क्षत्रियकुलावतंस

# छत्रपति शिवाजीमहाराज यांचें चरित्र


कृष्णराव अर्जुन केळूसकर

[ फ्रान्सचा जुना इतिहास, सेनेका व एपिक्टेटस यांचीं नीतिवचनें उपनिषदांचें भाषांतर, तुकारामबावाचें चरित्र, गौतमबुद्धाचें चरित्र, भगवद्गीतेवरील टीका, नीतिबोधमाला इत्यादि पुस्तकांचे कर्ते ]

यांनीं लिहिलें तें



मनोरंजन छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

मुंबई.

सन १९२०.




किंमत ४ रुपये



क्षत्रियकुलावतंस

## श्रीछत्रपति शाहूमहाराज

जी. सी. एस्. आय्., जी. सी. आय्. ई.,

जी. सी. व्ही. ओ; एल्‌एल्. डी.; इ. इ.

**करवीर-संस्थानाधिपति**

यांच्या चरणारविंदीं

**त्यांच्या महाप्रतापी पूर्वजाचें**

**हें जीवनवृत्त**

ग्रंथकर्त्यानें अत्यंत आदरबुद्धीनें, परमनम्रतापूर्वक व अतिकृतज्ञतेनें अर्पण केले आहे.

शिवरायाचें आठवावें रूप ।
शिवरायाचा आठवावा प्रताप ।
शिवरायाचा आठवावा साक्षेप ।
भूमंडळीं ॥

—रामदास

# प्रस्तावना.

मराठा प्रॉविडन्ट फंडाचे उत्पादक के. रा. रा. गोविंदराव कृष्णराव दळवी यांच्या मनात हे चरित्र लिहिण्याची कल्पना प्रथम आली होती. परंतु ते अल्पायु झाल्याकारणाने त्यांचा तो संकल्प असिद्ध राहिला. पुढे ह्या फंडाच्या चालकांनी प्रस्तुत लेखकास हे काम सांगितले. परंतु महाराष्ट्रातील एकदोन विद्वान् गृहस्थ शिवाजीमहाराजांचे चरित्र लिहीत आहेत असें कळल्यावरून, व केसरीपत्रकाराकडे शिवाजीमहाराजाच्या स्मारकासाठीं स. १८९५ पासून जमा होत असलेल्या हजारो रुपयांपैकी थोड्याशा रकमेचा विनियोग महाराजांचे एकादे चरित्र लिहवून छापण्याकडे होऊन ते सर्व लोकांस ख्रिस्तीधर्मपुस्तका-प्रमाणे अगदी अल्प किंमतीस विकत मिळण्याचा योग येईल असें वाटल्यावरून त्याने हे काम हाती घेतले नाही. परंतु पुढे सहा सात वर्षेपर्यंत ह्या विद्वानांकडून एकादे चरित्र प्रसिद्ध होईना, व केसरीकाराकडे जमलेली रकम तशीच पडून राहिली, असें पाहून आपण तरी आपल्या शक्तीप्रमाणे साधन अनुकूळ असलेल्या माहितीचा आधार घेऊन शिवरायाचे चरित्र लिहि-ण्याचा प्रयत्न करावा व परम प्रिय मित्राचा तदुद्देश सिद्धीस न्यावा असे त्याच्या मनात आले, आणि ह्या उद्योगास तो लागला. त्याचे हे फळ आज महाराष्ट्री-यांच्या पुढे ठेवण्यास तो समर्थ झाला याबद्दल त्यास अत्यानंद वाटत आहे. हें फळ लहान असून अपक्व आहे, किंवा यात असावा तसा गोड रस नाहीं, किंवा हे अगदीच बेचव आहे असें भिन्नरुचि वाचकाला कदाचित् वाटेल. परंतु एक कुशल बागवान् नुसते बी व खत जमा करण्यातच अद्यापि गुंतला आहे, व दुसरा देशांतराहून कलमें आणण्याच्या उद्योगात मग्न झाला आहे, तोंपर्यंत जे फारसे चोखंदळ नाहींत अशा साध्या जनाच्या क्षुधातृप्तीस हे फळ दुसऱ्या रसभरित फळाच्या अभावी थोडेसें तरी उपयोगी पडेल अशी उमेद आहे.

मराठ्यांचे नाव जगाच्या इतिहासात अजरामर करून ठेवणाऱ्या अशा ह्या महा-प्रतापशाली राष्ट्रीय वीराच्या अतुल पराक्रमांचें विस्तृत वर्णन स्वतंत्र चरित्र-लेखाच्या रूपाने करण्याच्या कामी महाराष्ट्रातील मोठमोठ्या विद्वान् ग्रंथकारांकडून आजपर्यंत आळस किंवा अनास्था कां झाली हें कळत नाहीं. पूर्वकालीन बखर-

कारांनी व कवींनीं शिवाजीमहाराजाचा चरित्रमहिमा आपआपल्या माहिती-प्रमाणें व शक्तीप्रमाणें इतका गाइला असता, आधुनिक विद्याचारसंपन्नतेच्या काळीं स्वदेश, स्वराज्य, स्वातंत्र्य इत्यादिकाविषयीं सदोदित विचार प्रकट करणाऱ्या पडितांकडून ह्या महापुरुषाविषयीं नुसता तोंडानें अभिमान प्रगट करण्यापलीकडे कांहींच होऊं नये हें चमत्कारिक दिसते. दुसऱ्याच्या स्वातंत्र्याचा अपहार करणाऱ्या किंवा स्वदेशाचा नाश करण्यास प्रवृत्त होणाऱ्या अनेक पुरुषाची चरित्रे मराठी भाषेत प्रसिद्ध व्हावीं, आणि ज्या प्रौढप्रताप वीरमणीने स्वदेशास स्वातंत्र्य मिळवून देण्याचे सुयश संपादिलें त्याचे सविस्तर चरित्र लिहिण्याची स्फूर्ति कोणालाहि होऊं नये यास काय ह्मणावे ? नाहीं ह्मणावयाला गुरुवर्य प्रो राजारामशास्त्री भागवत यानी शिवाजीमहाराजाचे एक लहानसें चरित्र पुष्कळ वर्षांपूर्वी लिहून प्रसिद्ध केलें होतें परंतु ते फारच त्रोटक होतें तसेंच, प्रकृत चरित्राची जाहिरात प्रसिद्ध झाल्यावर एक बहुतेक तेवढ्याच आकाराचे चरित्र घाईघाईनें छापून निघालें आहे परंतु शिवरायाच्या प्रतापकिरणांचा समावेश अशा लहानशा अवकाशात होणें शक्य नाहीं हें बहुश्रुत वाचकास सागावयास नकोच

प्रकृत चरित्रलेख लिहिण्याच्या कामी सांप्रत उपलब्ध असलेल्या एकंदर माहितीचा आधार घेतला असून त्यास साधेल तेवढें पूर्णत्व आणण्याचा प्रयत्न केला आहे त्याबद्दल शिवाजीमहाराजासंबंधाचे लेख लिहिणाऱ्या एकंदर नव्याजुन्या ग्रंथकाराचा प्रस्तुत लेखक ऋणी आहे. त्याला ज्या गोष्टी आज सत्य वाटल्या व ज्या क्रमानें त्या घडल्या अशी त्याची खात्री झाली, त्या गोष्टी त्या क्रमानें त्याने प्रस्तुत ग्रंथांत नमूद केल्या आहेत कित्येक पंडिताचें इतिहाससंशोधनाचें काम सांप्रत चालू आहे. त्यांचे शोध जगापुढे आल्यावर प्रकृत चरित्रलेखांत कांहीं दुरुस्ती करावी लागेल हें उघड आहे. परंतु तेवढ्यासाठीं अडून शंकाग्रस्त होऊन बसणें बरोबर नाहीं असें वाटल्यावरून हा लेख प्रसिद्ध केला आहे. यांत जे कांहीं दोष व न्यूनता अभिज्ञ वाचकांस दिसून येतील त्यांबद्दल ते लेखकास क्षमा करितील, व हें शिवरायाचें यशोवर्णन आहे हें लक्षांत आणून याचा यथोचित आदर करितील अशी उमेद आहे.

ह्या ग्रंथास आश्रय देण्याचें ज्या उदार गृहस्थांनीं आगाऊ अभिवचन दिलें त्यांचे येथें आभार मानणें उचित होय. आश्रयदात्यांस हें पुस्तक सातआठ

महिन्यापूर्वी मिळावयास हवें होते. परंतु अनेक अपरिहार्य अडचणींमुळें छापण्याचें काम लांबणीवर पडलें. तरी विनतिपत्रात जेवढा ग्रन्थ देण्याचें वचन दिलें होतें त्याच्या दीडपट मोठा ग्रंथ त्यांस पूर्वी ठरलेल्याच किंमतीस मिळाला आहे, हें लक्ष्यात आणून ते प्रस्तुत लेखकास ह्या दिरगाईबद्दल क्षमा करितील अशी आशा आहे हा ग्रंथ महाराष्ट्रीयास थोड्या किमतीस द्यावा अशी उत्कट इच्छा असल्याकारणानें तो इतका वाढला असूनहि मागाहून विकत घेणारांस त्याची किंमत त्या मानाने फारशी वाढविली नाहीं.

शेवटीं हे चरित्र तयार करण्यास अगदी दुर्मिळ व जुन्या ग्रन्थांचें साहाय्य रा रा गणपतराव कृष्णराव तिवरेकर, जे पी, रॉयल एशिआटिक सोसायटीचे लायब्रेरिअन, याच्या कृपेनें मिळालें त्याबद्दल त्याचे, मराठा प्रॉविडन्ट फंडाच्या चालकानीं प्रिय मातृभाषेची ही अल्पस्वल्प सेवा करण्याचा सुयोग आणून दिल्याबद्दल त्याचे, व शेट तुकाराम जावजी जे पी, निर्णयसागर छापखान्याचे मालक, यानी हे पुस्तक छापून प्रसिद्ध करण्याच्या कामी दिलेल्या सवलतींबद्दल त्याचे आभार प्रस्तुत लेखक मन पूर्वक मानितो.

ता २०, दिसेंबर, स १९०६ इ०
दादर, मुबई.

**चरित्रलेखक.**

# द्वितीय आवृत्तीची प्रस्तावना.

आज बरोबर चौदा वर्षांनीं ह्या चरित्रग्रंथास दुसऱ्या आवृत्तीचा योग आला आहे शिवाजीमहाराजासंबंधाचा अभिमान चोहोंकडे जागृत होऊन त्याच्या नावाचा सर्वत्र जयजयकार होऊं लागला तेव्हां आपणहि स्वसामर्थ्यानुरूप ह्या जयजयकारात अल्पस्वल्प भर घालावी अशा उद्देशानें प्रकृत लेखकानें हा चरित्र-लेखनाचा खटाटोप केला होता, आणि शिवरायाला लघुत्व व वैगुण्य आणणारे असे जे कित्येक निराधार व निरर्थक प्रवाद पुष्कळ दिवसापासून प्रचलित होते त्याची असत्यता योग्य पुराव्यानिशी स्थापित करण्याचा प्रयत्न त्याने केला होता हा प्रयत्न कित्येकाना न आवडावा हे साहजिक होतें परंतु प्रकृत लेखकाचे एतद्विषयक स्पष्ट अभिप्राय असत्य व निराधार आहेत असें सप्रमाण सिद्ध करण्यास कोणीहि समर्थ किंवा उद्युक्त झाला नाहीं, याचे नवल वाटतें यास्तव विरुद्ध पुराव्याच्या अभावी प्रथमावृत्तीतले अभिप्राय ह्या आवृत्तीत कायम ठेवावे लागले आहेत आपल्या लेखात प्रकट झालेली कित्येक मते काहीं जणास आव-डलीं नाहींत ह्मणूनच केवळ ती त्या लेखाच्या पुढील आवृत्तीतून काढून टाकणे कोणाहि सत्यनिष्ठ मनुष्यास सहसा योग्य वाटणे स्वाभाविक नाहीं ती खोटी ठरत तोंपर्यंत त्याचा अवलंब करणे अगदी बरोबर आहे

युरोपातल्या रणभूमीवर आमच्या मराठे बांधवानी आपल्या अंगचें शौर्य व पराक्रम उत्तम प्रकारें प्रकट केल्यावरून त्याची चोहोंकडे वाहवा झाली, आणि ह्या त्याच्या ठायींच्या युद्धोपयोगी गुणाचा प्रकर्ष पूर्वं काळी ज्या प्रौढ-प्रताप राजमणीच्या प्रोत्साहनाने व अलौकिक कर्तृत्वामुळें झाला होता त्याचें स्मरण आमच्या मराठे बांधवास विशेष प्रकारें होऊन त्याचें काहीं तरी शाश्वत स्मारक करावें असें त्याच्या मनात आलें, आणि तत्प्रीत्यर्थ फंड जमविण्यास ते लागले. तेव्हा प्रकृत लेखकाला असें वाटलें कीं, ह्या महातेजस्वी राजमणीच्या चरित्रासंबंधानें बऱ्याच पाश्चात्य इतिहासज्ञाचा जो विपरीत ग्रह

झाला आहे तो काढून टाकण्याचा प्रयत्न केल्यावाचून त्याच्या स्मारकास निर्दोष स्वरूप प्राप्त होणार नाहीं म्हणून त्यानें आपल्या ह्या ग्रथाचें इंग्रजी भाषातर करविण्याचा निश्चय केला, आणि हा त्याचा निश्चय त्याचे विद्वान् मित्र प्रो नी स. ताकखाव, एम् ए याच्या साहाय्याने सिद्धीस जाऊन हा भाषातररूप ग्रथ आता एकदोन महिन्यात प्रसिद्ध होण्याचा योग आला आहे आता आमच्या महाराष्ट्रीय जनासहि शिवरायाचे साद्यत चरित्र वाचण्याची इच्छा होणे स्वाभाविक असल्याकारणाने त्याच्यासाठी प्रकृत लेखकाने आपल्या ग्रथाची ही द्वितीय आवृत्ति प्रसिद्ध करण्याचे धाडस केले आहे हा चरित्रग्रंथ वाचून शिवरायाविषयी महाराष्ट्रीयाच्या व विशेषत मराठे बाधवाच्या ठायी यथार्थबुद्धि व खरा अभिमान जागृत झाल्यान त्याच्या स्मारकाच्या कार्यास मनापासून साहाय्य करण्यास उदारधी पुरुष उद्युक्त होतील, आणि पंचवीस वर्षापूर्वी अशाच कार्यासाठी एक मोठा फड जमा होऊन तो जमा करणाराच्या ठायी शिवरायाविषयी खरा अभिमान वसत नसल्याकारणाने व प्रामाणिकपणाचा अभाव असल्याकारणाने जमलेली मोठी रकम गडप होऊन स्मारककार्य असिद्ध राहिले, तसा प्रकार पुनरपि होणार नाही असा पक्का भरवसा आहे.

ही आवृत्ति अर्थात् गेल्या चादा वर्षाच्या अवधीत इतिहाससशोधकानी प्रसिद्ध केलेल्या बहुतेक माहितीचा उपयोग करून सुधारून वाढविली आहे. ह्याबद्दल ह्या इतिहाससशोधकाचा प्रकृत लेखक ऋणी आहे ह्या सर्वामध्यें बगालचे सुप्रसिद्ध इतिहासकार प्रो. जदुनाथ सरकार याचे ऋण फारच मोठे आहे. शिवरायाच्या चरित्रासबधाची जी माहिती आजपर्यंत अनुपलब्ध होती ती ह्या विद्वान् इतिहासकाराच्या स्तुत्य परिश्रमामुळे इंग्रजी वाचकास त्यानी लिहिलेल्या शिवरायाच्या चरित्राच्या द्वारें उपलब्ध झाली आहे ह्या त्याच्या बहुमोल माहितीच्या आधाराने प्रकृत प्रयास बरेच पूर्णत्व आले आहे

ह्या चरित्रलेखाच्या पथमावृत्तीस करवीर सस्थानाचे अधिपति **श्रीछत्रपति शाहूमहाराज सरकार, श्रीमत महाराज बापुसाहेब कागलकर** आणि **श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड** सरकार यानीं उदार आश्रय दिला होता, ह्याबद्दल लेखक त्याचा ऋणी आहे आमच्या इलाख्याच्या शिक्षणखात्याच्या अधिकाऱ्यानीं हा ग्रंथ लायब्रऱ्यात ठेवण्यास लायक आहे असें ठरविलें होतें, आणि दक्षिणा प्राईझ कमिटीकडून लेखकास पारितोषिक मिळालें होतें. यास्तव ह्या अधिकाऱ्याचेहि आभार मानणें उचित होय.

त्या ग्रंथाची ही आवृत्ति सुधारून वाढविल्यामुळे तींत शंभरसवाशें पृष्ठांचा नवा मजकूर घालावा लागला तरी कागदाच्या विलक्षण महर्गतेस्तव बारीक टाईप योजून ग्रथाची पृष्ठसंख्या फारशी वाढूं दिली नाहीं. छपाईच्या एकंदर साहित्याच्या किमती चौपटपाचपट वाढल्यामुळें व मजुरीचे दरहि तिप्पट वाढल्यामुळें त्या ग्रथाची किंमत मोठी ठेवणें भाग पडलें आहे, तरी किंमतीच्या भारीपणास्तव शिवरायाचा खरा अभिमान बाळगणारानीं त्या चरित्रात्मक ग्रंथास आश्रय देण्यास माघार घेऊं नये, अशी त्यांस नम्रतेची विनंति आहे.

हा ग्रंथ छापत असता तपासण्याच्या कामी माझे मित्र रा रा. विठ्ठलराव जिवाजी नाडकर्णी, मनोरजन मासिक पुस्तकाचे सपादक, यानी उत्तम साहाय्य केलें याबद्दल लेखक त्याचा फार आभारी आहे त्याप्रमाणेंच हा ग्रथ छापावयास लागणारे द्रव्यसाहाय्य मराठा प्रॉव्हिडन्ट फंडाचे चालक, आणि माझे परमस्नेही रावसाहेब हरिश्चंद्र विश्राम राजवाडकर जे. पी , रा रा यशवंतराव तानाजी माणगावकर व रा रा रामचद्रराव अर्जुन गोळे यानीं दिलें याबद्दल लेखक त्याचा फार आभारी आहे शेवटीं शिवरायाविषयी वास्तविक अभिमान वाहणाऱ्या महाराष्ट्रीयास एवढीच विनंति आहे कीं, प्रकृत चरित्रलेखांत काहीं अपूर्णता व दोष अद्यापि त्यांस दिसतील त्याबद्दल लेखकास गय करून "हें शिवरायाचें चरित्र आहे यास्तव हें स्वत· वाचून आपल्या पुढील पिढीला वाचावयास मिळावें ह्मणून संग्रहीं ठेवण्याचें त्यानीं अवश्य मनावर घ्यावें आणि लेखकाच्या परिश्रमाचें चीज करावें

चरित्रलेखक.

ता. २०, दिसेंबर स. १९२०
दादर, मुंबई.

# अनुक्रमणिका.


| विषय. | पृष्ठ. |
|---|---|
| **भाग पहिला**–पूर्ववृत्त . | १ |
| **भाग दुसरा**–शहाजीराजे याचें वृत्त ... | १५ |
| **भाग तिसरा**–शिवाजीमहाराजाचें बाळपण... .. .. | ५२ |
| **भाग चवथा**–शिवाजीमहाराजाचे शिक्षण ... | ६७ |
| **भाग पांचवा**–स्वराज्यस्थापनेची सिद्धता ... ... | ८३ |
| **भाग सहावा**–स्वराज्यस्थापनेला आरभ ... . . | ९० |
| **भाग सातवा**–स्वसत्तावृद्धि. | १०८ |
| **भाग आठवा**–पितृसकट-निवारण . ... | ११८ |
| **भाग नववा**–मोगलाशी सबध | १२८ |
| **भाग दहावा**–विजापूरकराचा आणखी मुलूख काबीज करितात . | १३६ |
| **भाग अकरावा**–अफझुलखानाचा वध. ... . ... | १४९ |
| **भाग बारावा**–विजापूरसरकाराच्या दुसऱ्या सरदाराचा पराभव | १७४ |
| **भाग तेरावा**–विजापूरसरकारास हतवीर्य केलें. ... ... | १९१ |
| **भाग चवदावा**–पितृदर्शन. | २०० |
| **भाग पंधरावा**–आरमार व समुद्रांतील किल्ले. ... .. | २०८ |
| **भाग सोळावा**–मोगलांच्या राज्यात स्वाऱ्या व शास्ताखानाची मोहीम. ... ... ... | २१५ |

| विषय | पृष्ठ |
|---|---|
| **भाग सतरावा**–सुरत, बार्मिलोर वगैरे शहराची लूट. ... | २३५ |
| **भाग अठरावा**–मिर्झाराजा जयसिंग याची स्वारी | २४७ |
| **भाग एकुणिसावा**–आग्र्यास प्रयाण . . ... | २७५ |
| **भाग विसावा**–गेलेले किल्ले व प्रात परत घेतले. . ... | ३०२ |
| **भाग एकविसावा**–मोगलांच्या मुलखात पुन स्वाऱ्या ... | ३१९ |
| **भाग बाविसावा**–विजापूरकराशी पुन युद्धप्रसग ... | ३४४ |
| **भाग तेविसावा**–राज्याभिषेक | ३५७ |
| **भाग चोविसावा**–राज्य-व्यवस्था .. .. | ३७८ |
| **भाग पचविसावा**–मोगलाशीं व विजापूरकराशी पुन कलह | ४१५ |
| **भाग सव्विसावा**–कर्नाटकातील मोहीम, .. ... | ४२६ |
| **भाग सत्ताविसावा**–मोगलाशीं शेवटले युद्धप्रसंग... | ४७१ |
| **भाग अठ्ठाविसावा**–इंग्रज व शिद्दी. ... ... ... | ४९० |
| **भाग एकुणतिसावा**–सज्जन-सेवा. ... . ... | ५१४ |
| **भाग तिसावा**–अतकाळ. | ५४० |
| **भाग एकतिसावा**–दौलतीचा हिशोब. ... ... . | ५५० |
| **भाग बत्तिसावा**–गुणदोषविवेचन. ... ... ... | ५५८ |

# छत्रपति शिवाजी महाराज.



## भाग पहिला.



### पूर्वजवृत्त.

प्रौढप्रतापनिधि क्षत्रियकुलावतंस छत्रपति शिवाजीमहाराज यांचें जन्म भोसलेनामक एका नामांकित कुलांत झालें हें क्षत्रियघराणें देवराजजी महाराणा या नावाच्या एका रजपूत राजानें महाराष्ट्रांत स्थापिलें ह्या महाराण्याची पूर्वपीठिका येणेंप्रमाणें आहे अयोध्याप्रांतांत शिसोदे नावाचे सूर्यवंशीय राजे राज्य करीत असत त्यांपैकीं कोणी पुरुष नर्मदानदीच्या दक्षिणतीरीं येऊन तेथें स्वतंत्र राज्य संपादून राहिला पुढें शालिवाहननामक शककर्ता राजा झाला. त्यानें ह्या पुरुषाच्या वंशांतील एका राजाला पराजित करून त्याचें राज्य हरण केलें त्या समयीं राजपत्नी आपला एक पांचसहा वर्षांचा पुत्र घेऊन नर्मदा-नदीच्या उत्तरभागीं मेवाडप्रांतांत विंध्याद्रिपर्वताजवळ गेली, आणि तेथें एका ब्राह्मणाच्या घरीं आपल्या पुत्रास गाई राखावयास ठेवून त्याच्या आश्रयानें राहिली ह्याप्रमाणें गोरक्षण करीत असतां ह्या मुलास एके जागीं पुरलेलें पुष्कळ द्रव्य सांपडलें तें त्यानें त्या ब्राह्मणास दाखवून आपण कोण कोठून आलों वगैरे सर्व वर्तमान विदित केलें मग त्या ब्राह्मणानें त्यास स्वराज्यस्थापनेच्या कामीं मनापासून साहाय्य केलें तो पहाडी मुलूख भिल्लांच्या हातीं होता त्यांशीं लढून त्यांनीं त्यास पादाक्रांत केलें, व त्या पहाडांत एके स्थलीं भवानीचें देवालय होतें त्याजवळ एक किल्ला बांधून त्याचें नांव चित्रकूट असें ठेविलें भवानीच्या देवालयाचा जीर्णोद्धार करून त्या किल्ल्यांत आणखी एकलिंगजी सांबाचें देवालय त्यांनीं बांधिलें ह्या पुरुषाच्या वंशजांनीं चित्रकुटास पांचशें वर्षें राज्य केलें, असें ह्मणतात. हा चित्रकूट किल्ला चितोड ह्या नावानें पुढें इतिहासांत प्रसिद्ध झाला.

पुढें दिल्लीस यवनी पादशाहत झाली तेव्हां यवन बादशहांचीं व रजपूत राजांचीं वारंवार युद्धें होऊं लागलीं. कित्येक हिंदुराजे यवनशत्रूंपुढें हतवीर्य होऊन त्यांचे अंकित होऊन राहिले. चितोडच्या रजपूतराजांशींहि ह्या दिल्लीच्या

बादशहानीं अनेक वेळां घोर संग्राम केले, परंतु त्यानी शत्रूंस पुष्कळ वर्षें मुळींच दाद दिली नाहीं. स्वराज्य व स्वातंत्र्य याचें रक्षण त्यानीं मोठ्या शौर्यानें केलें. स १२७५ च्या सुमारास चितोडच्या गादीवर लक्ष्मणसिहनामक महाराणा बसला त्याचा चुलता भीमसिंग राज्यकारभार पाहत असे ह्या भीमसिंगानें पद्मिणी नावाच्या एका अतिलावण्यवती स्त्रीशी विवाह केला होता ही स्त्री त्यानें सिंहलद्वीपाहून आणविली होती असें ह्मणतात ह्या रूपवती स्त्रीच्या लोकोत्तर सौंदर्याची वार्ता अल्लाउद्दीन खिलजीनामक दिल्लीच्या बादशहाच्या कानीं जाऊन तिचा अभिलाष त्याने धरिला, आणि प्रबल सेनेनिशी मेवाडप्रातात स्वारी करून चितोड किल्ल्यास वेढा दिला आतील रजपूत शत्रूशी मोठ्या शौर्यानें लढले ते त्यास कैक दिवसपर्यंत मुळीच हार गेले नाहींत, परतु अल्लाउद्दीन काहीं केल्या वेढा उठवीना त्याच्या प्रचड सैन्याचा गराडा किल्ल्यासभोवती एकसारखा पडला होता तेव्हा राजानें निरुपाय होऊन असा बेत केला कीं, किल्ल्यातील एकंदर रजपुतासह शत्रुसैन्यावर एकदम हल्ला करून धारातीर्थी पतन पावावे हा बेत त्याच्या पदरच्या एकूणएक शूर रजपुतास पसत झाला पण त्या वेळी राजास असा एक विचार सुचला की, मेवाडच्या शिसोदेवंशाचा समूळ उच्छेद होणें इष्ट नाही तो कायम राहण्यास काही तरी उपाय योजिला पाहिजे त्याचे बारा पुत्र होते. ते सगळे समरयज्ञात स्वप्राणाची आहुति देण्यास सिद्ध झाले होते लक्ष्मण-सिहाचे आपल्या द्वितीय पुत्रावर इतराहून विशेष प्रेम होते ह्या पुत्राचे नाव अजयसिह असें होते त्याला राजानें असें सागितले कीं, आमच्या घराण्याचें निर्मूलन होणे इष्ट नाही यास्तव तू अरवलीपर्वतात कैलवाडा ह्मणून एक बिकट स्थल आहे तेथे पळून जाऊन स्वप्राणाचे रक्षण करावे ही सल्ला त्या वीर्यशाली पुत्रास पसत होईना, परतु पित्याचा फारच आग्रह पडल्यामुळे हा अजयसिंह निरुपायास्तव पित्राज्ञेप्रमाणें कैलवाडा येथे जाऊन राहिला इकडे राजा आपल्या

१ ही पद्मिणी लक्ष्मणसिहाची राणी होती असे कित्येक बखरात आढळते

२ चिटणिसकृत बखरीत असे ह्मटले आहे की, लक्ष्मणसिह आपल्या सर्व लोकानिशीं शत्रूशी अखेरचा सग्राम करून गतप्राण झाला, तेव्हा त्याच्या पत्नीने किल्ल्यातून आरमसिहजी व सजनसिहजी अशा दोन राजपुत्रासह पलायन करून भिल्लाचा आश्रय धरिला पुढे हे राजपुत्र वयात येऊन मोठे पराक्रमी निपजले, व त्यानी चितोड वगैरे ठिकाणे यवनापासून परत घेतली प्रतापसिह महाराजानी तयार केलेल्या वशावळींत लक्ष्मणसिहाच्या ह्या दोनच पुत्राची नावे दिलीं आहेत आरमसिहाच्या ऐवजीं अरसीसग असे नाव तीत आहे 'सिंह' ह्या शब्दाचा सिग हा अपभ्रंश आहे.

आप्तजनासह शत्रूच्या सैन्यावर तुटून पडला. ह्या रणकंदनात चौदाशें रजपूत प्राणांस मुकले. किल्ला शत्रूच्या हातीं लागला आतील सर्व चीजवस्त यवनानी लुटून नेली व सर्व राजचिन्हाचें हरण केलें किल्ल्यात एक भव्य नौबत होती ती व किल्ल्यास पंचरसी दरवाजे होते ते त्यांनी काढून नेले

अजयसिहाने वर सागितल्याप्रमाणे पळून जाताना आपल्या ज्येष्ठ बंधूचा अल्पवयी पुत्र हम्मीरसिह यास बरोबर नेलें होते पुढे त्यानें लोकाची जमवाजमव करून आपले बरेंच राज्य पुन काबीज केले हम्मीरसिह वयात येऊन मोठा पराक्रमी निपजला अजयसिह मोठा धर्मशील असून त्याचे ह्या आपल्या पुतण्यावर फार प्रेम असे यास्तव त्याने त्याला वडिलाच्या गादीवर बसवून आपण त्याचा कारभार पाहूं लागला त्यानी राजनगर ह्मणून एक दुसरा किल्ला बाधून तेथे आपली गादी स्थापिली कारण चितोड येथील नौवत वगैरे राजचिन्हें शत्रूच्या हाती गेली होती ती परत मिळवीपर्यंत त्या किल्ल्याची पायरी चढावयाची नाहीं अशी त्यानी प्रतिज्ञा केली होती ज्या शत्रूंच्या पायीं आपल्या घराण्याचा असा भयकर सहार झाला, व वडिलाच्या राजधानीचा असा धुव्वा उडाला, त्याचा पुरा पराभव करून सूड उगवीपर्यंत आपली निशाणें मागे चालवावी, ताटात भोजन करूं नये, पलंगावर निद्रा करूं नये, श्मश्रू करूं नये, असा त्यानी नियम केला हा यवनद्वेष त्या शिसोदे राजवशाने पुढे असाच चालविला त्यानी जागजागी आपली ठाणी बसवून व नवीन किल्ले बाधून स्वसत्तावृद्धि पुष्कळच केली, व उदेपूर येथे आपली गादी स्थापून स्वत्व रक्षण केले.

अजयसिह मरण पावल्यावर त्याचा पुत्र सजनसिह याने असे मनान आणिलें कीं, राज्यविभागाकारणे आपल्या चुलतभावाशी कलह करीत बसण्यात कांहीं अर्थ नाहीं, तर स्वबाहुबलेकरून नूतन राज्य सपादन करण्यात वास्तविक पुरुषार्थ आहे, असा पोक्त विचार करून हा शूर पुरुष दक्षिणेकडे आला त्यानें सोंधवाड प्रात काबीज करून तेथे आपली गादी स्थापिली ह्या महाराण्याच्या वंशात दिलीपसिहजी महाराणा, सिहजी महाराणा[१], भोजासी महाराणा, व देवराजजी महाराणा असे राजे अनुक्रमे झाले. ह्या सर्वांनी यवनांशी सतत युद्धें करून स्वराज्य कायम राखिले, परतु पुढे देवराजजी महाराणा यवनाच्या सतत होणाऱ्या त्रासानें जेरीस येऊन, स्वराज्याचा त्याग करून दक्षिणदेशी आला, व कृष्णा आणि भीमा ह्या नद्याच्या तीरीं पाळेगारी करून कसाबसा योगक्षेम

---

१ ह्याचें नांव शिवाजी महाराणा असे इतरत्र आढळते.

करूं लागला दक्षिणेंत आल्यावर त्याने आपले नाव यवनभीतीने पालटलें आणि आपणास भोसावंत भोसले असें ह्मणवूं लागला ह्या शूर पुरुषाच्या मनांत ह्या प्राती साधल्यास पुन स्वराज्य स्थापावयाचे होते परतु जिकडे-तिकडे यवनाचे प्राबल्य झालें असल्याकारणानें त्याचा हा उद्देश सिद्धीस गेला नाहीं. तेव्हा शेवटी त्यास सिगणापूरची पाटीलकी मिळवून स्वस्थ राहावें लागलें

ह्याच्या वंशजानीं पुढे खानवट, हिगणी, बेरडी, देऊळगाव, जिती, वेरूळ, बनसेंद्र, कळसवावी, मुंगीपैठण, नानजव इत्यादि गावाच्या पाटीलक्या खरेदी केल्या ह्या देवराजजीची वंशपरपरा येणेप्रमाणे आहे इंद्रसेन, शुभकृष्णजी, रूपसिहजी, भूमींद्रजी, धापजी, बरहटजी[1], खलोजी[2] ऊर्फ खलकर्ण, कर्णसिहजी ऊर्फ जयकर्ण, सभाजी आणि बाबाजी ऊर्फ शिवाजी ह्या बाबाजीचे जन्म सन १५३३ त झालें[3] बाबाजी मोठा सदाचारी व धर्मशील

---

१ चिटणिसाच्या वशावळात याचे नाव बरबटजी असे दिले आहे

२ इतरत्र खेलोजी असे नाव आहे

३ ही वशावळ चिटणीसकृत बखरींतून घेतली आहे ही सातारचे छत्रपति प्रतापसिह महाराज याना तयार करविलेल्या वशावळीशा ततोतत जुळते ही वशावळ हल्ली छत्रपति शाहुमहाराज, सस्थान करवीर, याच्या आश्रयाने कोल्हापुरास छापून प्रसिद्ध झाली आहे राजस्थानचा प्रख्यात इतिहासकार टॉड याने आपल्या ग्रथात मेवाडच्या भाटा कडून मिळालेल्या शिवाजीच्या वशावळीचा उल्लेख केला आहे तोही सदरील वशा वळीशी बराच जमतो ह्या वशावळीचा अनुक्रम येणेप्रमाणे आहे लक्ष्मणसिह, अजयसिह, सजनसिह, दिलीपसिह, शिवाजी, भोसजी, देवराजजी, उग्रसेन, माहुलजी, खेलोजी, जनकोजी, सतुजी, सभाजी, आणि शिवाजी ऊर्फ बाबाजी ह्या वशावळीचा उल्लेख सदरील इग्रज ग्रथकाराने ज्या ठिकाणी केला आहे तेथे तो येणेप्रमाणें ह्मणतो 'ह्या सजनसिहाच्या वशात पुढे एक महापुरुष निर्माण होऊन हिदुस्थानातील यवन-पादशाहती उलथून टाकील, व त्याच्या पूर्वजाची जी दुर्दशा यवनानी केली होती तिजबद्दल त्याचा चागलाच सूड उगवील, असा योगायोग होता. कारण सातारच्या गादीचा मूळस्थापक जो शिवाजी तो ह्या सजनसिहाच्या वशात उत्पन्न झाला.' मूळात दिलेल्या वशावळीच्या सत्यतेस एवढा पुरावा पुरे आहे. राजस्थानातील भाटाच्या तोडच्या राजप्रशस्ति सुद्धा कृत्रिम असून त्या शिवाजीमहाराजाचा दरारा व वैभव यामुळेंच केवळ अस्तित्वात आल्या, त्या वस्तुत पाहता सत्य नव्हेत, असा तर्क जे करीत असतील त्याचा तो तर्क निराधार आहे, असें ह्मणण्यास हरकत नाही. एकदरीत पाहता शिवाजी महाराजाच्या पूर्वजासबधानें माहिती देताना बहुतेक बखरकारानी वाटतील तसे प्रवाद जमेस धरून काहीं तरी जंत्री जुळवून दिली आहे. यास्तव त्या परस्परविरुद्ध असल्या तर त्यांत काही नवल नाही. अशापैकीं काहीं येथें नमूद करितो-

होता ह्याला मालोजी व विठोजी असे दोन पुत्र होते मालोजी

श्रीशिवदिग्विजयनामक बखरीत महाराजाचे वशवृत्त येणेप्रमाणे दिले आहे शिसोदे भोसल्याच्या कुळात उदेसिग नामेकरून कोणी राज्यस्थापक निर्माण झाला त्यानें उदेपूरनगर वसविले याच्या वशातील एका पुरुषास चितोडकिल्ला एका यवनपादशहाकडून मिळाला त्या किल्ल्यावर त्याने आपले राज्य स्थापिले ह्या किल्ल्यावर एक फार मोठी पचरसी नौबत होती ती तेथला राजा सामोपचाराने देईना ह्मणून दिलीच्या बादशहाने त्याच्यावर स्वारी करून चितोड किल्ल्यास मोठ्या सैन्याचा गराडा दिला. तेव्हा निरुपाय होऊन पधरावीसहजार रजपूत शत्रूवर चालून जाऊन सगळे रणात पडले. ती नौबत, किल्ला व एकदर मालमत्ता बादशहाच्या हाती लागली ह्या गर्दीत काकाजी भोसले ह्मणून एक राण्याचा चुलता कारभारी होता, तो आपले कुटुब व राजपत्नी यास घेऊन किल्ल्यातून चोरवाटेने निघून गेला व उदेपुरच्या राण्याचा आश्रय धरून राहिला ह्या वेळी राजपत्नी गरोदर होती तिला पुढे पुत्र झाला त्याचे नाव चद्रसेन असे ठेविले उदेपूरच्या राण्याने ह्या आपल्या आप्तास काही मुलूख तोडून दिला पुढे चद्रसेन वयात आला तेव्हा ह्या काकाजीचे व त्याचे पटेना ह्मणून काकाजीस तेथून पळून जावे लागले तो दक्षिणेत येऊन दौलताबादसरकारचा आश्रय करून, हिंगणी, बेरडी, देऊळगाव, वेरूळ इत्यादि गावाच्या पाटीलक्या खरेदी करून तेथे सुखवस्तु राहिला ह्या काकाजीच्या वशात बाबाजी निर्माण झाला मराठी साम्राज्याच्या बखरीत हे वशवृत्त येणेप्रमाणे दिले आहे भोसल्याच्या कुळाचा मूळपुरुष शिवराव चितोडकर उदेपुरी राहत होता यास पुत्र तीन–रामराव, उदेसिग व भीमसिग अकबराने उदेपुरावर स्वारी करून युद्ध केले तेव्हा रामराव व उदेसिग हे रणात पडले, व भीमसिग याने उदेपुरच्या राण्यास भोसच्या किल्ल्यात नेऊन ठेविले. ह्या किल्ल्याच्या नावावरून त्याच्या वशास भोसले असे उपनाव पडले ह्या भीमसिगास विजयभान व रायभान असे दोन पुत्र होते रायभानाचा वश चितोडास राहिला; व विजयभानाचा पुत्र खेळकर्ण हा चितोडाहून महाराष्ट्रात आला त्याच्या वशजाचा अनुक्रम येणेप्रमाणे आहे खेळकर्ण, जयकर्ण, महाकर्ण, शिवाजी (हा भीमातीरी भीमखेटमाहुली येथे डोहात बुडून मेला), बाबाजी भोसला, हा वेडसर होता भिडेकृत शिवाजीमहाराज याच्या वशाच्या व अष्टप्रधानाच्या इतिहासात अशी माहिती दिली आहे की, मूळपुरुष सजनसिह महाराणा हा उदेपुरानजीक चितोडे शहरी राहत असे. यास दिलीपसिह, सिहाजी व भोसाजी असे तीन पुत्र होते त्यापैकी भोसाजी हा चितोडानजीक भोसावत ह्मणून एक गाव आहे तेथे येऊन राहिला त्यावरून त्यास भोसले हे उपनाव प्राप्त झाले ह्या भोसावताचे भाऊबद कोणी खेळकर्ण व मालकर्ण असे होते ते अहमदनगरच्या बादशहापाशी चाकरीस राहिले यास लोक खेलोजी व मालोजी असे ह्मणू लागले यास त्या बादशहाकडून प्रत्येकी पधराशें स्वाराच्या नेमणुका मिळाल्या. चाकणचौऱ्याशी, पुरदरपरगणा व सुपेमहाल हे त्यास सरजामादाखल मिळाले पुढें खेलोजी एका लढाईत पडला, व मालोजी चाकसमानी ह्या गावी डोहात बुडून मरण पावला. मालोजीचा बाबाजीनामक एक मुलगा होता. तो अल्पवयी असल्याकारणानें

स. १५५० त जन्मले, व विठोजी स १५५३ जन्मले. हे मोठे हुशार व सद्गुणी निपजले हे वयांत येऊन संसार पाहूं लागले असता देऊळगांवच्या शेतकऱ्याचे व याचे जमिनीसबंधाने तंटे उपस्थित होऊन त्याशीं त्याचें पटेना यास्तव ते दौलताबादेजवळ वेरूळ गावीं येऊन राहिले परंतु शेतकीच्या रडक्या उत्पन्नावर निर्वाह करण्याऐवजी आपल्या आगची धमक व हुशारी याचे योग्य चीज होईल असा काहीं तरी व्यवसाय पाहावा असे त्याच्या मनात येऊन त्यानी सिदखेडच्या लुखजी जाधवरावाच्या पदरी प्रथमत पायबारगिरीची नोकरी धरिली हा जाधवराव देवगिरीच्या यादवाचा वंशज असून सिदखेडचा देशमुख होता अहमदनगरच्या निजामशाहींत याला बारा हजार स्वाराची मनसब होती, व ह्या फौजेच्या खर्चासाठी त्याला त्या सरकारातून जहागीर मिळाली होती. त्याचे त्या सरकारात मोठे वजन असून त्याच्यासारखे बलाढ्य व शूर सरदार त्या वेळी निजामशाहींत फारच थोडे होते जाधवरावाने मालोजी व विठोजी यास मोठ्या आनदाने आश्रय दिला प्रत्येकास पाच होन पगार देऊं करून शिवाय त्यानी आपल्या पक्तीस भोजन करावे असे त्याने ठरविले ही गोष्ट स. १५७७ त घडली.

---

मालोजीचा सरजाम जप्त झाला बाबाजीची आई त्यास घेऊन वेरूळधुमेश्वर येथे जाऊन राहिली बाबाजी वयात आल्यावर देऊळगाव, खानवटे, जिती वगैरे गावाच्या पाटीलक्या खरेदी करून त्याची व्यवस्था गुमास्ते ठेवून तो करू लागला. ह्याप्रमाणे बाबाजी भोसल्यापर्यतच्या वशावळीसबधाने अनेकाचे अनेक तर्क आहेत छत्रपति प्रतापसिह याना तयार केलेली वशावळ इतराहून विशेष ग्राह्य व विश्वसनीय वाट ल्यावरून तिचाच आधार मुळात घेतला आहे

१ शेडगावकराच्या बखरात हा जन्मशक १५५२ दिला आहे

२ मि किंकेड व रा ब पारसनीस यानी आपल्या मराठ्याच्या इतिहासात मालोजी व विठोजी याची ही हकीकत शेडगावकराच्या बखरीच्या आधाराने अशी दिली आहे कीं, हे दोघे बधु प्रथम फलटणचा सरदार जगपतराव ऊर्फ वणगपाळ याच्या पदरी नोकरीस राहिले तेथे ते आपल्या आगच्या कर्तबगारीच्या व शौर्यवीर्यादि गुणाच्या योगानें मोठ्या योग्यतेस चढले एके समयी ते आपल्या धन्याबरोबर एका तलावात स्नान करावयास उतरले असता त्याच्यावर विजापूरकराच्या लोकानीं हल्ला केला. त्या समयी उभय पक्षाचे युद्ध झालें. त्यात मालोजी व विठोजी यानी मोठ्या शौर्यानें लढून शत्रूस पिटाळून लाविलें. ह्या त्याच्या शौर्याची वार्ता पहिला मूर्तिजानिजामशहा याच्या कानीं गेल्यावरून त्यानें त्यास बोलावून आणून आपल्या पदरीं सरदाऱ्या दिल्या.

# मालोजीराजे यांचें वृत्त.

मालोजी शरीराने मोठा मजबूत व धिप्पाड असे, तो इतका कीं, त्याच्या स्वारीस घोडें टिकत नसे यास्तव जाधवरावानें त्याला आपल्या देवडीवर ठेवले तो मोठा चतुर, हुशार व गुणी असल्यामुळे जाधवरावाचा त्याच्यावर लवकरच लोभ जडला त्याने त्यास मूर्तिजानिजामशहापाशी नेऊन, हा मोठा नेकीचा व उमदा पुरुष आहे, अशी त्याची शिफारस केली बादशहानें त्याची इभ्रत व हुशारी पाहून खुष होऊन त्याला आपल्या लष्करात शिलेदारी दिली मग मालोजी घरची घोडी व बारगीर ठेवून निजामशहाची नोकरी करू लागला. तरी तो जाधवरावाचा अकितच होता असे दिसतें

मालोजीचे लग्न फलटणचा देशमुख जगपाळराव निबाळकर याच्या बहिणीशी झाले हिचे नाव दिपाबाई असे होते वर सागितल्याप्रमाणे त्याला बढती मिळाल्यावर त्याचा ससार चागला थाटला त्याचा भाऊ विठोजी ह्यासही शिले-दारी मिळाली होती ह्या विठोजीस आठ पुत्र झाले, परतु मालोजीस काहीं एक संतति होईना आपल्या पोटी मूल नाहीं ह्मणून दिपाबाईस अतिशयित वाईट वाटं लागलें त्या दंपत्याने पुत्रप्राप्तीसाठी पुष्कळ दानधर्म, अनुष्ठाने व नवससायास केले शेवटीं त्याने नगरचा पीर शहाशरीफ यास नवस केला प्रत्येक गुरुवारी मालोजी फकिरास दानधर्म व खैरात करीत असे असा क्रम त्याने सतत सहा महिने चालविला तेव्हा सुदैवाने दिपाबाई गरोदर होऊन स १५९४ त तिला प्रथम पुत्ररत्न झाले हा पुत्र आपणास त्या पिराच्या अनुग्रहाने प्राप्त झाला असें मानून मालोजीने त्याचे नाव शहाजी असें ठेविले नंतर दुसरा मुलगा झाला. त्याचें नाव शरीफजी असें ठेविले

शहाजी हा चागला देखणा असून मोठा चलाख, हुशार व गुणी होता त्याची वाणी मधुर असून चालचलणूक फारच मोहक असे ह्या मुलाची चालचर्या पाहून

---

१ एकदोन बखरीत असे आढळते की, मालोजी जाधवरावाने दिलेल्या कामगि-रीने सतोष न पावून तो फलटणचा निबाळकर जगपाळराव याजकडे गेला त्याने त्याची हुशारी पाहून आपली बहीण दिपाबाई ही त्याला दिली. पण त्यानें ह्या वेळी जाधवरावाचा आश्रय सोडला होतासे दिसत नाहीं मि किकेड व रा ब पारसनीस शेडगावकराच्या बखरीच्या आधारानें असे ह्मणतात की, लुखजी जाधवरावाच्या शिफारशीवरून ह्या जगपतरावानें ( जगपाळरावानें ) आपली बहीण मालोजी-राजांस दिली.

२ त्यांपैकीं नागोजी याचे वंशज बनसेंद्रे येथें अद्यापि आहेत.

जाधवरावास मोठे कौतुक वाटे तो त्याला आपल्या घरीं वेळोवेळा घेऊन जाई व त्याला वस्त्राभरणें देऊन नटवीसजवी, असे त्याचे अनेक प्रकारें लाड करी. जाधवरावाला जिजाऊ नावाची दोनतीन वर्षांची एकुलतीएक मुलगी होती तिच्या बरोबर शहाजी तासाचे तास खेळे. अशी ह्या मुलाची मैत्री बाळपणापासूनच जमली होती. शहाजी पाच वर्षांचा असता शिमग्याचा सण आला जाधवरावाने रगपंचमीचा समारभ करून मातबर लोकास व आप्तास आपल्या घरी आमत्रण केले इतराबरोबर मालोजीसहि आमंत्रण मिळाले त्यावरून तो शहाजीस घेऊन समारभास गेला. जाधवरावाने शहाजीस हाक मारून आपल्या जवळ बोलाविले तो जाऊन त्याच्या माडीवर बसला इतक्यात जिजाऊ घरातून धावत येऊन आपल्या बापाच्या दुसऱ्या माडीवर बसली दोन्ही मुले बहुतेक समानवय व गोजिरवाणीं पाहून जाधवराव सहज लडिवाळपणाने बोलला 'मुली, हा तुला नवरा पाहिजे काय ? खरोखर हा जोडा योग्य दिसतो ' इतक्यात हीं दोन्ही मुले जवळ असलेल्या तबकातील रगगुलाल घेऊन एकमेकावर उडवूं लागलीं ती त्याची बालस्वभावास अनुरूप अशी क्रीडा पाहून सभेत बसलेल्या लोकास मोठे कौतुक वाटलें, व ते हसून ह्मणाले कीं, 'जोडा योग्य आहे ' तेव्हा मालोजी व विठोजी उठून सभासदास ह्मणाले 'ऐका हो, जाधवराव आजपासून आमचे व्याही झाले, व जिजाऊ आमची सून झाली ते आता काय बोलले ते तुह्मी सर्वांनी ऐकिलेंच आहे आता हा निश्चय बदलणार नाहीं थोर लोक सभेत बोलल्यावर मागे सरणार नाहींत ' ह्याप्रमाणे सर्व सभाजनास साक्षी ठेवून ते खाली बसले. ते त्याचे बोलणे ऐकून सभेतील लोक ह्मणाले कीं, 'प्रमाण आहे ' जाधवराव हा प्रकार पाहून अगदी चकित झाला त्याने त्या वेळी काहींएक उत्तर केले नाहीं.

दुसरे दिवशी जाधवरावाने सर्व आप्तास भोजनाचे आमंत्रण दिले. इतराबरोबर मालोजीसहि बोलावूं पाठविलें मालोजीने उलट असा निरोप दिला कीं, 'आह्मी तुह्मी व्याही झालों आता तुमच्याबरोबर भोजन लग्नसमारभाच्या वेळीं होईल. मध्यंतरी आह्मास बोलावूं नये ' ही गोष्ट जाधवरावाची स्त्री ह्माळसाबाई हिला कळली तेव्हा ती मालोजीचा हा उद्दामपणा पाहून फारच रागावली. जाधवरावासारख्या मातबर मनसबदाराशी मालोजीसारख्या य कश्चित् शिलेदारानें सोयरीक करूं पाहणें हें अर्थात् मोठेंच धाडस होतें ह्माळसाबाई आपल्या नवऱ्यास ह्मणाली 'आपल्या तोंडून सभेंत शब्द गेला हें अनुचित झालें. ते उठून बोलले त्या वेळीं त्यास लागलीच धमकी द्यावी ती

आपण दिली नाहीं त्या वेळीं उगीच बसलां हें ठीक झालें नाहीं. मालोजी आपल्या पदरचा नोकर त्याच्या घरी मुलगी दिल्यानें लोकापवाद येणार. निबाळकर, शिर्के, महाडीक असे बरोबरीचे सरदार, मनसबदार, देशमुख आहेत, त्याच्या घराण्यात मुलगे आहेत, ते टाकून मालोजीच्याच मुलास मुलगी द्यावयाची ती एवढी त्याची मातबरी तरी काय पाहिली ?' जाधवरावानें तिचे असे समाधान केले कीं, ' मी सभेत सहज विनोदाने बोललो. माझे त्याबद्दल वचन काहीं गुंतले नाहीं ' मग त्याने मालोजीस परत असें सागून पाठविले कीं, ' शरीरसबंधाची गोष्ट बिलकूल बोलू नका आमच्या घरांत ती कोणाच्या विचारास येत नाहीं सभेत मी बोलले ते केवळ विनोदाचें होतें. ते खरे समजून हट्ट धरून बसणे समजूतदार मनुष्यास शोभत नाहीं भोजनास अवश्य यावे. पुढे ब्रह्मसूत्र असेल तसें घडून येईल ' त्यावर मालोजीचा असा जबाब आला की, ' इतक्या लोकासमक्ष आपण बोलला ते अप्रमाण कसें होईल ? आम्हास आपल्याशी सोयरीक अवश्य कर्तव्य आहे ' हा त्याचा उद्धटपणाचा जबाब ऐकून जाधवरावास अतिशयित क्रोध आला भोजन आटोपल्यावर त्याने कारकुनास बोलावून आणून असा हुकूम केला कीं, मालोजीचा व विठोजीचा जो काहीं हिशोब झाला असेल तो त्यास चुकता करावा, व नोकरी सोडून आताच्या आता मुलेमाणसे घेऊन येथून निघून जावयास सागावे. ह्याप्रमाणें जाधवरावाची नोकरी सुटून त्या दोघा बंधूंस वेरूळगावी जाऊन राहावे लागलें, व पुन त्याच्या हातीं नागर आला !

ह्या अपमानामुळें मालोजीस पराकाष्ठेचे वाईट वाटलें आपली योग्यता मोठी नाहीं, आपल्यापाशी दौलत नाहीं, ह्मणून जाधवरावाने आपला हा असा उपमर्द केला, तर आता आपली योग्यता हरउपायाने वाढवावयाची असा निश्चय त्यानें केला त्याला रात्रंदिवस हाच ध्यास लागून राहिला सभेत सर्वादेखत केलेला करार मोडून जाधवराव मुलगी दुसऱ्यास देणार, ही आपली मोठीच अप्रतिष्ठा झाली, याहून मरण पुरवले, असें त्या मानी पुरुषास वाटून त्याच्या चित्तास सारखी तळमळ लागून राहिली मनाच्या अशा उद्विग्न स्थितींत असता ते दोघे बंधु एके दिवशी रात्री आपल्या शेताची राखण करावयाकरिता गेले ती माघमहिन्यांतील पूर्णिमेची रात्र होती ते शेत आळीपाळीनें राखीत बसले पहिल्यानें विठोजी निजला आणि मालोजी जागत बसला तो बसला त्या जागी वारूळ होतें कांहीं वेळ गेल्यावर त्या वारुळातून भवानीचा सुवर्णकंकण

असा देदीप्यमान हस्त हळूच बाहेर निघून त्यानें त्यास पालविल्याचा भास झाला, व तो असा हलून एकदम अदृश्य झाला मालोजीने विठोजीस उठवून आपणास झालेला दृष्टांत सागितला विठोजी ह्मणाला, 'हा दृष्टात लटका आहे' मग तो जागत बसला आणि मालोजी झोपी गेला तो निद्रिस्त होताच त्याला स्वप्न पडलें त्यात भवानीदेवी शुभ्र पातळ नेसलेली, कपाळी कुंकुममळवट भरलेली व सर्व अलंकारानी युक्त अशी त्याच्या पुढे उभी राहिली, व त्याच्या पाठीवर हात मारून त्यास जागृत करून ह्मणाली 'मी तुला सर्व प्रकारें प्रसन्न झालें आहें त्या वारुळात सर्प आहे ते स्वरूप माझे आहे त्यास नमस्कार करून तें वारूळ खण ह्मणजे त्यात तुला द्रव्य सापडेल, ते तूं घे सर्प निघून जाईल त्याच्या वाटेस जाऊं नको तुझ्या वंशास सत्तावीस पिढ्या राज्य दिले आहे हें स्वप्न पडल्यावर मालोजी जागा झाला, व ते त्याने आपल्या भावास निवेदन केले मग त्या दोघा बंधूंनी स्वप्नातील दृष्टाताची प्रतीति पाहण्याचा विचार करून ते वारूळ खणले त्यात त्यास पुष्कळ द्रव्य सापडले ते त्यानी घरीं आणून मागल्या दारी परसात पुरून ठेविले [१]

हा अवचित धनलाभ झाल्यामुळें मालोजीस मोठा हुरूप आला त्यानें लोकात असा प्रवाद पसरला की, आपणास श्रीभवानी प्रसन्न झाली असून तिनें आपणास पुष्कळ द्रव्य दाखविलें आहे व आमच्या कुळात शककर्ता उत्पन्न होईल असा वर दिला आहे नंतर त्यानीं तें द्रव्य, श्रीगोंदें येथे शेषावा

१ ग्राटडफ ह्मणतो की, हें द्रव्य मालोजीने कोणास तरी लुटून मिळविलें असावे. हा असा निराधार तर्क करण्याचें काहीएक प्रयोजन नाही कारण त्या धामधुमीच्या व राज्यक्रातीच्या काळी द्रव्य छपवून सुरक्षित ठेवण्याचा मुख्य उपाय ह्मटला ह्मणजे ते जमिनींत पुरून ठेवावे हा असे. हे लक्षात आणिले ह्मणजे त्यास हा असा आकस्मिक द्रव्यलाभ झाला यात काही गूढ मानण्याजोगे नाही मि. किंकेड शेडगावकराच्या बखरीच्या आधारानें हा धनलाभाचा प्रकार निराळाच देतात. ते ह्मणतात कीं, हे दोघे बंधु फलटणच्या जगपाळरावापाशीं नोकरीस राहण्यापूर्वीं त्याना हा धनलाभ झाला. तो असाः एके दिवशी विठोजी प्रात:काळी शेतावर गेला असून सायकाळपर्यंत घरीं आला नाहीं ह्मणून मालोजी त्याला पाहावयास गेला. तो एका दाट रानातून चालला असता काळोख पडला; आणि तेथें त्याला भवानीनें दर्शन देऊन असा वर दिला की, "तुझ्या घराण्यात शिव अवतार घेईल तो हिंदुधर्माची पुनरपि स्थापना करून मुसलमान देशांतून हाकून देईल आणि हिंदूचें राज्य स्थापील, तें २७ पिढ्या चालेल. राजा आंधळा असेल." मग तिनें एक वारूळ दाखवून तें खणलें असतां त्यांत द्रव्य सांपडेल असें सांगितलें.

नाईक पाडे ह्या नावाचा एक सावकार राहत असे, त्याच्या घरीं नेऊन ठेविलें ह्या सावकाराचा व त्यांचा पुष्कळ दिवसाचा घरोबा होता त्याच्या 'मदतीनें मालोजीने हजार घोडी खरेदी करून पुष्कळ बारगीर व शिलेदार नोकरीस ठेविले. तो पहिल्यापासूनच धर्मशील होता. त्यात आणखी ही द्रव्यप्राप्ति दैवी प्रसादानें झाली असें वाटून त्याचा भाविकपणा विशेषच वाढला. प्राप्त झालेल्या द्रव्याचा विनियोग धर्मकृत्याकडे करावा अशी त्याच्या मनाची प्रवृत्ति झाली. ज्या शेतातल्या वारुळात ते द्रव्य सापडले तें त्याने ब्राह्मणास दान केलें, व त्या वारुळावर एक सुंदर देवालय बाधिलें सातारा जिल्ह्यात शंभुमहादेवाचा डोंगर आहे, त्याच्या शिखरावर चैत्र महिन्यात मोठी यात्रा भरत असे ह्या यात्रेस पाचसात लाख माणसें जमत ह्या वेळी तेथे पाण्याचा फारच तोटा येत असे यात्रेकऱ्यास तीनतीन कोसावरून पाणी आणावें लागे हा त्रास कमी करण्याच्या उद्देशाने मालोजीने त्या डोंगरावर एक उत्तम स्थल पाहून तेथे विस्तीर्ण तलाव बाधिला ह्या कामीं त्याने पुष्कळ पैसा खर्चिला हा तलाव बाधून त्यात विपुल पाणी झाल्यावर मालोजीने तेथे ब्राह्मणभोजन घातले व फकीरास खैरात देवविली ह्याशिवाय आणखी तेथे त्याने धर्मशाळाहि बाधिल्या. वेरूळ येथे कृष्णेश्वराचे देवालय अगदी जीर्ण झालें होतें, त्याची त्यानें डागडुजी केली व त्या गावाजवळ एक तलाव बाधिला ह्याप्रमाणे आणखी कित्येक ठिकाणीं तळी, विहिरी वगैरे बाधून त्यानें क्षेत्राच्या ठिकाणीं पुष्कळ दानधर्म केला.

ह्याप्रमाणे अनेक धर्मकृत्ये करून त्यानें मातबरपणाविषयी व पुण्यशीलपणाविषयीं लौकिक सपादिला मग त्याने आपला मूळ हेतु सिद्धीस नेण्याचा उद्योग पुन सुरू केला. वर सागितल्याप्रमाणे त्याने हजारबाराशे स्वार पदरीं बाळगून आपला इतमाम बराच वाढविला व जाधवरावापाशी मुलीविषयीं पुन मागणी केली, परंतु जाधवराव काहीं केल्या त्याच्याशी शरीरसबंध करण्यास राजी होईना. तेव्हां मालोजीनें जाधवरावाच्या ताब्यांतील परगण्यात धामधूम सुरू केली व निबाळकरास भेटून असें सागितलें कीं, जाधवराव मुलगी देण्याचें कबूल करून आता देत नाहीं ह्मणतो. यास्तव त्याची खोड मोडण्याकरितां आह्मांस दोन हजार स्वारांची कुमक द्यावी. ही कुमक मिळाल्यावर त्यानें जाधवरावाच्या जहागिरीस उपद्रव देण्याचा क्रम चालू ठेविला. इतकेंहि करून जाधवराव आपला हटाग्रह सोडीना. तेव्हां त्यानें पुढील युक्ति योजिली. निंबाळकराच्या स्वारांनिशीं मालोजी व विठोजी श्रीगोंद्यास आले. तेथें सगळें अडमळ सामान

ठेवून ते निंबदेव्हाऱ्याचा घाट उतरले व नेवासें गांवावरून जाऊन गोदावरीच्या आलीकडे आले तेथे त्यानीं पारध करून दोन डुकरें मारून ती दौलताबादे-जवळच्या मशिदीत टाकिली आणि त्या डुकराच्या गळ्यात चिठ्या बाधिल्या. त्या चिठ्यात त्यानी निजामशहाला असा अर्ज केला की, 'जाधवरावानें आमच्या मुलास मुलगी देण्याचे भरसभेत कबूल केले असून आता बायकाच्या सागण्या-वरून वचनास फिरला आहे, व त्याने आम्हास नोकरीवरूनहि दूर केलें आहे. यास्तव आम्हीं निरुपाय होऊन निबाळकराचा आश्रय धरून हा प्रकार केला आहे ह्याउपर बादशहा आमची दाद घेऊन जाधवरावाशी आमची सोयरीक करून देईल तर उत्तम, नाहीं तर आम्हीं असाच प्रकार दुसऱ्या मशिदीतहि करूं हा भ्रष्टाकार निजामशहास कळला तेव्हा त्याला जाधवरावाचा अतिशयित राग आला, आणि त्याने त्याला आपल्या हुजुरास तत्काळ बोलावून आणून पुष्कळ दम दिला तो जाधवरावास म्हणाला की, 'तुम्ही करार करून आता नाहीं म्हणता हे उचित नव्हे तुमच्यामुळे आमच्या मशिदीत हा भ्रष्टतेचा प्रकार मालोजी भोसल्याने केला आहे तुम्हीं हा कलह विनाकारण माजविला आहे तरी आता मालोजीच्या मुलास मुलगी देऊन त्याच्याशी समेट करा.' त्यावर जाधवरावानें असा जबाब दिला कीं, 'भोसल्याच्या मुलास मुलगी देण्या-संबंधानें अनमान करण्याचे कारण एवढेच कीं, त्याची आमची योग्यता सारखी नाहीं. एरवी ते आमचे आप्तच आहेत. आमच्या घरात सर्वांचा विचार असा आहे कीं, समान स्थल पाहून मुलगी द्यावी '

हा त्याचा जबाब ऐकून बादशहास वाटलें कीं, आपण सागत असता हा ऐकत नाहीं, उद्दामपणा दाखवितो, तरी ह्याचा गर्व हरण करण्यासाठी मालोजीस चागली मनसब देऊन योग्यतेस चढवावे खरें ह्मटलें असता हा मोठा अपराध केल्यामुळें मालोजी व विठोजी याचे शासन करण्याचा विचार त्याच्या मनात यावा, परंतु तो काळ निजामशाहीस प्रतिकूळ होता मोगलाची त्या राज्यावर

---

१ मि किंकेड ह्मणतात की, जाधवरावानें मुलगी देत नाही असे सागितलें तेव्हा मालोजी तुळजापूरच्या भवानीच्या दर्शनास गेला, आणि तिच्यापुढें दंडवत् घालून त्यानें आपले गाऱ्हाणे तिला निवेदन केलें. नतर रात्रौ देवीनें स्वप्नात येऊन त्याचा मनोरथ पूर्ण होईल असें आश्वासन दिलें मग त्याने परत अहमदनगरास येऊन लुखजी जाधवास आपला अपमान केल्याबद्दल द्वंद्वयुद्धास आवाहन केलें हें त्याचें भाडण मूर्तिजाच्या कानावर जाऊन त्यानें मध्यस्थी केली आणि जाधवाला शहाजीस मुलगी द्यावयास भाग पाडलें

एकसारखी वक्रदृष्टि असून, तें बुडवून टाकण्याचा निर्धार अकबरबादशहानें केला होता अशा आणीबाणीच्या वेळी आपल्या राज्यातील मराठे सरदारात कलह माजून, त्यापैकीं काहीं शत्रूस जाऊन मिळाल्यानें आपला पक्ष तितका कमजोर होईल असा विचार बादशहाने करून मालोजीस आपलासा करण्याचा बेत केला मग त्याने मालोजी व विठोजी यास मोठ्या स्नेहभावाने बोलावून आणून प्रत्येकीं बारा हजार[१] स्वाराची मनसब दिली, व मालोजीस राजे हा किताब देऊन शिवनेरी व चाकण हे किल्ले व त्यासभोवतालचा मुलूख सरजामादाखल दिला, आणि पुणे व सुपे ह्या परगण्याची जहागीर करून दिली[२] हे वर्तमान स १६०४ च्या मार्च महिन्यात घडलें

ह्याप्रमाणे मालोजीचा पक्ष बादशाहाने घेऊन त्याची योग्यता वाढविली, हे पाहून जाधवरावाला त्याची मागणी इत पर नाकबूल करवेना बादशहानें उभय पक्षास आपली कुटुबे व आप्त यास दौलताबादेस आणावयास सागितलें, आणि विवाहसमारभ आपल्या समक्ष करविला खुद्द बादशहा समारभास हजर राहिल्यामुळे दरबारचे एकूणएक अमीर आले होते अशा प्रकारें शहाजी व जिजाबाई याचा विवाह मोठ्या थाटाने झाला. मालोजीने ह्या समयीं पुष्कळ खर्च केला, दरबारच्या सगळ्या अमिरास टोलेजंग मेजवानी दिली, व ब्राम्हणास दानधर्म व फकिरास खैरात केली हा विवाह स १६०४ च्या एप्रिल महिन्यात झाला ह्याप्रमाणे मालोजीचा हेतु सिद्धीस जाऊन वरती आणखी त्यास मनसब व राजे हा किताब मिळाला

ह्या विवाहानंतर मालोजीराजे निजामशाही राज्याचे मनसबदार होऊन त्या गडबडीच्या काळी त्या सरकारास फार उपयोगी पडले ते मोठे शूर व हुशार

१ ही मनसब फक्त मालोजीसच दिली असून ती पाच हजाराची होती असें कित्येक ठिकाणी ह्मटले आहे कित्येकाचे असे ह्मणणे आहे कीं, मालोजीने जगदेवराव निंबाळकराच्या मार्फत निजामशाही दरबाराकडे फिर्याद केली, परतु निबाळकर अदिलशाहीतला सरदार असल्याकारणानें त्याचे निजामशहाशी काही सूत होते किवा कसें याची शका वाटते

२ ह्या वेळी मालोजीस मिळालेल्या जहागिरीची यादी शि. दि. यात फार मोठी आहे. ती खरी आहे असे मानिल्यास त्याला पुणे, नाशिक, अहमदनगर व खानदेश एवढ्या प्रातातील काही परगणे मिळाले होते असे ह्मणावें लागतें. पण त्या सुमारास यातल्या काही प्रातावर मोगलाचा अमल बसला असल्या कारणानें हें सभवनीय दिसत नाही.

असल्यामुळें त्याचें दरबारात तेज पडूं लागलें. सरकारच्या अनेक बिकट कामगिऱ्या करून त्यानी दरबारची शाबासकी मिळविली. ह्याप्रमाणें जाधवरावाच्या हस्तेच बादशहाने त्यास जी ही एक मोठी मनसब दिली तीस ते सर्वथैव पात्र होते असें निदर्शनास आलें सरकारचे मुत्सद्दी मोठमोठ्या कामांत त्याची मसलत घेऊं लागले. शिवाय त्याचा स्वभाव मोठा प्रेमळ व परोपकारी असल्यामुळें दरबारचे लोक त्याला सर्वदा अनुकूळ असत शहाजी बापाबरोबर नेहमीं दरबारात जात असे तो मोठा देखणा, कुशाग्रबुद्धि, आर्जवी व सुशील असल्यामुळे बादशहाची त्याच्यावर फारच मर्जी बसली, व दरबारच्या अमीरउमरावासहि तो फार आवडूं लागला मालोजीराजे आपल्या मनसबदारीचा पंधरा वर्षे मोठ्या इभ्रतीनें उपभोग घेऊन व दरबारात आपले वजन अतोनात वाढवून सन १६१९ त मृत्यु पावले, आणि निजामशहाने त्याची दौलत व मनसब शहाजीराजे यास दिली

# भाग दुसरा.



## शहाजीराजे यांचें वृत्त.

### निजामशाहींतील नोकरी.

**शहाजीराजे** यास मनसबदारी मिळाली त्या वेळी निजामशाही राज्याचा कारभार मलिकंबर पाहत होता आता येथे पहिल्याने ह्या सरकाराची त्या काळीं कशी काय स्थिति होती तें थोडक्यात सागतो सन १६०० त अकबर बादशहानें अहमदनगर काबीज केले, व चादबिबीसुलताना हिचा खून तिच्याच पदरच्या सरदाराकडून झाला तिने निजामशाही तक्तावर बहादूर निजामशहा ह्या नावाचा जो एक बालराजा बसविला होता तो मोगलाच्या हाती लागला, व त्यानीं त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात[1] नेऊन कैदेत ठेविले ह्याप्रमाणे निजामशाही राजधानी व निजामशहा शत्रूच्या हाती लागला असता, मलिकंबराने मुळीच न डगमगता लोकाची पुन जूट केली, व निजामशाही तक्तावर दुसरा एक अल्पवयी वारस बसवून त्यास दुसरा मूर्तिजा निजामशहा असें नाव दिलें, आणि त्यास दौलताबादच्या मजबूद किल्ल्यात नेऊन ठेवून तेथे बहिरीघराण्याचे निशाण त्याने पुन उभारले ह्या प्रकारे मलिकबराच्या हाती सर्व सत्ता येऊन हबशी लोकाचा दरबारात वरचष्मा झाला त्यामुळे निजामशाहींतील मराठे सरदाराच्या मनात वैषम्य येऊन राज्यात दोन फळ्या झाल्या मराठे सरदाराच्या फळीचा प्रमुख मिआन राजू नामेकरून एक सरदार होता मलिकबर व मिआन राजू यानी निजामशाहीचा जो मुलूख मोगलानी काबीज केला होता त्यापैकीं बराच परत घेतला मिआन राजूनें दौलताबादेपासून उत्तरेस

---

१ कोणी ह्मणतात की, त्याला आग्रा येथे नेऊन कैदेत ठेविले होते

२ प्रो. जदुनाथ सरकार याला बुराण निजामशहा ह्मणतात. दुसरे बहुतेक इतिहासकार याचें दुसरा मूर्तिजा निजामशहा हेंच नाव देतात. आता एवढे मात्र खरें कीं, याच्या आजाचें नाव पहिला बुराण निजामशहा असे होतें. यास्तव गादीवर बसण्यापूर्वीं याचें नाव कदाचित् बुराण निजामशहा असें असावे.

गुजराथेपर्यंत व दक्षिणेस अहमदनगरापर्यंत सगळा मुलूख आपल्या कबजात घेतला, व दक्षिणेकडचा सगळा प्रात मलिकंबराच्या हातीं आला हे दोघेहि सरदार आपण निजामशहाचे अकित आहो असे बाह्यात्कारी ह्मणत परंतु वास्तविक सत्ता त्यानी आपल्या हातीं ठेविली होती मूर्तिजा निजामशहास आवशाच्या किल्ल्यात ठेविलें असून त्याच्या खर्चासाठी त्या किल्ल्याच्या सभोवतालील काहीं गावाचे उत्पन्न लावून दिलें होते

पुढे मिआन राजूने मोगलाशी सख्य करून मलिकंबराबरोबर युद्ध चालविले परंतु त्यात मलिकबराची सरशी होऊन मिआन राजू त्याच्या हाती लागला, आणि मराठे सरदाराची फळी फुटून सगळे मलिकबराचे अकित झाले ह्याप्रमाणें प्रतिपक्षास हतवीर्य करून मलिकंबर निर्वेधपणे कारभार पाहूं लागला त्यानें सर्व राज्याचा बदोबस्त यथास्थित करून जमाबंदीची उत्तम शिस्त लाविली. ह्या सुधारणेबद्दल त्याचा महाराष्ट्रात मोठा लौकिक झाला पुढे त्याने स १६१०त दौलताबादेजवळ खडकी नावाचे नवे शहर वसवून तेथे निजामशाही तक्त नेले. त्याने मोगलाशी अनेक युद्धप्रसग करून पुष्कळ यश सपादिले अहमदनगर मोगलाच्या हाती गेलें होते ते त्याने पुन काबीज केले ह्याप्रमाणे मलिकबर प्रबळ होऊन मोगलाचें काहीं चालू देईना, तेव्हा दिल्लीचा बादशहा जहागीर यानें आपला पुत्र शहाजहान यास मोठें सैन्य देऊन निजामशाही मुलूख पुनरपि काबीज करण्यासाठी दक्षिणेंत स १६१७ त रवाना केले, व त्याच्या मागोमाग आपणहि सैन्य घेऊन निघाला मोगलसैन्याची व मलिकबराची स १६२०त मोठी निकराची लढाई झाली ह्या युद्धात मराठे सरदार मोठ्या शौर्याने लढले. शहाजीराजे याच्या अगच्या शौर्यवीर्यादि गुणाचें निदर्शन पहिल्यानें ह्याच युद्धात झालें. मलिकंबराचा पराभव होऊन त्यास मागे हटावें लागलें तरी शहाजीराजे यांनीं कच न खाता मोगलाच्या सैन्यावर वेळोवेळा छापे घालून त्यास पुरेपुरे करून सोडिलें ह्या मर्दुमकीस्तव त्याची निजामशाही दरबारात मोठी वाहवा झाली. ते मोठे शूर व युद्धकुशल सरदार आहेत अशी सर्वांची खात्री झाली. मलिकंबराचा त्याच्यावर फारच लोभ जडला

शहाजहानानें पाहिलें कीं, मराठे सरदाराचें पाठबळ आहे तोंपर्यंत निजामशाही पादाक्रांत होणें कठीण आहे यास्तव त्यानें त्याच्यात फंदफितुरी आरंभिली. लुखजी जाधवराव वगैरे सरदारांस त्यानें मोठी लालूच दाखवून वश करून

१ ह्याच शहरास पुढें औरगजेबानें औरगाबाद असें नाव दिलें.

घेतलें ह्या सरदाराचे मलिकंबराशीं चांगलेंसें पटत नसल्यामुळे ते सहज फितूर झाले असें सांगतात कीं, लुखजी जाधवरावास मोगलाकडून चोवीस हजाराची मनसब प्राप्त झाली[१] शिवाय त्याच्या कित्येक आप्तासहि मोठमोठ्या मनसबा मिळाल्या हे वर्तमान स १६२१ त घडले शहाजीराजे मात्र मोगलाच्या ह्या लालचीस भुलले नाहींत ते मलिकंबराचा पक्ष धरून राहिले

ह्याप्रमाणे फितुरी होऊन आपला पक्ष दुर्बळ झाला असे पाहून मलिकंबरानें निरुपायास्तव अहमदनगर व त्या भोवतालचा मुलूख मोगलास देऊन त्याशी सख्य केले पुढे शहाजहानास दिल्लीकडे जावे लागले ही संधि साधून मलिकंबराने मोगलाच्या सैन्यास हाकून देऊन त्याच्या हातीं गेलेला मुलूख पुनरपि काबीज केला नंतर शहाजहान पुन दक्षिणेत आला, व फितूर झालेल्या मराठे सरदाराच्या साहाय्यानें मलिकंबराने घेतलेला मुलूख त्याने पुनरपि हस्तगत केला ह्या वेळी मलिकंबर फारच जेरीस आला शहाजीराजे यांनी त्यास मोठ्या इमानानें साहाय्य केले, परंतु मोगलाचे सैन्यबळ प्रचंड असल्यामुळे त्याचे काहींएक चालेना तेव्हा अशा प्रबळ शत्रूशी भांडत राहून निजामशाही बुडवावी त्यापेक्षा त्याशी तह करून सलोखा करावा, असा मलिकंबराने विचार केला. व त्याप्रमाणे त्याशी संधि करून तो त्याच्या तावडीतून बरेपणीं सुटला यानंतर

१ काही बखरींत लुखजी जाधवराव मोगलास जाऊन मिळण्याचे कारण येणेप्रमाणे दिलें आहे दुसरा मूर्तिजा निजामशहा मरण पावल्यावर त्याचे दोघे लहान मुलगे सहासात वर्षांचे होते बादशहाच्या स्त्रियांनी माबाजी अनंत ह्मणून एक चतुर पुरुष निजामशाहींत मुत्सद्दी होता त्याला विचारिले कीं, वजिरी चालविण्यास लायक असा पुरुष आपल्या राज्यात कोण आहे ? तेव्हा त्यानें शहाजीराजे यांचे नाव सांगितले त्यावरून त्यांनी त्यास वजिरी देऊन सर्व राज्यकारभाराचा कुलअखत्यार दिला शहाजीराजे निजामशहाच्या मुलास आपल्या मांडीवर घेऊन तक्तावर बसत, व लुखजी जाधवराव वगैरे मोठमोठ्या सरदारास तक्तापुढे येऊन कुरनिसात करावी लागे. जाधवरावास ह्याबद्दल फारच वाईट वाटू लागले जो कुणबी आपल्या देवडीवर एक वेळ चाकर होता, त्याच्या पोराची अशी बढती होऊन त्याने मसनदीवर बसावे, आणि आपण त्याच्या समोर उभे राहून मुजरा करावा, ह्यात आपला पाणउतारा होत आहे, असे जाधवरावास वाटून त्याच्या मनात त्या सरकाराविषयीं वैषम्य आले मग त्याने दिल्लीच्या बादशहाकडे आपला वकील पत्र देऊन पाठविला आणि त्यास निजामशाहीवर स्वारी करावयास सांगितले त्याने मीरजुमलानामक एका सरदारास साठ हजार फौज देऊन जाधवरावाच्या मदतीस पाठविले. त्यास जाधवराव व दुसरे काहीं मराठे सरदार जाऊन मिळाले.

त्यानें मोगलाशीं विरोध असा कधींहि केला नाहीं. ह्यापुढें मलिकंबर फार दिवस जगला नाहीं एकाएकीं कांहीं रोग होऊन स. १६२६ त त्याचें देहावसान झालें. मरणसमयी त्याचे वय ८० वर्षांचे होते.

मलिकंबर मरण पावताच मोगलानी लुखजी जाधवरावाच्या मदतीने निजामशहाशीं पुन युद्ध सुरू केलें ह्या सुमारास जहांगीर बादशहा मरण पावल्यामुळें शहाजहानास दिल्लीस जावे लागले तेव्हा त्याने जाधवरावाच्या मदतीस कांहीं फ.ज ठेवून दिल्लीकडे कूच केलें ह्या वेळी शहाजीराजानी साबाजी अनंत-नामक एका चतुर पुरुषाच्या साह्याने अल्पवयी मूर्तिजा निजामशहाच्या आईचा आपल्यावर पूर्ण भरवसा बसवून निजामशाहीचा सगळा कारभार आपल्या हाती घेतला होता, आणि दौलताबादेवर मोगल चालून आले तेव्हा निजामशहास व त्याच्या आईस तेथून काढून कल्याणाजवळ माहुली नावाचा एक किल्ला कासार घाटात आहे तेथे नेऊन ठेविले ह्या किल्ल्यास जाधवरावाने मोगल सैन्यानिशी वेढा दिला शहाजीराजानी सहा महिने किल्ला लढवून शत्रूस बिलकूल दाद दिली नाहीं तरी शत्रूचा वेढा काहीं केल्या उठेना मोगलाचें अधिकाधिक सैन्य किल्ल्यासभोवार जमा होऊं लागले इतके झाले तरी शत्रूशीं शेवटपर्यंत टक्कर देण्याची हिमत शहाजीराजास होती खरे पाहता निजामशाहीचें रक्षण करण्यास इमानाने व शौर्याने झटणारा पराक्रमी सरदार त्या वेळीं शहाजीराजावाचून कोणीहि नव्हता परंतु त्या पडत्या काळी निजामशहाच्या आईला दुर्बुद्धि सुचल्यामुळे राजाचे मन उदास होऊन त्यास आपल्या धन्यास सोडून जावे लागले लुखजी जाधवरावाने निजामशहाच्या आईशी मिलाफाचें बोलणे लावून तिला वश करून घेतलें, व निजामशाही अजीबात बुडविण्याचा घाट घातला हे पाहून शहाजीराजास फार वाईट वाटले त्यानी असा विचार केला कीं, खावंदच बेदील झाला तर त्याच्या वतीने लढून आपला प्राण धोक्यात घालण्यांत काय अर्थ आहे? आपण याचे सेवक म्हणवून येथवर निमकहलालीनें वागलो, त्याचे यापुढे काहीं चीज होईलसें दिसत नाहीं तेव्हा आपल्यामुळें पादशाहत बुडाली हे अपयश कशास घ्यावें? आपणच येथून निघून जावें हें उत्तम असा बेत करून व तो निजामशहास व त्याच्या आईस कळवून, त्यानीं आपल्या निवडक विश्वासू लोकानिशी किल्ल्यातून निघून जाण्याची सिद्धता केली. मग एके रात्रीं अकस्मात् किल्ल्याबाहेर पडून, शत्रूची फळी फोडून ते पार निघून गेले. जाधवरावाला हेंच हवे होतें शहाजीराजे किल्ल्यांतून पळून गेल्याचें

वर्तमान त्यास कळताच तो त्यांच्या पाठलागास निघाला. हा पाठलाग जाधवरावानें कित्येक दिवस मोठ्या आवेशानें व नेटानें चालविला. ही श्वशुरजामातांची धरपकड फलटणपर्यंत झाली तेथपर्यंत शहाजीराजे त्याला बिलकुल गाठले नाहींत. फलटणच्या सरहद्दीवर पोचताच जाधवरावानें लागलींच माघार खाल्ली कारण त्याला ठाऊक होतें कीं, निंबाळकराचें साहाय्य मिळून शहाजीराजाला अमळ जोर आला कीं ते आपणावर उलटून आपली दाणादाण करण्यास कदापि चुकणार नाहींत

शहाजीराजे माहुली किल्ल्यातून निघाले त्या वेळी त्याची बायको जिजाबाई व त्याचा मुलगा सभाजी, जो त्या वेळी तीनचार वर्षांचा होता, हीं त्याच्या बरोबर होती जिजाबाई त्या वेळी सात महिन्याची गरोदर होती पाठीवर शत्रु असल्यामुळे त्याना मोठ्या वेगाने दौड करावी लागली जिजाबाईस घोड्यावर बसवून नेत होते काहीं कोस दौड झाली न झाली तों तिच्या पोटात दुखून येऊन अशा वेदना होऊं लागल्या कीं तिच्याने एक पाऊल पुढे जाववेना. तेव्हा तिला कोठे तरी सुरक्षित स्थळी ठेवून पुढे जावे असा राजानी बेत केला. त्या वेळी जुन्नरास श्रीनिवासरावाचे ठाणे होते हा तेथे स्वतंत्र होऊन बसला होता त्याचे व शहाजीराजाचे पूर्वीपासून सख्य होते यास्तव जिजाबाईस त्याच्या आश्रयाने शिवनेरी किल्ल्यात ठेविले व तिच्या रक्षणार्थ काहीं स्वार व इतर लोक दिले[1] शहाजीराजे पुढें निसटून गेल्यावर मागोमाग जाधवराव त्या किल्ल्यापाशी आला, तेव्हा लोकानी त्याला असे सागितलें कीं, शहाजीराजाचे आणि तुमचें वैमनस्य असले तरी मुलीने काही तुमचा अपराध केलेला नाहीं. यास्तव तिला भेटून तिच्या रक्षणाविषयी योग्य तजवीज करावी ती मोगलाच्या हातीं लागली असता विटंबना कोणाची होणार याचा विचार करा हा बुद्धिवाद ऐकून जाधवरावाचे मन द्रवले. आणि तो तिच्या भेटीस गेला तिने त्याला पुष्कळ दोष देऊन ह्मटले 'त्याच्या ऐवजी मी आता तुमच्या हाती सापडलें आहें जें काहीं पारिपत्य करावयाचे ते मला करा ' जाधवरावाने तिला पोटाशीं धरून ह्मटलें 'होणारासारखी बुद्धि सुचून वैमनस्य पडलें, त्याला काहीं इलाज

१ कित्येक बखरींत असा उल्लेख आहे कीं, शहाजीराजानी निरुपायास्तव जिजाबाईला वाटेंतच टाकून व तिच्या रक्षणार्थ काही लोक ठेवून पुढे पलायन केले. पुढें जाधवराव तेथें आला, व त्याला आपल्या मुलीची करुणा येऊन तिला त्यानें शिवनेरी किल्ल्यात सुरक्षितपणे पोंचविले व तिच्या रक्षणार्थ पाचशें स्वार ठेविले.

नाहीं. तुला आता कोठें जावयाचे ते साग सिदखेडास चलत असलीस तर तुला मी तिकडे सुरक्षितपणे पोचविण्याची व्यवस्था करितो 'ती ह्मणाली, 'मला येथेच राहावयाचें, माहेरी जावयाचे नाहीं ' तिचा असा निश्चय पाहून जाधवरावाने तिच्या रक्षणार्थ आणखी काहीं सरजाम दिला त्याप्रमाणें ती मानी स्त्री आपल्या पतीनें नेमून दिलेल्या ठिकाणीच राहिली आपल्या पतीशी आपल्या पित्याने असें वैर करावे हे तिला मुळीच आवडले नाहीं चोहोकडे अशी धामधूम चालू असता तेथेच राहण्याचा तिने आग्रह धरिला, आणि पुढेहि कधी ती माहेरी गेली नाहीं

शहाजीराजे पळाले ते थेट विजापुरास गेले निजामशहाच्या आईची घरफूट नजरेस येताच त्यानी विजापुरसरकाराशी राजकारण करण्यासाठी बाळकृष्णपंत हनुमते यास तिकडे अगोदरच पाठविले होतें त्या सरकारचे त्या वेळचे मुख्य मुत्सद्दी मुरार जगदेव व रणदुल्लाखान यास शहाजीराजाची योग्यता चागली ठाऊक होती अदिलशहाने राजाचा बहुमान केला, व निजामशाही बुडूं न देण्याचा जो त्याचा हेतु तो सिद्धीस नेण्यास लागेल तें साहाय्य करण्याचे त्याने त्यास वचन दिलें व त्याच्या मदतीस काहीं फाजहि दिली

इकडे निजामशाहींत अधिकारातर झाले मलिकंबर मरण पावल्यावर त्याचा पुत्र फत्तेखान ह्यास वजिरी प्राप्त झाली हा फत्तेखान स्वभावाने मोठा गर्विष्ठ व क्रूर होता मलिकबराची कर्तबगारी, धोरण व राज्यातील मोठमोठ्या सरदारास वागवून घेण्याची शैली हीं त्यास मुळीच नव्हती त्याने मोगलाशी काहीं वेळ युद्ध चालविले, पण त्यात त्याला यश असें कधीच आले नाहीं ह्या वेळीं मोगलाचा सरदार खानजहान लोदी हा त्याच्याशी दक्षिणेत लढत होता ह्या सरदाराने फत्तेखानाशी पुढे लवकरच तह केल्यामुळे लढाई बंद पडून निजामशाहीचा काहीं वेळ निभाव लागला.

निजामशहास फत्तेखानाचा शिरजोरपणा सहन न होऊन त्याने त्याला अधिकारावरून दूर करून कैदेंत टाकिलें आणि तकरीबखाननामक एका दुसऱ्या सरदारास आपला वजीर केलें [1] हें असें अधिकारातर झालें तेव्हा जाधवरावानें पुनः निजामशहाकडे जावें असें मनात आणून त्याच्याशीं सलोख्याचें बोलणे

१ खाफीखान ह्मणतो की, फत्तेखानामागून हमीदखान हा वजीर झाला. हा हबशी सरदार होता. याची स्त्री अनिरूपवती होती, तिला सुलतान मोहित झाल्यामुळें हा मोठ्या योग्यतेस चढला.

लाविलें. मूर्तिजा निजामशहा हा मोठा खुनशी मनुष्य असून त्याला धोरणहि बेताचेंच होतें त्याच्या मनात जाधवरावाविषयीं पराकाष्ठेचा दंश होता. एवढा बलाढ्य सरदार आपण होऊन आपल्याकडे येत आहे, तर मागलें सगळें विसरून जाऊन त्याला आपल्या पक्षाकडे घेऊन आपल्या राज्याची बळकटी करावी, असा विचार त्याला कांहींच सुचला नाहीं पूर्वी केलेल्या निमकहरामी-बद्दल सूड उगविण्याचा त्यानें बेत करून जाधवरावाला दौलताबादेच्या किल्ल्यात आपल्या भेटीस बोलाविलें, व त्याचे काय ह्मणणें आहे ते समक्ष ऐकून घेण्याचे मिष केलें त्याप्रमाणे जाधवराव आपला मुलगा अचलोजी यासह निजामशहाच्या दरबारास आला इतक्यात कांहीं गुप्त मसलत करा-वयाची आहे असा बहाणा करून बादशहा कचेरींतून उठून आत गेला, आणि पूर्वी ठरवून ठेविल्याप्रमाणें तिघे मुसलमान सरदार आपल्या तरवारी उपसून जाधवरावाच्या व त्याच्या मुलाच्या अंगावर धावून आले, आणि त्यानीं त्याच्या हातातल्या तरवारी हिसकावून घेतल्या हा असा दगा पाहून ते पितापुत्र आपल्या कबरेच्या कटारी काढून त्याच्याशीं मोठ्या शौर्यानें लढले, परंतु यवनसरदारापुढे त्याचे कांहींएक न चालून शेवटी ते तेथेच ठार झाले[1] जाधव-रावाची बायको गिरिजाबाई व बंधु भोताजीराव हीं कांहीं सैन्यासह शहरा-बाहेरील हौदापाशी उतरली होतीं त्याला हे घोर वर्तमान कळताच ती आपली फौज घेऊन सिंदखेडास पळून गेली मग गिरिजाबाईने मोगल बादशहापाशीं अर्ज करून आपला दीर भोताजीरावें[2] ह्यास आपल्या नवऱ्याची मनसब व

---

१ मोडककृत अदिलशाहीच्या इतिहासात ही जाधवरावाची हकीगत अमळ निराळ्या रीतीने दिली आहे ती अशी फत्तेखानास कैद केल्यावरून जाधवराव वगैरे मराठे सरदारास आपल्या जीवाचे व अब्रूचे रक्षण कसे करावे याची फिकीर वाटू लागली जाधवरावाने पळून जाऊन मोगलाचा आश्रय करण्याचें मनात आणिलें. ही गुणगुण निजामशहाच्या कानावर जाताच तो घोटाळ्यात पडला जाधवरावा-सारखा बलाढ्य सरदार मोगलाकडे जाऊन त्यानी त्यास पाठीशी घातलें तर आपला पक्ष बराच दुर्बळ होईल असें त्याला वाटले, व त्यास पकडून कैद करण्याचा त्यानें बेत केला. नतर एके दिवशी जाधवराव आपल्या पुत्रासह दरबारात काहीं कामानिमित्त आला असता हा असा दग्यानें त्याचा खून झाला. जाधवरावाबरोबर त्याच्या दुसऱ्या मुलाचा व एका नातवाचा खून झाला, असें मुसलमानी बखरींत आहे.

२ कित्येक बखरींत याचें नांव विठोजी असें दिलें आहे. कित्येक तर याचें नांव नथुजी असेंही देतात.

जाहगीर देवविली. बादशहानें तिच्या एका मुलास व नातवासही मनसब दिली. त्यानंतर हें जाधवाचे घराणे अखेरपर्यंत मोगलाची नोकरी करून राहिलें.

शहाजीराजे ह्या वेळी परिंड्याच्या किल्ल्यात असून, आसपासचा मुलूख हस्तगत करून त्यात स्वतंत्रपणे अमल चालवीत होते. आपल्या सासऱ्यास दग्याने ठार मारिल्याचे वर्तमान ऐकून त्यानी असे मनात आणिले कीं, निजामशहाशीं पुन सलोखा करण्याच्या नादास लागण्यात किवा त्याच्या पक्षाने भाडण्यात आता काहीं अर्थ नाही. कारण मूर्तिजाबादशहा मोठा खुनशी व घातकी मनुष्य आहे अशी त्याची पुरी खात्री झाली मग राजानी असा बेत केला कीं, ह्या वेळी साधेल तेवढा मुलूख हाताशी घालून आपण स्वतंत्र होऊन बसावें. त्यानीं संगमनेरापासून पुण्यापर्यंतचा सगळा मुलूख काबीज केला व आसपासचे सगळे किल्ले हस्तगत केले ह्या धामधुमीत त्यानी विजापूरसरकारचाही काहीं मुलूख घेतला त्यावरून त्या सरकारास राग येऊन राजाचा बदोबस्त करण्यासाठी मुरारपंतास मोठ्या सैन्यानिशी पाठविले त्यानें राजाच्या ताब्यातले काहीं महाल हस्तगत केले पुणे, इदापूर वगैरे काबीज करून राजाचा वाडा वगैरे घरे जाळून टाकिली विजापूरकराच्या ह्या मोठ्या सैन्याशी झुंजण्याचे राजास ह्या वेळी सामर्थ्य नव्हते म्हणून त्यानी जुन्नरच्या श्रीनिवासरावाचा आश्रय धरिला मुरारपंताने भिलसारच्या टेकडीवर एक किल्ला बाधून त्याचें नाव दौलतमंगळ असे ठेविले, आणि त्यावर दोन हजार लोक हाताखालीं देऊन रामरावास ठेविले त्यानें चंद्रराव, बाजी दळवी वगैरे सरदाराबरोबर सैन्य देऊन तळकोंकण काबीज करावयास पाठवून स्वत विजापुराची वाट धरिली विजापूरकराची वावटळ निघून गेल्यावर त्यानी जुन्नराहून निघून, पमेगड नावाचा किल्ला मोडकळीस आला असून त्यात कोणाचे ठाणे नव्हतें, त्याची डागडुजी करून त्याचें शामगड[1] असे नाव ठेविलें, व त्यात ते राहूं लागले येथे राहून त्यानी आपल्या हातचे गेलेले सगळे किल्ले व महाल पुन हळूहळू काबीज केले, पाचसहा हजार फौजेची जमाजम केली, व जुन्नर

---

१ बसातीन-इ-सलातीन यात असें म्हटले आहे की, राजानीं भीमगडाची दुरुस्ती केली असून त्यास शहागड असें नाव ठेविलें होतें. (पृ० ४४१.) पमेगडाला यात भीमगड हें नाव दिलें आहे. शहाजीराजानी एका बाळनिजामशहाला गादीवर बसवून त्याच्या नावानें पुढें कारभार चालविला तो ह्याच गडात.

व संगमनेर ह्यापासून अहमदनगर व दौलताबाद ह्यापर्यंत सगळा मुलूख हाताशीं घातला, त्याचप्रमाणे बालेघाटाचाही मुलूख त्यानी कबजात घेतला

ह्या सुमारास मोगलाच्या खानजहान लोदी नावाच्या एका सरदारावर शहाजहान बादशहाची इतराजी झाल्यावरून तो दक्षिणेंत पळून येऊन निजामशाही सरकाराच्या आश्रयाने राहिला त्याच्या पारिपत्यास दिल्लीच्या बादशहाने फौज रवाना केली तेव्हा निजामशाहींतील देशमुख व जाहगीरदार लोदीचा पक्ष उचलून मोगलाशी लढूं लागले शहाजीराजानीही त्याचा पक्ष स्वीकारून त्याला पुष्कळ साहाय्य केले व मोगलाच्या सैन्याचे काहींएक चालूं दिले नाहीं हे वर्तमान शहाजहानास कळले तेव्हा त्याला अशी भीति वाटली कीं, दक्षिणेतील मराठे सरदार व मुसलमान बादशहा लोदीस सामील झाल्याने आपल्या सत्तेला व गादीला धक्का बसेल यास्तव ह्या लोदीचा व त्याच्या पक्षाच्या लोकाचा वेळीच नायनाट केला पाहिजे असा निर्धार करून तो मोठ्या सैन्यानिशी दक्षिणेत आला. व त्याने असे जाहीर केले की, जे कोणी लोदीला मदत करितील किंवा त्याच्या पक्षाला सामील होतील त्याचा समूळ नाश केल्यावाचून आपण राहणार नाहीं मग त्याने आपल्या एकूदर सैन्याच्या तीन टोळ्या करून, त्या तीन सरदाराच्या हाती देऊन लोदीवर व त्याच्या पक्षाच्या लोकावर रवाना केल्या त्यापुढे लोदीच्या पक्षाचा टिकाव न लागून तो दक्षिणेकडे पळत सुटला त्याने विजापूरकराची कुमक मागितली, पण ती त्यानी त्याला दिली नाहीं तेव्हा तो पुन दौलताबादेकडे वळला, व निजामशहानें त्याला मदत केली मोगलाच्या व निजामशहाच्या सैन्याची लढाई झाली तींत मोगलाची सरशी झाली ह्याप्रमाणे चोहोकडून निरुपाय होऊन लोदी काबुलास पळून जाण्याच्या उद्देशाने उत्तरेकडे दौड करूं लागला मोगलाच्या फौजेने त्याचा सारखा पिच्छा पुरविला तेव्हा शेवटी निराश होऊन लोदी आपल्या विश्वासू लोकासह एकदम मागे उलटला, व शत्रूच्या सैन्यावर हल्ला करून मोठ्या शौर्याने लढून समरभूमीवर पडला

ह्याप्रमाणें लोदीचा नाश झाल्यावर शहाजीराजास अशी दहशत पडली कीं, आतां शहाजहान आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें वर्तन करण्यास प्रवृत्त होऊन आपल्या प्रचंड सैन्याचा मोर्चा आपणांवर फिरवील ह्या प्रसंगीं आपला बचाव करण्याची त्याला एकच युक्ति बरीशी दिसली ती ही कीं, बादशहाला शरण जाऊन कृतापराधांची क्षमा मागावी व त्याची नोकरी पतकरून राहावे. मग ह्या आश्र-

याचा अर्ज त्यानीं अजिमखाननामक एका सरदाराच्या द्वारें बादशहास केला. त्यात त्यानीं बादशहास अशी विनंति केली होती कीं, 'मी तुमच्या नोकरीस राहावयास तयार आहे तुह्मी मला माझ्या अपराधाबद्दल क्षमा करून माझ्या जीवास काहीं अपाय करणार नाहीं, असें आश्वासन द्याल तर मी आपल्या हुजुरास दाखल होईन' शहाजहानास राजाच्या अगच्या शौर्यवीर्यादि गुणाची चागलीच प्रतीति आली होती शिवाय निजामशाही बुडविण्याचा जो त्याचा सकल्प तो सिद्धीस नेण्याच्या कामीं शहाजीराजासारख्या बलाढ्य व पराक्रमी सरदाराचे साहाय्य मिळाल्यास फारच उत्तम, असें त्या बादशहास वाटून त्यानें राजांचे बोलणे तत्काळ मान्य केले, व त्यास अभयवचन देऊन हुजुरास बोलाविलें तेव्हा राजे आपले दोन हजार स्वार घेऊन बादशहाच्या भेटीस गेले. तेथे त्याचा बहुमान होऊन त्यास पाच हजाराची मनसब मिळाली[1] निजामशाही सरकाराकडून त्याला पूर्वी मिळालेली जाहगीर त्याच्याकडे कायम केली; व तीशिवाय आणखी काहीं महाल दिले[2] शहाजहान इतकेच करून राहिला नाहीं, तर त्याने राजाच्या काहीं आप्तास व पदरच्या इतर सरदारासहि मनसबा दिल्या[3] विठोजीचा खेळोजी[4] ह्मणून एक मुलगा होता तो ह्या वेळीं

---

१ काहीं मराठी बखरात शहाजी राजाला ह्या वेळा बावीस हजाराची मनसब मिळाली होती, असें आहे खाफीखान ह्मणतो का, सहा हजार पायदळ व पाच हजार घोडदळ ठेविता येईल एवढी मनसब त्यास मिळाली होती (इलिअट भा ७, पृ. १५)

२ ह्या नवीन मिळालेल्या प्रातापैकी अहमदनगराचा प्रात असावा कारण पुढे शिवाजी महाराजांनी ह्या प्राताला हक्क मागितला होता मि किंकेड ह्मणतात कीं, त्यास आणखी फत्तेखानाचीही जाहगीर दिली

३ प्रो जदुनाथ सरकार ह्मणतात की, राजाना ह्या वेळी बादशहाने दोन लक्ष रुपये इनाम दिले, व त्याचा मुलगा सभाजी यास दोन हजाराची मनसब दिली, व त्याच्या एका मिनाजी नावाच्या बधूला तीन हजाराची मनसब दिली

४ ह्याला पाच हजारी मनसब मिळाली होती त्याच्या बरोबर याचे दोघे भाऊ मालोजी व परसोजी हेही मोगलाकडे गेले पुढे दौलताबाद मोगलाच्या ताब्यात जाऊन निजामशाही बुडते असें पाहून खेलोजी मोगलास सोडून विजापूरकराकडे गेला. याची बायको गोदावरी नदीवर स्नानास गेली असता तिला एका मोगल सरदाराने पकडून नेलें त्यानें चार लाख होन खडादाखल घेऊन तिला सोडून दिलें. ह्यानतर विजापूरकराचा मोगलाशीं तह झाल्यावर त्याला त्या सरकारानें आपल्या नोकरीवरून दूर केलें. तेव्हा तो दौलताबादेजवळील आपल्या वडिलांच्या पाटीलकीच्या गांवीं जाऊन राहिला आणि तेथून मोगलांच्या अमलांत लुटालूट करू लागला. औरंग-

राजाबरोबर होता त्यासही इतराबरोबर मनसब मिळाली हें वर्तमान स. १६३० त घडलें त्या वेळी जुन्नर, संगमनेर व वैझापूर हे प्रांत शहाजी राजास मिळाले,व ते हस्तगत करण्यास राजास पाठविले,आणि नंतर त्यास नाशिक येथे ठेविलें.

त्या वेळी दक्षिणेत मोठा दुष्काळ पडून लोक अगदीं हैराण झाले निजामशाही प्रजेचा फारच नाश झाला त्यात आणखी पटकी उद्भवली. तीमुळें तर हजारो लोक पटापट मरूं लागले सगळा देश ओस पडून सरकारी वसुलास मोठाच धक्का पोंचला असा दुहेरी कहर गुदरला असून मोगलासारखा प्रबळ शत्रु निजामशाहींत सारखा धुमाकूळ उडवून देत होता निजामशाहींतील बरेच जहागीरदार व मनसबदार मोगलानी नाहींतसे करून त्याच्या जागी आपले सरदार नेमून दिले असा चोहोंकडून गहजब झाल्यामुळे आपली गादी आता खास जाते असे निजामशहास वाटूं लागले आपले मोठमोठे सरदार फितूर करून मोगलानी आपल्या पक्षास सामील करून घेतले, तेव्हा आता आपली धडगत दिसत नाहीं, असा विचार करून, त्या सर्व कहराचें मूळ तो शोधूं लागला तेव्हा त्याच्या मनाने असें घेतले कीं, आपला नवा वजीर त्या सर्व सकटाचे कारण आहे मग त्याने त्याला अधिकारावरून दूर करून, फत्तेखानास बदीतून आणून पुन वजिरी दिली तकरीबखानास ही आपली मानखंडना सहन न होऊन तो मोगलास जाऊन मिळाला त्यानीं त्याला सहाहजारी सरदार करून आपल्या पदरीं ठेवून घेतले.

फत्तेखानाच्या हातीं पुन अधिकार येताच त्यानें निजामशहाचा मागील अपकाराबद्दल सूड उगविण्याचा निर्धार केला बादशहास वेड लागलें आहे असा प्रवाद त्यानें लोकात पसरून त्याला प्रतिबंधात ठेविलें व लवकरच गळफास देऊन ठार मारिलें त्याच्या पक्षाच्या मोठमोठ्या पंचवीस सरदारांचा एकेच दिवशीं त्याने खून करून सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली ( स. १६३२ ) हें असें क्रूर कर्म करून सर्व राज्याधिकार आपण बळकाविला तो आपल्या हातीं कायम राहावा यासाठी त्यानें शहाजहान बादशहास असा अर्ज केला कीं,[१] 'दिल्लीच्या

---

जेबाने आपले लोक त्याच्यावर पाठवून त्यास पकडून आणून ठार मारिलें. (प्रो. सरकारकृत औरंगजेबाचें चरित्र, भा. १, पृ. ५५ )

१ मि. किंकेड ह्मणतात की, त्यानें हा अर्ज आपला मुलगा अबदूल रसूल याच्या हस्तें पाठविला.

बादशहाचा अंकित होऊन राहण्याची मला किती उत्कट इच्छा आहे याविषयी खात्री व्हावी ह्मणूनच केवळ हें साहसकर्म मी केले आहे तूर्त मीं मूर्तिजाबादशहाचा शहाहुसेन नावाचा दहा वर्षांचा मुलगा गादीवर बसविला आहे, या संबंधाने बादशहाचा काय अभिप्राय आहे तो कळावा ' शहाजहान मोठा धूर्त होता त्याला फत्तेखानाचा मनसुबा तत्काळ कळून आला निजामशाहीचे बरेच परगणे ह्या वेळी त्याच्या हाती आले होते कांहीं किल्ले मात्र अमळ मजबूत असल्या-मुळें हस्तगत झाले नव्हते यास्तव फत्तेखानास हाताशी धरून आपला मतलब पुरा साधावा असा विचार करून त्याने त्याला असा निरोप पाठविला कीं, निजामशाही खजिन्यातील सर्व मोलवान् जवाहीर व उत्तमउत्तम हत्ती आमच्याकडे पाठवून द्याल तर जो मुलूख अद्यापि तुमच्या हाती उरला आहे तो बालराजास बहाल करून तुह्मासही खासगी जहागिरीदाखल कांहीं प्रांत तोडून देऊं फत्तेखानास ही मागणी प्रथमत रुचली नाहीं जवाहीर व हत्ती पाठविण्यास तो बिलकुल राजी नव्हता तेव्हा शहाजहानाने त्याच्या पारिपत्या-साठी मोठें सैन्य रवाना केले मोगलाशी सामना करण्याचें त्राण फत्तेखानास मुळींच नव्हतें ह्मणून तो घाबरून जाऊन बादशहास शरण गेला तो मागत होता तेवढा सगळा ऐवज त्याने बिनहरकत त्याच्याकडे पाठविण्याची व्यवस्था केली, व रोख आठ लाख रुपये देऊन आणखी सालिना काही खंडणी देण्या-चेंहि कबूल केले त्यावरून त्यास देऊ केलेली जहागीर त्याच्या नावाने करून बालराजाच्या वतीने सर्व राज्यकारभार पाहण्याची परवानगी त्याला शहाजहा-नानें दिली ही जी जहागीर फत्तेखानास मिळाली तीत शहाजीराजास पूर्वी दिलेल्या कांहीं महालाचा समावेश झाला[1] त्यामुळें त्यास पराकाष्ठेचे वाईट वाटलें, व त्यानीं मोगलाची ताबेदारी झुगारून देऊन पुन स्वतंत्र होऊन राह-ण्याचा विचार केला त्यानी फत्तेखानाचा पडता काळ पाहून निजामशाहीचा साधेल तेवढा मुलूख काबीज करावा असे मनात आणिलें आणि नाशिक, त्रिंबक, संगमनेर, जुन्नर व उत्तरकोंकणाचा कांहीं भाग हाताशीं घातला. गालनाचा किल्लेदार फत्तेखानाच्या शिरजोरपणास त्रासून किल्ला शहाजीराजांस कांहीं दाम घेऊन द्यावयास सिद्ध झाला. हे वर्तमान मोगल सुभेदारास कळताच

---

१ मि. किंकेड ह्मणतात कीं, ह्या फत्तेखानाची जी जहागीर शहाजीराजास दिली होती ती त्याची त्यास परत दिल्यामुळें शहाजीराजास वाईट वाटलें, आणि त्यानीं मोगलाची नोकरी सोडली.

त्यानें त्या किल्लेदारास मोठी लालूच दाखवून तो किल्ला आपल्या स्वाधीन करून घेतला

मग शहाजीराजानी विजापूरसरकाराशी पुन समेट करण्याचे मनांत आणून त्या दरबारचा मुख्य मुत्सद्दी मुरारपंत ह्याला आपलासा करून घेतले व त्याच्या द्वारें त्या सरकाराशी असें बोलणें लाविलें कीं, ' निजामशाहींत चोहोकडे बेबंदाई होऊन फत्तेखानावर कोणाचाहि भरंवसा नाहीं असें झाले आहे. मोगलानी त्याला अगदी दीन करून सोडिले आहे अशा समयी निजामशाही प्रात काबीज करणे फारस कठीण नाहीं तूर्त दौलताबादचा किल्ला सहज हस्तगत होण्याजोगा आहे कारण तेथील बंदोबस्त चागला नसून तो ज्या सरदाराच्या हवालीं आहे, ते बेदील झाले आहेत सरकारच्या मर्जीस येत असल्यास त्या किल्ल्यावर फौज पाठवावी मी सरकारच्या नोकरीस राहून तो किल्ला मोठ्या युक्तीने व हिमतीने लढून काबीज करून देतो ' ही त्याची मसलत त्या सरकारास पसत वाटली शहाजीराजासारखा बलाढ्य व पराक्रमी सरदार आपणास [illegible] मोगलाशी टक्कर देण्यास आपणाला बराच वकूब येईल असें त्यास [illegible] मग अदिलशहानें आपली फौज शहाजीराजाच्या मदतीस देऊन मुरारपंताला राजाबरोबर दौलताबादेवर पाठविले

शहाजीराजे विजापूरकराशी सगनमत करून त्याची फौज घेऊन [illegible] चालून येत आहेत असें पाहून फत्तेखान घाबरून गेला त्याच्याशीं सामना करण्याचा त्याला आवाका नव्हता मग त्याने मोगल सुभेदार मोहबतखान यास असे कळविले कीं, " शहाजीराजे मजवर चाल करून येत आहेत किल्ल्यात सामुग्री मुळी नाहीं तरी येऊन माझा बचाव करावा व किल्ला स्वाधीन करून घ्यावा मी बादशहाचा अकित होतो त्यावरून मोहबतखान त्याच्या कुमकेस आला ह्या मोगल सरदारानें विजापूरकराचें सैन्य दौलताबादेवर चालून येत होते त्यास अडवून त्याच्याशीं मोठ्या निकराचा सामना केला. ह्या वेळी शहाजीराजानी आपल्या अगच्या शौर्याची व युद्धकौशल्याची अगदीं पराकाष्ठा

---

१ अबदुल हमीदच्या बादशाहनाम्यात असे ह्मटले आहे की, ह्या वेळी विजापूर सरकाराचा मुख्य कारभारी खवासखान हा होता. हा मूळचा कलावत असून ह्या अधिकारास पोचला होता. मुरारपत हा त्याचा विश्वासू मसलतगार होता ( इलिअट, भा. ७, पृ. २३ )

केली, परंतु शत्रुसैन्याचा जमाव मोठा असल्याकारणानें विजापूरकराच्या फौजेचा मोड होऊन तीस मागे हटावे लागलें

किल्ला लढून हातीं येत नाहीं असें पाहून शहाजीराजे व अदिलशहाचे सरदार यानी तो भेद करून ताब्यात घेण्याचा बेत केला त्यानीं फत्तेखानास असा निरोप पाठविला कीं, दौलताबादेचा किल्ला मोगलाच्या स्वाधीन कराल तर तुमचा सर्वस्वी नाश होईल, परतु शहाजीराजे याचें जे नुकसान झालें आहे त्याची भरपाई करून देऊन तो किल्ला आमच्या ताब्यात द्याल तर आमच्या दरबाराचा तुमच्याशी पूर्ववत् स्नेह राहील, व तुमचा शत्रु तो आमचा शत्रु, असें मानून आह्मी तुह्मास सर्व प्रसगी साहाय्य करूं हे त्याचे बोलणे फत्तेखानास मान्य होऊन त्याने मोगलाशी दगा करण्याचे धाडस केलें तेव्हा विजापूरकरानी त्यास अन्नसामग्री व पैसा पुरविला ही अशी कुमक मिळाल्यावर, मोगल सैन्याने किल्ल्याखाली तळ दिला होता, त्यावर त्याने किल्ल्यावरून एकाएकीं तोफाचा भडिमार सुरू केला. शहाजीराजे विजापूरकराची फौज घेऊन फत्तेखानाच्या कुमकेस आले त्यानी मोगलाच्या छावणीवर बाहेरून एकसारखे छापे घालून त्यास अगदी हैराण करून सोडलें त्याप्रमाणें त्यानीं पाच महिनेपर्यंत किल्ला शत्रूच्या हातीं जाऊं दिला नाहीं तरी मोगलाच्या प्रबल सैन्यापुढे त्याचा दम न निघून अखेरीस मोहबतखान विजयी झाला, आणि दौलताबादेचा किल्ला त्यानें सर केला. हें वर्तमान स १६३३ त घडले

फत्तेखानाची ह्या युद्धात पुरी दुर्दशा उडाली तो अगदी हतवीर्य होऊन मोगलास शरण गेला दिल्लीच्या बादशहाने त्याचा सर्व अधिकार काढून घेऊन

१ प्रो सरकार हा किल्ला मोगलाच्या हातीं जाण्याचे कारण असे सागतात की, किल्ल्यातील माणसाचा भारी उपासमार होऊ लागला तेव्हा फत्तेखानाने मुरारपता कडे अन्नसामुग्रीची मागणी केली त्यास त्याने असा जबाब दिला की, किल्ला पहिल्यानें आमच्या हवालीं करा ह्मणजे अन्नसामुग्री देतो ही अट त्यास मान्य न होऊन त्यानें तो अभेद्य किल्ला मोगलाच्या स्वाधीन केला मि किकेड असें ह्मणतात की, महबतखानाचा मुलगा खानजमान दौलताबादेकडे येत आहे असे कळताच शहाजी राजे त्याच्या अगोदर दौलताबादेपाशीं येऊन थडकले, आणि त्यानी फत्तेखानाशी असें बोलणें लाविलें कीं, त्यानें मोगलाचा नाद सोडून विजापूरकराशी संगनमत करावें व सोलापूर व दुसरे पाच प्रात यावरची आपली सत्ता सोडावी, ह्मणजे दौलताबाद वगैरे किल्ले निजामशहाकडे राहू दिले जातील. हें बोलणें फत्तेखानाला कबूल झालें. तेव्हा शहाजीराजे किल्ल्यात कांहीं लोक व अन्नसामुग्री भरून मोगलांशीं टक्कर देण्यास सिद्ध झाले.

त्याला काहीं वार्षिक वेतन ठरवून स्वस्थ बसावयास लाविलें ज्या बालराजास निजामशाही तक्तावर बसविले होते त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात नेऊन कैदेंत ठेविले, आणि निजामशाही राज्य खालसा करून सगळा मुलूख आपल्या ताब्यात घेतला ह्याप्रमाणे स १६३३ त निजामशाहीची अखेर झाली शहाजहान बादशहास याबद्दल कृतकृत्यता वाटून आपण एवढ्यापुरता निर्वेध झालों असें तो मानू लागला शहाजीराजे प्रबळ होऊन पुन निजामशाहीची स्थापना करितील, व त्याच्याशी आपणास पुनरपि युद्धप्रसग करावे लागतील, हे त्याच्या ध्यानीमनीहि नव्हते

ह्या लढाईच्या वेळी शहाजीराजास साधेल त्या उपायाने जेर करण्याचा विचार मोगल सेनापतीनें केला होता दौलताबादेस मोगलाचा वेढा पडला असता, शहाजीराजे त्याच्यावर वेळोवेळा छापे घालून त्यास हैराण करू लागले. तेव्हा मोहबतखानानें त्याचा सूड उगविण्यासाठी असा बेत केला की, शहाजीराजाची स्त्री जिजाबाई ही बायझापुरास[1] आहे, तिला हरउपायाने पकडून आणावे इतक्यात निजामशाहींतील एक किल्लेदार[2] मोहबतखानास शरण येऊन आपणास मोगल बादशहाच्या नोकरीस ठेवा, असे ह्मणू लागला तेव्हा त्यानें त्याला असे सागितलें कीं, शहाजीराजे याची स्त्री बायझापुरास आहे तिला पकडून आणून आमच्या स्वाधीन कर, ह्मणजे तुझ्या इमानाविषयी बादशहाची खात्री होऊन तुला नोकरी मिळेल ’ ही अट त्या किल्लेदारास मान्य होऊन त्या प्रयत्नास तो लागला त्याने मोठ्या युक्तिप्रयुक्तीने जिजाबाईस पकडून

---

१ हे शहर औरगाबादेच्या पश्चिमेस २५ मैलावर आहे शहाजीराजे खानजहान लोदींचा पक्ष सोडून मोगलाच्या सरदारास कुमक करूं लागले त्या वेळी जुन्नर, नाशिक, त्रिबक, सगमनेर वगैरे प्रात त्यास जहागिरादाखल मिळाले, त्याबरोबरच बायझापूर त्याच्या हाती आले होते ह्या गावीं जाधवरावाचे कुटुब राहत असून जिजाबाई आपल्या आईकडे त्या वेळीं राहत होती असे जे रा सरदेसाई याचे ह्मणणे आहे ते निराधार आहे जुन्नरच्या श्रीनिवासरावाचा पुडावा मोडून त्यास पकडण्याच्या धामधुमीत राजानीं जिजाबाई व शिवाजी यास शिवनेरी किल्ल्यातून काढून बायझापुरास नेऊन ठेविले होते असे ते आपल्या मराठी रियासतींत ह्मणतात (पृ १५२ पाहा) प्रो सरकार जिजाबाईला पकडून नेल्याची हकीकत देत नाहीत खेलोजीच्या स्त्रीला पकडून नेल्याचे मात्र ते लिहितात पण बहुतेक मराठी बखरींत जिजाबाईस पकडून नेल्याचें लिहिले आहे

२ मि. किंकेड ह्मणतात की, हा त्रिंबकचा किल्लेदार होता व त्याचे नाव ह्मालदारखान असें होते.

मोगलाच्या छावणीत आणून दाखल केलें, परंतु ह्या वेळीं मोगलांच्या लष्करांत जाधवरावाचा भाऊ जगदेवराव हा होता, त्याला ही गोष्ट रुचली नाहीं त्यानें खानापाशीं अशी रदबदली केली कीं, ' शहाजीराजे यांचें आमच्या घराण्याशीं वाकडें आहे, ते तुह्मास महशूर आहेच ह्या वैमनस्यामुळे त्यानी जिजाबाईस व तिच्या मुलास सोडून दिलें असून दोनतीन वर्षांपूर्वीं मोहित्याची कन्या तुकाबाई हिजशी विवाह केला आहे त्यामुळे तर जिजाबाईचा व त्याचा पुरा बेबनाव झाला आहे यास्तव त्याना पकडून कद केल्यानें शहाजीराजास तर काहींएक वाईट वाटणार नाहीं, पण ह्यामुळे आमच्या घराण्याची मात्र नाहक इजत घेतल्यासारखे होईल ' हे त्याचे ह्मणणे खानास खरें वाटून जिजाबाईस त्याने जाधवाच्या स्वाधीन केले त्याने त्याना शहाजीराजाच्या ताब्यातील कोंडाणा किल्ल्यात सुरक्षितपणे पोचते केले ह्याप्रमाणे आमच्या चरित्रनायकावर बाळपणीं आलेलें हे एक मोठेंच अरिष्ट टळलें

पूर्वोक्त प्रकारे दौलताबादेजवळ विजापूरकराच्या फौजेचा मोड होऊन तिला माघारीं फिरावे लागलें, आणि तीबरोबर शहाजीराजेहि निरुपायास्तव मागे आले परतु ह्या पराभवाने व आशाभगाने राजे मुळींच हताश झाले नाहींत त्याचा जोम व उत्साह हीं कायम होतीं किंबहुना तीं ह्या अपयशानें विशेषच वृद्धिंगत झालीं. त्यानी ह्या समयी असा निश्चय केला कीं, निजामशाही मोगलानी बुडविली ती पुन स्थापित करावयाची ही प्रतिज्ञा काहीं अशीतशी अवघड नव्हती मोगलासारख्या बलाढ्य शत्रूंशीं त्याला झगडावयाचे होते राजानीं विजापूरकराच्या सैन्यासह परत तिकडे माघारी न जाता तिला वाटेतच सोडून नाशिकाकडून भीमगडाकडे कूच केलें[१] हा किल्ला त्याच्या ताब्यात पूर्वीपासूनच होता तीकडील डोंगरी मुलखात राहून त्यानी पुन फौज जमविली. पदरीं बरीचशी फौज झाल्यावर त्यानीं पुणे व चाकण यापासून बालेघाटापर्यंत सगळा प्रात मोगलाच्या हातचा हिसकावून घेतला ह्याप्रमाणे ते मोगलाचीं एकामागून एक ठाणीं उठवीत चालले. तेव्हा दौलताबादेच्या बंदोबस्तासाठीं इरादतखाननामक एका सरदाराची नेमणूक झाली होती, त्याने शहाजीराजांची

---

१ मि किंकेड बादशाही नाम्याच्या आधारान ह्मणतात कीं, महबतखान दौलताबादेस आपले लोक ठेवून माघारा वळताच शहाजीराजानीं लागलीच पुनः दौलताबादेवर हल्ला केला तेव्हा किल्ल्याचा रखवालदार खानदौरान यानें मोठ्या शौर्यानें लढून राजाचें काहींएक चालू दिलें नाहीं.

ही धामधूम बंद करण्याचा एक उपाय योजिला. तो असा कीं, विठोजीचा मुलगा मालोजी भोंसले ह्मणून होता, त्याशी त्याने स्नेह करून त्याच्या द्वारें शहाजीराजांशीं असें बोलणें लाविलें कीं, तुह्मी मोगलाच्या मुलखास उपद्रव करण्याचें सोडून द्याल तर तुह्मास पुन शहाजहान बादशहाकडून बावीसहजारी मनसब देववितों व तुमच्या मुलास ही मोठ्या मनसबा देववितो, शिवाय तुमच्या ज्या काहीं दुसऱ्या मागण्या असतील त्या मान्य करवितो हे राजाला मुळीच कबूल झालें नाहीं असल्या लालचीने त्याचे मन ह्या वेळी वळण्यासारखे नव्हते

शहाजीराजाच्या पदरी ह्या वेळी आठदहा हजार फौज झाली असून निजामशाहीचा मोगलाच्या ताब्यात गेलेला बराच प्रात त्यानी काबीज केला ह्यामुळें मोगलांच्या सैन्याचा आपणावर लवकरच हल्ला होईल हे त्याला ठाऊक होते. त्याच्याशीं एकटें भाडण्याचे सामर्थ्य त्यास नव्हते हे उघड आहे यास्तव त्यानी असा विचार केला कीं, विजापूरसरकारची मदत मिळाल्यावाचून आपली प्रतिज्ञा शेवटास जाणार नाहीं त्या वेळी त्या दरबारात खवासखान मुख्य कारभारी होता त्याच्याशी राजानी मुरारपंताच्या द्वारे असें बोलणे लाविले की, निजामशाहीच्या ८४ किल्ल्यापैकी एक दौलताबादेचा किल्ला गेला ह्मणून काय झालें ? तुह्मी मला साहाय्य कराल तर मी होईल तेवढी खटपट करून निजामशाही पुन उभी करितो व बहिरी घराण्याचा झेडा पुन उभारितों हे त्याचें ह्मणणें काही मुत्सद्यास पसत वाटले नाही, परतु राजानी त्याच्या सर्व हरकती व सशय मोडून काढून त्याची मने आपल्याविषयी शुद्ध केली. तेव्हा त्याच्या मसलतीस कबूल होऊन त्यास लागेल ती कुमक करण्यास ते तयार झाले, व त्यानीं राजाकडून असा करार करून घेतला की, निजामशाही वंशातील कोणी तरी वारस पाहून, त्यास गादीवर बसवून त्याच्या वतीने राजानी निजामशाहीचा कारभार पाहावा ह्या कराराप्रमाणें राजानी मूर्तिजा नावाचा एक दहा वर्षांचा

१ मोडककृत अदिलशाहीच्या इतिहासात ह्या सबधाचा उल्लेख अगदाच निराळा आहे तो असा विजापूरकराच्या एका सरदाराने हे मलोख्याचे बोलणे राजाशीं लाविले, तेव्हा त्यानी असा उलट निरोप पाठविला की, अदिलशहा मला आपल्या पुत्राप्रमाणें मानून बावीस हजाराची मनसब करून देईल तर तुह्मी सागाल तसें वर्तन मी करीन ही अट त्या सरदारास मान्य होऊन त्याने अदिलशहाकडून आज्ञापत्र आणविले, आणि राजाशीं असा करार केला की, निजामशाही प्रात काबीज करण्याच्या कामीं विजापूरसरकाराने फौजेची मदत द्यावी, व काबीज केलेला प्रात उभयतानीं वाटून घ्यावा मुळातील मजकूर शहाजीराजाच्या कैफियतीतून घेतला आहे.

मुलगा श्रीवर्धनें येथे नजरकैदेंत होता त्याला सोडवून आणून, भीमगड येथें तक्ताची जागा करून तेथे ठेविले हे वर्तमान स १६३३ च्या सप्टेंबर महिन्यात घडलें

ह्या मुलाच्या नावाची द्वाही फिरवून आणखी मुलूख व किल्ले घेण्याचा सपाटा राजानी चालविला ही त्याची हिमत व कर्तबगारी पाहून व ह्या स्तुत्य कृत्याने संतोष पावून, निजामशाही घराण्याचा अभिमान बाळगणारे सर्व सरदार, जहागीरदार व देशमुख त्याच्या पक्षास सामील होऊन त्यास लागेल ती मदत करण्यास उद्युक्त झाले निजामशाही लष्करातील शिपाई बेकार होऊन सैरावैरा फिरत होते, ते शहाजीराजाच्या निशाणास येऊन मिळाले ह्याप्रमाणे त्याचा पक्ष बळावत जाऊन सैन्यबळहि हळूहळू वृद्धिगत झाले राजानी निजामशाहीच्या ताब्यातली सगळी कोकणपट्टी, पूर्वेस अहमदनगरापर्यंत सारा मुलूख व दक्षिणेस नीरानदीपासून चादोरच्या डोगरापर्यंत एकंदर प्रात हस्तगत केला. राजाचा जुन्नर शहरावर फारच डोळा होता तेथे श्रीनिवासराव हा स्वतंत्रपणे अमल करीत होता. हा राजाचा मोठा दोस्त होता निजामशाहीचे प्रात बळकावून जे सरदार स्वतंत्र होऊन बसले होते, त्याला मोडून काढिल्यावाचून राज्यास बळकटी येणार नाहीं, हे राजाच्या लक्षात येऊन त्यानी श्रीनिवासरावाला आपला अकित होऊन राहण्याविषयी सामोपचाराने पुष्कळ सागून पाहिलें, परतु जुटीचे बळ केवढे आहे हे त्या स्वार्थी सरदाराच्या ध्यानात न येऊन; तो राजाच्या ह्मणण्यास काहीं केल्या कबूल होईना तेव्हा त्यास ताब्यात

---

१ प्रो सरकार ह्मणतात कीं, जुधन किंवा अजराई नावाचा किल्ला जुन्नरच्या पश्चिमेस तीस मैलावर आहे तेथे ह्या मुलास नजरकैदेत ठेविले होते

२ प्रो सरकार ह्मणतात कीं, तळकोकणात शिद्दी साइबखान नामक निजामशाही सरदार स्वतत्र होऊन कल्याणास होता त्याला शहाजीराजानीं मुरारपताच्या सल्ल्यानें असे पत्र लिहिलें कीं, “तुह्मी नवीन निजामशहाला मुजरा करावयास यावे आणि आह्मास सहाय व्हावे ” हे त्याचे सागणें त्या शिद्दीने कबूल केले नाही त्याने सगळें तळकोंकण शहाजीराजाच्या स्वाधीन करून आपण विजापूरकराच्या दरबारी जाऊन राहण्याचे योजिले शहाजीराजाला ही गोष्ट रुचली नाहीं; आणि मुरारपत शहाजीराजाच्या मदतीस काही लोक ठेवून विजापुरास जाऊ लागला तेव्हा त्यास जाऊन मिळण्यास हा शिद्दी निघाला असता त्याच्यावर शहाजीराजानीं हल्ला करून त्यास अगदीं हैराण केलें; आणि मुरारपताच्या रदबदलीमुळें तो त्याच्या हातचा सुटला.

आणण्यासाठीं राजाला कपटविद्येचा प्रयोग करावा लागला. त्यानी त्याच्याशीं शरीरसंबंधाचें बोलणें लावून त्याची मुलगी आपला मुलगा संभाजी यास मागितली. अशा प्रकारें सोयरीक जुळविण्याच्या मिषानें त्यास त्यानी आपल्या घरीं भोजनाचें आमंत्रण केलें त्याप्रमाणे श्रीनिवासराव भोजनास आला असता त्यास त्यानी कैद केलें, व त्याच्या ताब्यातलीं जुन्नर, जीवधन, सौंदा, भोरग वगैरे ठाणीं हस्तगत केली तक्तावर बसविलेल्या मुलास भीमगडाहून जुन्नरास आणिलें श्रीनिवासरावाप्रमाणेंच भिवडीस शिद्दी सायासैफखान, व जंजिऱ्यास शिद्दी अबर[1] हे स्वतंत्र होऊन पुंडावा करीत होते त्यासहि राजानी आपल्या काबूत आणिलें.

त्याप्रमाणें मोगलानी काबीज केलेला निजामशाहीचा बहुतेक मुलूख हस्तगत करून शहाजीराजानीं निजामशाही तक्त पुनरपि स्थापिलें, हे वर्तमान शहाजहान बादशहास कळताच त्याने राजाच्या पारिपत्यासाठी फौज पाठविली तिचा त्यानीं पुरा धुव्वा उडवून दिला परिंडे येथे मोगलाच्या सैन्याशी विजापूरकराच्या साहाय्यानें मोठे तुबळ युद्ध करून त्याचा त्यानी अगदी फडशा उडविला, व अहमदनगरातून त्यास हाकून देऊन खानदेशाकडे पिटाळून लाविले मग शहाजहानानें खानडौरानें[2] व खानजमान यास मोठे सैन्य देऊन शहाजीराजाचें बंड मोडून टाकण्यासाठीं रवाना केलें परंतु त्याहि सरदारास राजानीं चांगलेच खडे चारिले विजापूरदरबारचे रणदुल्लाखान व मुरारपंत याचा राजास चांगला पाठिंबा असून खुद्द त्याच्यापाशींहि जय्यत फौज जमली होती. त्यामुळे मोगलाच्या सैन्याचा त्याला वर सांगितल्याप्रमाणें पराभव करिता आला, व त्यानी अहमदनगर येथे फौज जमा करून दौलताबादेपर्यंतच्या मोगलाच्या मुलखांत लुटालूट चालविली

आपण दोन वेळा सैन्य पाठविलें त्याची शहाजीराजानी दुर्दशा उडविली, हें पाहून शहाजहान अगदी संतापून गेला त्यांत आणखी विजापूरसरकारानें त्या बंडखोरास मदत केल्याचें समजून तर त्याला अधिकच चेव आला. निजामशाही अजीबात बुडवून आपला ताबा त्या मुलखात बसविल्याबद्दल जी त्यास

---

१ हा अबर साइफखानाच्या वतीने शहाजीराजाबरोबर लढत असतां राजानीं त्यास जेर करून कैद केलें असें प्रो. सरकार ह्मणतात.

२ प्रो. सरकार लिहितात की, ह्या सरदारानें शहाजीराजाच्या एका तुकडीस गांठून तिचा मोड केला, आणि त्याच्या लोकाची मोठी कत्तल उडवून तीन हजार लोक कैद केले, व त्यांचे ८००० बैल धान्य वगैरे सामग्री घेऊन जात होते ते सगळे धरून नेले.

धन्यता वाटत होती तो सगळा भ्रम होता, असे राजानी थोडक्याच अवकाशात त्याच्या प्रत्ययास आणून दिलें. निजामशाहीशी प्रारभी कलह सुरू केला तेव्हा जी स्थिति होती तीच पुनरपि प्राप्त झाली असून पूर्वीच्याहून विशेष बलाढ्य शत्रूशी लढण्याची पाळी आली, हें त्या बादशहाच्या लक्षात येऊन त्याच्या अगाचा तिळपापड झाला मग क्रोधाच्या आवेशात त्यानें अशी प्रतिज्ञा केली कीं, प्रचड सेना घेऊन दक्षिणेंत जावयाचे, शहाजीराजाचा पुरा नायनाट करून निजामशाही मुलूख पुनरपि सगळा काबीज करावयाचा, व प्रसग पडल्यास विजापूरची अदिलशाही आणि गोवळकोंड्याची कुतुबशाही ह्या यवनी राज्याचे समूळ उत्पाटन करावयाचे असा पक्का निर्धार करून हा बादशहा मोठ्या जय्यत फौजेनिशी[1] शहाजीराजाच्या पारिपत्यास पिसाळलेल्या चित्याप्रमाणे दक्षिणेत धावून आला

प्रथमत त्याने असा बेत केला कीं, महमद अदिलशहास धमकीचा निरोप पाठवून शहाजीराजाच्या कटातून फोडावे ह्याप्रमाणे त्याने अदिलशहाकडे आपला वकील पाठवून असें कळविलें कीं, 'निजामशाहींतील जे किल्ले तुह्मी घेतले आहेत ते सगळे आमच्या स्वाधीन करावे, मुलुकमैदान[2] नावाची तोफ तुह्मी परिंड्याच्या किल्ल्यातून विजापुरास नेली आहे ती परत करावी, शहाजीराजास व त्याच्या पक्षाच्या लोकास कोणत्याहि प्रकारचे साहाय्य करूं नये, ह्या अटी कबूल करून त्याबरहुकूम वागण्यास तुह्मी तयार झाला तर तुह्मास निजाम-

---

१ पन्नास हजार फौज घेउन बादशहा ह्या वेळीं दक्षिणेत उतरला असे प्रो. सरकार ह्मणतात

२ ह्या नावाचा अर्थ रणभूमीचा राजा किवा सिह असा आहे ही तोफ अहमदनगर येथे निजामशहाच्या हुकुमावरून कुस्तुतुनियातील एका कारागिराने ओतून तयार केली हिचे वजन साठ खडी आहे असे ह्मणतात एका इग्लिश कामगाराने हिच्या वजनाचा अजमास ३२००० रत्तल केला आहे हिची लाबी नऊ हात असून परिघहि तितकाच आहे हात गोळा राहण्याची जागा इतकी मोठी आहे की, तीत बसून पागोटे सहज बाधिता येते हिच्या तोंडाचा व्यास चार फूट आठ इच आहे. हुसेन निजामशहाने विजयनगरच्या रामराजावर स्वारी केली तेव्हा ही तोफ बरोबर नेली होती असे ह्मणतात ही हल्ली महाकाली ह्या नावानें प्रसिद्ध आहे भाविक लोक हिची पूजा अजून करितात औरगजेबाने विजापूर जिकल्याच्या स्मरणार्थ हिजवर स. १६८५ त एक लेख कोरला होता कंपनी सरकारच्या मनात ती इंग्लडच्या राजास नजर करण्याचें स. १८२३ त आलें होतें. परतु ती किनाऱ्यापर्यंत आणण्यास सोईचे रस्ते नाहींत, असा एका एन्जिनिअरानें अभिप्राय दिला, ह्मणून ती येथें राहिली.

शाहीच्या सत्तेखालील सगळी कोकणपट्टी, सोलापूरचा किल्ला व त्या खालचा सगळा मुलूख आह्मीं देऊं, आणि ह्या अटी तुह्मास कबूल झाल्या नाहींत तर तुमचे राज्य सफाई बुडवून टाकण्यास आम्ही उद्युक्त होऊ ' विजापूरकराला ह्या त्याच्या अटी मान्य झाल्या नाहींत कारण रणदुल्लाखान वगैरे सरदारास शहाजीराजाच्या कटातच राहणे विशेष हिताचे वाटले

हा बेत फसला तेव्हा शहाजहानानें दोघाचेहि एकेच वेळी पारिपत्य करण्याचा बेत करून आपल्या फौजेचे चार भाग केले, आणि दोन शहाजीराजावर व दोन विजापूरकरावर पाठविले शहाजीराजावर पाठविलेल्या दोन टोळ्यापैकीं एकीवर शाइस्ताखाननामक सरदार प्रमुख असून त्याला चादोर, नाशिक, संगमनेर वगैरे शहरे व त्याच्या आसपासचा मुलूख व किल्ले, जे राजाच्या ताब्यात होते, ते घेण्याचे काम सागितलें दुसऱ्या टोळीवर खानजमान नावाच्या सरदारास नेमिलें असून तींत वीस हजार स्वार होते त्याला अशी कामगिरी सागितली कीं, त्याने शहाजीराजाशी मैदानप्रातात सामना करून त्याला तेथून हाकून द्यावे, व कोकणपट्टीतील किल्ले सर करून निजामशाही मुलखात राजास कोठेहि थारा देऊं नये

ह्याप्रमाणें मोगलाच्या जबरदस्त सैन्याचा शहाजीराजावर दोहो बाजूंनी एकदम मारा सुरू झाला तरी ते यत्किंचित्हि डगमगले नाहींत शत्रूशी अढळ धैर्याने टक्कर देऊन शेवटपर्यंत लढावयाचे, भिऊन हार जावयाचे नाहीं, असा निर्धार त्या वीर्यशाली पुरुषाने केला ह्या प्रसगी राजानी आपले सर्व क्षात्रतेज प्रगट केले त्याचे अप्रतिम युद्धकौशल्य, विलक्षण रणवेग, पुरा गनिमी कावा पाहून त्याच्या कट्टया शत्रूने देखील तोडात बोट घातले. मोगलाच्या सैन्यास राजानीं पुष्कळ हैराण केले पण त्याचा जमाव फारच मोठा असल्याकारणाने राजाचा जिकडूनतिकडून मोड होऊं लागला नाशिक व चादोर ह्या प्रातातले पंचवीस किल्ले मोगलानी काबीज केले, सोलापूर व बेदर ह्या शहरांच्या दरम्यानचा सगळा मुलूख राजाच्या हातचा गेला कोकणपट्टींतलीहि बरीच ठाणीं मोगलानीं घेतली. शत्रूंने कोकणातून हुसकून लाविल्यामुळे शहाजीराजे अहमदनगराकडे जाऊन दबा धरून बसले. तेथे त्याच्यावर शत्रूच्या दोन्ही टोळ्यांनी एकवट होऊन चाल केल्यामुळे निरुपाय होऊन त्याच्या तावडींतून मोठ्या शिताफीनें सुटून चांभारगोंदें व बारामती यांच्या दरम्यानच्या मुलखांत ते दडून राहिले. तेथेंहि शत्रूनें पिच्छा पुरविल्यामुळे ते कोल्हापूर व मिरज ह्या

प्रांतांकडे वळले तेथे त्यास विजापूरकराची कुमक मिळताच ते उलटून मोगलाच्या सैन्यावर छापे घालू लागले, त्यांची रसद मारून त्यास दाणावैरण मिळेनासें त्यानी केलें राजाशी सामना करण्याचा किंवा त्याच्या पाठीस लागण्याचा आवाका त्यास उरला नाहीं

हें वर्तमान शहाजहानास कळलें तेव्हा त्याने खानजमानास असा हुकूम पाठविला कीं, शहाजीराजाच्या पाठीस लागून फौजेची खराबी फार होत आहे, तरी तूर्त त्याचा नाद सोडून विजापूरसरकारच्या मुलखात स्वारी करावी त्या सरकाराचा पाडाव केल्यावर मग शहाजीराजास जेर करण्यास उशीर लागणार नाहीं. ह्या हुकुमाप्रमाणे तीन मोगल सरदारानी विजापूरकराच्या राज्यात स्वारी करून जिकडेतिकडे एकसारखा धुमाकूळ उडवून दिला त्याचे पुष्कळ किल्ले व शहरें त्यानी हस्तगत केलीं व हजारो लोक बंदिवान् केले शत्रूची भली मोठी फौज थेट विजापुरापाशीं जाऊन थडकली. तेव्हा आदिलशहा अगदी घाबरून गेला शत्रूशीं सामना करण्याचे सामर्थ्य त्यास नव्हते, यास्तव त्याने त्याच्याशीं तहाचें बोलणें लाविलें, व उभयपक्षामध्ये लागलींच तह झाला[१], तो विजापूरकराला अनुकूल असाच झाला ह्या तहात असें ठरलें कीं, परिंडा व सोलापूर हे किल्ले व त्याखालील सगळा मुलूख महमद अदिलशहाला मिळावा; सोलापूरच्या पूर्वेस बेदर, कल्याणी व नलदुर्ग ह्या प्रांतावरहि अदिलशहाचाच अमल कायम राहावा, मुलुकमैदान तोफ त्यानेंच आपल्याकडे ठेवावी, कोंकणपट्टींत विजापूरकराच्या मुलखास लागून जो निजामशाहीचा प्रांत वसईच्या नदीपर्यंत होता तो आदिलशहाच्या स्वाधीन व्हावा, त्याप्रमाणेंच भीमा व नीरा ह्या नद्यांच्या दरम्यान चाकणच्या किल्ल्यापर्यंत जो मुलूख पूर्वीं निजामशाहीच्या ताब्यांत होता तो अदिलशहास मिळावा, हा एवढा मुलूख मिळाल्याबद्दल अदिलशहानें मोगलबादशहास वर्षाला बारा लाख होन खंडणी द्यावी; शहाजीराजे आपल्या ताब्यातील एकूणएक किल्ले सोडून देऊन, आपल्याजवळच्या सर्व तोफा व इतर सगळी युद्धसामुग्री मोगलाच्या स्वाधीन करितील

१ मोगलाच्या ह्या स्वारीचें वर्णन प्रो. सरकारानीं औरंगजेबाच्या चरित्रात केलें आहे तें असें.–मोगल सैन्य शेतांची नासाडी करीत घरेंदारें जाळीत चाललें, व गुरेंढोरें हरण करून गावांतील लोकांची कत्तल करीत चाललें, त्यानीं धट्टयाकट्टया माणसास पकडून गुलाम केलें. ह्याप्रमाणें चांगले नांदते गाव त्यानीं अगदीं बेचिराख करून टाकिले. विजापूरकरानीं शहापूरच्या तलावाचा बांध फोडून विजापूराच्या आसपासचा प्रदेश जलमय करून सोडला. त्यामुळें मोगलांचा निरुपाय होऊन ते परत गेले.

तर त्याला व त्यांच्या पदरच्या एकंदर लोकाला शहाजहान बादशहानें क्षमा करावी, नाहींतर विजापूरकरांनी त्यांला आपल्या राज्यांत कोठेंहि थारा देऊं नये, ते जसे मोगलाचे शत्रु आहेत तसेच ते आपलेहि आहेत असें अदिलशहानें मानावें हा तह स १६३६ त झाला[१]

त्याप्रमाणें विजापूरकर तह करून प्राप्त झालेल्या अरिष्टातून स्वत मुक्त झाले. त्यामुळें शहाजीराजाचा एक मोठाच मदतगार नाहींसा होऊन ते एकटे पडले. पण अजूनहि त्यानीं हिमत सोडली नव्हती शत्रूशीं शेवटपर्यंत झुंजावयाचें अशी त्यास धमक होती. विजापूरकराशीं समेट करून शहाजहानाची सगळी फौज मोकळी झाली मग तिने एकट्या शहाजीराजावर आपला मोर्चा फिरविला. अशी ही एकत्र झालेली मोठी सेना राजाच्या एकसारखी पिच्छास लागली. मध्यें थोडासा अवकाश सापडला तेवढ्यात राजानी कोकणात उतरून आपल्या राहिलेल्या किल्ल्याचा कडेकोट बंदोबस्त चालविला होता पण इतक्यांत मोगलाचा प्रचड सेनासमुद्र त्याच्यावर लोटला, आणि त्यास विजापूरकरही सहाय झाले त्याचा सरदार रणदुल्लाखान सैन्य घेऊन त्याच्या मदतीस गेला. त्यामुळें एकंदर किल्ले शत्रूच्या हातीं जाऊन ते अगदी जेरीस आले, आणि शेवटी माहुलीच्या[२] किल्ल्यात जाऊन राहिले मोगलाचा सरदार खानजमान हा त्यांच्या पाठीवर होता त्यानें त्या किल्ल्यास गराडा घालून मोर्चे लाविले. राजांनीं तो

१ प्रो सरकार यानी औरगजेबाच्या चरित्रात ह्या तहाची कलमे दिली आहेत ती अशी (१) अदिलशहाने मोगलबादशहाचे अकित होऊन त्याच्या हुकमात राहावें; (२) निजामशाहीचा अत झाला असे ठरवून तिचा मुलूख अदिलशहा व मोगल बादशहा यानी आपसात वाटून घ्यावा, आणि हा वाटलेला मुलूख ताब्यात घेण्यास मोगल सरदाराना हरकत करू नये, (३) अदिलशहाचा सगळा मुलूख त्याच्याकडे कायम राहून आणखी सोलापूर, वागणी, परेंडा, भाळकी, चिदगुप, पुणें, सुपें, व कोकण प्रात वगैरे पन्नास परगणे निजामशाहीच्या सत्तेतले त्याने घ्यावे, (४) अदिलशहाने वीस लाख रुपये द्यावे, (५) गोवळकोंड्याच्या कुतुबशहाशी कोणत्याही प्रकारची कलागत अदिलशहानें करू नये त्याच्याशी वडील बधूच्या नात्याने वर्तावें; (६) उभय पक्षानीं एकमेकाच्या सरदारास फितवू नये, व फिसाद केलेल्या सरदारास नोकरीस ठेवू नये, (७) शहाजी भोंसले यानी निजामशाही घराण्यातला एक राजपुत्र उभा केला होता, तरी त्यानें आपल्या ताब्यातले जुन्नर, त्रिंबक वगैरे किल्ले मोगलाच्या हवालीं केले नाहींत तर त्यांस अदिलशहानें आश्रय देऊ नये, किंबहुना विजापूरसरकारच्या मुलखात कोठेंहि थारा देऊ नये.

२ हें ठिकाण मुबईच्या ईशान्येस सुमारें ३२ मैलावर आहे.

किल्ला काहीं वेळ लढविला परतु शेवटीं निरुपाय होऊन त्यांनीं तो शत्रूच्या स्वाधीन केला, आणि शहाजहान बादशहास त्यानीं असा नम्रतापूर्वक अर्ज केला कीं, ‘ माझ्या सर्व अपराधाची क्षमा करावी व मला आपल्या नोकरीस ठेवावें ’ बादशहानें ही राजाची विनंति मान्य केली नाहीं त्याना त्यानें असा जबाब पाठविला कीं, ‘ तुह्मास पूर्वी मनसब दिली असता तुम्हीं दिल्लीपदपाद-शाहीशीं विरोध केला, व शेवटी हे असें बंड करून आमची पुष्कळ खराबी केली. यास्तव तुह्मास आमच्या पदरीं पुनरपि नोकरी मिळणें नाहीं तुह्मास विजापूरकराच्या नोकरीस राहण्याची मात्र परवानगी दिली आहे ’ ह्याप्रमाणें जबाब मिळाल्यावर माहुली येथे निजामशाही तक्तावर बसविलेल्या बालराजास बादशहाच्या स्वाधीन करून आपल्या उरलेल्या लोकानिशी शहाजीराजे विजा-पुरास आले हे वर्तमान स १६३७ त घडलें[1]

## शहाजीराजांची अदिलशाहींतील नोकरी.

शहाजीराजे विजापुरास आले तेव्हा त्याचा अदिलशहाने व रणदुल्लाखान, मुरारपंत वगैरे मुत्सद्यानी बहुमान केला, व त्यास आपल्या पदरीं मोठ्या इतमामानें ठेवून घेतलें असा कर्तृत्ववान्, बलाढ्य व शूर सरदार आपणांस लाभला ह्मणून त्यास अतिशयित आनंद झाला मोगलाशी नुकताच तह झाला होता त्या अन्वयें शहाजीराजाची पूर्वीची सगळी जाहगीर अदिलशहाच्या हातीं आली होती तीपैकीं पुणें व सुपे हे परगणे[2] त्याने राजाकडे जाहगिरीदाखल कायम केले. ह्या जाहगिरीची व्यवस्था पाहण्याचें काम राजानी दादाजी कोंड-देवनामक एका हुशार व विश्वासू ब्राह्मणास[3] सागितलें, आणि त्या जाहगिरीच्या

---

१ प्रो मरकार तारीख-इ-शिवाजीनामक ग्रंथाच्या आधारानें स १६३६ च्या आक्टोबर महिन्यात राजे विजापूरसरकारच्या नोकरीस राहिले असें ह्मणतात.

२ हे परगणे मुरार जगदेव यानें शहाजीराजाची हुशारी व योग्यता पाहून दौलताबादेच्या लढाईहून परत येताना त्यास दिले होते, असा रायरीच्या बखरींत उल्लेख आहे तारीख-इ-शिवाजी नामक बखरीत चाकणपासून इंदापुरापर्यंतचा प्रात व शिरवळ हीं राजास जाहगिरीदाखल मिळाली असें आहे

३ हा दादाजी प्रात पुणें, परगणा पाटस, मौजे मलठण येथला पटवारी होता. रा. राजवाडे यानीं अठरा व एकुणीस या खंडांत प्रसिद्ध केलेल्या त्या वेळच्या कागदपत्रांत याच्या नावापुढें कोंडाणा किल्याचा सुभेदार व जुन्नर सुभ्याचा मुजुमदार असा उल्लेख आहे.

रक्षणार्थ त्याच्या बरोबर एक हजार स्वार ठेविले. ह्या स्वारावर शिद्दी हिलाल यास त्यानी प्रमुख नेमिलें

मोगलाकडून अदिलशहास भीमा व नीरा ह्या नद्यामधला प्रात मिळाला होता, त्याची व्यवस्था लावण्याचे काम त्याने मुरारपंतास[1] सागितलें ह्या मुत्सद्याने त्या कामगिरीवर जाताना शहाजीराजास बरोबर घेतलें कारण ह्या मुलखाची माहिती राजाला चागली होती. ह्या कामीं राजाचे त्यास उत्कृष्ट साहाय्य झालें ते जसे अप्रतिम योद्धे होते तसेच ते चतुर व बुद्धिमान् मुत्सद्दी होते. त्याच्या अगच्या ह्या अलौकिक गुणास्तव मुरारपंताच्या मनात त्याच्याविषयीं अधिकच आदरबुद्धि उत्पन्न झाली, व त्याजवर त्याचा पूर्ण लोभ जडला सुलतानानें नेमून दिलेली कामगिरी बजावून मुरारपंत दरबारी आला तेव्हा त्यानें सुलतानापाशी राजाची अतिशयित तारीफ केली व अशी शिफारस केली कीं, अशा शूर,युद्धकलानिपुण व राजकार्यधुरधर पुरुषास सहमा सोडूं नये, त्याची साधेल तेवढी बढती करून त्यास आपल्या पदरी कायम राहण्याविषयीं उत्तेजन द्यावें. शहाजीराजाच्या अगचे चातुर्य पाहून मुरारपंत थक्क झाल्याची एक गोष्ट कित्येक बखरीत येणेंप्रमाणें दिली आहे राजानी विजापूरकरास मथवून दौलताबादच्या किल्ल्यावर हल्ला करण्यासाठी त्याची मदत मागितली, तेव्हां मुरारपतास त्यानीं त्या मोहिमेवर पाठविलें[2] ही फौज कूच करीत असता वाटेंत सूर्यग्रहण[3] झालें तेव्हा भीमाइंद्रायणीसगमी नागरगावें[4] येथे त्यानीं सैन्याचा तळ दिला व पुष्कळ दानधर्म केला ह्या वेळी मुरारपंताच्या मनात असें आलें कीं, आपल्या स्वारीच्या हत्तीची रौप्यतुला करून तें रुपें ब्राह्मणांस दान करावें. पण हत्तीची तुला करावी कशी हा प्रश्न उद्भवला याविषयीं कोणास काहीं युक्ति

---

१ प्रो सरकार हे "बसातीन-इ-सुलातीन" यातील उल्लेखाच्या आधारावरून असे ह्मणतात की, मुरार जगदेवाचा वध स १६३५ च्या सुमारास झाला होता. हें खरें ठरल्यास शहाजीराजे दुसऱ्याच कोणा तरी सरदाराबरोबर सदरील मोहिमेवर गेले असावे. परतु मराठी बखरींत मुरारपंताचेच नाव दिले आहे.

२ ह्या मोहिमेची हकीकत मागें २७ पृष्ठावर दिली आहे.

३ हें ग्रहण शके १५५५ श्रीमुखनामसवत्सरी भाद्रपद महिन्याच्या अमावास्येस ह्मणजे ता. २३ सपटेंबर सन १६३३ रोजी झालें.

४ ह्या गांवीं ह्या असा हत्ती तोलल्यावरून त्यास तुळापूर असे नाव पडलें. औरंगजेबानें ह्या गांवास हें नांव दिल्याची गोष्ट सागतात ती अर्थात् खरी नाहीं.

सुचेना तेव्हा शहाजीराजानी असें सुचविले कीं, हत्तीला होडींत चढवावें, आणि त्याच्या भाराने ती दबेल तेथे खूण करावी मग हत्तीला खालीं उतरून तींत दगड भरावे, व त्या खुणेपर्यंत ती पाण्यात बुडाली ह्मणजे ते सगळे दगड काढून निरनिराळे तोलावे अशा रीतीनें हत्तीचें एकंदर वजन कळेल. ही साधी पण कोणासहि न सुचलेली युक्ति राजानी सागितल्यावरून मुरारपंतानें त्याची फारच तारीफ केली, आणि हत्तीची तुला झाली तेवढ्या किमतीचे गांव त्याने ब्राह्मणास इनाम दिले.

वर सागिल्याप्रमाणे मुरारपंताबरोबर जाऊन सुलतानाची कामगिरी बजावून शहाजीराजे विजापुरास परत आल्यावर तेथे फार दिवस राहिले नाहींत. पुढल्या वर्षी अदिलशहाच्या मनात असें आले कीं, कर्नाटकातील हिंदू जमेदारास जिंकून तिकडे आपली सत्ता वाढवावी ह्या मोहिमेवर त्याने रणदुल्लाखानाची योजना केली, व त्यास सरलष्कर असा किताब देऊन शहाजीराजास त्याचा दुय्यम नेमिले ह्या मोहिमेत राजानी रणदुल्लाखानास मनापासून मदत करावी ह्मणून त्याला त्या प्रातात काहीं जाहगीर देण्याचे वचन सुलतानाने दिले राजांनीं रणदुल्लाखानास मोठ्या उत्साहाने साहाय्य केल्यामुळे सुलतानाचा उद्देश बराच सिद्धीस गेला. त्यानी तिकडच्या जमेदाराशी दोनतीन वर्षे युद्धप्रसग करून त्यापैकीं पुष्कळास पादाक्रात केलें ह्या झटापटींपैकीं एकीचा उल्लेख एक-दोन बखरींत आढळतो रायारायलनामक[1] एक राजा कर्नाटकात प्रबळ होऊन विजापूरकराच्या तिकडील प्रातास फार उपद्रव करीत होता. त्याच्याशीं शहाजीराजानी दोन वेळा मोठी निकराची लढाई करून त्याचा पराभव केला, व अक्कलकोट, बागलकोट, कोल्हार, बेगरूळ,[2] वासकोट, बाळापूर व शिरटे हे परगणे काबीज केले हीं अशीं पराक्रमाची कृत्यें केल्यामुळे रणदुल्लाखानाचे

---

१ हा विजयनगरच्या राजघराण्यातला असावा असा तर्क आहे याचें श्रीरग रायल असेंही नाव कित्येक ग्रथात दिलें आहे

२ ह्याचें मध्याचें नाव बगलोर असे आहे. मि किकेड ह्मणतात कीं, केंप गौडा नावाच्या एका राजाचें हें शहर राजधानी होते. रणदुल्लाखान व शहाजीराजे स. १६३७ त कर्नाटकातल्या मोहिमेवर गेले तेव्हा त्यानी ह्या राजाशीं युद्ध करून त्याला जिंकिलें. दुसऱ्या वर्षीं रणदुल्लाखानास विजापूरसरकारानें परत बोलाविले, आणि कर्नाटकातली मोहीम शहाजीराजावर सर्वस्वीं सोंपली. त्यानी कोल्हार, बाळापूर वगैरे प्रात हस्तगत केले. हे हस्तगत केलेले प्रात विजापूरसरकारानें राजास जहागीर ह्मणून दिले.

राजांवर अतिशयित प्रेम जडलें विजापुरास परत आल्यावर हा खान सुलतानापाशी राजांची वारंवार वाखाणणी करूं लागला. सुलतान त्याच्यावर फारच खुष झाला, आणि त्यानी कर्नाटकात जे परगणे जिंकिले होते त्यांची जाहगीर त्यास त्याने करून दिली ह्या जाहगिरीस आणखी रतनपूर, देवगड, कनकगिरि व राजदुर्ग हे तिकडील परगणे अदिलशहानें पुढे काहीं दिवसानी जोडून दिले. त्याप्रमाणेंच महाराष्ट्रात इंदापूर, बारामती व मावळप्रात हे राजास जाहगिरीदाखल आणखी मिळाले, व कऱ्हाड प्रातातील बावीस गावाच्या देशमुखीची सनद त्याना प्राप्त झाली

ह्याप्रमाणे शहाजीराजाच्या अगच्या शौर्यवीर्यादि गुणाचें योग्य प्रदर्शन होऊन त्याचे अदिलशहाने चागले चीज केले ते मोठे हुशार व विश्वासू नोकर आहेत अशी त्याची खात्री झाली कर्नाटक व द्रविड ह्या देशातला जो मुलूख अदिलशाही सत्तेखालीं आला होता त्याची योग्य व्यवस्था लावून त्याचें रक्षण करण्याचें काम अमळ बिकट होते ते चागल्या हुशार व भरवशाच्या सरदारावाचून नीट तडीस जाणार नाहीं हें अदिलशहास कळून चुकले होतें. त्या कामगिरीवर शहाजीराजाची योजना झाली तर उत्तम, असा अभिप्राय सर्व मुत्सद्याचा पडला त्यावरून राजास त्या प्राताची सुभेदारी देऊन तिकडे रवाना केलें हा प्रात विजापूरकराच्या सत्तेत नवीनच आला असल्याकारणानें त्यांत चोहोंकडे फारच बेबंदाई माजली होती, ती मोडून टाकून सरकारची सत्ता नीट स्थापित करावयाची होती राजानी सर्व घोटाळा व धामधूम नाहींशी करून जिकडेतिकडे चागला बंदोबस्त केला जमाबंदीची नवी पद्धत त्या प्रातात सुरू करून सर्व प्रजेला आबाद व सुखी केलें आणि सरकारी उत्पन्नहि चागलें वाढविले ही सगळी व्यवस्था नीट लावण्यासाठीं राजानी महाराष्ट्रातील पुष्कळ ब्राह्मण कारकून तिकडे नेले हल्ली त्या प्रातात आढळणारे देशमुख, देशपाडे, कुळकर्णी, शिरस्तेदार इत्यादि उपनावाचे लोक मूळचे महाराष्ट्रांतले असून त्याला प्रथम शहाजीराजानी तिकडे नेलें होतें. राजे स्वत मलिकंबराच्या तालमेतले असल्यामुळें त्यांला ही व्यवस्था लावण्यास मुळींच कठीण पडलें नाहीं; आणि ती लावतांना तिकडील प्रजेला त्यांनीं विनाकारण नाडलें तर नाहींच, परंतु उलट त्या लोकांचा आपणावर लोभ जडेल अशाच रीतीने वागण्यास ते सर्वदा झटत असत. विजापूरसरकारास प्रतिवर्षी पाठवावा लागणारा वसूल नियमानें पावला

करून स्वतांपाशींहि काहीं अर्थसचय व्हावा याविषयीं ते सर्वदा खबरदारी घेत असत.

कर्नाटकात गेल्यावर शहाजीराजे पहिल्याने बेगरुळास राहत असत. परतु पुढे जिकडेतिकडे बरीच स्वस्थता झाल्यावर ते बाळापुरास राहूं लागले ह्या वेळीं तंजावरास विजयराघव ह्मणून एक बलाढ्य राजा राज्य करीत होता त्याचे त्रिचनापल्लीच्या राजाशी वैमनस्य येऊन उभयतामध्ये कलह सुरू झाला त्रिचनापल्लीकराने शहाजीराजाशी सख्य करून असें बोलणें लाविलें कीं, 'तुह्मी आह्मी एक होऊन, तंजावरच्या राजाचा पराभव करून त्याचा मुलूख काबीज करू तुमच्या स्वारीच्या खर्चास पाच लक्ष रुपये आह्मी देतो, व जी काहीं लूट मिळेल ती तुह्मी ठेवावी ' ह्यावरून राजानी विजयराघवावर चालून जाऊन त्याच्याशीं युद्ध केलें त्यात त्या राजाचा पराभव होऊन तो रणात पडला. तंजावर शहाजीराजाच्या कबजात आले त्यात त्यास पुष्कळ द्रव्य सापडलें हा प्रात चांगला आहे असें पाहून राजानी तो आपल्या स्वाधीन ठेवण्याचा विचार केला व त्रिचनापल्लीकराची अशी समजूत केली कीं, तंजावर प्रात आह्मी ठेवणार तुह्मीं आह्माला स्वारीखर्चाबद्दल काहींएक देऊं नये[१] परतु त्याला हें न आवडून तो राजाबरोबर युद्धास उठला त्याचाहि राजानीं पराभव करून त्याचा मुलूख काबीज केला हे जे दोन नवीन प्रात राजानी जिकले ते विजापूरसरकारानें त्याच्याचकडे कायम केले

येथपर्यंतचा शहाजीराजाचा चरित्रक्रम पाहिला असता सहजी असा प्रश्न उद्भवतो कीं, असा तेजस्वी, महापराक्रमी व धैर्यशाली पुरुष विजापूरसरकाराची ताबेदारी पतकरून स्वस्थ तरी कसा राहिला? मोगलासारख्या प्रबळ शत्रूंशीं टक्कर देऊन त्याच्या मोठमोठ्या सरदारासही ज्यानें काहीं वेळपर्यंत बिलकुल दाद दिली नाहीं, तो पुरुषसिंह असा परवश होऊन राहिला हें कसें? ह्या प्रश्नाचें समाधान असें आहे कीं, शहाजीराजे मोठे धोरणी व धूर्त होते केवळ आवेशादि वृत्तींस वश होऊन, अविचाराचें एकादें कृत्य करून आपला नाश करून

---

१ स्कॉटवेरिंग व बुदेले असें ह्मणतात की, तजावराचा राजा पचीरगू ह्मणून होता. त्याचा व मुद्गलचा पाळेगार जजाप्पा नाईक ह्याचा कलह लागला असता, जंजाप्पास शहाजीराजानीं मदत करून पचीरगूचा पराभव केला, व त्याचा प्रात आपल्याकडे ठेविला. हें जंजाप्पाला न आवडून त्याची व राजाची कलागत लागली. तींत तो ठार झाला, व राजांनीं त्याचाहि प्रात हस्तगत केला.

घेणें हें खऱ्या शहाण्या पुरुषास उचित नव्हे खरा धोरणी पुरुष असतो तो प्रसग येईल तसें वर्तन करून आपला इष्ट हेतु साध्य करण्यास झटत असतो. निजामशाही मोगलांनी बुडविली असता, शहाजीराजानी तिची पुन विजापूरकराच्या साहाय्यानें स्थापना केली परतु मोगलबादशहानें विजापूरकरास मोठी लालूच दाखवून त्याच्या कटातून फोडले, व सर्व निजामशाही मुलूख काबीज करून दोघा बादशहानी वाटून घेतला त्यामुळे शहाजीराजाचा निरुपाय झाला. त्याला आता कोणाचाच आधार राहिला नाहीं हातचा गेलेला मुलूख पुनः मिळविण्याची खटपट करूं झटलें तर दोन प्रबळ बादशहाचा आपल्यावर एकदम गिल्ला होऊन आपला पुरा नायनाट व्हावयाचा, हे त्यास कळून चुकले होतें. यास्तव नुसते थोडेसें बड उभारून धामधूम करीत राहून आपला पुरा नाश करून घेण्यापेक्षा कोठे तरी कायमची जहागीर मिळवून पुढे काय होईल तर पाहावे, असा विचार करून त्यानी ह्या वेळी विजापूरसरकारात नोकरी पतकरिली.

पुढे कर्नाटकात सुभेदारी मिळून अदिलशहाची पुरी मेहरबानी व विश्वास सपादन केल्यावर शहाजीराजानी आपले पूर्वस्वरूप थोडेथोडें प्रगट करण्यास आरभ केला कर्नाटक प्रातात साधल्यास स्वतंत्र राज्य स्थापण्याचा इरादा शहाजीराजाचा होता, असें कित्येक इतिहासकाराचे ह्मणणें आहे[१] तिकडील लोकाची प्रीति सपादन करून द्रव्यसग्रह करण्यात त्याचा मुख्य उद्देश अर्थात् हा होता कीं, स्वतंत्र व्हावयाचा योग आला असता त्या लोकाचें साहाय्य मिळून वरिष्ठ सरकाराशी युद्धप्रसग करण्याचे सामर्थ्य आपणास यावें. हा त्याचा उद्देश स्पष्ट होता यास एक पुरावा असा आहे कीं, त्याच्या हातच्या कित्येक सनदा व इतर दस्तऐवज कर्नाटकातल्या लोकाकडे सापडतात, त्यावर वरिष्ठ सरकारच्या वतीने वगैरे आशयाचा जो मायना नेहमींच्या पद्धतीस अनुसरून असावयाचा तो नसून, ‘ शहाजीराजे भोसले याच्या दरबारांतून, ’ असा उल्लेख आढळतो दुसरा पुरावा असा कीं, शिवाजीमहाराजांनी विजापूरकराच्या मुलखात धामधूम सुरू केली तेव्हा त्या दरबारचे कित्येक लोक उघडपणें बोलूं लागले कीं, शहाजीराजे याचे आपल्या पुत्राशी गुप्त कारस्थान चालू असून, त्यानींच त्यांला ही अशी धामधूम करण्यास उत्तेजन दिलें असावें. त्यावरून अदिलशहानें राजांस असा हुकूम केला कीं, ‘ तुह्मी आपल्या पुत्राच्या बेकैद वर्तनास आळा घालून त्याचा योग्य बंदोबस्त करावा. ’ त्यावर राजांनीं

१ उल्किजकृत म्हैसूरचा इतिहास पाहा.

दरबाराची अशी समजूत केली कीं, ' मीं माझ्या पूर्वीच्या बायकोचा व तिच्या त्या मुलाचा कधींच त्याग केला असून दुसरें लग्नहि केलें आहे त्यांचा माझा आज पुष्कळ दिवस कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं. सरकारास वाटेल त्या रीतीचा त्याचा बंदोबस्त करावा ' राजाच्या ह्या जबाबानें त्या वेळीं अदिलशहाचे समाधान झालें असावे असें दिसतें कारण त्याने त्या प्रसंगीं त्यांचें कांहींएक शासन केलें नाहीं आता ह्या उडवाउडवीच्या जबाबाचें खरें इंगित काय होतें हे कोणासहि सागावयास नको आपला मुलगा जें हें धाडसाचें काम करीत आहे ते सर्वथा निषिद्ध आहे असें राजाला वाटले असतें तर त्याला त्याच्या त्या अल्लड वर्तनास आळा घालून वाटेल तसा बंदोबस्त तेव्हाच करिता आला असता, परंतु आपला मुलगा करीत आहे तें आपल्या इष्ट उद्देशाचें समर्थकच आहे असें शहाजीराजाला वाटल्यावरून, पूर्वोक्त प्रकारचा जबाब देऊन व आपल्यावरचा वहीम कसाबसा उडवून ते नामानिराळे राहिले

पुढें शिवाजीमहाराजाची बंडाळी अधिकच वाढली. ती विजापूरसरकारास अगदीं असह्य होऊन त्यानें शहाजीराजांस चांगलीच तंबी देण्याचा विचार केला. वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें राजानीं आपला आपल्या पुत्राशीं काहींएक सबंध नाहीं असें निक्षून सागितलें असता, त्याचा पुन· संशय येऊन त्याला शिक्षा करण्याचा विचार विजापूरसरकारानें मनात आणिला यास मुख्य कारण असें झालें कीं, शहाजीराजाचें प्रस्थ कर्नाटकात अतिशयित वाढून ते स्वतंत्र होण्याचा बेत करीत आहेत, आणि तत्सिद्धयर्थ साधनसामुग्री जमवीत आहेत, अशी दरबारची पूर्ण खात्री होऊन चुकली होती हा असा राजाविषयीं पक्का वहीम येण्यास काहीं तरी सबळ कारणें अर्थात् त्या सरकाराला दिसलीं असावीं यात काहीं सदेह नाहीं. विजापूरकरानीं शहाजीराजास शासन करण्याचा निश्चय करून त्यांला पकडून आणण्यासाठी मुस्तफाखाननामक एका सरदाराला पाठविलें[1]. हा सरदार त्या वेळीं कर्नाटकांतल्या मोहिमेवर असून शहाजीराजे

[1] कित्येक बखरकार असें ह्मणतात कीं, अदिलशहानें ही कामगिरी घोरपडे याम सांगितली होती. परतु जेधे याच्या शकावलींत मुस्तफाखानाने त्यास पकडल्याचा उल्लेख आहे मोडककृत विजापुराच्या इतिहासात असें आहे की, मुस्तफाखानाचें व शहाजीराजाचें काहीं कारणावरून वैमनस्य येऊन राजानीं त्याच्याशीं उघड शत्रुत्व प्रगट केलें, व ते स्वतत्रपणें वागू लागले. हें त्याचें बड मोडण्याच्या इराधानें त्या सरदारानें घोरपडे व यशवतराव आसदखानी यास पाठविलें. प्रो. सरकार यवनी बखरींच्या आधारानें असेंच विधान करितात. ह्या यवनी बखरींत ह्या वैमनस्याचें कारण

त्याच्या मदतीस होते त्यानी ह्या वेळीं जिंजीस वेढा घातला होता मुस्तफा-खानाने राजास युक्तीने पकडण्याची कामगिरी बाजी घोरपडे मुधोळकर यास सागितली. राजाशी उघडपणें समरागणात गाठ घालून त्याचा पराभव करून त्यास कैद करण्याचे काम अतिदुर्घट होते घोरपड्यासारख्या सरदारास तर तें केवळ अशक्यच होते जो वीरपुरुष मोगलासारख्या प्रचंड शत्रूंसही पुरून उरला, व त्याच्या मोठमोठ्या सरदारानी पकडण्याचा खटाटोप केला असता जो त्याच्या हातीं लागला नाहीं, तो विजापूरकराच्या य कश्चित् सरदारास कसला हार जावयाला ? घोरपड्यानें राजाला पकडण्याची अशी काहीं खटपट अर्थात् केली नाहीं त्याने त्याला मेजवानीस ह्मणून आपल्याकडे बोलाविलें, त्याचे आमत्रण स्वीकारून राजे त्याच्या घरीं गेले, तेव्हा घोर-पड्यानें आपला वाडा दाखविण्याच्या मिषानें त्यास आत नेलें, आणि ते एका खोलीत शिरले असता ती एकदम बंद करून त्यास आत अडकविले, आणि तेथे अधारात हत्यारबंद लोक ठेविले होते त्यानी त्यास कैद केले [1] त्या-

असे नमूद केले आहे की, राजे जिजीस बरेच दिवस वेढा घालून बसले असता मुस्त-फाखानास त्यानी असा निरोप पाठविला कीं, मला व माझ्या लोकास आपल्या प्रातीं जाऊन विश्राति घेऊ द्या खानाने त्यास असा उलट निरोप पाठविला कीं, अशा प्रसगीं तुह्मी परत जाल तर मोठा गोधळ होईल तेव्हा राजानी पुन असे सागून पाठविले कीं, छावणीत दाण्यावैरणीची महर्गता झाली आहे, शिपायाचे फार हाल होऊ लागले आहेत, त्याच्याकडून लढाईचे श्रम इत पर होणार नाहीत, तरी तुमच्या परवानगीची वाट न पाहता मी स्वप्रातीं निघून जाईन ह्या निरोपावरून त्या सरदाराची खात्री झाली कीं, शहाजीच्या मनातून दगा करावयाचा आहे प्रो. सरकार यवनी बखरी अधिक विश्वसनीय समजून शहाजीराजास पकडून कैद करण्याचें हें कारण खरें आहे असें ह्मणतात परतु शहाजीराजासारख्या धूर्त व धोरणी पुरुषाच्या हातून असला अविचार व शिरजोरपणा झाला असावा असें ह्मणता येत नाही. काळवेळ पाहून वागण्यात व स्वसरक्षण करून स्वसामर्थ्य वाढविण्यात त्याचा हातखंडा होता. शहाजीराजे शिरजोर होऊन बडाळी करण्यास प्रवृत्त झाले होते हें जर खरें तर ते असे हातीं लागल्यावर त्याना तिकडल्यातिकडेच ठार करण्याचें सोडून विजापुरास आणण्याचें प्रयोजन नव्हतें. आता येथें एक मात्र तर्क सभवतो कीं, शिवाजीमहा-राजास धाक घालून त्याची बंडाळी मोडण्याच्या इराद्यानें अदिलशहानें राजास विजापुरास आणविलें असावें. परंतु त्यास मुस्तफाखानानें पकडल्यावर ही कल्पना आदिलशहास सुचली असें ह्मणण्यापेक्षा अदिलशहाला ती अगोदरच सुचून त्यानें त्यांना पकडण्याचा हुकूम पाठविला असावा असें समजण्यास कोणती हरकत आहे ?

१ मि. किंकेड पृ. १४२.

प्रमाणें त्यास पकडून घोरपड्यानें विजापुरास पाठवून दिलें [1] घोरपड्यानें राजाशीं हा दगा केला त्या वेळीं ते चंदावराजवळ जिरावाडी येथे थोड्या लोकानिशी तळ देऊन होते. ह्या विश्वासघाताबद्दल घोरपड्याचा सूड पुढे शिवाजीमहाराजानी राजाच्या सागण्यावरून कोणत्या प्रकारे उगविला हें त्याच्या चरित्रात यथास्थली कथन केलें आहे

शहाजीराजास पकडून विजापुरास आणिले तेव्हा त्यास देहातशासन करावे असा विचार दरबाराने केला या सबधाची वाटाघाट होताहोता शेवटी असें ठरलें कीं, राजास भितीत चिणून ठार मारण्याची दहशत घालावी, ह्मणजे ते आपल्या पुत्राचा बंदोबस्त करून त्याला योग्य शिक्षा करितील ह्या सबधाची साद्यंत हकीगत पुढे यथास्थलीं द्यावयाची आहे [2] येथे एवढेच सागावयाचे कीं, शहाजीराजासारख्या पराक्रमी व शूर सरदारास देहातशासन करण्याचा विचार अदिलशहाने केला तो त्याजविषयीं पुरा वहीम आल्यामुळेंच केला, यात काहीं संदेह नाहीं पुढे शिवाजीमहाराजानी आपल्या पित्यास ह्या घोर मृत्यूपासून मोगलबादशहाशी सधान बाधून सोडविलें [3] दिल्लीच्या बादशहाच्या मध्यस्थी-

---

१ मोडक ह्मणतात कीं, मुस्तफाखानाच्या हुकमावरून घोरपडे आणि आमदखान यानीं एके दिवशी प्रात काळी शहाजीराजाच्या छावणीवर अकस्मात् चाल केली. राजे रात्रभर ख्यालीखुशाली करून स्वस्थ झोपी गेले होते शत्रु आपणास पकडावयास एकाएकीं चालून आला असे कळताच ते घाबरून उठले व त्याच्या हातून सुटून जाण्याच्या इराद्याने घोड्यावर बसून एकटे कोणीकडे तरी जाऊ लागले इतक्यात बाजी घोरपड्याने लगट करून त्याला पकडून कैद केले आणि खानाकडे आणिले. त्यानें त्यास अटकेत ठेविलें, आणि त्याच्या तीन हजार घोडदळाची दाणादाण करून टाकून त्याच्या छावणीतली सारी चीजवस्त लुटली पुढे अदिलशहाला हा प्रकार कळल्यावर त्याने अफझुलखानास रवाना करून शहाजीराजास विजापुरास आणविले आणि त्याची कर्नाटकातली सगळी दौलत जप्त करविली

२ आठवा भाग पाहा.

३ कित्येक बखरीत असा उल्लेख आहे की, रणदुल्लाखान शहाजीराजाचा जिवलग मित्र होता त्याने बादशहापाशी रदबदली करून त्यास सोडविले रायरीच्या बखरीत हा रदबदलीचा प्रकार येणेप्रमाणे दिला आहे शहाजीराजास घोरपड्याने पकडल्यावर अदिलशहानें त्याला असा हुकूम पाठविला कीं,'शहाजीराजास विजापुरास आणूं नये, तिकडेच त्याला ठार मारावें' हा हुकूम ऐकून रणदुल्लाखानानें ससार सोडल्याचें मिष करून फकिराचा वेष धारण केला, व बादशहाकडे जाऊन मक्केस जाण्याची परवानगी तो मागू लागला हा असा बलाढ्य सरदार आपणास अंतरल्यानें आपल्या राज्याचें मोठेंच नुकसान होईल असें बादशहास वाटून त्यानें त्यास हातास धरून

स्तव राजास ठार मारिता येईना, तरी त्यास पुन कर्नाटकात जाऊं देऊं नये, विजापुरासच नजरकैदेत ठेवावें, असा अदिलशहाने ठराव केला. शहाजीराजे ह्याप्रमाणे विजापुरास जवळजवळ चार वर्षे अडकून पडले होते इतक्या अवकाशात शिवाजीमहाराजानी विजापूरसरकाराच्या मुलखात काहींएक धामधूम केली नाहीं शहाजीराजानी अनेक उपायानी दरबारच्या मुत्सद्यास वळवून आपल्यावरचा वहीम नाहींसा केला, व आपल्यावर दरबारचा पुन पूर्ववत् भरवसा बसवून कर्नाटकातली सुभेदारी परत मिळविली, व ते तिकडे निघून गेले

ह्याप्रमाणे जीवावरच्या सकटातून पार पडून कर्नाटकात गेल्यावर शहाजीराजानी विजापूरसरकाराशी उघड असा विरोध कधीहि केला नाहीं, परतु साधेल तेवढी स्वसत्ता वाढवून केव्हा तरी स्वतंत्र होण्याचा त्याचा विचार शेवटपर्यंत कायम होता ह्यानंतर शहाजीराजानी कर्नाटकात कोणकोणते युद्धप्रसंग केले याविषयीचा इतिहास उपलब्ध नाहीं यास्तव ह्या महापराक्रमी पुरुषाचे अखेरपर्यंतचे जीवनवृत्त येथे देता येत नाहीं कर्नाटकात विजापूरकरांच्या ज्या मोहिमा वेळोवेळा झाल्या त्याची मुसलमान इतिहासकारानी अगदीं सक्षिप्त हकीगत दिली आहे, तींत कोठेकोठे शहाजीराजाचा त्रोटक उल्लेख केला असून, त्यानी विजापूरसरकारच्या पक्षाने मोठ्या शौर्याने युद्ध केले, असें ह्मटले आहे. विजापूरसरकाराने कर्नाटकात त्याला जी जाहगीर दिली होती ती त्याच्याकडे कायम राहून तीत आणखी पुष्कळ भर त्यानी घातली तंजावर व त्रिचनापल्ली हे प्रात त्यास कसे प्राप्त झाले हे पूर्वी सागितलेच आहे. याशिवाय आणखी आर्नीचा किल्ला, पोर्तोनोवो वगैरे ठिकाणावर त्याची सत्ता होती.

---

खाली बसविले, आपला बेत रहित करण्यासाठी अनेक प्रकारी सागितले व शेवटी असें ह्मटले की, 'तुमची काही इच्छा असल्यास ती प्रगट करा, ह्मणजे मी ती लागलींच तृप्त करितो' तेव्हा रणदुल्लाखान ह्मणाला, आपल्या राज्यास अपाय जो काही झाला आहे तो शिवाजीराजामुळे, शहाजीराजे काही आपल्या राज्याशी वाईट रीतीने वागले नाहीत कुराणात असे आहे की, चागल्यास इनाम द्यावे व वाईटास शासन करावे. ह्या धर्माज्ञेप्रमाणे पाहता शहाजीराजास शिक्षा ठरविली आहे ती अन्यायाची आहे. हे बोलणे बादशहास मान्य होऊन त्याने शहाजीराजाची शिक्षा रद्द केली, व ते पुढें चागल्या रीतीनें वागतील ह्याविषयी खानास जामीन घेऊन राजाला आपल्या दरबारीं बोलाविलें. तेथे त्याचा बहुमान होऊन पुन• त्यास मोठ्या इतमामाने कर्नाटकांत पाठविलें.

शिवाजीमहाराजांनी चालविलेल्या स्वराज्यस्थापनेच्या उद्योगाविषयींचें वर्तमान राजांच्या कानीं वारंवार जात असून, त्याबद्दल त्यांस मोठे समाधान वाटे ह्या अशा महापराक्रमी पुत्राची भेट घेण्याविषयी त्यांस मोठी उत्कंठा लागून राहिली होती परंतु महाराजाची सगळी धामधूम विजापूरकराच्या राज्यात होत असल्याकारणाने राजाला ही आपली उत्कट इच्छा तृप्त करून घेण्याचा सुयोग पुष्कळ दिवस आला नाहीं पुढे शिवाजीमहाराज व विजापुरसरकार याच्यामध्ये काहीं वेळ तह होऊन वैरभाव अमळ नाहींसा होताच राजांनी स्वदेशी जाण्याची परवानगी विजापूरसरकाराकडून घेऊन आपल्या ह्या महाप्रतापी पुत्राची भेट घेतली[1] ह्या वेळी शहाजीराजे स्वपुत्राच्या आग्रहास्तव महाराष्ट्रातच राहिले असते परतु इकडे येण्याची परवानगी देताना विजापुरसरकारानें अशी अट घातली होती कीं, काम आटोपताच राजानी कर्नाटकात परत जावे, पुत्राशीं मिलाफी होऊन इकडे राहूं नये ही अट मोडली असती तर त्याची कर्नाटकातली सारी दौलत अदिलशहाने जप्त केली असती यास्तव इतके श्रम करून मिळविलेली दौलत घालवू नये ह्मणून ते परत कर्नाटकात गेले.

पुत्राची भेट घेऊन परत आल्यावर शहाजीराजे फार दिवस जगले नाहींत. नंतर दोन वर्षांनीं त्याचें देहावसान झाले त्याच्या मृत्यूची हकीकत येणेंप्रमाणें आहे बेदनूरचे पाळेगार भद्राप्पा नाईक व शिवाप्पा नाईक यानीं पुंडावा करून विजापूरकराच्या अमलातील मुलखास उपद्रव केला यास्तव त्याचें पारिपत्य करण्याची कामगिरी अदिलशहानें शहाजीराजे व सर्जाखान यास सागितली. शहाजीराजानीं भद्राप्पा नाइकाचा पराभव केला, व तो नाईक त्यास शरण आला. त्यानें विजापूरकराचे जे प्रांत हाताशीं घातले होते ते सगळे त्यानें सोडून दिले. मग त्याला थोडीशी जहागीर देऊन विजापूरकरांचा अकित केलें. ही शहाजीराजाची कामगिरी अदिलशहास कळली तेव्हा त्यानें फार खुश होऊन राजांस मोठ्या गौरवाचें पत्र लिहिलें व त्यांस वस्त्रें, अलकार, हत्ती, घोडे वगैरे नजराण्यादाखल पाठविले. दरबारच्या सर्व मुत्सद्यानीं वेगळींवेगळीं पत्रें पाठवून राजांची फार तारीफ केली. ह्या मोहिमेवर शहाजीराजे गुंतले असतां ते एके दिवशीं बंदेकीरे[2] नांवाच्या गांवीं शिकारीस गेले. तेथें ससाची पारध उठून

---

१ ह्या भेटीची साद्यंत हकीगत पुढें चवदाव्या भागांत दिली आहे.

२ हा गांव तुंगभद्रेच्या तीरीं असून त्याचीं बसवपाटण व वासवपट्टण अशीं नांवें इतरत्र दिलीं आहेत.

शहाजीराजांनीं आपला घोडा त्याच्या मागें लाविला. धावतां धावतां भंडोळींत घोड्याचा पाय अडकला त्यासरसे घोडा व राजे खालीं पडले, व छातीवर घोड्याचा पाय पडून, त्या धक्क्याने त्याचें तेथेच प्राणोत्क्रमण झालें. बरोबरचीं माणसें शोध करीत तेथे आलीं त्यानी राजाची ती अवस्था पाहून व्यंकोजी-राजास तेथें आणिलें. त्यानी त्याची यथासाग उत्तरक्रिया केली मरणसमयीं राजाचें वय सत्तर वर्षांचे होतें हे खेदजनक वर्तमान स १६६४ च्या जानेवारी महिन्यात घडले अदिलशहाकडून व्यंकोजीराजास दुखवटा येऊन मनसबदारीची वस्त्रे त्याच्या नावे झालीं शहाजीराजे ज्या जागी वारले तेथे त्याची छत्री बाधिली, आणि विजापूरकराकडून सनद आणून त्या गावाचे उत्पन्न तिच्या खर्चास लावून दिलें

शहाजीराजास एकंदर तीन औरस पुत्र होते त्यापैकीं वडील पुत्र संभाजी हा दौलताबादेस असता स १६२३ त जिजावाईच्या उदरी झाला त्याच्यावर राजाचे फारच प्रेम असे हा त्याच्याबरोबर नेहमी असे. हा स १६५३ त कनकगिरीच्या लढाईत जबिऱ्याचा गोळा लागून मरण पावल. ह्या लढाईची हकीगत अशी आहे कीं, शहाजीराजाच्या ताब्यातील बाळापूरनामक तालुक्यास कनकगिरीच्या सस्थानिकाने उपद्रव केल्याचे वर्तमान समजल्यावरून त्यानी संभाजीस फौज देऊन त्या सस्थानिकाला शिक्षा करावयास पाठविले त्याने कनकगिरीस वेढा देऊन किल्ल्यावर मारा चालविला असता, गोळा लागून तो समरागणात पतन पावला[1] ह्यामुळे शहाजीराजास पराकाष्ठेचें दुःख झालें त्याला त्या

[1] एके ठिकाणी असे लिहिले आहे की, संभाजीला विजापूरसरकाराकडून निराळी दौलत मिळाली होती, व ह्याला महमद अदिलशहाची स्त्री बडी साहेबीण हिने विश्वासघात करून विषाची लुगदी दिली, तीमुळे तो मृत्यु पावला शिवदिग्विजयात ह्या कनकगिरीच्या लढाईचें कारण असे सागितले आहे कीं, कनकगिरि शहाजीराजास जहागिरीदाखल मिळाला असून, तेथील सरदार आप्पाखान तो किल्ला सामोपचाराने देईना म्हणून त्याच्याशीं युद्ध करावें लागलें प्रो सरकार म्हणतात की, शहाजीराजे बधमुक्त होऊन कर्नाटकात आल्यावर काही दिवस तुगभद्रानदीच्या आसपासच्या आपल्या जहागिरीतल्या सरदारांनीं बंडावा केला होता तो मोडण्यांत गुतले असता संभाजी असा लढाईत पडला. मि. किंकेड म्हणतात की, शहाजीराजे विजापुरास चार वर्षे अडकून पडले असतां त्याच्या पश्चात् कर्नाटकातल्या ज्या सरदारास त्यानीं अंकित करून ठेविले होतें त्यांनीं बडाळी चालविली होती. ह्या गडबडीत मुस्तफाखाननामक एका सरदाराने राजाच्या ताब्यांतील कनकगिरिनामक किल्ल्यावर हक्क सांगून हल्ला केला आणि तो हस्तगत केला. तेव्हां संभाजी सैन्य घेऊन त्या किल्ल्यापाशीं आला, आणि त्याने त्या सरदारास

संस्थानिकाचा अतिशयित राग येऊन त्याच्यावर त्यांनी जातीनें हल्ला केला, व त्याचा पुरा मोड करून कनकगिरी हस्तगत केला. ह्या कलहात अफझुलखाना कडून त्या संस्थानिकास आंतून साहाय्य मिळाले होतें ह्याबद्दल त्यालाहि शासन करावे असें राजांच्या मनात आलें. परंतु त्याच्याशीं उघडपणें वैर करून युद्धास प्रवृत्त झाल्याने अदिलशहास क्रोध येऊन त्याची आपणावर चढाई होईल या भीतीने राजे त्याच्या वाटेस गेले नाहींत परतु पुढे लवकरच ह्या संभाजीचा धाकटा बंधु त्याचा सूड घेणार होता हें शहाजीराजांच्या त्या वेळीं स्वप्नींहि आलें नाहीं

लुखजी जाधवरावाने पाटलाग केला तेव्हा राजानी जिजाबाईस शिवनेरी किल्ल्यांत ठेविलें होतें, हे मागे सागितलेंच आहे. तेथे आमच्या महाप्रतापी चरित्रनायकाचें जन्म स १६२७ त झाले हा राजाला जिजाबाईच्या पोटी दुसरा मुलगा झाला. राजानी स १६३० त मोहित्याची कन्या तुकाबाई हिजशीं दुसरा विवाह केला तिजपासून त्यास स १६३१ त एक पुत्र झाला त्याचें नाव व्यंकोजी असें होते शहाजीराजानीं चंदावरप्रात काबीज केल्यावर तुकाबाई व व्यंकोजीराजे यास तेथे नेऊन ठेविलें पुढे शहाजीराजाच्या पश्चात व्यंकोजीराजे कर्नाटकातील सगळी जहागीर आटपून राहिले ह्या दौलतीचा हिस्सा घेण्यासाठीं पुढे शिवाजीमहाराजानी कर्नाटकात स्वारी केली, तिची हकीगत यथास्थलीं देऊ महाराष्ट्रात पुत्राचे भेटीस जाऊन, त्याचें वैभव पाहून कर्नाटकात परत आल्यावर शहाजीराजानीं व्यंकोजीस जवळ बोलावून असा बोध केला कीं, “ तुमचे वडील बंधु शिवाजीराजे यानी जवामर्दी करून नवे राज्य संपादिलें आहे तुह्मी आमच्या इकडील दौलतीचे मालक आहा आमचे काका विठोजीराजे व आमचे बंधु शरीफजीराजे यांच्या कुटुंबाचे तुह्मी चालवावें प्रजापालन यथान्याय करून राज्य करावें तुमचे वडील बंधु शिवाजीराजे यानी

---

असें सागून पाठविले कीं, ह्या तुमच्या वादासबधानें प्रथम विजापूरसरकारास विचारावें. हें असें सामोपचाराचें बोलणें त्यानें लाविलें असता त्या सरदारानें आपल्या तोफखान्यावरच्या लोकांस असा हुकूम केला कीं, साधल्यास संभाजी व त्याच्या भोवतालचे त्याचे कामदार यास गोळे सोडून ठार करावें. त्या हुकमाप्रमाणें त्यांनीं केल्यावरून संभाजी ठार झाला ही अशी कुरापत काढावयास त्या सरदाराला अफझुलखानानें प्रवृत्त केलें असें ह्मणतात. शहाजीराजांनीं पुढल्या वर्षी सुटून येऊन हा किल्ला पुनः सर केला.

तर सर्व पृथ्वी आक्रमण करण्याचा प्रचंड उद्योग आरंभिला आहे ईश्वरकृपेनें त्यांचे मनोरथ परिपूर्ण झाले तर ते सर्वांचें संगोपन करितीलच, परंतु त्याच्यावर कदाचित् समय गुदरला तरी आह्मीं इकडील दौलतीचा पादशहाकडून इतल्ला तोडून घेतला आहे. ही दौलत तुमची दोघाची आहे, परंतु साप्रत ह्या दौलतीचें रक्षण तुह्मी हुशारीनें करावे. तुह्मी माझे आवडते पुत्र असून पराक्रमी शिवाजी-राजांचे बंधु आहा, हें ध्यानांत ठेवा पदरी चार विश्वासू माणसें आहेत त्याच्या विचाराने चालल्यास तुमचें कल्याण होईल. ”

# भाग तिसरा.



## शिवाजी महाराजांचें बाळपण.

शहाजीराजे निजामशाही सोडून निघाले असता लुखजी जाधवराव मोगलसैन्यानिशीं त्याच्या पाठीस लागला त्या समयीं जिजाबाई सातआठ महिन्याची गरोदर असल्यामुळें तिला शिवनेरी किल्ल्यात ठेवून राजे पुढं कूच करून गेले, ह मागील भागात सांगितले आहे बाईच्या रक्षणासाठी जी माणसें ठेविली होती त्यांपैकीं बाळकृष्णपंत हनुमंते[1], शामरावे[2] नीलकंठ, व रघुनाथ बल्लाळ कोरडे असे तीन[3] विश्वासू कारकून होते नंतर जाधवरावानेंहि आपले काही स्वार तिच्या रक्षणास ठेविले होते शिवाय तिला जुन्नरच्या श्रीनिवासरावाचा आश्रय होता असें दिसते ह्याप्रमाणे ती काहीं अशी सुरक्षित स्थलीं होती हें खरे, तरी आपल्या प्रिय पतीवर असें सकट गुदरलें असून त्या धामधुमीत आपला तीनचार वर्षाचा मुलगा त्याच्याबरोबर आहे, त्याचे काय होईल ही चिंता तिला एकसारखी लागून राहिली ह्या हृद्रोगानें ती दिवसेंदिवस कृश होत चालली. हा चिंताज्वर तिला लागला असता तिनें किल्ल्यातील शिवाई देवीस असा नवस केला कीं, राजावरचें अरिष्ट टळून ते सुरक्षित राहून, माझे पोटीं पुत्र झाला तर त्याला तुझे नाव ठेवीन पुढं दिवस पुरे होऊन ती शके १५४९, प्रभव नाम संवत्सर, वैशाख शुद्ध पंचमी, सोमवार, ता १० एप्रिल

---

१ मल्हार रामरावकृत बखरीत हे नाव कृष्णाजीपन हनुमते असे आहे. याचें नाव नारो त्रिंबक हणमते असे एक दोन ठिकाणी आढळते.

२ काही ठिकाणीं हें नाव शंकराजी नीलकंठ असें आहे

३ मल्हार रामराव, सोनोपंत डबीर ह्मणून आणखी एक कारकून होता, असें ह्मणतो. सभासद ह्मणतो की, हे कारकून राजानीं बेंगरुळास असतां जिजाबाईबरोबर पाठविले होते. गोमाजी नाईक पाणसंबळ नावाचा एक माणूस जिजाबाईच्या लग्नापासून तिच्या तैनातीस जाधवरावाने दिला होता तो ह्या वेळीं तिच्याबरोबर होता असें ह्मणतात.

स १६२७, ह्या दिवशी प्रसूत झाली[1] ह्याप्रमाणे मराठी साम्राज्याचे संस्थापक शिवाजीमहाराज यांचे जन्म ह्या अशा ऐन धामधुमीच्या काळीं पुण्यापासून सुमारें पन्नास मैलावर शिवनेरी किल्ल्यात झाले.[2] जिजाबाईस पुत्ररत्न झाल्यामुळे सर्व आश्रित मंडळीस परमानंद झाला त्या ठिकाणीं आणि त्या स्थितीस अनुकूळ झाला तेवढा उत्सव त्यानीं केला आसपासच्या गावातील हेलकरणी हेल घेऊन आल्या, तेवढ्यास बारातेरा दिवस भोजन घालून, लुगडी, चोळखण वगैरे बक्षिसे दिली शहाजीराजे त्या वेळी विजापुरास होते त्यास हें पुत्रप्राप्तीचें वर्तमान हुजरे, कारकून वगैरे पाठवून कळविलें ही शुभवार्ता घेऊन गेले त्यास राजांनीं सोन्याची कडीं, वस्त्रे वगैरे दिली, व पुष्कळ दानधर्म केला शिवाई देवीच्या प्रसादानें हा पुत्र झाला असे मानून, त्यास नवसाप्रमाणे शिवाजी असें नाव ठेविलें[3]

---

१ मल्हार रामरावकृत बखरीत व शिवदिग्विजयात हा जन्मकाळ वैशाख शुद्ध द्वितीया गुरुवार असा दिला आहे, परंतु ह्या तिथीस गुरुवार येत नाहीं रायरीच्या बखरीत शके १५४८, क्षयनाम संवत्सर, वैशाख शुद्ध पंचमी सोमवार ही तिथि दिली आहे, परंतु ह्या तिथीस सोमवार येत नाहीं यास्तव ह्या दोन्ही तिथि विश्वसनीय नव्हत अलीकडे शेडगावकर भोसले याच्या घराण्यात सापडलेली बखर प्रसिद्ध झाली आहे, तीत हा जन्मकाल शके १५५१ फाल्गुन वद्य ३ शुक्रवार असा दिला आहे. रा. बाळ गंगाधर टिळक यांनी १९०० साला केसरीच्या ता २४ एप्रिलच्या अकांत असे ठरविले होते की, शिवछत्रपतींची जन्मतिथि शके १५४९ प्रभवनाम संवत्सर, वैशाख शु १, गुरुवार, उत्तर रात्र, अश्विनी नक्षत्र, ता. ६ एप्रिल, स १६२७ अशी आहे. काव्येतिहाससंग्रहकाराकडे काशीनाथ कृष्ण लेले यानी एक जंत्री पाठविली होती, तींत मूळातील तिथि दिली असून रोहिणी नक्षत्र दिलें आहे हे नक्षत्र ह्या तिथीस असून ती एकदरीत बरोबर दिसते (रा राजवाडेकृत म इ. सा. खंड ४ पाहा ) मराठी साम्राज्याची बखर व उल्किजकृत म्हैसूरचा इतिहास ह्यामध्ये वैशाख शुद्ध पंचमीच दिली आहे

२ जिजाबाई ह्या किल्ल्यावरच्या ज्या घरात राहत असे त्याची एक भिंत अजून शेष आहे. तींत नाशिकचे माजी कलेक्टर मि. जॅक्सन यानी मुंबईसरकारच्या हुकमावरून संगमरवरी दगडाची एक पाटी बसवून अखिल भरतवर्षातील अत्यंत थोर अशा ह्या प्रौढप्रताप राजमणीच्या जन्मस्थानाचें चिरकाल स्मरण राहीसें केलें आहे.

३ मि. किंकेड दंतकथाप्रिय असल्याकारणानें शहाजीराजांस झालेल्या ह्या पुत्ररत्नासंबंधाच्या दोन कथा आपल्या ग्रंथांत नमूद करितात. त्या अशा: (१) एक गोसावी शहाजीराजांच्या स्वप्नांत आला, आणि त्यांच्या हातीं एक आम्रफळ देऊन ह्मणाला, "हें तूं आणि तुझी बायको मिळून खा, ह्मणजे तुमच्या पोटी शिव अवतार

जिजाबाई आपल्या पुत्रासह ह्या किल्ल्यांत तीन वर्षें होती. तेथून तिला शहाजीराजानी बायझापुरास नेऊन ठेविलें असावें. कारण स १६३३ त तिला येथून पकडून नेल्याचें मागल्या भागांत सागितलें आहे मोगलांच्या तावडीतून सोडविल्यावर भोताजीराव ऊर्फ जगदेवराव जाधव याने तिला कोंडाणा किल्ल्यात नेऊन ठेविलें येथून पुन ती काहीं दिवस शिवनेरी किल्ल्यात व काहीं दिवस माहुलीच्या किल्ल्यात राहत होती असें दिसतें [१]शहाजीराजानी मोगलाच्या ताब्यातला निजामशाही मुलूख पुन काबीज करण्याचा सपाटा चालविला, तेव्हा ती ह्या किल्ल्यात राहत होती पुढे मोगलाची व राजाचीं युद्धें होऊं लागून जिकडेतिकडे धुमाकूळ उडाला असता त्यानी तिला कोठे ठेविलें होते ते कळत नाहीं परतु एवढे मात्र खात्रीने सागता येते कीं, ती आपल्या प्रिय पुत्राचा व आपला बचाव व्हावा यासाठी आपल्या माहेरच्या माणसाच्या आश्रयास कधींहि जाऊन राहिली नाहीं. ती अशी जाऊन राहिली होती, असे जे कित्येकाचें ह्मणणें आहे त्याला मुळीच आधार नाहीं गरोदर स्थितीमध्ये केवळ निराधार झाली असून, तिचा बाप तिला आपल्या गावीं नेऊन पोचविण्यास तयार झाला असता, जी मानी स्त्री तिकडे जावयास कबूल झाली नाहीं, ती पुढे कधी माहेरीं जाऊन राहिली असावी, हें मुळीच सभवत नाहीं त्यात आणखी जाधवांचें घराणे मोगलाचा आश्रय धरून राहिलें होते त्यामुळें तर आपल्या माहेरी जाण्याचें तिच्या मनांत कधींहि आलें नसावें कारण शहाजीराजानी मोगलाशीं स १६३४ पासून युद्ध सुरू केल्यामुळे मोगलसरदाराचा आश्रय करणें फारच धोक्याचें होतें, व ते तिच्या पतीसही मुळीच पसत वाटले नसतें तेव्हा साराश काय कीं,

---

येईल त्याला मुसलमानास मुजरा करावयास लावू नको, आणि तो बारा वर्षांचा झाला ह्मणजे त्यास स्वतत्रपणें वागू दे" हें स्वप्न पाहून राजे जागे झाले आणि पाहतात तों त्याच्या हाती तें फळ होते तें त्यानी जिजाबाईकडे नेऊन उभयतानीं खाल्लें पुढें हें पुत्ररत्न झालें तेव्हा स्वप्नात प्रत्यक्ष शिवानें दर्शन दिलें ह्या भावनेनें त्यानीं त्याचें नाव शिवाजी असें ठेविले (२) दुसरी दतकथा अशी आहे की, शिवाजी महाराजाचें जन्म झालें तेव्हा शिवानें शहाजीराजास स्वप्नात दर्शन देऊन असे सागितलें कीं, "तुझ्या पोटी पुत्र झाला आहे तो माझा अवतार आहे."

१ मि. किंकेड ह्मणतात कीं, शहाजीराजे यास वश करून घेण्यासाठी बाल शिवाजींना पकडून आणावें आणि अटकेंत ठेवावें ह्मणून मोगलानी तीन वर्षें प्रयत्न केला. परतु जिजाबाईनीं त्यास अशा तजविजीनें लपवून ठेविलें कीं, त्यांची सगळी खटपट व्यर्थ गेली.

शिवाजीमहाराजांच्या जन्मापासून पुढलीं दहा वर्षें, शहाजीराजांनीं चालविलेल्या धामधुमीच्या काळीं, जिजाबाई आपल्या पुत्रासह राजाच्या ताब्यांतील कोणत्या ना कोणत्या तरी किल्ल्यात राहत असे,व तिचें साधेल तेवढे चागलें रक्षण व्हावे याविषयीं राजे खबरदारी घेत असत बायझापुरास असता तिला एका किल्लेदाराने पकडून मोगलांच्या हातीं दिलें तेव्हां तिला जाधवानें सोडविलें, हें मागे सागितलेच आहे ह्या प्रसगी तिने खरे ह्मटले असता माहेरीं जाऊन सुखरूप राहावे, पण ती पुन आपल्या पतीच्या ताब्यातील कोडाणा किल्ल्यात येऊन राहिली ह्यावरून तिचा मानी स्वभाव चागलाच दिसून येतो मोगलाच्या सैन्याची वावटळ जिकडूनतिकडून सुटली असता, व राजाच्या ताब्यातील एकएक किल्ला व ठाणे शत्रु सर करीत असता, तिचा हा निर्धार कायम राहावा हे मोठेच नवल होय

ह्या दहा वर्षांत तिच्या मनाची अवस्था कशी काय झाली असावी, व तिला अहर्निश किती चिना लागून राहिली असावी याची कल्पना सहज होण्यासारखी आहे आज ह्या किल्ल्यात तर उद्या त्या किल्ल्यान, अशी तिची पळापळ होत असून, शत्रु केव्हां घाला घालून आपल्या परम प्रिय पुत्राचा व आपला नाश करील याचा नेम नाहीं, असा तिला एकसारखा घोर लागून राहिला होता. त्याप्रमाणेच शहाजीराजानी मोगलासारख्या अत्यंत प्रबळ शत्रूशीं चालविलेल्या अतिघोर सग्रामाचा शेवट कसा काय होतो ह्याचा तिला हृद्रोग लागला होता, परतु ती अत्यंत स्वाभिमानी व पतिनिष्ठ असल्यामुळें तिनें हीं दहा वर्षे मोठ्या धैर्यानें व निश्चयानें कंठिली ह्या एवढ्या काळात शिवाजीमहाराजाचें सगोपन जिजाबाईने कोणत्या प्रकारे केले, व त्यास सुशिक्षण देण्याविषयीं कशी काय व्यवस्था केली, याचा उल्लेख कोणत्याही बखरींत नाहीं. तरी एवढ्या वयात महाराजानी घोड्यावर बसणें, तिरदाजी करणे, बंदूक मारणे, पट्टा फिरविणें इत्यादि युद्धोपयोगी कलाचा बराच अभ्यास केला होता, व त्यांस लिहितां वाचतांहि चागलें येऊं लागले होते.

पुढें शहाजीराजांस अदिलशाहींत आश्रय मिळून ते स १६३७ त विजापुरास जाऊन राहिले, तेव्हां आपल्या ह्या गुणवान् मुलास व जिजाबाईस त्यांनीं आपल्या बरोबर तिकडे नेलें.[1] मग विजापूरसरकाराकडून मिळालेल्या जहागिरीची

१ प्रो. सरकार तारीख-इ-शिवाजी या ग्रंथाच्या आधारानें ह्मणतात कीं, शहाजीराजानीं दादाजी कोंडदेवाच्या हातीं आपल्या जहागिरीची व्यवस्था स. १६३६ त

व्यवस्था दादाजी कोंडदेव यास सांगून शहाजीराजे रणदुल्लाखानाबरोबर कर्नाटकांत गेले, त्या वेळीं त्यानी जिजाबाईस व शिवाजीमहाराजास ह्या विश्वासू कारकुनाच्या स्वाधीन करून त्यास असे सांगितलें कीं, महाराजास योग्य शिक्षण देऊन चांगलें वळण लावावे. ह्यावरून दादाजी कोंडदेवानें ह्या मायलेकरास मोठ्या इतमामाने पुण्यास आणिले, आणि तेथे चांगला वाडा बांधून[१] त्यात त्यास ठेविले तेथे महाराजाच्या नावानें एक उत्कृष्ट बाग तयार करून त्यात नाना प्रकारची फळझाडे लाविली दुसरे वर्षी शहाजीराजे कर्नाटकप्रांतात बेंगरूळ येथे असता दादाजीस परगण्याचा हिशोब घेऊन तिकडे जावे लागलें. त्या वेळीं त्यानें शिवाजीमहाराजास व जिजाबाईस राजाच्या भेटीस नेलें, व ती पुनः लागलींच पुण्यास परत आली त्या वेळी राजानी त्याच्याबरोबर शामराव नीलकंठ पेशवे, बाळकृष्णपंत मुजुमदार, सोनोपंत डबीर व रघुनाथ बल्लाळ कोरडे सबनीस यास आपल्या जहागिरीची नीट व्यवस्था लावण्यासाठी पुण्यास पाठवून दिलें[२]

शहाजीराजे कर्नाटकातील मोहीम फत्ते करून विजापुरास परत आले तेव्हा त्याच्या मनात असे आलें कीं, शिवाजीमहाराजास विजापुरास आणून त्याचा तेथे विवाह करावा त्याप्रमाणे राजानी दादाजीस लिहून कळविले हा त्याचा मनोदय महाराजास कळला तेव्हा ते ह्मणाले कीं, आपले लग्न विजापुरास यवनाच्या वस्तींत न होता पुण्यासच व्हावें कारण तेथे कार्यात यवन येऊन धर्मलोप व्हावयाचा ही महाराजाची इच्छा दादाजीनें राजास पत्रद्वारे विदित केली व असे कळविलें कीं, आह्मी इकडे चांगली मुलगी पाहून कार्य आटपून

---

दिला तेव्हा त्यानीं त्यास असे सांगितलें की, माझी बायको जिजाबाई व पुत्र शिवाजी ही शिवनेरी किल्ल्यात आहेत त्यास पुण्यास आणून आपल्या देखरेखीखालीं ठेव व त्यास लागेल तेवढा पैसा खर्चासाठी दे

१ ह्या वाड्याचें नांव त्याने राजमहाल असे ठेविले होतें हा वाडा शनवारवाड्याच्या पूर्वेस मुठा नदीच्या उजव्या तीरावर होता हल्लीं ह्या जागी म्युनिसिपालिटीचा बाग आहे. मि किंकेड पृ. १३०

२ दादाजी कोंडदेवाच्या मदतीसाठी ह्या कारभाऱ्याना पाठविलें होते. त्याच्या आडनांवावरून त्यांचे हुद्दे लक्षात येतात. खुद्द दादाजी कोंडदेव कागदोपत्रीं आपल्या नांवापुढें 'सुभेदार नामजाद किल्ले कोंडाणा' असें लिही. हा किल्ला राजांच्या जहागिरीचा मध्यवर्ती असल्याकारणानें दादाजीनें येथें लष्कराचें ठाणें केलें असून तेथें तो कधीकधीं जाऊन राहत असे.

घेतों हा विचार पसंत वाटून त्यांनी त्यास संमति दिली. त्याप्रमाणें दादाजीनें शिरके याची कन्या सईबाई हिजशी स १६४० त पुणे येथें महाराजांचा विवाह मोठ्या थाटाने केला

पुढें स १६४१ त शहाजीराजानी महाराजांस व जिजाबाईस विजापुरास आणवून आपल्याजवळ ठेविले येथे ती दोनतीन वर्षे होती असें दिसतें यवनाच्या राजधानीत इतके दिवस राहावयास मिळाल्यामुळे तेथली स्थिति महाराजास यथास्थित पाहावयास मिळाली, व यवनद्वेष आधीच त्याच्या हृदयात थोडाबहुत वास करीत होता, तो ह्या समयी चागलाच दृढ झाला पुढे जें राजकीय सबंधाचे अटोकाट ज्ञान त्यानी हरएक प्रसंगी प्रगट करून सर्व जगास थक्क करून सोडिले, त्याचे सपादन त्यास येथे घडले

महाराज ह्या वेळी केवळ चवदा वर्षाचे होते तरी त्याची सर्व युद्धकलात चागली गति झाली होती ते अगाने बळकट व देखणे असून अतिशयित चपळ व चौकस असत हत्ती, घोडे व नानाप्रकारचे कारखाने लक्षपूर्वक पाहून त्यासंबंधाने माहिती करून घेण्याचा नाद त्याना पराकाष्ठेचा होता शहाण्या व थोर माणसांचा यथोचित सन्मान करून त्याचे आपणावर प्रेम जडेल असें त्यांनी करावे, व त्यास नानाप्रकारचे प्रश्न विचारून त्याच्याकडून मिळवेल तितकी माहिती मिळवावी हलकट माणसाच्या वाऱ्यासहि ते राहत नसत व्यसनी व शोकी मनुष्याचा त्याना पुरा तिटकारा असे वडिलाची अवज्ञा किवा अमर्यादा त्याच्या हातून यत्किंचितूही कधी होत नसे हे असे गुण पाहून राजाकडे येणारे सरदारलोक महाराजांचें फार कौतुक करीत राजांचा परम मित्र मुरार जगदेव हा तर महाराजांची ही चालचलणूक पाहून फारच खुश होत असे.

एके दिवशीं ह्या मुरारपंतानें अदिलशहापाशीं शहाजीराजाच्या ह्या पुत्राची फारच तारीफ केली ती ऐकून अशा गुणी मुलास पाहण्याची इच्छा बादशहास झाली, आणि त्यांला आपल्या दर्शनास आणण्याविषयीं त्यानें मुरारपंतास आज्ञा केली. ह्यावरून महाराजास बादशहाच्या भेटीस न्यावयाचें ठरलें; परंतु हा बेत महाराजांस रुचला नाहीं. त्यांनी मोठ्या मर्यादेनें व आर्जवानें राजांस असें कळविलें कीं, ' हे यवन परम नीच; त्यांचें आर्जव करणें, त्यांस सलाम करणें हें माझ्या मनास मुळींच आवडत नाहीं. ह्या गोष्टींचा मला त्रास येतो. खचित-

व ब्राह्मण यांची येथें सदोदित निंदा चालते, ती मला बिलकुल पाहवत नाहीं. रस्त्यानें जातांयेतां गोवध होतो तो दृष्टीस पडला ह्मणजे मला फारच वाईट वाटतें, व असा त्वेष येतो कीं, गोवध करणाराचा शिरच्छेद करावा, परतु वडील रागावतील व भलताच काहीं तरी परिणाम होईल, हें मनांत येऊन निरुपाय होतो. मुसलमानाचा मला मुळी ससर्ग नको असें वाटते. अमीर-उमरावाच्या घरीं जाणें, व त्याच्याशीं परिचय करणें, हें माझ्या चित्तास योग्य वाटत नाहीं त्यांचा स्पर्श झाला असता मला वस्त्रे बदलावी लागतात ' हें महाराजाचें ह्मणणे राजास कळलें तेव्हा त्यानी कारभारी लोकाकडून त्यास असा बोध करविला कीं, ' तुमचे वडील यवनाची सेवा करून एवढ्या वैभवास चढले आहेत त्याचा द्वेष किवा तिरस्कार करणे बरोबर नाहीं. तुह्मी सुजाण आहा. तुह्माला असें बोलणें शोभत नाहीं अशाने वडिलाची अवज्ञा होते ' समानवयस्कांकडूनही महाराजास पुष्कळ सागविलें. प्रत्यक्ष जिजाबाईनेंही अनेक प्रकारी समजूत घातली तरी महाराज आपला हेका सोडीनात तेव्हां खुद्द शहाजीराजानी महाराजास समक्ष बोलावून असा बोध केला कीं, ' यवन पृथ्वीपति आहेत. स्वधर्म रक्षण करून त्याची सेवा करण्यास काय हरकत आहे ? ईश्वरी सूत्राप्रमाणे आह्मास माप्रत त्याची सेवा पतकरून योगक्षेम करणें भाग आहे देवास असें करणें नसते तर हिंदूंचे राज्य त्याच्या हातीं का जाते बरे ? कालवर्तमानानुरूप वागून आह्मी हे वैभव संपादिलें आहे हें जतन करण्यास तुह्माला बादशहाची कृपा सपादन केली पाहिजे ' हा उपदेश ऐकून महाराजानी समर्याद व सविनय असें उत्तर दिलें की, ' मला वडिलांची आज्ञा शिरसा वंद्य आहे, परंतु गोहत्या व देवब्राह्मणाची विटंबना यवन करितात, ती माझ्यानें बिलकुल पाहवत नाहीं '

हा असा यवनद्वेष शिवाजीमहाराजांच्या ठायी पूर्णपणें विकास पावलेला पाहून शहाजीराजांस अर्थात् वाईट वाटलें असावे, परतु अशा हुशार व पाणी-दार मुलास कडक रीतीनें वागविणें किंवा शिक्षा करणें त्यास इष्ट वाटलें नाहीं. खरें ह्मटलें असतां त्यासही यवनाचा तिरस्कार वाटत नव्हता असें नाहीं. परंतु त्यांच्याशीं सामोपचारानें वागून आपलें कार्य साधून घ्यावें असा त्यांचा नेहमीं मनसुबा असे. पुत्राचा असा निग्रह पाहून त्यांस फारसा राग आला नसावा असें दिसतें. महाराजांशीं या संबंधानें अनेक वेळां बोलून शेवटीं त्यांस त्यांनीं मोठ्या आग्रहानें दरबारांत जाण्यास तयार केलें. दरबारांत गेल्यावर बाद-

शहास जमिनीस हात लावून मुजरा करावा, असें महाराजांस त्यांनी सांगितले. परंतु महाराज दरबारांत गेले ते नुसता सलाम करून वडिलाजवळ जाऊन बसले. बादशहानें राजाबरोबर कोणी मुलगा आला आहे असें पाहून मुरार-पंतास विचारिले ' शहाजीराजाचे पुत्र ते हेच काय ?' पंताने ' होय ' म्हटलें, आणि शिवाजीमहाराजानी रीतीप्रमाणें कुरनिसात केली नाहीं याबद्दल बादश-हाच्या मनात काहीं विकल्प येऊं नये म्हणून त्यास त्याने असे सागितले, कीं, ह्या मुलाने दरबार कधीच पाहिला नाहीं, हा याचा पहिलाच प्रसग आहे. घरी सर्वास सलाम करण्याची सवय असल्यामुळे याने हजरतीस सलामच केला मूल अज्ञान आहे ' ह्याप्रमाणे समजूत घातल्यावर बादशहाने शिवाजीमहाराजास वस्त्रे, जवाहीर वगैरे देऊन निरोप दिला घरी आल्यावर महाराजानी दरबारची वस्त्रे टाकून स्नान केले

ह्यानंतर महाराज राजाबरोबर वेळोवेळा दरबारात जात परतु बादशहास नुसता सलाम करून ते आपल्या जागी जाऊन बसत हा असा त्याचा नेहमीचा क्रम पाहून बादशहाच्या मनात सशय आला, आणि हा कुरनिसात मुद्दाम करीत नाहीं किवा कसे याची शहानिशा करावी असें त्याच्या मनात येऊन , त्यानें महाराजास जवळ बोलावून त्या सबंधाने प्रश्न केला त्या समयी महाराजानी मोठ्या खुबीचे उत्तर देऊन वेळ मारून नेली ते म्हणाले ' मुजरा करावयास मला सागतात परतु मी ऐन प्रसगी विसरून जाऊन जोहार करितो, याची माफी असावी. लेकराच्या ह्या जोहारातच कुरनिसात आहे असे हजरतींने मानून घ्यावें. दुसरे असें कीं, हजरत आणि माझे वडील हे मला सारखेच वाटतात हजरत कोणी निराळे आहेत असे वाटल्यास मुजरा करावयास शिकेन ' हें प्रसगोचित उत्तर ऐकून बादशहास हसूं आले

दरबारात जाताना वाटेत कसायाची दुकाने लागत त्यात कच्चे गोमांस व गुराच्या मुंड्या विकावयासाठीं मांडून ठेविल्या असत. त्याप्रमाणेंच उद्मी लोक राजवाड्यासमोर शिजविलेले मास विकावयास बसत. हा प्रकार पाहून शिवाजी-महाराजांस अतिशयित वाईट वाटे, व ते अगदी संतप्त होत त्या उदम्यांस व खाटकांस जिवें मारावें असा त्यास त्वेष येई. परंतु करितात काय ? त्यांस निरुपायास्तव त्या वाटेनें मुकाट्यानें जावेंयावे लागे. एके दिवशीं महाराज त्या रस्त्यानें चालले असतां एक कसाई गाईचा वध करितांना त्यांच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर ते त्याच्या अगावर धावून गेले आणि त्याला चांगला मार देऊन

त्यांनीं ती गाय सोडविली ह्या गोष्टीचा चोहींकडे बोभाटा झाला परंतु शहाजीराजाचे वजन दरबारात अतोनात असल्यामुळें त्यांच्या वाटेस कोणी गेला नाहीं, व बादशहानेंही ती गोष्ट मनास आणिली नाहीं हा गोवधाचा प्रकार नेहमीं नजरेस पडून शिवाजीमहाराजास अगदी वीट आला. त्यांला तो असह्य होऊन यवनाच्या राजधानींत अत पर राहूं नये असें वाटलें, व दरबारात पुनः कधींहि जाऊं नये असा त्यानी निश्चय केला, परतु पित्यानें आज्ञा केली ह्मणजे तिचें उल्लंघन करणें महत्पाप आहे असें ते समजत यास्तव त्यानी एके दिवशी तीर्थरूपास असें सविनय कळविलें कीं, ‘ मला आपल्याबरोबर दरबारात याव-याची आज्ञा करूं नये कारण वाटेत गोमासाची दुकाने मांडिलेलीं असतात तीं माझ्यानें पाहवत नाहींत आपण बादशहाचे ताबेदार असल्यामुळे आपणास ह्या गोष्टीकडे कानाडोळा करावा लागतो बादशहाच्या मनास वाईट वाटेल असे काहींएक आपणास बोलता किंवा करिता येत नाहीं तरी रस्तोरस्ती होणारा गोवध व गोमासाची दुकानें बंद होततोंपर्यंत मी दरबारास यावयाचा नाहीं. हा प्रकार बंद होईल अशी काहीं तजवीज केल्यावर मग मला दरबारास बरोबर येण्याची आज्ञा करावी ’ हे पुत्राचे निकराचे बोलणे ऐकून शहाजीराजे पेचात पडले एकटे दरबारात जावे तर बादशहा विचारणार, मुलास का आणिले नाहीं ह्मणून, त्यास काय उत्तर द्यावे ? अशा फिकिरींत ,राजे पडले असता मिरजुमला नामेंकरून एक सरदार त्याच्यापाशी काहीं सल्लामसलत विचारावया-साठीं आला त्याच्याशीं काहीं वेळ बोलणे झाल्यावर त्याला त्यानी आपले संकट निवेदन केले. तेंव्हा त्या सरदारानें राजाला असें ह्मटले कीं, मुलास आज घरींच राहूं द्या आपण दोघे दरबारास जाऊं आणि हजरतीची मर्जी पाहून त्या प्रकरणीं गोष्ट काढूं

त्याप्रमाणें ते दरबारास गेले, व सरकारी कामकाज आटोपल्यावर, बादशाहाची खुश मर्जी पाहून त्या सरदारानें त्याच्यापाशीं असा अर्ज केला कीं, ‘ खुदावंत, आपण सर्वांचे मायबाप आहां आपली हिंदु व मुसलमान अशी प्रजा असून, आपली सर्वांवर सारखी कृपा आहे. आपल्या पदरीं जसे मुसलमान नोकर आहेत, तसे हिंदूहि पुष्कळ आहेत. त्यांस आपआपल्या धर्माप्रमाणें वागूं देणें हें खावंदांस उचित आहे. गोवध व गोमांससेवन हीं हिंदूंस मोठीं पातकें वाट-तात. आपल्या राजरस्त्यावर व राजवाड्याच्या आसपास गोमांसाची दुकानें असून सर्वांदेखत गोहत्या होत असते. ती पाहून हिंदूंस अतिशयित वाईट

वाटणें साहजिक आहे. शहाजीराजांसारखे इभ्रतदार व वजनदार सरदार आपल्या पदरीं आहेत. त्यांच्या मनास जेणेंकरून वाईट वाटणार नाहीं असें करणें हें आपणांस उचित आहे खावंदापाशीं ह्या प्रकरणीं आपण होऊन बोलण्याचें धैर्य त्यांस होत नाहीं शहाजीराजांचा पुत्र शिवाजी आज दरबारास आला नाहीं याचे कारण हेंच होय हा गोवधाचा व गोमांसविक्रयाचा देखावा त्याच्यानें मुळींच पाहवत नाहीं. तो आपल्या बापावर फारच रागावला आहे. त्यासाठीं हजरतीनें ह्या गोष्टीचा चागला विचार करावा ' हा त्याचा अर्ज बादशहानें शातपणें ऐकून घेऊन त्याचा योग्य विचार केल्यावर त्यास असें वाटले कीं, ह्या सबंधाचा बंदोबस्त अवश्य केला पाहिजे मग त्यानें अशी ताकीद देवविली कीं, 'शहरात कोणींहि गोवध करूं नये, किंवा गोमासाचीं दुकाने माडूं नयेत हा हुकूम मोडणारास मोठे शासन होईल. हिंदूंच्या धर्माविरुद्ध हा प्रकार असल्यामुळें त्याच्या देखत कोणी गोहत्या केली किवा वाटेत गोमास विकावयास माडिलें, आणि त्यास कोणा हिंदूने ठार मारिलें तरी त्याची दाद सरकारात मिळणार नाहीं ' असा सक्त हुकूम चोहोकडे जाहीर करून शहराच्या दक्षिणेस दूर एके बाजूस कसाईपुरा बसविला, व तेथें सर्व कसायास जाऊन राहावयास हुकूम केला हा बंदोबस्त केल्यावर शिवाजीमहाराज पुन आपल्या पित्याबरोबर दरबारास जाऊं लागले त्याची हुशारी, तेज व चौकसपणा पाहून बादशहाची त्याच्यावर मर्जी बसली. तो त्यास वेळोवेळा वस्त्रे, भूषणे, मेवामिठाई वगैरे देऊन सतुष्ट करी

एके दिवशी एक कसाई गोमास पाटींत भरून शहराच्या दरवाज्यानजीक आत येऊन विकावयास बसला असता तिकडून शिवाजीमहाराज आपल्या काहीं समवयी मित्रासह घोड्यावर बसून चालले होते त्याची नजर त्या कसायाकडे गेली. त्यासरशीं त्यानी तलवार उपसून त्याचा तेथेच शिरच्छेद केला. तेव्हां त्या कसायाच्या बायकोने सरकारवाड्यांत जाऊन बादशहापाशीं गाऱ्हाणें केलें, व त्या सबंधाचा पुरावा दरवाज्यावरच्या लोकानीहि केला. ती फिर्याद ऐकून बादशहानें ह्मटलें कीं, ' शिवाजीराजे यांनी केले तें योग्य आहे. शहरांत येऊन मांस विकावयास बसूं नये अशी ताकीद तुह्मांस केली असून तिची तुह्मी परवा केली नाहीं; त्याबद्दल तुह्मांस शिक्षा झाली ती बरोबर आहे. "असें बोलून त्या कसायाच्या बायकोस चार रुपये दफणाईस दिले, व चवाठ्यावर शेर रांडरोटी करून दिली.

ह्या गोष्टीचा शहरांत फारच गवगवा झाला जो तो ह्मणूं लागला कीं, 'आतां मुसलमानांचा ह्या राजधानीत कांहीं बोज राहिला नाहीं. यवनी पादशाही आजच गारद झाली कीं काय ? बादशहा कसलीच तक्रार कानावर घेत नाहीं शिवाजी तर अमा उद्दाम आहे कीं, तो बादशहाला कुरनिसातमुद्धा करीत नाहीं त्याला वाईट वाटते ह्मणून सगळ्या कसायाला शहराबाहेर हांकून काढून त्याची दुकानें वस्तीच्या बाहेर दूर नेलीं. त्यामुळे सगळ्या मुसलमानाची गैरसोय झाली आहे ह्यावरून तो शहाजीराजाचा मुलगा फारच शेफारून गेला आहे तो आता भर रस्त्यात मुसलमानाचे बेधडक खून करूं लागला आहे हे काहीं बरोबर नाहीं '

हा सगळा बोभाटा शहाजीराजाच्या कानी येऊन त्यास मोठी चिंता उत्पन्न झाली मुलगा चागला हुशार, बुद्धिमान् व गुणी निगजला आहे अशी तारीफ ऐकून त्याला जवळ आणून ठेविलें, ते अशासाठी कीं, आपण कमाविलेली दौलत यानें राखून तींत स्वपराक्रमानें भर घालावी परतु हा असा हूडपणा करितो याला काय करावें ? याला कांहीं शिक्षा करावी तर याचा स्वभाव तापट आहे, भलताच कांहीं तरी परिणाम व्हावयाचा मग दोन बोधाच्या गोष्टी सागून तो ताळ्यावर येतो कीं काय तें पाहावें, असा विचार मनात आणून त्यानी महाराजांस आपल्याजवळ बोलावून जिजाबाईसमक्ष पुटीलप्रमाणे उपदेश केला ' तुह्मी अद्यापि लहान आहा तुह्मास अजून जगाचा अनुभव नाहीं भलत्याच गोष्टीचा विषाद मानून सतापून जाणें व काहीं तरी हूडपणाचे कृत्य करणें हें तुमच्यासारख्या समजूतदार मुलास शोभत नाहीं यवनांस मुजरा करावयाचा नाहीं, गोवध पाहतांच तरवार उपसावयाची, असा बाणा धरून ह्या मुसलमानशाहींत कसें चालेल बरें ? त्याची आपणास नोकरी करावयाची तर हा अभिमान धरून बिलकुल उपयोगीं नाहीं आह्मी अशा बाण्यानें वागतों तर आह्माला आज बसायाला जागाहि मिळाली नसती. तुमचे वडील आजपर्यंत यवनाची चाकरी करून स्वताच्या कर्तबगारीच्या जोरावर प्याद्याचे फर्जी झाले. आह्मीं आजपर्यंत किती कष्ट व दगदग सोसून ही दौलत संपादिली आहे हें आमचें आह्मांस ठाऊक. निजामशाहींत असतां आह्मांला किती त्रास व संकटें सोसावीं लागलीं, व त्यांतून निभावून आह्मी ह्या दरबारीं कसे मानमान्यता पावलों आहों ह्याचा कांहीं विचार करा. आमच्याप्रमाणें तुह्मींहि ह्या दरबारीं राहून आर्जवानें व लीनतेनें वागावें, आणि आमची दौलत पुढें चालवावी, अशी आमची फार

इच्छा आहे. तुह्मी व्यवहार जाणून, वडील वागत आले त्या रीतीनें वागाल व हरएक काम दक्षतेनें व हुशारीनें कराल तर तुमच्यासारखा मातबर व सुखी कोणी असणार नाहीं परंतु साप्रत जो उद्दामपणा तुह्मी दाखवीत आहां त्यास तुह्मी आळा घालणार नाहीं तर ते आह्मास येथून घालवून देतील व सगळी दौलत जप्त करितील. दरबारांत आमचे वजन असून कांहीं अमीरउमराव आमचे दोस्त आहेत ह्मणून बरें आहे. परंतु ज्यांला आमचे वैभव पाहवत नाहीं त्यानी बादशहाचे मन आह्माविषयीं कलुषित केल्यास आमचा येथे एक क्षणभर टिकाव लागावयाचा नाहीं. याचा पुरा विचार करा आणि आपले पुढील वर्तन सुधारा नसती कलागत उत्पन्न करून स्वहितनाश करून घेण्यास प्रवृत्त व्हावे हें तुमच्यासारख्या समंजस मुलास मुळींच उचित नाहीं.' हा वडिलाचा उपदेश शिवाजीमहाराजांनी निमूटपणे ऐकून घेतला, त्यास प्रत्युत्तर मुळीच केलें नाहीं

ह्याप्रमाणे शहाजीराजानी महाराजास स्वत उपदेश करून आणखी जिजाबाईसहि त्याला दोन गोष्टी एकाती बोलावयास सागितलें त्याप्रमाणें तिनें महाराजास गोड, ममतेच्या शब्दानी असा बोध केला कीं, "तुह्मी आता लहान नाहीं; वडिलाच्या मर्जीविरुद्ध वागून त्यास कोणत्याहि गोष्टीबद्दल विषाद वाटूं देणें हें तुमच्यासारख्या नीतिमान् मुलास मुळींच शोभत नाहीं. तामसी वृत्ति टाकून नम्रतेने वागाल तर त्यात तुमचें कल्याण आहे वडिलानीं इतका काळ परिश्रम करून व दगदग सोसून मिळविलेली दौलत तुह्मी राखावी हें योग्य होय. वडिलास हरएक प्रकारें साहाय्य करण्याजोगें तुमचें वय झालें असून अगीं हुशारीहि कांहीं कमी नाहीं असें असून त्याच्या मनास वाईट वाटेल किंवा दौलतीस धक्का येईल असें वर्तन तुह्मीं करावें हें काहीं ठीक नाहीं वडिलाची अवज्ञा करून आपलें सर्वस्वीं नुकसान करून घेणें तुमच्यासारख्या शहाण्या मुलास उचित नव्हे. गैरचालीनें चालून व अविचार करून आपला दुर्लौकिक करून घेऊं नका. तुमच्या कुलशीलाचा विचार करून वागा. त्यास बट्टा लागूं देऊं नका." हें आईचें ममतेचें भाषण ऐकून महाराजांनीं असें उत्तर केलें कीं, "तुमचा उपदेश मला शिरसा वंद्य आहे.तुमच्या सांगण्याप्रमाणें वागण्यास मी सर्वदा तत्पर आहें. परंतु तुरकाला जमिनीस हात लावून मुजरा करणें, स्वधर्मविटंबना व गोबधादि [illegible] कर्मे होत असलेलीं पाहणें मला बिलकुल आवडत नाहीं. तीं दृष्टीस पडलीं ह्मणजे मला एवढा संताप येतो कीं, मला देहभानहि नाहींसें

होतें. ह्या गोष्टीस माझा निरुपाय आहे. ईश्वरी सत्ता काय असेल ती असो. तुरकांचें अन्न खाऊन राहण्यात स्वधर्महानि आहे असें मला वाटतें. यानंतर माझ्या हातून काहीं अविचाराची कृत्यें होऊं नयेत असें आपल्या मनात असल्यास मला येथे ठेवूं नका, यवनाच्या राज्याबाहेर कोठें तरी दूर ठेवा हें असें मी आपणांस निक्षून सागतो, तें आपली अवज्ञा किंवा उपमर्द करावा ह्मणून सांगत नाहीं ही माझी आपणास करद्वय जोडून विनंति आहे ''

हे महाराजाचे ह्मणणें जिजाबाईने राजास कळविलें, आणि अशी विनति केली की, मुलगा चागला हुशार, शहाणा व मर्यादशील असून असा हूडपणा करितो याबद्दल त्याजवर रोष करून त्यास काहींतरी शासन करण्यास उद्युक्त होणें उचित नाहीं त्याचा आणि यवनाचा जन्मातरींचाच द्वेष असावा एरवीं तो असा वागताना काय असेल ते असो त्याला काही यवनाची ताबेदारी करून राहणें कधीहि आवडणार नाहीं आम्हीं कितीहि सागितलें तरी तो ताळ्यावर यावयाचा नाहीं. ह्यासाठीं त्याला येथे जवळ ठेवून नसती भानगड व दौलतीला संकट उत्पन्न करून घेण्यापेक्षा चार पावलें दूर ठेवावा, हे ठीक दिसतें, मायाजाळास गुंतून त्याला जवळ ठविल्याने आपल्या प्रतिष्ठेची हानि होण्याचे भय आहे, यास्तव आपल्या चित्तास योग्य दिसेल तो विचार करावा ' हे ऐकून शहाजीराजास फार वाईट वाटलें, व त्यानी दीर्घश्वास टाकिला मग मुरारपत आदिकरून अमिराची सल्ला घेऊन महाराजास आपल्यापासून दूर ठेवण्याचा विचार राजानीं केला ह्या सुमारास दादाजी कोंडदेव दौलतीचा हिशोब घेऊन विजापुरास आला त्याच्याबरोबर शिवाजीमहाराज व जिजाबाई यास पुन. पुण्यास पाठवून दिलें.

शिवाजीमहाराजांस पुण्यास रवाना करण्यापूर्वी त्याचा विजापुरास आणखी एक विवाह झाला हा दुसरा विवाह करण्याविषयीं खुद्द आदिलशहाचा आग्रह पडला असें ह्मणतात शहाजीराजे महाराजास घेऊन एके दिवशीं दरबारास गेले असता बादशहानें त्यांला विचारिलें 'याचा विवाह केला काय?' त्यावर राजांनीं उत्तर केलें कीं, 'होय, पुण्यास असता याचा विवाह झाला.' बादशहानें ह्मटलें: 'तुह्मी आह्मी नसता विवाह झाला तो कसला विवाह? येथें मोठ्या समारंभानें यांचा दुसरा विवाह करा.' असा बादशहानें आग्रह केल्यामुळें राजांनीं एका मराठे सरदाराची सुलक्षण मुलगी पाहून तिजशीं महाराजांचा विवाह मोठ्या थाटानें केला. दरबारचे सर्व अमीरउमराव व खुद्द बादशहा लग्नसमारंभास

आले होते नजर नजराणा व अहेर किती झाला त्याची गणती नाहीं राजानीं दानधर्म, भोजनें, मेजवान्या इत्यादिकांत विपुल द्रव्य खर्चिलें. महाराजाच्या ह्या दुसऱ्या बायकोचे नाव सोयराबाई असें ठेविलें.

वर सागितल्याप्रमाणे शिवाजीमहाराज व जिजाबाई यास दादाजी कोंडदेवा-बरोबर पुण्यास पाठविल्यावर पुन कधी त्यास शहाजीराजापाशी राहण्याचा योग आला नाहीं ह्यानंतर राजे कर्नाटकात सुभेदारीवर गेले, ते पुन विजापुरास किंवा पुण्यास कायमचे राहावयास असे कधीच आले नाहींत तेव्हा अर्थात् हा पितृसान्निध्याचा योग महाराजास पुनरपि प्राप्त झाला नाहीं. त्यावरून बहुतेक इतिहासकार असा तर्क करितात, कीं, शहाजीराजाची जिजाबाईवर व तिच्या ह्या पुत्रावर अप्रीति झाली असल्याकारणानें त्याला त्यानी आपल्यापासून दूर ठेविलें होतें, आणि ह्या तर्कास प्रमाण काय तर श्वशुरजामाताचे वैमनस्य येऊन त्याचे युद्धप्रसगहि झाले हे होय परंतु शहाजीराजाचे आपल्या ह्या स्त्रीपुत्राशी येथवर झालेले आचरण पाहिले असता ह्या तर्काला मुळीच आधार नाहीं असे ह्मणावे लागते महाराजाच्या जन्मकाळापासून सतत दहा वर्षे राजे कोणत्या धामधुमीत होते हें पाहिले ह्मणजे एवढ्या अवकाशात त्यास कौटुंबिक सौख्य अनुभवण्यास मुळींच स्वस्थता नव्हती असें दिसून येईल राजानी दुसरा विवाह केल्यावरून जिजाबाईवर त्याची अप्रीति झाली होती असा कोणी तर्क करितील तर तोहि निराधार आहे कारण दोनदोन तीनतीन बायका करण्याची चाल मराठे सरदारात तेव्हा होती व अजूनहि आहे. तेव्हा राजानी दुसरा विवाह केला तो जिजाबाईवरचे प्रेम उडाल्यामुळे केला हे ह्मणणे बरोबर नाहीं पुढे महाराज विजापूरकराच्या मुलखात धामधूम करूं लागले तेव्हा राजानी आपला ह्या स्त्रीपुत्राशी काहींएक सबंध नाही असा जबाब देऊन आपणावरचा वहीम उडवून दिला, यावरून कोणी सदरील तर्क करील तर तोसुद्धा बरोबर नाहीं.

---

१ प्रथम ग्राटडफ यानी हा तर्क आपल्या मराठ्याच्या इतिहासाच्या तिसऱ्या भागात केला असून रानडे यानी हाच तर्क आपल्या पुस्तकाच्या चौथ्या भागात नमूद केला आहे. रा. सरदेसाई आपल्या मराठी रियासतींत हा तर्क खरा मानून जिजाबाई आपल्या बापाच्या आश्रयास गेली नाही ह्मणून तिची स्तुति करितात. (पृ १५९) प्रो. जदुनाथ सरकाराचा तर्क तर फारच विलक्षण आहे. ते ह्मणतात की, जिजाबाईचे तारुण्य गेल्यामुळें शहाजीराजाचें तिजवरचें प्रेम उडून त्यानी दुसरी तरुण व विशेष रूपवती बायको केली असावी !

कारण हा त्यांचा जबाब केवळ कपटाचा होता, हें कोणालाहि समजण्यासारखें आहे जिजाबाईशीं त्याचा खरोखर बेबनाव झाला असता तर त्यानीं विजापुरास जाऊन स्वस्थता प्राप्त झाल्याबरोबर तिला व महाराजांला तिकडे नेलें नसतें. पुढें स १६४३ च्या सुमारास महाराजांला व तिला पुण्यास दादाजी कोंडदेवा-पाशीं कायमचें ठेवून दिलें, त्याचें कारण तरी तसेंच अपरिहार्य घडून आलें ह्मणून महाराजाच्या ठायीं यवनद्वेष पुरा बाणला असल्यामुळे त्यांस जवळ ठेवण्याची मुळीं सोयच नाहीं असें पाहून केवळ निरुपायास्तव त्यास राजांनीं पुण्यास रवाना केलें ह्या एवढ्या गोष्टींचा नीट विचार केला ह्मणजे सदरी निर्दिष्ट केलेला तर्क केवळ निराधार आहे असें ह्मणावें लागतें. जिजाबाईचा पहिला मुलगा सभाजी हा पित्याच्या अनुरोधानें वागून प्राप्त स्थितीमध्यें समाधान मानून राहणारा असल्यामुळे तो राजांबरोबर नेहमी असे ह्यावरून शिवाजी-महाराज राजास कमी प्रिय होते असें कोणी ह्मणेल तर तें युक्त नव्हे

# भाग चवथा.



## शिवाजी महाराजांचें शिक्षण.

महापुरुष निर्माण होण्यास अनुकूल परिस्थिति व सुशिक्षण याची अपेक्षा असते. हीं शिवाजीमहाराजास चागलीं प्राप्त झालीं होतीं असें ह्मणण्यास चिंता नाहीं त्याचीं पहिलीं दहा वर्षे मातृसमागमेंच गेलीं मनुष्याच्या मनावर बरावाईट परिणाम होण्यास हें वय अतिशयित महत्त्वाचे असते त्या वयात ज्या सदसद्वृत्तींचें बीजारोपण होते त्या पुढें अनुकूल संस्कारानी विकसित होण्याचा दृढसंभव असतो हे वृत्तिविकासाचें काम अत्यंत नाजूक आहे हें मुख्यत्वेंकरून मातापितराच्या आचरणावर अवलंबून असतें. त्यांतून मातृशिक्षणाचा प्रभाव मोठाच असतो. तिचा स्वभाव व आचरण हीं जशी असतील तशीं ती तिच्या लेंकरात उतरण्याचा संभव फार असतो गर्भसंभवकालापासूनच ह्या शिक्षणास आरंभ होतो, असें काहीं शास्त्रज्ञाचें ह्मणणें आहे ते खरे आहे असें मानिल्यास जिजाबाई गरोदर झाल्यापासून कोणत्या संकटावस्थेत होती, व त्या अवस्थेत तिच्या मनाची वृत्ति कशी झाली असावी, हें कोणासही सागावयास नको यवनाविषयीं पराकाष्ठेचा द्वेष शिवाजीमहाराजाच्या हृदयात अगदीं लहान वयातच जो इतका विकास पावला त्याचे कारण पाहूं जाता त्यांच्या मातेचीच वृत्ति अशी पूर्ण बनलेली होती हे होय. बालराजांचीं पहिलीं दहा वर्षे तर केवळ घोर संकटात गेलीं, आणि ही संकटपरंपरा ज्यांच्या पायीं त्यांस प्राप्त झाली त्या यवनाविषयीं द्वेष व तिरस्कार ह्या वृत्ति त्यांच्या हृदयांत पूर्णपणें विकास पावल्या तर त्यात काहीं नवल नाहीं त्यांत आणखी जिजाबाईसारखी अत्यंत स्वाभिमानी, महत्त्वाकांक्षी व बुद्धिमान् माता त्यांस अहर्निश हाच बोध करणारी सर्वदा सन्निध असल्यावर मग हा वृत्तिविकास पाहिजे तसा व्हावयास हरकत कोणती ?

जिजाबाईचें जन्म ज्या कुळांत झालें होतें तें एक वेळ देवगिरीस राजवैभव भोगीत होतें. हें राजवैभव यवनांनीं हरण केल्यामुळें त्यास हीन स्थिति व परवशता प्राप्त झाली. ह्या गोष्टीचा विसर त्या कुळांतील माणसांला सहसा

पडण्यासारखा नव्हता, आणि जिजाबाईसारख्या मानी स्त्रीला तर त्याची विस्मृति कदापि होणारी नव्हती. पुढें तिच्या पित्यास व बंधूस निजामशहानें विश्वासघात करून ठार मारिलें, त्यामुळे तर तिचा यवनद्वेष फारच वाढला होता त्याप्रमाणेंच भोंसल्याच्या कुळाचे राजवैभव यवनाच्याच पायीं नष्ट होऊन त्यातील पुरुषास परागंदा व्हावे लागलें, व अगदीं हीन स्थितीमध्ये कालक्रमणा करावी लागली, हे ती कधीहि विसरली नव्हती पुढे शहाजीराजांनी स्वबाहुबलाने काहीं काळपर्यंत यवनाशी कलह करून त्यास आपल्या अगचे अप्रतिम क्षात्रतेज व विलक्षण शौर्य दाखवून चकित करून सोडिले परतु त्याचे सैन्यबल प्रचंड असल्याकारणाने शहाजीराजास हार खाऊन पुनरपि यवनाची ताबेदारी केवळ निरुपायास्तव पतकरावी लागली हा स्वपतीचा अलौकिक पराक्रम पाहून, व ते काहीं वेळ समरविजयी होऊन एक यवनपादशाही केवळ त्याच्या मुठीत आली असून शेवटी त्यास हतवीर्य व्हावे लागले, हे लक्षात येऊन तिच्या हृदयात कोणत्या वृत्ति उद्भवल्या असतील बरे ? भोसल्याच्या कुळात शककर्ता पुरुष निर्माण होऊन तो सर्व हिंदूंस यवनत्रासापासून मुक्त करील, असा भवानीदेवीचा वर होता तो आता लवकरच खरा होईल अशी आशा त्या माउलीच्या हृदयात काहीं वेळ स्फुरण पावण्यासारखी कृति शहाजीराजाच्या हातून घडली होती, परतु तिचे पर्यवसान निराळेच होऊन त्यास पुनरपि यवनाची ताबेदारी स्वीकारावी लागली, हे पाहून तिची किती निराशा झाली, व तिला किती वाईट वाटले, हे येथें सागावयास नको

आपल्या पूर्वजाचें गतवैभव पुनरपि प्राप्त होऊन आपल्या कुळांत शककर्ता पुरुष खात्रीने निर्माण होईल असें त्या भाविक स्त्रीला नेहमीं वाटत असे. आणि शहाजीराजानी केलेल्या पराक्रमावरून तर तिला ही गोष्ट असाध्य आहे असे मुळीच वाटत नसे ह्या सबंधाच्या गोष्टी ती आपल्या प्रिय पुत्राशीं नेहमी बोलत असे उभय कुलाच्या राजवैभवाचें हरण यवनांनी केल्यामुळे आपणास किती हीन स्थिति प्राप्त झाली आहे ते ती त्यास वेळोवेळा सागत असे. शहाजीराजांनी नुकतेच जे पराक्रम केले होते त्याचें वर्णन त्याजपाशी पुन:पुन करून त्याच्या हृदयात तसे पराक्रम करण्याविषयींची इच्छा जागृत होईल असें करण्याविषयीं ती झटत असे गोहत्या करणाऱ्या, देवब्राह्मणाची विटंबना करणाऱ्या, क्रूर व विश्वासघातकी अशा यवनाची सेवा करून योगक्षेम चालविणें अत्यंत निंद्य व विपत्तिमूलक आहे असा बोध ती त्याला अहर्निश करीत असे. जिजाबाई

मोठी धर्मशील असल्यामुळें ती घरीं नेहमीं पोथ्यापुराणें वाचवी. त्यातील कथा ऐकण्याचा नाद शिवाजीमहाराजांस लहानपणापासूनच लागला ह्यामुळें स्वधर्मा-विषयींचा अभिमान व श्रद्धा हीं त्याच्या हृदयांत अल्प वयातच उत्पन्न झालीं. राम-रावण,कौरव-पाडव इत्यादिकांचे युद्धप्रसंग ऐकून त्याच्या अगात स्फुरण येत असे, व आपल्या वडिलांचे पराक्रम स्वमातेच्या तोंडून पुन पुन ऐकून, तसे आपण करून स्वजीविताचें सार्थक्य करूं असा हुरूप त्यांच्या ठायीं, समजूं लागल्यापासून, उत्पन्न होऊन तो दिवसेंदिवस वृद्धिगत होत गेला

शिवाजीमहाराज जात्याच मोठे बुद्धिमान् व चपळ असल्यामुळे त्यास जें जें सागावें तें तें चागलें समजत असून त्याची आठवण त्यास उत्तम राहत असे. जिजाबाई स्वभावानें फार गंभीर, धीर व अभिमानी होती तिच्या सहवासानें व बोधानें तिचे हे गुण महाराजात पूर्णपणे आले होते त्याच्या आचरणास चागलें वळण लावावे, त्यास कुसगति लागू नये, त्याला कोणतेंहि व्यसन किंवा ढंग लागूं नये, ह्याविषयी ती फारच जपत असे. त्यास युद्धोपयोगी कला शिक-विण्याची व्यवस्था तिने लहान वयापासूनच केली होती ह्याप्रमाणें महारा-जाच्या ठायीं साहस, शौर्य, मर्दुमकी, सदाचारप्रीति, स्वधर्मनिष्ठा इत्यादि गुणांचा विकास ह्या माउलीच्या सुशिक्षणाने चागला झाला परतु ह्या सर्व वृत्तींहून विशेष महत्त्वाची अशी एक वृत्ति ह्या प्रेमळ मातेच्या बोधानें महाराजाच्या हृदयात उत्पन्न होऊन उत्तरोत्तर विकसित होत गेली, व तिच्या प्रभावाने त्याचें नांव जगाच्या इतिहासांत अजरामर होऊन राहिलें आहे. ती वृत्ति कोणती ह्मणाल तर 'स्वातंत्र्यप्रीति' ही होय. यवनांचे ताबेदार होऊन परतंत्रतेंत आयुष्यक्रमण करण्यांत काहींएक पुरुषार्थ नाहीं. यवनावर भरंवसा ठेवून त्याची सेवा कितीहि एकनिष्ठेनें व इमानानें केली तरी तिचें काहींएक चीज व्हावयाचे नाहीं, व खऱ्या सौख्याचा लाभ व्हावयाचा नाहीं ह्या विचाराचें बाळकडू ह्या मातेनें बालराजांस पाजलें असून परतंत्रतेमुळें किती हानि होत असते, किती हाल व विपत्ति भोगाव्या लागतात, व जीवितरक्षण होण्यास किती पंचाईत असते, याचा प्रत्यक्ष अनुभव महाराजास बाळपणापासून चांगलाच आला होता. ह्या-प्रमाणें स्वानुभव आणि मातृबोध यांच्या योगानें महाराजांच्या हृदयांत स्वातंत्र्य-प्रीति पूर्णपणें बाणली असून यवनांची ताबेदारी प्राण गेला तरी करावयाची नाहीं, असा निर्धार त्यानीं लहान वयांतच केला होता. पुढें ह्या निर्धाराप्रमाणें कार्यसिद्धि करण्यास ते प्रवृत्त झाले असतां दादाजी कोंडदेव यानें त्यांस त्या-

पासून परावृत्त करण्याविषयी अनेक प्रकारीं बोध केला, व इतर उपाय योजिले; परंतु जिजाबाईनें असा कांहीं प्रयत्न केल्याचा उल्लेख कोणत्याहि बखरीत नाहीं. ह्यावरून हे उघड होतें कीं, यवनांची ताबेदारी झुगारून देऊन स्वतंत्रराज्य-सत्ता स्थापित करण्याची स्फूर्ति, आवेश व उत्साह हीं त्याच्या ठायीं मातृबोधा-नेंच प्रथमत उत्पन्न झाली यात काहीं शंका नाहीं विजापुरास असता महारा-जांनी यवनाविषयीचा तिरस्कार प्रथम प्रगट केला तेव्हा जिजाबाईनें पतीच्या आज्ञेवरून त्याचा निषेध केल्याचा मागल्या भागात उल्लेख केला आहे. त्यावरून कोणी ह्मणतील कीं, यवनाची ताबेदारी पतकरून राहावे असाच जिजा-बाईचा महाराजाना बोध होता, परतु हे ह्मणणे बरोबर नाहीं कारण तिच्या अंतर्यामीं कसेहि विचार घोळत असले तरी पतीची आज्ञा शिरसा वंद्य मानून तदनुसार वर्तन करणे हा साध्वी स्त्रीचा धर्म आहे, हे मनात आणून तिने महाराजास त्या प्रसंगी तसा बोध केला त्यात वावगे असें काहींच झाले नाहीं तेव्हा तात्पर्य काय कीं, जिजाबाईसारखी परम सात्विक, भाविक, स्वाभिमानी व स्वोत्कर्षप्रिय माता शिवाजीमहाराजासारख्या परम मातृभक्त व अत्यंत बुद्धिमान पुरुषास सुदैवानें प्राप्त होऊन, तिच्या अतिप्रमळ बोधाचा ठसा त्याच्या चित्तावर उत्कृष्ट उठून त्याच्या हातून सर्व जगास थक्क करून सोडणारे व हिंदुप्रजेस यवनत्रासापासून सोडविणारे पराक्रम घडले

येथवर जिजाबाईकडून कोणत्या प्रकारचें शिक्षण शिवाजीमहाराजास प्राप्त झाले ते सागितलें. आता स. १६३७ त शहाजीमहाराजानी दादाजी कोंडदेवास महाराष्ट्रांतील आपल्या जहागिरीची व्यवस्था सागून शिवाजीमहाराजास त्याच्या हवालीं केलें व त्यास असें सागितलें कीं, याला योग्य प्रकारे शिक्षण द्यावें. तेव्हा अर्थात् ह्यानंतर महाराजाच्या शिक्षणाचें काम मुख्यत. दादाजीकडे आलें. तरी मातेच्या सुशिक्षणाचा शेवट येथे झाला असें मात्र समजतां कामा नये. तिचा सर्व जीवप्राण महाराजावर होता. सर्व आशेचा व भावी उत्कर्षाचा कंद केवळ हा आहे असे तिला वाटे. उभय कुळांचें गतवैभव यवनांपासून पुनरपि हिसकावून घेण्याचें सामर्थ्य ह्याच्या अंगीं येईल असें तिला वाटूं लागलें होतें. फार काय, पण भवानीच्या वरप्रसादानें आपल्या कुळांत जो शककर्ता उत्पन्न होणार आहे असें त्या भाविक स्त्रीस वाटत होतें, तो कदाचित् आपल्या ह्या पुत्राच्याच रूपानें प्रगट होईल असें तिला वाटण्याजोगीं कांहीं चिन्हें महा-राजांच्या ठायीं एव्हांपासूनच दिसूं लागलीं होतीं. तेव्हां अर्थात् महाराजांच्या

ठायीं सद्गुण व स्वधर्म याविषयींची प्रीति उत्तरोत्तर वृद्धिगत होईसे करण्याविषयीं ती सर्वदा झटत असे.

आता दादाजी कोंडदेवाकडून महाराजांस कोणत्या प्रकारचे शिक्षण प्राप्त झाले तें सांगितले पाहिजे प्रथमत ह्या पुरुषाची थोडीशी माहिती येथे दिल्यास अप्रासंगिक होणार नाहीं. दादाजी शहाजीराजांच्या नोकरीस केव्हांपासून होता तें कळत नाहीं[1], परंतु तो फार हुशार, चाणाक्ष, प्रामाणिक व स्वामिनिष्ठ आहे अशी खात्री झाल्यावरून राजांनीं पुणे, सुपे, बारामती, इंदापूर, मावळ वगैरे महाराष्ट्रातील आपल्या जहागिरीची व्यवस्था पाहण्याचे काम त्यास सागितलें. ही आपल्या धन्याची कामगिरी त्याने उत्तम प्रकारें केली हे प्रात मोगल व मुसलमान याच्या दीर्घ काळ चाललेल्या कलहामुळे बहुतेक उद्वस्त झाले होते. त्याशिवाय आणखी महाराष्ट्रात स १६३०–३१ साली भयंकर दुष्काळ पडल्यामुळें तर हे प्रात अगदी बेचिराख झाले होते[2] त्यात पुन वसति करवून त्यानें ते चागले लागवडीस आणिले, व शेतकऱ्यास उत्तेजन यावें ह्मणून त्यास कांहीं वर्षांचा सारा माफ केला आसपासच्या गावचे शेतकरी ह्या प्रातांत येऊन जमिनी नांगरूं लागले त्यामुळे उत्पन्न वाढून लोकही सुखी झाले दादाजीनें जमिनीची मोजणी व प्रतबंदी करून मलिकंबरी वसुलाची पद्धत जिकडेतिकडे सुरू केली ती अर्थात् अशी कीं, दरसाल जे पीक येईल त्याची अजमासपाहणी करून त्यावर वसूल ठरवावयाचा ह्यामुळे लोकास अधिकाधिक पिके काढण्याचा हुरूप आला अशा रीतीनें शेतकऱ्याशी कौलकरार होऊन, जमिनी आपल्याकडे कायमच्या राहतील व त्याची नागरणीपेरणी करून होणाऱ्या

---

१ प्रो सरकार मुसलमानी बखरीच्या आधारावरून असे ह्मणतात की, विजापूर सरकारचा सरदार मुरार जगदेव याला शहाजी राजानीं १६३३ त चागलें साहाय्य केल्यावरून त्यास त्यानें त्या सरकाराकडून चाकणच्या किल्ल्यापासून पुणे, सुपें, इंदापूर व वाई हे परगणे जहागिरीदाखल देवविले तेव्हा त्यांची व्यवस्था लावण्याचें काम राजांनी दादाजी कोंडदेवाकडे सोंपविले त्यापूर्वीं हा गृहस्थ हिंगणी, बेरडी व देऊळ गांव ह्या गावाचें कुळकर्णाचे काम करीत होता ह्या गावाच्या पाटीलक्या मालोजी राजांनी खरेदी केल्या असल्याकारणानें दादाजीचें सगळें आयुष्य भोंसल्यांच्या नोकरींत गेलें असून शहाजीराजाना त्याची कर्तबगारी व इमान हीं चागलीच अवगत होतीं, ह्मणून त्यांनीं त्यास सदरील विश्वासाची कामगिरी सांगितली.

२ ह्या दुष्काळासंबंधाचा उल्लेख जेधे यांच्या शकावलींत व पादिशाही नाम्यांत केला आहे.

उत्पन्नाचा योग्य अंश आपणांस निर्वेधपणें भोगावयास मिळण्याची शाश्वति आहे असें रयतेस वाटल्यावरून ती दादाजीच्या व्यवस्थेखालील प्रांतांत येऊन सुखानें राहूं लागली.

ह्या वेळीं मावळातल्या मावळे लोकांची स्थिति फारच निकृष्ट होती ते रात्रंदिवस कितीही कष्ट करीत तरी त्यांस खावयास पोटभर अन्न व जाडेभरडें वस्त्रही मिळण्याची पंचाईत असे हे लोक मोठे कष्टाळू व विश्वासू आहेत असें पाहून दादाजीनें त्याची ती दीन स्थिति सुधारण्याविषयी विशेष परिश्रम केले. त्यास त्याने साऱ्याची सूट देऊन जमिनीची लागवड करण्यास उत्तेजन दिलें. पुष्कळांस आपल्या पदरी शिपायांच्या नोकऱ्या देऊन वसूल जमा करण्याची वगैरे कामे त्याने सागितलीं. त्यास एकदोन रुपये पगार व नाचणी, वरी यासारखे थोडेसें रुक्ष धान्य दिलें म्हणजे बस होत असे त्या पहाडी मुलुखांत लाडग्याचा, वाघाचा वगैरे उपद्रव फार असे तो नाहींसा करण्यासाठीं दादाजीनें मावळे बरकंदाज ठेवून त्यास अशी लालूच दाखविली कीं, जो कोणी लांडगा किंवा वाघ मारून आणील त्यास बक्षीस मिळेल ह्या बक्षिसाच्या आशेनें त्यांनीं पुष्कळ हिंसक पशूंचा सहार करून त्याचा त्या प्रातातून बहुतेक त्रास नाहींसा केला.

ह्या मुलखात चोरवडा फार माजला होता. यास्तव दादाजीनें जागोजाग चौक्या पाहारे ठेवून चोरांचा बंदोबस्त केला चागले उत्पन्नाचे वृक्ष लावण्यास व बागाईत वाढविण्यास लोकाना त्यानें उत्तेजन दिलें, ह्यामुळें जिकडेतिकडे बागबगीचे, आमराया इत्यादि निर्माण झाल्या. शहाजीराजाच्या ताब्यांतल्या किल्ल्यांची डागडुजी करून त्यावर त्यानें शिबंदी ठेविली व मावळे लोकांची एक पलटण तयार केली. मावळातल्या खोऱ्यात जागोजाग देशमुख व देशपांडे होते, ते निजामशाही, अदिलशाही व मोगलशाही याच्या धामधुमी माजल्यामुळें कोणालाही न जुमानतां बहुतेक स्वतंत्र होऊन बसले होते त्यास वठणीस आणून शहाजीराजाचे अंकित करण्याच्या कामीं दादाजीस फारच प्रयास पडले. साम, दाम, दंड व भेद ह्या चारी प्रकारांची योजना त्यास प्रसंगानुसार करावी लागली. त्यांच्या आपसांतल्या कलागती मिटविण्याचें काम त्यानें मोठया चातुर्यानें केलें. या त्याच्या कर्तृत्वाची कल्पना अलीकडे प्रसिद्ध झालेल्या कागदपत्रांवरूनं[1] चांगली करितां येते. अशा रीतीनें शहाजीराजांच्या जाहगिरीची व्यवस्था

१ रा. राजवाडे यानीं प्रसिद्ध केलेलीं १५, १६, १७, १८ व २० ही खंडें पाहा.

दादाजी कोंडदेवाच्या परिश्रमानें उत्तम होऊन तिचें उत्पन्न पुष्कळ वाढलें. ह्या उत्पन्नांतून शिपाई, नोकर, कामदार, कारकून वगैरे लोकांस द्यावा लागणारा मुशाहिरा व इतर चिल्हर खर्च वजा जाता बाकीचा सगळा ऐवज दादाजी शहाजीराजांकडे वर्षाच्या वर्षास प्रामाणिकपणानें पावता करीत असे. ह्या विश्वासू कारभाऱ्याच्या सचोटीची अशी एक गोष्ट सागतात कीं, एके दिवशीं शिवाजी-महाराजांस बरोबर घेऊन तो राजाच्या एका बागेंतून चालला असता एक पाडाचा आंबा त्यानें आपल्या हातानें तोडला. पण आपण हें बेकायदा काम केलें असें मनांत येऊन तो ह्मणाला की, आपणास ह्याबद्दल शासन असावें; आणि ज्या हातानें तो आंबा तोडिला तो हात तोडा, असें तो बरोबरच्या चाकरास सांगू लागला. ते पाहून शिवाजीमहाराज ह्मणाले ‘हे तुमचें करणें बरोबर नाहीं. ह्या बागाची लावणी तुह्मींच केली आहे. तुह्मी मालकच आहा’ हें ऐकून त्यानें आपल्या अंगरख्याची एक अस्तनी लांडी केली, व असा लांड्या अस्तनीचा अंगरखा तो आमरण वापरीत असे, असें ह्मणतात[1]

एकंदरींत पाहता दादाजी मोठा इमानी व स्वामिकार्यदक्ष असा होता. शहाजीराजानी आपल्या जहागिरीची व्यवस्था त्याला सांगितली त्या वेळीं तो चागला पोक्त वयाचा असून मोठा अनुभविक होता त्याचें वर्तन पवित्र असून स्वधर्मावर त्याची पूर्ण श्रद्धा असे. एकंदर धर्मकर्मे तो नियमानें करी त्याच्या मनाची वृत्ति अशी असे कीं, स्वामिकार्यासाठी देह झिजवून व दक्षतेनें व इमानानें वागून स्वोत्कर्ष साधावा तेव्हा अशा ह्या प्रामाणिक, धर्मशील व पापभीरु पुरुषाच्या स्वाधीन आपल्या पुत्रास करण्यास शहाजीराजास कांहींएक दिक्कत वाटली नाहीं, हें साहजिक आहे आणि दादाजीनेंही आपल्या धन्याच्या ह्या गुणी व हुशार मुलाचे संगोपन मोठ्या प्रेमानें व दक्षतेनें केलें.

शिवाजी महाराजास व जिजाबाईस कोणत्याहि गोष्टीचें उणें पडूं न देण्याविषयीं तो मनापासून झटे. क्षत्रियाचा मुलगा क्षत्रियकर्म करण्यास चांगला

---

१ रायरीच्या बखरींत ही गोष्ट अमळ निराळी दिली आहे हा आंबा एका कुणब्याच्या बागेंतला त्यानें तोडला असून त्या कुणब्यास आपला हात तोडावयास तो सागू लागला. परतु तो कुणबी काही केल्या ऐकेना. ह्मणून तो त्या हातात चामड्याचा मोजा घालू लागला ही गोष्ट पुढें शहाजीराजास कळली तेव्हा ते त्याच्या त्या प्रामाणिकपणानें फार संतोष पावले, व त्यास सातशें होन व एक खिलात (झगा) त्यांनीं बक्षीस पाठविला, आणि हातमोजा इतःपर वापरू नये असें त्यास सागितलें. त्याप्रमाणेंच त्यास लागेल तो खर्च आपल्या उत्पन्नांतून करण्याची त्यांनीं परवानगी दिली.

योग्य व्हावा यासाठीं त्यानें महाराजास युद्धकला शिकविण्याची उत्तम व्यवस्था केली. त्याचें शरीर बळकट व चपळ होण्यास लागणाऱ्या कसरती व व्यायाम त्यांच्याकडून तो नियमानें करवीत असे जिजाबाईनें ह्या प्रकारच्या शिक्षणास पूर्वीच आरंभ केला होता; व हे शिक्षण दादाजीनें पुढे दक्षतेने चालू ठेविले ह्या प्रकारच्या शिक्षणाशिवाय आणखी महाराजाकडून विद्याभ्यासहि करविला होता ह्या अभ्यासाची व्यवस्था प्रथम जिजाबाईने करविली असून पुण्यास गेल्यावर दादाजीने तो पुढे चालविला होता महाराजास उर्दू व फारशी ह्या भाषा चागल्या शिकविल्या होत्या. इतकेच नव्हे तर त्यास थोडेसे संस्कृतहि शिकविले होते. असें सांगतात कीं, त्यानी काहीं पदे व आरत्या केल्या असून त्यात उर्दू भाषेतील शब्द बरेच आहेत[२]. दादाजी स्वत धर्मशील पुरुष असल्यामुळें महाराजासही ते वळण लागले. कथा व पुराणे यांचे श्रवण त्याला नित्य घडूं लागलें, व स्वधर्माभिमान त्याच्या ठायी विशेषच दृढ झाला

---

१ चिटणीसकृत बखर पाहा शिवदिग्विजयातील अत्युक्तिरूप वर्णन खरे मानिले तर पुराणातरींच्या क्षत्रियास सर्व विद्या व सर्व कला शिकविण्याचा परिपाठ असे, त्याप्रमाणे महाराजास शिक्षण मिळाले होते असे ह्मणावे लागतें

२ रा राजवाडेकृत म इ सा ख ४ पृ ७४ पाहा ह्या विद्वान् इतिहासशोधकानें सरस्वतीमंदिर व ५, अ ५ यात 'शिवाजीची साक्षरता' ह्या नावाचा एक लेख लिहून ग्राटडफचें महाराजाच्या निरक्षरतेसबधाचे विधान सर्वथा असत्य आहे असें सिद्ध केलें आहे त्याच्या वेळच्या, त्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या व पुढे झालेल्या बहुतेक मराठे सरदारास लिहिता वाचता येत असे असे त्याचे ह्मणणें आहे, ते खरे आहे. असा पुरावा त्यानी दिला असूनहि प्रो सरकार यास तो न पटून ते महाराज निरक्षर होते असा हटाग्रह धरून बसले आहेत रा देव यांचें ह्मणणें जें की, रामदास स्वामींस पाठविलेल्या पत्राच्या अखेरचा थोडासा मजकूर महाराजाच्या हातचा आहे, तें त्याना विश्वसनीय वाटत नाही ' अलीकडे प्रसिद्ध झालेलीं पत्रें, याद्या इत्यादिकावरून असें निर्विवाद सिद्ध झालें आहे कीं, शिवाजी महाराजांसच काय पण त्याच्या मातुःश्री जिजाबाई, त्याचे पणजे बाबाजी, त्यांचे आजे मालोजी व त्यांचे तीर्थरूप शहाजी यासही लिहिता वाचता येत असे. मराठे हे क्षत्रिय आहेत, शूद्र नव्हत, हे ध्यानात ठेविलें पाहिजे; आणि सोळाव्या व सतराव्या शतकातल्या कुलीन मराठ्याचा लिहिणें वाचणें शिकण्याचा सार्वत्रिक परिपाठ होता. इतकेंच नव्हे तर त्यांच्यापैकी कांहीं कविही होते. द्रौपदीस्वयवराचा कर्ता अवाचिसुत काशी, व सिद्धांतबोधाचा कर्ता शामुनि हे मराठे होते; साधुवर्य तुकाराम बावा यांचें अध्ययन व कवित्व हीं तर सर्वश्रुत आहेत.

हें जे शिक्षण महाराजांस दादाजीकडून प्राप्त झालें त्यांत काहीं विशेष नव्हतें ह्या प्रकारचें शिक्षण देण्याची व्यवस्था जिजाबाईनें पूर्वीच केली होती. दादाजीकडून त्यांस मिळालेले शिक्षण याहून निराळें होतें. दादाजी जमाबंदीच्या कामांत मोठा हुषार होता. त्याच्या व्यवस्थेखालीं असलेल्या प्रांताचें उत्पन्न वाढविण्याविषयीं व त्यातील रयतेस खुश ठेवण्याविषयी योग्य उपाय योजण्याच्या कामी तो पुरा वाकबगार होता हाताखालील लोकास उत्तम रीतीनें वागवून त्याच्याकडून वाटतील ती कामे करून घेण्यात त्याचा हातखंडा होता. न्यायमनसुब्याच्या कामातही तो पुरा हुशार असून निःपक्षपाती व निरपेक्ष असे ताब्यातील प्रजेचे योग्य रक्षण होऊन ती आबाद राहील अशी शिस्त लावण्यास तो मनापासून झटे स्वामिहिताचे हरएक काम तो मोठ्या दक्षतेनें व निरलसपणे करीत असे. हा सगळा कारभार दादाजी कोणत्या रीतीनें करी हे महाराज नेहमीं जवळ राहून पाहत असत प्रत्येक गोष्टीची बारकाईनें चौकशी करून उपयुक्त व्यवहारज्ञान संपादन करण्याची त्याला पराकाष्ठेची हौस असे. त्याचा चौकसपणा असा काहीं अमर्याद असे कीं, प्रत्येक बाबतींत शेकडो प्रश्न करून जवळच्या माणसास ते पुरेपुरे करून सोडीत हीं अशी जिज्ञासा व चौकसपणा त्याच्या अगीं असल्यामुळे दादाजीचे प्रत्येक काम नीट समजून घेण्यास ते सर्वदा उद्युक्त असत एकाद्या प्रकरणाची माहिती आपणास नीट झाली नाही असें आढळून आलें ह्मणजे त्यास फार वाईट वाटत असे. दादाजीस ते फार मान देत असत. त्याच्या सन्निध राहून त्याच्या सर्व अनुभवज्ञानाचा लाभ आपणास घडावा असे त्यास मनापासून वाटे. परंतु दादाजी सर्वच गोष्टी त्याच्या विद्यमानें करीत नसे हे लक्षांत येऊन ते त्याला एके दिवशीं असें स्पष्टपणे बोलले कीं, ‘ आह्मी लहान असलो ह्मणून काय झालें ? प्रत्येक गोष्ट आह्मास कळवून करावी आपण आह्मास वडिलाच्या जागीं आहा. आह्मांस शहाणे करावयासाठीं वडिलानी आपल्या स्वाधीन केलें आहे. प्रत्येक कामाची व्यवस्था आह्मांस सांगून केली नाहीं तर आम्हीं शहाणे कोणत्या रीतीनें व्हावें ?’ ही अशी त्यांची उत्सुकता पाहून दादाजी हरएक कामांत त्यांची मसलत घेऊं लागला. महाराज प्रत्येक गोष्टीचा मनःपूर्वक विचार करीत, व तीसंबंधानें त्या अनुभविक व पोक्त पुरुषाचे साधकबाधक विचार मनापासून ऐकून घेत. कधींकधीं मोठ्या बिकट बाबी व पंचायती उपस्थित होऊन त्यांवर अभिप्राय किंवा न्याय देणें कठीण पडे. अशा भानगडीच्या प्रश्नांचा निर्णय करून योग्य

निवाडा देण्याचें शिक्षण दादाजीकडून महाराजांस अल्प वयांतच प्राप्त झालें. त्यांची धारणाशक्ति व कुशाग्रबुद्धि अलौकिक असल्यामुळें कसेंही बिकट प्रकरण असलें तरी त्याचें आकलन होण्यास व तें ध्यानांत ठेवून त्यापासून पुढें फायदा करून घेण्यास त्यांस मुळीच कठीण जात नसे.

साराश, जमाबंदीची व्यवस्था नीट लावून प्रजा आबाद कशी राखावी, शेतकऱ्यांस उत्तेजन देऊन उत्पन्न कसें वाढवावें, घोडे वगैरे जनावराची जोपासना कशी करावी, शिपाईप्यादे वगैरे नोकर पदरीं ठेवावयाचे ते कसे पारखून ठेवावे, नोकरास राजी राखून त्याच्याकडून इष्ट कामे कशी बिनबोभाट करून घ्यावीं, पागा व लष्कर यांची शिस्त कशी राखावी, इत्यादि गोष्टींचें ज्ञान महाराजांस दादाजीकडून अल्प वयातच चागलें प्राप्त झालें त्या अनुभवाचा व ज्ञानाचा परिपाक पुढें किती उत्तम प्रकारें झाला व त्यापासून कोणतीं कार्यें उद्भवलीं तें सर्व जगास विदित आहे

परंतु यवनद्वेषाचें बाळकडूं त्यास प्रिय मातेकडूनच पाजलें गेलें होते, हें वर निर्दिष्ट केलेंच आहे. यवनाची ताबेदारी प्राण गेला तरी करूं नये, त्याचें अन्न खाणें ह्मणजे विषभक्षण करणें होय, स्वराज्य स्थापन करून हिंदू प्रजेस यवनत्रासापासून मुक्त करण्याचा प्रयत्न मन पूर्वक करावयाचा, इत्यादि मर्दुमकीचे विचार त्याच्या हृदयात लहानपणींच उद्भवून ते उत्तरोत्तर दृढ होत गेले, ते त्याच्या मातेच्या शिक्षणामुळेंच मुख्यत होत त्यासंबंधाचें सगळे श्रेय जिजाबाईसच दिलें पाहिजे. दादाजी कोंडदेवाच्या मनात असले विचार उत्पन्न होण्याचा फारसा सभव नव्हता. त्याची दृष्टि इतकी दीर्घ नव्हती. ज्याच्या कृपेनें आपल्या धन्यास ही जहागीर प्राप्त झाली आहे त्याच्याशीं नम्रतेनें वागून त्यांची इतराजी होऊं न देण्याविषयीं कायावाचामनेंकरून झटावें, व कसेंही करून जहागिरीचें संरक्षण करावें, एवढेंच आपलें कर्तव्य आहे असें त्या विश्वासू व सरळ मनाच्या पुरुषास वाटत असे. धन्याची जहागीर वाढविण्याचें धाडस करून यवनांच्या कोपास पात्र होण्याचा विचार त्याच्या मनात कधींहि आला नाहीं, हें स्वाभाविकच होतें.

महाराजांस व जिजाबाईस विजापुराहून दादाजी कोंडदेवाबरोबर शेवटीं रवाना केल्यावर लवकरच महाराजांनीं आपला कृतसंकल्प येणेंप्रमाणें बोलून दाखविला; ‘ वडिलांनीं यवनांची ताबेदारी पतकरून संपादिलेल्या दौलतीवर

निर्वाह करून राहणें मला योग्य वाटत नाहीं स्वताच्या पराक्रमानें नवीन दौलत संपादन करण्याचा माझा निर्धार झाला आहे माझ्या हातून कांहीं तरी नवीन कमाई होईल तरच भोसल्याच्या कुळात जन्म घेतल्याचें सार्थक्य. पुरुषाने स्वताच्या कमाईचे अन्न खावे यातच पुरुषार्थ आहे दैवावर भरंवसा ठेवून राहणें सर्वथा योग्य नव्हे. दैव पंगु आहे पुरुषाने स्वप्रयत्नाने त्यास अबल केलें पाहिजे. यवनानी आह्मा हिदूच्या स्वातंत्र्याचा अपहार करून गोब्राह्मणास व क्षेत्रादिकास अनेक प्रकारी त्रास दिला आहे, व हिदुधर्माची चोहोकडे ग्लानि होत चालली आहे ह्या अनिष्ट प्रकार बंद करून स्वातंत्र्याची पुन स्थापना करण्याविषयी तनमनधनेकरून उद्योग आरभिण्याचा मी निश्चय केला आहे ह्या सत्कार्यसिद्धीसाठी प्रयत्न करिताना सर्वस्वनाश होऊन स्वप्राण वेचावे लागले तरी चिता नाहीं आजपर्यत माझे वय व्यर्थ गेले त्यास आता उपाय नाहीं इत पर आयत्या पिठावर रेघा ओढीत बसून प्राप्त स्थितीत समाधान मानून राह-ण्यात मुळीच पुरुषार्थ नाहीं ' हा महाराजाचा सकल्प दादाजी कोडदेव यास कळला,तेव्हा त्याने त्यास त्यापासून परावृत्त करण्याच्या उद्देशाने येणेप्रमाणे बोध केला, ' तुह्मी मनात योजिलेली गोष्ट साध्य होणे परम दुर्घट आहे सर्व देश यवनानी पादाक्रात केला आहे सर्व किल्ले व ठाणी हस्तगत करून त्यानी त्यावर आपल्या फौजा ठेविल्या आहेत तुमच्या वडिलानी सपादिलेल्या दौलतीचें रक्षण करून राहा ह्मणजे पुरे आहे नवी सपादण्यासाठी खटपट करू गेल्यास यवनाशी विरोध घडेल, व आहे तीही गमावून आपल्या वडिलास व स्वतास तुह्मी प्राण-सकटात पाडाल आपले वडील काहीं कमी पराक्रमी नाहींत, परतु प्रबळ यवनां-पुढें त्याचें काहींएक न चालून अती त्यास यवनाची ताबेदारी स्वीकारावी लागली याचा नीट विचार करा भलताच अविचार करू नका.' ह्या बोधावरून दादाजीच्या बुद्धीचा पोच कितपत होता, व त्यास कोणत्या गोष्टींत इतिकर्तव्यता वाटत असे, हे स्पष्ट होतच आहे

पुढें महाराजानी कृतसकल्पाप्रमाणे स्वराज्यस्थापनेच्या उद्योगास आरभ करून विजापूरकराच्या मुलखात धामधुम सुरू केली तेव्हा दादाजी अगदी घाबरून जाऊन महाराजास ह्मणाला कीं, ' तुह्मी जो हा प्रकार आरंभिला आहे तो सर्वथा अनिष्ट होय. येणेंकरून तुह्मास व तुमच्या जहागिरीस मात्र खास धोका आहे. यवनांच्या चार पादशाहती चोहों बाजूंस प्रबल नांदत आहेत. त्यांच्यापुढे तुमचें सामर्थ्य तें किती ? ह्या अशा उपद्व्यापामुळें तुमच्या वडिलांस मात्र तुह्मी नाहक

पेचांत आणणार आहां. ते तिकडे त्यांच्या अंमलांत आहेत तुमच्या ह्या कृतीमुळें त्यांजवर अदिलशहाचा कोप होऊन त्यांस तो मोठें शासन करील, व तुह्मी आपल्या जहागिरीस मुकून देशोधडीस लागाल, आणि वडिलांनी कमाविलेली दौलत अविचारानें गमाविल्याबद्दल तुमची अपकीर्ति होईल. यास्तव विजापूरसरकाराशी इमानानें वागून आहे ती दौलत कायम राखाल तर त्यात तुमचें कल्याण आहे ' हा असा अवसानघातकीपणाचा बोध दादाजीकडून त्यांस वेळोवेळां होई. तो ते निमूटपणें ऐकून घेत, त्यास उलट जाब असा बिलकुल करीत नसत. अशा ह्या नाउमेदीच्या बुद्धिवादानें महाराजाचें मन स्वमतसंकल्पापासून यत्किंचित्‌हि परावृत्त झालें नाहीं, हे आह्मा महाराष्ट्रीयांचें मोठेंच भाग्य समजावयाचे.

असें सागतात कीं, आपण एवढ्या कळकळीनें खऱ्या हिताचा बोध केला असता हा वाटेवर येत नाहीं, तेव्हा आता काय करावें असा त्या इमानी पुरुषास हृद्रोग लागून राहिला धन्यानें ह्या मुलास आपल्या स्वाधीन करून यास चांगलें वळण लावण्यास सागितलें आहे. पण हा असा बेकैदपणें वर्तन करून आपल्या धन्यावर नसतें संकट आणणार तेव्हा अशा पेचात धन्यास आणित्याचें अपयश पर्यायानें आपल्या माथीं येणार, व तुह्मी जवळ असून ह्याला हे फंद कसे करूं दिले? असा बोल आपणास लागणार व आजपर्यंत इमानानें केलेल्या नोकरीवर पाणी पडणार हे विचार दादाजीच्या मनात येऊन तो झुरणीला लागला, व प्रकृति क्षीण होऊन त्याचें लवकरच देहावसान झालें[१].

---

१ मराठी साम्राज्याच्या बखरीत असा उल्लेख आहे की, दादाजीस हा हृद्रोग असह्य होऊन त्यानें विषप्राशन करून स्वप्राणनाश केला. 'तारीख. इ-शिवाजी ' यामध्येंही असाच उल्लेख आहे. ह्या यवनांबखरींत शिवाजीमहाराज सोळा वर्षांचे असतां दादाजी मरण पावला असा उल्लेख आहे. परंतु अलीकडच्या शोधावरून असें निश्चितपणें कळतें की, तो स. १६४७ च्या आक्टोबर महिन्यात मरण पावला भा इ. स. मं. अ. शके १८३५-अंक ५१ ह्यावरून असें ह्मणावें लागतें की, महाराजानीं तोरणा किल्ला घेतला (१६४६) व राजगडाच्या तीन माच्या बाधल्या (१६४५) त्या वेळीं दादाजी हयात होता. पण ह्या दोन्ही कारस्थानांत त्याचें अंग असल्याचा उल्लेख कोठेंच नाहीं. आता ह्या कारस्थानांपासूनच विजापूर सरकाराशीं प्रत्यक्ष विरोध सुरू झाला आणि हेंच दादाजीच्या चिंताज्वरास विशेष कारण झाल्याचा उल्लेख वर केलाच आहे.

ह्या प्रकरणीं आपणावर कांहीं दोष येऊं नये ह्मणून दादाजीनें या संबंधाची कच्ची हकीगत शहाजीराजास लिहून कळविली, आणि अशी विनंति केली कीं, आज-पर्यंत आपल्या इकडील जहागिरीची व्यवस्था व रक्षण आह्मीं यथामति इमानानें केले. सांप्रत आपले चिरंजीव आपढंगीपणानें मनास वाटेल तें करीत आहेत, त्यामुळे ओढवणाऱ्या दुष्परिणामाचें अपयश आमच्या माथीं न यावें एतदर्थ आपणास वेळींच लिहून कळविलें आहे. तरी याचा आपणास योग्य दिसेल तसा बंदोबस्त करावा ' परंतु शहाजीराजे यानी महाराजाचा ह्या बाबतींत करावा तसा कांहींच बंदोबस्त केला नाहीं. कारण उघडच आहे कीं, शहाजी-राजांच्याहि मनात स्वराज्यस्थापनेचा विचार ह्या वेळी घोळत होता. ह्या संबं-धाचा उल्लेख यथास्थली केलाच आहे एकंदरीत तात्पर्य काय कीं, स्वराज्यस्था-पनेचा विचार महाराजाच्या मनात उत्पन्न व्हावयाला दादाजी कोंडदेवाचें शिक्षण यत्किंचित्‌हि कारण झालें नाहीं, तर ह्या विचाराविरुद्धच त्यानें त्यास वेळो-वेळा बोध केला होता, आणि हा शिष्य लेचापेचा असता तर हा नेभळेपणाचा उपदेश ऐकून तो प्राप्त स्थितीमध्ये समाधान मानून स्वस्थ राहिला असता, परंतु महाराजाचे तेज विलक्षण असून अंगीकृत कार्याचें महत्त्व व तें साध्य कर-ण्यास लागणारी साधनसामुग्री याचें ज्ञान त्यांच्या ठायी पूर्णपणे वसत असल्या-कारणानें ते त्यापासून अणुमात्र पराङ्मुख झाले नाहींत. हा मातृबोधाचा प्रभाव किती विलक्षण आहे पाहा ! मातृमुखानें निघालेला प्रेमळ व मधुर असा एक शब्द दशसहस्र उपदेशकाच्या बोधप्रचुर व्याख्यानाहून अधिक आहे, अशी एक उक्ति आहे तिचे सत्यत्व महाराजांच्या चरित्रात चांगलें प्रत्ययास येतें.

वर दर्शविल्याप्रमाणें महाराज दादाजीच्या ह्या बोधाप्रमाणें वागले नाहींत, त्या-वरून कोणीं असें समजूं नये कीं, ते त्याच्याशीं सर्वच बाबतींत हूडपणानें वागत असत. ते दादाजीस वडिलासारखा मान देत असत त्याच्याशीं सर्वदा नम्रतेनें वागून तो जें कांहीं सांगे तें ते मनापासून करीत. आपल्या पित्याचा हा परम विश्वासू नोकर आहे, हें जाणून त्याच्यावर ते लोभ करीत. महाराजांच्या हूड-पणाच्या व धाडसाच्या कृत्यांस बोधानें आळा पडत नाहीं असें पाहून त्यांच्या अंगच्या लोकोत्तर चपलतेस व जोमास कांहीं तरी निराळ्या प्रकारचा व्यायाम मिळावा त्यासाठीं दादाजी त्यांला आपल्या बरोबर गांवोगांव हिंडवून जमीन-महसुलाची वगैरे व्यवस्था दाखवूं लागला. आपला बहुतेक कारभार त्यांच्या अंगावर टाकून त्यांचा बराच वेळ तिकडेच गुंतून राहील असें तो करूं लागला.

हें काम महाराज मोठ्या उत्साहानें व हुशारीनें करीत. पण अशा उपायानें ते कृतसंकल्पापासून यत्किंचितहि परावृत्त झाले नाहींत. उलट एवढें मात्र झालें कीं, जाहगिरींतील देशमुख, देशपांडे, दरकदार, कामदार वगैरे लोकाच्या ओळखी होऊन त्याच्याशी महाराजाचा प्रत्यक्ष सबंध आला, व स्वतंत्रपणें कारभार चालविण्याची धमक त्याच्या अगी अधिकच आली

ह्याप्रमाणें आपण योजिलेली युक्ति निष्फळ झाली असें पाहून तर दादाजीस विशेषच वाईट वाटलें पुढं कसें होईल याची चिंता त्यास फारच लागली त्यामुळे त्याची प्रकृति बिघडून जाऊन तो अत्यवस्थ झाला तो असा बिछान्यास खिळला तेव्हा जिजाबाईने व महाराजानी त्याची शुश्रूषा उत्तम प्रकारे केली महाराज नेहमी त्याच्या बिछान्यापाशी बसून राहत कोणी काहीं उपाय सांगत तेवढे सगळे त्यांनीं करून पाहिले. परतु काहींएक गुण न येऊन दादाजीचा अतसमय जवळ आला तेव्हा त्याने आपल्या ताब्यात असलेला सर्व खजिना वगैरे महाराजाच्या हवाली केला किल्ले, कोट, प्रात, पागा, लष्कर इत्यादिकाची व्यवस्था कोणत्या प्रकारें ठेवावी, पदरच्या लहानमोठ्या माणसाशी कसे वागावे, व त्यांच्याकडून कोणकोणती कामे कसकशी घ्यावी, इत्यादि गोष्टी त्याने त्यास नीट समजून सागितल्या मग कारकून, दरकदार, कामदार व इतर नोकर यास आपल्याजवळ बोलावून आणून शहाजीराजाची नोकरी इमानाने व दक्षतेने करावयास त्यानें सागितले, व महाराजाचे व त्याचे हातात हात देऊन त्यास असें सागितलें कीं, इतउत्तर तुह्मी ह्यास धनी समजून ह्याच्या हुकमात वागा ह्याचे कोणत्याही प्रकारें उणें पडूं देऊं नका ह्याप्रमाणे सर्व निरवानिरव करून मग स्वताच्या मुलामाणसाचे आपल्या पश्चात् चालविण्याविषयी महाराजास त्याने सांगितलें, व शेवटी अशी इच्छा प्रगट केली ह्मणतात कीं, 'तुह्मीं स्वराज्यस्थापना करून गोब्राह्मण व स्वधर्म यांचें रक्षण करण्याचा सत्संकल्प केला आहे त्यास ईशकृपेनें यश येऊन तुह्मी जगात लौकिक व धन्यता मिळवाल अशी मला पूर्ण उमेद आहे.' असें बोलून त्या अत्यंत प्रामाणिक पुरुषानें प्राण सोडिला. मरण-समयीं ह्यांचें वय सत्तर वर्षांचें होतें.

येथवर जे निरूपण केले आहे त्यावरून जिजाबाई व दादाजी कोंडदेव याज-पासून महाराजांस कोणत्या प्रकारचें शिक्षण प्राप्त झालें होतें हें वाचकांच्या लक्षांत येण्याजोगे आहे. आतां महाराजांस मिळलेल्या आणखी एका प्रकारच्या

शिक्षणाचा येथें उल्लेख करून हें प्रकरण आटपूं हें शिक्षण त्यास विजापुरास पितृसमागमे प्राप्त झालें. शहाजीराजांचें विजापूरदरबारात मनस्वी वजन असून बहुतेक मराठे व मुसलमान सरदाराशी त्याचें दळणवळण असे, त्यामुळे दरबारचे रीतरिवाज, अमीरउमरावाच्या चालीरिती, राज्यकारभाराची पद्धति, निरनिराळ्या सरकारी खात्याची व्यवस्था इत्यादि गोष्टींचे ज्ञान महाराजानी मोठ्या उत्साहाने व आस्थेने सपादन केले ह्या गोष्टींसंबंधानें जवळच्या लोकांस शेंकडो प्रश्न करून त्यास जी काहीं माहिती असेल ती मिळविण्याचा क्रम त्याचा नेहमी चालू असे विजापुरास असता त्यानी आपला काळ यत्किंचित्‌हि व्यर्थ दवडिला नाहीं केवळ चैनीखातर मोठ्या डौलाने इकडूनतिकडे मिरवण्यांत जसा इतर सरदाराच्या मुलाचा वेळ जात असे तसा याचा कधीहि गेला नाहीं. लष्कराची व्यवस्था, पागेचा बंदोबस्त, दारुगोळ्याची व बंदुकातोफाची तरतूद कोणत्या प्रकारें ठेवितात हें ते पुन पुन जाऊन पाहत असत, व मोठमोठ्या अनुभविक पुरुषास त्यासबंधाने नाना प्रश्न विचारून आपल्या दिलदप्तरात ही सर्व माहिती बेचूक नमूद करून ठेवीत असत आपला पुत्र असा चौकस व हुशार असून त्यास चागल्या गोष्टीचा नाद आहे हे पाहून शहाजीराजास फार समाधान वाटे, व महाराजाचे ह्या संबंधाचें कोड पुरविण्यास ते बिलकुल कसर करीत नसत. दरबारच्या मुत्सद्याशी काहीं मसलती चालल्या ह्मणजे राजे महाराजांस जवळ घेऊन बसत दरबारी जाणें झालें ह्मणजे ते त्यास बरोबर घेऊन जात. ह्याप्रमाणें त्यास पुष्कळ गोष्टी ऐकावयास व पाहावयास मिळाल्या, आणि त्याची धारणाशक्ति व आकलनशक्ति अप्रतिम असल्यामुळे त्याचा ह्या गोष्टींनी पुढे पुष्कळ फायदा झाला पितृसमागमानें त्यास हें अत्यंत उपयुक्त ज्ञान प्राप्त होऊन आणखी यवनद्वेषहि त्याच्या चित्तात पूर्णपणें विकसित झाला. याविषयींचें निरूपण मागील भागांत केलेंच आहे

येथपर्यंत महाराजांच्या शिक्षणाचा प्रकार सांगितला. तो बहुतेक व्यावहारिक व नैतिक शिक्षणाचाच केवळ होय. याशिवाय आणखी त्यांच्याकडून कांहीं ग्रंथांचें अध्ययन करविलें होतें किंवा कसें याविषयीं विश्वसनीय अशी माहिती बखरींतून आढळत नाहीं शिवदिग्विजयांत महाराजांच्या शिक्षणप्रकाराचें वर्णन केलें आहे तें अत्युक्तिरूप असून त्यास इतरत्र आधार नाहीं. वामन, तुकाराम, रामदास वगैरे साधूंनीं महाराजांच्या स्तुतिपर उद्गार प्रगट केले आहेत, त्यांवरून असें

अनुमान होतें कीं, त्याचे अध्ययन बरेंच झालें असावें परंतु महाराजांचें चरित्र लिहून ठेवणारास ह्या प्रकारचे शिक्षण विशेष महत्त्वाचें वाटलें नाहीं हें निर्विवाद आहे ग्रंथप्राप्त ज्ञानाहून व्यवहारज्ञानाचें तेज कधींकधीं प्रखर असतें हें महाराजाच्या उज्वल चरित्रावरून जगाच्या प्रत्ययास आले, आणि त्यांच्या शौर्याच्या ह्या तेजानें दिपून जाऊन इतर बाबतींसबंधानें इतिहासलेखक अमळ मुग्ध राहिले यात कांहीं नवल नाहीं.

# भाग पांचवा.



## स्वराज्यस्थापनेची सिद्धता.

### १६४३–४६.

महाराजांनीं विजापुराहून परत आल्यावर असा सत्संकल्प केला कीं, यवनांची महाक्लेशप्रद ताबेदारी झुगारून देऊन स्वतंत्र राज्यस्थापना करावयाची, स्वधर्मीयाची यवनाच्या सत्तेतून मुक्तता करावयाची, व स्वधर्मविडंबन करणाऱ्या यवनास स्वदेशातून हांकून द्यावयाचे. ह्या कृतसंकल्पास अनुसरून त्यानी आरंभीं कायकाय केलें त्याचे वर्णन उपलब्ध बखरींत ह्मणण्यासारखे नाहीं जे अल्प-स्वल्प कोठेंकोठें आढळते त्याचें साधेल तेवढ सुसगत निरूपण येथे करितों.

पुण्यास परत आल्यावर आपली सगळी जाहागीर प्रत्यक्ष जाऊन पाहण्याच्या मिषानें आसपासच्या पाहाडी मुलखात महाराज एकसारखे फिरूं लागले. जवळच्या माहीतगार लोकास बरोबर घेऊन व निरनिराळ्या गावी नवे स्नेही करून त्याच्या साहाय्यानें जवळपासच्या बहुतेक स्थलांचे व किल्ल्याचे निरीक्षण त्यानीं मोठ्या उत्साहानें केले प्रत्येक किल्ल्याच्या चोरवाटा व दऱ्याखोऱ्यातील बिकट रस्ते त्यांनीं एकूणएक स्वत हिंडून पाहिले त्याची ह्या माहितीची एवढी उत्कंठा पाहून बरोबरच्या लोकास मोठें कौतुक वाटे, आणि ऊन किंवा पाऊस बिकट चढाव किंवा हिंसक श्वापदें याची भीति किंवा परवा मुळींच न करिता अशा अल्पवयी राजबिंड्या पुरुषानें साधारण कष्टाळू रांगड्या माणसाप्रमाणें रानावनातून अविश्रातपणें भ्रमण करावें हें त्यांस अमळ चमत्कारिक वाटणें साहजिक होतें. परंतु पुढें जो हुतुतु आमरण घालावयाचा होता त्याला ही तयारी अत्यावश्यक होती हें त्या बापड्याच्या लक्ष्यात कोठून यावयाला ? त्याप्रमाणेंच ज्या प्रातात आपल्या चळवळीस आरंभ करावयाचा त्याची पाहणी यथास्थित करीत असता तीबरोबरच त्यांनीं दुसरीहि एक तयारी अव्याहतपणें चालविली होती. ती कोणती ह्मणाल तर मनुष्यांची अनुकूलता.

जो जो मनुष्य भेटे त्याशीं स्नेह करून त्यास आपलासा करून घेण्याच्या कलेंत महाराजांचा हातखंडा होता. कोणी कसाहि मनुष्य असला तरी त्याच्याशीं

त्यांनी थोडा वेळ भाषण केले कीं तो त्यास अगदीं भाळून जात असे. हीं अप्रतिम कला त्यास अगदीं अल्प वयात साध्य झाल्यामुळेच मुख्यत त्यास अंगीकृत कार्यात असें उज्ज्वल यश आले त्यानीं पदरच्या प्रत्येक मनुष्याशी मोठ्या प्रेमाने व रहसाळीने बोलावे आपण हलके व हे श्रेष्ठ असा भास त्याच्या मनास बिलकूल होऊं नये अशी सावधगिरी महाराज त्याच्याशी वागण्यात सर्वदा घेत असत त्यास काहीं सकट किवा अडचण असल्यास ती मोठ्या स्नेहभावानें ऐकून घेऊन त्यास आपल्याकडून होण्यासारखे असेल तेवढे साहाय्य करण्यास ते सर्वदा तयार असत पदरच्या माणसास पैशाअडक्याची प्रसगी मदत करण्यास ते मागेपुढे पाहत नसत

महाराजाच्या ह्या अशा औदार्यामुळे पैशाचा फार खर्च होऊ लागला तेव्हा दादाजीने एके दिवशी अशी तक्रार केली कीं, ‘आपण धनीच आहा आपण कोणास काहीं द्या ह्मटले तर आह्माला देणे प्राप्त परतु आपणास जी नेमणूक करून दिली आहे तिच्या बाहेर खर्च होऊन आपल्या वडिलाच्या खर्चास जाणारी रकम कमी झाली असता तिकडून आह्मास नाहक दोष येईल यासाठी आपणास जास्त खर्च करण्याची परवागी आणून द्यावी, ह्मणजे मग आमचे ह्मणणें नाहीं ’ यावर महाराजानी असें उत्तर केले कीं, ‘तुह्माला त्याची पंचाईत कशाला ? जो अधिक खर्च होईल त्याची मंजुरी आह्मी वडिला-कडून आणवू ’ हें ऐकून दादाजी कुंठित झाला. त्या बापड्याला महाराजाचे पुढील धोरण काय ठाऊक ? पदरच्या मनुष्याचे नि:सीम प्रेम सपादून त्याच्या हातून पुढे महत्कार्यसिद्धि करवावयाची हा विचार त्याला कोठून असणार ? आपल्या धन्याच्या उत्पन्नाची जोगवण कसोशीनें करून साधेल तेवढा मोठा ऐवज त्याच्याकडे वेळच्यावेळी प्रामाणिकपणानें पावता करणें एवढीच आपली इतिकर्तव्यता असें त्यास वाटे, यात काहीं वावगे नव्हतें.

महाराज पदरच्या माणसाला राजी ठेवून त्याशी ममतेनें वागूं लागले. त्यामुळें ज्याला त्याला वाटूं लागले कीं, हा धनी परम दयाळू व उदार आहे; हा आपलें हित पाहणारा आहे, याशीं इमानाने वागून याच्या आज्ञेंत सर्वदा राहिलों तर आपलें कल्याण होईल. असा महाराजांनी सर्वांस वेध लाविला. पदरच्या माणसांपैकीं मावळे लोकांवर महाराजांची मेहरबानी फारच असे. ते अडाणी व बावळटसे दिसत. पण ते मोठे प्रामाणिक व इमानी असून सांगितलेलें काम हुशारीनें व अनन्य भावानें करीत. कोणतेंहि अत्यंत विश्वासाचें काम त्यांच्यावर

सोंपविलें असलां त्यासंबंधानें त्यांच्याकडून दगा असा बिलकूल होत नसे. ते अगदीं गरीब स्थितींतले असल्यामुळें त्यास कोणी नोकरीस ठेवून अन्नवस्त्राची सोय केल्यास त्याचे ते मोठे उपकारी होत, व आपल्या अन्नदात्यासाठीं प्राणहि द्यावयास तयार होत प्रथमत दादाजी कोंडदेवानें त्यांच्या अगचे हे गुण पारखून त्यांस आपल्याकडे नोकरीस ठेविलें हे त्याचे गुण महाराजाच्या लक्षात यावयास विलंब लागला नाहीं त्यांनीं ह्या लोकास ममतेने व उदारपणे वागवून अगदीं आपलेसे करून सोडले ह्या लोकाचा महाराजास पुढें किती उपयोग झाला, हें इतिहासप्रसिद्ध आहे महाराजाच्या जाहगिरीच्या आसपासच्या पहाडी मुलखांतले ते रहिवासी असून स्वचरितार्थासाठी त्या अटव्य रानातच त्यांचें नेहमीं हिडणेंफिरणे असल्या कारणानें तिकडील सगळे रस्ते, चोरवाटा व पाऊलवाटा त्याच्या नेहमी पायाखालच्या असत वर सागितल्याप्रमाणें महाराज गावोगांव हिंडूं लागले तेव्हा ह्या मावळ्यास ते बरोबर घेऊन जात, आणि तेहि आपल्या तरुण व प्रेमळ धन्याच्या उपयोगी हरप्रकारें पडून त्यास खुष राखण्यास अगदी मनापासून झटत केलेल्या कामगिरीबद्दल थोडेसे इनाम दिले तरी तेवढ्यानेंच सतुष्ट होऊन ते आपल्या धन्याशीं अधिकाधिक इतबारानें वागण्याचा प्रयत्न करीत महाराजाचा स्वभाव उदार असून ते सर्वांशींच प्रेमभावानें वागत असल्यामुळे हे मावळे त्यांच्या अगदी भजनी लागले आजपर्यंत लोकानी आपणास तुच्छ व हेंद्रे मानिले असता हा दयाळू धनी आपणाशी प्रेमळपणाने वागतो व गोड बोलतो, हें पाहून ते महाराजावर अतिशयित प्रीति करूं लागले त्याच्या मनांत महाराजाविषयीं अत्यंत अभिमान व भक्ति हीं उत्पन्न झाली, आणि जेथें ह्या धन्याचे चरण तेथे आपलें शिर, त्याच्या इष्ट कार्यसिद्धीसाठी समयी प्राणहि देणें प्राप्त झालें तरी चिंता नाहीं, असा त्यांच्या मनाचा निर्धार झाला; आणि हा त्याचा निर्धार कसाहि बिकट प्रसग आला तरी कधीं यत्किंचितहि ढळला नाहीं ह्या मावळ्यांचे पुढारी कांहीं देशमुख होते, त्यांशीं महाराजांनीं पहिल्यापासून स्नेह संपादून त्याला आपल्या इष्ट कार्यास अनुकूल करून घेतलें. त्यांपैकीं तीन नांवें इतिहासांत प्रसिद्ध आहेत. तीं हीं एसाजी कंक, तानाजी[1] मालुसरे व बाजी पासलकर[2]. हे तिघेहि पिढीजाद वतनदार असून मावळांतले

१ हा खुद्द मावळांतला देशमुख नव्हता मावळाखालच्या कोंकणपट्टीतला हा देशमुख होता.

२ हा मुसेखोऱ्याचा देशमुख. मावळात त्याचें मनस्वी वजन होतें. देश-

लोक त्यांस आपले पुढारी समजत. हे तिन्ही पुरुष महाराजांच्या प्रत्येक कार-स्थानांत पहिल्यापासून होतें, व पुढें मोठमोठ्या कामगिऱ्या त्यांनी अतिशयित इमानानें व मर्दुमकीने कशा पार पाडल्या व स्वामिकार्यी आपल्या प्राणांच्याहि आहुति द्यावयास ते कसे प्रवृत्त झाले हे यथास्थलीं सागूं.

महाराजानी केलेला सकल्प दादाजीला पसत वाटला नाहीं, हे मागे सागितलेंच आहे तो आपल्या उद्देशास उत्तेजन देत नाहीं हे पाहून त्यानी त्याच्या हाताखालच्या इतर कारकूनमडळीकडे आपला बेत बोलून दाखविला व त्यास आपल्या मसलतीस अनुकूल करून घेतले गावोगावचे देशमुख कामानिमित्त पुण्यास आले ह्मणजे त्यास एकीकडे बोलावून त्याजकडे त्यानी आपली मसलत बोलावी, त्याचा तीसबधाने काय अभिप्राय आहे ते समजून घ्यावे, व त्याच्याशी अशा युक्तीनें व मोहक रीतीनें भाषण करावे कीं, ते त्याच्या मसलतीस काया-वाचामनेंकरून सामील होत ते गावोगाव हिडत असता प्रत्येक देशमुखाची गाठ घेऊन त्याच्याशी सलोख्याचे भाषण करून व इतबार दाखवून त्याला आपलासा करून घेत त्याप्रमाणेच जे मराठे सरदार भेटत त्याच्याशीहि मोठ्या इतल्याने वागून त्यास वश करून घेण्याचा महाराज प्रयत्न करीत त्याचे वय लहान होते तरी त्याचे उत्साहजनक व मर्दुमकीचे भाषण ऐकून व योजलेल्या मसलतीची साध्यता कितपत आहे हे नीट लक्षात येऊन हे देशमुख व मराठे सरदार त्यास तत्काळ वश होत, व त्याच्या मसलतीत शिरण्यास उद्युक्त होत शिवाय त्याचा आदरशीलपणा, त्याचा वीर्योत्साह, यवनाविषयी त्याच्या ठायीं वागत असणारा पराकाष्ठेचा द्वेष, स्वधर्मरक्षणाविषयींचा त्याचा पूर्ण निर्धार व स्वराज्यस्थापनेने होणाऱ्या अनंत फायद्याचें मनोवेधक रीतीनें प्रतिपादन करण्याची त्याची उत्कृष्ट शैली हीं पाहून कोणी कसाहि कुरेंबाज, आपढंगी किंवा आपल्यापुरते पाहणारा असला तरी तो महाराजाला अगदीं भाळून जात असे दुसरें असें कीं, महाराजांच्या वीर्यशाली वडिलांनी केलेले पराक्रम व सपादिलेला लौकिक हे त्या

---

मुखांचे बखेडे मिटविण्याच्या व त्यास वश करून घेण्याच्या कामी दादाजी कोंडदेवास या पासलकराचे पुष्कळ साहाय्य झाले. दादाजीच्या काही निकालावर याची साक्ष आहे. कान्होजी जेधे देशमुख याचा हा जांवई होता. सकटात सापडलेल्या देशमुखास याचें नेहमीं चांगलें साहाय्य होत असे. शिवाजी महाराजास अनुकूळ होऊन त्यांच्या स्वराज्यसिद्धीच्या उपक्रमास तो साहाय्य करण्यास प्रवृत्त झाला तेव्हां तो चांगला पोक्त वयाचा होता.

प्रांतात सर्वत्र मशहूर होते, आणि अशा प्रतापी पुरुषाचा पुत्र आपल्या पित्या-प्रमाणेंच जवानमर्द निपजून मर्दुमकी करून आपणास यवनाच्या मगरमिठीतून खास सोडवील असा उत्साहजनक विचार त्याच्या मनात उत्पन्न होऊन, महाराज अल्पवयी होते तरी त्यास सामील होण्यास ते तयार झाले, आणि जे कोणी ह्या त्याच्या महत्कार्यास सहाय झाले नाहींत त्यास त्यानी कोणत्या प्रकारे शासन केलें ह्याचा पुढे निर्देश होईल

ह्याप्रमाणें महाराज आपल्या जहागिरीतील व आसपासच्या गावातील देश-मुखांस व सरदारास वश करून घेण्याच्या उद्योगास लागले आता ह्या अगीकृत दुर्घट कार्यात त्याला यश येण्याचा सभव किती वाटला असावा, किंवा हे कार्य पुढलामागला पोच न पाहता केवळ हूडपणानें व धाडसाने त्यानी आरभिले कीं काय याचा निर्णय येथे अवश्य झाला पाहिजे

महाराजाच्या ह्या उद्देशास पहिली अत्यंत प्रोत्साहक गोष्ट ह्मटली ह्मणजे त्याच्या महापराक्रमी तीर्थरूपाचा येथवरचा चरित्रक्रम होय निजामशाहींत नोकरीस असता त्यानी जे पराक्रम केले, ती शाही बुडविण्यास मोगल प्रवृत्त झाले असतां त्याच्याशी जे युद्धप्रसग त्यानी केले, व पुढे निजामशाही मोगलानी पार बुडवून टाकिली असता तिची स्थापना पुनरपि करण्यासाठी जो प्रचड उद्योग त्यानी केला त्याचा कित्ता महाराजापुढे ढळढळीत होता. मोगलासारख्या जबरदस्त शत्रूशी झुंजण्यास देखील शहाजीराजे कचरले नाहीत, व पुढे त्या शत्रूने त्यास पराजित केलें ते त्याचे सैन्यबळ प्रचंड पडल्यामुळेच केवळ होय, त्याप्रमाणेच पुढे विजापूरसरकाराच्या पदरी नोकरी धरिल्यावर त्याच्या साहाय्याने त्या सरकारास कर्नाटकातील मोहिमात यश येऊन त्याची तिकडे दृढ सत्ता स्थापित झाली, ह्या गोष्टी महाराजास चागल्या विदित होत्या. ह्यावरून त्यांची अशी खात्री झाली कीं, आपण आपल्या लोकाचा चागला जमाव करून त्यास योग्य प्रकारें तयार केलें तर त्याच्या मदतीने यवनाची सत्ता महाराष्ट्रातून हळूहळू निर्मूळ करिता येईल. ह्याप्रमाणे प्रतापशाली वडिलानी घालून दिलेला अत्यंत उत्साहजनक कित्ता वळवून त्यास साजे असे काही तरी कर्तृत्व करण्याचा हुरूप शिवाजीमहाराजांसारख्या सत्पुत्राच्या हृदयांत उत्पन्न झाला यात कांहीं नवल नाहीं. सत्कृत्यांत ‘ बापसे बेटा सवाई ’ असें ह्मणवून घेण्याचा सुयोग व सद्बुद्धि फारच थोड्या सुपुत्रांस प्राप्त होते. निजामशाहीची पुन स्थापना करून सर्व राज्यसूत्रें आपल्या हातांत वागविण्याची वडिलांची उत्कट आकांक्षा शत्रु अति-

प्रबळ असल्यामुळे तृप्त झाली नाहीं, व शेवटीं निरुपायास्तव यवनांचीच पुनरपि ताबेदारी त्यांस पतकरावी लागली, हें चागलें झालें नाहीं, असें महाराजांस नेहमीं वाटत असे, व हें ते वारवार बोलूनहि दाखवीत विजापुरास असता तेथे जी स्थिति महाराजाच्या अवलोकनात आली होती तीवरून तर त्यांच्या मनांत यवनाच्या नाबेदारीचा पुरा वीट उत्पन्न झाला होता, हे मागें सागितलेंच आहे. आपला पडता काळ असल्यामुळें आपल्या वडिलांसारख्या पुरुषसिहास ही हीन स्थिति पतकरून राहावें लागलें आहे, यास्तव ह्या अनिष्ट स्थितींतून साधेल त्या उपायानें सुटण्याचा उद्योग करावयाचा असा स्तुत्य निश्चय महाराजानी अल्प वयातच केला. ह्यावरून त्याच्या ठायी तेजस्विता, स्वाभिमान व स्वातंत्र्यप्रीति ह्या वृत्ति लहान वयातच किती विकास पावल्या होत्या हे व्यक्त होते

आणखी असें कीं, पुणें, सुपे, मावळ वगैरे प्राताताले कित्येक देखमुख यवनी अमलास त्रासून त्या राज्यक्रातीच्या समयी पुंडावा करू लागले होते, व त्याचे आपआपसातहि सदा कलह चालू असत तेव्हा अशा नाराज देशमुखास एकीचे महत्त्व किती आहे ते समजून सागून स्वतंत्रता प्राप्त करून घेण्याचा योग्य उपाय सुचविला तर तो त्यास किती रुचण्याजोगा होता हें सागावयास नकोच. हें काम महाराजानीं मोठ्या युक्तिप्रयुक्तीने करून त्याच्या आपआपसातल्या कुरबुरी मिटवून टाकल्या व आपल्या इष्ट कार्यास त्यास अनुकूळ करून घेतलें.

महाराजाच्या इष्ट उद्देशाच्या सिद्धीस अनुकूळ अशी आणखी एक गोष्ट ही होती कीं, पुणे, सुपे, मावळ वगैरे निजामशाही प्रांत विजापूरसरकाराच्या ताब्यांत नुकतेच आले असून त्या प्राताची व्यवस्था त्या सरकारानें अद्यापि चागलीशी लाविली नव्हती, व आसपासच्या किल्ल्यावर फौजफांटा वगैरे ठेवावा तसा ठेविला नव्हता, शिवाय त्या सरकाराच्या दरबारांतील मुत्सद्दीमंडळींत बखेडे माजल्यामुळें तर हा बदोबस्त पुष्कळच ढिला होता त्यांत आणखी शहाजी-राजांला इकडील प्रातात जाहगीर दिली असल्यामुळें ह्या प्रांताचा बंदोबस्त आपोआप राहील असें विजापूरसरकारास वाटणें साहजिक होतें. मालोजीराजे व शहाजीराजे यांच्या ताब्यात इकडील प्रांत पुष्कळ वर्षे असून दादाजी कोंड-देवासारखा उत्तम कारभारी त्या वेळीं त्यांस लाभल्यामुळें त्या प्रांतांची व्यवस्था अशी चांगली राहिली होती कीं, तेथील प्रजाजन आबाद होऊन हिंदूंच्या राज्यांत आपण सुखी होऊं असें त्यांस वाटूं लागलें होतें; व शहाजीराजांसारख्या फौज बाळगून असणाऱ्या महापराक्रमी पुरुषाच्या तेजस्वी पुत्राच्या मनांत स्वराज्य-

स्थापनेची स्फूर्ति उत्पन्न होऊन तत्सिद्ध्यर्थ उपाययोजनेंतहि तो परम कुशल आहे अशी त्याची खात्री होऊन त्यास तनमनधनेंकरून साहाय्य करण्यास ते उद्युक्त झाले यांत नवल तें कोणतें ? मनुष्यांची ही अनुकूलता पाहून महाराजांस अधिकाधिक हुरूप येणें साहजिक होतें

आता हा स्वराज्यस्थापनेचा सदुद्देश सिद्ध झाला असता राज्य चालविण्यास लागणारी योग्यता व बुद्धिमत्ता महाराजाच्या अगीं किती होती हें पुढे सर्व जगाच्या प्रत्ययास आलेंच आहे. हे राजकीय शिक्षण महाराजास घरचेंच होतें. त्याच्या घरी नेहमीं ह्याच गोष्टी जिजाबाई, दादाजी कोंडदेव व इतर कारभारी बोलत त्याच्या जाहगिरीची व्यवस्था ठेवण्याच्या कामी जो व्यवहार नित्य चालत असे तो महाराजाच्या सदोदित डोळ्यासमोर होत असे. जमीनमहसूल, शिबंदी, न्यायमनसोबा इत्यादि गोष्टींत महाराज लहानपणापासूनच मन घालूं लागले होते हे मागे सागितलेंच आहे त्या मिळालेल्या अल्पस्वल्प अनुभवात आणखी विजापुरी प्राप्त झालेल्या अनुभवाची भर पडली होती हा दुसरा अनुभव त्यास थोडाच वेळ मिळाला हे खरें परतु तेवढा महाराजासारख्या तैलबुद्धीच्या, तेजस्वी व उत्साही पुरुषास पुरण्याजोगा होता. विजापूरसरकाराची त्या वेळीं पूर्ण भरभराट असून हरएक राजकीय प्रकरण त्या काळच्या मानानें पूर्णावस्थेस आल्यासारखे होते. अशा दरबारात शहाजीराजाचे मोठे वजन असल्यामुळे दरबारांतील प्रत्येक घडामोड महाराजास समजण्यास मुळीच अडचण पडली नाहीं हें मागे सांगितलेंच आहे

हें स्वराज्यसाधनसाहित्य महाराजासारख्या अलौकिक पुरुषास आरंभी अनुकूळ झालें तेवढें बस झाले, आणि जिजाबाई मातुश्रीनें त्यांच्या सुपीक मनोभूमींत लावलेलें स्वराज्यसाधनप्रीतीचें सद्बीज उत्तम प्रकारें अंकुरित होऊन त्या माऊलीच्याच हातीं त्याचें यथास्थित सेचन वारंवार झालें, व त्यास अनुकूल परिस्थितीचें व उत्साह, आवेश, स्वोत्कर्षप्रीति, यवनद्वेष, पित्याचें प्रोत्साहक चरित्र इत्यादि गोष्टींचें उत्कृष्ट खत मिळून त्या अंकुराचा सुंदर वृक्ष बनला; आणि त्याचा शाखाविस्तार समग्र जगास चकित करून टाकणारा असा झाला. त्या स्वराज्यरूप विशाल वृक्षाच्या मधुरतम फळांचा आस्वाद कांहीं काळ महाराष्ट्रीयांस घडून ते सुखी, संपन्न व कीर्तिमान् झाले.

# भाग सहावा.



## स्वराज्यस्थापनेला आरंभ.

### १६४६–४७.

मागल्या भागात सांगितल्याप्रमाणे महाराज पुण्यास आपल्या जाहगिरीत येऊन राहिल्यावर एकाद्या संपन्न सरदाराच्या मुलाप्रमाणे ऐषआरामींत मग्न होऊन न राहता माहीतगार लोकास बरोबर घेऊन आपल्या जाहगिरींतील व आसपासच्या प्रांतातील एकूणएक महत्त्वाच्या जागा व किल्ले त्यांनी बारकाईने पाहिले, यवनाचा बंदोबस्त प्रत्येक किल्ल्यावर कितपत आहे त्याची माहिती मिळविली, सगळ्या चोरवाटा व हमरस्ते पाहिले, बहुतेक देशमुखाशी ओळखी व मसलती केल्या कोणते लोक आपल्या उपयोगी पडतील व कोणते आपणास हरकत करितील ते पाहून ठेविले, त्याप्रमाणेच कोणत्या रीतीनें आपल्या इष्ट कार्यास आरंभ करावा, व तो केव्हापासून केला असता विशेष यशस्वी होईल याचा नीट विचार केला, जवळच्या लोकांबरोबर या संबंधाने वारंवार खलबते केलीं, आणि मग आपला कार्यक्रम ठरविला

आता हा स्वराज्यस्थापनेचा आरंभ महाराजांनी आपण होऊन केला नसून शहाजीराजाच्या सांगण्यावरून दादाजी कोंडदेव व त्याच्या बरोबर असलेले दुसरे कारकून यांनी महाराज केवळ अकराबारा वर्षांचे असतांच तो केला, असें एका इतिहासशोधकाचें[1] ह्मणणें आहे, आणि ह्या आपल्या विधानास तो सभासदाच्या पुढील वचनाचा आधार घेतो. ' बेंगरूळाहून पुण्यास येतांच बारा मावळे काबीज केलीं मावळे देशमुख बांधून दस्त करून पुंड होते त्यास मारिलें ' परंतु ह्या एका वचनावरून स्वराज्यस्थापनेचा गुरुमंत्र शहाजीमहाराजांनीच आरंभी दिला असून हें कार्य दादाजी कोंडदेवाच्या सल्ल्यानें साधारयाचें त्यांच्या मनात होतें असें ह्मणणें सर्वथा युक्त नव्हे. सभासदाच्या ह्या वाक्याचा संदर्भ वास्तविक पाहतां असा आहे कीं, शहाजीराजांनीं कर्नाटकाच्या

---

१ रा. राजवाडेकृत खंड ४ पृष्ठ ७३.

मोहिमेंत उत्तम कामगिरी बजाविल्याबद्दल बारा मावळे, बारामती व इंदापूर हीं त्यास सरंजामासाठी दिली होती हे नवीन मिळालेले प्रांत आपल्या ताब्यांत घेण्याविषयी दादाजी कोंडदेवास राजांनी सांगितल्यावरून त्यानें स. १६३८ त बेंगरुळाहून परत आल्यावर, सभासद म्हणतो त्याप्रमाणे, मावळे काबीज करून मावळे देशमुखांस अंकित केले शहाजीराजांचा ह्या वेळी नुकता कोठे विजापूरकरांच्या दरबारी प्रवेश होऊन त्यास स्थायिकपणा येऊ लागला होता अशा समयी पुन लागलींच बंड करण्याचा अविचार आरंभिल्याचा निराधार आरोप त्याच्यावर करणें केवळ हास्यास्पद होय शहाजीराजास मावळांत राज्य स्थापण्याचा प्रयत्न दादाजी कोंडदेवाच्या मसलतीनें करण्याची इच्छा का झाली याचें कारण सदरील इतिहासशोधक असे देतो कीं,‘कर्नाटकात अफजलखान,मालोजी घोरपडे वगैरे विजापूरचे सरदार द्वेषानें शहाजीचे पाऊल स्थिर करूं देत ना ’ हें कारण तर स. १६३८ त मुळींच संभवत नाहीं अफजलखान वगैरे सरदार राजाचा द्वेष पुढे आठ दहा वर्षांनी करूं लागले सदरील साली कर्नाटकाच्या इतिहासांत ह्या प्रतिस्पर्ध्यांच्या नावाचाहि उल्लेख नाहीं ह्या अप्रयोजक अनुमानास ‘मूले कुठार ’ या न्यायानें असा अपवाद आहे कीं, दादाजीनें जर शहाजीराजास मावळांत स्वराज्यस्थापनेची सल्ला दिली होती तर पुढे सातआठ वर्षांनी महाराजांनी त्या कामास सुरुवात केली तेव्हा त्यानें एवढें अकांडतांडव का केलें बरें ? व शिवाजीमहाराज त्याचा नेमळा बुद्धिवाद बिलकूल ऐकतनात तेव्हा झुरणीस लागून किंवा कित्येकांच्या मतें विषप्राशन करून त्यानें स्वप्राणनाश का केला ? शहाजीराजाच्या मनात स्वराज्यस्थापनेचा विचार ह्या वेळी आला होता हें खरे मानिलें तर ते काम दादाजी कोंडदेवापाशीं त्या वेळीं असलेल्या हजारबाराशे लोकांच्या साहाय्यानें सिद्ध होण्यासारखे आहे असें मानण्याइतकी मूढ बुद्धि त्याची होती काय ? बेंगरुळाहून परत येताना दहावीस हजार लोक दादाजी कोंडदेवाबरोबर दिल्याचा पुरावा प्रकृत अनुमान करणाऱ्यास एकाद्या कोणत्या जुन्या चिटोऱ्यात सापडला आहे काय ? पण एवढे भगीरथ काम

---

१ रा. राजवाडे यांनी शिवकालीन कागदपत्रे पुष्कळ जमा करून त्यांचे पांच भाग प्रसिद्ध केले आहेत. हे बहुतेक कागद निवाड्याचे मेहजर आहेत. मावळातील देशमुख परस्परांशी कलह करीत. ते एकमेकांशी मारहाण करून अनेक प्रकारी खराबीस येत. ते यवनी अमलाची फारशी परवा करीत नसत. अशा लोकांना आहारीं आणून आपल्या धन्याची जहागीर सुरक्षित व सुव्यवस्थित राखण्याचें अतिबिकट काम दादाजी

एकाद्या दुसऱ्या शेंदाडशिपायास सांगण्यापेक्षां शहाजीराजे स्वतः आपल्या सैन्यानिशीं कां नाहीं एकदम चढाई करून आले? कोणीकडूनहि पाहतां त्याचें हें अनुमान अत्यंत दुष्ट असून महाराजास यामुळें नसतें लघुत्व येणारें आहे. त्यावरून कोणीं असें मात्र समजूं नये कीं, शहाजीराजाच्या मनात स्वतंत्र राज्य स्थापण्याचा विचार कधीच आला नाहीं या प्रकरणीं मागे थोडासा उल्लेख झालाच आहे[१] वाद मिळून इतकाच आहे कीं, शिवाजीमहाराजानी स्वत स्वराज्यस्थापनेस आरंभ करण्यापूर्वी सातआठ वर्षे शहाजीराजाच्या सांगण्यावरून महाराष्ट्रात स्वतंत्र राज्य स्थापण्याचा उद्योग सुरू झाला होता कीं काय? तो सुरू झाला होता हे खरे ह्मणावे तर तो नंतर लागलीच बंद का पडला? व दादाजी कोंडदेवाची मति पुढे का पालटली? आता हे मात्र खरें आहे कीं, दादाजी

कोंडदेवासारख्या कर्तबगार व इमानी पुरुषाच्या हातून सिद्धीस गेले ह्या देशमुखाच्या एकमेकातल्या कलागतीचे निवाडे दादाजी कोंडदेवानें कसे केले याचा मासला सदरील कागदपत्रात पुष्कळ पाहावयास मिळतो ह्या कागदपत्रावरून आणखी शिवाजीमहाराजानी ह्या देशमुखास वश करून घेण्याच्या कामी कसकशी खटपट केली याचाहि थोडासा उल्लेख सापडतो. रा राजवाड्यानी जमविलेले काही कागद आपल्या पंधराव्या खंडात दिले आहेत, त्यातील तीन कागदावर **प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता। शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते** ह्या वचनाची मुद्रा छापिली आहे. या तिन्ही कागदातला मजकूर पाहिला तर तो चाकण कसब्यातला कृष्णभट बिन मुरारिभट ब्रह्मे नावाच्या एका इसमाला काही जमीन इनाम दिल्याचा आहे यातल्या पहिल्या कागदाचा शक १५६१ (आश्विन शु० ८) असा आहे यावरून हें इनामपत्र स. १६३९ तलें असावे असे दिसते. ह्या सनात शिवाजीमहाराजाचे वय बारातेरा वर्षांचें होतें. तेव्हा अर्थात् हें इनामपत्र दादाजी कोंडदेवाने करून दिलें असून ब्राह्मणास दिलेली जमीन शहाजीराजाच्या जहागिरीतली असल्यामुळें त्याच्या अल्पवयी पुत्राच्या नावाची वर दर्शविलेल्या वचनाची मुद्रा त्या पत्रावर त्यानें केली असावी ह्या एवढ्या आधारावर रा सरदेसाई आपल्या 'रियासतीत' (पृ. १६९) असा तर्क करितात की, दादाजीनें शहाजीराजांच्या सांगण्यावरून शिवाजीमहाराजाच्या नावाने स्वराज्यस्थापनेस हा असा आरंभ कर्नाटकातून आल्यावर केला होता! असला बादरायणसंबंध जोडून देण्यात काहीच अर्थ नाहीं त्या काळचे देशमुख, वतनदार व इतर जमीनदार सरदार आपल्या नावाच्या अशा मुद्रा आपल्या कागदपत्रावर करीत असत. सदरील वचनाची मुद्रा शिवाजीमहाराजानीं आपल्या पुढील व्यवहारांत कायम केली हें खरें, पण एवढ्यावरून वादविषयक तर्कास काही बळकटी येते असें ह्मणवत नाही.

१ पृ. ४३–४४ पाहा.

कोंडदेवानें शहाजीराजांच्या जहागिरीची सुव्यवस्था लावून तीस लहानशा टुमदार स्वराज्याचें स्वरूप आणून देण्याचें काम उत्तम प्रकारें केलें, आणि त्याचा हा सगळा कारभार आमच्या अल्पवयी, कुशाग्रबुद्धि चरित्रनायकाच्या डोळ्यासमोर झाला असल्याकारणानें हें त्यास चागलेच शिक्षण मिळाले एवढ्यापुरता स्वराज्यस्थापनेस आरभ झाला असें ह्मणण्यास फारशी हरकत नाहीं तथापि ही जहागीर अदिलशहाच्या कृपेने मिळाली असून तीवर त्याचा पुरा शह व ताबा होता. तो झुगारून देण्याचे धाडस प्रथम शिवाजीमहाराजानीच केले तें दादाजीनें किंवा शहाजीराजानी केलें नाही

आता येथे कोणी असें ह्मणेल कीं, शहाजीराजाच्या मनात महाराष्ट्रात स्वतंत्र राज्य स्थापण्याचा विचार नव्हता तर महाराजासबंधाची कागाळी दादाजी कोडदेवाने त्याच्याकडे केली असता, व विजापूर सरकाराकडून त्यास यासंबंधाने जरब मिळाली असता, त्याचा बंदोबस्त करण्याचे किवा त्यास आपल्या जाहगिरींतून हाकून देण्याचे राजानी मनात का आणिलें नाहीं ? ह्या प्रश्नाचे उत्तर सोपे आहे महाराजानी विजापूरसरकाराच्या अमलातील मुलखांत धामधूम आरंभिली त्या सुमारास कर्नाटकात शहाजीराजाचे बस्तान नीट बसून त्याच्या हाती बराच प्रात जहागिरीच्या वगैरे रूपाने आला होता, व ते तिकडे प्रबळ होऊन त्याचें प्रस्थ बरेंच वाढले होते शिवाय पुढे विजापूरदरबारात दुफळी माजून त्या राज्यात जिकडेतिकडे अव्यवस्था झाली होती. अशा संधीस राजे स्वत कर्नाटकात स्वतंत्र राज्य स्थापण्याच्या प्रयत्नात होते हे मागे सागितलेंच आहे. तेव्हा अशा समयी स्वपुत्रानें बेताबाताने आरंभिलेली चळवळ यशस्वी होण्याचा सभव आहे असें त्यास वाटून, त्या कागाळ्यांसबंधाने कानावर हात ठेवून ते नावानिराळे राहिले. स्वराज्यस्थापनेचा विचार त्याच्या हृदयात पूर्णपणें वागत होता, व त्यास यवनाची सेवा मनापासून आवडत नव्हती हें निर्विवाद आहे. परंतु सदरील इतिहासशोधक ह्मणतो त्या वर्षीच त्यानीं ह्या कार्यास आरंभ केला हें ह्मणणें मुळींच बरोबर नाहीं. कर्नाटकात शहाजीराजांनीं पुढे थोडीशी चळवळ केली हे खरें परतु शिवाजीमहाराजांप्रमाणें त्यांनीं विजापूरसरकाराशीं उघडउघड विरोध केला असें कधींहि घडलें नाहीं. ते शेवटपर्यंत विजापूरसरकारांचे अकितच राहिले.[1]

---

१ जेधे याच्या शकावलींत शहाजीराजास शिवाजीमहाराजांच्या आगळिकीस्तव विजापूरसरकारच्या हुकमावरून कैद करून कनकगिरि येथें स. १६४८ त अटकेंत

असो, तर ह्याप्रमाणें महाराष्ट्रांत स्वराज्यस्थापनेची कल्पना व आरंभ याचें सर्व श्रेय केवळ जिजाबाईमातुश्रीस व महाराजास दिलें पाहिजे. आतां ह्या आरंभ महाराजानी कोणत्या प्रकारें केला याचें सविस्तर निरूपण कोणत्याहि बखरीत केलेले नाहीं. जी त्रोटक माहिती अव्यवस्थितपणे दिली आहे ती साधेल तेवढी जुळवून देण्याचा प्रयत्न येथे केला आहे.

महाराजानी एकंदर देशस्थितीचें अवलोकन करून व मुसलमान, मोगल व आपले हिंदु लोक याच्या स्थितीचा पूर्ण विचार करून असें मनांत आणिलें कीं, मोगल व मुसलमान याच्या ताब्यात सह्याद्रिबाधारा आहे हें खरें, परंतु त्यावर त्याचा अमल व्हावा तितका दृढ झालेला नाहीं, व तो आपल्या ताब्यांत कायमचा राहिल्याने आपला मोठासा फायदा आहे असे त्यास वाटत नसल्यामुळें तिकडील कोटकिल्ल्यांचा वगैरे बंदोबस्त त्यानी चागलासा ठेविला नाहीं, तेव्हां हाच प्रात पहिल्यानें आपल्या कबजांत घ्यावा येथील किल्ले आपल्या ताब्यांत असल्यास सभोंवतालील मुलूख सहज जेरदस्तींत येईल यवनांनीं कितीहि खटपट केली तरी ह्या प्रातातील हिंदु प्रजा अनुकूळ झाल्यावांचून तो त्यांच्या हातीं कायमचा असा कधीहि राहणें नाहीं यास्तव यवनांस सहसा साध्य न होणारा असा हा मुलूख आपल्या ताबीन झाल्यानें येथील बिकट

---

ठविल्याचे नमूद करून पुढे त्यास व त्याच्याबरोबर कानोजीनाइक जेधे यास स. १६४९ त मोटिल्याचे लिहिले आहे त्यासमयीं शहाजीराजानी कानोजीनायकास असें मागितलें की, 'आह्मास कर्नाटकात बेंगरूळ प्रांताची पांच लक्ष होनाची जहागीर मिळाली आहे. आह्मास तिकडे जाणे भाग आहे. तुमचे वतन मावळात आहे आमचे चिरंजीव राजश्री शिवबा पुणें येथें आहेत. त्याच्याजवळ तुह्मी आपल्या लोकानिशीं राहावे. तुमचे त्या प्रातात प्राबल्य आहे. तरी मावळचे अवघे देशमुख त्यास रुजू होऊन त्याच्या आज्ञेत वर्तनील असे करा मोगलाकडील किंवा अदिलशहाकडील फौज आली तरी इमान राखून तिशी लढाई करा.' हा असा करार त्या नायकाकडून बेलरोटीवर हात ठेववून शपथपूर्वक करविला आणि त्यास पत्र देऊन शिवाजी-महाराजांकडे पाठविलें. ह्या मजकुरावरून रा. बा. ग. टिळक असे अनुमान करितात की, "दादाजी कोंडदेव व शिवाजीमहाराज यानी पुणें प्रांतात रचू घातलेल्या व्यूहास व धोरणास शहाजीची पूर्ण अनुमति होती. कदाचित् शहाजीमहाराजाचीच ही मसलत असावी." हें अनुमान १६३८-३९ तल्या परिस्थितीशी कसे जुळत नाहीं हे वर सांगितलें आहेच. १६४९ नंतर शिवाजीमहाराजांच्या (दादाजी कोंडदेवाच्या नव्हे) व्यूहास शहाजीराजाची पूर्ण अनुमति होती असें ह्मणण्यास मात्र हरकत नाही.

किल्ल्यांच्या आश्रयानें यवनांशीं थोड्याशा लोकांच्या साहाय्यानें झुंजतां येईल, व प्रसंग पडेल त्या वेळीं ह्या किल्ल्यांत छपून बसून स्वरक्षण करितां येईल; त्याप्रमाणेंच आपल्या जाहगिरींतील व आसपासच्या प्रांतांतील देशमुखांवर जरब ठेवून त्यांस आपले कायमचे अंकित करण्यास हे डोंगरी किल्ले फारच उपयोगीं पडतील, असा विचार करून पहिल्यानें कांहीं किल्ले हस्तगत करण्याच्या उद्योगास महाराज लागले त्या वेळीं आसपासच्या बहुतेक किल्ल्यावर विजापूर सरकाराने रखवालदार ठेविले होते. त्याच्याशीं युद्ध करून त्या सरकाराशीं उघड विरोध प्रगट करण्याचे सामर्थ्य महाराजास त्या काळीं मुळींच नव्हतें. यास्तव दुसऱ्याच काहीं तरी युक्तीनें किल्ले हस्तगत करण्याचा बेत त्यानी केला. पुण्याच्या नैऋत्येस सुमारे वीस मैलावर तोरणा नावाचा किल्ला आहे. त्या किल्ल्यावरील अमलदाराशी बोलणे लावण्याकरिता महाराजानी एसाजी कंक, तानाजी मालुसरे व बाजी पासलकर त्यास पाठविलें त्या किल्लेदारास त्यानीं असें सांगितलें कीं, हा किल्ला तूर्त आमच्या स्वाधीन करा. तो आह्मी पातशहापासून आपल्याकडे करून घेणार आहो ह्याप्रमाणें त्याच्याशी सामोपचारानें बोलून व त्यास काहीं लांच वगैरे देऊं करून हा किल्ला स १६४६ त महाराजानी आपल्या ताब्यात घेतला

ही विजापूरसरकारची केलेली पहिलीच आगळीक आपणास पचावी ह्मणून महाराजानी विजापूर दरबारात लागलींच वकील पाठवून असें कळविले कीं, 'हा किल्ला आह्मी घेतला तो सरकाराच्या फायद्यासाठींच केवळ होय त्या एकीकडच्या मुलखांत आमच्यासारखा विश्वासू नोकर असल्यानें पादशाहाचें पुष्कळ प्रकारें हित होण्याजोगे आहे इकडील मुलखातील जमीनमहसूल देशमुख जमवीत असल्यामुळें त्याची आकारणी व्हावी तशी बरोबर झालेली नाहीं;

१ खाफीखान ह्मणतो की, शिवाजी महाराजानी प्रथम चंदनवंदन हा किल्ला काबीज केला. रा. राजवाडे ह्मणतात की,'तोरणा व राजगड हे किल्ले ताब्यात घेण्याचें कारण असे होतें की, दक्षिणेस रोहीड खोऱ्यात बांदल देशमुख राहत होते, ते महाराजांस अनुकूळ नव्हते त्याना कबज्यात आणण्यासाठी हे दोन किल्ले त्यांनीं हस्तगत केले. ह्यायोगें स १६४६ त महाराष्ट्र राज्याची मुहूर्तमेढ भक्कम रोंवली गेली.' हें त्यांचें शेवटलें विधान स्वराज्यस्थापनेचा आरंभ दादाजी कोंडदेवानें शहाजी महाराजांच्या सांगणीवरून केला असें जें त्याचें स्वतांचें व रियासतकाराचें ह्मणणें आहे त्यास विरुद्ध आहे. हा किल्ला घेतल्याचा प्रकार कित्येक बखरींत असा सांगितला आहे कीं, पावसाच्या दिवसांत किल्लेदार आपले लोक घेऊन किल्ल्याखालीं येऊन खोऱ्यांत राहत

व देशमुख खरी आकारणी काय आहे ते कळूं देत नाहींत. अशानें त्यांचा फायदा होऊन सरकारान्चें नाहक नुकसान होते. तेव्हा आमच्या ताब्यांत मुलूख आल्यानें त्याची धारेबंदी यथास्थित होईल ' ह्या ह्मणण्याचे प्रत्यंतर यावें ह्मणून विजापूरसरकारास गेल्या दहा वर्षात जो वसूल मिळाला होता त्याहून पुष्कळ अधिक देण्याचें महाराजानी कबूल केलें त्याच्या ह्या अर्जाचा जबाब मिळण्यास बरेच दिवस लागले. महाराजाला तरी हेच हवे होते त्याच्या वकिलानें दरबारच्या लोकास अवदानें चारून अर्जाचा निकाल अनुकूळ करून घेतला इकडे महाराजानी मावळे लोक जमवून तोरणा किल्ल्याची दागदुजी केली, व तो चागला मजबूत करून त्यास प्रचंडगड असें नाव दिलें ह्या किल्ल्यात खणीत असतां महाराजास पुष्कळ द्रव्य सापडले हा धनलाभ आपणास भवानीच्या प्रसादानें झाला असून आपल्या सत्कृत्यास तिची पूर्ण अनुकूलता आहे असा प्रवाद भाविक लोकात त्यानी पसरविला. यामुळे तर त्याची महाराजावर अधिकच निष्ठा बसून ते त्यास विशेष उत्साहाने साहाय्य करूं लागले ह्या प्राप्त झालेल्या द्रव्याचा विनियोग दारूगोळ्याचा व इतर युद्धोपयोगी सामुग्रीचा मुबलक सग्रह करण्याकडे व एक नवीन किल्ला बाधण्याकडे केला.

तोरणा किल्ल्याच्या आग्नेयीस तीन मैलावर मुरबाद[1] नावाचा डोंगर चागला आहे असें पाहून तेथे वस्ती करून किल्ला बाधण्याचे काम महाराजानीं मोठ्या झपाट्याने सुरू केलें. त्या डोंगरास तीन सोंडा किंवा माच्या होत्या, त्यांसहि तटबंदी केली मुख्य किल्ल्यास राजगड असे नाव देऊन तेथे एक मोठी इमारत उभारिली[2], व तीन माच्यास सुवेळा, सजीविनी व पद्मावती अशीं नांवे

असे ही सधि साधून महाराज हजारबाराशे लोक घेऊन किल्ल्यावर गेले, आणि तो त्यानी हस्तगत केला. किल्लेदाराने विजापूरसरकाराकडे त्या सबधाची कागाळी केली तेव्हा महाराजानी उलट अशी कागाळी केली की, किल्लेदार आपलें ठाणें सोडून गेल्यामुळें आह्माला त्याच्या रक्षणार्थ लोक ठेवावे लागले.

१ यास कोणी मुद्रोदेव व कोणी दुरजादेवीचा डोंगर ह्मणतात शेडगावकराच्या बखरींत याचें मुसल्देव असें नाव दिलें आहे

२ शिवदिग्विजयात ह्मटलें आहे की, हा किल्ला मूळचाच असून तो महाराजांनी राजकारण करून घेतला, व त्याला तीन सोंडा होत्या त्या मात्र नव्या बाधिल्या. महाराजांनीं हा असा उपक्रम केल्याची वार्ता अदिलशहाच्या अधिकाऱ्यांस कळली तेव्हां त्यानी रोहिडखोऱ्याचा देशपांडे दादाजी नरस प्रभु ( गुप्ते ) यास असें जरबेचें पत्र लिहिलें कीं, रोहिडेश्वराच्या डोंगराच्या आश्रयानें शिवाजीमहाराजांनीं मावळे वगैरे

दिली. ह्याप्रमाणें हे चार नवेच किल्ले तयार केले शिरवळानजीक खेडबेर नांवाचा गाव होता तेथे रान फार होते ह्या ठिकाणी फर्मोशी आंब्याचीं झाडे लावून त्यानजीक पेठ वसविली, व तिचे नाव शिवापूर असें ठेविलें येथे मावळे व कोंकणे लोक जमवून महाराज राजकारणें करूं लागले.

ह्या किल्ल्याचे बाधकाम चालले असता त्या सबंधाची कागाळी अदिलशहाच्या कानावर गेली तेव्हा हे काम बद करण्याविषयी त्याने महाराजास हुकूम

---

लोक जमवून पुटावा माडला आहे, किल्ल्यावरील ठाणे उठवून तो काबाज केला आहे व त्यास राजगड असे नाव दिले आहे, त्यास तू सामील आहेस, उत्पन्न वगैरे पोंचते करात नाहीस, तरी हा प्रकार तू सोडला नाहीस तर तुला विजापुरास नेऊन तुझी गरदन मारण्यात येईल ही गोष्ट ह्या देशपाड्याने शिवाजीमहाराजास कळविली तेव्हा त्यानीं त्यास लागलीच पत्र लिहिले, त्यातील आशय असा होता की, " विजापुराहून तुह्मास हुकूम आला तो समजला शहाशीं बेमानगिरी तुह्मी व आह्मी, करीत नाही तुमचे कुलदेव रोहिडेश्वर यानीं आह्मास हे यश दिले आहे पुढ तो 'हिदवी'स्वराज्य करून सर्व मनोरथ पुरविणार आहे राजश्री दादाजीपताच्या विद्यमाने तुमच्या वडिलाचे, तुमचे व आमचे श्रीपाशी इमान झाले ते कायम आहे, त्यात अतर पडणार नाही तुह्मी आमच्याकडे निघून यावे " सदराल आशयाची पत्रे रा राजवाड्याच्या पधराव्या खडात लेखाक २६७ व २६८ यात प्रसिद्ध झाली आहेत. ही स. १६४५ तली आहेत तेव्हा अर्थात् ज्याला राजगड हे नाव दिले तो मुळचाच असन तोरणा किल्ला हस्तगत करण्यापूर्वी त्याच्या माच्या बाधण्याचे काम चालू झाले असावे. आता शिवाजीमहाराजानी पाठविलेल्या पत्रात दादाजी कोंडदेवाच्या विद्यमाने आणभाक झाल्याचा उल्लेख आहे त्यावरून रियासतकार ह्मणतात की, ह्या उद्योगात दादाजीच आरभी सूत्रचालक व प्रोत्साहक होता. पण ह्या गोष्टीने त्याच्या ह्या ह्मणण्यास मुळीच बळकटी येत नाही मावळातील काही देशमुख व देशपाडे शहाजीराजाच्या जाहगिरीत असून कोणासच जुमानीत नसत त्यास वश करून घेण्याचा हा एक उपाय दादाजीने योजला होता, असे दिसते शहाजीराजाची जहागीर विजापूरकराच्या अमलात असून तिच्या सीमा काही स्पष्ट ठरल्या नव्हत्या तेव्हा अर्थात् आपल्या धन्याच्या काबूत जेवढा प्रात येईल तेवढा घेण्याचा हा दादाजीचा उपक्रम होय त्यात त्याचे याहून विशेष धोरण नव्हते, असते तर सदरील पत्रव्यवहार सतराअठरा वर्षांच्या मुलाने आपण होऊन करण्याऐवजी तो दादाजीसारख्या वयोवृद्ध व अनुभववृद्ध कारकुनाकडूनच झाला असता. पण शिवाजीमहाराजानी दादाजींचा बुद्धिवाद न जुमानता आपल्याच जबाबदारीवर हा उपक्रम केला असल्या कारणानें सदरील पत्रव्यवहार दादाजीच्या विद्यमानें झाला नाही हे उघड होते. ही गोष्ट आपल्या अनुमानास सर्वस्वी प्रतिकूळ आहे हें रियासतकाराच्या लक्ष्यात कसें आलें नाहीं नकळे.

पाठविला, व कर्नाटकात शहाजीराजे होते त्यांस खलिता पाठवून याबद्दलचा जाब विचारिला. तेव्हां त्यानी असा जबाब लिहून पाठविला कीं, "ह्या प्रकरणीं शिवाजीनें मला कांहींएक विचारलें नाहीं, व मीहि त्यास कांहीं सांगितलें नाहीं. परंतु मी स्वत. व माझे सारें कुटुंब पातशहाचें इमानी नोकर आहो यास्तव शिवाजी काहीं करीत असल्यास ते आमच्या जहागिरीच्या सुधारणेसाठी किंवा सुरक्षितपणासाठी करीत असावा आमच्या जहागिरीच्या लगत्यास आमचा असा चांगलासा किल्ला नाहीं ह्मणून हा किल्ला आमचा मुलगा बांधीत असावा. याबद्दल सरकारने मनात विकल्प आणूं नये. सरकाराविरुद्ध तो कांहींएक करीत नसावा " हा असा जबाब पातशहास पाठवून त्यानी दादाजीस व महाराजास या प्रकरणी एक पत्र पाठविले त्यात ह्या गोष्टीबद्दल महाराजाचा निषेध करून असें का केलें ह्मणून विचारलें, व पुढे तसे न करण्याविषयी त्यास लिहून सांगितलें दादाजीनें ह्यापूर्वीच राजाला एक पत्र पाठवून सविस्तर वर्तमान कळविलें होतें, व ह्या संबधाने शिवाजीमहाराजासहि पुष्कळ प्रकारी बोध केला होता पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं, हे मागे सांगितलेंच आहे.

ह्यानंतर लवकरच दादाजी कोंडदेव मरण पावला व जाहगिरीची सगळी व्यवस्था महाराज स्वत आपल्या वडिलाच्या नांवे पाहू लागले ह्या सुमारास जहागिरीच्या वसुलाची मागील बाकी मागण्याकरिता शहाजीराजाकडून लोक आले. त्यांस महाराजानी असा निरोप देऊन रवाना केलें कीं, 'दादाजीपंत वारले येथला खर्च वाढला असून इकडील भिकार जमिनीचे उत्पन्न जाहगिरीच्या खर्चास पुरत नाहींसें झालें आहे. कर्नाटकात आपल्या ताब्यात मोठा मुलूख असून तो सुपीक आहे यास्तव आपण तिकडील उत्पन्नावरच इत.पर निर्वाह करावा हें बरें ' ह्या जबाबाने शहाजीराजास मुळीच राग आला नाहीं असें दिसतें उलट आपला मुलगा कर्तृत्ववान् निपजून अचाट कृत्यें करून स्वोत्कर्ष साधण्यास उद्युक्त झाला आहे हे पाहून त्यास मोठे समाधान वाटलें. यानंतर त्यानी आपल्या जाहगिरीची एकंदर व्यवस्था पाहण्याचा कुलअखत्यार महाराजास मोठ्या आनंदानें दिला; आणि 'तुमची हुशारी व कर्तबगारी ऐकून मी फार खुष झालो आहें, ' असा निरोप त्यानी त्यास पाठविला ह्या वेळीं विजापूरदरबारांत दुफळी माजली असून फारच घोटाळा झाला होता. यास्तव शहाजीराजांनीं असा विचार केला कीं, कर्नाटकांत आपणास मिळालेल्या जाहगिरीचें रक्षण करून स्वस्थ राहावे हें बरें. शिवाय शिवाजीमहाराजांनीं चाल-

चिलेल्या धामधुमीमुळें आपल्यावर कांहीं किटाळ येण्याचा संभव आहे. तेव्हां आपण चार पावलें दूर राहावे ह्मणजे त्याचा आपला कांहीं संबंध नाहीं असें सागता येईल ह्याप्रमाणें इतउत्तर शहाजीराजे कर्नाटकात कायमचे जाऊन राहिले.

शहाजीराजाच्या जाहगिरीपैकी सुपेप्रांताची व्यवस्था बाजी मोहिते याजकडे होती हा बाजी शहाजीराजाचा मेहुणा ह्मणजे तुकाबाईचा बंधु होता त्याच्या ताब्यात सुप्याचें ठाणे आणि तीनशे घोड्याची पागा होती दादाजी मरण पावल्यावर महाराजानी त्यास पत्र लिहिले कीं, ‘ तुह्मीं आपल्याकडील वसुलाचा हिशोब व एकंदर पागा घेऊन पुण्यास यावे ’ हे त्याने मानिले नाहीं. ह्या पत्राचें उत्तर काहींएक न देता पत्र घेऊन जाणारापाशीं त्याने असे उद्गार काढिले कीं, ‘,शहाजीराजे समक्ष असता हे मालक कोठून झाले ? याला असा हुकूम पाठविण्याचा अधिकार काय ? हे अदिलशहाच्या राज्यात पुंडावा करून किल्ले हस्तगत करीत आहेत याबद्दल ह्याला शासन व्हावयाचें पण ते वडिलाच्या जोरावर खपून जात आहे यामुळें हे शेफारले आहेत आपली फंदफितुरी हे अशीच पुढे चालवितील तर ह्याच्या वडिलाची शोभा न राहून याचाहि प्राण धोक्यात पडेल याचे याला काहीं वाटतच नाहीं.आपणास तोलण्यासारख्या गोष्टी कराव्या; असल्या फंदात यानी पडूं नये ” मामा काय बोलला ते जासुदानी महाराजांस सविस्तर कळविले ते ऐकून त्यास फार राग आला, व शिमग्याच्या दिवसांत पोस्त मागण्याच्या बहाण्याने काही मावळे बरोबर घेऊन ते ह्या मामाच्या भेटीस गेले त्यानी त्यास अचानक पकडून कैद[1] केले आणि त्याच्या ताब्यांतला प्रात व पागा ही हस्तगत केली. ह्याशिवाय त्याच्या खजिन्यात पुष्कळ द्रव्य, जवाहीर, उंची वस्त्रे वगैरे मोलवान् वस्तु सापडल्या हा मोहिते आपल्या वडिलाचा मेहुणा आहे हे लक्षात आणून महाराजानी त्याचा मोठा आदर केला व त्यास आपल्यापाशी राहून आपण आरभिलेल्या कार्यास साहाय्य करावयास सागितले, परतु तो काही केल्या कबूल होईना तेव्हा त्यास व त्याच्या पक्षाच्या लोकास मोठ्या इतमामानें कर्नाटकात शहाजीराजे बेगरूळ येथें होते तिकडे पाठवून दिलें

---

१ कित्येक बखरीत असे आहे की, महाराज काही मावळे घेऊन मोहित्याला नकळत त्याच्या ताब्यातील प्रातात शिरले, व मध्यरात्रीस सुप्याच्या ठाण्यावर छापा घालून त्यानी ते सर केले व मोहित्यास व त्याच्या पक्षाच्या लोकास बदिवान् केलें. महाराजानी तीनशे निवडक लोकानिशी त्याच्या किल्ल्यावर जाऊन तो निजला असता त्याला गाठून कैद केले असे एकदोन बखरीत आहे.

"ह्या एका कृत्यानें पंदरच्या सर्व माणसांवर व इतर लोकांवरहि महाराजांची चांगली जरब बसली तो वडिलाचा खुद्द मेहुणा असतां त्याची सुद्धा यानी मर्यादा ठेविली नाही, तेव्हा यांच्याशी फारच संभाळून वागले पाहिजे, यांची आज्ञा मोडली किंवा याच्या विरुद्ध काहीं खटपट केली तर पाहिजे त्यास शासन करा-वयास हे मागेपुढे पाहणार नाहीत, असे विचार त्याच्या मनात येऊन ते महाराजांस फार वचकूं लागले

पुण्याच्या पूर्वेस चाकणचा किल्ला आहे. हा किल्ला पुण्यास जाण्यायेण्याच्या मार्गात असल्यामुळे तो आपल्या ताब्यात असल्यास फारच सोईचे होईल असे महाराजास वाटले ह्या किल्ल्याची हकीगत अशी होती कीं, निजामशाही सरकाराकडून हा पहिल्याने शहाजीराजास मिळाला होता पुढे त्यांस जाधव-रावाच्या पाठलागामुळे विजापुराकडे पळून जावे लागलें तेव्हां त्या धामधुमींत मार्तंडदेव व होनापा देशपांडे नावाच्या पुंडांनी तो बळकाविला होता नंतर मुरार जगदेवाच्या दिवाणानें ह्या पुंडास कैद करून हा किल्ला ताब्यात घेतला व मुराररावाने तो राजाच्या स्वाधीन केला दादाजी कोंडदेवाने राजाच्या जाह-गिरीची व्यवस्था लावताना ह्या किल्ल्यावर फिरंगोजी नरसाला यास हवालदार नेमिले होते दादाजी मरण पावल्यावर हा फिरंगोजी ह्या किल्ल्यात स्वतंत्र होऊन बसला होता त्याच्याशी युद्ध न करिता तो सामोपचाराने वश होतो कीं कसे तें पाहण्यासाठी महाराजानी त्याच्याकडे आपला वकील पाठवून किल्ला ताबीन करून देण्याविषयीं बोलणे लाविलें. हें त्या किल्लेदारास मान्य होऊन त्यानें किल्ला स्वाधीन करून दिला, व महाराजाच्या भेटीस येऊन त्याची ताबेदारी पतकरून नोकरी करण्यास तो कबूल झाला. हें त्याचे गरिबीचें वर्तन पाहून महाराज खुष झाले, व त्या किल्ल्यावर त्यालाच पुन हवालदार नेमून आस-पासच्या खेड्याचा वसूल जमा करण्याचे काम त्यानी त्याला सांगितलें ह्या किल्ल्यावर बिलालपाग्या ह्मणून एक जुना कामदार होता. त्याला महाराजापाशी राहणें प्रशस्त न वाटल्यावरून त्यास शहाजीराजाकडे जाऊं दिलें. बाकीचे पूर्वींचे जुने कामगार होते ते महाराजाच्या नोकरीस राहण्यास तयार झाल्यावरून त्यांस त्यांच्या कामावर कायम केलें. चाकण किल्ला पुरा ताब्यात आल्यावर बारामती व इंदापूर येथले ठाणेदार महाराजांस वश होऊन त्यांचा अंमल मानूं लागले.

फिरंगोजी नरसाल्यानें महाराजांच्या आज्ञेवरून पुढें शिवनेरी किल्ला हस्तगत केला. ह्या किल्ल्याचीहि देखरेख महाराजानीं त्यालाच सांगितली, व ह्या दोन्ही किल्ल्यांच्या आसपास असलेल्या गांवात दादाजी कोंडदेवानें चालू केलेली जमा-बंदीची पद्धत अमलात आणण्याची कामगिरी त्याजकडे सोपविली

ह्यानंतर महाराजांचें लक्ष पुण्याजवळील कोंडाणा नांवाच्या किल्ल्यावर गेलें. पुण्यांत सुरक्षितपणें नादावयाचे तर हा मजबूत किल्ला आपल्या हातीं अवश्य आला पाहिजे असे त्यास वाटले हा किल्ला स्वाधीन झाल्याने महाराजाच्या सगळ्या पुणेप्राताच्या जाहगिरीस बळकटी येणार होती. परंतु हा हस्तगत होतो कसा याची त्यास मोठी पंचाईत पडली. विजापूरसरकाराने ह्या किल्ल्यावर एक मुसलमान हवालदार नेमिला होता त्याच्याशी उघडपणें युद्ध करून किल्ला सर करण्याचें सामर्थ्य महाराजास त्या वेळी आलें नव्हतें, व यदाकदाचित् त्याच्याशी युद्ध करण्यास महाराज प्रवृत्त झाले असते तर विजापूरसरकाराशीं उघड वैर केल्यासारखे होऊन आपला नाश होण्यास विलंब लागणार नाहीं हें त्यास पक्कं ठाऊक होतें यास्तव त्यानी त्या किल्लेदारास लाच देऊन वश करून घेण्याचा बेत केला, आणि हा त्याचा बेत सहज सिद्धीस गेला कोंडाणाकिल्ला हातीं आल्यावर त्याची नीट व्यवस्था करून त्यास सिंहगड असें नाव दिले.

ह्या सुमारास पुरंदरनामक किल्ल्यावर नीलकंठ हैबतराव नामेंकरून एक हुशार ब्राह्मण होता त्याच्या ताब्यात हा किल्ला व आसपासचा प्रांत होता. हा त्यास निजामशाही सरकाराकडून इनाम मिळाला होता पुढे निजामशाही मुलुख मोगलाच्या ताब्यात गेल्यावर हा नीलकंठराव स्वतंत्र होऊन बसला होता. शहाजीराजे व दादाजी कोंडदेव ह्याच्याशी हा मित्रभावानें वागत असे. दादाजी मरण पावला त्या सुमारास हा नीलकंठराव मरण पावला त्याला तीन पुत्र होते. त्यापैकीं वडील मुलगा निळोपंत[१] हा सगळा कारभार आटपून आपल्या धाकट्या भावांस मोजीनासा झाला. ह्या भावाची नावें पिलाजी व संकाजी अशीं होतीं. त्याचें ह्मणणें अर्थात् असें होतें कीं, किल्ल्याची मालकी तिघां भावाच्या हातीं सारखी असावी हा असा त्या तिघा भावांत कलह जुंपून राहिला होता. शिवाजी महाराज पराक्रमी निपजून आपल्या जाहगिरीची वृद्धि करण्याच्या प्रयत्नात आहेत हें पाहून निळोपंत त्याच्याशीं स्नेहभावानें वागत असे.

१ मि. किंकेड व रा. ब. पारसनासी याचें नांव पिलो असें देतात.

आता हा किल्ला आपल्या कबजांत येतो कसा हा विचार महाराजास उत्पन्न झाला. किल्ल्याच्या मालकांशी उघडउघड वैर करावे तर ते पडले पिढीजाद मित्र, तेव्हा हे करणे लोकोपचारास अमळ विरुद्ध तर खरेंच परंतु बारामती, इंदापुर व सुपे ह्या आपल्या तिन्ही परगण्यांचे संरक्षण व बंदोबस्त यथास्थितपणे व्हावयास ह्या किल्ल्याचे साहाय्य अवश्य हवे असे महाराजास कळून चुकलें होतें. वर सांगितल्याप्रमाणे त्या भावामध्यें कलह लागला आहे असें पाहून महाराज सुपेंप्रातात जाण्याच्या मिषाने[1] राजगडावरून कांहीं निवडक मावळे बरोबर घेऊन निघाले ते जवळ आले असे कळल्यावरून धाकट्या भावानी आपल्या भांडणाचा निवाडा करण्यासाठी महाराजांस पुरंदरास बोलाविले त्यावरून महाराज त्या किल्ल्याच्या पायथ्याशी नारायणाच्या देवाल्यात तळ देऊन राहिले किल्ल्यावर एकदम चढून गेल्यास निळोपंतास संशय येईल असें त्यास वाटलें इकडे त्या धाकट्या भावासहि उघडपणे शिवाजीमहाराजास जाऊन मिळण्याचे धैर्य होईना अशा बुचकळ्यात उभय पक्ष पडले असता किल्ल्यावरील लोकानी असा विचार केला कीं, हे तिघे बंधु परस्पराशी भांडत असल्यामुळे परिणामी किल्ला कोणाच्या हातीं लागेल याचा नेम नाहीं. त्यापेक्षा तो शिवाजीमहाजाच्या हातीं गेला तर फार बरे होईल. कारण आसपासच्या मुलखावर त्याची सत्ता असून ते आणखी मुलूख व किल्ले काबीज करण्याच्या उद्योगात आहेत तेव्हा आपण त्याच्या सारख्या पराक्रमी व थोर पुरुषाच्या पदरी पडावें हे बरे असें मनात आणून त्यानी महाराजास किल्ल्यावर आणण्याची एक युक्ति योजिली ती अशी त्यानी त्या तिघा भावास असें सांगितलें कीं, शिवाजीमहाराजाचा व तुमचा स्नेहभाव आहेच ते आज किल्ल्याखालीं मुक्काम करून आहेत त्यास जाऊन भेटा, व त्याचा आदरमान करून त्यास किल्ल्यावर घेऊन या. त्यांत आणखी हे दिपवाळीचे दिवस आहेत तेव्हा त्यांस स्नानास आमंत्रण करावें ते वरती आल्यावर आपल्या गृहकलहाचे कारण त्यांस सांगावें व ते सांगतील तसें वागावें ही त्याची सूचना त्या

---

१फलटणच्या निंबाळकरांवर हल्ला करण्याच्या मिषानें जाऊन ते त्या किल्ल्यापासून सहा मैलावर सासवड येथें मुक्काम करून राहिले होते असे शिवदिग्विजयांत आहे.

२ रायरीची बखर लिहिणारा ह्मणतो की, महाराजानी आपणास एक पावसाळा तुमच्या किल्ल्याच्या आश्रयानें राहूं द्यावें असें बोलणें निळोपंतापाशीं केलें; तें त्यास मान्य झाल्यावरून जिजाबाईस बरोबर घेऊन त्यानीं पुरंदरकिल्ल्याखालीं मुक्काम केला.

तिघांहि बंधूंस मान्य होऊन ते गडाखालीं महाराजाच्या भेटीस गेले, व त्यांस त्यांनीं वरती स्नानास येण्याविषयीं आदरपूर्वक आमंत्रण केलें तेव्हा महाराज ह्मणाले 'मजबरोबर चार मातबर लोक आहेत त्यास येथे सोडून मीच एकटा वर कसा येऊं?' त्यावर ते ह्मणाले कीं, सर्वास घेऊन वर यावे. मग महाराजानी आपल्या बरोबरच्या काही लोकासह वर जाऊन तीन दिवस त्याचा पाहूणचार घेतला. तेवढ्या अवकाशात त्या भावाचें भाडण ऐकून घेऊन व त्याची समजूत घालून कलह मिटविण्याचा प्रयत्न महाराजानी केला पण त्यांचा एकोपा कांहीं केल्या होईना धाकट्या भावानी महाराजापाशी अशी विनंति केली की, आमचा वडील बधु आह्मास काहीं देत नाही, यास्तव आपण आह्माला आपल्या पदरी घ्यावें. तिसरे दिवशी रात्री महाराज तिघा भावाशी बोलत बसले असता निळोपंत झोप येऊं लागली ह्मणून उठून निजावयास गेला. ही संधि पाहून महाराजानी धाकट्या भावास असा उपाय सुचविला की, तुमचा बंधु सामोपचाराने ऐकत नाही तरी त्यास ताळ्यावर आणण्याचा एक उपाय मला दिसतो. तो असा कीं, तो आता निजला आहे तेथे त्यास कैद करावें ही युक्ति त्यांस लागलीच कबूल झाली आणि त्यांनी त्यास कैद करून शिवाजीमहाराजांकडे आणिलें. मग महाराजानीं किल्ल्याखालील आपल्या मावळे लोकांस वर बोलावून व किल्ल्यावरील जे लोक अनुकूळ होते त्यास सामील करून घेऊन त्याच्या साहाय्यानें त्या तिघा भावास किल्ल्याखालीं आणून किल्ला हस्तगत केला.[१] मग त्यांचे इनाम गांव त्यांस यथाविभाग वाटून देऊन त्यांस किल्ल्याच्या खालच्या माचीवर राहण्याची परवानगी दिली[२] पुढे महाराजानी त्यास आपल्या पदरीं

१ मि. किंकेड ह्मणतात की, गडावर गेल्यावर दुसरे दिवशी महाराजानी त्या तिघा बधूस ह्मटलें की, आपण सासवडाजवळच्या नदीत स्नानास जाऊ या ते त्यास पसत वाटून ते तिकडे प्रात काळी स्नानास गेले, आणि तेथून परत येतात तो किल्ला महाराजाच्या लोकानी हस्तगत करून त्यावर आपलें निशाण लावले आहे असे त्यास दिसलें.

२ कित्येक बखरीत असा उल्लेख आहे की, वडील बंधूकडे पूर्वींचे वशंपरपरेचे वतन चालविलें, आणि दुसऱ्या दोघा बधूस दुसरीकडे इनामी वतने करून दिली. मि. किंकेड ह्मणतात की, यातल्या वडील बधूचें नाव पिलो नीलकठ असें असून त्याला महाराजानीं त्या किल्ल्याखाली व पुरंदर गांवाच्या आसपास मोठी जमीन इनाम करून दिली; मधला शकररावजी नीलकंठ याला त्यानी आपला तोफखाना व पिलखाना यांवर नेमिलें, आणि धाकट्यालाहि आपल्या पदरी ठेवून घेतलें.

नोकऱ्या देऊन वाढविलें. त्याप्रमाणें त्यानीं पुरंदर किल्ला रक्तपात होऊं न देतां बिनबोभाट काबीज करून आपल्या सुपें, इंदापूर वगैरे परगण्यास बळकटी आणिली.

त्यानंतर महाराजांच्या आज्ञेवरून माणकोजी दहातोंडे याने विसापूरचा किल्ला हस्तगत केला तेथे शहाजीराजाच्या हाताखालचा एक सरदार शिद्दी बिलाल हबशी म्हणून होता त्याच्याकडे त्या किल्ल्याचा हवाला द्यावा असा महाराजांचा मनोदय होता परंतु त्यासंबंधानें त्यास विचारिता त्याचें असें म्हणणें पडलें कीं, ' महाराज पुंडावा करीत आहेत, त्याचे आचरण केवळ बेकैद आहे; हा त्याचा स्वप्राणनाशाचा उद्योग आहे अशाच्या पदरी मी राहूं इच्छीत नाहीं.' हें त्याचें उत्तर ऐकून महाराजास मुळीच राग आला नाहीं, कारण तो शहाजी-राजाच्या पदरचा जुना नोकर होता त्याची यत्किंचित्‌हि बेअदबी होऊं न देतां उलट चांगली बिदागी करून त्यास महाराजानी शहाजीराजाकडे रवाना केलें. त्यानंतर तिकोना, लोहगड व राजमाची हे पुणेपरगण्याच्या वायव्येकडील किल्ले त्यानी हस्तगत केले

त्याप्रमाणें शिवाजीमहाराजानी आपल्या जाहगिरीच्या आसपासचे मुख्य-मुख्य किल्ले आरंभीं स्वाधीन करून घेऊन तिला चांगली बळकटी आणिली. हा वेळपावेतों त्यानी विजापूरसरकाराशी प्रत्यक्ष विरोध असा फारसा प्रकट केला नव्हता त्या सरकाराचे तोरणा, कोंडाणा वगैरे दोनतीन किल्ले घेतले ते यत्किं-चित् रक्तपात होऊ न देता त्यानी हाताखालीं घातले असून त्यासबंधाने त्यास असें निमित्त होतें कीं, ते आपल्या जाहगिरीच्या आसपास असल्यामुळे त्यांची व्यवस्था आपल्या हातून नीट ठेविली जाऊन आपल्या जाहगिरीसहि त्यापासून सुरक्षितपणा येईल, व आसपासचे देशमुख पुंडावा करितात त्यांजवर चांगली जरब ठेविता येऊन, सरकारी सारा देण्यासबंधानें देशमुख टंगळमंगळ करितात त्यांच्याकडून तो जेव्हांचा तेव्हा वसूल करता येईल. आतां चाकण, पुरंदर वगैरे इतर किल्ले घेतले ते पुंडानीं बळकाविले असून ते विजापूरसरकारला मुळींच मोजीत नसत तेव्हा अशा पाळेगारांला अंकित करण्यांत आपण विजापूरसर-कारचें हितच करीत आहों असें त्याला भासवितां आलें असो; तर ह्या मुलूक वाढणाऱ्या चळवळीचें विजापूरदरबारास त्या वेळीं फारसें कांहीं वाटलें नाहीं, हें ठीकच होतें. कारण त्याची समजूत अशी होणें साहजिक होतें कीं, शहाजीराजे आपल्याशीं इमानानें वागून आपली नोकरी मोठ्या हुशारीनें करीत

आहेत, तेव्हां त्यांचा हा अल्पवयी मुलगा आपल्या सत्तेविरुद्ध कांहीं खटपट करीत नसावा. तो जें कांहीं करीत आहे तें आपल्या हितार्थेच असावें. दुसरें असें कीं, अदिलशहा स्वत मोठमोठ्या इमारती बांधण्यात गर्क झाला असून कर्नाटकात स्वसत्तावृद्धि करण्याकडेच त्याचें लक्ष विशेषत· लागलें होते; आणि शहाजीराजासारख्या शूर व हुशार सरदाराच्या साहाय्यानें त्यानें ही सत्ता त्या मुलखांत पुष्कळ बसविली असल्यामुळें त्याच्यावर अदिलशहाची अतिशयित मेहरबानी होती तेव्हा त्याच्या ह्या अल्पवयी मुलाची महाराष्ट्रांतील चळवळ बंद करून त्याच्या ताब्यातली जाहगीर खालसा करण्याचा विचार मनात आणिल्यास त्यास दुखविल्यासारखे होईल असेंहि पातशहास वाटले असावें.

परंतु महाराजाचा उद्देश व धोरण केवढे होतें हें कांहीं येथे सांगण्याचें प्रयोजन नाहीं स्वसत्तावृद्धि करून स्वराज्यस्थापना करण्याचा जो बिकट व दीर्घ उद्योग पुढे आमरण करावयाचा होता त्याचा हा खंबीर पाया ते रचीत होते. मजबूत किल्ल्याचा आश्रय मिळाल्याने आपल्या ताब्यातील मुलखाचें चांगलें रक्षण करिता येते, व शत्रूच्या मुलखात अकस्मात् चालून जाऊन त्याचा मोड करून पुन किल्ल्यात सुरक्षितपणे ठाणें धरून राहता येते, हे त्यांच्या लक्षांत येऊन हे पहाडी किल्ले बळकावण्याच्या उद्योगास त्यानीं पहिल्यानें आरंभ केला.

-त्याप्रमाणे महाराजानी ह्या वेळी चाकण किल्ल्यापासून नीरानदीपर्यंतचा सगळा प्रात स्वसत्तेत आणिला काबीज केलेल्या प्रत्येक किल्ल्याची दागदुजी वगैरे करून त्यावर मावळे लोक रखवालीस ठेविले, व त्याचा साधेल तेवढा उत्तम बदोबस्त राखिला त्यामुळें आसपासचे देशमुख जमीनमहसूल बिनतक्रार देऊं लागले दादाजी कोंडदेवाने चालू केलेली वसुलाची शिस्त सर्वत्र सुरू केली शेतकरी लोकास कौल देऊन राजी राखून त्याच्याकडून वेळच्या वेळीं उत्पन्न येईल असें केले रयतेस सुरक्षितपणा वाटून ती जमिनीचें उत्पन्न वाढविण्यास मनापासून झटेल असें करण्याविषयीं महाराज नेहमीं तत्पर असत. त्यामुळें ती त्यास फारच चाहूं लागली सर्व हिंदू प्रजेस हा आपला राजा असावा असें वाटूं लागलें. महाराजाचा हा स्वसत्तावृद्धीचा अजब उपाय पाहून पदरच्या लोकांस अतिशयित कौतुक वाटूं लागलें. त्याची ही युक्तिकला व कुशलता पाहून त्यांच्याविषयी त्या लोकांच्या मनांत पूज्यताबुद्धि उत्पन्न झाली, व ते महाराजांच्या भजनीं अधिकच लागले. मावळे लोकांला तर महाराज केवळ मायबाप वाटूं लागले. ते त्यांच्या जिवास जीव देण्यास तयार झाले. स्व प्राणांची

परवा न करितां महाराज सांगतील तें एकनिष्ठेनें करावयाचें असा त्यांनीं निर्धार केला.

वर सागितल्याप्रमाणे जमीनमहसुलाची वगैरे व्यवस्था यथायोग्य लाविल्यावर महाराजानी आपल्या पदरी साधतील तेवढे लोक ठेवण्याचा क्रम चालविला. त्यांच्या नोकरीस राहण्याची उत्कंठा ज्यास त्यास वाटून पुष्कळ लोक त्यांच्याकडे येऊं लागले हा धनी आपणास लाभला तर आपलें मोठेंच भाग्य होय असें त्यांस वाटूं लागलें मनुष्याची योग्य पारख करण्याच्या कामात तर महाराज अतिशयित निष्णात असत कोणी कसाहि मनुष्य आला तरी त्याची पारख जातीने करून तो कोणत्या कामास लायक आहे हे नीट ठरवून त्यास ते काम महाराज सागत असत शूर शिपाई व हुशार कारकून जेवढा सापडेल तेवढा नोकरीस ठेवावयाचा असा त्याचा क्रम असे अशा प्रकारे हुशार व इमानी माणसाची जमाजम करून त्याच्या अगी चागली वाकबगारी येऊन पुढील महत्कार्यास ते उपयोगीं पडतील अशी खबरदारी घ्यावयास महाराजानी मुळींच आळस केला नाहीं

हा असा लोकाचा जमाव करिता करिता मावळे लोक दहा हजारापर्यंत जमले, व शहाजीराजाची पागा जागोजाग होती ती एकत्र करून व तींत नवी भर घालून ती तीन हजारापर्यंत नेली शहाजीराजानी तैनातीस दिलेले व दादाजी कोंडदेवानें आपल्या पसतीने नोकरीस लाविलेले काहीं कारकून होते ते अद्यापि महाराजांपाशी कायम असून त्याचे त्यांस हरएक प्रसंगीं उत्तम साहाय्य मिळूं लागलें आपल्या तरुण धन्याची स्वराज्यस्थापनेविषयीची अशी स्तुत्य हांव व हिंमत पाहून त्याच्याहि अगी स्फुरण चढलें ते महाराजास प्रत्येक प्रकरणीं योग्य दिसे ती सल्लामसलत इमानानें देऊं लागले त्यांचें वय लहान होतें तरी त्याच्या अगीं अचाट कर्तबगारी व अलौकिक युक्तिमत्ता होती हें पाहून ते त्यांस अतिशयित मान देऊं लागले व त्यांच्या केवळ अर्ध्या वचनात वागू लागले महाराजानींहि त्यांच्या अगच्या गुणांचें योग्य चीज करून त्यांस साजतील असे हुद्दे देऊन वाढविलें. स्वराज्याचा पाया आपल्या जाहगिरीपुरताच तूर्त घालावा व पदरच्या लोकांच्या मनात ह्या कल्पनेचें बीजारोपण करावें असा विचार करून महाराजांनीं ह्या वेळीं शामराज नीलकंठ रांझेकर यास पेशवा केलें, बाळकृष्णपंत दीक्षित यास मुजुमदारी दिली, सोनोपंतास

१ यास १६४३ त पेशवाईचा हुद्दा मिळाला असें शि. दि. यांत म्हटलें आहे, तें

डबिरी सांगितली, व रघुनाथ बल्लाळ बोकील यास सब्नीस केमिलें. ह्याशिवाय येसाजी कंक, तानाजी मालुसरे व बाजी पासलकर यास मावळ्यांच्या लष्करावर सरदार केलें, व एकंदर सेनेचे नायक स्वत झाले. सरनौबत हा हुद्दा अजून कोणास दिला नव्हता.[२] ह्या रीतीने स्वताच्या जाहगिरीच्या बाहेर स्वसत्तेचा विस्तार फारसा झाला नव्हता तरी तेवढ्यापुरता स्वराज्याचा पाया घालून तो कायम राखण्याचा व त्यावर भव्य इमारत उभारण्याचा उद्योग महाराजानी पुढे कसकसा केला तो आता यथाक्रम सांगूं

---

राजवाडे खरे समजून चालतात. परतु हे सभवनीय दिसत नाहीं. ह्याचें नांव चित्रगुप्त सकाजी असें देतो.

२ सभासद व चित्रगुप्त ह्मणतात की, सुपेप्रांताचा देशाधिकारी तुकोजी चोर मराठा सरलष्कर होता, त्याला सरनौबत केलें. परंतु पुढे हाच हुद्दा माणकोजी दहातोंडे ( दुतोंडे, दातबडा ) यास दिल्याचा त्यांत उल्लेख आहे.

# भाग सातवा.



## स्वसत्तावृद्धि.

### १६४८-४९.

पूर्वोक्त प्रकारे स्वराज्यस्थापनेस आरंभ करून त्यास आवश्यक अशी थोडी-बहुत व्यवस्था लावून महाराज स्वसत्ता वाढविण्याच्या उद्योगास लागले. हा उद्योग त्यानी आरंभीं कसकसा केला ते कथन करण्यापूर्वी त्याच्या जाहगिरीच्या सभोवतालील मुलखाची व्यवस्था कशी काय होती त्याचे दिग्दर्शन करणें उचित होय

नीरानदीच्या दक्षिणतीरींचा मुलूख पूर्वेस शिरवळपर्यंत व दक्षिणेस कृष्णानदीच्या उत्तरेकडील डोंगरापर्यंत हिरडस मावळचा कृष्णाजी नाईक बांदलनामक देशमुख याच्या ताब्यात असून तो त्याचा वसूल जमा करीत असे, व रोहिडाकिल्ला त्याच्या स्वाधीन होता. ह्या देशमुखाच्या मनात शिवाजीमहाराजांविषयीं पहिल्यापासून अढी असून तो त्याचा द्वेष करीत असे[1] त्यानें आपल्या किल्ल्याचा बंदोबस्त उत्तम प्रकारें ठेविला असून त्याच्या रक्षणार्थ लोकहि पुष्कळ ठेविले होते. महाराज जवळपासचे किल्ले हस्तगत करूं लागले तेव्हां हा किल्ला त्यांच्या हातीं न जाऊ देण्याविषयीं त्याचा पूर्ण निर्धार झाला होता. पुरंदर किल्ल्याच्या आसपासच्या मुलखावरहि ह्या बादलाचा पुरा डोळा होता पुढें

---

१ हा बादल पुण्याखालील बारा मावळात मोठा जोरावर असून तेथले वइते (दाईत) घेत असे दादाजी कोंडदेवास तो मुळी जुमानीना तेन्हा दादाजी शिवापुराहून त्याच्यावर चालून गेला पण बादलानें त्याचा पराभव करून त्याच्या लोकास पिटून काढलें. पुढें कान्होजी नाईक जेधे याने त्याला चार गोष्टी सांगून दादाजीच्या भेटीस आणिलें. परतु हा देशमुख शिवाजीमहाराजांस अनुकूळ झाला नाहीं. अशाच एक खोपडे आडनावाचा देशमुख होता; तोहि महाराजांशी बिरोध करीत असे. त्यांनीं तोरणा वगैरे किल्ले हस्तगत केले तेव्हां ह्या दोघां देशमुखानीं विजापूरकरांच्या सरदाराकडे कामाळी केली होती.

ह्या किल्ला महाराजांनी हस्तगत केला तेव्हा त्याला आपल्या किल्ल्याविषयी मोठी काळजी लागणें साहजिक होते

कृष्णानदीपासून वारणानदीपर्यंतचा घाटमाथा चंद्रराव मोरे याच्या हाती होता. जावळीप्रांतावर याची सत्ता असून हशमगड येथें याचें ठाणें होतें ह्या तर महाराजांस सामोपचाराने सहसा वश होण्यासाखा नव्हता ह्याच्या लोकाचा मोठा जमाव असून त्याच्या बळावर हा कोणासच मोजीत नसे

वाई येथे बिजापूरसरकाराने नेमलेला एक मोकासदार होता. पाडवगड, कमळगड वगैरे आसपासचे किल्ले त्याच्या हवालीं होते कोल्हापूरप्रांत एका मुसलमान अधिकाऱ्याच्या व्यवस्थेखालीं होता, व तेथला पन्हाळाकिल्ला त्याच्या ताब्यात होता

कल्याणप्रांत पूर्वी निजामशाहीच्या सत्तेखाली होता तो स १६३६ त मोगलांशी झालेल्या तहानें विजापूरसरकारच्या ताब्यात आला होता. ह्या प्रांताचे दोन भाग करून त्यावर दोन अधिकारी नेमले होते कल्याणभिवंडीपासून नागोठण्यापर्यंतच्या उत्तरेकडील प्रांतावर मुल्ला अहमद[१] नावाचा एक कुलीन मुसलमान सरदार नेमिला होता त्याचे मुख्य ठाणें कल्याणभिवंडी येथें होते त्याच्या ताब्यातला मुलूख मोठा विस्तीर्ण असून घाटावरचे व घाटाखालचे पुष्कळ किल्ले त्याच्या स्वाधीन होते ह्या किल्यांवर चागलासा बंदोबस्त नव्हता. दक्षिणेकडील भागावर एका हबशी सरदाराची नेमणूक केली असून त्याच्याकडे तो केवळ जाहगिरीदाखल होता ही जाहगीर त्याच्या पूर्वजास निजामशाही सरकाराकडून मिळाली होती ही जाहगीर त्यास अशासाठी दिली होती कीं, त्यानें आरमार ठेवून व्यापाराचे रक्षण करावे, आणि मक्केस जाणाऱ्या यात्रेकरूंस तावज्या समुद्रात नेऊन पोंचवावे ही जाहगीर प्रथमत वंशपरपरा चालत आलेली नसे जो कोणी हबशी सरदार आरमारावरील कामगिरी उत्कृष्ट प्रकारें बजावीत असे त्यास ही जाहगीर प्राप्त होत असे अशा रीतीनें निवडलेल्या सरदारास वजीर ही पदवी मिळत असे. ह्या शिद्दीपाशी खलाशी वगैरे आरमारावरील लोक बहुतेक हबशीच असत. ह्यामुळें आफ्रिकेतील ह्या लोकाची कोंकणांत एक लहानशी वसाहतच झाली होती ह्या शिद्दीच्या सर्व आरमाराचा जमाव दंडाराजपुरीच्या बंदरांत असे. ह्या बंदरापाशीं एक लहानसें बेट असून

१ कित्येक बखरकार याचें नाव मूलाणा असें देतात.

त्याला मजबूत तटबंदी केली होती. ह्या बेटास जंजिरा असें नांव आहे. या वेळीं हबशांचा मुख्य सरदार फत्तेखान होता त्याच्या ताब्यात बरेच किल्ले असत. त्यामध्यें तळें, घोसाळे व रायरी हे मुख्य होत हे सगळे किल्ले मराठे सरदाराच्या हवालीं केलेले होते

कोंकणपट्टीत विजापूरकराचा अमल पुष्कळ काळापासून होता त्या प्रातातले परगणे त्या सरकाराने जहागिरीदाखल दिले असून तेथले देशमुख त्या जाहगिऱ्याचा उपभोग वंशपरंपरा घेत असत, व जमिनीचा वसूल तेच आटपीत. दाभोळ, अजनवेल, रत्नागिरी व राजापूर ह्या बंदराची व्यवस्था मात्र सरकारी अधिकाऱ्याकडे असे, व त्या शहराच्या आसपासच्या प्राताचा वसूल तेच गोळा करीत सदरीं सागितलेल्या देशमुखापैकीं अमळ प्रबळ असे वाडीचे सावंत होते. फिरग्याच्या ताब्यातील गोवेप्राताच्या लगत्याचा मजबूत पहाडी प्रात ह्या देशमुखाच्या ताब्यात जहागिरीदाखल असे त्या सावंताच्या खालोखाल योग्यतेचे देशमुख ह्मटले ह्मणजे शृंगारपूरचे सुर्वे होते[1] त्याच्या ताब्यातला प्रात्त अमळ एकीकडचा असल्यामुळे ते जावळीच्या मोऱ्याप्रमाणे बहुतेक स्वतंत्र होऊन बसले होते

येणेंप्रमाणे शिवाजीमहाराज स्वसत्तावृद्धि करण्यास सिद्ध झाले तेव्हा त्याच्या जहागिरीच्या सभोंवतालील प्राताची व्यवस्था होती, आणि ह्याच प्रातावर त्यांचा रोख पहिल्याने व्हावा हे स्वाभाविक होते घाटमाथ्यावरील व त्या खालील प्राताची माहिती मावळ्याच्या साहाय्याने महाराजानी मिळविली होतीच, व तिकडील काहीं देशमुखास वश करून घेतलें होते त्याप्रमाणेंच कोंकणांतील देशस्थिति पाहण्यासाठीं, व तिकडील देशमुखास व किल्लेदारास भेटून आपला यवनी अमल झुगारून देण्याचा सकल्प जाहीर करून ते आपल्या बेतास अनुकूळ होतात किंवा कसें हें पाहण्यासाठी आपल्या पदरच्या ब्राह्मण व प्रभु कामदारास महाराजानीं तिकडे पाठविलें त्यानी सर्वत्र हिंडून महाराजांच्या सत्संकल्पास बरेच देशमुख व मराठे सरदार अनुकूळ करून घेतले.

महाराजापाशीं ह्या वेळी मनुष्यसंग्रह पुष्कळ झाला होता, व आणखी लोक त्याच्या नोकरीस राहावयास तयार होते. परंतु इतक्या लोकास मुशाहिरा कोठून द्यावा ही अडचण त्यांस प्राप्त झाली ताब्यात आलेल्या मुलखाचें उत्पन्न

---

१ याचें नांव दळवी असें ग्राटडफ देतो, आणि चिटणीस, सभासद व चित्रगुप्त सुर्वे असें नाव देतात.

ह्या एकसारख्या वाढत जाणाऱ्या खर्चास पुरणें मुळींच शक्य नव्हतें. लोकांस वेळच्या वेळीं वेतन मिळालें तर ते मनापासून कोणतीहि कामगिरी करण्यास सिद्ध असतात लष्कर व पागा साधेल तेवढी वाढविल्यावांचून आरंभिलेलें कार्य सिद्ध होण्याची आशा बिलकुल नव्हती. त्याप्रमाणेंच हस्तगत केलेल्या किल्ल्याची व्यवस्था नीट लावून त्यावर अन्नादि सामुग्री मुबलक ठेविल्यावाचून शत्रूच्या भावी हल्ल्यापासून त्यांचे रक्षण होणें शक्य नव्हतें तेव्हा कोणत्या तरी उपायाने द्रव्य मिळवित्यावाचून गत्यंतर नाही हे महाराजाच्या लक्षांत येऊन त्या उद्योगास ते लागले जे कोणी धनाढ्य सावकार आढळत त्याच्याकडून उसने द्रव्य घेण्याचा क्रम त्यानी चालविला, व जे सावकार सामोपचारानें द्रव्य द्यावयास राजी नसत त्याजपासून तें बळजबरीने घ्यावयास ते उद्युक्त होत. हा क्रम अन्यायाचा तर खरा. परतु ज्या देशकार्यास ते प्रवृत्त झाले होते तें अत्यत महत्त्वाचे असून सिद्ध झाल्याने सर्वांचेच कल्याण होण्याजोगे होतें. यास्तव मनुष्याची व द्रव्याची अनुकूलता साधेल त्या उपायानें करण प्राप्त होतें. मनुष्यास द्रव्याच्या लालचीने अनुकूळ करिता येई. परतु ज्याच्यापाशी द्रव्य असे त्यास मोहक वाणीने बोलून वश करण्याचा उपाय हरला असतां दुसरा उपाय ह्मटला ह्मणजे जुलमाचाच होता.

एके समयी त्याला अशी बातमी लागली कीं, कल्याणचा सुभेदार मुल्ला अहमद याच्याकडून मोठा खजिना विजापूरदरबारी जात आहे हा खजिना कोंकणातून वाईच्या मार्गाने चालला होता तो लुटण्याचे मनात आणून महाराजानी तीनशें स्वार व कांहीं मावळे बरोबर घेऊन खजिना घेऊन जाणारांवर हल्ला केला[1], व त्यास उधळून लावून सगळा ऐवज तत्काळ राजगडावर नेऊन ठेविला. ह्या खजिन्याबरोबर चागलाच सरजाम होता कारण शिवाजी महाराज किंवा दुसरा कोणी तरी पुंड तो लुटील अशी भीति त्या सरदारास होतीच. ह्या झटापटीत महाराजाकडचे दहापाच लोक ठार झाले व पाचपंचवीस जखमी झाले, व मुल्लाचे पाचपंचवीस लोक पडले व शेपन्नास जायबंदी झाले. आपले जे लोक प्राणास मुकले त्याच्या कुटुंबाचा निर्वाह महाराजानीं चालविला, व ज्यानीं चागली कामगिरी बजाविली त्यांस त्याच्या योग्यतेप्रमाणें इनामें वगैरे देऊन उत्तेजन दिलें त्यामुळें सर्वास असें वाटूं लागलें कीं, हा प्रभु दयाळू व

१. शि. दि. ह्मणतो की, येसाजी कक व तानाजी मालुसरे यानी काही मावळ्यांनिशी जाऊन हा खजिना महाराजाच्या आज्ञेवरून लुटला

उदार असून गुणांची बूज अवश्य करावयाचा. याची सेवा इमानानें केल्यास ती व्यर्थ व्हावयाची नाहीं ह्या रीतीनें महाराजाच्या पदरच्या लोकांचा हुरूप व उत्साह हे अधिकाधिक वाढत चालले

हा खजिना लुटल्यामुळें कल्याणच्या मुल्लाशी उघड वैर उपस्थित झाले. तेव्हा महाराजानी आबाजी सोनदेव यास त्याच्यावर पाठविलें त्याने जाऊन कल्याणावर एकाएकीं छापा घातला व ते सर करून मुल्ला हयातीस[१] बंदिवान् केलें, व त्याच्या ताब्यातले सगळे किल्ले आपल्या कबजात घेतले. ह्या विजयाचे वर्तमान महाराजास कळलें तेव्हा त्यास मोठा आनंद झाला, व ते जातीनें कल्याणास गेले मुल्लास कैद केलें होते, त्यास सोडवून त्याचा बहुमान केला, व त्यास आदरपूर्वक विजापुरास रवाना केले आबाजीपंताने ह्या मुल्लाची सून[२] लढाईच्या गर्दीत पकडून ठेविली होती महाराज कल्याणास आल्यावर त्यांच्यापाशी आबाजीने असा अर्ज केला कीं, ह्या लढाईत एक अतिलावण्य-संपन्न तरुण स्त्री सापडली आहे ती महाराजाच्या सेवेस योग्य आहे असें वाटल्यावरून ठेवून दिली आहे हे ऐकून महाराजानी त्यास आज्ञा केली कीं, तुह्मी जी सुंदर स्त्री ठेविली आहे ती सभेस घेऊन या अशी आज्ञा होताच त्या कारभाऱ्याने तिला चागली नटवून सजवून सभेस आणिलें. तिला पाहून महाराज हसले आणि ह्मणाले कीं, ह्या बाईच्या लावण्यासारखें आमच्या मातुश्रीचे लावण्य असते तर आमचेहि रूप हिच्या-सारखे झाले असते हें ऐकून सगळया लोकास अचंबा वाटला त्याच्या त्या निग्रही वृत्तीचें त्याला मोठे नवल वाटले मग महाराज आबाजी सोनदेवास ह्मणाले ' ज्यास यश पाहिजे त्यानें परस्त्रीचा अभिलाष कदापि करूं नये राजाने उच्छिष्ट स्त्रीचा अगीकार करू नये परस्त्रीचा अभिलाष केल्याने रावणासारखे बलाढ्य पुरुष नाश पावले आहेत मग आमच्यासारख्याची कथा काय ? राजास सर्व

१ प्रो मरकार हे आडनाव नवैयत असे देतात ते आणखी असे ह्मणतात की, महमद अदिलशहा ह्या वेळी फार आजारी असल्यामुळे हा मुल्ला विजापुराम बरेच दिवस होता, आणि त्याच्या पश्चात् त्याच्या ह्या कल्याण प्राताच्या जहागिरीची अव्यवस्था झाल्यामुळे महाराजाच्या हाती हा प्रात असा सहज आला

२ शि. दि. ह्मणतो की, ही त्या मुल्लाची कन्या असून तिला आबाजी सोनदेवाने त्याजपासून राजीखुषीनें पैसा देऊन घेतले होतें तारीख-इ-शिवाजी नामक यवनी बखरींत मुळातल्यासारखाच मजकूर आहे ही कोणातरी दुसऱ्याच मुसलमानाची मुलगी होती असें कित्येकाचें ह्मणणे आहे

प्रजा अपत्यासमान आहे ' हें असें बोधाचें भाषण ऐकून सर्वांच्या चित्तावर असा परिणाम झाला कीं, महाराज महापुरुष आहेत. याच्या हातून अनाचार कदापि व्हावयाचा नाहीं, व पदरच्या माणसानीं तो केल्यास याला तो मुळींच खपावयाचा नाहीं मग महाराजानीं त्या स्त्रीस वस्त्रालंकार देऊन मोठ्या इतमामाने तिचा सासरा विजापुरास गेला होता तिकडे पाठवून दिलें[1]

कल्याणप्रात जिकिल्याबद्दल आबाजी सोनदेवाची फार तारीफ करून महाराजानी त्याला त्या प्राताचा सुभेदार नेमिले, व तिकडे जमीनमहसुलाची व्यवस्थित पद्धत लागलीच सुरू केली यवनी अमलात प्रजा अगदीं टेकीस आली होती तीस आश्वासन देऊन हुशार केले त्या प्रातात ज्या प्राचीन सस्था लुप्तप्राय झाल्या होत्या त्याचे पुनरुज्जीवन केले देवस्थानास व ब्राह्मणास जीं वर्षासने पूर्वकाळीं चालू होतीं तीं पुन सुरू केलीं, व जीं त्या काळी चालू होतीं ती तशीच कायम ठेविलीं. त्यामुळें सर्व हिंदू प्रजा सतोष पावून महाराजाची कीर्ति सर्वत्र प्रसृत झाली.

ह्या विजयानें महाराजाला व पदरच्या लोकाला मोठाच हुरूप आला मुल्लाचा वसवसा मोडून काढिल्यावर त्यानी आसपासचे किल्ले सर करण्याचा धूम सपाटा चालविला किल्लेदाराशी प्रथम सामोपचाराचे बोलणें लावावे, व रक्तपात न होता ते किल्ले ताबीन करून देतात की कसे ते पाहावे, तसे ते करारास न आले तर त्याच्यावर अकस्मात् छापे घालून किल्ले घ्यावे, असा क्रम त्यांनी चालविला मावळे व धारकरी यास किल्ल्याची बारीकसारीक माहिती असे. ज्या किल्ल्याची माहिती नसे तेथले माहितगार मिळवावे इतकेहि करून एकाद्या किल्ल्यावर प्रवेश नच झाला तर त्यावरील रखवालदारापैकी काहीं जणाशीं भेद करावा, व त्याच्या कोटघेऱ्याच्या आतील घरे शाखरण्यासाठी आगोटीस गवत वगैरे पुरविण्याचा करार किल्ल्याखालच्या गावकऱ्यानी केलेला असे, त्यापैकीं कांहीं जणास लाच देऊन आपलेसे करावे व आपल्या धारकऱ्याच्या माथ्यावर गवताच्या मोळ्या देऊन त्यात तरवारी घालाव्या अशा बहाण्यानें किल्ल्यावर जावें व भेद करून वश केलेल्या रखवालदाराच्या मदतीनें बाकीच्या रखवालदारांवर एकदम घाला घालून किल्ला सर करावा ह्याप्रमाणे त्यानीं कांगारी ( कांगुरी ), तुंग, तिकोंनी, लोहगड, राजमाची, कुवारी, भोरप, घनगड, केलना, माहुली आदिकरून किल्ले घेतले ह्या प्रांतात कित्येक देशमुख पुंडावा करीत व

---

१ कल्याण शहरात शिवाजीमहाराजास पुष्कळ पुरलेले द्रव्य सापडले असे त्या वेळचा टावर्निअर नावाचा एक युरोपिअन प्रवासी लिहितो.

घालेनार रयतेस फारच उपद्रव करीत त्यास जेरीस आणून किंवा ममता दाखवून आपले अंकित करून महाराजानीं सगळा मावळप्रांत त्यांच्या त्रासापासून मुक्त केला, व तेथील प्रजा सुखी केली. यवनाचा मुळसुळाट अगदीं मोडला; आपला हिंदू राजा झाला असून कोणत्याहि बाबतींत कोणावर जुलूमजबरी होतनाशी झाली, हें पाहून सर्व हिंदू प्रजा महाराजास दुवा देऊं लागली. स्वधर्मरक्षण होऊन स्वराज्याचा अनुभव घडूं लागल्यानें सर्वांस सुख झालें.

ह्याप्रमाणें कल्याणप्रांताच्या उत्तरभागातील प्रजा आबाद व सुखी झाली हें ऐकून दक्षिण भाग जो शिद्दीच्या कबजात होता तेथल्या हिंदू प्रजेसहि शिवाजी महाराजाची सत्ता आपल्यावर व्हावी अशी इच्छा होऊं लागली त्या वेळीं हबश्याच्या नोकरीस सोडवळेकर व कोडवळेकर असे दोन मराठे जमेदार होते त्यानीं महाराजास असें सांगून पाठविलें कीं, "आह्मास हबशाच्या तांबेदारीचा अगदीं वीट आला आहे तो आह्मास अनेक प्रकारीं छळतो. आपली स्वारी कोकणात यावी, ह्मणजे आह्मी तळा व घोसाळा, हे किल्ले आपणांस घेऊन देतों. हे किल्ले हातीं आल्याने आपणास पुष्कळ प्रांत साधण्यासारखा आहे, व यवनाची तांबेदारी जाऊन आह्मी आपल्या पदरीं पडूं" ही अशी तिकडील लोकाची अनुकूळता पाहून महाराज कांहीं लोकानिशीं तिकडे गेले, व ते किल्ले त्यानी स्वाधीन करून घेतले. ह्या किल्ल्यानजीक सुरगड आहे तोहि त्यानीं हस्तगत केला, व आसपासच्या प्रांतात आपला अमल बसविला. हबश्याचा हा प्रांत हातीं आला खरा, परंतु तो कायमचा स्वाधीन राहणें अमळ कठीण होतें. कारण शिद्दी मोठा प्रबळ होता ह्यासाठीं महाराजानीं बीरवाडीस चांगली मेट पाहून तेथे किल्ला बांधिला आणि रायरीच्या[१] बळकट डोंगरावर लिंगाणा नावाचा किल्ला बांधिला हाच किल्ला पुढें विशेष मजबूत करून त्यास रायगड असें नाव दिलें. ह्या सर्व किल्ल्यावर आपले लोक ठेवून त्यांचा चांगला बंदोबस्त केला ह्याप्रमाणें हबश्याच्या ताब्यांतून कुलाबा प्रांताचा पूर्वभाग महाराजांच्या सत्तेखालीं आला.

ह्या मोहिमेत महाराजांला प्रसिद्ध भवानीतरवारीचा लाभ झाला. महाराज हरिहरेश्वराच्या दर्शनाला जाऊन परत येत असता त्यांस कोणीं असें सांगितलें कीं, गोवलकर सावंताच्या घरीं एक नामी धोपतरवार आहे तिची किंमत

---

१ रायरी व लिंगाणा हे किल्ले निराळे असून रायरीच्या किल्ल्यास पुढें रायगड असें नांव दिले असें कित्येकाचे ह्मणणें आहे.

तीनशें होन आहे. ही तरवार त्याजकडून आपण घ्यावी असें जवळच्या लोकांनीं महाराजास सुचविलें. त्यांस महाराज ह्मणाले कीं, ' खऱ्या मर्द पुरुषानें कोणा संभावित मनुष्यापाशीं एकादी वस्तु असली तर तिचा अभिलाष धरूं नये. स्यमंतमण्याची गोष्ट पुराणातरीं आहे ती तुमच्या लक्षात असेलच त्यामुळें उपस्थित झालेलें वैर भगवंतासच निभाविता आलें आपण मानवांनी असल्या क्षुल्लक वस्तूसाठी नसतें वैर माजवूं नये ' हा असा त्याचा निस्पृहपणा पाहून लोक उगीच राहिले इकडे सावतांच्या कारभाऱ्यानी त्यास अशी सल्ला दिली कीं, शिवाजीमहाराजासारख्या प्रतापी पुरुषाशी सख्य करण्याची अमोल संधि आली आहे ती व्यर्थ दवडूं नका त्यास तुमच्याकडची तलवार नजर करून त्याचें मित्रत्व संपादा. ही मसलत त्या सावंताला रुचून त्यानी महाराजाची भेट घेऊन ती तरवार त्यास नजर केली त्यामुळे खुष होऊन महाराजानी त्याला तिजबद्दल तीनशें होन व पोषाख दिला, व त्यास आपल्या नोकरीस ठेविलें ह्या तरवारीवर महाराजाची फार प्रीति असे कोणत्याहि मोहिमेस निघावयाचे झालें तरी ती घेतल्यावाचून ते निघत नसत. ह्या तरवारीचे नाव त्यानी भवानी असें ठेविलें. ती हातीं आल्यावर महाराजास प्रत्येक मोहिमेंत यश येत गेले ह्मणून तिची ते नित्य पूजा करीत. नवरात्रात घटाजवळ ठेवून तिची पूजार्चा करून दसऱ्याच्या दिवशी ती पुन. हातीं धरून नव्या मोहिमेस निघावे असा त्याचा क्रम असे

ह्या मोहिमेत महाराजानी राजापूर शहरावर हल्ला केला. हे शहर शिद्दीच्या ताब्यात होते तेथें मोठा व्यापार चालत असल्यामुळें तें मोठें श्रीमान् होतें. त्या शहराची नाकेबंदी करून तें लुटण्याचा बेत महाराजांनी केला. तेथल्या कमावीसदारानें त्याशी सामना करण्याचा घाट घातला, पण त्यास चागलें शासन केल्यामुळे तो शरण आला मग शहरातील व्यापाऱ्याकडून व श्रीमत लोकांकडून काढवेल तेवढें द्रव्य काढिले ह्या शहरात महाराजांस एक मोठा हुशार व लायक मनुष्य प्राप्त झाला त्याचे नाव बाळाजी आवजी असें होतें. ह्याचा बाप आबाजी हरि चित्रे हा जंजिऱ्याच्या शिद्दीच्या पदरी दिवाण होता. त्याजवर शिद्दीची इतराजी होऊन त्याला व त्याच्या भावाला त्यानें ठार मारिलें; व त्याच्या बायकामुलांस मस्कत येथें नेऊन गुलाम ह्मणून विकण्यासाठी तारवांत घालून रवाना केलें बाळाजीची आई मोठी हुशार व धूर्त बायको होती तिनें खलाशांचें मन वळवून आपणास राजापुरास नेऊन विकावयास सागितलें. तेथें तिचा भाऊ विसाजी शंकर हा मोठा व्यापारी होता. त्यानें त्यास त्या खलाशां-

करून विकत घेतलें तीं आपलीं नातलग आहेत हें त्यास त्यानें कळूं दिलें नाहीं. तिचे तीन मुलगे होते वडील मुलगा हा बाळाजी आवजी, व दुसऱ्या दोघाचीं नांवे चिमणाजी व शामजी अशीं होतीं ह्या तिघा मुलास विसाजीनें चांगलें शिक्षण दिलें होते बाळाजी एका कसबेदाराच्या हाताखालीं कारकून होता शिवाजी महाराजाची स्वारी कोंकणात आली आहे असें ऐकून त्याने आपल्या दैन्यावस्थेच्या हकीगतीचे एक पत्र त्यास पाठविले महाराज त्या पत्राचे अक्षर पाहून फार खुष झाले, व त्यानी त्याला आपल्या पदरीं कारकुनीची नोकरी पतकरून राहावें असा त्या पत्राचा जबाब पाठविला त्यास बाळाजीनें असें प्रत्युत्तर पाठविलें कीं, मामाचें कर्ज आहे ते फिटल्यावाचून मला येववत नाहीं पुढे महाराज राजापुरास गेले तेव्हा तेथल्या लोकास त्यानी असें सागितले की, येथे बाळाजी आवजी ह्मणून कोणी गृहस्थ आहे त्यास आमच्याकडे घेऊन या. त्याप्रमाणे त्यास महाराजाकडे आणिलें. हे वर्तमान त्याच्या आईला कळताच ती घाबरून धावत आली, व महाराजाच्या चरणी लोटागण घालून आपली सगळी हकीगत तिने त्यास निवेदन केली ती ऐकून महाराजाला फार गहिवर आला, व तिच्या दुसऱ्या दोघा मुलासहि बोलावून आणून तिचे त्यानी असें आश्वासन केलें कीं, जसे हे तुझे तिघे मुलगे तसाच मी तुझा चवथा मुलगा आहे असें समज व ह्या तिघा मुलास मजबरोबर पाठीव, मी त्याचे कल्याण करीन बाळाजी आवजीचें अक्षर पाहून महाराज अगोदरच सतुष्ट झाले होते, त्यात आणखी त्याची प्रत्यक्ष भेट झाल्यावर त्याची इभ्रत व हुशारी पाहून तर त्यास फारच आनद झाला व त्यानी त्यास आपला चिटणीस नेमिले चिमणाजी हा जमाखर्ची लिहिण्यांत मोठा कुशल आहे असें पाहून त्यास दप्तरदार केले, व शामजीस रायगडाची कारखाननिशी दिली

ह्या बाळाजी आवजीवर महाराजांची अतिशयित कृपा असे हरएक गुप्त कारस्थान महाराज पहिल्यानें त्याच्याकडे बोलत तो अतिशयित प्रामाणिक व स्वामिनिष्ठ असल्यामुळें महाराजाचा त्याच्यावर पूर्ण विश्वास असे मोठमोठी महत्त्वाची पत्रे, खलिते वगैरे महाराज हमेशा त्याच्याच करून लिहवून घेत तो उत्तम लेखक व मजकुर जुळविणारा असल्यामुळें त्याला कोणत्याहि प्रकरणाविषयीं थोडीशी समजूत दिली ह्मणजे पुरत असे त्याच्या आधाराने सुसगत व मुद्देसूद मजकूर लिहिण्याच्या कामात तो पुरा वाकबगार असे असें सागतात कीं, एके प्रसंगीं स्वारीत असता महाराजांनी त्याला एक खलिता लिहावयास सागि-

तला परंतु सगळा दिवस काहींना काहीं काम निघाल्यामुळें त्याला रात्र होईपर्यंत तो खलिता लिहावयास अवकाश मिळाला नाहीं रात्रौ महाराजांनीं त्यास जवळ बोलावून, सागितलेला खलिता लिहिला काय ? असा प्रश्न केला तेव्हा बाळाजी अगदी घाबरून गेला लिहिला नाहीं ह्मटलें तर हुकूम तोडल्याबद्दल शिक्षा खात्रीनें व्हावयाची हे त्यास पक्के माहीत होते. मग कशी तरी वेळ मारून नेली पाहिजे असें मनात आणून त्यानें न कचरता होय असा जबाब दिला तेव्हा तो कसा काय लिहिला आहे तो आह्मांला वाचून दाखवा, अशी महाराजाची आज्ञा झाली तेव्हा बाळाजीनें दप्तर सोडून एक कोरा कागद काढून पुढें धरून न अडखळता सर्व खलिता बोलून दाखविला तो ऐकून महाराज फार खुष झाले, आणि असा नामी मसुदा लिहिल्याबद्दल त्यानी त्याची तारीफ केली. जवळ दिवटीवाला दिवटी घेऊन उभा होता त्याच्या नजरेस बाळाजीचे हें सारें कृत्रिम पडून तो हसला महाराजानी त्याला दरडावून हसण्याचें कारण विचारलें. तेव्हा त्याचा निरुपाय होऊन त्याने महाराजास सागितलें कीं, बाळाजी बावांनीं जो कागद आता महाराजास वाचून दाखविला तो कोरा होता, त्यावर काहींएक लिहिले नव्हतें. ह्याप्रमाणे लबाडी उघडकीस आली तेव्हा बाळाजीनें आपला अपराध कबूल केला, व तो खलिता लिहिण्यास फुरसद कशी झाली नाहीं तें सागितलें त्याची अशी धारणाशक्ति पाहून अर्थात् महाराज फार सतोष पावले.

# भाग आठवा.



## पितृसंकटनिवारण.

### १६४९–५३.

**एथवर** सागितल्याप्रमाणे शिवाजीमहाराजानी विजापूरकराच्या मुलखांत दोनतीन वर्षे धुमाकूळ उडवून दिला, त्याचें वर्तमान त्या दरबारात वेळोवेळी पोहंचे, परतु त्याजकडे त्या सरकारानें फारसे लक्ष पुरविले नाहीं कल्याणचा सुभेदार मुल्ला याचे समूळ उत्पाटन होऊन तो रडत विजापूरच्या दरबारात गेल्यावर त्याच्या तोंडून कच्ची हकीकत कळली तेव्हा मात्र पातशहास वाटलें, कीं, यापुढे शिवाजीमहाराजाच्या धामधुमीकडे दुर्लक्ष करून उपयोग नाही. शिवाजीमहाराजानी सरकारी खजिना लुटला, कल्याणप्रात काबीज केला, जवळपासचे बहुतेक किल्ले हस्तगत केले, व आणखी किल्ले घेण्याच्या व सरदार बुडविण्याच्या उद्योगात ते आहेत, असे वर्तमान विजापुरात सर्वत्र पसरून चळवळ उडून गेली पातशहा महमद अदिलशहा यास असा सशय आला कीं, हे सारे शहाजीराजे याचेच गुप्त कारस्थान असावे त्यानी आपल्या मुलास आतून सागितल्यावरून त्याने हे असें उघड बंड आरंभिलें आहे हा सशय येण्यास आणखी असेंहि कारण असावे कीं, रणदुल्लाखान कर्नाटकातून परत आल्यावर तिकडील सगळा बदोबस्त शहाजीराजास सागितला असून तिकडील सुभेदारीहि त्यासच दिली होती ह्याप्रमाणे बहुतेक स्वतंत्र व्यवस्था हाती आल्यावर व तिकडील लोकाचा विश्वास व प्रीति हीं सपादन केल्यावर राजांच्या मनांत तिकडे स्वतंत्र राज्य स्थापण्याचा विचार घोळूं लागला होता. याविषयी मागे सांगितलेंच आहे. शिवाजीमहाराजांनीं ज्या मुलखात धामधूम चालविली होती तो शहाजीराजांच्या हातचा तुकताच गेला असल्यामुळें तो परत आपल्या कबजांत यावा ह्यासाठींच त्यानीं ही खटपट आपल्या पुत्राकरवीं चालविली असावी असा वहीम पातशहाला येणें साहजिक होतें.

असा संशय पातशहास आला खरा, परंतु शहाजीराजांचें एकदम उघडपणें पारिपत्य करण्याचें साध्य नव्हतें. बरें शिवाजीमहाराजावर फौज पाठवावी तर तिकडे कर्नाटकांत शहाजीराजे गडबड करून दौलतीस अपाय आणितील. तेव्हा हा कांटा युक्तीने काढण्याचा विचार पातशहानें केला त्यानें प्रथमत शहाजी-राजांस असें पत्र पाठविलें कीं, "तुह्मी आमचे इतबारी अमीर असतां तुमचा पुत्र जो तुम्हीं पुणेप्राती ठेविला आहे तो बदलला आहे त्याने हरामखोरी करून आमच्या ताब्यातले किल्ले घेतले व कल्याणप्रातहि काबीज केला ही गोष्ट बरी नाहीं. यात स्वहित काय पाहिले ? याकरिता तुह्मास असें फर्माविण्यात येत आहे की, शिवाजीने असा गाफीलपणा व पुंडावा करूं नये अशी त्यास तुम्हीं ताकीद द्यावी त्याने ताब्यात राहून मेहरबानी सपादन करावी ह्याप्रमाणें वागण्यास तो राजी नसल्यास तुमच्यावर इतराजी होऊन तुमची जाहगीर काढून घेतली जाईल, व त्यास व तुह्मास शासन करण्यात येईल तुमच्या हातून त्याचा बदोबस्त किवा पारिपत्य होत नसल्यास त्याला हुजुरास आणावे"

शहाजीराजानी ह्या पत्राचा जबाब असा पाठविला कीं, "शिवाजी माझा पुत्र खरा, परतु तो माझ्या हुकमात नाहीं तो बिघडला आहे माझा त्यास काहीं इलाज नाहीं मी पातशहाचा एकनिष्ठ नोकर आहे यात माझी तकशीर बिलकुल नाहीं माझा गुन्हा असेल तर मी मनोभावे हुजुरास हजर राहतो. हजरतींनी शिवाजीवर स्वारी करून त्यास जीवत धरून आणावें, किवा काय मन मानेल तें करावे त्यास मी आड आलो तर माझा मुलाहिजा ठेवूं नये. शिवाजीला तबी देऊन हुकमांत आणावे, एवढाच माझा अर्ज आहे मला दुसरें काहीं कळत नाहीं" ह्याप्रमाणे शहाजीराजाकडचें उत्तर आलें तरी पातशहाची खात्री होईना[१] ह्मणून त्यानें आपला सरदार मुस्तफाखान हा कर्नाटकांत मोहिमेवर गेला होता त्यास असा गुप्त हुकूम पाठविला कीं, शहाजी-राजांस युक्तीनें पकडून विजापुरास पाठवावें असें केल्याने शिवाजीमहाराज

---

१ शिवदिग्विजयात सागितले आहे की, ह्या वेळी अदिलशहाने शिवाजी महाराजांसहि एक जरबेचें पत्र पाठवून ह्या शिरजोरपणाच्या कृत्यांबद्दल त्याचा निषेध केला, व त्यांस विजापुरास हुजूरास येण्याविषयीं हुकूम केला. महाराजानी त्यास असा जबाब पाठविला कीं, माझ्या ताब्यांत आलेला सगळा प्रात मला जहागिरीदाखल द्याल तर मी विजापुरास येतों.

सहज वठणीस येतील असें त्यास वाटलें. मुस्तफाखानानें ही कामगिरी बाजी घोरपडे यास सांगितली

ह्या घोरपड्यानें राजास कसें दग्यानें पकडलें हे मागे सांगितलेच आहे.[1] त्यानें त्यास विजापुरी आणिल्यावर पातशहानें पुन असें निक्षून सांगितलें कीं, तुह्मी आपल्या मुलाचे बंड मोडून टाका दुसऱ्या सरदाराकडूनहि त्यास पुष्कळ सांगविलें, परंतु त्या सर्वांस त्याचा एकच जबाब होता तो हा कीं, 'शिवाजीचा आणि आपला कांहींएक संबंध नाहीं तो सरकाराशी बंड करीत आहे त्याच-प्रमाणे तो माझ्याशींहि बंडखोरासारखे वर्तन करीत आहे ' मग पातशहानें राजाकडून आपल्या समक्ष शिवाजीमहाराजाला अशा आशयाचे पत्र लिहविलें कीं, ' तुह्मी एकदम विजापुरास निघून यावे व पातशहाचे जे किल्ले कोट वगैरे बळकाविले असतील ते त्याच्या स्वाधीन करावे तुमच्यामुळे त्याची आमच्यावर अतिशयित इतराजी झाली आहे '

हें असें वडिलाचें पत्र आलें तेव्हा महाराजाला मोठा विचार पडला आप-ल्यामुळे वडिलावर संकट आले आता कसें करावे ? त्याची आज्ञा शिरसा वंद्य करून आजपर्यंत मिळविलेले किल्ले व प्रांत सोडून देऊन यवनाचे अंकित होऊन राहावें तर आपण आरंभिलेलें स्तुत्य कार्य असिद्ध राहते, आणि ज्या स्थिती-विषयीं आपणास अतिशयित तिटकारा वाटत आहे तीच स्वीकारून राहणें भाग पडणार, असे विचार त्याच्या मनात येऊन ते चिंताग्रस्त होऊन बसले. ही त्याची उदासीन अवस्था पाहून सईबाईने चिंतेचें कारण विचारलें तेव्हां त्यांनीं तिला वडिलाच्या पत्रातला मजकूर कळविला व पुढें काय करावे ह्मणून विचारलें तिनें उत्तर केलें " आह्मी स्त्रिया आमची बुद्धि ती किती ? साहे-बांपाशीं मोठमोठे विचारकर्ते कारकून व सरदार आहेत त्याची सल्ला घ्यावी. विचारिलेंच त्याअर्थी मला असें वाटते कीं, राज्य साधावे, स्वधर्माचें व गोब्राह्मणाचें रक्षण करावें अशी इच्छा धरिली आहे ती योग्य आहे. देवावर भार घालून चालावे. यश देणार तो समर्थ आहे. राज्य साधावयाचें तर मोह काय उपयोगाचा ? थोरले महाराज पडले दूरदेशीं, नाहीं तर त्यासहि ह्या गोष्टीचा संतोष वाटता. ' हें सईबाईचे भाषण ऐकून महाराज संतोष पावले. आपल्या सारखेंच तिचें मत आहे हें पाहून त्यांस समाधान वाटलें. नंतर मातुश्री, कार-

---

१ भाग दुसरा पृ. ४५

कून व सरदार यास विचारितां त्यांनींहि अशीच मसलत दिली. मग त्यांनीं शहाजीमहाराजास पत्राचा जबाब असा पाठविला कीं, "आह्मी तिकडे आल्यानें काहींएक उपयोग होणार नाहीं घेतलेले किल्ले, कोट व प्रात सोडून द्या ह्मणून सागू लागले तर आह्मी काहीं सोडण्यास राजी होणार नाहीं यास्तव आपल्या दैवी असेल तसें आपणास होईल, व आमच्या दैवी असेल तसे आह्मी करूं."

हे महाराजांकडचें गेलेलें पत्र पातशहास दाखवून शहाजीराजानी पुन अशी विनंति केली कीं, "मुलगा आपल्या स्वाधीन बिलकुल नाहीं त्याचें पारिपत्य हजरतीस वाटेल त्या रीतीने करावे मजवर विनाकारण दोषारोप करून कोपायमान होऊं नये" परंतु इतक्यानें पातशहाचे समाधान झाले नाहीं त्याला वाटलें कीं, यात शहाजीराजाचीच सगळी लबाडी आहे त्यांला शिक्षा केल्यावाचून मुलगा ताळ्यावर यावयाचा नाहीं. मग त्याने भितीस दगडाचा एक कोनाडा करून त्यात बसण्यापुरती थोडीशी जागा ठेविली, व तींत राजास चिणून एक चिरा मात्र लावावयाचा ठेविला, आणि त्याला असें सागितलें कीं, अमुक मुदतींत तुमचा मुलगा आम्हाम शरण आला नाहीं तर हा चिरा कायमचा बसवून टाकूं ह्या कोनाड्यातून त्याला दिवसातून एकदोन वेळा काढीत व पुनः आत ठेवून देत

असा हा अतिभयंकर प्राणातप्रसग वडिलावर आल्याचें महाराजास कळलें तेव्हां त्याला पराकाष्ठेचें दु ख झालें, व आता पुढे काय करावे याचा विचार पडला. आपल्या पायीं वडिलाचा प्राणनाश खचीत होतो असें मनांत येऊन त्याचे हृदय शोकविव्हल झाले अशा महापराक्रमी नरपुंगवाचा असा परम उद्वेगकारक रीतीनें अत व्हावा व तो मुलाच्या बेतालपणामुळे व्हावा हें खरोखरीच सुशील पितृभक्ताच्या हृदयास अत्यंत दु ख देणारें होय आजपर्यंत ज्या गोष्टी आपण केल्या त्या वडिलाच्या कानावर गेल्या असून त्यानीं त्याबद्दल आपणांस शासन केलें नाहीं, तेव्हा त्या त्यास समत असाव्या असें महाराजांस वाटून त्यांनीं आपला योजिलेला क्रम निश्चयानें पुढें चालविला होता. आपण हा एवढा उपद्व्याप केला त्याचा परिणाम असा घोर होईल असें त्यांस वाटलें नव्हतें; कारण त्यांस हें माहीत होतें कीं, कर्नाटकांत आपल्या वडिलांचें वर्चस्व अतिशयित वाढलें असल्यामुळे ते पातशहास एकाएकीं दाद देणार नाहींत; परंतु घोरपड्यानें त्यांस दग्यानें पकडून विजापुरास आणिलें ह्मणून हा दुर्धर प्रसंग त्यांजवर ओढवला.

खऱ्या वीर्यशाली व दृढनिश्चयी पुरुषाची परीक्षा अशाच बिकट प्रसंगीं होत असते. महाराजांच्या अगचे अनेक गुण ह्या भयंकर प्रसगाने चांगले कसास लागले. एक तर त्याची पितृभक्ति किती नि सीम होती हें दिसून आलें. ते केवळ स्वार्थसाधु व राज्यलोभी असते तर त्यांनी स्वपित्याच्या जिवाची परवा केली नसती राज्य-तृष्णेस वश होऊन पितृहत्या करण्यासहि औरगजेबासारखे नराधम प्रवृत्त होतात, तर स्वकष्टाने संपादिलेलें राज्य स्वपित्याच्या प्राणरक्षणासाठी कोण सोडण्यास तयार होईल ? परंतु महाराज ह्या कोटीतले मानव नव्हते दुसरा मोठा गुण म्हटला म्हणजे आरभिलेलें सत्कार्य कसेंहि सकट प्राप्त झालें तरी कदापि असिद्ध सोडावयाचें नाहीं, असा अढळ निश्चय हा होय यवनाच्या सत्तेतून स्वदेश सोडवून स्वतंत्र करण्याचा जो निर्धार एक वेळ केला तो ह्या वेळीं पितृमोहास्तव चळण्याचा समय प्राप्त झाला होता कृतसकल्प सोडला नाहीं तर पितृहत्येस आपण कारण होतो, व पितृरक्षण करावयासाठी यवनास शरण जावे तर केलेला संकल्प असिद्ध राहून जगात आपलें हसे होतें, ह्याप्रमाणे 'इकडे आड आणि इकडे विहीर' अशी महाराजाची स्थिति ह्या वेळी होऊन गेली, परतु महाराजानी ह्या प्रसंगी स्वसंकल्प कायम राखून पितृसंकटनिवारणाची जी अजब युक्ति योजिली तीवरून त्याच्या अगची कल्पकता व धूर्तता चागलीच प्रत्ययास आली.

ह्या काळपावेतो त्यानी मोगलाच्या मुलखास यत्किंचित्‌हि उपद्रव केला नव्हता याचे एक कारण तर उघडच होते कीं, दोन्ही पातशाहतींशी एकदम विरोध करणें इष्ट नव्हते शिवाय मोगलाचा बंदोबस्त सरहद्दीच्या मुलखात विशेष चागला होता दुसरें असेंहि कारण असावे कीं, विजापूरसरकाराची सत्ता दुर्बळ करून टाकणारा रिपु उत्पन्न व्हावा, व शहाजीराजांसारख्या शूर व बलाढ्य सरदारानें किंवा त्याच्या वीर्यशाली पुत्राने फिसाद करावी हे मोगल-बादशहास इष्टच वाटण्यासारखें होते. यास्तव विजापूरसरकाराशी युद्धप्रसंग करावे लागून यदाकदाचित् आपला पाडाव होऊं लागला तर मोगलाचा आश्रय स्वीकारून आपणास सावरता येईल असें महाराजास वाटल्यावरून त्यानी त्या सरकारास मुळींच दुखविलें नव्हतें.

मोगल बादशहाचा उद्देश महाराजांस पक्का माहीत असल्यावरून त्याला ह्या वेळीं अशी खात्री वाटली कीं, आपण त्याच्यापाशीं मदत मागितली असतां ती तो तत्काळ देईल. मग त्यांनीं शहाजहान बादशहास त्याचा मुलगा मुरादबक्ष जो ह्या वेळीं दक्षिणेंत सुभेदार होता, त्याच्याद्वारें असा अर्ज केला कीं, " आमचे

वडील शहाजीराजे यांजवर विजापूरसरकाराची इतराजी होऊन त्यांस भिंतींत चिणून मारण्याचा ठराव त्या सरकारनें केला आहे, तरी त्यांस ह्या प्राणसंकटांतून सोडविण्याची मेहरबानी करावी, व त्यास आपल्या पदरीं घ्यावें, त्याप्रमाणेच आह्मीहि आपल्या नोकरीस राहावयास तयार आहों निजामशाहीच्या संबंधानें झालेला लढा मनात न आणितां अशा शूर व इमानी सरदारास जीवदान दिलें असतां दक्षिणेंत मोगली अमल वृद्धिंगत व दृढ करण्यास त्याच्याकडून व आह्माकडून पुष्कळ साहाय्य होईल " अशा आशयाचा अर्ज रघुनाथपंत मुरादबक्षाकडे घेऊन गेला तेव्हा अर्थात्‌व त्याच्या तोंडास पाणी सुटले असावे शहाजीराजानीं निजामशाहीस हस्तालंब देऊन विलक्षण शौर्य व पराक्रम प्रकट केला होता त्याचा विसर त्यास पडला नव्हता त्याप्रमाणेच शिवाजी महाराजानीं स्वराज्यस्थापनेच्या कामी प्रदर्शित केलेली अचाट कर्तबगारी व युक्तिमत्ता त्याच्या कानी वेळोवेळी गेलीच असावी तेव्हा असे पराक्रमी व शूर सरदार आपणास अनुकूल झाले तर निजामशाहीप्रमाणे अदिलशाही व कुतुबशाही बुडविण्यास आपणास विलंब लागणार नाहीं असें त्यास वाटणें सहाजिक होते.

महाराजाच्या ह्या नम्रतेच्या अर्जाचा जबाब मुरादबक्ष याने सन १६४८च्या मार्चमहिन्यात असा पाठविला कीं, तुमचे काय मागणे आहे ते कळविण्यासाठी तुह्मी आपला एकादा विश्वासू वकील इकडे पाठवावा त्याप्रमाणे महाराजानी वकील पाठविला मुरादबक्षाने शहाजहान बादशहास ही गोष्ट कळवून महाराजाचा अर्ज मान्य करण्याविषयी रदबदली केली, तेव्हा त्या बादशहाचे मन वळून त्याने विजापूरसरकारास असा खलिता पाठविला की, शहाजीराजे भोसले यास कोणत्याहि प्रकारचे शासन न करिता सोडून द्यावे, व महाराजास स. १६४९ च्या आगस्ट महिन्यात मुरादाच्याद्वारे असा जबाब लिहिला कीं, " शहाजीराजांचे पूर्वीचे गैरवर्तन मनात न आणिता त्याला आमच्याकडे नोकरीस ठेवण्यास आम्ही राजी आहों, व तुम्हासहि पाच हजार स्वारांची मनसब देण्यास तयार आहो तरी तुम्हीं आपल्या वडिलास व इतर नातलगास घेऊन दरबारी रुजू व्हावें " ह्या नंतर दोन महिन्यानी मुरादाने शहाजीराजांसही अशा आशयाचें पत्र पाठविलें, कीं, तुमचे पुत्र शिवाजी यांनीं तुमच्या सुटकेविषयीं अर्ज करून आपण हुजूरची नोकरी पतकरण्याची इच्छा प्रदर्शित केली हें पाहून आह्मांस समाधान वाटलें, व तुमचे मागील अपराध मनास न आणितां तुमची सुटका करण्याविषयीं लिहिलें आहे. आम्ही बादशहाकडे जाणार आहों. त्यांच्याकडे

तुमच्यासंबंधानें रदबदली करून तुमची पुनरपि नोकरीस राहण्याविषयींची विनंति मान्य करावयास लावूं तुम्हीं आपला एक इतबारी वकील मात्र पाठवा ह्मणजे त्याच्याबरोबर कौलाचे फर्मान व तुमचे पुत्र संभाजी वगैरे यास पूर्वी-प्रमाणे मनसबा देण्यात येतील. मोगलदरबाराशी मात्र तुम्हीं इत पर इमानानें वागलें पाहिजे तुमच्यावर ह्या दरबाराची पूर्ण कृपा आहे याचा सूचक ह्मणून तुह्माकरिता पोशाख पाठविला आहे त्याचा स्वीकार करावा ”

शहाजहानाचा खलिता अदिलशहास अमान्य करण्याची छाती नव्हती कारण त्यांचा मागे तह झाला असून मोगलबादशहास नाखुष केल्यास आपलें मोठेंच नुकसान होईल ही दहशत अदिलशहास होती त्याने शहाजीराजास जामिनावर खुलें केले[1]. परतु त्यास विजापूरशहर सोडून जाण्याची सक्त मनाई केली तेथे

---

[1] कित्येक बखरकाराचे असें ह्मणणे आहे की, रणदुल्लाखान व मुरारपत याच्या रदबदलीनें शहाजीराजे मुक्त झाले. त्यानी पातशहास असे सांगितलें ह्मणतात की, अशा थोर व शूर सरदाराचा अशा निंद्य रीतीने वध केल्यानें आपला दुर्लौकिक होईल, व सर्व मराठे सरदार आपणावर बिथरतील परतु हे खरे नसावे, कारण हे दोघेहि मुत्सद्दी ह्या वेळी हयात नव्हते असे दिसते रणदुल्लाखानाच्या रदबदलीचा चमत्कारिक प्रकार मागे दुसऱ्या भागांतील एका टिपेत दिला आहे प्रो सरकार ह्मणतात की, शहाजहानानें अदिलशहास खलिता पाठविला असावा असे वाटत नाही, तर रणदुल्लाखानाने रदबदली केल्यामुळेच शहाजीराजाची सुटका झाली असावी, परतु मुरादबक्षाकडून शिवाजी महाराजास व शहाजीराजास आलेली पत्रें त्यानी रा ब पारसनीस याजकडे मूळ पारशी भाषेंतली आहेत ती खरी मानून त्याचा अनुवाद केला आहे त्यातलें तिसरें पत्र मुरादबक्षाने शिवाजीमहाराजाच्या मार्च महिन्यातल्या अर्जानतर सहा महिन्यानी खुद्द शहाजीराजास लिहिलें असून त्याना त्याबरोबर पोषाखहि पाठविला होता, आणि मोगलाच्या नोकरीस राहण्यासंबधाचे बोलणें करण्यास वकील पाठवावा असें त्याने लिहिले होतें,आणि आगस्ट महिन्यात त्यानें शिवाजीमहाराजांस लिहिलेल्या पत्रात शहाजीराजास वगैरे घेऊन हुजुरास येण्याविषयी लिहिले होते. जेधे याची शकावली खरी मानिली तर शहाजीराजे जून महिन्याच्या सुमारास (ज्ये शु पौर्णिमेस) मुक्त झाले असावे मि किंकेड ह्मणतात कीं, शहाजीराजास शहाजहान बादशहाकडून वर दिलेल्या आशयाचें पत्र विजापुरास आलें ते पाहून अदिलशहाला मोठी चिंता उत्पन्न झाली असावी. शहाजीराजांचा वध केला तर शिवाजीमहाराज मोगल बादशहाचे अंकित होऊन त्यांनीं जिंकलेले मुलूख मोगलांच्या सत्तेखाली जातील आणि शहाजीराजे आता त्यांचे अंकित झाल्यामुळें त्यांचा आपण वध केला तर त्याबद्दल मोगल बादशहा आपणाकडे जाब मागील, असा विचार त्याला पडला. मग शहाजीराजाचे मित्र मुरार जगदेव व रणदुल्लाखान यांनीं रदबदली केल्यावरून त्यानें त्यांस सोडून दिलें.

त्यांस नजरकैदेंत ठेविलें. त्यानंतर शहाजीराजे विजापुरास सुमारें चार वर्षे अडकून राहिले होते तेथून सुटून जाण्याचे त्यानीं नाना प्रयत्न केले, परंतु अदिलशहा त्यास आपल्या कर्नाटकातील जहागिरीत काहीं केल्या जाऊं देईना त्याच्या वतीने बऱ्याबऱ्या सरदारानी पादशहाची पुष्कळ समजूत केली, पण त्याने आपला ठराव पालटला नाहीं चार वर्षांनंतर राजास कर्नाटकात जाऊं देण्यास मुख्यत असें कारण झाले कीं, त्या मुलखात जिकडेतिकडे धुमाळी सुरू होऊन पातशहाचा तिकडील अमल नाहींसा होण्याचा रग आला तेव्हा तिकडील फुंडांचा बंदोबस्त लावण्याचे काम अत्यंत कठीण असून ते शहाजीराजासारख्या हुशार व शूर सरदाराच्या हातूनच पार पडण्यासारखे होते, हे जाणून अदिलशहास राजाला तिकडे रवाना करणें भाग पडले, परंतु त्यास तिकडे पाठविण्यापूर्वी त्याने त्याच्याकडून अशी आणभाक करून घेतली कीं, त्यानी मुधोळकरास व त्याच्या जाहगिरीस कदापि उपद्रव करू नये पातशहा इतकेच करून थाबला नाहीं तर त्यानी झालेली गोष्ट विसरून जाऊन परस्परामध्ये सलोखा व्हावा ह्मणून त्याने त्यास असें सागितले कीं, तुह्मी आपआपल्या इनाम जमिनीची अदलाबदल करावी घोरपड्याने कर्नाटकातील सगळी जाहगीर शहाजीराजास द्यावी व त्यानी कऱ्हाड प्रातावरील आपले हक्क घोरपड्यास द्यावे पादशहाच्या ह्या हुकमावरून त्यानी ही अशी अदलाबदल केली

परतु शहाजीराजाच्या मनातला घोरपड्याविषयीचा दंश किमपि गेला नाहीं. नजरकैदेंतून सुटून कर्नाटकात पाऊल पडताच राजानी शिवाजीमहाराजाला असें पत्र लिहिले की, 'तुह्मी आमचे खरे पुत्र असाल तर बाजी घोरपड्यास शिक्षा कराल.' खरे ह्मटलें असता हा राजाकडचा निरोप त्यास हवा होता असें नाहीं. त्याच्या मनात घोरपड्याविषयी पुरा द्वेष उत्पन्न होऊन ते त्यास शिक्षा करण्याची योग्य संधि पाहतच होते ही संधि त्यास पुढे आठनऊ वर्षांनीं आली. शहाजीराजानी मनावर घेतले असते तर त्याचा सूड उगविण्यास त्याला उशीर लागला नसता, परंतु त्यास पातशहाचा आश्रय असल्यामुळें त्याशीं उघड वैर करवेना पुढे स १६६१ च्या सुमारास वाडीचे खेमसावंत व लखमसावत देसाई यानी विजापूरकराची मदत घेऊन शिवाजीमहाराजाशीं लढाई करण्याचा बेत केला, तेव्हा त्याच्या मदतीस ह्या बाजी घोरपड्यास दिले. त्यावरून घोरपडे विजापूरकराच्या सैन्यासह कोंकणात यावयास निघाला. तो तिकडे जाण्यापूर्वी पहिल्यानें आपलें गाव मुधोळ येथे गेला. महाराजांला घोरपडे

आल्याची खबर लागताच त्यांनीं विशाळगडावरून मोठ्या वेगानें कूच करून जाऊन मुधोळावर अकस्मात् छापा घातला. घोरपड्याची व त्याची मोठ्या निकराची लढाई झाली. तींत घोरपडे पडला मग महाराजानीं सगळें मुधोळ शहर लुटून जाळून उद्ध्वस्त करून टाकलें, व घोरपड्याचे सगळे नातलग व हातीं लागले तितके लोक पकडून ठार मारिले असें. सागतात कीं, ह्या वेळीं सुमारें तीन हजार लोकांचा संहार महाराजानी केला! एवढं भयकर कृत्य ह्यापूर्वी किवा ह्यानंतर त्याच्या हातून कधीहि झालें नाहीं परतु यवनाचा पक्ष धरून केवळ आपला तळिराम गार करण्यासाठी ह्या घोरपड्यानें[1] शहाजीराजाचा जीव धोक्यात घातला ह्याबद्दल महाराजाच्या मनात केवढा प्रखर दंश होता हें यावरून दिसून येतें, व पितृभक्ति त्याच्या ठायी किती उज्ज्वल होती हेंहि चागलें व्यक्त होतें

शहाजीराजे विजापुरास १६४९ पासून १६५३ पर्यंत नजरकैदेंत होते. तितक्या अवकाशात महाराजानी विजापूरसरकारच्या मुलखास काहींएक उपद्रव केला नाहीं कारण उघडच होते की, आपल्या पूर्वक्रमास अनुसरून यत्किंचित् गडबड त्या सरकारच्या प्रातांत केली असता आपल्या प्रिय पित्याच्या जिवास धोका आहे हें ते जाणून होते बरें मोगलाच्या मुलखात काहीं धामधूम करूं म्हटलें तर तिकडून मोगलबादशहाचा रोष होऊन आपल्या पित्यावर पुन प्राण-सकट यावयाचें, हें त्यास पक्के माहीत होतें यास्तव हा एवढा काळ त्यास जागच्या जागीं स्वस्थ बसून काढावा लागला त्यात सुख मानण्यासारखी गोष्ट एवढीच होती की, विजापूरसरकारानें मोगलबादशहाच्या भीतीस्तव महाराजापाशीं अशी अट घातली नाहीं की, आमचे जे किल्ले व प्रात तुह्मीं घेतले आहेत ते आमचे आह्मांस परत दिले नाहींत तर आम्ही शहाजीराजास देहातशासन करूं.

---

१ बाजी घोरपड्याचा मालोजी नावाचा एक मुलगा ह्या गडबडीत बचावला असून तो पुढें आपल्या बापाच्या जहागिरीचा मालक झाला हा मालोजी मोठा पराक्रमी निपजला. असा बलाढ्य सरदार आपणास वश झाल्यानें आपलें मोठें कार्य होईल असें वाटून महाराजानीं त्याला भागानगराकडून एक पत्र पाठविलें व त्यात असें दर्शविलें कीं, घोरपडे व भोंसले ह्या घराण्यातील कलह नाहींसा होऊन पर-स्परांचें सख्य व्हावें व उभयता मिळून यवनास पादाक्रात करून मराठ्याचें राज्य स्थापावें असें आमच्या मनात आहे. परतु ह्या मलोख्याच्या पत्रानें हा मालोजी वळला नाहीं. तो शेवटपर्यंत विजापूरकराच्या नोकरीस राहिला.

महाराजांनीं ह्या एवढ्या अवकाशात काबीज केलेल्या किल्ल्यांची डागडुजी व व्यवस्था नीट केली, व हातीं आलेल्या प्रांतात जमाबंदीची वगैरे शिस्त लाविली.

आता विजापूरसरकारानें तरी शिवाजीमहाराजाचें पारिपत्य करण्याचा प्रयत्न एवढ्या अवकाशात केला नाहीं, याचें कारण असें असावें कीं, त्यानीं मोगल बादशहास शरण जाऊन त्या सरकारास शह दिला होता, व ते मोगलाच्या पदरीं नोकरी करण्यास तयार झाले होते हे अदिलशहास कळून चुकलें होतें. यास्तव त्याच्या वाटेस ह्या वेळी गेलें असता काबीज केलेले किल्ले व प्रांत मोगलाच्या स्वाधीन करून त्यास शरण जाऊन ते त्यांस आपणावर स्वारी करण्यास चिथावून देतील, आणि मग आपली धडगत राहणार नाहीं अशी दहशत अदिलशहास वाटणें साहजिक होतें

# भाग नववा.



## मोगलांशीं संबंध.

### १६५०–५७

**पितृसंकटनिवारणार्थ** व आरंभिलेले कार्य सिद्धीस न्यावयास आलेला जबरदस्त प्रत्यवाय नाहींसा करण्यासाठी महाराजानी केवळ निरुपायास्तव शहाजहान बादशहास पूर्वोक्त प्रकारे शरण जाऊन त्याची नोकरी पतकरण्याचा हेतु केवळ बाह्यात्कारी दर्शविला त्याच्या साहाय्याने पित्याची मुक्तता झाल्यावर त्याच्याशी केलेला करार पाळण्यास महाराज टंगळमंगळ करू लागले खरें ह्मटलें असता ही त्यानी त्या बादशहास केवळ गुलकावणी दाखविली यवनाची ताबेदारी प्राण गेल्याहि करावयाची नाहीं असा दृढ संकल्प महाराजांनी केला होता तो अशा संकटाने ढळणारा नव्हता

पुढे दिल्लीपतीकडून महाराजास असा तगादा आला कीं, तुह्मी आपल्या कराराप्रमाणे वागावें, व आमच्याकडे नोकरीस येऊन आह्मी देऊ केलेली मनसब स्वीकारावी हा तगादा महाराजानी मोठ्या युक्तीनें टाळला त्यानी मुरादाकडे आपला वकील रघुनाथपंत यास पाठवून अशी मागणी केली कीं, "जुन्नर व अहमदनगर ह्या प्रातात आमचे वडिलोपार्जित सरदेशमुखीचे हक्क अलीकडे वसूल झालेले नाहींत, ते आमचे हक्क ह्या प्रातात मंजूर व्हावे " त्यानें महाराजांला असें उत्तर पाठविलें की, आह्मी बादशहाच्या हुजुरास गेल्यावर तुमच्या मागणीचा अनुकूळ विचार होईल परंतु आपणांकडील एक वकील मात्र पाठवून द्यावा, त्यास विचारूं तो मजकूर समजावून देतां आला पाहिजे, ह्मणजे काम होण्यास दिरंग लागणार नाहीं हें असें पत्र त्या शहाजाद्याकडून १६४९ सालच्या अखेरीस आलें होते. ह्याप्रमाणें शहाजहानाचा नोकरी धरण्याविषयींचा आग्रह महाराजांनीं कांहींना कांहीं निमित्त पुढें करून चालढकलीवर टाकला.

सन १६५७ त शहाजहानानें आपला पुत्र औरंगजेब व मीरजुमला यास विजापूरचें राज्य काबीज करण्यासाठीं मोठे सैन्य देऊन रवाना केलें [१] त्यांनी सरहद्दीवरचे कल्याण, बेदर वगैरे किल्ले सर करण्याचा सपाटा चालविला तेव्हां महाराजानी औरगजेबापाशी स्नेहभावाचे बोलणे लावून असे कळविलें कीं, " आम्ही दिल्लीपतीचे नोकर आहों आम्ही तुह्माला ह्या मोहिमेत लागेल ते साहाय्य करण्यास तयार आहों आम्हीं विजापूरकराचे जे किल्ले व प्रात हस्तगत केले आहेत ते आमच्याकडे राहूं द्यावे विजापूरकराचे समुद्रकिनाऱ्याचे दाभोळ वगैरे प्रात आम्ही तुमच्यासाठी काबीज करितो " हे महाराजाचे बोलणे त्या शहाजाद्यास मान्य होणे साहजिक होते. कारण त्याला महाराजाची योग्यता चागली महशूर होती त्याने त्यास पत्र लिहून कळविले कीं, तुमच्या ताब्यात विजापूरसरकाराचा जो प्रांत आहे त्यास आम्ही इत पर हात लावणार नाहीं तुमच्या मनात समुद्रकिनाऱ्याचा मुलूख काबीज करण्याचे आहे त्याप्रमाणें तुह्मी अवश्य करावे

ह्या वेळी औरंगजेबाच्या मनात शिवाजीमहाराजाची मुलाखत घेऊन त्याला असें प्रत्यक्ष सागावयाचे होते की, ' ह्या मोहिमेत तुमचा आमचा हितसबंध सारखाच आहे, तुह्मी आह्माला सामील होऊन मनापासून मदत कराल तर त्यांत तुमचे पुष्कळ कल्याण होणार आहे ' अशा आशयाचे त्याने महाराजाला पुढें पत्रहि पाठविले होते ह्याप्रमाणे आमीष दाखवून महाराजाला वश करून घेण्याचा ह्या शहाजाद्याने बराच प्रयत्न केला, परतु महाराज कसले वस्ताद ! त्याच्या गुलकावणीला ते मुळीच फसले नाहीत आपण दिल्लीपतीचे ताबेदार आहों असे निरोप ते त्याला वारवार पाठवीत, एवढेच ह्याप्रमाणे औरगजेबाला नम्रता दाखवून त्यानी त्याच्या सैन्याची वावटळ आपल्या मुलखास कांहींएक उपद्रव न होऊं देता दूर घालविली मोगलाचे सैन्य लाब जाऊन विजापूरकराशी लढण्यांत गुतले आहे असे पाहून महाराजानी आपले सामर्थ्य साधेल त्या उपायानें वाढविण्याचा निर्धार केला

१ प्रो. सरकार ह्मणतात का, औरगजेब स १६५३ पासून दक्षिणेतील सुभ्यावर आला असून स. १६५६ त तो गोवळकोड्याच्या शहाशी लढत होता स. १६५६ च्या नवेंबर महिन्यात महमद आदिलशहा वारला तेव्हा त्याने विजापुरावर स्वारी करण्याची तयारी करून त्या दरबारच्या सरदारास व माडलिकांस वश करून घेण्याचा प्रयत्न चालविला. तेव्हा शिवाजी महाराजांनी अहमदनगरचा मोगल सुभेदार मुलताफतखान याच्याद्वारे औरगजेबापाशीं स्नेहभावाचे बोलणे लाविलें.

यवनी बखरींच्या आधारानें प्रो. सरकार ह्मणतात कीं, मोगलांनीं अदिल-शाही मुलखांत धुमाकूळ मांडला तेव्हां त्या दरबारानें शिवाजीमहाराजास फार मोठी लालूच दाखवून मोगलांच्या नैर्ऋतीकडील प्रातावर हल्ला करावयास सांगि-तलें तें अर्थात् अशा हेतूने कीं, मोगल अदिलशहाच्या ईशान्येकडील प्रांतावर चालून येऊन बेदरास त्यानी वेढा दिला होता, तो उठवून ते आपल्या प्राताच्या रक्षणार्थ परत जातील. ह्याप्रमाणें त्यानी मिनाजी भोंसले व काशी यास तिकडे स्वारी करावयास पाठविलें. त्यानीं स. १६५७ च्या मार्च महिन्यात भिमानदी ओलाडून चामारगोंद्याचा प्रात लुटण्याचा धूमधडाका चालविला, अशी लुटालूट करीत ते थेट अहमदनगराच्या वेशीपर्यंत जाऊन थडकले

येणेंप्रमाणें मिनाजीस पूर्वेकडे अहमदनगर प्रातात पाठवून महाराज स्वतः जुन्नर शहरावर चालून गेले हे शहर या वेळी चागलें सपन्न असून महाराज त्या शहरासंबंधानें व अहमदनगरासंबंधानें दिल्लीपतीपाशीं हक्क सागत होते. परंतु तो त्याचा हक्क त्यानें मुळीच कानावर घेतला नव्हता यास्तव ह्या गोष्टीचा सूड उगविण्याच्या इराद्यानें त्यानी तीं शहरें लुटण्याचा विचार मनात आणिला होता. जुन्नरशहरावर त्यानी रात्रीचा छापा घातला आणि तटाला दोऱ्या लावून आत उतरून तेथल्या ठाण्यावरील लोकाची कत्तल उडविली आणि तें शहर यथेच्छ लुटले त्यात त्यास तीन लाख होन, दोनशे घोडे व इतर पुष्कळ मोल-वान् चीजवस्त सापडली ही लूट त्यांनीं लागोलाग पुण्यापर्यंत नेऊन पोंचविली. तेथे काहीं लोक पूर्वीच ठेवून दिले होते त्याच्या हवालीं ती करून त्यांस ती राजगडास ताबडतोब न्यावयास सांगितले.

औरंगजेबास ही गोष्ट कळली तेव्हा त्यानें तेथल्या ठाणेदारास मोठा ठपका देऊन त्याच्या मदतीस काहीं सैन्य रवाना केलें त्यानें नसिरीखान, इराज-खान व दुसऱ्या काहीं सरदारास तीन हजार लोक देऊन अहमदनगर प्रांताचें रक्षण करण्यास व शिवाजीमहाराजाच्या मुलखावर स्वारी करण्यास पाठविलें. त्याप्रमाणेंच रावकर्णनामा सरदार औरंगाबादेकडून शहाजाद्याचा मदतीस येत होता त्यासहि त्यानें अहमदनगर प्रांतांत शिवाजी महाराजावर जावयास सांगि-तलें, आणि शास्ताखानास आपल्याकडचे एक हजार लोक तिकडे घेऊन जाण्याचा हुकुम केला. इकडे मराठे अहमदनगरापर्यंत लुटालूट करीत आले, हें ऐकून अहमदनगरचा किल्लेदार मुलताफतखान त्यांच्यावर चालून गेला; आणि त्यानें चामारगोंद्याचा हल्ला उठवून मिनाजीचा पाठलाग केला. पण त्यानें

त्यांस दाद दिली नाहीं तो त्या प्रांतात एकसारखा धुमाकुळ उडवीत होता. जुन्नर शहर लुटल्यावर महाराज त्याच्या आसपासचा प्रात लुटीत असतां राव-कर्ण व शास्ताखान त्यांच्यावर चालून आले तेव्हा ते जुन्नर परगण्यांतून निसटून जाऊन अहमदनगर परगण्यात शिरले आणि तिकडे लुटालूट करूं लागले; आणि अहमदनगरापाशीं काहीं लोकानिशी ते अकस्मात् आले आणि शहरच्या पेटा लुटूं लागले ही बातमी किल्ल्यावर पोंचताच तेथून मुलतफातखानानें कांहीं लोक शहराच्या बचावासाठीं रवाना केले त्यामुळे त्यास ते शहर हवेंतसे लुटावयास सापडलें नाहीं तरी ह्या हल्ल्यात त्यास बरेंच द्रव्य मिळाले[1] सातशे घोडे व चार हत्ती त्याच्या हातीं लागले. हे घेऊन महाराज शत्रूच्या तावडीतून पार निघून गेले ह्या झटापटींत त्याचे कित्येक लोक प्राणास मुकले ह्या वेळीं आणखी वर सागितलेल्या नसरीखानानेहि त्याच्याशी लगट केली होती. ह्या सरदारा-बरोबर मोठे सैन्य असल्यामुळे महाराजाचा निभाव न लागून ते शत्रूस झुकांडी देऊन पार निघून गेले मोगलाचे घोडदळ अगदी थकून गेल्यामुळे त्याचा पाठलाग करण्याचे त्यास त्राण उरलें नव्हतें

ही लूट मिळाल्यावर महाराजानी आपले घोडदळ वाढविण्याचा सपाटा चालविला वर सागितल्याप्रमाणे त्यास जुन्नर व अहमदनगर ह्या शहरांत पुष्कळ घोडे मिळाले होते. त्याशिवाय आणखी जिकडून घोडा मिळेल तिकडून तो खरेदी करून आणिला त्यावर आपले बारगीर स्वार केले व मराठे शिलेदार मिळाले तेवढे चाकरीस ठेविले ह्यापूर्वी जे घोडदळ महाराजांपाशी होतें त्यावर माणकोजी दहातोंडे यास मुख्य नेमिलें असून त्यास सरनौबत हा किताब दिला होता हा माणकोजी पूर्वी शहाजीराजाच्या नोकरीस असून मोठा अनुभवशीर होता त्याने ह्या घोडदळाची व्यवस्था उत्तम ठेविली होती. तो वारला तेव्हा त्याच्या जागी नेताजी पालकर नामक एका शूर सरदाराची नेमणूक महाराजानी केली. हा पालकर मोठा हुशार व धाडशी होता. त्याचा मराठे शिलेदारात मोठा लौकिक होता त्याच्या वशिल्यानें पुष्कळ शिलेदार महाराजाच्या नोकरीस येऊन राहिले.

शिवाजीमहाराजानी मोगलाच्या जुन्नर व अहमदनगर परगण्यात धुमाकूळ उडवून देऊन पाठीवर मोगलाचें सैन्य असूनहि हीं दोन्हीं शहरें लुटलीं,

---

१ प्रो. सरकार ह्मणतात की, मुल्तफातखानाने शहरांतल्या लोकाचा व त्यांच्या राजवस्तीचा बचाव व्हावा ह्मणून त्यास किल्ल्यात नेऊन ठेविले.

आणि शेवटी त्याच्या सरदारास दाद न देतां आपल्या सुरक्षित किल्ल्यांत परत गेले हें पाहून औरंगजेब संतप्त झाला आणि त्यानें नसरीखान वगैरे सरदारास असा एकसहा हुकूम दिला कीं, ' मराठे सापडतील तेथे त्याची कत्तल उडवावी शिवाजी महाराजाच्या प्रातात शिरून तेथल्या लोकाचा सहार करावा किंवा त्यास गुलाम करावे त्याची पुणें, चाकण वगैरे ठाणी सर करून साफ विध्वस्त करून टाकावी मोगली अमलातल्या ज्या देशमुखानी किवा इतर शेतकऱ्यानी मराठ्यास भर दिली असेल त्याचा वध करावा. त्याची कींव अशी मुळीं करूं नये ' विजापूरकराशी युद्ध जुंपले होते तोपर्यंत आपला नैर्ऋतीकडचा प्रांत मराठ्याच्या हाती लागू नये ह्मणून त्यानें त्या बाजूच्या चारपाच ठिकाणी आपल्या लष्कराची ठाणी करून त्यास अशी ताकीद दिली की, मराठ्याचा मोगली मुलखात बिलकुल शिरकाव होऊं देऊं नये, आणि त्याच्या मुलखात वारंवार छापे घालून तो उध्वस्त करावा परतु औरगजेबाच्या हुकमाची अमलबजावणी करण्यास त्याच्या सरदारास महाराजांनी बिलकुल सवड दिली नाहीं

पुढे मोगलानी विजापूरकराचा जिकडूनतिकडून मोड करून त्यास अगदी जेरीस आणिले, हे वर्तमान महाराजाच्या कानी आले तेव्हा आता आपली वाट काय होते याची धास्ती त्यास उत्पन्न झाली विजापूरकराचा पुरा पराभव केल्यावर औरंगजेब आपल्यावर उलटला असता त्याच्याशी टक्कर देण्याचे सामर्थ्य आपणास अद्यापि आलेले नाहीं हे त्यास माहीत होते यास्तव हे सकट सामोपचारानें टळते तर पाहावे असा विचार करून महाराजानी औरगजेबास अगदीं नम्रतापूर्वक अर्ज[1] केला की, 'मी आपल्या दोन शहरास उपद्रव दिला त्याबद्दल मला क्षमा करावी. अशी आगळीक मी पुन कधी करणार नाहीं इत पर मी आपल्या सेवेंत हजर राहून अगदी इमानाने वागेन. आपला पक्ष मी कदापि सोडणार नाहीं ' ह्या आशयाचे पत्र लिहून आणखी ह्या आपल्या

---

१ प्रो सरकार ह्मणतात की, हा अर्ज त्यानीं नसरीखानास केल्यावरून त्यानें त्यास असा निरोप पाठविला की, तुह्मी आपला वकील आमच्याकडे पाठवून काय मागणी करावयाची असेल ती करा. त्यावरून महाराजानीं रघुनाथपतास प्रथम त्या सरदाराकडे पाठविले. तेव्हा त्यानें औरंगजेबास ही गोष्ट कळविली; परतु त्याने काहींएक निश्चित जबाब दिला नाही. त्यावरून त्यांनीं पुनः खुद्द औरंगजेबालो विनंति अर्ज लिहिला.

ह्मणण्यांची खातरजमा करण्याकरितां आपला विश्वासू व हुशार वकील रघुनाथ बल्लाळ कोर्डे यास त्यांनी शहाजाद्याकडे पाठविलें

परंतु इतक्यात शहाजहान आजारी पडल्याचें पत्र औरंगजेबाची बहीण रोशनार हिजकडून आल्यामुळें व विजापूरकराशी तह होऊन दक्षिणेंतली कामगिरी बहुतेक आटोपल्यासारखीच झाल्यावरून तो आपली फौज घेऊन दिल्लीकडे लगबगीने गेला तो उत्तरेकडे चालला आहे असें पाहून महाराजानीं त्याच्याकडे कृष्णाजी भास्कर[१] ह्या नावाचा दुसरा एक वकील पाठविला, व त्यास असें कळविलें की, आम्ही जो दिल्लीपतीचा अपराध केला आहे त्याबद्दल आम्हास आता फारच पस्तावा वाटत आहे आम्हीं इकडे पुष्कळ घोडेस्वार जमा केले आहेत प्रस्तुतसारख्या प्रसंगी आपणास जरूरी असल्यास साहाय्य करण्यास आम्ही तयार आहो, आणि दक्षिणेतील तुमच्या मुलखाचें रक्षण तुमच्या पश्चात् करण्याचे काम आमच्यावर सोपविले असता आम्ही ते मोठ्या खुशीनें पतकरूं. परतु आपल्या हातीं गेलेल्या प्रातात आमचे काहीं वंशपरपरागत आलेले हक्क आहेत ते आपण चालू करावे, आमच्या घराण्याच्या जाहगिरीचा काहीं भाग आपल्या कबजांत गेला आहे तो आह्मास परत मिळावा, व जुन्नर आणि अहमदनगर ह्या प्रातातील आमची देशमुखी आह्मास परत मिळावी, ह्मणजे आह्मी आपल्या लोकानिशीं दिल्लीपतीची जी नोकरी बजावूं तीबद्दलचा मोबदला आह्मास मिळाल्यासारखें होईल त्याप्रमाणेच कोकणप्रात अदिलखानाच्या ताब्यात दिला आहे त्याची व्यवस्था त्याच्याकडून चागलीशी लागलेली नाहीं. हा प्रात आमच्याकडे दिल्यास पुष्कळ फायदा होणार आहे ''

ह्या आशयाचें पत्र घेऊन महाराजाचा वकील औरंगजेबाकडे गेला त्या वेळीं तो अगदीं गडबडींत होता यास्तव त्या पत्रातील फाजील मागण्या पाहून त्याला राग तर आला नाहींच, पण त्यानें असें मनात आणिलें कीं, आपल्या प्रातात ज्या हक्काच्या वगैरे मागण्या शिवाजीमहाराज करीत आहेत ते त्यांस मिळण्याची आशा तूर्त लवून ठेवावी, व विजापूरच्या राज्यांत जो त्यांनीं धुमाकूळ मांडला आहे तो तसाच चालविण्यास त्याला उत्तेजन द्यावें, यांतच आपल्या ताब्यांतील मुलखाचा बचाव आहे. मग महाराजांच्या सदरील पत्रास त्यानें असा युक्तीनें जबाब दिला कीं, ' तुम्हीं केलेल्या अपराधांबद्दल तुम्हांस पश्चात्ताप

---

१ प्रो॰ सरकार ह्या वकिलाचें नांव रघुनाथपंत असें देतात.

झाला आहे ह्मणून तुह्मास क्षमा केली आहे. कोंकणांतला प्रांत तुम्हीं खुशाल कबजात घ्यावा सोनोपंतास ( आबाजी सोनदेवास ) आमच्याकडे पाठवून द्यावे, म्हणजे तुमच्या वडिलोपार्जित हक्कासंबंधाने वाटाघाट करिता येईल. तुमच्या आमच्यामध्ये शेवटचे करार नक्की झाले ह्मणजे तुम्हीं पांचशे स्वार आमच्या कुमकेस पाठवून द्यावे, व आमच्या मुलखात बंदोबस्त व शांतता ठेवण्यासाठी तुमचें बाकीचें सैन्य सर्वदा तयारींत ठेवावे "

ह्या उभयपक्षाच्या पत्रव्यवहारापासून काहींएक निष्पन्न झाले नाहीं उभयतांनीं परस्परास मनाचे बोट दाखविले एवढेच त्याच्यामध्ये कायमचा असा करार काहींच झाला नाहीं कारण उघडच होते की, औरंगजेब ह्यानंतर आपल्या बंधूंशी लढण्यात व बापास कैदेत टाकून गादी बळकवण्याच्या धामधुमीत गुंतला होता. महाराजाला तरी हेच हवे होते. त्याला हे ठाऊक होते की, आपण केलेल्या मागण्या औरंगजेब कधीहि मान्य करणार नाहीं, परंतु त्यास अशा रीतीने झुलविल्याने तात्कालिक अनर्थ टळून आपला कार्यभाग साधून घेण्यास चांगला अवकाश सापडावा ह्मणून त्यानीं ह्या वेळी त्यास अशी नम्रता दाखविली औरंगजेब तरी काहीं कमी धूर्त नव्हता शिवाजीमहाराजाची ही नम्रता केवळ मानभावीपणाची असून आपली पाठ वळताच ते आपल्या मुलखास त्रास देण्यास कमी करणार नाहींत हे त्यास पक्कें कळून चुकले होतें. ह्मणून उत्तरेस जाताना त्यानें आपला सरदार मिरजुमला यास अशी ताकीद दिली की, नैर्ऋत्येकडील प्रांतावर चांगलें लक्ष ठेव. ' तो कुत्र्याचा पोर ' टपून राहिला आहे, त्याप्रमाणेच अदिलशहाला त्याने असा निरोप पाठविला की, शिवा काही किल्ल्यात लपून छपून आहे त्याला हाकून द्या, तुह्मांला त्यास आपल्या पदरीं ठेवावयाचे असेल तर त्याला दूर कर्नाटकात जहागीर देऊन ठेवा, ह्मणजे त्याचा आमच्या मुलखास उपद्रव होणार नाहीं.

असें सांगतात कीं, औरंगजेबाने दिल्लीस जाऊन आपल्या बापास बंदीत घालून त्याचे तक्त बळकावण्याचा इरादा मनांत आणिला व आपल्या साहाय्यास दक्षिणेंतील सरदारांस पत्रे पाठवून बोलाविलें. इतरांबरोबर शिवाजीमहाराजासहि ह्या आशयाचें पत्र आलें. तें वाचून पाहतांच त्याच्या अंगावर शहारे आले. बापविरुद्ध उठून पुत्रानें बंड करावें हें त्यांस मुळींच आवडलें नाहीं. त्यांनी त्याचा धिक्कार केला व तें पत्र घेऊन येणारास आपल्या समोरून हांकून दिलें. इतकेंच करून महाराज थांबले नाहींत, तर त्यांनीं तें पत्र कुत्र्याच्या शेपटास

बांधून पुणें शहरांतील रस्त्यात फिरविलें व औरंगजेबाचा ह्या कुकर्माबद्दल सर्व लोकांत उपहास केला. औरंगजेबाला आपल्या पत्राचा हा असा अनादर झालेला कळला तेव्हां त्याला फार राग आला, व त्यानें अशी प्रतिज्ञा केली की, ह्याबद्दल महाराजांचा लवकरच सूड उगवावयाचा परंतु हा सूड त्याला कधींच उगविता आला नाहीं ! फार काय पण हा महाराजांविषयीचा त्याचा रागहि लवकर नाहींसा झाला असावा कारण असें की, पुढे स १६५९ त महाराजानीं अफजुलखानास नामोहरम केल्याचे वर्तमान त्या बादशहास कळलें तेव्हां त्यानें महाराजास मोठ्या गौरवाचे व शाबासकीचें पत्र पाठविलें, व ह्या त्याच्या पराक्रमाबद्दल परितोषिक ह्मणून त्यास त्याने विजापूरकराच्या सरहद्दीवरील दोनतीन किल्ले दिले. इतकेंच करून तो राहिला नाहीं, तर त्याने महाराजास हा स्तुत्य क्रम पुढे चालविण्यास आग्रहपूर्वक सागून असें वचन दिलें की, तुह्मी विजापूरकराचे जे प्रात काबीज कराल त्यावरची खंडणी तुह्मास माफ करण्यात येईल हे असें उत्तेजन औरंग-जेबाने महाराजास दिले यात त्याचा मतलब अर्थात् असा होता की, शिवाजी-महाराजाच्या हातून अदिलशाही बरीच कमजोर झाली ह्मणजे ती बुडविण्यास आपणास सोपे जाईल, व शिवाजीसारख्या बाडगुळासहि तत्काळ छाटून टाकिता येईल. परंतु हे शेवटले काम पुढे किती जड होणार होतें हे त्या धूर्त बादशहाच्या ध्यानींमनीहि त्या वेळी नव्हतें.

# भाग दहावा.



## विजापूरकरांचा आणखी मुलूख काबीज करितात.

## १६५४–५८.

शहाजीराजांची विजापुराहून सुटका होऊन ते कर्नाटकांत सुखरूपपणें जाऊन पोहोचल्यावर महाराजानी विजापूरसरकाराच्या राज्यात पुन धामधूम सुरू केली. सगळा घाटमाथा व कोकणपट्टी आपल्या हाताशी घालण्याचा त्यानीं बेत केला, व आणखी किल्ले सर करण्याचा क्रम सुरू केला हें वर्तमान विजापूरदरबारास कळलें तेव्हा त्यास मोठी चिंता पडली सैन्य पाठवून त्याच्याशी युद्ध करण्यास प्रवृत्त व्हावे तर ते मोगलाचा आश्रय करून उद्याचें विघ्न आज उभे करितील, कारण अदिलशाही बुडविण्याचा विचार मोगल बादशहाच्या मनात पुष्कळ दिवस होता यास्तव महाराजाशी समोरासमोर सामना न करिता त्यास युक्तीनें पकडून आणावे असा विचार त्या दरबारात होऊन त्या कामगिरीवर बाजी शामराज नावाच्या एका सरदारास बरोबर दहा हजार लोक देऊन पाठविलें. महाराज त्या वेळीं महाडप्रातात होते बाजी शामराज वाईच्या वाटेनें आला तो जावळीच्या चंद्रराव मोऱ्याच्या आश्रयाने पारघाटाजवळ दबा धरून बसला. मनात कीं, महाराज त्या वाटेनें आले ह्मणजे त्यास अचानक पकडावें, परंतु महाराजांचे हेर नेहमीं चोंहोकडे अनेक वेषानी फिरत त्यांनी येऊन त्याच्याविषयींची बातमी दिली त्यावरून महाराज सावध होऊन आपल्या लोकांनिशीं पारघाटाच्या पायथ्याशी त्या बाजीवर एकाएकीं जाऊन तुटून पडले, व त्याच्या लोकांची दाणादाण करून त्यास रानोमाळ पळावयास लाविलें.[1] असा

---

१ चिटणीस ह्मणतो की, बाजी शामराज महाडास जाऊन पोंचला तेव्हा शिवाजीमहाराज चेऊल बदर लुटून हस्तगत करण्यात गुतले होते. तेथून ते थेट राजगडावर गेले, आणि महाराजाच्या एका तुकडीनें बाजी शामराजावर हल्ला करून त्याचा अगदीं मोड केला. शेडगावकराच्या बखरीत असा उल्लेख आहे कीं, महाराजांला पकडण्यासाठी र[illegible]तपूरचा रणदुल्लाखान व दतवडचा बाजी घोरपडे यांस ८००० लोकांसह पाठविलें [illegible]तें. [illegible]जवर महाराजानीं व नेताजी पालकरानें दोहोंकडून हल्ला करून त्यांचा पराभ[illegible] केला.

त्याचा पराजय झाल्यावर तो निरुत्साह होऊन रडत माघारीं विजापुरास गेला.

ह्या बाजी शामराजाला जावळीचा कृष्णाजी बाजी[1] चंद्रराव मोरे यानें आपल्या प्रातांतून येऊं देऊन प्रसंगी मदतहि केली, हें पाहून महाराजांस त्याचा मोठा राग आला, आणि त्याचा काटा काढ्न टाकित्यावाचून त्याच्या प्रातास लागून असलेला आपला मुलूख सुरक्षित होत नाहीं असे त्यास वाटलें. ह्या मोऱ्याच्या ताब्यात कृष्णा व वारणा ह्या नद्याच्या दरम्यानचा घाटमाथ्यावरील प्रात होता. त्याच्या पदरी दहाबारा हजार मावळे वगैरे होते. तो आपणास राजा ह्मणवीत असे सोळाव्या शतकात याच्या पूर्वजास विजापुरच्या अदिलशहाने ही जहागीर दिली होती त्या सरकारास नियमित करभार देऊन बाकीच्या उत्पन्नाचा उपभोग तो स्वत घेत असे, व जवळपासच्या मुलखांत लुटालूट करून गब्बर झाला होता हशमगड येथें त्याचे ठाणे असे. बरेच किल्ले व खोरी त्याच्या ताब्यात होतीं महाराजानी ह्यापूर्वी अनेक वेळा त्याच्याशीं सलोख्याचें बोलणें लावून आपल्या मसलतीने राहावयास त्याला सागून पाहिलें होतें[2] महाराजानीं त्यास असें सागून पाठविलें, कीं, ‘ तुह्मी आपणास राजे ह्मणवितां तें केवळ व्यर्थ होय आह्मी खरे राजे आह्मास श्रीशंभूनें राज्य दिलें आहे तुह्मी विजापूरकरास कर देता तो देण्याचे बंद करून आह्मांस देत जावा, व आमचे अकित व्हावें हें मान्य होत नसल्यास सगळेच उत्पन्न तुह्मीं भोगावें व आह्मास जरूर लागेल तेव्हा पाच हजार लोक मदतीस देत जावें. तुह्मांवर कसेंहि संकट आलें तरी आम्ही तुमची कुमक करूं आमचे अकित न होतां बदफैल व्हाल तर तुमची जावळी हस्तगत करून तुह्मास कैद करून ठेवूं ’ हें त्याला मुळीच मान्य झालें नाहीं

१ मि. किंकेड व रा ब. पारसनीस याचे नाव बाळाजी कृष्णाजी असें देतात; परंतु रा. ब. पारसनीस यानी ‘ इतिहाससग्रहा ’ च्या पहिल्या वर्षाच्या दहाव्या व अकराव्या अकांत प्रसिद्ध केलेल्या मोऱ्याच्या हकीकतनाम्यात कृष्णाजी बाजी असें याचें नाव दिलें आहे.

२ असें सांगतात कीं, महाराजानीं स्वत. ह्या मोऱ्याच्या भेटीस जाऊन त्याच्याशीं बोलून त्याला वश करून घेण्याचा प्रयत्न केला; पण तो काहीं केल्या वळला नाहीं. उलट त्यानें त्यांस पकडून कैद करण्याचा घाट घातला; पण असा दगा घडण्याचा संभव वाटून ते ह्या बाबतींत पूर्वीपासूनच सावध होते. ते तेथून लागलेच निसटून गेले. ( रा. ब. पारसनिसांचें महाबळेश्वरवर्णन पाहा.)

त्यानें महाराजांस असा कुर्म्याचा जबाब पाठविला कीं, 'तुम्हीं काल राजे झाले तुह्माला राज्य कोणीं दिलें ? आपल्या घरी आपणांस फुकटचे राजे ह्मणवून घेतले तर ते कोण मानील ? जावळीला याल तर तुमचा एक माणूसहि परत जाणार नाहीं तुमच्यात पुरुषार्थ असेल तर उद्या येणार ते आजच यावें. आम्ही कोंकणचे राजे आहो, श्रीमहाबळेश्वराच्या कृपेने आम्ही राज्य करीत आहो श्रीच्या कृपेने आह्मास पादशहाने राजे हा किताब दिला आहे मोरचेल व सिंहासन हीं आह्मास त्यानें दिलीं आहेत आह्मी कैक पिढ्या जावळी येथे राज्य करीत आहो आमच्याशीं कटकट कराल ती विचार करून करा तुह्माला वरकड मुलूख आहे येथे उपाय कराल तर तो अपाय होईल यश न घेता अपयशास पात्र होऊन जाल " महाराजानी त्यास असा धमकीचा निरोप पाठविला कीं, 'तुह्मी आपणास राजे ह्मणावयाचे सोडून देऊन व मोरचेल वगैरे राजचिन्हे एकीकडे ठेवून रुमालाने हात बाधून भेटीस याल व आमची चाकरी कराल तर ठीक आहे बदफैली कराल तर प्राणास मुकाल' ! ही धमकी मोऱ्याने जुमानली नाही

हा मोऱ्याच्या ताब्यातला डोंगराळ व बिकट मुलूख आपल्या हाती आल्यावाचून सगळा घाटमाथा आपल्या कबजात येत नाहीं, व त्यावर राहून यवनास शह देण्याचा जो आपला विचार तो चागलासा साधत नाहीं, व कोंकणपट्टीत आपली सत्ता निर्वेध स्थापित होत नाहीं, असें ध्यानात येऊन त्या मोऱ्याचें अजीबात उत्पाटन करण्याचा महाराजानीं विचार केला, परंतु त्याच्या पदरी आपल्याप्रमाणेंच शूर मावळे वगैरे लोकाचा भरणा असून त्याचा भाऊ सूर्यराव व कारभारी हणमंतराव हे मोठे योद्धे आहेत, तेव्हां त्याच्यावर एकदम चालून गेलों असतां आपल्या लोकांची पुष्कळ खराबी होईल व आपणांस हटकून यश येण्याचा संभव फार कमी आहे असें त्यांस वाटून त्यास युक्तीनें जेर करण्याचा त्यानीं बेत केला. मग त्याच्या मुलखांतील किल्ल्यांची वगैरे वास्तविक स्थिति कशी काय आहे तें पाहून येण्यासाठीं महा-

१ असें सांगतात की, पूर्वी जिजाबाई शिवाजी महाराजांस घेऊन महाबळेश्वरास देवदर्शनाला आल्या होत्या, त्या वेळीं ह्या मोऱ्याच्या तीन सुंदर मुली पाहून जिजाबाईनीं एक आपल्या ह्या पुत्रास मागितली. तेव्हां भोंसल्याचें घराणें आपल्याहून हीन आहे अशा समजुतीवर ही त्यांची मागणी त्यानें कबूल केली नाहीं. (किंकेड पृ. १४७)

जांनी रघुनाथ बल्लाळ यास कांहीं लोकांनिशी पाठविलें. त्याच्या मुलखांत युक्तीनें प्रवेश करून[1] तेथली सगळी हालहवाल पाहून त्यानें महाराजांस असें लिहून कळविलें कीं, 'आपण काहीं निमित्तानें ह्या प्राताकडे सैन्यानिशीं यावें,व आह्मी सूचना पाठवूं तेव्हा घाटाखालीं उत्तरावे.' ह्यावरून कांहीं लोक तिकडे पाठवून महाराज स्वत राजगडावरून निघाले,व मोठ्या त्वरेनें पुरंदरास जाऊन तेथून महाबळेश्वरास देवदर्शनाच्या निमित्तानें गेले. तेथल्या जंगलात आपल्या लोकाची जमाजम करून ते तेथे तयारीने राहिले, व आपण जवळ आल्याचें रघुनाथ बल्लाळ यास त्यानी कळविलें तेव्हा तो जावळीहून निघून महाराजापाशी गेला नंतर महाराज महाबळेश्वरावरून निसणीच्या घाटाने उतरून जावळीस गेले, व हशमगडास वेढा घालून मोऱ्याशी लढूं लागले एक महिनाभर तेथे[2] रण माजून राहिले शेवटी कृष्णाजी चंद्रराव आपल्या लोकानिशी जावळी सोडून पळाला आणि रायगडावर जाऊन राहिला त्याचा पाठलाग करून महाराजांनी रायगडावर चढाई केली मोऱ्यांनी तो किल्ला तीन महिने लढविला, पण शेवटी त्यास हार खावी लागून तो महाराजास शरण आला, आणि रायगड त्यानी सर केला महाराजानी कृष्णाजी बाजीचा बहुमान केला आणि त्याला आपल्याबरोबर चाकणास नेले ह्या मोऱ्याची पुन जावळी येथें स्थापना करून हा आपला अकित होऊन राहील असे करावे व त्याच्याकडे थोडेसे लोक ठेवून प्रसंग पडेल तेव्हा आपणास मदत करावयास येण्याविषयीं याच्याकडून करार करून घ्यावा असे महाराजाच्या मनात होते, परतु चाकणच्या किल्ल्यावर असता ह्या मोऱ्याने मुधोळच्या व्यंकाजी घोरपड्याशी संधान बांधून आपली सुटका त्याच्या साहाय्यानें करून घेण्यासाठी त्याला त्यानें पत्रे पाठविली, तीं महाराजाच्या हातीं लागलीं तेव्हां त्यानी मोऱ्यास ह्मटलें कीं,'तुह्मी रायगड येथे आमच्याशीं इमानाने वागण्याची आणभाक केली असून व्यंकाजी घोरपड्यास हे

१ शि दि ह्मणतो की, चद्ररावाचा कारभारी हणमतराव याच्याशी प्रथमत. लग्नसंबंध जुळविण्याचें बोलणे करण्याच्या मिषाने रघुनाथ बल्लाळ त्याच्याकडे गेला होता, व तो बेफाम पाहून त्याचा त्याने दग्यानें वध केला,व नतर महाराजानी चद्ररावाशी युद्ध करून त्यास रणांत ठार केलें व जावळी काबीज केली. रायरीच्या बखरीतहि बहुतेक असाच मजकूर आहे. त्यांत असें सांगितलें आहे कीं, हणमतरावाला महाबळेश्वरीं गांठून तेथें त्याचा वध केला, व मग महाराजांनीं महाबळेश्वर व जावळी मोऱ्याशीं लढून काबीज केली.

२ मोरे घराण्याचा हकीकतनामा.

फितुरीचे कागद पाठविले तर तुह्मी मोरे बेइमान आहां,' असा त्याच्यावर टपका ठेवून त्याचा शिरच्छेद केला. मोऱ्याच्या बायकामुलांस महाराजांनी पुरंदरास नेऊन ठेविलें होतें त्याचे दोघे मुलगे होते त्यास थोडीशी जहागीर देऊन त्याच्या कुटुंबाची व्यवस्था लावावी असें त्याच्या मनात होतें,परंतु ह्या मुलानींहि विजापूरकराकडे गुप्त पत्रव्यवहार केला तो महाराजाच्या हाती आल्यामुळें त्यानी त्यास पुण्यास नेऊन त्याचा वध केला,[१] आणि मोऱ्याच्या बायकास व मुलींस सोडून दिलें

१ ह्या मुलाची नावे कृष्णाजी व बाजी अशी कित्येक बखरीत दिली आहेत, परंतु ना बरोबर नाहीत, कारण त्याच्या बापाचे नाव कृष्णाजी बाजी असें होते महाराजानी कृष्णाजी याचा अशाच कारणानें वध केला होता ही गोष्ट दग्याच्या प्रकाराशी जुळेना ह्मणून त्याच्या नावाचा असा विग्रह केला असावा रायरीच्या बखरींत असे आहे की, हल्ला करून जावळी हस्तगत केली व बाजीराव कृष्णराजे (कृष्णाजी बाजी) सापडले त्यास स्त्रियासुद्धा कैद केले, व त्यास पुण्यास नेऊन अभ्यंत भोजन घालून त्याचा पुण्याच्या दक्षिणभागी शिरच्छेद केला कित्येक बखरीत असे ह्मटले आहे की, महाराजानी रघुनाथ बल्लाळ व संभाजी कावजी यास चंद्रराव मोऱ्याकडे सोयरीक जुळविण्याच्या मिषानें पाठवून त्याच्या करवी त्याचा दग्याने वध करविला आणि मग जावळीवर हल्ला करून ती काबीज केली ह्या झटापटीत चंद्ररावाचा शूर कारभारी रणात पडला, आणि त्याचे दोघे मुलगे बाजी व कृष्णाजी यास पाडाव करून महाराजांनी पुण्यास नेलें. त्यास थोडीशी जहागीर देऊन त्याची चांगली व्यवस्था लावण्याचा महाराजाचा इरादा होता, परंतु त्यानी विजापूरकराशी गुप्त पत्रव्यवहार करून कारस्थान केलें व तेथून पळून जाण्याचा विचार केला हे त्याचे कागदपत्र मुद्देदस्त करून महाराजानी त्याच्यापाशी रुजवात केली व त्याचा वध केला कृष्णाजी बाजी चंद्रराव मोरे याला पहिल्याने दग्यानें मारवून मग महाराजानी जावळीवर चढाई करून त्याच्या लोकाशी लढून ती घेतली असा मजकूर कित्येक बखरीमध्यें आहे तो खरा मानून आह्मी तो ह्या चरित्रग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीत दिला होता. परंतु रा.ब.पारसनीस यानी 'इतिहाससंग्रहा'च्या पहिल्या पुस्तकाच्या दहाव्या व अकराव्या अंकात चंद्रराव मोरे याचा 'हकीकतनामा' प्रसिद्ध केला आहे तो, जेधे देशमुखाची 'शकावली' इ. सं. मंडळाच्या चतुर्थ संमेलनाच्या अहवालात प्रसिद्ध केली आहे ती, व रा. राजवाडे यानीं आपल्या १८ व्या खंडाच्या पाचव्या लेखांकात एका त्रुटित शकावलीचे कांही बंद प्रसिद्ध केले आहेत ते आमच्या पाहण्यात आले त्यांवरून ह्या दग्याच्या प्रकाराविषयी आह्मांस जो संशय वाटत होता तो दृढ होऊन प्रकृत मुळांत दिलेली हकीकत आह्मांस खरी आहे असें वाटतें. ही हकीकत अर्थात् बहुतेक चंद्रराव मोरे यांच्या उपरिनिर्दिष्ट हकीकतनाम्याच्या आधारानें लिहिलेली आहे; आणि ती जेधे यांच्या शकावलींतील संक्षिप्त टिप्पणांशी जुळते. तीत असें ह्मटलें आहे कीं,

ह्या मोऱ्याचा हणमंतराव म्हणून एक मोठा पराक्रमी बंधु होता, तो सदरील धामधुमीतून निसटून गेला होता जावळी महाराजाच्या हाती गेल्यावर तो तळ-

---

शके १५७७ त पौष चतुर्दशीस जावळी लढून घेतली, आणि हा मोरे रायरी येथे जमाव करून होता त्यास जेर करून तो किल्ला शके १५७८ च्या वैशाख महिन्यात घेतला व काही देशमुखाच्या मध्यस्थीने चद्रराव मोरे महाराजास शरण आला हा शेवटला उल्लेख रा राजवाड्यानी छापलेल्या शकावलीतहि आढळतो ही त्यानी छापलेली त्रुटित शकावली जेधे याच्या शकावलीशी बहुतेक जुळते रायरीच्या बखरीतला व शिवदिग्विजयातला उल्लेख वर एका टिपेत दिलाच आहे त्यावरूनहि असे दिसते की, कृष्णाजी बाजी चद्रराव मोरे याचा दग्याने वध झाला नव्हता आता येथे सहजी असा प्रश्न उद्भवतो की, सभासद जो बहुतेक पहिला बखरकार व ज्याला खरी हकीकत माहीत असण्याचा विशेष सभव त्याच्या लेखात हा दग्याचा भ्रामक मजकूर नमूद झाला कसा ? याचे एक सबळ कारण असे दिसते की, चद्रराव हे नाव नसून मोरे घराण्याच्या मूळपुरुषास हा यवनाकडून किताब मिळाला होता तो त्या घराण्यातले पुरुष आपल्या नावापुढे लावीत असत कृष्णाजी बाजी नामोहरम झाल्यावर त्याचा बधु हणमतराव, जो तळकोकणात राजा होऊन बसला होता, त्यानेंहि हा किताब धारण केला असावा, आणि सोयरिकीचे बोलणे करण्याच्या मिषाने सभाजी कावजी यानें त्याला एकाती गाठून त्याचा वध केला असे सभासद म्हणतो, आणि कृष्णाजी बाजी चद्रराव याचाहि घात अशाच उपायाने केला असे तो म्हणतो, पण आपला बधु ज्या युक्तीला बळी पडला तिचाच आपल्यावरहि प्रयोग करावयास सभाजी कावजी आला असता त्याजवर हणमतरावाने भरवसा ठेवला कसा याचा चमत्कार वाटतो तेव्हा अवातर पुराव्यावरून कृष्णाजी बाजी याचा असा दग्याने वध झाला नसून हणमतरावाचाच झाला हे खरे असावे, आणि ह्या हणमतरावाने चद्रराव हा किताब धारण केला असल्यामुळे सभासदाने दोघेहि वादविषयक दग्याला बळी पडले असे लिहिले असावें, आणि त्याच्या नतरच्या काही बखरकारानी हाच प्रवाद अधपरपरान्यायानें खरा मानून आपआपल्या लेखात नमूद करून ठेविला असावा हणमतराव मोऱ्याकडे सभाजी कावजी सोयरिकीचे बोलणे करण्याच्या मिषाने गेल्याचा उल्लेख बऱ्याच बखरीत आहे, हा अर्थात् खरा असावा पण कृष्णाजी बाजीसारखा कुर्रेबाज व धूर्त राजा जो शिवाजी महाराजास तुच्छ लेखीत असे त्याने महाराजाकडच्या सोयरकीचे बोलणें करावयास आलेल्या ब्राह्मणावर विश्वास ठेवून त्याशी एकातात गोष्टी केल्या असाव्या हें मुळी सभवत नाही, आणि रघुनाथ बल्लाळाला एकट्याला हें असे साहस करण्याचें धाडस झाले असावे असेंहि म्हणवत नाही त्या हुशार ब्राह्मणाला जावळीच्या प्रांताची स्थिति कशी काय आहे हे पाहून यावयास महाराजानी पाठविलें होते एवढ्याच एका गोष्टीवरून त्या ब्राह्मणावर हा असा दगा केल्याचा आरोप केला आहे. खरें पाहतां जावळी काही अशा दग्याने सहज हातीं आली नाही महाराजास तेथें चारपाच महिने लढाई करावी लागली. ह्या वादात आणखी एक मुद्याची गोष्ट ही

कोंकणांत राजा होऊन बसला होता. तो मोठा शूर व हिंमती असल्यामुळें जावळी परत घेण्याची खटपट तो करील या भीतीनें महाराजांनी त्याच्याशीं काहीं राजकारण करण्याच्या मिषाने संभाजी कावजीस त्याच्याकडे रवाना केलें. त्यानें हणमंतरावाकडे जाऊन त्याच्याशीं मोठ्या स्नेहभावाचें बोलणें लाविलें तो ह्मणाला "होणार तें घडून आलें तें तुह्मी मनात ठेवूं नका तुमचें कल्याण करावे असें महाराजाच्या मनात आहे तुमचा त्याचा शरीरसबंध घडावा ह्यासाठीं त्यानी मला तुमच्याकडे पाठविलें आहे तुमच्या केसासहि धक्का लागणार नाहीं असें अभय महाराजानी तुह्मास दिलें आहे तरी झाल्या गोष्टीबद्दल अणुमात्र संशय न धरितां महाराजाचा मनोरथ तुह्मी सिद्धीस न्यावा. असे केल्याने महाराज सतोष पावतील" ह्याप्रमाणे संभाजीने कृत्रिमभाव बिलकुल न दाखविता त्याच्याशीं एकांतीं भाषण करिता करिता त्याच्या पोटात कटारीचे वार चालवून त्याला जिवे मारिलें.[1]

ह्याप्रमाणे जावळीप्रात काबीज करून मोऱ्याच्या ताब्यातले सगळे कोटकिल्ले महाराजांनी हस्तगत केले, व तिकडील प्रातात आपला अमल बसविला. मोऱ्याने आपल्या गडावर द्रव्यादिकाचा सग्रह पुष्कळ केला होता तो सगळा महाराजास आयताच लाभला मोऱ्याच्या आश्रयाने शिवतर खोऱ्यात बाबाजी कोंडदेव[2] ह्या नावाचा एक ब्राह्मण होता मोऱ्याचा नायनाट करून महाराज त्या प्रांतात अमल बसवूं लागले तेव्हा हा ब्राह्मण शिरजोर होऊन त्यास मुळीच जुमानीना. त्यानें आसपासच्या प्रातात पुंडावा आरभिला. त्यावरून त्यास पकडून कैद केलें. ब्राह्मणास जिवें मारूं नये असा महाराजाचा भोळा समज असल्यामुळें त्याचे डोळे काढण्याचा हुकूम त्यानी दिला.

---

ध्यानात ठेवण्यासारखी आहे की, वादविषयक दग्याचा प्रकार नमूद करणारे कित्येक बखरकार ह्मणतात कीं, ह्या मोऱ्याचे बाजी व कृष्णाजी असे दोन मुलगे महाराजानी पाडाव करून पुण्यास नेले होते त्यानी घोरपड्याशी पत्रव्यवहार केल्यावरून त्याचा महाराजानी शिरच्छेद केला. ही जी त्याच्या मुलाची नावे दिली आहेत ती खरीं नसावी, कारण ह्या मोऱ्याचें नाव कृष्णाजी बाजी असे होते. यावरून पाहता पुण्यास शिरच्छेद केला तो त्याचा, त्याच्या मुलाचा नव्हे असे ह्मणावें लागते.

१ हा मजकूर सभासदाच्या बखरीतून घेतला आहे. चिटणीस एवढेंच ह्मणतो कीं, हणमतरावास सभाजी कावजाने मारिले. शेडगावकराच्या बखरीतहि असाच मजकूर आहे.

२ सभासद ह्याचें नाव बाजी कोडणे राऊ असे देतो.

ह्या मोऱ्याच्या प्रांतांत वाईजवळ गोळेवाडी ह्मणून एक गांव आहे तो गोळे नांवाच्या एका मराठे सरदाराच्या ताब्यात होता मोरे नामोहरम झाल्यावर हा सरदार स्वतंत्र होऊन बसला. महाराजानीं त्याच्यावर चालून जाऊन त्याचा मोड केला आणि गोळेवाडी काबीज केली ह्या धामधुमीत महाराजाच्या एका ब्राह्मण सरदाराने ह्या गोळ्याची सून कैद करून महाराजापुढे आणून उभी केली. ती अतिशयित सुदर असल्याकारणानें महाराज तिचा अगीकार करि- तील असें ह्या ब्राह्मणास वाटलें होते परंतु महाराज पापभीरु असल्याकारणानें त्यानी कल्याणच्या मोहिमेत सापडलेल्या सुंदर यवनीस पाहून जे उद्गार काढले तेच ह्या समयींहि काढिले असें ह्मणतात[१].

हिरडस मावळात बादल देशमुख होता. त्यास आपला अंकित करण्याचा प्रयत्न महाराजानी त्याच्याशीं सामोपचाराचें बोलणें लावून केला, परंतु तो असल्या सौम्य उपायाने वश होईना तो रोहिडानामक किल्ल्यात प्रबळ होऊन बसला होता. त्या किल्ल्यावर महाराजानी रात्रीचा अकस्मात् छापा घालून त्यास गाठलें आपल्यावर प्रत्यक्ष शिवाजीमहाराज पुष्कळ लोकांनिशीं चालून आले आहेत, त्याच्यापुढे आपला निभाव लागणार नाहीं, हे त्या बादलास पक्कें ठाऊक होतें तरी शेवटपर्यंत लढण्याचा निर्धार करून तो आपल्या लोकांसह महाराजावर तुटून पडला. उभय पक्षाकडील लोक मोठ्या शौर्यानें लढले खुद्द बादल हाती शस्त्र घेऊन रणात लढत होता अखेरीस त्याचा मोड होऊन तो समरागणात पडला. तेव्हा त्याचे उरलेले लोक निरुपाय होऊन महाराजास शरण आले त्यांत बादलचा दिवाण बाजी प्रभु देशपांडे हा प्रमुख होता[२].

---

१ मि किंकेड पृ १५३

२ महाराष्ट्र साहित्य नावाचे एक मासिक पुस्तक अलीकडे प्रसिद्ध होऊ लागलें आहे. त्यांतील ऐतिहासिक साहित्य ह्या सदराखाली पहिल्या अकात ह्या देशपांड्याच्या वंशजाकडे सापडलेली तीन पत्रे प्रसिद्ध केली आहेत, त्यातल्या पहिल्या पत्रावरून असे दिसतें की, ह्या कृष्णाजी नाईक बादलाचा पराभव दादाजी कोंडदेवानें पूर्वीं एक वेळ केला असून त्यास कैद केलें होतें. दादाजी कोंडदेवाचा ह्या बादलाने एक वेळ पराभव केला असून कानोजी जेधे याने त्यास दादाजीच्या भेटीस आणून त्याचा समेट केल्याची हकीकत मागें सातव्या भागाच्या आरंभीच्या एका टिपेत रा राजवाडे याच्या पधराव्या खंडातील ३०२ लेखाकाच्या आधाराने दिली आहे जावळीच्या चद्रराव मोऱ्याशी महाराजानी लढाई केली तेव्हा हा बादल महाराजाच्या पक्षानें लढल्याचा उल्लेख जेधे याच्या शकावलीत केला आहे तो खरा मानिला तर हा

ह्या देशपांड्याची मर्दुमकी पाहून महाराज फार खुष झाले. त्याला त्यांनी मोठ्या औदार्याने व ममतेनें वागवून त्याची वतनवाडी त्याच्याकडे कायम केली. पुढे हा देशपांडे महाराजांशी मोठ्या इमानाने वागूं लागल्यावरून त्यास त्यांनी आपल्या नोकरीस ठेविले त्याला एका पायदळ तुकडीचा सरदार केलें. हा हुषार व शूर पुरुष पुढे महाराजाच्या उपयोगी कसा पडला हें यथास्थलीं सांगूं

बादलास नाहींसा केल्यावर सगळ्या मावळप्रांतांत महाराजाचा अमल निर्वेधपणे बसला त्यांतला सगळा पुंडावा नाहींसा करून रयतेस निर्भय केलें. त्या प्रांतात सर्वत्र जमीनमहसुलाची चांगली शिस्त लावून दिली प्रजेला हितावह असे कौल देऊन सर्व जमीन लागवडीत येईल असे केले आपल्या लष्करात नोकरी धरावयास जे लोक राजी असत त्यास ती देऊन आपले सैन्यबळ वाढविण्याचा क्रम महाराजांनी एकसारखा चालविला होताच जावळीच्या मोऱ्याच्या पदरचे पुष्कळ उमदे लोक महाराजास आयते सापडले, त्यांचा संग्रह महाराजांनी मोठ्या खुशीनें केला

जावळीचा व त्याच्या आसपासचा जो मुलूख सर केला तो आपल्या हातीं सुरक्षित राहावा ह्यासाठी कृष्णानदीच्या उगमासन्निध बिकट व खडकाळ जागा पाहून तेथे एक भक्कम किल्ला बांधावा असें महाराजाच्या मनात आले हे काम त्यांनी मोरो त्रिंबक पिंगळे यास सांगितले हा पिंगळे मोठा हुशार पुरुष होता त्याचा बाप शहाजीराजाच्या नोकरीस असून राजे कर्नाटकात गेले तेव्हा हा त्याच्याबरोबर तिकडे गेला होता तेथें त्यास आपल्या बापाच्या व शहाजीराजाच्या हाताखाली त्या धामधुमीच्या काळास योग्य असें शिक्षण व अनुभव हीं प्राप्त झाली होती. तो स १६५३ च्या सुमारास महाराष्ट्रात परत येऊन महाराजापाशी नोकरीस राहिला होता त्याला जी जी कामगिरी सांगावी ती तो मन पूर्वक, इतबारानें व हुशारीने करी, हे पाहून महाराजाचा त्याच्यावर भरवसा बसला होता त्याच्या हातून हें किल्ला बांधण्याचे काम चांगलें होईल असें महाराजास पक्कें ठाऊक होते त्याप्रमाणें त्याने ते काम उत्तम प्रकारें बजाविलें, व महाराजांची त्याच्यावर विशेषच मेहरबानी बसली ह्या किल्ल्याचें नाव प्रतापगड असें ठेविलें ह्या वेळीं महाबळेश्वराच्या देवालयाचा जीर्णोद्धार महाराजांनी करून कृष्णानदीच्या उगमापाशी एक देवालय व पोवळी बांधिली.

---

बांदल पुढें पुनः महाराजास जुमानीसा झाला असावा, किंवा बांदल ह्या आडनावाचे अनेक देशमुख असावे असें मानावे लागतें.

ह्यानंतर औरंगजेबानें विजापूरसरकारावर स्वारी करून त्याचा पराभव केला, व त्याच्याशी तह करून पुन दिल्लीकडे कूच केलें ह्या मोगलाच्या मोहिमेमुळें आपल्या ताब्यातील मुलखास उपद्रव होऊं नये ह्मणून महाराजानी कोणती युक्ति केली हे मागल्या भागात सागितलेच आहे औरगजेबासारख्या धूर्त व क्रूर पुरुषाला हुलकावण्या दाखवून अजीबात फसविले, व त्यास नम्रता दाखवून विजापूरकराच्या अमलात हवातसा धिगाणा घालण्याची मुभा त्याजकडून मिळविली पुढे तो उत्तरेकडे निघून गेल्यावर महाराजानी कोकणप्रात काबीज करण्याचा क्रम पुन सुरू केला. समुद्रकिनाऱ्याची रत्नागिरी, विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, साळशी, खारेपाटण वगैरे ठाणी त्यानी हस्तगत केली.

ह्या वेळी सातशे पठाण महाराजाकडे नोकरी मागावयास आले मोगलांशी चालू असलेले युद्ध आटोपल्यावर विजापूरसरकाराने ह्या पठाणास आपल्या नोकरीवरून दूर केले होते. ते भटकत भटकत पुण्यास महाराजापाशी येऊन ह्मणाले की, " आह्मास आपल्या लष्करात नोकरीस ठेवा आपली कीर्ति ऐकून व आपण शहाजीराजे भोसले याचे प्रतापशाली पुत्र आहा हे जाणून आपणांकडे आश्रय मिळेल ह्या आशेनें आह्मी आलों आहो आह्मास नकार सागूं नये. " अशी गळ त्या पठाणानी घातली असता ह्या यवनास नोकरीस ठेवावें कीं कसे याचा विचार महाराजास पडला जवळच्या कित्येक लोकाचे ह्मणणें असें पडले कीं, ' हे दुष्ट यवन असून दिल्लीच्या किंवा विजापूरच्या बादशहानें यांला भेदमत्र देऊन पाठविलें असावे. हे पहिल्यानें विश्वास दाखवून संधि पाहून आपला घात करितील. याला कोठेच कशी नोकरी मिळाली नाहीं? यांच्या गुणस्वभावाविषयीची माहिती आपणास काहींच नाहीं, यास्तव यास नोकरीस ठेवणें बरोबर नाहीं ' महाराजाच्या पदरी गोमाजी नाईक पानसंबळ या नावाचा एक हवालदार होता हा जाधवाकडचा नोकर जिजाबाईचें लग्न झालें तेव्हा सेवेसाठी ह्मणून दिला होता. जिजाबाईवर जे पुढे अनेक सुखदु खांचें प्रसंग आले त्यात तिच्या जवळ राहून त्याने तिची व आपल्या या छोट्या धन्याची सेवा अत्यंत इमानानें व हुशारीनें केली होती. शिवाजीमहाराजांनी स्वराज्यस्थापनेचा घाट घालून तत्सिद्ध्यर्थ उद्योग आरंभिला तेव्हां हा परम विश्वासू आहे असें पाहून त्यानी त्याची योग्यता वाढवून त्यास हवालदार केलें होतें. ह्या गोमाजीनें ह्या समयीं महाराजांस अशी मसलत दिली कीं, " आपण धनी आहां. आपला लौकिक ऐकून हे आले आहेत. यांला विमुख पाठविणें

बरोबर नाहीं. आपण स्वराज्यवृद्धि करणार आहां ती पदरीं सर्व प्रकारचीं शूर माणसें असल्यावांचून कशी साध्य होईल? फक्त हिंदू तेवढे नोकरीस ठेवावयाचे असा निर्धार केल्यास कसें चालेल? ज्यानें राज्य करावयाचे त्यानें सर्व जातींच्या लोकावर सारखी नजर ठेविली पाहिजे सर्वांस आपआपल्या धर्माप्रमाणें वागूं दिलें पाहिजे कोणत्याहि जातींत गुणी व योग्य माणसें सापडली तरी त्याचा संग्रह राजानें अवश्य केला पाहिजे. तेव्हा ह्या गोष्टीचा पुरा विचार करून महाराजानीं उचित दिसेल तें करावे" गोमाजी नायकाची ही मसलत महाराजास पसंत वाटून त्यानी त्या पठाणास समक्ष बोलावून आणिलें, व त्याजकडे नीट बारकाईनें पाहून व त्यास पुष्कळ उलटसुलट प्रश्न विचारून त्याचे हृद्गत ताडलें, आणि त्यास आपल्या नोकरीस ठेविल्यानें काहींएक दगा होणार नाहीं अशी पुरी खात्री झाल्यावर त्यास ठेवून घेतलें ह्या पठाणाच्या पथकावर राघो बल्लाळ अत्रे यास सरदार नेमिलें. ह्यानंतर महाराज आपल्या नोकरीस मुसलमान लोक ठेवूं लागले. ह्या मुसलमान नोकरांपैकीं काहीं जणानी त्याच्या लष्करात मोठ्या योग्यतेस चढून त्याची मोठ्या हुशारीनें व इमानानें नोकरी केल्याचे इतिहासात आढळतें

महाराज सगळी कोंकणपट्टी हस्तगत करण्याचा निर्धार करून त्या उद्योगास लागले तेव्हा त्यास जंजिऱ्याच्या शिद्दीपासून फारच त्रास होऊ लागला तो महाराजानी काबीज केलेल्या किनाऱ्यावरील प्रांतास आपल्या आरमाराच्या साहाय्यानें वारंवार उपद्रव देऊं लागला तेव्हा ह्या प्रबळ रिपूस जिंकिल्यावाचून आपला उद्देश सिद्धीस जात नाहीं असें लक्षांत येऊन महाराजानी शामराजपंत पेशव्याबरोबर पुष्कळ लोक देऊन त्यास त्याच्यावर पाठविलें त्या वेळी फत्तेखान ह्या नावाचा सिद्दी जंजिऱ्यास राज्य करीत होता त्याला हें पक्के ठाऊक होतें, कीं, आपणावर शिवाजीमहाराजांचा डोळा असून त्याची स्वारी आपणावर लवकरच होणार आहे. ह्मणून तो जय्यत तयारी करून होता. शामराजपंताचे व त्याचे दंडाराजपुरीजवळ अनेक सामने झाले त्यात पेशव्यास हार खावी लागली. त्याच्या त्या तयारीपुढे महाराजाच्या लोकांचें काहींएक न चालून त्यांस मागे हटावे लागलें. त्याचे पुष्कळ लोक नाश पावले हे अपयश आपल्या सैन्यास आलेलें पाहून महाराजास फार वाईट वाटलें.शामराजपंतावर त्याची इतराजी झाली. त्यास परत बोलावून त्याच्याकडचा पेशवाईचा हुद्दा काढून घेतला, व त्या मोहिमेवर रघुनाथपंतास पाठविलें. मोड होऊन मागें हटलेल्या सैन्याच्या मदतीस आणखी लोक रवाना केले. शामराजपंताकडील पेशवाईचा अधिकार

काढून घेतला तो मोरो त्रिंबक पिंगळे यास सांगितला. त्या मोरोपंताकडे हा अधिकार आमरण राहिला. त्याच वेळीं निळो सोनदेव ह्यानें चांगली कामगिरी बजाविली ह्मणून त्याला बाळकृष्णपंताकडची मुजुमदारी काढून दिली. गंगोमंगाजी यास वाकनिशी सांगितली, व येसाजी कंक यास पायदळाची सरनोबती दिली.

वर सांगितल्याप्रमाणें शिद्दीशी युद्ध चाललें असतां वाडीचे सावंत देशमुख यास असें कळलें कीं, शिवाजीमहाराजांनी कोंकणपट्टी काबीज करण्याचा संकल्प करून मोठें सैन्य रवाना केलें आहे. अशा प्रबळ सैन्याशी लढण्याचे त्राण त्याम त्या वेळी मुळीच नव्हतें. ते विजापूरसरकाराचे अंकित असून त्यास त्या सरकाराचा आश्रय असल्यामुळे ते महाराजास मुळींच जुमानीत नसत. परंतु महाराजांनी जावळीचा मोरे नामोहरम केला, आसपासचे सगळे पुंडपाळे-गार हतवीर्य केले, एकंदर मोठमोठे किल्लेकोट कबजांत घेतले, व इतका धुमा-कूळ त्यांनी चालविला असतां विजापूरकराच्यानें त्याचें पारिपत्य करवलें नाहीं. त्यांत आणखी मोंगलांशीं नुकताच जो संग्राम झाला त्यांत विजापूरसरकाराचीं हाडें चांगलीच नरम झाली आहेत, व हल्ली तर त्या दरबारांत दुफळी माजून कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं अशी अवस्था झाली आहे, तेव्हां अशा समयीं त्या सरकाराकडून आपणास कुमक मिळून शिवाजीमहाराजाशीं टक्कर देण्यास आपणास सामर्थ्य येईल याची आशा मुळींच नाहीं, असे विचार त्या सावंताच्या मनांत येऊन महाराजाशी स्नेह करण्यांतच आपला तरणोपाय आहे असें त्यास वाटलें. त्यांनी महाराजाकडे वकील पाठवून तहाचें बोलणें लाविलें. ते त्यास तत्काळ मान्य झालें. त्या तहांत असें ठरलें कीं, सावंतांनीं आपल्या जहागिरीच्या उत्पन्नाचा अर्धा हिस्सा शिवाजीमहाराजास द्यावा, व हा वसूल महाराजांनी आपले लोक नेमून वेळच्या वेळीं करीत जावा. बाकीचें अर्धे उत्पन्न व देशमुखीचे सगळे हक्क सावंतांनीं बिनतक्रार भोगावे, त्यांनीं इतःपर विजापूरकरास कर देऊं नये, व आपल्या प्रांतांतील एकंदर किल्ल्यावर आपल्या खर्चानें लोक ठेवून त्यांचा योग्य बंदोबस्त राखावा, आणि जरूर पडेल तेव्हां शिवाजीमहाराजांस तीन हजार पायदळानिशीं मदत करावी.

ह्याप्रमाणें केवळ निरुपायास्तव सावंतांनी महाराजाशीं तह केला; परंतु त्या मानी देशमुखांस त्याबद्दल लवकरच पस्तावा वाटला. तहांत ठरलेल्या कलमां-प्रमाणें वागण्यास ते तयार नव्हते. शिवाजीमहाराजांचा आपल्यावरील सुभा

उडवून देऊन ते पुनरपि विजापूरसरकाराचे अंकित झाले त्याबद्दल त्याची महाराजांनीं कशी खोड मोडली तें पुढे यथास्थलीं सांगूं

इकडे शिद्दीवर पाठविलेल्या सैन्यानें बराच वेळ झुंज केले, परंतु शिद्दी काहीं केल्या जेरीस येईना इतक्यात पावसाळा सुरू होऊन उभय पक्षास लढाई तहकूब करणें भाग पडले पावसाळा संपताच शिद्दीची खोड चांगलीच जिरवावयाची असा निश्चय करून महाराजानी त्याच्यावर पाठविण्यासाटीं मोठें सैन्य तयार केले, व त्याजवर मोरोपंत पेशवा व नेताजी पालकर ह्या सरदाराची नेमणूक केली त्या वर्षी पावसाळा नेहमीपेक्षा अमळ जोराचा असल्यामुळे ही नव्या दमाची मोहीम व्हावयास विलंब लागला. इतक्यात महाराजावर विजापूर सरकाराच्या एका मोठ्या सरदाराची मोहीम झाली तेव्हा अर्थात् तिकडे त्याचे सगळे लक्ष लागून ही शिद्दीवरची मोहीम लांबणीवर पडली आता हे नवें अरिष्ट महाराजावर कोणते आले, व त्यातून ते कसे पार पडले त्याचे निरूपण पुढील भागात करूं

# भाग अकरावा.



## अफझुलखानाचा वध.

मागील भागात सांगितल्याप्रमाणें शिवाजीमहाराजानीं विजापूरसरकाराचा बराच मुलूख व पुष्कळ किल्ले काबीज केले, चंद्रराव मोऱ्यामारख्या बलाढ्य सरदारास जिंकून नाहींसा केला, वाडीच्या सावंतास आपले ताबेदार करण्याचा घाट घातला, कल्याणचा सुभा तर कायमचा काबीज केला, शिद्दीला शह देऊन सगळी कोंकणपट्टी हस्तगत करण्याचा बेत मांडला असें सांगतात कीं, ह्या वेळी महाराजानी विजापुरसरकाराचे चाळीस किल्ले काबीज केले होते[1] हें सगळें वर्तमान विजापुरास वेळोवेळा जात होतेंच त्यास वठणीस आणण्याचा एक उपाय तर विजापूरसरकार करून चुकलेच होतें तो अर्थात् शहाजीराजास पकडून आणून देहांत शासन करण्याचें भय घालण्याचा होय परंतु ह्या उपायाचा भलताच परिणाम झाला. महाराजानी मोगलाशीं संधान करून उलटा त्या सरकारासच शह आणिला पुढें शहाजीराजास सोडून दिल्यावर महाराजास पकडून आणण्यासाठीं बाजी शामराज यास पाठविलें परंतु तोही पराभव पावून परत गेला यानंतर मोगलाशी युद्ध करावें लागल्यामुळे महाराजास शिक्षा करण्याचा बेत त्या सरकारास काही वेळ तहकूब करावा लागला नंतर मोगलाशी तह केल्यावर व औरंगजेब राज्याधिकार बळकाविण्याच्या खटपटीत गुंतल्यामुळे त्याच्या मोहिमेची धास्ती नाहींशी झाल्यावर महाराजास शिक्षा करण्याचा विचार त्याच्या मनात आला अशा बंडखोरास होईल तितकें लवकर शासन केले पाहिजे, त्याच्याकडे इत पर दुर्लक्ष करून चालणार नाहीं, असें त्यास वाटूं लागलें

ह्या वेळी अल्ली अदिलशहा विजापूरच्या गादीवर बसला होता. त्याचें वय वीसएकवीस वर्षांचे असल्यामुळे त्याची आई सगळा कारभार खवासखान नामक एका हुशार मुत्सद्याच्या साहाय्यानें पाहत असे. ही बडी साहेबीण ह्या नावानें इतिहासात प्रसिद्ध आहे. हिने आपले एकंदर सरदार व अमीर यांस बोलावून आणून असा हुकूम केला कीं, हरामखोर शिवाजी पातशाहतीमध्यें फारच धुंडावा करीत आहे त्याच्यावर मोहीम करून त्याला जीवंत धरून आणावा;

---

[1] मोडकक्कत विजापूरचा इतिहास.

असें बोलून ह्या कामगिरीवर कोण जाण्यास तयार आहे असें ती त्यास विचारूं लागली, परंतु ही कामगिरी पतकरण्यास कोणीहि पुढें सरसावेना कारण त्यांच्या कानीं शिवाजीमहाराजाचे पराक्रम वारंवार आले असल्यामुळें त्याचें त्याला पराकाष्ठेचें भय वाटूं लागलें होतें. त्याच्याशी सामना करण्यास कोणीहि कबूल होईना त्या सभेस अफझुलखाननामक[1] एक सरदार होता. त्यास ईर्षा चढून तो उठून उभा राहिला व कुरनिसाद करून ह्मणाला कीं, 'मला त्या पुंडावर स्वारी करण्याचा हुकूम झाल्यास त्याला चढेघोड्यानिशी जाऊन पकडून आणितों, व ह्या सिंहासनाच्या पायथ्याशी बांधून ठेवितो त्याची मी तमा धरीत नाहीं माझ्या भीतीनें शिवा बिल्लीसारखा होईल' हें त्याचें वीरश्रीचें भाषण ऐकून बडीसाहेबीण खुष झाली, व त्यास पुष्कळ नजरनजराणा देऊन शिवाजीमहाराजावर जाण्यास तिनें हुकूम दिला त्याच्याबरोबर बारा हजार स्वार व पुष्कळ पायदळ दिलें होतें[2] शिवाय चांगला भक्कम तोफखाना, पुष्कळ अग्निबाण, उंटावर लादलेल्या जेजाला वगैरे मुबलक युद्धोपयोगी सामान होतें. असें सांगतात की, हें सामान तीन वर्षेपर्यंत युद्ध करीत राहिले तरी पुरण्यासारखें होतें अफझुलखानानें ह्या सैन्याशिवाय आणखी दोनतीन हजार मावळे आपल्या लष्करात नोकरीस ठेविले कारण त्याला मावळप्रांतात स्वारी करावयाची असून ज्याच्याशी सामना करावयाचा होता त्याच्याजवळ मावळे

---

१ हा मोगलाशीं नुकत्याच झालेल्या युद्धांत शौर्य दाखवून व कर्नाटकांतल्या मोहिमेत चांगली कामगिरी करून मोठी योग्यता पावला होता वाई प्रांताची सुभेदारी याच्याकडे असून यानेच दरबारात येऊन या संबंधाची कागाळी केली होती, असे ह्मणतात हा जातीचा भटारी असून पुढे स्वपराक्रमानें सरदारपद पावला होता याचे मूळचे नाव अबदुलखान असे होते ह्याच नावाने त्याचा कित्येक बखरींत व पोवाड्यात उल्लेख आहे प्रो. सरकार याचें मूळ नाव अबदुल्ला भटारी व उपनाव अफझलखान असे देतात

२ ग्राटडफ ह्मणतो कीं, याच्या बरोबर पाच हजार स्वार व सात हजार पायदळ होते. चिटणिसाच्या मते तीस हजार सैन्य होते. चित्रगुप्त ह्मणतो की, एकदर सत्तर हजार सैन्य होते पोवाड्यात बारा हजार स्वार होते असे ह्मटले आहे. राजापूर येथे इंग्रज लोकाची त्या वेळी वखार होती, तिच्या हकीकतीच्या कागदपत्रांवरून असे दिसतें की, अफझुलखानाबरोबर दहा हजार सैन्य होतें. हें असे थोडे सैन्य असल्याकारणानें बडी साहेबीण हिने अफझुलखानास अशी मसलत दिली होती कीं, शिवाजीमहाराजाशी सख्य करण्याचें मिष करावे व त्यास क्षमेची लालूच दाखवून दग्यानें पकडावें किंवा ठार मारावें.

लोकांचाच जमाव मोठा होता, परंतु त्या बापड्याला ठाऊक नव्हतें कीं,शिवाजी-महाराजानीं नोकरीस ठेवलेल्या मावळ्यांचे इमान, स्वामिनिष्ठा व हुशारी हीं ह्या वेठीस धरलेल्या मावळ्यात कदापि येणारीं नव्हती.

अफझुलखान ही अशी फौज घेऊन कृष्णानदीच्या अलीकडे आला, व कूचदरकूच करीत बालेघाट चढून तुळजापूर येथील भवानीच्या देवालयापाशी त्याने मुक्काम केला हे मराठ्याचे व विशेषत भोंसले घराण्याचे कुलदैवत आहे, हे जाणून त्याने त्या देवस्थानाची नासधूस केली देवीची गंडकी मूर्ति होती ती भोपे यानी पाण्यात लपवून ठेविली. देवीची मोठी मूर्ति होती ती फोडून जात्यात भरडून तिचे त्याने पीठ केले[1]. नंतर येथून आपला मुक्काम हलवून त्याने पंढरपुराकडे कूच केले, व वाटेत माणकेश्वराच्या देवालयाची नासाडी केली. त्याने असा आडवा रस्ता धरण्याचे कारण असें सागतात की, त्या वेळी पाऊस फार असल्यामुळे डोगराळ प्रदेशातून सैन्य नेणे अमळ कठीण होते भीमातीरी मुक्काम करून पंढरपूरच्या देवस्थानाचा नाश करण्याचें त्याने मनात आणिले. हे अरिष्ट पाहून बडव्यानी पाडुरगाची मूर्ति छपवून ठेविली, व गावातले सगळे लोक घरेंदारें सोडून रानोमाळ पळाले त्या गावाची व आसपासच्या इतर गावाची खराबी करून तो पुण्याकडे वळला, व वाटेत महाराजाचे जे जे किल्ले व प्रात लागले ते हस्तगत करीत चालला

इकडे हेरानी येऊन महाराजाला अफजुलखानाच्या स्वारीची वार्ता कळविली. त्या वेळी ते राजगडावर होते आपणास जीवत धरून नेण्यासाठी खान येत आहे, त्याच्याशी सामना करण्याची व्यवस्था कशी काय करावी, याविषयी आपल्या सरदाराची त्यानी मसलत घेतली. तेव्हा सर्वांचा असा विचार पडला कीं, त्याच्याशी युद्ध करण्यास चागली अडचणीची जागा पाहावी ही अशी बिकट जागा कोणती आहे ते पाहता जावळीस जाऊन प्रतापगडावर तयारीनिशीं राहावें असें ठरले, परंतु कांहीं जणाचे ह्मणणें असें पडलें कीं, त्याची सेना मोठी प्रबळ आहे त्याच्याशीं लढाई करून आपला निभाव लागणार नाहीं यास्तव त्याच्याशीं सख्य करावें हें बरें. ही मसलत ऐकून महाराज बोलले "यवन बेइमान आहेत. त्यांच्याशी सख्य करणें ही अनुचित गोष्ट होय. ते केव्हां घात करितील

१ पोवाड्यांत ह्मटले आहे की, फोडिली तुळजा। वरती मसुदच बाधिली ॥ मसूद बांधुनी पुढे गाय जब केली ॥

२ वेगीं पंढरपुरा आला॥ फोडिला विठोबा। पुडलीक पाण्यांत टाकिला॥—पोवाडा.

याचा नेम नाहीं ते दुर्बुद्धि, कपटी लोक विश्वास दाखवून आपला नाश करावयास चुकणार नाहींत खरे सख्य करण्याची गोष्ट त्याच्या स्वप्नींहि यावयाची नाहीं त्याच्याशी समर करून आपली खरी मर्दुमकी त्यास दाखवून त्याचा पराभव करण्याची मला उमेद आहे ह्या यवनाशीं सल्ला करणे नाहीं असा माझा कृतसकल्प आहे ते प्रबळ आहेत तर त्याचा हरयुक्तीनं सहार केला पाहिजे '

हे अरिष्ट कर्में टाळावे ह्याविषयी चिन्त चितातुर होऊन महाराज रात्री निद्रिस्त झाले असता त्याला स्वप्नात तुळजापूरच्या भवानीनें दर्शन देऊन ह्मटलें, ' तूं काहीं चिन्ता करूं नको तुझ्या हाती अफजुलखानाचा वध करवून तुला मी यशस्वी करिते.' हे स्वप्न पडल्यावर महाराज जागृत झाले, व उठून मुखप्रक्षालन करून त्यानी मातुश्रीस उठविले आणि ते तिला निवेदन केले नतर प्रात काळी पदरचे कारकून व सरदार यास बोलावून आणून स्वप्नवृत्त कथन केलें, आणि ते त्यास म्हणाले कीं, 'प्रत्यक्ष जगदबा आम्हास प्रसन्न झाली आहे आता अफझुलखानाची ती कथा काय? त्याच्याशी युद्ध करून त्याला गर्दास मिळविण्याची हिमत मला जगदबेच्या प्रसादानं आली आहे.' हे ऐकून पदरचे लोक ह्मणाले कीं, ' हे साहसकर्म सिद्धीस गेलें तर फारच उत्तम, नाहींतर मात्र परम कठीण प्रसग आहे ' असे त्याचे सचित उद्गार ऐकून महाराजानी निक्षून ह्मटले की, " खानाशी सख्य केले तरी प्राणनाश व्हावयाचा त्यापेक्षा युद्ध करावे हेच उत्तम. जय आला तरी उत्तम व प्राण गेला तरी उत्तम त्रिभुवनात कीर्ति होईल समरागणात पराक्रम करून मरावे हे मला श्रेयस्कर वाटते शत्रूस शरण जाऊन त्याच्या हातून प्राणनाश व्हावा हे अत्यंत अनुचित होय. यास्तव खानाशीं युद्ध करण्याचाच माझा निर्धार झाला आहे त्याच्याशी लढून यश मिळाले तर ठीकच होईल, परतु जर करिता मी लढाईत पडलो तर माझ्यामागे माझ्या कमाईचे रक्षण करून मिळविलेल्या स्वराज्याची व्यवस्था नीट ठेवा, व माझ्या मातुश्रीच्या आज्ञेत वागून माझे नाव मागे राखा "

त्याप्रमाणें स्वनिश्चयकथन करून महाराजानी तत्काळ प्रतापगडावर जावयास निघण्याची तयारी करण्याचा हुकूम दिला, व आपला झालेला बेत मातुश्रीस विदित करण्यासाठी ते महालात गेले. जिजाबाईच्या चरणावर मस्तक ठेवून आपला काय विचार झाला आहे तो तिला सांगितला. त्या वेळीं त्या दोघांसहि गहिंवर आला. संकट किती बिकट आहे व त्यातून निभावण्याचा संभव किती

अल्प आहे हें त्यास कळतच होतें, तरी ह्या वेळी त्या वीरमातेनें त्या संकटां-तून मुक्त होण्यास दुसरा मार्गच नाहीं असा प्रोक्त विचार करून सर्व मायाजाळ एकीकडे ठेवून त्याला अतिकष्टाने निरोप दिला तिनें त्याच्या मस्तकीं हात ठेवून असा आशीर्वाद दिला कीं, 'तूं ह्या युद्धात यशस्वी होशील. शत्रूशीं मोठ्या शौर्याने व हुशारीनें लढून मला वीरमाता ह्मणीव' ह्याप्रमाणें स्वमातेची संमति घेऊन महाराज आपल्या लोकांसह प्रतापगडावर गेले

हे वर्तमान अफझुलखानास कळले तेव्हा तो पुण्याकडचा रोख फिरवून वाईस आला, व तेथे तळ देऊन मोठ्या हुशारीने राहिला. महाराज अशा डोंगराळ व बिकट जागी जाऊन राहिले हे पाहून खानाला फार वाईट वाटले तो प्रांत किती खडतर आहे हे त्यास पक्के ठाऊक होते तेव्हा अशा अडचणीच्या जागी शिवाजीमहाराजाशी सामना करणे आपणास फार जड जाईल हे त्याच्या लक्षात येऊन तो विचारात पडला मग त्याने असें मनात आणिले कीं, त्याला तिकडून हरयुक्तीनें काटावें, त्याला स्नेहभाव दाखवून व इतबार वाटेल असें करून इकडे आणावे, आणि जीवंत धरून मतलब साधावा. ह्या हेतूने त्यानें मावळा-तल्या कित्येक देशमुखास पत्रे लिहून अनेक प्रकारी लालूच दाखवून आप-आपल्या लोकांनिशी आपल्या मदतीस येण्याविषयीं लिहिलें त्याप्रमाणे खंडोजी खोपडे आपले मावळे घेऊन अफझुलखानास जाऊन मिळाला ह्या खोपड्याचें आणि कानोजी जेधे याचें देशमुखीसबंधाने भांडण होते जेधे महाराजांस शरण गेल्यामुळे त्याजकडे हिरडस मावळाची देशमुखी कायम झाली होती ह्या रागाने खोपड्याने महाराजाशी विरोध करून यवनाची ताबेदारी स्वीकारिली होती त्याने ह्या वेळी शिवाजी महाराजाना पकडून आणतों असा लेखी करार रोहिडखोऱ्याची देशमुखी परत मिळण्याच्या आशेने अफझुलखानाशी केला होता! ह्या खोपड्याप्रमाणेंच गुंजन मावळाचा देशमुख विठोजी हैबतराव यास अफझुलखानानें आपणास येऊन मिळण्याविषयी लिहिले होतें अफझुल-खानास खोपडे जाऊन मिळाल्यामुळे आपले वतन जाण्याची भीति आहे व आपणासही अफझुलखान बोलावीत आहे अशा आशयाचें पत्र कानोजी जेध्यानें महाराजास लिहिल्यावरून त्यानीं त्यास असा जबाब लिहिला कीं, तुमच्या वतनाची तुह्मास परवा असल्यास तुह्मी त्याच्याकडे जावें; पण चांगला विचार करून जावें.' ह्यावर जेधे महाराजाकडे जाऊन ह्मणाला कीं, 'मी आपलें वतन तुमच्या पायी अर्पिलें आहे. तुमचें बरें तें माझे बरें.' असें ह्मणून आपलीं

मुलेंमाणसें व चीजवस्त तळेगावास पोचती करून तो आपले लोक घेऊन प्रतापगडावर गेला[1]

अफझुलखान वाईस येऊन भिडला, तेव्हा त्याच्या गोटातील एकंदर हाल-चाल कशी काय आहे व त्याच्याबरोबर सैन्याची वगैरे सिद्धता कितपत आहे ते पाहण्यासाठीं महाराजानी त्या कामगिरीवर विश्वासराव नाना प्रभु[2] याची नेमणूक केली हा विश्वासराव फकिराचा वेश घेऊन दररोज रात्री त्याच्या गोटात हिंडे व एकंदर बातमी महाराजास पोचवी त्यावरून महाराजाना कळून आले कीं, खानाबरोबर मोठी फौज असून त्याची तयारी भक्कम आहे आपले लोक घेऊन त्यास समरांगणात गाठले असता पुष्कळ माणसाची खराबी होऊन यश हटकून येईल याचा वानवा आहे यास्तव त्याला युक्तीने नामोहरम करून आपले लोक राखावे असा विचार महाराजानी केला, व ह्या विचारास पदरच्या लोकाचीहि समति मिळाली. मग त्यानी अफझुलखानास असा नम्रतेचा निरोप पाठविला कीं, "आपल्यासारख्या बलाढ्य व शूर सरदाराशी सामना करण्याचे माझ्या मनात कदापि यावयाचे नाहीं विजापूरसरकाराशी होईल त्या उपायाने सल्ला करावा अशी माझी उत्कट इच्छा आहे. मी अदिलशहाची मोठीच आगळीक केली आहे मी सर्वस्वी अपराधी आहे मला बादशहाकडून क्षमा होईल की नाहीं याची शंका वाटते यास्तव आपण मध्यस्थी करून मजवर हजरतीची कृपा होईल व कृतापराधाबद्दल माफी होईल असें कराल तर माझे मोठेच भाग्य होय असें मी समजेन मी आजपर्यंत जे काहीं केले आहे त्याजबद्दल मला पराकाष्ठेचा खेद वाटत आहे. आपल्या आश्रयाने व शिफारशीने तरी माझ्या गुन्ह्याची माफी मला सरकाराकडून होईल की नाहीं कोण जाणे तरी पण मी माझ्या ताब्यातला सगळा मुलूख आपल्या हवालीं करण्यास तयार आहे एवढेच मात्र कीं, हजरतीची मजवर कृपादृष्टि अवश्य होईल अशी खातरजमा आपण करावी"

हा असा अगदी गरिबीचा व मित्रेपणाचा निरोप अफझुलखानास आला तो खराच आहे असें त्या गर्विष्ठ व डौली खानास वाटले. त्यातील कपट त्याच्या ध्यानात आलें नाहीं. शिवाजीमहाराज आता आपल्या सगळ्या गोष्टी कबूल करून आपल्या कबजात यावयास विलंब लागत नाहीं असा पक्का भरंवसा त्यास

---

१ रा. राजवाडेकृत खंड १५ लेखांक ३३४,३३५,३३८ व ३६४ आणि खंड १७ पृ ३१ पहा.

२ हा मावळांत मुसे खोरें येथला वतनदार होता.

वाटला तेव्हा त्याला पुरा विश्वास दाखवून त्या बिकट जागेतून काढण्याचा आपला पूर्वोक्त बेत त्यानें कायम केला, आणि कृष्णाजी भास्कर[१] नावाच्या एका हुशार ब्राह्मणास त्याच्याकडे वकिलीस पाठविले खानाने ह्या वकिलास एकांती नेऊन आपले सर्व मनोगत कळवून असें सांगितले कीं, तुह्मी शिवाजीमहाराजाकडे जाऊन त्याला पक्का स्नेहभाव दाखवून येणेप्रमाणे बोध करा, 'तुमचे तीर्थरूप शहाजीराजे व आह्मी काहीं निराळे नाहीं त्याचा आमचा घरोबा असून बंधुत्वाचे नाते आहे. तेव्हा तुह्मी आह्माला काहीं परकी नाहीं तुह्मी आमच्याविषयी यत्किंचित्‌हि किल्मिष मनात बाळगूं नका तुमचे वडील शहाजीराजे यानी महापराक्रम करून मुलूख काबीज केल्यामुळे पातशहाची त्याच्यावर पूर्ण मर्जी आहे ह्यासाठी तुमचे सर्वतोपरी कल्याण करून तुह्मास तळकोंकणचे संपूर्ण राज्य आम्हीं देवविता तुम्हीं घेतलेले किल्ले तुमच्याकडेच कायम रहातील असे करितो तुमच्या मर्दुमकीबद्दल पादशहापाशी तुमची शिफारस करून तुमच्या मनासारखा सरंजाम तुह्मास देवविता तुमची त्याची भेट करून देऊन तुमचे ते अतिशयित गौरव करतील असे करितो "खानाने हा निरोप महाराजास देऊन वकिलास असा कानमंत्र सांगितला की, 'त्यास सतोष व उत्तेजन वाटेल असें बोलून ते आमच्या भेटीस निनदिक्कत येतील असें करा इतकेंहि करून ते आमच्या भेटीस यावयास तयार होत नसल्यास आह्मी त्याच्या भेटीस येतो असे त्यास सागा '

खानाचा हा वकील आपल्याकडे येत आहे असे कळले तेव्हा महाराज गडाखाली उतरून त्याला सामोरे गेले व वर घेऊन आले आलेल्या मनुष्याची व्यवस्था उत्तम प्रकारे ठेवून वकीलाचे बोलणे ऐकून घेण्यासाठी महाराजानी कचेरी भरविली कृष्णाजी भास्कराने खानाचा निरोप इत्थंभूत निवेदन केला,

१ कित्येक बखरीत असे आहे की, अफझुलखानानेच प्रथम महाराजाकडे वकील पाठविला महाराजानी काही निरोप वगैरे पूर्वी पाठविला नव्हता प्रो सरकाराचेहा असेच मत आहे खानाकडील वकिलाचे नाव ग्राटडफ 'पंताजी गोपीनाथ' असे देतो चित्रगुप्त दत्ताजी गोपनाथ असे देतो, व शिवदिग्विजयात गोविंदपंत ह्मणून आणखी एक वकील खानाकडून आला होता असे आहे सभासदकृत बखरीच्या महाडच्या प्रतींत पंताजपंत असे नाव आहे. शेडगावकराच्या बखरीत खानाकडील वकिलाचे नाव दत्ताजी भास्कर असे दिले आहे वाई प्रांतातल्या अफझुलखानाच्या जहागिरीची व्यवस्था पाहण्याचे काम ह्या कृष्णाजी भास्कराकडे असून त्याचा त्याच्यावर मोठा विश्वास होता, असे प्रो. सरकार ह्मणतात.

तो ऐकून घेऊन ते ह्मणाले "ह्या मेहरबानीबद्दल खानाचे आह्मी फार आभारी आहों आम्ही काबीज केलेल्या मुलखापैकी थोडासा जरी आम्हास जाहगिरी-दाखल मिळाला तरी तेवढ्यानेच आम्हाला सतोष होईल कसेंहि झाले तरी आम्ही पादशाहाचे नोकर आहो या इकडच्या प्रातात पुडपाळेगार होते, त्याचा संहार करून आम्ही सगळा मुलुख मोकळा केला आहे. सरकारी मुलखाचा नीट बदोबस्त करून आबादानी केली आहे जुन्या किल्याची दागदुजी करून काही नवेहि बाधले आहेत फौजहि चागली नामी जमा केली आहे याप्रमाणें पादशहाची दौलत वाढविली आहे ही सगळी आयतीच त्यास मिळाल्याने आम्हीं त्याची मोठीच कामगिरी केली असें होणार आहे खान आम्हास आमच्या वडिलाप्रमाणें पूज्य आहेत त्याच्या भेटीस आम्ही मोठ्या प्रीतीनें यऊ" या प्रमाणे लौकिकात जे काही बोलावयाचे होते ते बोलून कचेरी बरखास्त केली व खानाचे लोक आपआपल्या नेमून दिलेल्या बिऱ्हाडास गेले

महाराजानी खानाकडील लोकास बिऱ्हाडास जागा देताना अशी तजवीज केली होती की, कृष्णाजी भास्कराचे बिऱ्हाड इतरापासून अमळ दूर एकीकडे असावे. याचे कारण अर्थात् असें कीं,त्याला एकातीं गाठून फितविण्याचा त्याचा बेत होता. रात्री जिकडेतिकडे निजानीज होऊन सामसूम झाल्यावर मध्यरात्रीच्या सुमारास महाराज त्या वकिलाच्या डेऱ्यात हळूच गेले, व त्यास उठवून त्याच्याशी येणें-प्रमाणें बोलले "तुह्मी जातीचे ब्राह्मण वर्णश्रेष्ठ आहा आजपर्यंत मी जे काहीं केले आहे तें हिदुधर्म व हिदुलोक याचे रक्षण करण्यासाठीच केवळ आहे प्रत्यक्ष भवानीनें मला अशी आज्ञा केली आहे कीं, 'गोब्राह्मणाचे रक्षण कर. हिदूंची देवालये व हिदूचे देव याची नासधूस करणाराचे पारिपत्य कर हिदु-धर्मद्वेष्ट्याचा सहार कर' जगदंबेच्या ह्या आज्ञेप्रमाणे मी जे कार्य आरंभिले आहे त्यास आपल्या सारख्या श्रेष्ठ ब्राह्मणाचे साहाय्य अवश्य हवें आपला धर्म बुडत चालला देवब्राह्मणास पीडा होत आहे सर्व भरतखंड म्लेच्छमय होण्याचा समय आला आहे याबद्दल तुह्माला अवश्य खेद वाटला पाहिजे. आह्मी ही दु स्थिति नाहींशी करण्याचा उद्योग आरंभिला आहे, तो आपल्या सारख्याच थोर पुरुषाच्या साहाय्याने सिद्धीस जाणार आहे." ह्याप्रमाणें अत्यंत गोड व मोहक शब्दांनीं त्याच्याशी भाषण केल्यामुळें त्याची वृत्ति लागलीच पालटली. त्याच्या ठायीं धर्माभिमान जागृत झाला. महाराजाचें असें गौरवाचें व उत्तेजनपर भाषण ऐकून तो अगदीं भाळून गेला. त्यानें पाहिलें कीं, हा पुरुष

स्वधर्मरक्षण व स्वराज्यस्थापन करण्याच्या स्तुत्य कार्यास उद्युक्त झाला असून याच्या अंगी ह्या कार्यसिद्धीस आवश्यक असें धैर्य, शौर्य, वीर्य आदिकरून गुण उत्तम आहेत, व आजपर्यंतचे याचे पराक्रम तारीफ करण्यासारखे आहेत यास्तव याला सहाय होऊन याच्या यशाचा वांटेकरी होण्यातच पुण्य आहे असा विचार करून त्याने महाराजापाशी शपथ घेऊन असें ह्मटले कीं, 'तुमची नोकरी इमानाने करून राहावे असा माझा निर्धार झाला आहे' अशी आणभाक केल्यावर त्याने महाराजास असें कळविले की, 'खानाचा वास्तविक उद्देश तुह्माला पकडून विजापुरास नेण्याचा आहे तो तुह्माला विश्वास दाखवून भेटीस बोलावणार आहे व पकडून विजापुरास घेऊन जाणार आहे हा त्याचा बेत कदापि फिरणार नाहीं ह्याप्रमाणे खानाच्या वकिलास वश करून घेतल्यावर पुढे काय करावे ह्याविषयी उभयताचे काही वेळ खलबत झाले व असें ठरले कीं, कृष्णाजी भास्कराने खानास विश्वास दाखवून तोच स्वत गडाजवळ भेटीस येईल असे करावे, व तो असा आपल्या काबूत आल्यावर त्याचा घात करावा म्हणजे मग त्याच्या सैन्यात गडबड उडून त्याचा हवा तसा मोड करिता येईल हे असें गुप्त कारस्थान करून महाराज स्वस्थानी गेले

मग काही दिवस प्रसिद्धपणे वकिलाशी वरकरणी बोलणे झाल्यावर असें ठरले कीं, खानाने जावळीस यावे व तेथे परस्पराच्या भेटी होऊन एकंदर करारमदार व्हावे ह्या भेटीची व्यवस्था मुकर करण्याकरिता महाराजानी आपल्याकडून पंताजी गोपीनाथ[1] यास खानाकडे वकील ह्मणून पाठविले हा ब्राह्मण महाराजाच्या अगदी विश्वासातला होता त्याला रवाना करण्यापूर्वी एकाती नेऊन कृष्णाजी भास्कराबरोबर झालेले सगळे खलबत त्यानी सांगितले आणि ह्मटले कीं, "तुह्मी खानास असा निरोप द्या कीं, 'आह्मीच तुमच्या भेटीस यावे, पण आह्माला अतिशयित भीति वाटत आहे वाईस भेटीला यावयास आह्माला धैर्य होत नाहीं तुम्ही आह्माला वडिलासमान आहा यास्तव मेहरबानी करून तुह्मीच जावळीस याल तर आह्मी तुमच्या मुलाखतीस अवश्य येतो. आह्माला धीर देऊन पातशहाच्या दर्शनास घेऊन जाल व आमची त्याजपाशी शिफारस कराल तर त्यांत तुमचा थोरपणा आहे खरा विश्वास असेल तर तुह्मी जावळीस यावयास अनमान करूं नये' ह्याप्रमाणें त्याला पुष्कळ गोंरवून सांगावे, काहीं

१ रा राजवाडे ह्मणतात की, हा पंताजी गोपीनाथ महाराजांचा जुना नोकर होता. जिजाबाईबरोबर व महाराजाबरोबर सोंगट्या खेळण्याचा याचा अधिकार होता.

एक अदेशा येऊं देऊं नये त्याचा एकंदर रोंख काय आहे व त्याच्या सैन्याची वगैरे व्यवस्था कशी काय आहे ती पाहून या " खानाच्या वकिलास निरोप देताना त्याजवर सुप्रसन्न होऊन महाराजानी त्याला भरजरी वस्त्रे, मोत्याचा चौकडा, सुवर्णाची कडी व पदके,एक अरबी घोडा, व पाच हजार होन एवढें बक्षीस दिलें व आपल्या वकिलासहि वस्त्रालंकार देऊन त्याच्याबरोबर चागला लवाजमा दिला

कृष्णाजी भास्कराने परत जाऊन खानास असे कळविले कीं, 'शिवाजीमहाराज आपणास शरण येऊन भेटावयास सिद्ध आहेत परतु त्याला वाईस यावयास धैर्य होत नाहीं येथे आल्यानें आपला काहीं तरी विश्वासघात खास होईल असें त्याच्या मनाने घेतलें आहे त्याचा वकील आपल्याकडे आला आहे त्याला आपल्या मुलाखतीस बोलवाल तर तो स्वत शिवाजीमहाराजाचा निरोप काय आहे तो सागेल.' मग पंताजी गोपीनाथास भेटीस बोलावून खानाने त्याच्या तोंडून महाराजाचा निरोप सायत ऐकून घेतला कृष्णाजी भास्कराने त्यावर अशी ज्ञान केली की, 'जावळीस ते बोलावीत आहेत"त्यापेक्षा तेथपर्यंत जाऊन कार्य साधते आहे तर सोडा का ? तुह्मा होऊन जावळीस गेल्याने तुमच्या मनात काहींएक कपट नाहीं असे त्याला वाटून ते तुमच्या भेटीस अवश्य येतील, व ते असे आले ह्मणजे तुमचा कार्यभाग सहज साधेल' यावर खानाने अशी हरकत घेतली कीं, तो जावळीसारख्या बिकट जागीं मला भेटावयास बोलावीत आहे, परतु तेथे काहीं दगा होणार नाही हे तुह्मी शपथेवर सागूं शकता काय ?" कृष्णाजी भास्कर बोलला ' शिवाजीमहाराजाच्या मनात तुमच्याविषयी काहींएक कपट नाही अशी माझी पूर्ण खात्री आहे यासंबधाने तुह्मी काहींएक सदेह मनात आणू नका ही सधि आली आहे ती व्यर्थ दवडू नका जावळीस जाऊन त्याला भेटण्यास मुळीच हरकत नाहीं तेथे आपले लष्कर घेऊन चला त्याला तळ देण्यास पुरेशी जागा तिकडे असून गवतपाण्याचीहि गुबलक सोय होण्यासारखी आहे ' ह्याप्रमाणे त्याने खानाच्या सर्व हरकती मोडून काढून त्याच्या मनात जावळीस जाऊन महाराजास भेटावे व तेथे त्यास पकडून कैद करावें हा बेत चागला भरविला ही आपल्या वकिलाची खातरजमा खानास खरी वाटून त्यानें जावळीस जाण्याची तयारी केली व तो सागेल तसें वागून आपला इष्ट उद्देश सिद्धीस नेण्याचा निश्चय केला मग महाराजाचा वकिल पंताजी गोपिनाथ यानें अफझुलखानाचा वास्तविक बेत काय आहे त्याचा बारीक तपास काढून येऊन महाराजास असें कळविले कीं, खान जावळीस येत आहे, त्यास

भेटण्याची तयारी करून तुह्मीं गडाखालीं जावें आणि त्याला एकांतीं गाठून ठार करावें, आणि मग त्याच्या सैन्यावर छापा घालावा

ह्याप्रमाणे खान जावळीस यावयास सिद्ध झाला हे पाहून महाराजानीं आपल्या जवळच्या सर्व सरदारास बोलावून पुढें काय करावे ह्मणून विचारिलें. त्यांनी महाराजास हुरूप देऊन ह्मटले कीं, 'ह्या प्रसगीं आपण आह्मास जी कांहीं कामगिरी सागाल ती शिरसावंद्य करून तदनुरूप वर्तण्यास प्राणापरतीं मेहनत करू, व आपला उद्देश शेवटास नेऊं आपण मुळीच चिंता करूं नये.' मग मातुश्रीस आपला उद्देश कळवून तिची मसलत विचारिली तिनेंहि त्याचें आश्वासन करून ह्मटले कीं, 'तुझ्या पदरच्या विश्वासू माणसाच्या मसलतीने ठरेल तसें कर ह्या कामात तुला यश देणार श्रीजगदंबा समर्थ आहे तुला आजपर्यंत कोणत्याच मसलतीत अपयश आलेले नाहीं यास्तव ही मसलतहि तूं धैर्यानें व हुशारीने पार पाडशील असा मला पक्का भरवसा आहे' ह्याप्रमाणें सर्वांची सल्ला घेऊन महाराज पुढील कार्यास लागले

खानास आपला पुरा विश्वास यावा ह्मणून त्याच्या सोईसाठी जेवढी व्यवस्था करणे शक्य होतें तेवढी निरलसपणे करण्याचा सपाटा त्यानी चालविला त्याच्या सैन्यास घाट चढून वर येताना अडचण पडू नये ह्मणून जागोजाग असलेली दाट झाडी तोडून वाटा केल्या. त्याच्या सैन्यास तळ देण्यास प्रशस्त जागा व्हावी ह्यासाठी झाडेंझुडपें तोडून चागलें विस्तीर्ण व खुलें मैदान केले वाटेत जागोजागी वारकऱ्याच्या गुप्त व प्रकट चौक्या ठेवून त्यावर कारकून नेमिले, व त्यास असा हुकूम केला कीं, खानाच्या सैन्यास ज्या कोणत्या गोष्टीची उणीव पडेल ती पुरवावी व प्रत्येक मुक्कामास मेजवानीची उत्कृष्ट व्यवस्था ठेवावी.आता खानाच्या सैन्याच्या सोईसाठी जी ही वाट महाराजानी केली होती ती अशा युक्तीने केली होती कीं, त्या वाटेच्या आसपास किर्र झाडी असून तींतून पलीकडे काय आहे ते दिसूं नये कोठेकोठे आडव्या वाटा होत्या त्यात मोठमोठीं झाडे तोडून टाकून त्या साफ बुजवून टाकल्या होत्या.

महाराजानी हा आपला गुप्त बेत नेताजी पालकर, मोरोपंत पेशवे व तानाजी मालुसरे यास कळवून नेताजी पालकरास सैन्य घेऊन कोकणातून घाटमाथ्यावर लागोलाग बोलाविलें, व त्यास किल्ल्याच्या पूर्वभागी असळ दूर दाट झाडीत दबा धरून बसावयास सागितलें तें अशाकरिता कीं, खानाचे लोक त्या बाजूला चढून येण्याचा संभव होता. मोरोपंताबरोबर जुने कसलेले योद्धे होते. त्यांला

अशी वर्दी दिली कीं, ' खानाचे बहुतेक सैन्य खालीं जावळीस तळ देऊन राहा-वयाचें आहे, त्याच्या आसपासच्या झाडीत तुह्मी आपल्या लोकानिशी लपून राहावे.' नेताजीच्या साहाय्यास रघुनाथ बल्लाळ व मोरोपंताच्या साहाय्यास त्रिंबक भास्कर यास दिले ह्या सर्वांस असा हुकूम केला कीं, खानाचा समाचार घेऊन फत्ते झाल्यास शिंगाचा आवाज होईल त्याबरोबर नेताजीने पुढे चाल करून येऊन शत्रूचे जे सैन्य वर येईल त्यावर हल्ला करावा आणि गडावरून पाच तोफा झाल्या ह्मणजे मोरोपताने जावळी येथील खानाच्या लष्करावर तुटून पडावे कोणीहि बेफाम राहूं नये व लुटीवर नजर ठेवूं नये ही अशी बाहेरील व्यवस्था करून गडावर जेथे जितके लोक व तोफा वगैरे सामुग्री हवीशी वाटली तेथे तितकी स्वत पाहून ठेविली जागोजाग नाकेबदी केली. किल्ल्याच्या मागल्या बाजूच्या प्रत्येक बुरुजावर पन्नास मनुष्य व पुढल्या बाजूच्या प्रत्येक बुरुजावर शभर मनुष्य ठेविले, शिवाय किल्ल्याच्या दरवाज्यावरून आत सदरेपर्यंत जागोजाग पुष्कळ लोक ठेवून दिले व त्यावरील मुख्यास अशी वर्दी दिली कीं, आम्ही गडावरून खाली उतरूं लागलो म्हणजे करणा वाजेल त्या वेळीं तुम्हीं हळूहळू पुढे सरकत यावें, आणि भेटीसाठी केलेल्या जागेपासून बाणाच्या टप्प्यात राहावे ह्याप्रमाणे किल्ल्याच्या दरवाजापासून भेटीच्या जागे-पर्यंत टप्प्याटप्प्यानी हजार दोन हजार लोक उभे राहतील अशी व्यवस्था केली व शेवटपर्यंत थोडेसे निवडक लोक बरोबर असावे असें ठरविले

गडाखाली बुरजानजीक मोकळी जागा होती तेथे खानाची मुलाखत घेण्याचे ठरवून त्या जागी सुदर व भव्य मडप तयार करविला त्यात एक मुख्य बैठकीची व दोनतीन लहान बैठकीच्या जागा करविल्या मुख्य बैठकीची सदर फारच उत्कृष्ट करविली. वर सुंदर छत लावून त्याला मोत्याच्या झालरी लाविल्या; व जिकडेतिकडे गाद्या, पडगाद्या, लोडे, गिर्द्या वगैरे सुरेख लावून ठेविलीं. ह्या-प्रमाणें ह्या सदरा एकीहून एक उत्तम करून सर्व मंडप चागला शृंगारिला

ही अशी सगळी व्यवस्था करून त्यानी खानास येण्याविषयी निरोप पाठविला. त्यावरून तो आपल्या लोकानिशीं रडतोंडीच्या घाटाचा रस्ता नीट केला होता त्यानें यावयास निघाला ह्या वेळी त्याने तोफा वगैरे आपले अवजड सामान वर आणिलें नाहीं असें ह्मणतात[१]. खान रडतोंडीच्या घाटाने उतरून पारानजिक

---

१ काही बखरकाराचें असें ह्मणणे आहे की, खानाने आपला तोफखानाहि वर आणिला होता.

कोयनेच्या काठी मुक्काम करून राहिला त्या वाटेनें वर येताना त्याच्या लष्कराचे फारच हाल झाले व त्याच्या सैन्यातले पठाण ह्मणू लागले की, 'शिवाजी मोठा हरामखोर आहे त्याची करामत व हिकमत कोणाला कळावयाची नाहीं. ह्या प्रसगी अशा बिकट ठिकाणीं चढून गेल्यावर आपली काहीं वडगत दिसत नाहीं ' हे उद्गार अफझुलखानाच्या कानी जात, परतु त्याच्या बुद्धीस पक्का भ्रम पडल्यासारखा झाला होता शिवाजीमहाराज अशा युक्तीने आपल्या हाती खचीत लागतील अशी बळकट आशा त्यास वाटल्यावरून त्याने हे धाडस केले. खानाच्या मुक्कामाच्या जागी तबू, राहुट्या, मडप इत्यादिकाची तयारी करून त्याच्या लष्करास लागणाऱ्या सामानासुमानाची तरतूद चागली करून ठेविली होती ही सगळी व्यवस्था पाहून खान बहुत खुष झाला त्याला आता खास वाटू लागले की, शिवाजीमहाराजाचे दिल आपल्याविषयी साफ आहे, ते आपणास बिनदिक्कत भेटतील, व मग आपला हेतु सिद्धीस जाईल

जावळीस जाऊन पोचल्यावर खानाने कृष्णाजी भास्करास गडावर पाठवून महाराजास असा निरोप दिला की, 'आह्मी खाली येऊन दाखल झालो आहो. भेटीस सत्वर यावे विलब लावू नये ' हा निरोप घेऊन वकील गडावर गेला त्याच्याशी लौकिकात काही बोलावयाचे होते ते बोलून मग त्याला महाराज एकान्ती घेऊन गेले व त्याच्याशी हितगुजाच्या गोष्टी करू लागले. तेव्हा तो वकील ह्मणाला की, ' आपल्यापाशी कबूल केल्याप्रमाणे खानास जावळीस तर आणिले आहे आता खाशाखाशाची मुलाखत एकान्ती करविते ह्या समयी आपण आपला पराक्रम व आपले शौर्य याची पराकाष्ठा करून स्वकार्य सिद्धीस न्यावे नतर असे ठरले की, नेमलेल्या ठिकाणी खानाची व महाराजाची भेट आजपासून तिसऱ्या दिवशी व्हावी कृष्णाजी भास्कराने मात्र खानाकडून असे करवावे की, मुलाखतीस येताना त्याने आपल्याबरोबर फक्त एक शिपाई सदरेस आणावा, व महाराजानीहि एकच शिपाई बरोबर न्यावा बरकड सगळे लोक उभयतानी दूर ठेवावे ही व्यवस्था खानाकडून मान्य करवितो असे अभिवचन देऊन कृष्णाजी भास्कर गडाखाली आला खानाकडे जाऊन त्याने भेटीच्या अटी त्यास कळविल्या, व वरती आणखी अशी सफाई केली कीं, शिवाजी महाराजाला तुमचा भरवसा अद्यापि येत नाहीं. यास्तव आपला मतलब

१ प्रो सरकार ह्मणतात की, त्याने गोपिनाथपतास पाठविले.

साधण्यासाठी तो ह्मणतो त्या अटी मान्य करण्यास आपणाला कांहींएक हरकत नाहीं. खानाला शिवाजीमहाराज केव्हा हातीं लागतात असें होऊन गेलें होतें. त्या अटी मान्य करण्यास त्यानें मुळीच आढवेढे घेतले नाहींत. त्या त्याला तत्काळ मान्य झाल्या. भेटीची जागा तयार केली होती ती कशी काय आहे ते पाहून येण्यासाठीं त्यानें आपल्या भरवशाचे लोक पाठविले. त्यांनी ती पाहून येऊन खानास अशी बातमी दिली कीं, जागा चांगली मोकळी असून जवळपास फौज वगैरे कांहीं ठेविलेली नाहीं.

शेवटी भेटीचा समय समीप आला. खान पंधराशें निवडक लोक बरोबर घेऊन निघाला. हे पाहून कृष्णाजी भास्कर ह्मणाला कीं, "एवढे लोक भेटीच्या जागी घेऊन गेला तर शिवाजीमहाराजास तुमचा विश्वास वाटणार नाहीं, व ते कदाचित् गडाखालींहि येणार नाहींत. तुह्मी पातशाही वजीर असून नामांकित वीर आहां. शिवाजीमहाराज आपणापुढें केवळ तृणवत आहेत. त्याला पकडावयाला एवढी तयारी कशाला? ते कराराप्रमाणें एक शिपाई घेऊन येणार. तेव्हा आपणहि एकच मनुष्य बरोबर घेऊन सदरेस जावें हें ठीक दिसतें."[1] हे त्याचें बोलणें खानाला पसंत वाटून त्यानें आपले लोक वाटेंत जागोजाग ठेविले, व कांहीं जणास भेटीच्या ठिकाणापासून बाणाच्या टप्प्यांत ठेवून तो पालखींत बसून पुढें चालला. त्याच्या बरोबर दोन हुजरे, सैदबंडा ह्या नावाचा एक पट्टाइत शिपाई व कृष्णाजी भास्कर एवढेच लोक तो सदरेस आला त्या वेळीं होते. त्याची अशी पक्की खात्री होती कीं, करारावरहुकूम शिवाजीमहाराज भेटावयास आले ह्मणजे बस आहे. त्याला आपण तत्क्षणीं कैद करून घेऊन जाऊं. त्याचें आपल्यापुढें तें बळ कितीं? त्याप्रमाणें त्याला स्वबलाचा पूर्ण भरवसा असल्याकारणानें त्यानें आपला जामानिमा एखाद्या कचेरींस जावयाच्या वेळीं करितात तसा केला होता. त्याच्या अंगांत मलमलीचा झिरझिरीत अंगरखा असून एका हातांत नुसती एक तरवार होती. खान महाराजाच्या पूर्वीच सदरेस जाऊन बसला, व त्याला लवकर स्वारीं घेऊन येण्यासाठीं त्यानें आपल्या वकिलास गडावर पाठविलें. त्यानें सांगितल्यावरून महाराजास कळलें कीं, खान एका

---

[1] ग्रा. सरकार ह्मणतात कीं, गोपीनाथपंतानें त्याला असें ह्मटलें.

[2] पोवाड्यांत ह्मटलें आहे कीं, मोरोपंत व शामराजपंत यास खानाला आणावयास पाठविलें असून खान चार हजार लोक घेऊन पालखींत बसून येऊं लागला तेव्हा त्यांनीं त्याला ते लोक दूर ठेवावयास लावून पालखीहि लांबच ठेवावयास सांगितलें.

शूर शिपायास बरोबर घेऊन सदरेस आला आहे तेव्हा महाराजानीं खानाला असा निरोप पाठविला कीं, तुह्मी फक्त एका हुजऱ्यानिशी सदरेस बसाल तर मी त्यालीं येईन त्यावरून खानानें सैदबडास दूर जाऊन राहावयास सांगितलें.

इकडे महाराजानी पूर्वोक्त प्रकारे सगळा कडेकोट बंदोबस्त केल्यावर स्नान, देवपूजा आदिकरून नित्यविधि उरकले नंतर त्यानी श्रीभवानीचें स्मरण केले, व या आणीबाणीचा व केवळ जीवावरचा प्रसंग पार पाडण्याविषयी तिची मनोभावें प्रार्थना केली, ती इतकी गोल्कठ होऊन केली की, भवानी त्याच्या अंगात संचरून येणेप्रमाणे बोलली ' अरे मुला, चिंता करू नको या समयी तुझ्या पाठीवर मी उभी आहे खानास मोह घालून मी तुझ्या सन्मुख आणिले आहे तरी तू निर्भय चित्ते अवमान करून त्याचा वध कर त्याचे शिर कापून माझ्यापुढ ठेव त्याच्या रुधिराचा टिकला ललाटो लावून, ह्मगा बळी देऊन मला संतुष्ट कर ' जवळच्या कारभाऱ्यानी देवीच हे शब्द टिपून ठेविले, व अंगातलें वार जाऊन ते सावध झाले तेव्हा त्यास ते निवेदन केले ते ऐकून त्यास अधिकच हुरूप आला नंतर त्यानी आपल्या एकदर सरदारास उद्देशून असें भाषण केल ' आह्मी तर जीवित तृणप्राय समजून शत्रूच्या अंगावर चालून जात आहों यात यश आले तर ठीकच आहे परंतु काही भलताच प्रकार घडला तर तुह्मी घाबरून जाऊ नका ठरविलेल्या बेताप्रमाणे शत्रूवर चालून जाऊन त्याचा मोड करा व राज्याचे रक्षण करा तुह्मी सर्व शूर व पराक्रमी आहा आमची सगळी मदार तुमच्यावर आहे तुमच्यासारखे इमानी व नीयशाली पुरुष सहाय आहेत ह्मणून आह्मास यवनाची परवा वाटत नाहीं. या समयीं सर्वांना आपआपल्या शौर्याची व पराक्रमाची पराकाष्ठा करावी. तुमची अनुकूलता आहे ह्मणून मला अफझुलखानाचा मुळीच हिशोब वाटत नाही आजपर्यंत केलेली कमाई आपल्या साहाय्याचे व शौर्याचे फळ आहे. ती आपली कमाई कायम राखण्यास जिवाची परवा न करिता या कठीण प्रसंगी झटाल तर तुमची कीर्ति अधिकच वाढेल '' हे असे वीर्योत्साहाचे उद्दीपन करणारे भाषण ऐकून सर्व लोकाच्या अंगात स्फुरण आले ते ह्मणाले 'आपण आह्मास जी जी आज्ञा कराल तदनुसार वागण्यात आम्ही यत्किंचितहि कसूर करणार नाही त्यासाठी आमचे प्राणहि बळी पडले तरी त्याची आह्माला क्षिति नाही हे प्राण आपल्या चरणी एकवार वाहिले आहेत ते आता आमचे नव्हत ते स्वामिकार्यी गत झाले तर ते आम्हीं मोठेच भूषण समजू ''

ह्याप्रमाणे पदरच्या लोकांत उत्साह व अभिमान हीं जागृत करून व त्यांच्याशी आणखी काही निरवानिरवीच्या गोष्टी बोलून महाराज खाली जाण्याच्या तयारीस लागले त्यांनी अंगात जिरे घालून त्यावर झगा चढविला, तशीच डोकीस जिरेटोपी घालून वरती पागोटे घातले चोळणा व काचा कसला उजव्या हातात बिचवा घेऊन तो अस्तनीत छपविला व डाव्या हाताच्या पंजाला वाघनख चढविले हा असा पोषाख केल्यावर महाराज पुन देवीच्या दर्शनास गेले व मातुश्रीच्या चरणी मस्तक ठेवून गडाखाली खानाच्या भेटीस जाण्याविषयी तिजपाशी निरोप मागू लागले त्या समयी त्या माउलीस गहिवर येऊन ती ह्मणाली, "बाळा तू जगदंबेच्या कृपेने जय पावशील माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे कुंतीचे पुत्र भीम व अर्जुन हे जसे महापराक्रमी निपजले तसा तू भोसल्यांच्या कुळात निर्माण झाला आहेस ह्या कुळाचे नाव जगात गाजीव अफझुलखानास रणात ठार करून राज्याची अभिवृद्धि कर शिवबा, तू मला आज कुंतीच्या पंक्तीस बसीव खानाला जीवन सोडू नको त्याचे शिर तोडून आण तुझा वडील बंधु संभाजी ह्या खानामुळे प्राणास मुकला आहे, त्याचे उसने घे"

ह्याप्रमाणे मातुश्रीचा आशीर्वाद घेऊन महाराज गडाखाली हळूहळू उतरू लागले त्यांच्या बरोबर तानाजी मालुसरे, येसाजी कंक, हिरोजी फरजंद, पंताजी गोपीनाथ वगैरे पाचपन्नास लोक होते सदरेपाशी आल्यावर पालखीतून उतरून महाराज जिवा महाल्या व संभाजी कावजी यास बरोबर घेऊन आत गेले ते खानाला पाहून स्वागतसत्कार करून मध्ये मध्ये थबकू लागले कृष्णाजी भास्कर

१ रायरीच्या बखरीत असे आहे की, ह्या वेळी आपणास जय मिळेल की नाही याची शंका वाटून महाराजांनी काही ब्राह्मणास पुष्कळ द्रव्य देऊन काशी व गया येथे पाठविले, व आपल्या जिवास धोका आल्यास आपले उत्तरकार्य त्या पुण्यक्षेत्रात करावयास त्याला सांगितले त्याप्रमाणेच त्यांनी ब्राह्मणास पुष्कळ गोप्रदाने केली व आपली दाढी काढिली हे सार पाहून जिजाबाईस फार दुःख होऊन ती रडू लागली तेव्हा तिला महाराजांनी दूर नेऊन ठेविले आता ह्या खानामुळे संभाजीचा वध झाल्याचा जो उल्लेख आहे त्याचा खुलासा दुसऱ्या भागातल्या एका टिपवरून होण्याजोगा आहे शहाजीराजाच्या कर्नाटकातल्या जाहगिरीत जो बखेडा झाला होता तो ह्या खानाच्या विश्वासघातामुळे झाला होता असे ह्मणतात,

२ जिवा महाल्या व संभाजी कावजी असे दोघे बरोबर होते असे सभासद, चित्रगुप्त व शेडगावकर ह्मणतात मि किंकेड व प्रो सरकार हेच ह्मणणे खरे मानितात. पोवाड्यात असे आहे की, जिवाजी महालदार याजपाशी आपली तरवार देऊन त्यासच बरोबर घेतलें होते. ग्रांटडफ ह्मणतो की, महाराजाबरोबर तानाजी मालुसरे होता

खानापाशी होताच. त्याने त्याला असें सांगितलें कीं, आपली धिप्पाड मूर्ति पाहून शिवाजीमहाराज घाबरत आहेत, ह्मणून ते असें करीत आहेत वास्तव हा तुमचा हुजऱ्याहि येथून जाऊं द्या, ह्मणजे त्याला पुढें यावयाला धीर होईल. खानाला तें खरेंच वाटून त्यानें त्या हुजऱ्यालाहि दूर जावयास सांगितलें मग महाराज खानाजवळ गेले त्याच्या बरोबरच्या हुजऱ्यांच्या दोन हातांत दोन तरवारी होत्या तरी त्याच्या संबंधानें खानानें हरकत घेतली नाहीं[1] महाराज जवळ आले असें पाहून खान उभा राहून त्यास भेटावयासाठीं ह्मणून दोनतीन पावलें पुढें सरसावला खान ह्या वेळीं अगदीं उतावळा झाला होता त्याला आतां अशी पक्की खात्री वाटली कीं, महाराज निःशस्त्र असून आपल्या तावडींत सहज सांपडतील कारण उघडच होतें कीं, त्याचें धूड मोठें विशाळ असून महाराजाचा बांधा अमळ ठेंगणा व सडपातळ होता कृष्णाजी भास्करानें रीतीप्रमाणें उभयतांची ओळख करून दिल्यावर ते एकमेकांस आलिंगन करावयास सरसावले, तों खानानें महाराजांची मुंडी कवटाळून डाव्या काखेखालीं घट्ट

[1] ग्रॅ० सरकार ह्मणतात कीं ह्या भेटीच्या वेळीं एकंदर आठ पुरुष हजर होते. अफझुलखान, त्याचा वकील व त्याचे दोन हुजरे आणि शिवाजी महाराज, त्यांचा वकील आणि त्यांचे दोन हुजरे ते आणखी असें ह्मणतात कीं, एखादा पाटाव केलेला बटक्यार जसा निःशस्त्र होऊन शरण येतो, तसे महाराज खानापुढें जातात दिसले अफझुलखानापाशीं मात्र तलवार होती त्याकाफीखान ह्मणतो कीं दोघेहि अशस्त्र होते.

[2] ग्रांटडफ ह्मणतो कीं, परस्परांस आलिंगन करितांना शिवाजी महाराजांनीच प्रथम खानाच्या पोटांत वाघनख खुपसलें एकंदर मराठी बखरींतील मजकूर मुळींतल्या सारखा आहे माटककृत आदिलशाहीच्या इतिहासांत अफझुलखानाच्या वधाचा प्रकार निराळाच दिला आहे तो असा अफझुलखानापुढें आपलें कांहीं चालणार नाहीं असें पाहून महाराजांनी त्याच्याशीं सख्य करण्याचा घाट घातला, व त्यास पराकाष्ठेची गरिबी दाखवून व त्याच्या डेऱ्यांत जाऊन गोडगोड बोलून त्याला प्रतापगडावर मेजवानीस बोलाविलें तो महाराजावर विश्वास ठेवून गाफीलपणानें दहाबारा लोकांनिशीं गडावर आला असतां त्याच्यावर महाराजाच्या हत्यारबंद लोकांनीं गर्दी करून त्यास ठार केलें तुमानीनुस्सलातीननामक बखरींतहि असाच मजकूर आहे पृ ५६९ पाहा चित्रगुप्ताची बखर व पोवाडा यांत त्याचे परस्परांशीं रागारागाचें भाषण होऊन मग हें द्वंद्वयुद्ध झालें असें ह्मटलें आहे महाराजांनीं भेटीसाठीं असा भपक्याचा तंबू उभारल्याबद्दल खान त्याजवर रागावल्यावरून त्यांची परस्परांशीं बोलाचाली झाली असें कित्येकांचें ह्मणणें आहे खोटगावकर ह्मणतो कीं, महाराजांनीं आपल्या वैभवाचें असें प्रदर्शन केल्याबद्दल त्याच्या वकिलापाशीं खानानें नाखुशी प्रदर्शित केली. तेव्हां त्या वकिलानें त्याची अशी समजूत केली कीं, ह्या सगळ्या

धरिली, व हातात कटार होती तिचे मेण टाकून ती त्याच्या कुशीत चालविली, परंतु त्याच्या अंगात जिरे होते त्यास ती लागून खरखरली, अंगास लागली नाही खानानेच पहिल्याने दगा करण्याचा प्रयत्न केला तेव्हा आता आपणास पाहिजे ते करण्यास हरकत नाही असें मनात आणून महाराजांनी डाव्या हातात वाघनख होते ते खानाच्या पोटात चालविले व दुसऱ्या हातातल्या बिचव्याचाहि मारा केला, व त्याच्या काखेतून आपली मुंडी चपळाईने काढून घेतली वाघनखाचा मारा होताच खानाचे पोट फाटून आतडी बाहेर आली ती एका हाताने सावरून धरून त्याने आपल्या हातच्या तरवारीचा एक सज्जड वार महाराजावर केला तो त्यांनी चपळाईने उडी मारून चुकविला तरी तो शिरस्त्राणास निसटता लागून ते तुटून जवाहिरसी जखम झाली इतक्यात महाराजांनी डोळ्याचे पाते लवते न लवते तो खानावर आणखी एक वार करून त्यास अगदी घायाळ केले व त्याच्या हातातली तरवार ते हिसकून घेऊ लागले तेव्हा खान मोठ्याने ओरडला की, 'मारले मारले, दगा दगा, लवकर धावा' हे शब्द कानी पडताच उभय पक्षाकडील जे लोक दूर उभे होते ते तेथे येऊन पोहचण्यापूर्वी सय्यद बंडा तेथे धावत आला, व त्याने महाराजावर पट्ट्याचे वार चालविले तेव्हा महाराज जिवा महालियाजवळील पट्टा उजव्या हातात चढवून व डाव्या हातात बिचवा घेऊन त्याचे वार चुकवू लागले इतक्यात जिवा महालियाने सय्यद बंडाच्या खांद्यावर फिरंगीचा वार करून त्याच्या पट्ट्याचा हात तोडून टाकला, व शेवटी तो जेर होऊन पडला मग उभय पक्षाकडील लोकांचे रणकंदन मातले ह्या गर्दीत खानाच्या लोकांनी शिताफी करून त्याला पालखीत घालून चालविले[1] इकडे येसाजी कंक व तानाजी मालुसरे यांनी महाराजांस

---

बहुमोल वस्तु अखेरीस विजापूर सरकाराच्या ताब्यात जावयाच्या आहेत तारीख इ शिवाय ह्या यवनी बखरीत असे आहे की, उभयतांचा थोडीशी बोला चाली झाल्यावर गोपीनाथपंताने महाराजास खानाची माफी मागावयास सांगितल्यावरून त्यांनी पुढे होऊन खानाच्या पोटावर आपले डोके टेकले त्याबरोबर खानाने त्याला दाबून धरून त्याच्यावर तरवार चालविली, तेव्हा महाराजांनी त्याच्या पोटात वाघनख खुपसले

१ येसाजी कंकाने त्याला ठार केले असे चिटणीस म्हणतो तानाजी मालुसरे व शिवाजी महाराज या दोघांनी मिळून त्याला मारिले असे डफ म्हणतो

२ सभासद व चित्रगुप्त म्हणतात की, खान स्वतः चबुतऱ्यावरून उडी टाकून पळून सुटला व 'दगा दगा' असे मोठ्याने ओरडला तेव्हा त्याचे लोक धावून येऊन त्याला पालखीत घालून घेऊन जाऊ लागले.

त्या गर्दीतून सुखरूप बाहेर काढिल्यावर ते खानाच्या पालखीमागून धावले भोयाचे पाय तोडून त्यांनी पालखी खाली पाडिली, आणि खानाचे डोकें कापून रुमालांत बांधून आणिलें[1] ह्या धामधुमीत कृष्णाजी नावाचा एक कारभारी अफझुलखानाबरोबर होता तो खानाची अशी दशा पाहून तरवार उपसून महाराजांवर चालून आला त्याचे दोनतीन वार महाराजांनी चुकविले व त्याला सांगितलें की, 'ब्राह्मणास मारूं नये अशी मला माझ्या वडिलांची आज्ञा आहे, यास्तव तू बऱ्या गोष्टीने निघून जा' असें बोलून त्याला सोडून दिलें[2]

ह्या सर्व गडबडीतून महाराज सुटून किल्ल्याच्या दरवाज्यावर सुखरूप जाऊन पोहचले त्या वेळी दोनचार घटका दिवस उरला होता पूर्वसंकेताप्रमाणे इशारतीच्या तोफा सुटल्या व शिंग वाजलें ह्या तोफा खानाच्या तळावरील लोकांच्या कानी पडल्या तेव्हा त्यास असें वाटलें की, ह्या भेट झाल्याबद्दलच्या होत ह्याप्रमाणे ते गाफील राहिले असतां इकडे नेताजी पालकर पूर्वी ठरल्याप्रमाणे खानाबरोबर वर आलेल्या पठाणी लोकांवर तुटून पडला इतक्यांत खानाचा वध होऊन त्याचें शिर कापून गडावर नेल्याचें वर्तमान त्या लोकांस कळून त्यांची वादल उडाली नेताजी पालकराच्या लोकांनी त्यांच्यावर हल्ला केला तेव्हा तर त्यांची केवळ त्रेधा उडाली तरी ते फार शूर व रणांत कसलेले असे निवडक लढवय्ये असल्यामुळे त्यांनी मावळ्यांशी बराच वेळ युद्ध केलें परंतु

---

१ डफ ह्मणतो की, [illegible] खंडू माळ यानें व दुसऱ्या कोणी कापून आणिलें चित्रगुप्त व सभासद हे ह्मणतात की, महाराजांच्या आज्ञेवरून संभाजी कावजी यानें ते आणिलें पोवाड्यांत ह्मटलें आहे की, संभाजी कावजीनें भोयाचे पाय तोडले आणि महाराजांनीं स्वतः खानाचें शिर कापिलें प्रो. सरकार ह्मणतात की संभाजी कावजीनें हें काम केलें

२ यवनी बखरींच्या व राजापूरच्या इंग्रज वखारवाल्याच्या लेखाच्या आधारावरून प्रो. सरकार ह्मणतात की, अफझुलखान हा असा आपल्याच दगेखोरपणास बळी पडला तो असा महाराजांस दगयानें पकडून न्यावयास किंवा ठार मारावयास आला असतां त्यांनी त्याच्या हातीं न सापडण्याची खबरदारी घेतली नसती तर त्यास वेडे ह्मटलें असतें मि. करकरिआ व न्यायमूर्ति रानडे यांनी मराठा बखरींत दिलेला एतत्संबंधाचा वृत्तांत बरोबर आहे असें प्रतिपादन केलें आहे ह्या वादांत एवढी गोष्ट निर्विवाद आहे की, महाराजांस पकडण्याची किंवा ठार मारण्याची प्रतिज्ञा खानानें केली होती, आणि त्याच्या तावडींत न सापडण्यासाठीं महाराजांस युक्ति योजणें प्राप्त होतें त्यानें मावळांतल्या खोपडे वगैरे देशमुखांशीं केलेल्या कारस्थानावरूनहि त्याचा सदरहु हेतु स्पष्ट दिसतो

शेवटी त्याचा पुरा मोड झाला मावळ्याच्या हातीं जितका पठाण लागला तितका त्यानी कापून काढिला.

तिकडे मोरोपत पिंगळयानेंहि संकेताप्रमाणे खानाच्या जावळी येथील लष्करावर एकदम घाला घातला शत्रूचा आपणावर असा हल्ला येईल हे त्याच्या ऱ्यानीमनीहि नव्हते ते अगदी बेफाम होते ह्मणून हा असा त्याच्यावर अकस्मात् हल्ला झाला तेव्हा त्याची तर पुरी गडबड उडाली तरी तेहि मोठ्या नेटाने लटले शेवटी त्याची दाणादाण होऊन ते सैरावैरा पळत सुटले महाराजाचा आपऱ्या सरदारास नेहमी असा हुकूम असे कीं, जे कोणी हातातलें शस्त्र ठेवून शरण येतील त्यास ठार मारू नये ह्यामुळे पुष्कळ लोक पाडाव झाले कित्येक लोक आसपासच्या रानात कैक दिवस पळत छपत होते. त्याला त्यातून निघून जाण्यास वाटच मुळी सापडेना अशा रीतीने दीन व हैराण झालेले पुष्कळ लोक महाराजाच्या लोकानी धरून आणिले[1]

ह्याप्रमाणे हातीं लागलेल्या शत्रूच्या लोकास महाराजानी आपल्या नेहमीच्या क्रमास अनुसरून मोठ्या औदार्याने व ममतेने वागविले त्याचा योग्य परामर्ष घेऊन व त्यास वाटखर्च वगैरे देऊन सोडून दिले जे अमीरउमराव पाडाव झाले होते त्याचा योग्य मानमरातब करून, त्यास वस्त्र घोडी वगैरे देऊन व त्याचे गौरव करून विजापुरास जावयास निरोप दिला महाराजाचा हा असा मनाचा थोरपणा पाहून पाडाव केलेले कित्येक मराठे शिपाई त्याच्या नोकरीस राहावयास तयार झाले अशा लोकास त्यानी ठेवून घेतले ह्या वेळी झुजारराव घाटगे ह्या नावाचा एक मोठा सरदार महाराजाच्या हाती लागला होता त्याच्या बापाचा व शहाजीमहाराजाचा परम स्नेह होता, हे महाराजास ठाऊक होतें. यास्तव त्यानी त्याला आपल्या जवळ राहण्याविषयी पुष्कळ आग्रह केला, पण तो काहीं केल्या ऐकेना तेव्हा त्याला वस्त्रालंकार वगैरे देऊन मोठ्या सन्मानानें विजापुरास परत पाठविलें[2]

ह्या गर्दीत अफझुलखानाचा मुलगा फाजलखान हा रणात घायाळ होऊन पळाला तो आपल्या जखमी झालेल्या पायास चिरगुटे बांधून झाडीतून लपत

---

१ ह्या लढाईत खानाकडचे तीन हजार लोक गारद झाल्याचे वर्तमान राजापुरच्या इंग्रज व्यापाऱ्याना मिळाल्याचे त्याच्या कागदपत्रात नमूद केले आहे, असें प्रो सरकार ह्मणतात

२ प्रो सरकार ह्मणतात की, खानाचे दोघे मुलगे, एक मोठा सरदार, लिंबाजी भोसले व झुजारराव घाटगे असे ह्या पाडाव केलेल्या लोकात होते.

छपत चालला होता त्यास व अफझुलखानाच्या कुटुंबातील इतर माणसाला खंडुजी काकडे याने पकडले तेव्हा त्यानी त्यास लाच देऊं केल्यावरून त्यानें त्याला कोयनेच्या तीरानें कऱ्हाडास सुरक्षित नेऊन पोचविलें, महाराजापुढे त्यास आणिले नाहीं ह्याबद्दल महाराजानी त्याला देहान्तशासन केलें

ह्या लढाईत महाराजास पुष्कळ लूट मिळाली शेपाऊणशे हत्ती, सातआठ हजार घोडी,[2] हजारबाराशे उंटे, सगळा तोफखाना, दोनतीन हजार बैल, मोहरा, होन वगैरे रोख नाणे दहाबारा लक्षाचे, सोने, रत्नं, मोत्ये वगैरे जड जवाहीर दोनतीन लक्ष किंमतीचे, कापड सुमारे दोन हजार ओझी, डेरे, राहुट्या, पाले वगैरे स्वारीच्या उपयोगाचे मुबलक सामान, इतकी लूट त्यास मिळाली याशिवाय आणखी खानाच्या लष्करातले पुष्कळ मराठे शिपाई महाराजाची मर्दुमकी व औदार्य पाहून चकित झाले व त्याच्या नोकरीस मोठ्या खुषीने राहिले यामुळे त्याच्या लष्करात पुष्कळच भरती झाली

खानाचे शिर कापून आणिले ते महाराजानी भवानीस वाहिलें भवानीचे दर्शन घेतल्यावर ते मातुश्रीच्या दर्शनास गेले आपला परम प्रिय पुत्र विजयी होऊन सुखरूपपणे गडावर येऊन आपल्या दृष्टीस पडला ह्मणून तिला अतिशयित हर्ष झाला तिनें त्याला पोटाशी धरून ह्मटले 'सभाजीचा सूड उगवून तू माझ्या डोळ्याचे पारणे फेडिले, शिपाईगिरीची शर्त केली हें यश तुला मिळाले हे तुझे मोटेच भाग्य समजले पाहिजे शत्रूला मारून सुखरूपपणें मला येऊन भेटलास हा सोन्याचा दिवस उगवला ' असे बोलून तिनें महाराजावरून निंबलोण केले, त्याच्या समागमे जे होते त्यास मोटमोटी बक्षिसे, वस्त्र, भूषणें देऊन त्याची बढती करविली 'तुह्मी होता ह्मणून हा विजयी होऊन आला,' अशी त्याची तारीफ तिनें केली

---

१ चिटणीस व शिवदिग्विजयकार ह्मणतात की, घटोना खोपटा ह्या नावाचा एक अफझुलखानाकडील मावळ्याचा मुख्य सरदार होता, त्याने फाजलखान व खानाचा कबिला यास दोनशे लोकाच्या मदतीने कऱ्हाडास नेऊन पोचते केले हा खोपटा पुढे महाराजाच्या लोकाच्या हाती लागून त्याचा त्यानी शिरच्छेद केला. कानोजी जेध्याचा प्रतिस्पर्धी जो खोपडे तोच हा असावा सभासद ह्मणतो की, फाजलखानास इतर सरदाराप्रमाणे पकडून आणिले असता त्याचा महाराजानीं योग्य मान करून त्यास सोडून दिले

२ प्रो सरकार ह्मणतात ६५ हत्ती, ४००० घोडे, १२०० उंटे, २००० ओझीं कापड आणि दहा लक्षाचा ऐवज महाराजाच्या हाती लागला

मग आपल्या सैन्याची हालहवाल कशी काय आहे ते पाहण्यासाठी महाराज गडाखाली गेले युद्धात घायाळ होऊन जे बेजार झाले होते त्याची शुश्रूषा योग्य प्रकारे व्हावी अशी त्यानी चागली तजवीज केली, व प्रत्येकाकडे स्वत जाऊन त्याचा परामर्ष घेतला, व त्याच्याशी मधुर व उत्तेजनपर भाषण करून त्याच्या वेदनाचे त्यास फारसे काही न वाटे असे केले रणामध्ये पडलेल्या एकूणएक शिपायाची यादी करविली, व त्याच्या बायकामुलाचे समाधान व आश्वासन करून त्याच्या निर्वाहासाठी त्यास वेतने करून दिली समरभूमीवर प्राणास मुकलेल्या ज्या अमलदारास पूर्वी वतने ... दिली होती ती त्याच्या मागे त्याच्या कुटुबात वशपरपरेने चालू ठेविली लढाईत जखमी झालेल्या लोकाच्या जखमा प्रत्यक्ष डोळ्याना पाहून त्या जखमाच्या मानाने कोणास दोनशे, कोणास शभर, कोणास पाऊणशे असे होन बक्षीस दिले शिवाय ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे कोणास पागोटी, कोणास कडी वगैरे इनामे दिली जे वरच्या दरजाचे जुमले व सरदार होते त्यास मदिल झगे, सोन्याची कडी, कठमाला शिरपेच, मोत्याचे तुरे, आगठ्या, घोडी इत्यादि इनामे दिली कित्येकास गाव, मोकासे आदिकरून बक्षीस दिले आणि ज्याची जशी मर्दुमकी नजरेस आली तिच्या मानाने त्याची बढती केली कोणी पायचे होते त्यास घोडी दिली, कोणास सरदाऱ्या दिल्या, कोणास पालख्या, अबदागिरे दिली युद्धात पडलेल्या कित्येक पुरुषाचे मुलगे ज्वान होते त्यास बोलावून आणून आपल्या नोकरीस ठेविले लोकास इनामे व बढत्या देण्याचा हा समारभ महाराजानी पदरच्या सर्व लोकास जमवून त्याच्या समक्ष केला व ज्यानी मर्दुमकी केली होती त्याची तारीफ प्रसिद्धपणे केली ह्यामुळे सर्वास अतिशयित उत्तेजन व उत्साह प्राप्त झाला आणि महाराजाच्या अगचे हे औदार्य, हा दयाळूपणा, व गुणाची बूज करण्याची ही उत्कृष्ट पद्धत पाहून त्याची नोकरी विशेषच जोमाने उत्साहाने व इमानाने करण्याचा हुरूप प्रत्येकास आला ह्या वेळी महाराज पंताजी गोपीनाथास विसरले नाहीत त्याने खानाकडे जाऊन वकिलीचे काम मोठ्या शिताफीने केल्याबद्दल हिवरेगाव इनाम देऊन पुष्कळ मोठे बक्षीस दिले [१] त्याप्रमाणेच विश्वासरावाने हेराचे काम उत्तम प्रकारे केल्याबद्दल त्यालाहि मोठे बक्षीस दिले

१ रायरीच्या बखरीत ह्मटले आहे की, दत्ताजी गोपीनाथ हा महाराजाचा वकील असून त्याने उत्कृष्ट कामगिरी बजावल्याबद्दल त्याला महाराजानी एक लाख होन

ही मोठी फत्ते झाल्याबद्दल प्रतापगडावर व इतर ठिकाणींहि आनंदोत्सव केला जिकडेतिकडे वाद्याचा एकच गजर होऊन राहिला घरोघरी विजयगुढ्या उभारल्या हत्तीवरून शर्करा वाटल्या ब्राह्मणास दक्षिणा दिल्या गोरगरिबास खैरात केली ब्राह्मणभोजनें घातलीं महास्थलींचे सिद्ध, साधु, गोसावी यास पूजोपचारार्थ द्रव्य पाठविलें अफझुलखानाच्या वधाचें वृत्त आपल्या एकंदर इष्टमित्रास कळविलें शहाजीराजास कर्नाटकात ते वार्तिकाबरोबर लिहून कळविलें हा जो विजय मिळाला तो सगळ्या हिंदू राष्ट्राचा झाला असे मानून त्याप्रीत्यर्थ चोहोंकडे मोठा उत्सव करण्यात आला तुळजापूर, पंढरपूर व शिंगणापूर येथील देवस्थानें भ्रष्ट करणाऱ्या माणसाचा हा असा वध झाला तो पुराणांतरींच्या एकाद्या राक्षसाच्या वधासारखा होय, असें सर्व लोक मानू लागले आणि त्याचा नाश झाला यात काही तरी ईश्वरी सूत्र आहे असें त्यास वाटू लागलें सर्वांच्या हृदयात स्वदेशाभिमानाचे वारें संचरलें अशा वृत्ताचा त्यानेक शतकें बिलकुल गंधहि नव्हता त्या समयीं लोकांच्या मनात कोणत्या भावना उद्भवल्या त्याचें दिग्दर्शन एका पवाड्यात झालें आहे अफझुलखानाच्या वधाच्या हकीकतीचें वर्णन त्या पवाड्याच्या रूपानें करावें असा हुकूम प्रत्यक्ष जिजाबाईनी दरबारच्या एका शाहिरास केला असून त्याबद्दल त्यास एक शेर सोनें व एक घोडा इनाम दिला असें ह्मणतात

अफझुलखानाचा वध ज्या ठिकाणीं केला तेथें त्याचें डोकें पुरून त्यावर एक बुरूज बांधिला व त्याचें नाव अफझुलबुरूज असें ठेविलें खानाच्या हातची तरवार हिसकावून घेतली होती, ती जयाचें स्मारक ह्मणून जतन करून ठेविली हा विजय आपणास तुळजापुरच्या भवानीच्या प्रसादानें प्राप्त झाला असें मानून तिची स्थापना प्रतापगडावर करावी असा विचार महाराजानी केला. गंडकी नदीस हुशार ब्राह्मण पाठवून एक शिळा पैदा केली व कारागीर तुळजापुरास पाठवून तेथल्या मूर्तीच्या नमुन्यावर नवी मूर्ति घडविली बालेकिल्ल्यावरील कोटात चांगली प्रशस्त जागा पाहून तेथें सुंदर देवालय बांधिलें, आणि त्यात ह्या मूर्तीची स्थापना सुमुहूर्ती यथाविधि करविली ह्या देवालयात नित्यपूजा

---

बक्षीस देऊन हिवरेगाव इनाम दिला शि दि ह्मणतो की, पंताजीपंतास हिवरेगाव इनाम दिला कित्येकाचें असें ह्मणणें आहे की, खानाचा वकील कृष्णाजी भास्कर यास महाराजानी इनामाची लालूच दाखवून आपलासा करून घेतलें व त्यास पुढें हिवरेगाव इनाम देऊन आपल्या नोकरीस ठेवून घेतलें

नैवेद्य व ब्राह्मणभोजने करण्यासाठी त्या त्या कामावर कारभारी नेमून त्यांस तनखा लावून दिला. देवालयात उत्सवादि करण्यास लागणाऱ्या खर्चासाठीं नेमणूक करून दिली. शिवाय देवीस शृंगारण्यासाठी दागदागिने व उंची वस्त्रे मुबलक दिली. येथे तुळजापुराप्रमाणे उत्सव, नवस, यात्रा वगैरे व्हाव्या अशी व्यवस्था केली.[1]

अफझुलखानाचा वध होऊन त्याजबरोबर दिलेल्या फौजेचा पुरा नाश झाला ही खेदकारक वार्ता अदिलशहास व बडे-साहेबिणीस कळली तेव्हा त्यास पराकाष्ठेचे दुःख झालें. असे सागतात की, जासुदानी हे भयंकर वर्तमान पातशहास कळविले तेव्हा तो अत्यंत दिलगीर होऊन तक्तावरून उतरून महालात जाऊन पलंगावर निजला. तसेच बडेसाहेबिणीच्या कानी हे वर्तमान पडताच ती 'अल्ला-अल्ला ! खुदा ! खुदा !' ह्मणून पलंगावर आंग टाकून शोक करीत पडली. अफझुलखानासारख्या शूर व बलाढ्य सरदारास नामोहरम करून त्याचे शिर कापून नेलें. एवढी मोठी फौज गेली असता तिचा पुरा फडशा उडाला. एकदर चीजवस्त लुटीस गेली. असे जबर नुकसान होऊन शिवाजीमहाराजाचे सामर्थ्य फारच वाटलें, ते आता मुसलमानी पातशाहत बुडवून टाकून हिंदुपातशाहीची

[1] कित्येकाचे असे ह्मणणे आहे की, हे देवालय चंद्रराव मोऱ्यास जिंकिल्यावर बाधिले. मि. किंकेड या देवालयासंबधाची एक दंतकथा खटगावकराच्या बखरीच्या आधाराने अशी देतात की, महाराजानी विजापुरसरकाराशी विरोध आरंभिल्या कारणाने त्याना आपली कुलस्वामिनी तुळजापुरची भवानी तिच्या दर्शनास प्रति वर्षी जाणे दुर्घट झाल्याकारणाने त्यानी रायरीच्या किल्ल्यावर भवानीचे देवालय बाधण्याचा बेत केला, व मूर्तीसाठी सगमरवरी दगड पाहून आणावयास लोक पाठविले. पण देवीने त्याच्या स्वप्नात येऊन त्यास सागितले की, माझे देवालय महाबळेश्वरासंनिध बाधावे अशी माझी इच्छा आहे. तरी भोरप्या नावाच्या टेकडीचा शोध लावून तेथे माझी स्थापना कर व तेथेच तुझ्यासाठी एक किल्ला बाध. स्वप्नातल्या ह्या तिच्या आज्ञेप्रमाणे हा भोरप्या डोंगर महाबळेश्वरापासून बारा मैलावर सापडला. तेथे त्यानी हे देवालय व प्रतापगड ही बाधिली, देवीचे देऊळ ह्या गडावर अफझुलखानाच्या वधापूर्वी होते याबद्दलचा एक पुरावा ते असा देतात की, महाराजानीं अफजुलखानाच्या मुलाखतीस जाताना व त्याचा वध करून परत आल्यावर देवीचे दर्शन घेतले असा उल्लेख आहे. या उल्लेखावरून फार तर एवढेच सिद्ध होते कीं, हा नवा गड बाधिला तेव्हा त्यावर आपल्या उपास्य देवतेचे एखादे लहानसे देवालय महाराजानी अगोदर बाधिले असून सदरील विजयानंतर ते विशेष मोठ्या प्रमाणावर बाधिले असावे.

स्थापना करितात, अशा सर्व अमीरउमरावास धाक पडून ते चिताक्रांत झाले. आता अदिलशाहीची धडगत दिसत नाही, शिवाजीमहाराज आपली विजयी फौज घेऊन येऊन विजापूरशहर हस्तगत करितात, अशी चर्चा घरोघर होऊं लागली. पातशाही नौबत तीन दिवस बंद पडून पातशहा व त्याची आई यांनी तीन दिवस अन्नसेवन केले नाही, असे ह्मणतात.[1]

---

[1] अफझुलखानाच्या वधासंबंधाच्या अनेक दंतकथा प्रचलित आहेत. मार्शल याने विजापुराचा वृत्तांत लिहिला आहे त्यांत तो असे ह्मणतो की, आपल्या मोहिमेचा वाईट शेवट होऊन आपला तीन नाश होणार हे अफझुलखानाला पूर्वीच समजून आले होते ह्मणून त्याने आपल्या ६३ बायकांना बोलावून आणून ठार मारिले हे अत्यंत क्रूर कर्म करण्याचे कारण असे सांगतात की, आपल्या पश्चात् त्याचा परपुरुषाशी संबंध होऊं नये ह्मणून त्याने ही अशी अमानुष खबरदारी घेतली. ह्या अफझुलखानाचा वाडा ज्या जागी होता त्याच्या आसपास ह्या त्याच्या वधलेल्या बायकांच्या कबरा अजून दाखवितात. शेडगावकरांच्या बखरींत ह्या दंतकथेचा उल्लेख आहे. तेथे आणखी असे ह्मटले आहे की, हा अफझुलखान मोहिमेस निघताना आपल्या गुरूच्या दर्शनास गेला तेव्हा त्या गुरूला तो शिरावांचून तुमचे धड आहेसा दिसला. प्रो. सरकारांनी अफझुलखानाचा वाडा ज्या ठिकाणी होता ते ठिकाणी प्रत्यक्ष पाहिले असून तेथे हल्ली रान माजले आहे, काही मोडक्या इमारतींचे शेष तेथे दिसतात, आणि ज्या डोहांत अफझुलखानाने आपल्या ६३ बायका लोटून देवून बुडवून ठार मारल्या तो त्यांनी पाहिला, असें ते ह्मणतात.

# भाग बारावा.



## विजापूरसरकाराच्या दुसऱ्या सरदारांचा पराभव.

१६५९–६०

**अफझुलखानाचा** वध करून त्याच्या मोठ्या सैन्याचा पुरा नाश केल्यावर महाराजांचा धाक चोहोंकडे बसून त्याला पुढील स्वराज्यविस्ताराचें काम सुलभ झालें. त्या सरकाराचे आणखी किल्ले व प्रांत काबीज करण्यास त्याला फारसें कठीण गेलें नाहीं. अफझुलखानानें शिवाजीमहाराजावर स्वारी करण्याचें वर्तमान शिद्दीस कळल्याबरोबर त्यानें तळा व घोसाळा ह्या किल्ल्यास वेढा दिला. परंतु इतक्यांत त्याच्या कानीं असें आलें कीं खानाचा वध होऊन सगळें सैन्य गारद झालें. त्याबरोबर त्यानें वेढा उठवून पिछेहाट केली. त्याच्यावर स्वारी करण्याच्या इरायानें महाराजांना आपलें सैन्य तयार केलें, परंतु त्या वेळा पन्हाळा हातीं येण्याचा सुमार दिसल्यावरून ते तिकडे वळले.

ह्या किल्ल्यावर विजापुरसरकारानें नेमलेला किल्लेदार होता तो आपण होऊन स्वाधीन करून देण्यास तयार झाला. त्यावरून त्याच्याशीं बोलणें चाललें. हा उत्तम किल्ला असा अनायासें हातीं येत आहे हें पाहून महाराजाला मनांत अमळ संशय आला. त्याला वाटलें कीं, असा लोभ दाखवून आपणाला कचाटींत धरण्याचा विजापुरसरकाराचा गुप्त बेत असावा, तरी पण गड आपल्या हातीं आल्यास फार बरें होईल असें वाटल्यावरून आपला एक परम विश्वासू सरदार बरोबर पुष्कळ मावळे देऊन त्या किल्ल्यावर पाठवावा असा त्यांनीं विचार केला. मग अन्नाजी दत्तो याची त्या कामगिरीवर नेमणूक केली, आणि आपण स्वतः बरोबर पुष्कळ स्वार व पायदळ घेऊन जवळपास तयारींत राहिले. ते अर्थात् अशाकरितां कीं, काहीं दगा आहे असें आढळून आल्यास शत्रूचें तत्काळ पारिपत्य करितां यावें, परंतु लढाईचा प्रसंग मुळीं आलाच नाहीं. किल्लेदारानें

कबूल केल्याप्रमाणे किल्ला बिनहरकत स्वाधीन केला[१] ( आक्टोबर १६५९ ). असाच पावनगडहि त्याच्या कबजात आला. हे किल्ले ताब्यात आल्यावर महाराजानी वसतगड छापा घालून घेतला. कृष्णानदीच्या दोन्ही तीरावरील प्रांतांत आपला अमल बसवून तेथला वसूल बिनबोभाट जमा व्हावा यासाठी तिकडील सर्व गडावर आपली ठाणी महाराजानी बसविली. ही अशी ठाणी बसवीत शिराळाच्या गढीपर्यंत बसवीत जाऊन तिकडील वसूल जमा करण्यासाठी त्यानी कामदार नेमिले.

पन्हाळा कबजात आल्यावर महाराज त्या गडावर जाऊन राहिले, व सह्याद्रीच्या माथ्यावरील व त्याखालील किल्ले हस्तगत करण्याचे त्यांनी मनात आणून तिकडे आपले लोक पाठविले. हे बहुतेक किल्ले त्यास बिनहरकत मिळाले, लढाई वगैरे फारशी करावी लागली नाहीं. मात्र रांगणा व खेळणा हे किल्ले छापा घालून घ्यावे लागले. खेळणा किल्ला घ्यावयास बरेच प्रयास पडले. म्हणून त्यास त्यांनी विशाळगड असें नाव दिलें, ते अद्यापि चालत आहे. हा एवढा मुलूख महाराजांनी अफझुलखानाचा वध केल्यावर दोनतीन महिन्याच्या अवधीत हस्तगत केला. त्याप्रमाणे सगळा कोल्हापुरप्रांत व त्यांतील किल्ले महाराजांनी घेतले.

ह्या वेळी मिरज येथे विजापूरकराचें ठाणें असून त्यावर रुस्तमजमान नावाचा सरदार मुख्य होता. याच्या ताब्यांत कोल्हापुरापासून रत्नागिरीपर्यंत मुलूख असून आणखी कानडा प्रांतहि त्याच्या हवाली होता. त्याने महाराजाच्या ह्या रामधुमीस मुळींच हरकत केली नाहीं. याचें कारण, एक तर असें असावें कीं,

[१] हा किल्ला हस्तगत करण्याची हकीगत इतिहासांत दिली आहे ती अशी : किल्ला अतिशयित मजबूत असून सहज हस्तगत होण्यासारखा नाही असे पाहून महाराजांनी पुढील युक्ति योजिली. आपल्या पदरच्या काही सरदारांस शिक्षा करण्याचें मिष करून त्या सरदारांनी आपल्या हाताखालच्या सातआठशे लोकांसह महाराजांची नोकरी सोडल्याचा बहाणा करून पन्हाळ्यावरील किल्लेदारास अशी विनंति केली की, आम्ही शिवाजीमहाराजांवर नाखुष होऊन त्यांची नोकरी सोडून आलो आहों. आम्हांस तुमच्या चाकरीस ठेवा. हे त्यांचे म्हणणे त्या किल्लेदारास खरे वाटून त्याने त्यांस किल्ल्यावर घेतले. इकडे महाराजांनी किल्ल्यास वेढा दिला. मग एके दिवशी रात्रीं संकेताप्रमाणे वर गेलेल्या लोकांनी खालील काही लोकांस जेथें दाट झाडी होती अशा जागी वर घेतले. महाराजाच्या लोकांनी एकवट होऊन रखवालदारावर हल्ला केला व त्याचा मोड करून किल्ला हस्तगत केला.

तो त्याला भिऊन जागच्या जागी थबकून राहिला असावा, किंवा त्या वेळचे राजापूर येथले इंग्रज व्यापारी संशय घेतात त्याप्रमाणे त्याला महाराजानी लाच देऊन गुपचूप बसविले असावे परंतु पुढे त्याला असा हुकूम आला कीं, त्याने शिवाजीमहाराजावर चालून जाऊन कोल्हापूरप्रांताचे रक्षण करावे त्याच्या जवळ त्या वेळी तीन हजार स्वार व थोडेसे पायदळ होते इतक्या लोकांसह तो पन्हाळ्याजवळ चालून गेला ( आक्टोबर स १६५९ ) तो जवळ आला असे पाहून महाराजानी त्याच्यावर आपल्या स्वारांनिशी हल्ला केला, त्याचा पुरा मोड करून त्यास कृष्णेपार हाकून दिले, व त्याचा शेवटपर्यंत सारखा पिच्छा पुरविला त्याचा पाठलाग करीत करीत महाराज थेट विजापुरापर्यंत गेले [१] वाटेतील मोठमोठे गाव लुटून त्यानी उद्ध्वस्त केले, व पेठा होत्या त्यावर दस्त बसविला हा असा सारखा धुमाकूळ उडवून देऊन ते तिकडून मोठ्या वेगाने परतले, ते इतके की, त्याचा पाठलाग करणे शत्रूला दुरापास्त झाले आणि त्याचा तो विलक्षण वेग पाहून विजापुरकरानी हा प्रयत्न केलाहि नाहीं

ह्याप्रमाणे थेट विजापूरशहरापर्यंत जाऊन सगळा प्रांत लुटून उद्ध्वस्त करून महाराज विशाळगडास येऊन दाखल झाले येथे त्याच्या आज्ञेवरून अन्नाजी दत्तो यानें पायदळसैन्य जमा करून अगदी सिद्ध ठेविले होते ते घेऊन ते लागलीच रत्नागिरी प्रांतात शिरले, आणि तिकडची बंदरे व शहरे काबीज करण्याचा त्यानी सपाटा चालविला ह्या मोहिमेत त्यानी राजापुरावर मात्र हल्ला केला नाहीं याचे कारण राजापुरच्या व्यापाऱ्यानी असे नमूद करून ठेविले आहे की, हे शहर रुस्तमजमान याचे असून महाराजाशी त्याने सलोखा केला होता बडी साहेबीण त्याचा द्वेष करीत असे ह्मणून त्याला स्वसंरक्षणार्थ महाराजाशी स्नेह करावा लागला ह्या वेळी त्यानी दाभोळ शहर आणि त्या खालील सगळी ठाणी हस्तगत केली ह्या ठाण्यावरचे अदिलशहाचे सुभेदार राजापुरास पळून गेले तेथून रायगडावर येऊन पुन फौजेची चांगली तयारी करून त्यानी चेऊल शहरावर हल्ला केला

---

१ राजापूरच्या इंग्रज व्यापाऱ्याचा ह्या वेळचा असा लेख आहे कीं, अफझुलखानाचा मुलगा फाझलखान हा रुस्तमजमानाबरोबर होता फाझलखानाचे बहुतेक लोक पडले, आणि रुस्तमजमान जेमतेम हुक्केरी येथे जाऊन स्वस्थ बसला. प्रो. सरकार पृ. २९४.

२ प्रो. सरकार पृ. २९४.

त्या शहरांत त्यांनी तीन दिवस मुक्काम करून ते यथेष्ट लुटलें हे शहर त्या वेळी मोठे सधन होते त्यात महाराजास पुष्कळ द्रव्य सापडले तेथला ठाणेदार खोजोजी यास कैद करून ते शहर त्यांनी हस्तगत केले, व ही सगळी लूट राजगडावर सुरक्षित नेली

ह्या धामधुमीत दाभोळचा सुभेदार पराभव पावल्यामुळे अफझलखानाची मालाची तीन जहाजे त्या बंदरात होती ती घेऊन तो राजापुरास गेला तेथे रुस्तमजमानाच्या हुकमावरून त्या जहाजावरचा माल बंदरावर उतरला ही बातमी महाराजाच्या एका सरदाराला लागताच त्याने राजापुराकडे आपल्या लोकांनिशी दौड केली मराठे जवळ आले असे कळताच राजापूर येथला रुस्तमजमानाचा सुभेदार वरील एका जहाजात बसून जाऊ लागला तेव्हा तेथल्या इंग्रजव्यापाऱ्याचा एक दलाल मि हेन्री रिव्हिंगटन नामक एका इंग्रज कामदाराकडे येऊन म्हणाला की, मी तुमच्या नावाने रुस्तमजमान याला काहीं रकम कर्जी दिली आहे ती ह्या सुभेदाराकडून वसूल करून घ्या यावरून त्या कामदाराने आपले एक जहाज त्या जहाजाच्या मागे लावून त्या सुभेदाराला अटकाव केला, तेव्हा त्याने काही रकमेच्या मोबदल्यादाखल त्या जहाजातला माल दिला ही अशी त्याची गडबड चालली असता महाराजाचे वर सांगितलेले लोक त्या बंदरावर येऊन थडकले आणि त्यांनी राजापूरचा सुभेदार ज्या जहाजातून पळून जात होता ते पकडून देण्याविषयी वरील इंग्रज कामदारास सांगितले, पण तो ते ऐकेना इतकेंच नव्हे तर त्या सुभेदाराच्या सांगण्यावरून त्याने अफझुलखानाच्या वर सांगितलेल्या दोन जहाजांपैकीं एक आपल्या कबजात घेऊन त्यास निराळे नाव दिले, आणि त्याची बोलाचाली होत असतां तिसरें जहाज निसटून गेले तेव्हा महाराजाचा सरदार सुभेदाराजवळून घेतलेला माल त्याजकडे मागू लागला तोही तो देईना तो ह्मणाला कीं, आमची रकम शहराच्या महसुलातून घेण्याची आह्माला परवानगी देत असाल तर जप्त केलेल्या मालाची तुह्मास किंमत देतो. ह्याप्रमाणे निराशा झाल्यावर त्या सरदाराने इंग्रजाचे दोन दलाल पकडून नेले, आणि आमचे दलाल सोडून द्या असें सांगण्यासाठी त्याच्याकडे फिलिप गिफर्ड नावाचा एक कामदार गेला होता त्यालाहि त्याने अटकेत ठेविले आणि इंग्रजास असें सांगून पाठविलें कीं, अफझुलखानाची तिन्ही जहाजे व सुभेदाराकडून घेतलेला माल आमच्या स्वाधीन होई पर्यंत कैद केलेल्या इसमास आह्मी सोडून देणार नाहीं. त्यानें हे तिघे कैदी

खारेपाटणास नेऊन ठेविले इकडे रिव्हिंगटन यानें शिवाजीमहाराजाना पत्र लिहून अशी विनंति केली कीं, 'आमचे कैद केलेले इसम सोडून देण्याचा हुकूम करावा तुह्मी दंडाराजपुरीवर हल्ला कराल त्या वेळीं आह्मी तुह्मांस मदत करूं. तुमच्या लोकानी आह्मास मुसलमानाचीं जहाजें पकडून द्यावयास सांगितले, परतु आह्मी ते केले नाहीं, कारण त्याच्याशी वैर करणें आह्मांस इष्ट वाटलें नाहीं ' ह्या आशयाच्या पत्रावरून महाराजानी आपल्या सरदारास असा हुकूम पाठविला की, इंग्रजाच्या कैदीस सोडून द्यावे, रुस्तमजमानाच्या मुखत्याराच्या ताब्यात राजापुर शहर पुन द्यावे, आणि त्या शहरातल्या लोकाची जी कांहीं चीजवस्त लुटली असेल ती त्याची त्याना परत करावी असें सागतात कीं, आपला दोस्त रुस्तमजमान याच्या शहरावर असा हल्ला केल्या कारणानें महाराजानी आपल्या त्या सरदाराला[1] नोकरीवरून दूर केले हा हुकूम पोचतांच दलालास सोडले, परतु गिफर्ड याची सुटका एका ब्राह्मणाने लबाडी केल्यामुळें लौकर झाली नाहीं त्यावरून रिव्हिंगटन यानें महाराजाकडे पुनः तक्रार केली. पण त्याच्याकडून पुन हुकूम येण्यापूर्वी ह्या इग्रज कैद्याला खारेपाटणाहून विशाळगडाकडे महाराजाचे लोक घेऊन जात असता इंग्रजाच्या शिपायानी त्याच्यावर हल्ला करून त्याना सोडविलें असें ह्मणतात.[2]

अफझुलखान व रुस्तमजमान अशा बलाढ्य सरदारांचा शिवाजीमहाराजांपुढें काहींच उपाय न चालून एक तर प्राणास मुकला व दुसरा जीव घेऊन जेमतेम विजापुरात जाऊन पडला, व महाराजाच्या लोकानी त्या राजधानीपर्यंत दौड करून सर्व देश लुटून जाळून टाकला ह्यामुळे विजापूरसरकाराच्या अमलांतील एकूणएक गावातल्या लोकास महाराजाची मोठीच दहशत वाटूं लागली लहानसान मुसलमान सरदार व किल्लेदार महाराजाचें नाव ऐकताच थरथरां कापूं लागले, मग त्याच्यावर चालून जाण्याचें धैर्य होणार कोणाला? हें पाहून कित्येक मराठे पुंड गावात शिरून शिवाजीमहाराजाचें नाव सागून खडणी व लूट जमवून यथेष्ट मजा मारूं लागले विजापूरसरकारास तर महाराजाची फारच धास्ती वाटूं लागली. त्या दरबारांतील अमीरउमरावांमध्यें यादवी माजली होती

---

१ ह्या सरदाराचे नाव दोरोजी होते असे ह्मणतात

२ हा सगळा मजकूर प्रो सरकार यानी आपल्या ग्रथांत राजापूर येथील इंग्रज व्यापाऱ्याच्या स १६६० तल्या कागदपत्राच्या आधारानें नमूद केला आहे त्यावरून घुळविला आहे.

तीसुद्धा ह्या वेळी अशत बंद पडून जो तो शिवाजीचें बंड कसें मोडावें ह्या फिकिरींत पडला शिवाजीमहाराजावर आता कोणास पाठवावें ही चिता अदिलशहास प्राप्त झाली कोणी नामाकित सरदार पुढे होऊन दंड ठोकून मी शिवाजीवर जातों असें ह्मणण्यास तयार होईना असें सागतात कीं, अफझुलखानाचा मुलगा फाजलखान याची बादशहापाशी नेहमी आपल्या बापाच्या घाताबद्दल सूड उगविण्यासाठी महाराजावर मोहीम करावी अशी सारखी अर्जीजी असे, परतु त्यास एकट्यास त्याच्यावर मोहीम करण्याची छाती नव्हती किन्येक सरदाराचें असें मत पडले कीं, अदिलशहानें स्वत ह्या मोहिमेवर जावें, पदरच्या कोणत्याहि सरदारावर या बाबतींत भरवसा ठेवणें बरोबर नाहीं, परतु कित्येकानी उलट असा अभिप्राय दिला कीं, बादशहानें स्वत अशा बंडखोरावर चालून जाणे कमीपणाचें आहे शिवाय शिवाजीमहाराज अतिशयित धाडसी व हुशार असल्यामुळे केव्हा काय करितील याचा नेम नाहीं, आणि बादशहाचा जीव ह्या अविचारानें धोक्यात पडेल [१]

ही अशी विजापूरदरबारात भवतिनभवति चालली असता ह्या वेळीं शिद्दी जोहारनामक एक सरदार पुढे आला हा जातीचा हबशी असून मोठा पराक्रमी होता हा कर्नाटकातील मोहिमात पुष्कळ चागली कामगिरी करून मोठ्या योग्यतेस चढला होता पुढे याचा आणि बादशहाचा बेबनाव येऊन हा कुर्नूळप्रातात स्वतंत्र होऊन राहिला होता ह्या त्याच्या शिरजोरपणाबद्दल बादशहाच्या मनात त्यास शिक्षा करावयाची होती, परतु पुढे त्यानें कृतकर्माबद्दल माफी मागून बादशहाची आपणावर पुन कृपादृष्टि व्हावी असा प्रयत्न चालविला होता. बादशहानें त्यास ह्या वेळीं असें सागून पाठविले कीं, तूं शिवाजीमहाराजावर स्वारी करून त्याची खोड मोडून येशील तर तुला आह्मी क्षमा करून मोठ्या योग्यतेस चढवू ही अट त्या सरदारास पसत होऊन तो ह्या मोहिमेवर निघाला.

---

१ असे सागतात कीं, ह्या सुमारास औरगजेब आपल्या भावास नामोहरम करून व बापास अटकेत ठेवून दिल्लीच्या तक्तावर बसल्यानतर त्यानें दक्षिणेत आपली सत्ता कायम करून वाढविण्याचे मनात आणिले, आणि त्याच्या अमलातल्या मुलखात शिवाजी महाराज धामधूम करीत होते, त्याचा नाश करण्यासाठी शास्ताखाननामक एका सरदाराबरोबर मोठी सेना देऊन पाठविले (१६६०), आणि विजापूरच्या अदिलशहासही महाराजावर स्वारी करावयास सागितले. ह्मणून अदिलशहाने ही अशी मोहिमेची घाई चालविली होती. शास्ताखानाच्या मोहिमेची हकीगत पुढे सोळाव्या भागात निराळी दिली आहे.

तेव्हां त्याच्याबरोबर फाजलखानहि बापाच्या मृत्यूबद्दल सूड उगविण्याच्या हेतूने निघाला.

शिद्दीजोहाराबरोबर बादशहाने फारच मोठी फौज दिली होती. अफझुलखानाबरोबर दिलेल्या फौजेच्या दुप्पट ती होती असें ह्मणतात. हा शिद्दी ह्या मोहिमेस निघण्यापूर्वी त्यास बादशहाने सलाबतखान अशी नवी पदवी देऊन त्याचा गौरव केला. मनांत कीं, कोठून तरी त्यास आपली कामगिरी उत्साहपूर्वक व इमानाने करण्याचा हुरूप यावा. फाजलखानास तर अशी उत्कंठा लागून राहिली होती कीं, शिवाजीमहाराजाशी मोठ्या निकराचा सामना करून त्याचा पुरा मोड करून आपल्या बापाचे उसने आपणास केव्हा घ्यावयास मिळते. ह्याप्रमाणे इकडून ह्या दोन सरदाराला महाराजावर पाठवून तिकडून जजिऱ्याच्या शिद्दीला वाडीच्या देशमुखाच्या मदतीने महाराजाच्या ताब्यातील कोकणपट्टीवर स्वारी करण्यास अदिलशहाने फर्माविले. शिद्दीजोहार व फाजलखान यांनी पहिल्याने पन्हाळ्यावर हल्ला करण्याचे ठरवून त्या गडाकडे कूच केले, व तो किल्ला घेण्याचे काम शिद्दीजोहाराने करावे आणि फाजलखानाने घाटावरून कोकणात शिवाजीमहाराजाच्या मुलखात शिरावे असें ठरले.

महाराजाचे हेर सर्वदा चोहोकडे हिंडत. त्यांनी ही सगळी हकीगत त्याला लागलीच कळविली. आपणावर शत्रूची अशी जिकडूनतिकडून गर्दी होणार आहे हे अगाऊ समजताच प्रत्येक किल्ल्यावर उत्तम बंदोबस्त करून आपल्या लोकास हुशार राहावयाची वर्दी महाराजांनी दिली. शत्रूच्या चोहोंकडून होणाऱ्या हल्ल्यास टक्कर देण्याची त्यांनी कडेकोट तयारी केली. रघुनाथपंतास कोकणात फत्तेखान शिद्दीशी झुजण्यास सांगितले, कल्याणभिवडीप्रांताचे रक्षण करण्याचे काम आबाजी सोनदेव यास सांगितले. बाजी पासलकर यास वाडीच्या लखम सावंताशी टक्कर द्यावयास पाठविले, घाटावर मोरोपंतास पुरंदर, सिंहगड, प्रतापगड इत्यादि किल्ले व त्याच्या आसपासचा मुलूख यांचें रक्षण करावयास सांगितलें, आणि आपण स्वतः पन्हाळ्याचा बचाव करावयाचा असा निश्चय करून त्या किल्ल्यावर कडेकोट बंदोबस्ताने राहिले, व नेताजी पालकराला आपल्या स्वारानिशी शिद्दीजोहाराच्या सैन्यावर लावून लावून छापे घालून हैराण करावयास सांगितलें. महाराज स्वतः पन्हाळ्यावर जाऊन राहिले.

---

१ चिटणीस व. शि. दि. हे सरजाखाननामक आणखी एक सरदार याच्या बरोबर दिला होता असे ह्मणतात.

याचें कारण असें कीं, विजापुराकडून येणाऱ्या सैन्याचा रोख प्रथमत कोल्हापूरप्रांतावर असून पन्हाळा किल्ला घेण्याचा बेत त्याने केला होता हें महाराजांस कळून तो त्याच्या हातीं सहसा जाऊं देऊ नये असें त्यांनी मनात आणिलें. परंतु त्या किल्ल्याचे रक्षण स्वत करण्याचे त्यानी मनांत आणिले हें बरोबर नव्हते असें पुढे प्रत्ययास आले

शिद्दीजोहार आपल्या सैन्यानिशी पन्हाळ्याकडे येऊं लागला तेव्हा त्यास महाराजानी प्रथम मुळीच हरकत केली नाहीं त्यास चांगला अंगावर येऊं देऊन मग त्याची खोड मोडावी असा त्याचा इरादा होता पन्हाळ्यापाशीं शत्रुसैन्याने ठाणे दिले तेव्हा नेताजीनें आपली हालचाल सुरू केली तो त्या सैन्यावर रात्रीचे छापे घालू लागला, त्याची रसद बंद करून त्यास दाणावैरण मिळेनासें करूं लागला शत्रूशी उघड सामना करण्याचे तो टाळी. आसपासच्या डोंगऱ्यातून हळूच न कळत मावळ्याच्या टोळ्या शत्रूच्या ठाण्याजवळ येत व ज्या बाजूला बंदोबस्त अमळ ढिला असे तिकडून आत तरवारी घेऊन घुसत व कापाकापी करीत, व शत्रूचे लोक अंगावर चालून आले ह्मणजे त्यावर गरनाळा सोडून पार निघून जात ह्याप्रमाणें नेताजीनें शत्रूच्या सैन्यास पुष्कळ हराण केलें, व स्वताचें फारसें नुकसान होऊ न देता त्याचे पुष्कळ लोक ठार केले शिद्दीजोहारानें पाहिलें कीं, असले छापे घालणारे पार नाहींतसे केले पाहिजेत, त्याशिवाय काहींएक करिता यावयाचें नाहीं यास्तव तो स्वतः त्याच्यावर आपल्या लोकानिशी हल्ला करूं लागला, व जे लोक सांपडतील त्याचा संहार करण्याचा त्याने सपाटा चालविला, परंतु त्या डोंगरी मुलखात मराठ्याचा पाठलाग करण्याचे काम अतिशयित कठिण आहे, व ते करण्यापासून काहींएक फायदा नाहीं, असें पाहून त्याने आपले लोक दूरदूर ठाणीं करून त्यावर ठेविले होते ते सगळे एकवट करून किल्ल्यास विशेषच मजबूत वेढा दिला त्या वेळी हवा फारच प्रतिकूळ होती तरी त्याने किल्ल्यावर मोठ्या जोराचा मारा चालविला, किल्ल्यातून बाहेर व बाहेरून किल्ल्यात कोणाहि मनुष्यास जाऊं देऊं नये असा कडेकोट बंदोबस्त त्यानें केला, व आपल्या सैन्यास असा एकसहा हुकूम फर्माविला कीं, कोणीहि मराठा हातीं लागल्यास त्यास जीवंत सोडूं नये. आपले लोक रात्रंदिवस सावध व जागृत राहावे ह्यासाठीं रात्रीं निराळे व दिवसा निराळे असे अधिकारी व शिपाई पाहाऱ्यावर असावे अशी त्याने व्यवस्था केली, आणि सर्व फौजेवर आपण स्वत. देखरेख करूं लागला.

त्याप्रमाणें महाराज त्या किल्ल्यावर चार महिने अडकून पडले शत्रूचा वेढा उठण्याचा रंग मुळींच दिसेना कारण त्याचें सैन्य फारच मोठें असून त्याचा बंदोबस्त नामी होता नेताजी पालकरानें बाहेरून कितीहि छापे घातले तरी तें सैन्य ह्मणण्यासारखें कमी झाले नसते वरून तोफांचा मारा कितीहि केला तरी त्यापासून त्याचे फारसें नुकसान होण्यासारखें नव्हतें दुसरे असें कीं, खुद्द महाराज ह्या किल्ल्यात अडकून पडले आहेत असें शत्रूस कळून आल्यावरून तो आता ह्या किल्ल्याचा वेढा उठवून दुसरीकडे जाईल हे स्वप्नींहि आणावयाला नको किल्ला सर करण्यासाठी आपल्याकडून तो शिकस्त केल्यावाचून राहाणार नव्हता, हे उघड होतें शिद्दीजोहाराला आता अशी खात्री वाटूं लागली होती कीं, हा किल्ला वेळाउशिरा आपल्या स्वाधीन होऊन शिवाजीमहाराज हाती खास लागतील, आणि जें काम आजपर्यंत कोणाच्याहि हातून झालें नाही ते केल्याचे यश आयतेंच मिळून आपली विजापुरदरबारात मोठी बढती होईल हे विचार मनात येऊन त्याला मोठाच आवेश व उत्साह प्राप्त झाला होता इकडे महाराजाना तरी किल्ल्यावर सर्व प्रकारचा बंदोबस्त असा उत्तम राखिला होता कीं, शत्रु त्याखाली एकदोन वर्षे सारखा गराडा देऊन बसला तरी त्याच्या हातीं तो कदापि गेला नसता व त्या किल्ल्यावरील लोकास दोन वर्षे पुरे इतकी अन्नसामुग्री व दारूगोळा भरून ठेविला असल्यामुळें बाहेरून ही सामुग्री येण्याची बंद झाली तरी काहींएक अडण्यासारखें नव्हतें असें होतें तरी ह्या असा आपला कोंडमारा होऊन आपण एकेच जागी अडकून पडलों, आपले लोक बाहेर काय करीत आहेत ते कळण्याचा मार्ग मुळींच उरला नाहीं, आपल्या लोकास प्रसंगानुरूप जे काहीं हुकूम द्यावयाचे ते देण्याची सोय आता राहिली नाहीं, हे लक्षात येऊन त्यास अतिशयित वाईट वाटूं लागले येथून आपली सुटका होते कशी ही चिंता त्यास उत्पन्न झाली किल्ल्यासभोवार शत्रूचा पक्का गराडा पडला असून कोणत्याहि ठिकाणी त्याचा बंदोबस्त अगदी लेचापेचा नव्हता तेव्हा त्यातून निसटून जाण्याचा बेत साधण्यासारखा नव्हता बरें, शत्रूवर एकदम तुटून पडून सामना द्यावा तर तेंहि साध्य नव्हतें, कारण त्याचें सैन्य फार मोठें होतें, व असें धाडस केल्यास आपले सर्व लोक खात्रीनें नाश पावतील असें महाराजास वाटत होतें. तेव्हा त्याच्या तावडीतून सुटून जाण्याचा दुसराच काहीं तरी उपाय योजिला पाहिजे असें मनात आणून त्यांनी शिद्दीजोहाराला असा निरोप पाठविला कीं,

'आम्ही किल्ला स्वाधीन करून देण्यास राजी आहों, व आमच्या जिवास काहींए धोका नाहीं असें अभय दिल्यास आम्ही स्वत किल्ल्याच्या खालच्या माचीव तहाचे बोलणे करण्याकरिता येतो' हा निरोप ऐकून शिद्दीस मोठा आन झाला, व त्याने त्यास अभयवचन दिले त्यावरून महाराज आपल्या बरोब थोडेसे लोक घेऊन शिद्दीच्या छावणीत सध्याकाळच्या सुमारास दाखल झाले त्यास हे माहीत होते की, शिद्दीच्या शब्दावर विश्वास ठेवण्यास मुळीच हरक नाहीं उभयताची गाठ पडल्यावर महाराजानी असा बेमालूम वहाणा केल की, तो त्या शिद्दीस खराच वाटला किल्ला स्वाधीन करून देण्यासबंधाच्या बहु तेक मुख्यमुख्य कलमाचा विचार होऊन ती नक्की केली पण इतक्यात रा पडली म्हणून काही किरकोळ बाबीचा निकाल उदयिक करू असे वचन देऊ महाराज त्याचा निरोप घेऊन परत किल्ल्यावर गेले[1] शिवाजीमहाराज अगद दीन होऊन आपणास शरण आले, आता ते आपण सागू तसे बिनतक्र ऐकतील असें शिद्दीस वाटून तो निश्चित झाला ते आता युद्ध करीत नाहींत किल्ला आपल्या हाती आल्यातच जमा असे समजून शिद्दीच्या लोकानी किल्ल्या वरचा मारा बंद केला पाहाऱ्यावरचे लोक बेसावध राहून मजा करू लागले

ह्याप्रमाणे शिद्दीच्या लोकास गाफील करून महाराजानी किल्ल्यातून निसटून जाण्याचा बेत केला आपले निवडक मावळे एकवट करून रात्रीच्या काळोखात ते किल्ल्याखालीं उतरून शत्रूच्या पाहारेकऱ्याच्या अगावरून बेलाशक निघून

---

१ ही हकीगत मोडकक्रुन अदिलशाहीच्या इतिहासात येणेप्रमाणे आहे महा राजानी शिद्दीस मोठ्या नम्रतेचे पत्र पाठवून कळविले की, 'आम्ही तुम्हास मित्र य नात्याने भेटू इच्छितो आमचे अपराध क्षमा करून आम्हाला आश्वासन दिल्यास व भेटीची परवानगी मिळाल्यास दोनतीन लोकानिशी आपल्या डेऱ्यास येऊन आमचा सगळा हेतु प्रत्यक्ष कळवू' शिद्दी एवढ्याने खुलून गेला, व तो जात्याच बेइमान असल्यामुळे त्याने महाराजाला असे कळविले की, मी बाह्यात्कारी बादशहा कडून आलो आहे. तरी माझ्या मनातून तुमचे नुकसान करण्याचे नाही म्हणून तुम्ही सख्य करून करारमदार ठरविल्यास तुमच्या एका केसालाहि धक्का लाग देणार नाही, तुमच्या भेटीची आम्हास फार उमेद आहे हा असा धीर मिळाल्यावर महाराज मध्यरात्रीच्या सुमारास दोनतीनच माणसे बरोबर घेऊन किल्ल्याखाली उतरून त्याला जाऊन भेटले त्या वेळी शिद्दीने त्याची फारच बरदास्त ठेविली व काही करारमदार ठरून महाराज परत किल्ल्यावर गेले. ही गोष्ट बादशहास कळ तांच तो सतापून स्वत शिवाजीमहाराजावर चालून जाण्यास सिद्ध झाला. पृ. २०२

गेले.[१] ते सगळे बेफाम असल्यामुळे शिवाजीमहाराज पळून जात आहेत हें त्याच्या लक्षातहि आलें नाहीं, पण नंतर लवकरच त्याला महाराज पळून गेल्याचे कळलें, व ते त्याच्या पाठलागाची तयारी करूं लागले, तो इकडे महाराज आपल्या लोकांसह अतिशयित वेगानें विशाळगडाकडे[२] पार निघून गेले. फाजलखान व शिद्दीजोहाराचा मुलगा शिद्दी उर्जीज[३] हे घोडदळ घेऊन महाराजाच्या पाठलागास निघाले, व त्याच्या मागोमाग मोठें पायदळहि निघालें. परंतु उजाडून दिवस बराच वर येईपर्यंत महाराजाचे लोक त्याच्या दृष्टीस पडले नाहींत. ते त्याच्या नजरेस पडले तेव्हा ते विशाळगडापासून सहा मैलावर घाट चढत होते. आपल्या मागून शत्रूनें येऊं नये, तर त्यास मध्येच अडवून धरावें म्हणून त्यांनी घाटाच्या खिंडीत पाटाच्या पाण्याजवळ कांहीं मावळे ठेवून त्याच्यावर बाजी देशपांडे यास मुख्य नेमिलें, व त्यास असें सांगितलें कीं, आम्ही किल्ल्यांत जाऊन पोंचल्यावर पांच तोफा मारून इशारा करूं तोंपर्यंत ह्या खिंडीत राहून शत्रूला अटकाव करावा. हा बाजी देशपांडे मोठा शूर व इमानी आहे अशी महाराजाची पूर्ण खात्री होती. कोणत्याहि बिकट प्रसंगी त्याच्यावर बिनदिक्कत भरवसा ठेवण्यास कांहीं एक हरकत नाहीं असें त्यास वाटे. त्या आणीबाणीच्या प्रसंगी त्यास सांगितलेली कामगिरी तो उत्तम प्रकारें पार पाडील असें महाराजास वाटल्यावरून त्यांनी त्याचीच ह्या वेळीं निवड केली ती अगदी यथायोग्य होती. त्याच्या बरोबर पांच हजार मावळे दिले होते. त्यानें ह्या खिंडींत जागोजाग मोर्चे बांधून झाडींतून लोक उभे केले. मुसलमानाचे स्वार पुढें चालून आले त्यावर त्यांनी गोळ्या व जेजालाचे दुरटे चालविले. त्यामुळे त्याला खिंडींतून वर चढतां येईना. मागाहून पायदळ येऊन पोंहचल्यावर मुसलमानांनी

---

१ रायरीच्या बखरींत असे आहे कीं, महाराज वीस हजार मावळ्यानिशीं मुसलमानाच्या फौजेवर एकाएकीं तुटून पडून त्याच्याशीं लढतलढत विशाळगडाकडे निघून गेले, व फाजलखान त्याच्या पाठीस लागला. तहाच्या बोलण्याचें मिष करून त्यास अगोदर बेसावध केलें नव्हतें.

२ ते रागणा नावाच्या किल्ल्याकडे पळून गेले असे कित्येक बखरींत म्हटलें आहे; व तें ग्रांटडफ व न्या. मू. रानडे खरें समजले व आम्हीही पहिल्या आवृत्तींत असेंच म्हटलें होतें; परंतु रांगणा किल्ला पन्हाळ्यापासून पाऊणशें मैलावर आहे, व पांढरें पाणी विशाळगडापासून सहा मैलावर आहे. जेध्याच्या शकावलींत महाराज खेळणा किल्ल्याकडे पळून गेले असें आहे. खेळणा तोच विशाळगड होय.

३ 'तारीख-इ. शिवाजी'मध्यें याचें नांव शिद्दी हलाल असें आहे.

खिडींतल्या मावळ्यावर मोठ्या आवेशाने हल्ला केला, परंतु त्यांनीं जिवावर उदार होऊन मोठ्या जोमानें युद्ध करून हा हल्ला मागे सारला मग पुन त्यानीं मोठ्या जमावाने त्याच्यावर हल्ला केला, परतु तोहि देशपाड्याने मागे हटविला. त्या वेळीं उभयपक्षाकडील लोक मोठ्या आवेशाने व शौर्याने लटले त्याप्रमाणें बाजी प्रभूने दोनप्रहर दिवस येईपर्यंत शत्रूच्या एवढ्या मोठ्या सैन्याला शौर्यानें झुलविलें, त्याला खिडीतून वर येऊं दिले नाहीं हे पाहून फाजलखानास अतिशयित चेव आला त्यानें आपल्या कर्नाटकातील पायदळानिशी पुनः तिसऱ्यानें मावळ्यावर मोठ्या नेटाचा हल्ला केला, व त्यावर तोफाचा सारखा भडिमार चालविला त्या वेळी निम्मेशिम्मे मावळे खलास झाले होते व शत्रकडचे जवळ जवळ पाच हजार लोक ठार झाले होते तरी बाजी देशपाड्याने धैर्य न सोडतां हा तिसरा हल्ला मागे हटविण्याचा प्रयत्न केला इतक्यात त्याला तोफेचा गोळा लागून तो रणात पडला पण प्राण जाण्यापूर्वी त्याच्या कानी पाच तोफाची सरबत्ती पडून महाराज किल्ल्यावर जाऊन पोचल्याचा इशारा मिळाला तेव्हा तो इमानी देशपाडे मरणवेदना लागल्या होत्या तरी आनंद पावला आपणावर सोपविलेली कामगिरी आपण मर्दुमकीनें पार पाडली व स्वामिकार्या आपला प्राण खर्ची पडला याबद्दल त्यास पूर्ण समाधान वाटले आपला सरदार पडला हे पाहून मावळ्याचा पुढे धीर निघेना, व महाराजहि किल्ल्यावर जाऊन पोचले, तेव्हा आपली कामगिरी आता आटोपली असें समजून ते रानात वाट सापडेल तिकडे पागले आणि सगळे किल्ल्यावर चढून गेले, जाताना त्यानीं आपल्या शूर सरदाराचें प्रेत नाहून नेले ते शत्रूच्या हाती लागूं दिले नाहीं मुसलमानाच्याने त्याचा त्या बिकट रानातून पाठलाग करवला नाहीं[1]

खिडीवरील मावळे पसार होऊन ती मोकळी झाली तेव्हा शत्रु वर चढून किल्ल्याखाली आला पण त्या वेळीं त्या प्रातातील हवा रखरखीत झाली होती. उन्हाळा जबर असल्यामुळे नद्यास व नाल्यास पाणी नाहींसें झालें होते शिवाय किल्ल्याखालची जागा अगदीं अडचणीची असल्यामुळे तेथे ठाणें देऊन किल्ल्यास मोर्चे लावून वेढा घालणे कठीण होते. फाजलखानास तर अशी भीति वाटे

१ मि. किंकेड ह्मणतात की, शिदीजोहार विशाळगडाजवळ गजपुरी ह्मणून एक गाव आहे तेथे येऊन काही दिवस तळ देऊन राहिला, आणि मग त्याने विशाळगडाच्या पूर्वभागी जाऊन गडास सुरुग लाविला, त्याबरोबर महाराजांनी दुसरीकडून सुरुग लावून जोहाराच्या पुष्कळ लोकाचा सप्पा उडविला.

लागली कीं, शिवाजीमहाराज हरहुन्नरे आपली फौज बुडवून बापासारखीच आपलीहि दशा करितील ह्या दहशतीमुळे त्याने वेढा देण्याचा विचार सोडून दिला. त्यात आणखी शिद्दीजोहार पन्हाळ्याजवळचा तळ हलवून विशाळगडाकडे येण्यास काकू करू लागला म्हणून फाजलखानाचा निरुपाय होऊन तो विशाळगडाखालचे आपले ठाणे उठवून पन्हाळ्याकडे आला, परतु पन्हाळ्यासहि वेढा घालून बसणे त्यास फायद्याचे दिसले नाहीं याचे एक कारण तर उघडच होतें कीं, महाराज आता मोकळे झाल्यामुळे केव्हा काय करितील व आपला धुव्वा उडवून देतील याचा नेम नाहीं असे भय त्यास वाटू लागले दुसरें असे की, पावसाळा नजीक आला असल्यामुळे ह्यापुढे वेढा घालून बसल्यास आपला ह्या डोंगरी मुलखात निभाव लागणे नाही असें त्यास वाटणे साहाजिक होते त्यात आणखी महाराज विशाळगडास निघून गेल्यावर पन्हाळा किल्ला त्यानी राघोबा बल्लाळ अत्रे यान्या स्वाधीन केला होता तो शिद्दीजोहाराशी मोठ्या शौर्याने लढत होता त्याने ह्या वेळी फारच हुशारीने व हिकमतीने किल्ल्याचे रक्षण केले महाराजानी त्यास बाहेरून साहाय्य करण्यास फौज पाठविली होती मुसलमानानी किल्ल्यास मोर्चे लावून शह दिला म्हणजे मागून तळावरील लोकावर ह्या फौजेनें हल्ला करावा व कापाकापी करून सापडेल ते सामानसुमान लुटून पळून जावे. किल्ल्याशी लगट करणारे लोक मागला बंदोबस्त करण्यासाठीं परत तळावर धावले म्हणजे किल्ल्यावरच्या लोकानी त्याचे मोर्चे मारून काढावे असा दुहेरी मारा महाराजाच्या लोकानी सुरू ठेविला तेव्हा शिद्दीजोहाराने व फाजलखानाने किल्लेदारास फितूर करण्याचा घाट घातला त्यानी रघुनाथ बल्लाळास असे सागून पाठविलें कीं, ‘ तुह्मी किल्ला आमच्या स्वाधीन करून देऊन आमच्या पक्षाकडे याल तर तुमची बादशहाकडे शिफारस करून तुह्माला योग्यतेस चढवूं व चागली जाहगीर करून देववू ’ त्यास त्या इमानी पुरुषाने असा जबाब पाठविला कीं, ‘ आह्मास धनलोभ बिलकुल नाहीं आह्मी आमच्या धन्याशी कदापि निमकहराम होणार नाहीं ’ असा त्याजकडून निक्षून जबाब मिळून त्याचा तो बेत फसला शेवटी चोहोंकडून निरुपाय होऊन त्यानी असा विचार केला कीं, तूर्त विजापुरास निघून जावे, व पावसाळा सपताच पुन नव्या दमाची मोहीम करावी, परंतु बादशहाची एवढी मोठी फौज इकडे आणून तिची बरीच खराबी मात्र केली, आपल्या हातून कांहींच पराक्रम झाला नाहीं, अशा स्थितीत आपण परत गेलों तर आपली फजिती होईल, लोक आपणास नामर्द म्हणतील, व बादशहाची आपणांवर फारच इतराजी

होईल, त्यापेक्षां विजापुरास न जाता पावसाळा त्याच प्रातात काढावा, व मग पुन लढाई सुरू करावी, असा त्यानी बेत केला. हा त्याचा बेत त्याच्या लष्करातील लोकास कळला तेव्हा त्यास तो न रुचून ते बेदिल झाले, आणि स्वदेशी जावयास रजा मागू लागले त्याची समजूत काहीं केल्या पडेना, व ते आपला हट्ट सोडिनात ह्याप्रमाणे सारी फौज नाराज झाली असता तेथे राहणे त्यास निर्भय वाटेना यास्तव त्याला आपला तळ उठवून विजापुरास जावे लागले

हे सरदार असे हतवीर्य होऊन परत आलेले पाहून अली अदिलशहास अतिशयित वाईट वाटले एवढे मोठे सैन्य घेऊन जाऊन काहींएक न करिता शिद्दीजोहार परत आला, व आपले लोक मात्र पुष्कळ कमी झाले हे पाहून त्याला त्याचा फार राग आला हा अदिलशहा मोठा तापट व उतावळ्या स्वभावाचा होता त्यात आणखी शिद्दीचा मत्सर करणाऱ्या सरदारानी बादशहाच्या मनात असें भरून दिले कीं, शिवाजीमहाराजानी शिद्दीस लाच दिल्यामुळे त्याने त्यास पन्हाळ्यावरून सुटून जाण्यास सवड दिली. एरवी ते त्याच्या हाती सहज लागण्यासारखे होते. बरें, पुढें ते विशाळगडावर जाऊन राहिले तेव्हा त्या किल्ल्यास वेढा देण्याचे सोडून तो पन्हाळ्यासच राहिला, व त्याहि किल्ल्याचा वेढा नेटाने चालविण्याचे सोडून निमकहरामी करून परत आला ह त्या सरदाराचे ह्मणणे त्या पिनळ्या कानाच्या बादशहास खरे वाटून त्याने शिद्दीवर फितुरीचा आरोप केला तो ऐकून शिद्दीस मोठाच राग आला, व त्या सतापासरशी अद्वातद्वा बोलून आपल्यावरचा आरोप त्याने उडविण्याचा प्रयत्न केला ह्या त्याच्या सक्रोध भाषणाचा असा अर्थ केला कीं, तो बादशहाची बेअदबी करण्यास प्रवृत्त झाला असून त्याच्या ठायीं राजनिष्ठा मुळीच नाहीं असें स्पष्ट दिसत आहे

इकडे आपण शत्रूच्या तावडीतून सुटलो व त्याचे सैन्यहि बरेच खराब होऊन परत गेले हे आपल्यावरचे मोठेच अरिष्ट टळले, हे पाहून महाराज परम हर्ष पावले ज्याच्या अद्वितीय पराक्रमाने व प्राणाच्या आहुतीने स्वसकटाचे निवारण झाले त्या बाजी देशपाड्याचा मुलगा बाळाजी बाजी यास महाराजानी बोलावून आणून त्याचे समाधान केले त्याच्या बापाच्या मर्दुमकीची व इमानाची फारच तारीफ केली व त्याची सरदारी त्याला दिली. त्याच्या ताब्यात जे किल्ले होते त्याचे काम बाळाजीस सागितलें, व त्यास बक्षीचा हुद्दा देऊन कांहीं जहागीरहि करून दिली. त्याचे सात भाऊ होते त्यास आणून महाराजांनीं पालख्या व तैनाती दिल्या, व त्यांस मावळे लोकाची सबनिशी सांगितली.

ह्या समयी रघुनाथ बल्लाळ अत्रे याने मोठ्या हिमतीनें शत्रूशीं टक्कर देऊन पन्हाळागडाचें रक्षण केलें, यामुळे महाराज फार खुष झाले त्याचीहि तारीफ करून त्यास योग्यतेस चढविले व त्यास पन्हाळा व त्याखालील प्रांत यांचा सुभा सांगितला त्याने हें काम मोठ्या हुशारीने केले त्याने त्या नवीन ताब्यात आलेल्या प्रांताची व्यवस्था चांगली लाविली लढाईच्या धामधुमीमुळें शेतकरी लोक शेते सोडून वाट मिळेल तिकडे पळून गेले होते त्यास कौल व आश्वासन देऊन परत आणिले, व त्याच्याकडून जमिनीची लागवड करवून उत्पन्न वाढविले

वर सांगितल्याप्रमाणे महाराजांनी शिद्दीजोहाराला व फाजलखानाला घाटावरच अडकवून त्यांशीं निकराचे युद्धप्रसंग केले व त्याच्या सैन्याची पुष्कळ नासाडी केली, आणि पुढे युद्ध चालविण्याचा जोम व धमक नाहींशी होऊन त्यास नामोहरम होऊन परत जावे लागले इकडे कोकणात जंजिऱ्याच्या शिद्दीने सकेताप्रमाणें आरमार तयार करून समुद्रकिनाऱ्यावरील महाराजाच्या ताब्यातील कित्येक ठाण्यावर हल्ला करून ती हस्तगत केली रघुनाथपतास त्याच्याशी युद्ध करावयास पाठविलें होते त्याचा शिद्दीने बरेच वेळा पराभव केला खैरातखान व याकूबखान यानी महाराजाच्या ताब्यातल्या नळागडास वेढा घातला होता, इतक्यात त्यास कळले कीं, शिवाजीमहाराज यवनाच्या तावडीतून सुटून व त्यांस मागे जावयास लावून रायगडावर जाण्याकरिता इकडून येत आहेत. तेव्हां ते सरदार घाबरून जाऊन वेढा उठवून जंजिऱ्यास परत गेले शत्रूचे हे वर्तन पाहून रघुनाथपताला नवा दम आला आणि त्याने शिद्दीचा पुरा पिच्छा पुरविला त्याच्या लोकास त्याने कोठेच थारा नाहींसा करून सोडिला, व त्याच्या ताब्यांतील दंडाराजपुरीचा सगळा प्रांत काबीज केला ह्याप्रमाणे अगदी जेरीस आल्यामुळे शिद्दीने रघुनाथपंताशी तहाचे बोलणें लाविले. त्याने आपला वकील रघुनाथपंताकडे पाठविला मग उभय पक्षामध्यें सल्ला होऊन लढाई बंद झाली शिद्दीने रघुनाथपंताचा बहुमान करून त्यास बहुमोल पोषाख व घोडा नजर केला[१]

---

१ ऑर्मी ह्मणतो की, शिवाजीमहाराज पन्हाळ्यावरून निघाले ते दंडाराजपुरीवर मोठ्या सैन्यासह आले, व तेथल्या शिद्दीला शिद्दीजोहाराचा हातचा हुकूम ह्मणून एक खलिता त्यांनी दाखविला त्यात असा मजकूर होता कीं, दंडाराजपुरी शिवाजीमहाराजाच्या स्वाधीन करा. ह्मणजे ते पन्हाळा किल्ला सोडून देणार आहेत. ह्या

मागे सांगितले आहेच की, विजापूरसरकाराने महाराजावर शिद्दीजोहाराला पाठवून जंजिऱ्याच्या शिद्दीला व वाडीच्या सावंताला महाराजाच्या ताब्यातील कोंकणपट्टीवर स्वारी करून ती हस्तगत करण्यास सांगितले होते त्या दोघानीं परस्परास साहाय्य करावे असें ठरले होते त्याप्रमाणे सावंतानीहि ह्या वेळी महाराजाशी शत्रुत्व प्रगट केले यास्तव त्यास शिक्षा करण्याची कामगिरी महाराजानी बाजी पासलकरास सांगितली होती[1] सावंताशी त्याच्या पुष्कळ झटापटी झाल्या, त्यात त्यास बरेच यश आले शेवटी कायसावंत शिद्दीच्या साहाय्यानें पाच हजार लोकानिशी बाजी पासलकरावर चालून आला उभयपक्षाचे राजापुरानजीक तुमुल युद्ध झाले पासलकर स्वत हातात फिरंग घेऊन रणात शत्रूशी मोठ्या आवेशाने लढत होता त्याची कायसावंताशी गाठ पडून दोघाचे द्वंद्वयुद्ध झाले दोघेहि वीर मोठे बलवान् व युद्धकुशल असल्यामुळे त्याची झटापट मोठ्या निकराची झाली एकमेकानी एकमेकास पुष्कळ जखमा केल्या, तरी त्याचा जोम काहीं कमी झाला नाहीं शेवटी ते परस्पराच्या वारानी एकेच वेळी रणात पडून गतप्राण झाले[2] महाराजाचा हा शूर सरदार पडला तरी

---

हुकूम त्या शिद्दीस खरा वाटून त्यान दंडाराजपुरी महाराजाच्या स्वाधीन केली. कारण त्याला वाटले की, शिवाजीमहाराज पन्हाळ्यावरून निघाले आहेत ते शिद्दीजोहाराच्या परवानगीवाचून निघाले नसाव परतु पुढे शिद्दीला वहीम येऊन त्याने जंजिरामात्र महाराजाच्या स्वाधीन केला नाहीं

१ हा महाराजाचा बालमित्र असून अतिशयित दमाना व शूर होता हा युद्धकर्मात पुरा निष्णात असून अगात मोठा धिप्पाड होता ह्यास मावळ्याच्या पायदळाची सरनोबती दिली होती हा मूळचा मुसेखोरे येथ राहणारा असून आठ गावाचा देशमुख होता हा प्रथम रायगडाखाली छत्रीनिजामपुराजवळ कुरडू नावाच्या गावात रहात असून खिंडीचे नाके सभाळीत असे ह्याच्यापाशी यशवंता घोडी, गजली फिरंग व अजगर ढाल ह्या तीन उत्तम वस्तु होत्या त्याची घोडी तर एक अपूर्व रत्नच होती ती आपणास प्राप्त व्हावी असे विजापूरसरकारास वाटून त्याने सोनू दळव्यास ती त्याच्याकडून जबरीने आणावयास पाठविले त्याचा पासलकराने पराभव केला. (पोवाडा)

२ प्रो सरकारानी २९८ व्या पृष्ठावर डच व्यापाऱ्याच्या त्या वेळच्या कागदपत्रावरून असा मजकूर घेतला आहे की, शिवाजी महाराज ह्या वेळी वेंगुर्ल्यापासून चार दिवसाच्या वाटेवर सैन्य घेऊन आले असून त्याचा कुडाळच्या देसायांनी पराभव करून त्यास मागें पिटाळून लाविले. हें वर्तमान अर्थात् त्या व्यापाऱ्यानी कर्णोपकर्णी ऐकिले असून ते बाजी पासलकरांच्या सदरील मोहिमेस अनुलक्षून असावे.

त्यांच्या लोकांनी धीर न सोडता शत्रूशीं शेवटपर्यंत लढून त्याचा पुरा मोड केला. बाजी पासलकर रणात पडल्याचे वर्तमान कळले तेव्हा महाराजास अतिशयित दु ख झालें. आपला अत्यंत इमानी व जिवलग मित्र व मोठा शूर सरदार आपणास शिद्दीच्या व सावंताच्या वैरामुळे अतरला हें मनात येऊन महाराजांनी त्यास चागलीच शिक्षा करावयाची असा निर्धार केला.

# भाग तेरावा.



## विजापूरसरकारास हतवीर्य केलें.

## १६६१–६२.

मागल्या भागात सांगितल्याप्रमाणें शिद्दीजोहार व फाजलखान हे मोठी प्रबळ सेना घेऊन महाराजावर चालून आले असता त्यांच्या त्या मोठ्या आवेशाच्या मोहिमेचा शेवट वाईट झाला हे पाहून अल्ली अदिलशहा फार दिलगीर झाला, व त्यास अतिशयित राग येऊन त्या आवेशासरशी त्यानें शिवाजीमहाराजावर आपण जातीनें स्वारी करावयाची असा निर्धार केला. मग पुनः मोठ्या सैन्याची जमाजम करून हा बादशहा कऱ्हाडप्रांतात गेला बादशहा प्रत्यक्ष मोहिमेस निघाला हे पाहून आसपासच्या प्रांतातले जे जमेदार शिवाजीमहाराजास करभार देण्याचे कबूल करून त्यांचे अंकित झाले होते ते गडबडून जाऊन बादशहाच्या छावणीत येऊन आह्मी आपले ताबेदार व नोकर आहों असें कबूल करूं लागले शिद्दीजोहाराने ह्या वेळी बादशहापाशी क्षमा होण्याविषयीं रदबदली केली, परंतु तो बादशहाबरोबर पुन मोहिमेस जावयास सिद्ध झाला नाहीं कारण त्याला दरबारच्या अमीरउमरावाच्या हेवेखोरपणाचा चांगलाच अनुभव येऊन चुकला होता तो आपल्या जाहगिरीस निघून गेला.

बादशहाने पन्हाळ्यास वेढा देऊन तो घेतला त्याप्रमाणेच त्यानें पावनगडहि काबीज केला नंतर आसपासचे बहुतेक किल्ले जे महाराजानीं हस्तगत केले होते ते एकामागून एक सर करण्याचा सपाटा त्याने चालविला. रागणा व विशाळगड हे दोन किल्ले मात्र त्याच्या हातीं गेले नाहींत इतक्यात पावसाळा सुरू झाला. तेव्हा सह्याद्रीच्या घांटमाथ्यावर बरसादीच्या दिवसांत राहणें नीट न वाटून तो परतला व कृष्णानदीच्या तीरीं चिमलगे येथें छावणी करून राहिला.

इकडे महाराजांनीं असा बेत केला होता कीं, बादशहाच्या फौजेशीं सामना इतक्यांत करूं नये. कारण त्यांला कळून आलें होतें कीं, त्याच्याबरोबर प्रचंड

सेना असल्यामुळें त्याच्याशी एकदम युद्ध करण्यास प्रवृत्त झाले असता आपल्या लोकाची फार खराबी होऊन आपले सैन्यबळ कमी होईल नुकतीच शिद्दी-जोहाराशी लढाई करावी लागल्यामुळे त्याचे बरेच लोक कमी झाले होते त्याची वावटळ निघून गेली न गेली तों ही दुसरी तीहून प्रबळ अशी प्राप्त झाली होती बादशहा किल्ले काबीज करण्याच्या खटपटीत गुतल्याने त्याची बरीच फौज खलास होईल, असे झाले ह्मणजे त्याच्याशी सामना करण्यास कठीण जाणार नाहीं, आणि तो पराभव पावून परत गेला ह्मणजे मग त्याने घेतलेले किल्ले आपणास पुनरपि सर करिता येतील, असे महाराजानी त्या वेळी मनात आणिलें

परतु इतक्या अवकाशात महाराज काहीं स्वस्थ बसले नव्हते त्यानी राजा-पुरशहरावर पुन हल्ला करून ते ह्या वेळा हस्तगत केल ह्या शहरात इग्रज लोकाची वखार होती त्याविषयी माग उल्लेख केलाच आहे त्याचे ह्या वेळी बरेंच नुकसान झाले वखारीवरच्या रिव्हिंगटन, जिफर्ड वगैरे चार इग्रज व्यापाऱ्यास महाराजानी कैद करून प्रथम वसती येथ ठेविल, मग तेथून त्याना काढून सोन-गडावर ठेविल आणि शेवटी काहीं दिवस रायगडावर ठेविल हा असा त्याच्या-वर राग काढण्याचे कारण असे कीं, शिद्दीजोहारान पन्हाळ्यास वेढा घातला होता तेव्हा त्याला त्यानी दारूगोळा पुरवून मदत केली होती इतकेंच नव्हे तर त्याच्या कित्येक लोकानी द्रव्याच्या लोभान शिद्दीजोहाराच्या छावणीत जाऊन एक प्रकारचे कुलपी गोळे सोडण्याचं काम केले होते[1] तीन वर्षानतर त्याच्याकडून खड घेऊन त्यास बधमुक्त केले

राजापुर हस्तगत केल्यावर महाराजानी शृगारपुरावर आपला मोर्चा फिरविला तेथे सुरवे[2] ह्या आडनावाचा एक मराठा सरदार स्वतत्रपणे राज्य करीत होता तो कोणासच मोजीत नसे त्याच्यापाशी दहा हजार लोकाचा जमाव होता तो नेहमी आसपासच्या मुलखात पुडावा करून त्यास उपद्रव देत असे त्याचे मुख्य कारभारी पिलाजी व तानाजी असे दोघे शिरके ह्या आडनावाचे मराठे सरदार होते पिलाजी शिरके महाराजापाशी सुरव्याचा वकील ह्या नात्यानें होता परंतु हा सुरवे नीट वागेना ह्मणून महाराजानी ह्या वकिलास कैदेत

१ प्रो सरकार पृ २९०

२ डफ ह्याचें नाव दळवी असें देतो, व सुरवे त्याचा दिवाण होता असें ह्मणतो. शिरक्याचें तर तो नांवहि देत नाही मुळातील मजकूर मराठी बखरीवरून घेतला आहे.

ठेविले होते सुर्व्याचा उपद्रव नाहींसा करून टाकण्याच्या इराद्यानें महाराजांनी त्याचें मुख्य शहर जे शृंगारपूर त्याजवर अकस्मात् छापा घालून ते सर केलें. शृंगारपूर हातचे गेले तरी हा सुर्वे काहीं हार आला नाहीं तो आपल्या लोकास धीर देऊन महाराजाच्या सैन्याशी एकसारखा लढत राहिला शेवटी महाराजानी स्वत त्याच्यावर चालून जाऊन त्याला समरागणात गाठून त्याच्याशीं दारुण युद्ध केले त्यात सुर्वे पडला व शिरके पळून गेला सुर्व्याचा असा नाश झाला तेव्हा त्याच्या अमलातले काही सरदार पळून जाऊन शिद्दीच्या मुलखात आश्रय धरून राहिले हे महाराजास मुळीच आवडले नाही शिरके वगैरे सरदार आपल्या लोकाची पुन जमाजम करून व शिद्दीचे साहाय्य घेऊन हा काबीज केलेला प्रात परत घेण्याचा प्रयत्न करितील तो त्यानी करूं नये म्हणून महाराजानी तानाजी शिरक्यास आपलासा करून शृंगारपूरशहर व दुसरे कांहीं गाव इनाम करून दिले ह्याप्रमाणे स्वत शिरके महाराजाची ताबेदारी स्वीकारून राहिला तेव्हा दुसरेहि काहीं सरदार शिद्दीच्या आश्रयास गेले होते ते परत आपआपल्या गावीं आले त्यास महाराजानी त्याची वतनें परत देऊन सतुष्ट केले त्यापैकीं जे कोणी नोकरी करण्यास राजी व लायक होते त्यास महाराजानी आपल्या पदरीं ठेविले. ह्या शिरक्याची कन्या पुढे महाराजानी आपल्या ज्येष्ठ पुत्रास केली [1]

नंतर पावसाळा सुरू झाला तरी महाराज स्वस्थ राहिले नाहींत कारण विजापूरच्या बादशहाने त्याच्यावर स्वारी केली तेव्हा शिद्दीनें केलेला तह मोडून पुन उचल घेऊन त्याच्या प्रातास उपद्रव केला होता त्यामुळे महाराजास त्याचा अतिशयित राग आला, आणि पावसाळा सपून विजापूरकरास किंवा वाडीच्या सावंतास त्याला मदत करिता येण्यापूर्वी त्याचे अजीबात उत्पाटन करण्याचा त्यानी निश्चय केला. महाराजानी व्यकाजीपंतास त्याच्यावर पाठविले उभय पक्षांच्या पुष्कळ झटापटी होऊन शेवटी व्यंकाजीने दंडाराजपुरी व सभोवतालचा आणखी बराच प्रात काबीज केला त्या हस्तगत झालेल्या प्रातात आणखी किल्ले बांधून व त्यावर पाचसहा हजार लोक ठेवून तो प्रात कायमचा हातीं

१ महाराजाच्या ह्या स्वारीचा उल्लेख मोनगड येथे ठेवलेल्या इग्रज कैद्यानी आपल्या एका पत्रात स १६६१ त केला होता, तो असा शिवाजीने दळवी राजे व शृगारपूरचे राजे याना जिकून आपली सत्ता वाढविली आहे. दडाराजपुरीपासून खारेपाटणापर्यतचा समुद्रकिनारा त्याच्या हाती गेला आहे. (प्रो. सरकार पृ. ५६)

राहील असें केलें शिद्दीच्या ताब्यात काय तो एक जंजिरा राहिला तोहि हस्तगत करण्याचा निश्चय करून त्यावर महाराजाच्या लोकानी तोफाचा भडि-मार चालविला, परतु हा प्रयत्न त्यास लवकरच सोडून द्यावा लागला. कारण त्याच्यापाशीं हव्या तितक्या तोफा नसून त्याची सरबत्ती करण्यास लागणारीं हुशार माणसेंहि हाताशी नव्हतीं पुढे लवकरच पावसाळा सरून विजापूरसर-काराच्या सैन्याची हालचाल सुरू झाली तेव्हां महाराजास तिकडे लक्ष पुरवावें लागल्यामुळे शिद्दीवरचा हल्ला ढिला पडला

वर सागितल्याप्रमाणें अली अदिलशहा पावसाळा सुरू झाल्यामुळे मोहीम बंद करून चिमलगे येथे तळ देऊन राहिला होता तेथ असता त्याला अशी बातमी आली की, कर्नाटकात फारच बडाळी माजली आहे तेव्हा त्यानें शिद्दीजोहारास तिकडे पाठविण्याचा विचार करून आपल्याकडे मोठ्या आदराने बोलावून आणिले व त्याचा चागला मानसन्मान करून त्यास कर्नाटकात जावयास सागितले परतु तो काहीं केल्या कबूल होईना त्याला त्या बादशहाचा मुळीच विश्वास येईना. कारण त्याचा मुख्य वजीर इब्राहीमखान हा शिद्दीचा फार द्वेष करीत असे आणि बादशहापाशीं त्याचे अतिशयित वजन असे यास्तव शिद्दीजोहार लागलींच आपल्या जाहगिरीस परत गेला त्यावरून बादशहाचा असा पक्का समज झाला कीं, हा कर्नाटकातील बंडवाल्यास सामील असून शिवाजी महाराजाशीहि त्याचें संगनमत असावे.

शिद्दीजोहार कर्नाटकातील बडे मोडण्यास जाण्याचे कबूल करीना तेव्हा आता पुढे काय करावे असा अदिलशहास विचार पडला त्याचा ह्या वेळी असा पक्का निर्धार झाला होता कीं, शिवाजीमहाराजाचे पारिपत्य केल्यावाचून परत जावयाचे नाहीं त्याच्या जवळच्या कित्येक मसलतगाराचाहि अभिप्राय असाच होता, परंतु दुसऱ्या कित्येकाचे ह्मणणे असें पडले की, आधी कर्नाटकातली बंडाळी मोडली पाहिजे शिवाजीमहाराजास शोधून काढण्यासाठी राने, दऱ्या, डोंगर धुंडीत राहून लष्कराची खराबी होईल आणि शेवटी डोगर पोंखरून उंदीर काढिल्यासारखें होईल! अशी बादशहाची द्विधा वृत्ति होऊन पुढें काय करावें ते त्याला सुचेना इतक्यात वाडीचे देशमुख लखमसावंत व खेमसावंत यांनीं त्याजपाशी असा अर्ज केला कीं, आपणास पुरेसें साहाय्य मिळाल्यास आपण शिवाजीमहाराजाचें पारिपत्य करून सर्व कोंकणप्रात सोडवितों. हा त्यांचा अर्ज मंजूर होऊन असें ठरलें कीं, बहिलोलखान व मुधोळचा बाजी घोरपडे

त्यांनी सैन्य जमवून सावंतास मदत करावी, व त्या तिघानी मिळून शिवाजी-महाराजावर स्वारी करावी, आणि बादशहानें सैन्य घेऊन कर्नाटकात जावे.

ह्याप्रमाणें महाराजावर नव्या दमाची मोहीम तयार होत असता बाजी घोर-पडे ह्या तयारीसाठी मुधोळास आला हे वर्तमान महाराजास कळताच त्याच्या-वर अकस्मात घाला घालून त्याला व त्याच्या पुष्कळ नातलगास व लोकास ठार मारिले आपल्या तीर्थरूपास त्याने विश्वासघात करून पकडिल्याबद्दल त्याचा त्यानी असा भयंकर रीतीने सूड उगविला याविषयी पूर्वी सांगितलेच आहे हा असा घोरपड्याचा नाश झाला तेव्हा त्याच्या जागी खवासखानाची रवानगी झाली. ह्या सरदारानी कोकणच्या घाटापर्यंत कूच केले न केलें तोच त्यास आपल्या सैन्यानिशीं ताबडतोब कर्नाटकात निघून येण्याचा बादशहाकडून हुकूम आला. त्यावरून ते तिकडे निघून गेले कर्नाटकातले बडखोर लोक प्रबळ असल्यामुळें त्याचा मोड करण्यास मोठ्या सैन्याची जरूर पडल्याकारणाने बादशहास त्याला तिकडे निरुपायास्तव बोलवावे लागले

ह्याप्रमाणे कर्नाटकातील बडवाल्याशी झगडण्यात बादशहाचे सगळें सैन्य गुतून पुष्कळ दिवस तिकडेच राहिले त्यामुळे महाराजास चागलेच फावलें.

१ मि किंकेड व रा ब पारसनास आपल्या पुस्तकात शहाजीराजाचा व महा-राजाचा ह्या प्रकरणी झालेला पत्रव्यवहार देतात, त्यावरून असे कळते की, हा घोरपडे वाडचे सावत व खवासखान यासह महाराजावर स्वारी करणार हे वर्तमान शहा-जीराजाना महाराजास पत्र लिहून कळविले ह्या पत्रात त्यानी असे लिहिले होते की, ह्या बाजी घोरपड्याने स्वधर्मरक्षणाच्या कायास साहाय्य करावयाचे सोडून मुसल-मान व तुर्क याच्या कारस्थानास सामील होऊन आमच्याशी दगा केला आणि आह्मास विजापुरास नेले तेथे आमच्यावर कोणता प्रसग ओढवला होता हे तुह्मास विदित आहेच मराठ्याची सत्ता स्थापित करून स्वधर्मरक्षण करण्याचा जो तुमचा मनोरथ तो सिद्धास न्यावा असा सर्वज्ञ प्रभूचा सकल्प आहे असे आता दिसून येत आहे ह्मणूनच आमच्यावरचा त्या समर्याचा घोर प्रसग टळला तुमच्यावर आता खवासखान घोरपड्याच्या साहाय्याने चालून येत आहे, यात शिव आणि भवानी तुह्मास यश देवो ह्या दोघाचा चागला सूड घ्यावा अशी आमची इच्छा आहे, पित्याची इच्छा पूर्ण करण्यास तत्पर असा तुमच्या सारखा आज्ञाधारक पुत्र आह्माला सुदैवानें प्राप्त झाला आहे, यास्तव एवढी कामगिरी करण्याची मी तुह्मास आज्ञा करितों बाजी घोरपडे आपले लोक घेऊन मुधोळास गेला आहे" ह्या आशयाचें पत्र आल्यावर मुधोळावर हल्ला करून महाराजानीं त्याचा सूड घेतल्यावर शहाजी महाराजास आपण कोणत्या रीतीने ही कामगिरी बजाविली ते लिहून कळविलें.

बादशहानें जे किल्ले वगैरे काबीज केले होते ते सगळे त्यानी भराभर हस्तगत केले; इतकेच नव्हे तर आणखीहि बराच प्रांत त्यानी ह्या वेळीं जिंकिला.

वाडीच्या सावंतानी आपल्या राजनिष्ठेचे प्रदर्शन करून शिवाजीमहाराजाशी लढण्यासाठी आपण होऊन बादशहापाशी मदत मागितली, व ह्याप्रमाणे महाराजावर आपला किती दांत आहे ते प्रकट केले, ह्याबद्दल त्यास चांगलीच शिक्षा करावयाची असा महाराजानी निश्चय केला, व त्याच्या ताब्यातील प्रांतावर लागलीच स्वारी करून त्याच्याशी युद्ध आरंभिले सावंत अगदी घाबरून गेले बादशाही फौजेच्या साहाय्यावाचून त्यास महाराजाशी लढण्याचें त्राण मुळीच नव्हते, व हे साहाय्य मिळण्याची आशा ह्या प्रसंगी अगदी नव्हती. महाराजानी त्याचे कुडाळ, बांदे वगैरे प्रांत काबीज केले सावंत फिरंगणांत पळून जाऊन गोव्याच्या सुभेदाराचा आश्रय धरून राहिले फिरंग्यानी त्यास आश्रय दिला हे पाहून महाराजानी त्या सरकारास धमकीचा निरोप पाठविला त्यासरशी त्याचे डोळे उघडून त्यानी सावंतास आपल्या राज्यातून निघून जावयास सांगितले तेव्हा त्याचा निरुपाय होऊन ते महाराजास शरण आले त्यानी प्रथम पितांबर शेणव्यास महाराजापाशी वकिलीस पाठविले व अशी विज्ञप्ति केली की, 'आह्मी सावंत असून भोसले घराण्याशी आमचे नाते आहे. यास्तव आह्मी आपलेच आहो आपले ताबेदार होऊन आपल्याशी इत पर इमानानें वागावें असा आमचा निश्चय झाला आहे तरी आमची आगळीक मनास न आणिता आमच्यावर कृपा व्हावी' हे त्याचे नम्रतेचें ह्मणणे कळल्यावर महाराजानी त्यास अभय देऊन भेटीस आणविले, वाडीप्रांताची देशमुखी त्याच्याकडे कायम केली, व त्यानी प्रतिवर्षी खंडणी द्यावी असे ठरविले[1] महाराजानी त्याच्या पायदळ सैन्यास आपल्या नोकरीस ठेवून दूरच्या कामगिरीवर रवाना केले, व आपल्या पदरचे लोक त्याच्या प्रांताच्या रक्षणासाठी ठेविले

ह्या सावंताच्या पदरी नानसावंत[2] व राम दळवी असे दोघे सरदार होते ते चांगले हुशार व जवानमर्द आहेत असें पाहून त्यास महाराजानी आपल्या

---

१ सभासद ह्मणतो की, त्यास नवख्यादाखल सहा हजार होन द्यावे असा करार करून ठेविले. त्यानी कसबा कुडाळ येथे राहावे, व वाडा, हुडे, ठाणे, कोट वगैरे कांहीएक बांधू नयेत व लोकांचा जमाव करू नये असे ठरविले.

२ सभासद ह्याचे नाव तानाजी सावंत असे देतो.

नोकरीस ठेविलें राम दळवी फारच शूर आहे असें महाराजांच्या नजरेस आल्यावरून त्याच्या स्वाधीन काहीं फौज केली व त्यास कोंकणांतील काहीं प्रांताचा बंदोबस्त ठेवण्याची कामगिरी सांगितली त्याप्रमाणें महाराजांनीं सावंताची व त्याच्या ह्या दोघा शूर सरदाराची कायमची तुटातूट केली

ह्या मोहिमेत महाराजानी पंचमहाल, मर्दनगड, बारदेश वगैरे प्रांत काबीज केले व खुद्द गोव्यावर रोख धरिला तेव्हा फिरंगी घाबरून गेले शिवाजीमहाराजाचा आपणावर शह बसूं नये, व त्याच्यापासून आपणास काहींएक उपद्रव होऊ नये ह्या हेतूने त्याच्याकडे कुडाळकर देसायाचा सबनीस अनंत शेणवी यास पाठवून त्यानी तहाचे बोलणे लाविले परंतु ह्या शेणव्यानें हितशत्रुत्व दाखवून महाराजाचा विश्वासघात करण्याचा घाट घातला फिरंग्याकडून तहाचे बोलणे आले तेव्हा ते बेफाम राहतील असे त्यास वाटून त्यानें फिरंग्यास अशी मसलत दिली कीं, त्याच्या छावणीवर रात्रीचा एकाएकीं छापा घालून त्याचा नाश करावा. परंतु ही गुप्त मसलत गणोजी नावाच्या एका तांडेलास समजून त्याने ती महाराजास कळविली तेव्हा अर्थात् ते सावध राहिले सदरील मसलतीप्रमाणे अनंत शेणवी दहा हजार फिरंगी बरोबर घेऊन मध्यरात्रीच्या सुमारास महाराजाच्या गोटावर हलकेच चालून आला. तो इकडे महाराज आपले ठाणे सोडून अर्ध कोस मागें हटून तयारीनें उभे राहिले होते फिरंगी सैन्य गोटापाशी येऊन तोफाबंदुकाची सरबत्ती करीत राहिले महाराजानी उजाडेपर्यंत काहींएक हालचाल केली नाहीं प्रातःकाळ होताच त्याच्या घोडेस्वारानी फिरंग्याच्या सैन्यावर एकदम चाल करून कापाकापी सुरू केली फिरंग्याचा पुरा मोड झाला त्याचे फार तर हजार बाराशे लोक जीव घेऊन माघारा पळून गेले असतील बाकीच्यापैकीं काहीं समरभूमीवर पडले, काहीं पाण्यात उड्या टाकून बुडून मेले, व काहीं पाडाव झाले ह्याप्रमाणे एवढी फौज गारद झालेली पाहून फिरंगी अगदी घाबरून गेले. त्याचा बारदेश सगळा महाराजानी लुटून जाळून उद्ध्वस्त केला फिरंगी सापडेल तेवढा ठार मारण्याचा सपाटा चालविला फिरंगी सावकार सापडले तेवढे पकडून आणून त्याच्यावर जबर खंड बसविला कुडाळ, बांदें, साकळी, मणेरी, तुचाळी वगैरे ठिकाणीं महाराजानी ठाणीं घातली होतीं, त्याचप्रमाणेंच त्यानीं बारदेशातहि ती जागोजाग घातलीं. चोहोंकडून गोवेंप्रांतास जशी काय चौकीच बसविली आता गोवें आपल्या हातचें जाते अशी दहशत फिरंग्यांस पडली.

अनंत शेणव्याची कपटाची मसलत ऐकिल्यामुळे आपल्यावर असें घोर संकट ओढवले ह्याबद्दल त्यास अनुताप झाला मग त्यानी महाराजास आपल्या वकिलाबरोबर पत्र पाठवून झाल्या गोष्टीबद्दल क्षमा मागितली त्याच्या बरोबर महाराजास वीस हजार पुतळ्या, उंची वस्त्रे व इतर नजराणा त्यानी पाठविला व तहाचे बोलणे केले तें महाराजास मान्य होऊन असा तह ठरला कीं, फिरग्यानी दरसाल नव्या तोफा पुरवाव्या, काही जवाहीर प्रतिवर्षी द्यावे, व आपल्या जहाजास कौल महाराजाकडून घ्यावे

वर सागितल्याप्रमाणे सावंताचा मोड होऊन त्यास महाराजाचे अंकित व्हावे लागले, ही हकीगत विजापुरसरकारास कळली तेव्हा त्यास फार वाईट वाटले कोकणाच्या बाजूस एवढाच एक सरदार नाव घेण्यासारखा उरला होता तोहि शिवाजीमहाराजाचा ताबेदार झाला तेव्हा कोकणपट्टी परत मिळविण्याची त्या सरकाराची आशा बहुतेक नाहींशी झाली जजिऱ्याच्या शिद्दीचे त्यास थोडेसें पाठबळ होते, त्यालाहि महाराजानी बराच निर्बळ करून सोडले होते व तो त्या वेळा विजापुरसरकाराच्या आश्रयाने राहून आपला इतउत्तर निभाव लागणे नाही असें समजून त्या सरकाराशी अमळ बेपरवाईनेच वागू लागला होता तेव्हा आता पुढे शिवाजीमहाराजाशी लढाई करावयाग कोणास उभ करावें हा विचार त्या सरकारास येऊन पडला दरबारातील कोणीहि सरदार तयार होइना, आणि त्याचा उपद्रव तर काही केल्या कमी होईना तेव्हा निरुपाय होऊन अली अदिलशहाचा वजीर अबदूल महमद याने त्याचा त्रास नाहीसा करण्याच्या हेतूने त्याच्याशी गुप्तपणे तह केला हा तह असा गुप्तपणे करण्याचे कारण अर्थात् असें होते को, दरबारच्या अमिरास तह केल्याचे वर्तमान कळले असते तर त्याना ती गोष्ट मुळीच आवडली नसती, व त्यानी त्या वजिरास दोष देऊन कामावरून दूर करविण्याची खटपट केली असती इतकेच नव्हे तर बादशहास भलतीच मसलत दिल्याबद्दल त्याला जबर शिक्षा करविली असती असो महाराजाबरोबर त्या वजिराने केलेल्या तहात असें ठरले कीं, शिवाजी महाराजाचा उपद्रव नाहींसा करण्यासाठी त्यानी जिंकिलेला मुलूख त्याच्याकडेच राहू द्यावा तो परत घेण्याची खटपट विजापूरसरकारानें करूं नये, याशिवाय त्यास आणखी काहीं मुलूख तोडून द्यावा; शिवाजी महाराज आपले अंकित आहेत असें विजापूरसरकाराने इत:पर मानूं नये, त्या सरकारानें त्यास प्रतिवर्षी सात लक्ष होन खंडणी-

ाखल द्यावे, परस्परानी परस्परास प्रसग पडेल तेव्हा साहाय्य करावे, आणि
'हाराजाचा शामजी नाईक पुंडे विजापुरदरबारात वकील असावा.

हा तह झाल्यावर महाराजानी विजापूरसरकाराच्या उरलेल्या मुलखास उप-
व देण्याचे बंद केले पुढे शहाजीराजे महाराष्ट्रात यावयास निघाले त्यास
जापूरसरकाराने परवानगी देताना असे सागितले कीं, तुम्ही आपल्या पुत्रास
टून आमच्याशी ते इत पर सलोख्याने वागतील असे करा त्याप्रमाणे शहाजी-
जानी महाराजास सागितल्यावरून त्यानतर त्यानी विजापूरसरकाराशी आपण
ऊन विरोध केला नाही ह्या पितापुत्रान्च्या भेटीचे वर्णन पुढे स्वतंत्र
'गान करूं

ह्याप्रमाणे महाराजाच्या अगच्या शौर्यवीर्यादि गुणाचे अलौकिक तेज प्रगट
ऊन, प्रारभी जी गोष्ट दादाजी कोडदेवप्रभृति जनास असभाव्य व घोरपरि
मी अशी वाटली होती ती सुसाध्य आहे, एवढेच नव्हे तर वरीच साध्य झाली
हे, हे त्यानी स्वताच्या कर्तबगारीने सर्वाच्या प्रत्ययास आणून दिले, आणि
जापूरसरकाराचा हा एक लहानसा जाहगीरदार आहे असे पवरामोळा
ीपूर्वी कित्येक देशमुखास व मराठे सरदारास वाटे, तो आता इतका प्रबळ
ला की, त्या सरकारास अगदी हतवीर्य करून त्याच्याकडून प्रतिवर्षी तो खडणी
ं लागला, हे पाहून त्यास केवढे नवल वाटले असावे'

आता ह्या वेळी ह्मणजे स १६६२ पर्यंत महाराजाच्या ताब्यात किती मुलूख
ला होता याचे येथे दिग्दर्शन करू एवढ्या अवकाशात त्याच्या ताब्यात
'याणापासून गोव्यापर्यंत सगळी कोकणपट्टी आली होती ह्या एवढ्या मुलखाची
वी सुमारे तीनशे मैल होती भीमानदीपासून वारणानदीपर्यंत सगळा
कणघाटमाथा त्याच्या कबजात आला होता ह्या प्राताची लाबी सुमारें
.० मैल होती, व सगळ्या मुलखाची रुंदी सरासरी शंभर मैल होती.
प्रमाणेच त्याच्या जवळ ह्या वेळी पन्नास हजार पायदळ व सात हजार घोडे-
र होते हे सैन्य त्याच्या ताब्यातल्या मुलखाच्या मानाने अमळ अधिकच
ं परतु एवढे सैन्य ठेवणे त्याला अवश्य होतें, कारण त्याला स्वराज्य-
पना दोन प्रबळ पातशाहतींशी वैर करून करावयाची होती त्यापैकीं
ा पातशाहतीस तर त्यानी पूर्वोक्त प्रकारे चीत केले आता दुसरी जी
गल पातशाहत तिजशीं कसकसे वैर आरंभिले हा वृत्तात यथाक्रम सांगूं.

# भाग चवदावा.



## पितृदर्शन.

### १६६२.

महाराजांनीं विजापूरसरकारास हतवीर्य करून त्याच्याकडून आपले स्वातंत्र्य कबूल करविलें व त्याजवर वार्षिक खंड बसविला, हे वर्तमान शहाजीराजास कळले तेव्हा त्यास परम हर्ष झाला असावा यात काहीं शंका नाहीं अशा अद्वितीय पराक्रमी पुत्राची भेट घेण्याची उत्कंठा त्यास पुष्कळ दिवस लागून राहिली होती महाराज आपणाकडील हकीकत त्यास वारंवार पत्रे पाठवून कळवीत असत, व तेहि वेळोवेळा पत्रे पाठवून त्याचा गौरव व पुरस्कार करीत असत, परंतु हा सगळा पत्रव्यवहार अत्यंत गुप्तपणे होत असे कारण महाराजाच्या एकंदर कर्तृत्वात आपले अंग आहे असें विजापूरसरकारास कळूं न देण्याविषयीं शहाजीराजे फारच सावधगिरी घेत असत आपली कर्नाटकांतील दौलत कायम राखून साधल्यास तिकडे स्वतंत्र राज्य स्थापण्याचा त्याचा इरादा होता, हे मागे सागितलेंच आहे यास्तव विजापूरसरकारास आपला वहीम पुन न येऊं देण्याविषयीं ते फारच जपत पुढे त्या सरकाराचा आणि शिवाजीमहाराजाचा सलोखा झाला तेव्हा आपणास महाराष्ट्रात जाऊन येण्याची परवानगी सहज मिळेल असें वाटल्यावरून त्यानी त्या सरकारापाशी असा अर्ज केला कीं, 'आमच्या आराध्य देवतास आह्मी काहीं नवस वगैरे केले आहेत ते फेडण्यासाठी व त्या देवताचे दर्शन फार दिवस घडले नाहीं ते घ्यावयासाठी आह्मास महाराष्ट्रात एक वेळ जाऊन यावयाचे आहे तरी आह्मास तिकडे जाण्याची परवानगी मिळावी ' हा आपला अर्ज मंजूर व्हावा ह्मणून त्यानी आतून खटपटहि केली होती दरबाराने हा त्याचा अर्ज मंजूर करून त्यास असें फरमाविलें कीं, ' तुह्मी स्वदेशी जाता आहा तरी तुमचा पुत्र मोठा पुंड झाला आहे, त्याला बहुत प्रकारी बोध करून व युक्तिप्रयुक्तीनें समजावून पादशहाचे भेटीस आणावें. त्यानें तुमच्याप्रमाणें पादशहाची अमिरी स्वीकारून राहावे. तुमचा

बोध ऐकून तो आमच्या दरबारी येईल तर त्यास वजिरी सागून सर्व पादशाहत त्याच्या स्वाधीन करू. कसेंहि करून तो आमचा अंकित होईल असें राजकारण करा ’ यास शहाजीराजानी एवढाच जबाब पाठविला कीं, ‘ माझा पुत्र माझ्या स्वाधीन आहे किंवा कसें ते सरकारास विदित आहेच तरी पण मजकडून होईल तितका प्रयत्न मी करून पाहतो मला सरकाराच्या हिताचे तेच करणें आहे श्रीकुलस्वामिनीचे दर्शन घेऊन नंतर आपल्या कार्यासाठी पुत्राचीहि भेट घेतो त्याला बोधाच्या चार गोष्टी सागून पाहतो ’असें उत्तर शहाजीराजाकडून गेल्यावर त्यास पुन असें सागणे आले कीं, ‘ तुमच्याकडून होईल तो यत्न करून पाहा. न जमल्यास तुम्ही तरी परत आमच्याकडे या त्यास मिलाफी होऊं नका पुत्रलोभास वश होऊन तिकडेच राहूं नका. ’

त्याप्रमाणे पादशहाची परवानगी मिळाल्यावर राजे कर्नाटकातून स्वदेशी यावयास निघाले येताना आपले द्वितीय कुटुब व त्याच्या पोटी झालेला पुत्र व्यंकोजी यास बरोबर आणिले आपण येत आहो हे महाराजास पत्र पाठवून त्यानी कळविले होते ते प्रथम तुळजापुरास आले तेथे भवानीचे दर्शन घेऊन त्यानी पुष्कळ दानधर्म केला असें सागतात कीं, स्वराज्यस्थापना करून गोब्राह्मणाच्या पीडेचा परिहार करावा व स्वधर्मरक्षण करावे असा सदुद्देश धरून आपल्या पराक्रमी पुत्राने चालविलेल्या खटपटीस यश आल्यास लक्ष रुपयाचें सोने घेऊन त्याच्या मूर्ति वगैरे घडवून भवानीस अर्पण करूं, असा नवस शहाजीराजानी केला होता त्याप्रमाणे महाराजास बरेच यश आले असें पाहून राजानी सोने खरेदी करून त्याच्या चागल्या मूर्ति कर्नाटकातील कारागिराकडून तयार करवून ह्या वेळी बरोबर आणिल्या होत्या त्या देवीस यथाविधि अर्पण केल्या नतर त्यानी सिगणापूरचा महादेव, पंढरपूरचा विठोबा व शिखरशंभु-महादेव याचे दर्शन घेतले प्रत्येक देवस्थानी पुष्कळ दानधर्म केला, ब्राह्मण-भोजने घातली व गोरगरिबास खैरात केली

शहाजीराजे महाराष्ट्रात आल्याची खबर महाराजास कळताच त्यांनी त्यांच्या प्रत्येक मजलेस सर्व कांहीं तरतूद यथास्थित ठेविली शहाजीराजास जशी पुत्राच्या भेटीची रात्रंदिवस उत्कंठा लागली होती तशी महाराजासहि पितृ-दर्शनाची उत्कट इच्छा झाली होती. जिजाबाईस तर हा सोन्याचा दिवस वाटला. आता, ही भेट पुष्कळ वर्षांनी व्हावयाची तेव्हा अर्थात् चालीप्रमाणें ती देवा-लयात व्हावी असें ब्राह्मणाच्या विचारानें ठरले. हें देवालय जेजुरीचें नेमून

तेथे उभयतांनी यावें असा बेत झाला राजे जवळ आले असें पाहून महाराजानी आपली फौज, हत्ती, घोडेस्वार, कारकून वगैरे बरोबर देऊन सरनौबत यास सामोरा पाठविले आपण स्वत जेजुरीस जाऊन त्याची वाट पाहत राहिले त्याची स्वारी वाजतगाजत सामोरे गेलेल्या लोकासमवेत देवळात येऊन दाखल झाली मग देवाची यथासाग पूजा करून शहाजीराजानी जिजाबाई, शिवाजी-महाराज व त्याच्या दोन स्त्रिया याची विधिपूर्वक भेट घेतली तो विधि असा कीं, एक मोठे काशाचे ताट आणून त्यात तूप घातलें होतें ह्या तुपात त्या चौघाची मुखे शहाजीराजानी एकसमयावच्छेदेकरून अवलोकन केली हा विधि आटोपल्यावर महाराजानी परम प्रिय पित्याच्या चरणी मस्तक ठेविले त्यानी त्यास उचलन धरून प्रेमालिगन दिले दोघाच्याहि नेत्रातून प्रेमाश्रु चालले मग राजास पालखीत बसवून महाराज स्वत त्याचे जोडे हातात धरून मोठ्या मर्यादेने पालखीबरोबर अनवाणी चालले त्याप्रमाणे अत्यत आदराने त्यास डेऱ्याम आणून बिछायतीवर बसविले, आणि महाराज त्याचे जोडे तसेच हाती धरून त्याच्या समोर मोठ्या मर्यादेने उभे राहिले, व अति-नम्रतापूर्वक येणेप्रमाणे बोलले "महाराजाच्या आज्ञेचा भग करून विजापूरकराशी वैर केलें, त्यामुळे महाराजास फार क्लेश झाले, हे अतिशयित अनुचित होय पुत्राच्या करणीमुळे पित्यास प्राणसकट प्राप्त व्हावे हे खरोखरच अगदी वाईट याबद्दल मला मोठे दु ख वाटते हा मजकडून मोठा अपराध घडला आहे त्याबद्दल महाराजानी मला वाटेल ते शासन करावे " ह त्याचे भाषण ऐकून राजास अतिशयित गहिंवर आला ते सद्गदित होऊन त्याच्या नेत्रातून अश्रु-धारा चालल्या मग राजानी महाराजास पुन आलिगन देऊन मोठ्या आग्रहानें जवळ बसविले, व त्याची अनेक प्रकारी प्रशसा करून ते येणेप्रमाणें बोलले "तुह्मी शिसोदे क्षत्रियकुलात निर्माण होऊन त्या कुलास अनुरूप असा अप्रतिम पराक्रम केला, व हिन्दुप्रजेस यवनाच्या क्लेशप्रद सत्तेतून सोडवून स्वराज्य-स्थापन व स्वधर्मरक्षण करण्यासाठी भगीरथ प्रयत्न करून त्यात यशस्वी झाला, हें पाहून मला पराकाष्ठेचे समाधान व धन्यता वाटत आहे. आमच्या वडिलास असा दृष्टात झाला होता कीं, तुमच्या कुळात शककर्ता उत्पन्न होऊन तो हिंदुप्रजेचें व हिंदुधर्माचें यवनांपासून रक्षण करील हा दृष्टात खरा होता हे तुह्मीं आपल्या अलौकिक कर्तृत्वानें प्रत्ययास आणून दिलें. तुमच्या ठायींच्या शौर्यवीर्यादि अनुपम गुणाच्या योगानें आमच्या कुलाचा पुनरपि भाग्योदय

झाला आहे असा प्रतापशाली पुत्र आमच्या उदरी निर्माण झाला ह्मणून आह्मी त्रैलोक्यात धन्य झालों आहो " प्रिय पित्याचे असे स्तुतिपर व प्रोत्साहनप्रद भाषण ऐकून महाराजानी उठून त्याच्या चरणावर पुन मस्तक ठेविलें, आणि हात जोडून मोठ्या विनयाने असे ह्मटलें की, " मजकडून जें काहीं यत्किंचित झाले आहे तो सगळा महाराजाच्या चरणाच्या पुण्याईचा प्रताप आहे महाराजाचा पूर्ण आशीर्वाद होता ह्मणून मला माझ्या कार्यात थोडेसें यश आले आहे "

ह्याप्रमाणे त्या महाप्रतापी पितापुत्राचा प्रेमसवाद झाल्यावर महाराजानी तेथे आलेल्या आपल्या पदरच्या सर्व सरदाराच्या व कारभाऱ्याच्या भेटी करविल्या नंतर त्यानी तुकाबाईचे मोठ्या आदराने व सन्मानानें दर्शन घेतले, व्यकोजीसहि मोठ्या प्रेमाने आलिगन दिले शहाजीराजाबरोबर आलेल्या सरदाराच्या व कारभाऱ्याच्या महाराजानी भेटी घेतल्या ह्याप्रमाणे सगळ्याच्या भेटी होऊन त्याची हृदये प्रेमरसाने उचबळू लागली महाराजाच्या ठायीची अशी नि सीम व अलौकिक पितृभक्ति पाहून सर्वास पराकाष्ठेचे नवल वाटून ते त्याची अतिशयित वाखाणणी करू लागले महाराजानी ह्या आनंदोत्सवाप्रीत्यर्थ तेथे पुष्कळ दानधर्म केला, ब्राह्मणभोजने घातली व गरीबगुरिबास खैरात केली येथून पुढे त्यानी पुण्यास प्रयाण केले

शहाजीराजानी पुण्यास दोन महिने मुक्काम केला तेथे त्याचे व त्याच्या बरोबर आलेल्या सर्व लहानथोर लोकाचे महाराजानी बहुत प्रकारी प्रेमपूर्वक आदरातिथ्य व पाहुणचार केला राजाच्या सेवेत सर्वकाळ तत्पर राहून त्यास कोणत्याहि गोष्टीचे उणे पडू दिले नाहीं. स्वराज्यस्थापनेस आरंभ केल्यापासून घडलेल्या एकदर गोष्टीचे निरूपण स्वत केले नित्यश जो काहीं राज्यकारभार पाहणे तो त्याच्या विचारे व त्याच्या नावे चालविला शहाजीराजास हे वर्तन पाहून अतिशयित समाधान वाटे असा शूर, पराक्रमी व शहाणा पुत्र आपल्याशी अतिनम्रतेने वागून आपल्या अर्ध्या वचनात राहण्यास सर्वदा तत्पर आहे असें पाहून त्यास किती तरी आनंद व धन्यता वाटली असावी ! महाराजानी आपली सर्व दौलत राजास दाखविली, ती पाहून तर ते अतिशयित थक्क झाले एवढ्या अल्प अवकाशात एकाद्या सार्वभौम नृपतीस शोभेशी सपत्ति मिळविल्याबद्दल त्यांची राजानी तारीफ केली

शहाजीराजानी कर्नाटकातून येताना काहीं उत्कृष्ट तरवारी तयार करवून आणिल्या होत्या. त्या त्यांनी महाराजास दिल्या, व त्याच्या अप्रतिम

पराक्रमानें स्वतास परम संतोष झाल्याचे सूचक ह्मणून आपल्या हातांतील एक बहुमोल तरवार खुद्द त्यास दिली तिचा महाराजानी परम पूज्य बुद्धीनें स्वीकार करून ती आपल्या प्रिय व महाप्रतापी पित्याच्या हातची यशस्वी तलवार जाणून तिचें नाव तुळजा असें ठेविले, व ती भवानीतरवारीजवळ नित्य पूजेस ठेविली

महाराज आपल्या वडिलाच्याच बरदास्तीत नेहमी निमग्न असत. त्यानी एवढ्या अवकाशात कोणत्याहि प्रकारच्या राजकारणात किवा मोहिमेत बिलकुल मन घातलं नाहीं एकाद्या सामान्य सेवकाप्रमाणे ते त्याच्या सेवेत सर्वदा तत्पर असत आता, ते आपल्या पित्याचीच तेवढी बरदास्त करून राहिले नाहींत, तर आपली सावत्र माता तुकाबाई हिचीहि सेवा त्यानी मोठ्या आदराने केली जिजाबाईमातुश्रीशी जसें त्याचे प्रेमाचे व आदरशीलतेचे वर्तन असे तसेंच तुकाबाईशीहि ते वर्तन करीत तिच्या तैनातीस चागली हुशार माणसे ठेवून तीस सर्व गोष्टींची अनुकूलता करून दिली तिला व व्यंकोजीला जे जे काहीं हवें असे ते ते त्यास तत्काळ मिळण्याची व्यवस्था नीटपणे होत आहे की कसे याची ते नित्य चौकशी ठेवीत, व आपण स्वत तुकाबाईपाशी वारवार जाऊन तिच्यापुढे हात जोडून उभे राहत, आणि काहीं आज्ञा आहे काय ह्मणून विचारीत

नतर महाराजानी राजास अशी सविनय विनंति केली कीं, "महाराजानी थोडी तसदी घेऊन मुख्यमुख्य किल्ल्याची व्यवस्था कोणत्या प्रकारे ठेविली आहे ती प्रत्यक्ष पाहावी त्याप्रमाणे राजे काहीं किल्ले पाहावयास गेले अर्थात् महाजांनी त्याच्याबरोवर जाऊन त्यास प्रत्येक किल्ल्याची व्यवस्था दाखविली, व तो कसा प्राप्त झाला ती हकीगत निवेदन केली काहीं नवे किल्ले बाधिले होते त्याची रचना कोणत्या प्रकारे केली होती ते त्यास दाखविले प्रत्येक ठिकाणची व्यवस्था पाहून राजानी ज्या काहीं सूचना वगैरे केल्या त्या महाराजानी चित्त देऊन ऐकून घेतल्या राजास प्रतापगडावर नेऊन तो किल्ला, भवानीचें देवालय व ज्या बुरुजापाशी अफझुलखानाचा वध केला होता, तें स्थल महाराजांनीं त्यास दाखविलें, व त्या वेळी कोणकोणत्या हिकमती योजिल्या होत्या त्याचें त्यास सविस्तर कथन केले ह्याप्रमाणें किल्ल्याची पाहणी करीत असता प्रत्येक किल्लेदार, सरदार व कामदार याच्या राजाशीं भेटी करविल्या. शेवटीं पन्हाळागडावर गेल्यावर शहाजीराजांनीं

परत कर्नाटकांत जावयाचा आपला मानस महाराजास कळविला तो समजून त्यास फार वाईट वाटले त्यानी महाराष्ट्रातच राहून संपादिलेल्या राज्याची व्यवस्था पाहावी अशी महाराजाची इच्छा होती, व ती त्यानी त्यास अनेक वेळा बोलूनहि दाखविली होती त्यावर राजाचें ह्मणणे असे पडले कीं, "मी तुमच्या मायेस गुतून इकडे राहिलो तर तिकडे संपादिलेली दौलत सारी यवनाच्या हाती नाहक जावयाची दुसरें असे की, मी कर्नाटकातील जाहगीर सभाळून राहिल्याने तुमच्या पुढील क्रमास अनेक प्रकारी साहाय्य होऊन सर्व भरतभूमि आक्रमण करण्याचा व यवनास स्वदेशातून हाकून देण्याचा तुमचा संकल्प शेवटास जाण्याचा संभव विशेष आहे" हे सयुक्तिक कारण ऐकून महाराजानी आपला आग्रह सोडिला, आणि वडिलाची रवानगी करण्याच्या तयारीस ते लागले पन्हाळ्यावर पुन राजाबरोबर आलेल्या एकंदर लोकास मोठ्या थाटाच्या मेजवान्या केल्या निरनिराळ्या ठिकाणच्या गुणी जनास बोलावून आणून त्याची करमणूक करविली त्यास त्याच्या दरज्याप्रमाणे जवाहीर, वस्त्रे वगैरे दिली त्याचा मुख्य कारभारी त्र्यबक नारायण हणमते यास उंची पोषाख व जवाहीर देऊन ढालतलवार बक्षीस दिली खुद्द शहाजीराजे, तुकाबाई व व्यंकोजी यास नाना परीच्या अपरूप चिजा नजर केल्या याशिवाय त्यास कोणत्या वस्तु हव्या ते विचारून घेऊन त्या त्यास आणून दिल्या पोषाख, जवाहीर, हत्ती, घोडे वगैरे पुष्कळ देऊन आणखी वाटखर्चासाठीं पुरेसा खजिना व सरजाम त्याच्याबरोबर दिला

ह्याप्रमाणे जाण्याची तयारी झाली तेव्हा ह्या परम योग्य पितापुत्रास अतिशयित गहिंवर आला महाराज तर फारच कष्टी झाले यवनाच्या ताबेदारीत किती क्लेश व संकटे आहेत याचा पुन पुन प्रत्यय आल्यामुळे तिचा त्याग करण्यातच वास्तविक सौख्य आहे असा त्याचा अभिप्राय झाला असल्यामुळें आपल्या प्रतापशाली पित्याने तिचा अखंड स्वीकार करून राहावे हे त्यास मनापासून आवडत नव्हते, परंतु ह्या ताबेदारीचा अंगीकार करून राहण्यात आपला कोणता हेतु आहे तें राजानी दर्शविल्यावरून महाराज निरुत्तर झाले तरी त्याच्या तावडीत त्यानी अशा वृद्धापकाळी आपण होऊन जाऊन पडावे हे त्यास कसेंसेंच वाटलें परंतु नाइलाजास्तव त्यास वडिलांची पाठवणी करणें भाग पडलें. राजे निघते वेळी महाराजानी त्याच्या पदरच्या लोकास पुन्न पुन. विनवून सांगितलें कीं, "थोरले महाराज वयोवृद्ध झाले आहेत. त्यांच्या जीवास मनापासून जपा. मी तिकडे

लवकरच यांच्या दर्शनास येणार आहे त्या वेळी तुमच्या नोकरीबद्दल तुह्मास मी योग्य पारितोषिक देईन ”

असें सागतात कीं, महाराजानी ह्या वेळी आपल्या तीर्थरूपापाशी असें कबूल केलें कीं, आपण हयात आहा तोपर्यंत विजापूरसरकाराच्या उरलेल्या मुलखास मी उपद्रव करणार नाहीं शहाजीराजानी विजापुरास जाऊन बादशहाची मुलाखत घेतली व शिवाजीमहाराजाकडून स्वतास मिळालेले हत्तीघोडे व जवाहीर हीं, त्यानी पाठविलेला नजराणा ह्मणून, बादशहास अर्पण केली, व हजरतीनें फरमाविलेले काम फत्ते करून आलो असे सागून त्याचा निरोप घेऊन ते कर्नाटकात निघून गेले

ह्यानतर शहाजीराजे आपल्या प्रिय व सुशील पुत्राचे आणखी पराक्रम व कीर्ति ऐकावयास फार दिवस जगले नाहीत, व ही त्याची भेटहि शेवटचीच झाली महाराष्ट्रातून परत गेल्यावर दोन वर्षानी त्याचे देहावसान झाले हा मृत्यु त्यास कसा अवचित प्राप्त झाला हे मागे त्याच्या वृत्तात कथन केले आहे. ही पितृनिधनवार्ता ऐकून महाराज शोकसागरात बुडाले ‘ आजपर्यंत आपल्या शिरावर वडील असून त्याच्या हिमायतीवर यवनाशी वैर आरभिलें ते हा लोक सोडून गेल्यानें आपण केवळ निराधार झालो आपण केलेले पराक्रम ऐकून ज्यास खरा अभिमान व सतोष वाटावयाचा, व ज्याच्या तोंडून गौरवाचे शब्द आल्यानें आपल्या चित्तास समाधान, उत्साह व धन्यता हीं वाटावयाची, ते आपले परम प्रिय वडील आपणास सोडून गेले ’ असे खेदोद्गार काढून ते परम कष्टी झाले जिजाबाईमातुश्रीस अनावर शोक झाला. ती सती जावयास सिद्ध झाली तेव्हा तर महाराजास आकाशपातळ एक झाले तीर्थरूप गेले आणि मातुश्रीहि सोडून चालल्या हे पाहून त्यास अतोनात दु ख झालें. तिच्यापाशी अगदी दीनपणें बसून तिची त्यानी नाना प्रकारी समजूत घातली. तरी ती साध्वी ऐकेना तेव्हा तिचे पाय घट्ट धरून ते एकसारखे रडत बसले, काहीं केल्या पाय सोडिनात हा आकात पाहून मोरोपंत, निराजीपंत, दत्ताजीपंत वगैरे कारभारी जवळ होते त्यानीं पदर पसरून मातुश्रीची अशी विनवणी केली कीं,‘आपण अग्निप्रवेश केल्यावर महाराज काहीं प्राण ठेवणार नाहींत. संपादिलेलें राज्य आजच लयास जाण्याचा प्रसंग आला शिवाजीमहाराज व थोरले महाराज याचें नाव मागे राहत नाहीं. ह्या गोष्टीकडे नजर देऊन महाराजास ओसंगी घ्यावे. मन घट्ट करून राहावें हेका धरून सती गेला तर वंश-

क्षय केला ही अपकीर्ति जगांत होईल ' ह्याप्रमाणें सर्वांनी सात्वन करून आग्रह केल्यामुळें केवळ पुत्रप्रेमास्तव तिने आपला विचार सोडला.

संप्रदायाप्रमाणें तीर्थरूपाची उत्तरक्रिया करून लक्षावधि रुपयाचा दानधर्म महाराजानी केला शहाजीराजाचा अत जेथें झाला त्या बंदेकीरे[1] गावी पुष्कळ पैसा खर्चून छत्री बाधिली, व तिची पूजार्चा नियमानें चालावी ह्मणून पारिपत्यगार नेमून विजापूरसरकाराकडून कांहीं गांव घेऊन त्याचें उत्पन्न तेथल्या खर्चास लावून दिले, हे मागें सागितलेच आहे

१. बेदिकेरे बेदगिरि व बादगिरि असे ह्या नावाचे आणखी पाठ इतरत्र आढळतात. [. ४९ पाहा.

# भाग पंधरावा.



## आरमार व समुद्रांतील किल्ले.

कोंकणपट्टी काबीज केली ती आपल्या हातीं निर्वेधपणे राहावी यासाठी महाराजांनी त्या प्रांतांत उपद्रव करणाऱ्या बहुतेक पुंडाचा नायनाट केला किंवा त्यास आपले अंकित करून ठेविले. परंतु एका यवन सरदाराच्या उपसर्गास त्यास अद्यापि आळा घालितां आला नव्हता. जंजिऱ्याच्या शिद्दीशी अनेक वेळां युद्धप्रसंग करून त्याचा बराच मुलूख त्यांनी हस्तगत केला होता, व तेथें नवे किल्ले बांधून त्यांत आपली कायमची ठाणीं वसविली होतीं. परंतु त्याचा जंजिरा फार मजबूत असून त्यास त्याच्या आरमाराचा आश्रय असल्यामुळे तो महाराजांच्या हातीं येईना. त्याचें आरमार नेहमीं समुद्रांत फिरत असून संधि साधेल तेव्हां महाराजांच्या ताब्यांतील किनाऱ्यांवरच्या गांवांस वारंवार त्रास देत असे. जमिनीवरून त्याच्या किल्ल्यांत दाणावैरण वगैरे सामुग्री जाण्याचें बंद करून त्यावर हवे तितके दिवस मारा करीत राहिलें तरी त्यास तो जुमानीत नसे. आरमाराच्या साहाय्यानें त्याला दूरच्या बंदरांतून लागेल ती सामुग्री आणवितां येत असे. त्यामुळे किल्ला हवे तितके दिवस लढविण्याचें सामर्थ्य त्यास प्राप्त झालें होतें. जंजिरा हातीं आल्यावांचून त्याचा त्या किनाऱ्यावरील उपद्रव नाहींसा होत नाहीं हे लक्षांत येऊन महाराजांनी असा विचार केला कीं, शिद्दीचें सगळें बळ काय तें आरमारांत आहे, तेव्हां त्याच्या सारखें आपलेंहि आरमार असावें, म्हणजे त्याच्याशी आपणास पाण्यांतून युद्ध करितां येऊन जंजिरा सहज हस्तगत होईल, व त्याचें आरमार आपल्या प्रांतास उपद्रव द्यावयास आलें असतां त्यास आपल्या आरमाराच्या साहाय्यानें हुसकून लावितां येईल. त्याप्रमाणेंच शिद्दी जो आज इतका गबर झाला आहे तो समुद्रांतून होणाऱ्या व्यापारावर आरमाराच्या साहाय्यानें त्यास शह ठेवितां येतो म्हणून होय. व्यापाऱ्यांची जहाजें लुटून त्यास महामूर धन मिळवितां येतें व नवे लोक व नवीं जहाजें त्यास मिळवितां येतात. यास्तव अशा

प्रबळ शत्रूशीं आपणास लढावयाचें म्हणजे त्याच्यासारखे आपलेंहि आरमार अवश्य असलें पाहिजे

असा विचार करून त्यानी चोहोकडून कारागीर आणविले व लहानमोठीं चार-पाचशे जहाजे तयार करविली त्याची नावे त्याच्या आकारमानाप्रमाणें निर-निराळी ठेविलीं ती नावे येणेप्रमाणे होतीं गुराबा, तराडी, गलबते, दुबारे, शिबाडे, महागिऱ्या, पडाव, मचवे, बाथोर, तिरकटी, पाल इ० हीं तयार करावयास सुमारे दहा लाख रुपये खर्च झाला त्यावर तोफा वगैरे लढाऊ सामान चढवून ती सज्ज केली, व त्यावर राहून लढणारे लोक पुष्कळ तयार केले कोळी, चाचे,[1] भडारी वगैरे जे लोक जहाजे चालविण्याच्या कलेत निष्णात असून ज्यास पश्चिम किनाऱ्याची माहिती चागली होती असे लोक जिकडून तिकडून आणवून त्यास ह्या जहाजावर ठेविले ह्या आरमाराचे सेनाधिपत्य मायनायक[2] भंडारी व दर्यासारग अशा दोन सरदारास दिले होते पुढे कांहीं मुसलमान खलाशीहि त्यानी आपल्या जहाजावर ठेविले हबसानच्या शिद्दीवर नाराज होऊन मिस्री व दौलतखान असे दोघे सरदार महाराजाच्या आरमारा-वर नोकरीस राहिले

ह्याप्रमाणे आरमार तयार होऊन ते समुद्रात जिकडेतिकडे फिरूं लागले, आणि त्याने मोगलाई, फिरगी, वलंदेजी, फराशीस व इग्रज तारवावर हल्ले करून तीं लुटण्याचा सपाटा चालविला ह्यामुळे महाराजास नाना प्रकारच्या वस्तु मुब-लक मिळू लागल्या, व आरमाराचा अवाढव्य खर्च बाहेरच्या बाहेर भागू लागला. हबशाला चागलीच दहशत पोचली तो आपणास इतके दिवस समुद्राचा राजा म्हणवी, त्याला असा जबरदस्त रिपु निर्माण झाला त्याच्या व महाराजाच्या आरमाराच्या चकमकी वारवार झडू लागल्या फिरगी, इग्रज वगैरे व्यापाऱ्यास

१ हे चाचे बहुश कोळी व भडारी असत याचा इग्रज वगैरे युरोपीय व्यापाऱ्यास मोठा धाक असे याची वस्ती पश्चिम समुद्राच्या तीरावरील खेड्यातूनच बहुत करून आढळते.

२ मायनायक म्हणजे पाण्यावरचा नायक माय हा अरबी भाषेत पाण्याला शब्द आहे. दर्या हा पर्शिअन भाषेत समुद्राला शब्द आहे, आणि सारग म्हणजे कप्तान किंवा सरदार. कोणी म्हणतात कीं, दर्यासारग मुसलमान होता परतु तो हिंदूच असावा असें दुसऱ्याचें म्हणणे आहे. ( रा. राजवाड्याचे आठवें खड पृ २७ व तारीख-इ-शिवाजी पाहा. )

मोठी दहशत वाटून आपलीं जहाजे समुद्रातून सुरक्षितपणे जावी यावीं यासाठी ते महाराजास वार्षिक खंड देऊं लागले ह्याप्रमाणें महाराजाची सत्ता पश्चिम-समुद्रावर हळूहळू बसत चालली व शिद्दीचे महत्त्व कमी होत गेले

आपल्या आरमारास निवाऱ्याच्या जागा मिळाव्या म्हणून त्यानी समुद्रकिनाऱ्याच्या कित्येक किल्ल्याची दागदुजी करण्याचे मनात आणिले. कुलाबा किल्ला नवीचा होता तो ताब्यात घेऊन त्याची चागली दुरुस्ती केली, व हे आरमाराचे मुख्य ठाणें केले सर्व ठिकाणच्या जहाजाची झडती तेथ होत असे त्याप्रमाणेच सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग वगैरे किल्ल्याची दागदुजी करून ते चागले मजबूत केले ह्या सर्व किल्ल्याच्या आश्रयाने त्यानी आपले आरमार नेहमी जय्यत ठेविले ह्या सर्व ठिकाणच्या आरमाराने व्यापाऱ्याच्या किंवा मक्केस जाणाऱ्या यात्रेकरूच्या जहाजावर हल्ले करून मिळविलेल्या लुटीचा हिशोब कुलाबाकिल्ल्यापाशी मुख्य ठाण्यास जाऊन द्यावा अशी व्यवस्था केली

फिरग्यानी जेव्हा पाहिले कीं, महाराजाच्या आरमारापुढे आपला निभाव न लागून येथून उठावा होतो, तेव्हा त्यानी महाराजाकडे आपला वकील पाठवून स्नेहाचे बोलणे लाविले त्यावरून महाराजानी त्याच्याकडून काहीं तोफा, दारूगोळा व इतर लटाऊ सामान प्रतिवर्षी देण्याचे कबूल करून घेऊन त्यास उपद्रव द्यावयाचा नाहीं असा करार केला हा करार ते त्याजकडून प्रतिवर्षी नवा करून घेत असत इग्रजाशींहि त्याचा असाच करार झाला होता, असे कित्येक ठिकाणी लिहिलेले आढळते

महाराजानी स्वत ह्या आरमारावर मुख्य होऊन कधी मोहिमा केल्या नाहींत. एकदा मात्र बार्सिलोर शहर लुटावयास जाताना ते जहाजात बसून गेले व तसेच जलमार्गाने परत आले परतु हा प्रवास त्याला फारच त्रासदायक वाटला. एक तर त्यास व त्याच्या फौजेतील पुष्कळ लोकास समुद्र लागला व ते त्यामुळे फार हैराण झाले व दुसरे असें की, तुफानात सापडून केव्हा काय प्रसग गुदरेल याचा नेम नाही व पाण्यातला प्रवास काहीं हुकमी नाहीं; वारा जसा अनुकूळ किंवा प्रतिकूळ लागेल तसा तो कमीजास्त दिवसानी सपावयाचा, ह्याप्रमाणे अफाट समुद्रात अडकून राहिल्याने आपल्या राज्यातील हालहवाल कळण्याचा मार्ग अजीबात खुटतो, हे महाराजाच्या चागले प्रत्ययास आले, आणि त्यानी पुन कधीहि जलप्रवास केला नाहीं.

महाराजाच्या आरमाराची यादी चित्रगुप्ताने दिली आहे ती खरी मानि-ल्यास त्यांत थोर गुराबा ३०, गलबतें १००, महागिऱ्या १५०, लहान गुराबा ५०, होड्या १०, लहान होड्या १५०, तारवे ६०, पाल २५, जुग १५, मचवे ५०, एवढी होती इंग्रज लोकांनी त्याच्या आरमाराच्या याद्या वेळोवेळा लिहून ठेविलेल्या आढळतात त्यावरून पाहता महाराजाचें आरमार कारवारापाशीं गेलें तेव्हा त्यांत एक डोलकाठीची तीसपासून एकशें पन्नास टनपर्यंत वजनाची ८५ जहाजें, व तीन मोठी जहाजें होतीं पुढे मुंबईचे इंग्रज शिद्दीशी सलोख्यानें वागू लागल्यावरून त्यास दहशत पडावी ह्मणून महाराजांनीं एकशें साठ जहाजें मुंबईच्या बॅकबेसमोर नेऊन उभी करविली होती असा तेथील इंग्रजाचा लेख आहे

हे असें आरमार तयार करून मोगल, शिद्दी, फिरंगी, इंग्रज, डच वगैरे लोकांच्या पश्चिम किनाऱ्याजवळून जाणाऱ्यायेणाऱ्या जहाजाला शह देऊनच महाराज राहिले नाहीत, तर त्यांच्यासारखा आपणहि परदेशाशीं स्वतंत्रपणें व्यापार सुरू करण्याचा त्यांचा इरादा होता असें त्या वेळच्या सुरत, कारवार वगैरे ठिकाणच्या इंग्रज व्यापाऱ्यांच्या लेखावरून स्पष्ट दिसतें उत्तर कोंकणच्या किनाऱ्यावरील बंदरें त्यांच्या ताब्यात आल्यावर त्यांनी हा व्यापार सुरू केला असें दिसून येतें राजापूर येथें अफझुलखानाचीं जी जहाजें त्यांनीं हस्तगत केलीं त्यांचा उपयोग त्यांनीं ह्याच कामाकडे केला सुरतच्या इंग्लिश व्यापा-ऱ्याचा स १६६३ तला असा लेख आहे कीं, शिवाजीमहाराज अरबस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील मोकाबंदरास पाठविण्यासाठीं दोन मोठीं जहाजें जैता-पूरच्या बंदरांत सज्ज करवीत होते पुढे स १६६५ तला त्या व्यापाऱ्याचा असा उल्लेख आहे की, महाराज आपल्या ताब्यातल्या आठनऊ मोठ्या बंदरांतून प्रति वर्षी दोनदोन तीनतीन जहाजें इराण, बसरा, मोका वगैरे बंदराशी व्यापार करावयास पाठवूं लागले ह्याच व्यापाऱ्याचा स १६६९ सालचा असा लेख आहे कीं, महाराजाची तांदूळ वगैरे भरलेली कित्येक व्यापाराचीं जहाजें कारवारच्या किनाऱ्यापाशीं वादळांत सापडून नाश पावलीं[१]

हे आरमार मुख्यत्त शिद्दीच्या आरमाराशी टक्कर देऊन त्यास हतवीर्य करण्यासाठीच तयार केलें होतें, व त्यांच्याशीं समुद्रांत अनेक वेळा युद्धप्रसंग झाले असावे परंतु त्यांचें वर्णन केलेलें कोठेंहि आढळत नाहीं शिद्दीचा

१ प्रा सरकार पृ ३३८.

जंजिरा काबीज करण्याचा जो उद्देश तो मात्र बहुतेक सिद्ध झाल्यासारखा होता, परतु पुढे त्याने विजापूरकराची ताबेदारी सोडून मोगलांचा आश्रय केल्यामुळे त्यास बरेंच साहाय्य होऊन तो उद्देश शेवटी असिद्धच राहिला शिद्दीचा जंजिरा आपल्या ताब्यात येत नाहीं तर त्यासारखा आपण एक जंजिरा बाधावा असे मनात येऊन महाराजानी आपल्या ताब्यातील समुद्रकिनाऱ्याची पाहणी केली, व मालवणचा किनारा अशा किल्ल्यास सोईचा आहे असें पाहून तेथे तो बाधण्याचा निश्चय केला हा जंजिरा येथे बाधण्याचा आणखी असा उद्देश होता कीं, गोव्याच्या फिरग्यांनी काहीं गडबड केल्यास त्याच्यावर जरब ठेवणे सोपे जावें, त्याचप्रमाणे वाडीच्या सावंताचीहि काहीं जहाजे असून ते व्यापाऱ्याची जहाजे लुटीत, तेव्हा त्या सावतानी काहीं गडबड केल्यास त्याच्यावरहि हवा तसा दाब ठेविता यावा

वर सागितल्याप्रमाणे पाण्यात किल्ला बाधावयाचें ठरल्यावर जेथे तो बांधावयाचा तेथला तळ कसा काय आहे व आसपास पाण्यातला मार्ग कोठून कसा आहे याचा तपास करण्याचे काम महाराजानी काहीं कोळ्यास सागितलें त्यानी मोठी मेहनत घेऊन व जिवाची परवा न करून एकदर जागा नीट पाहिली, व ही माहिती महाराजास मोठ्या इमानानें दिली ह्या त्याच्या कामगिरीबद्दल त्यास महाराजानी मोठें बक्षीस दिले, त्यास आपल्या जहाजावर ताडेलाच्या नोकऱ्या दिल्या, व एका गावाचे वतन त्यास वंशपरपरा करून दिलें

नंतर उत्तम मुहूर्त पाहून गणेशपूजन व समुद्रपूजन केलं, ब्राह्मणभोजनें घातलीं, समुद्रास शंभर होनाची दक्षिणा, पचखाद्यें, फळफळावळ, सुवर्णाचे श्रीफळ, वस्त्रे, मंदिल व चादर हीं अर्पण केलीं ह्याप्रमाणे पूर्वविधि करून किल्ल्याच्या कामास आरंभ केला पाचशे पाथरवट व दोनशे लोहार जमा करून आणिले दोनशे खंडी लोखंड खरेदी करून टाक्या, हातोडे, पहारा, अड्ड वगैरे विखणें घडविली चिरे काढून टाकी लावून तयार करविले. पाच खडी शिसे खरेदी करून किल्ल्याचा पाया भक्कम घातला चुना चागला पक्का करावयासाठी चागले हुशार पाथरवट, कामाठी, कोळी वगैरे लोक जमविले. एकंदर तीन हजार माणसांचा जमाव झाला. त्यास जहाजात घालून व सर्व मालमसाला बरोबर देऊन समुद्रात नेऊन ठेविले. आपलें बरेंच आरमार ह्या जागेच्या आसपास ठेवून त्यावर तोफा, दारूगोळा वगैरे युद्धोपयोगी सामानाची मुबलक तरतूद केली. किनाऱ्यावर पाचहजार मावळे लोकाची चौकी ठेविली. गोवेंकर

फिरंग्यांशीं ह्या वेळीं तह झाला असून त्यास ह्या कामांत हरकत करण्याचें धैर्य मुळींच नव्हतें त्याप्रमाणेंच सावंतहि ह्या वेळीं महाराजाचे अंकित झाले होते, यास्तव त्याच्याकडूनहि कांहीं अडथळा होण्यासारखा नव्हता जी कांहीं भीति होती ती शिद्दीच्या व मोगलाच्या जहाजाची परतु हा किल्ला बाधून होईपर्यंत त्याच्याकडून काहींहि हरकत झाली नाहीं असें दिसतें

महाराज स्वत आपल्या हातानें येथे काहीं दिवस काम करीत होते असें ह्मणतात एकंदर कामावर पहिल्यापहिल्यानें त्याची देखरेख होती, व किल्ला कसा बाधावा आणि तो पाण्यांत पक्का पायाशुद्ध उभारण्यास काय युक्ति योजाव्या ह्या संबंधाची सगळी कल्पना त्याची स्वताचीच होती इमारतीचा पाया मजबूत होऊन वरील भितीचे काम चालू झालें तेव्हा महाराजानी पुढल्या कामावर देखरेख करण्यास गोविद विश्वनाथ प्रभु सुभेदार यास ठेविले, व आपण रायगडावर निघून गेले. हा किल्ला पुरा व्हावयास तीन वर्षे लागलीं. सर्व काम पुरें झाल्यावर महाराज ही इमारत पाहावयास पन्हाळयावरून बावड्याच्या घाटानें मालवणास आले प्रवेशविधि सुमुहूर्तावर केला पाच हजार ब्राह्मणाचें भोजनादिकेंकरून तर्पण केलें सर्व लोकास शर्करा वाटली प्रवेश करिताना आरमारावरच्या तोफाची सरबत्ती झाली पाथरवटाच्या मुकादमास वस्त्रे व सोन्याचीं कडी इनाम दिलीं ह्या कामासाठीं गोवेकरानी शभर कसबी लोक दिले होते त्यांस नावाजून त्याच्या कप्तानास भरजरी वस्त्रे व सोन्याचीं कडी दिलीं गोविद विश्वनाथ प्रभु यास शाबासकी देऊन झगा, मंदिल, भरजरी चादर, मोत्यांचा तुरा, चौकडा, सोन्याची कडीं व तलवार हीं इनाम दिलीं

ह्या जंजिऱ्याचें नाव महाराजानीं सिधुदुर्ग असें ठेविलें हा दुर्ग बाधावयाला एक कोटि होन खर्च झाले असे ह्मणतात ह्या किल्ल्यावर तीन हजार मावळे लोक ठेवून त्यावर एक मामलेदार नेमिला ह्या मावळ्यापैकीं जे हुशार होते त्यांस नाईक, सरनाईक व तटसरनोबत असे हुद्दे दिले किल्ल्यावर पाण्याचा मारा होऊं नये ह्मणून पाण्यात एक मोठा बुरूज बाधून त्याचें नांव दर्याबुरूज असें ठेविलें [1] याशिवाय आणखी अजनवेली, रत्नागिरि, पद्मदुर्ग, सरजाकोट, गहनदुर्ग, खाकेरी व राजकोट असे जंजिरे महाराजांनी बांधिले असें ह्मणतात.

१ ह्या किल्ल्यांत एके ठिकाणीं महाराजाचीं पावलें उमटली होती असें मानून त्यावर एक देऊळ बाधिलें आहे. त्यांत महाराजाची मूर्ति ठेविली असून तिची पूजा नित्य होत असते. ही पूजा करणारांस हल्लीं कोल्हापूरसरकाराकडून नेमणूक आहे.

हा जंजिरा बांधूनहि शिद्दीस ह्मणण्यासारखा शह बसेना, व मुंबईच्या बंदरा-नजीक असलेल्या महाराजाच्या ताब्यातील प्रातास शिद्दीचा फार त्रास होऊ लागला, व त्यास इंग्रजाचीहि थोडीबहुत अनुकूलता दिसू लागली, तेव्हा मुबई बेटापासून बारा मैलाच्या अतरावर खांदेरी व उंदेरी अशी दोन खडकाळ बेटे आहेत ती कबजात घेऊन त्यावर किल्ले बाधण्याचा बेत महाराजानीं केला हा बेत त्यानी कोणत्या प्रकारे सिद्धीस नेला याची सविस्तर हकीकत पुढे एका स्वतत्र भागात द्यावयाची आहे[1]

ह्याप्रमाणे आरमार तयार करून व पाण्यात किल्ले बाधून शिद्दी, फिरगी इंग्रज, मोगल व मुसलमान याच्यावर पुरा शह बसविण्याचा व मुसलमान आणि मोगल याच्या सत्तेवर चोहोकडून घाला घालण्याचा महाराजाचा सकल्प ते अल्पायु झाल्यामुळे तसाच असिद्ध राहिला समुद्रावर पुरी सत्ता बसवून सर्व व्यापाराची किल्ली आपल्या हातात ठेवावयाची व आपल्या ताब्यातील मुलखास शत्रूकडून कोणत्याहि बाजूने त्रास होऊ द्यावयाचा नाही असा त्याचा इरादा होता परतु त्याच्या पश्चात् हे धोरण कोणालाहि न कळून हे आरमार पुढे हळूहळू नष्टप्राय झाले

---

१ अठ्ठाविसावा भाग पाहा.

# भाग सोळावा.



## मोगलांच्या राज्यांत स्वाऱ्या व शास्ताखानाची मोहीम.

## १६६०–६३.

औरंगजेब दक्षिणेतल्या सुभ्यावर असता महाराजानी त्याच्या ताब्यातील जुन्नर, औरंगाबाद वगैरे प्रातात धामधूम केली होती, परतु पुढे विजापूरकराशी तह करून औरगजेब त्याच्यावरील मोहिमेतून मोकळा झाला तेव्हा त्याचा मोरचा आपणावर फिरेल ह्या भीतीने महाराजानी आपल्या अपराधा बद्दल त्याजकडे क्षमा मागून त्याचा अकित होण्याची त्याला लालूच दाखविली इतक्यात शहाजहान आजारी पडल्याची वार्ता ऐकून तो दिल्लीकडे जावयास निघाला तेव्हा महाराजानी शहाजीराजास पूर्वी मिळालेल्या जहागिरीचा काहीं भाग मोगलानी हस्तगत केला होता त्याची त्याजकडे मागणी केली, आणि अदिलशहाच्या ताब्यातील कोकणप्रात काबीज करण्याची मुभा मागितली ह्या त्याच्या मागण्याचा स्पष्ट जबाब औरगजेबाने न देता आबाजी सोनदेवास आपल्या दरबारी पाठवावयास सागितले पुढे औरगजेबाने स्वबधूशी विरोध करून व स्वपित्यास बंदीत टाकून दिल्लीचें तक्त बळकाविल्यावर तिकडे अनेक राजकारणे उपस्थित होऊन त्यातच तो गुतून पडल्यामुळे त्याला दक्षिणेकडे लक्ष द्यावयास मुळीच फावले नाहीं तरी महाराजानी अफझुलखानाचा वध करून विजापूरकराच्या सेनेचा पुरा धुव्वा उडविला, हे वर्तमान औरगजेबाला पोचलें तेव्हा त्यानें ह्या विजयाबद्दल त्यास अभिनदनपर पत्र पाठविले असें ह्मणतात: परंतु ह्याच समयी त्या कावेबाज बादशहाने अदिलशहाला पत्र पाठवून असें फर्मांविलें होते कीं, शिवाजीची चागली खोड मोडावयास आळस करूं नका औरंगजेबानें आपल्या राज्यारोहणाचा पहिला वार्षिक उत्सव केला त्या समयीं महाराजांनी त्याचें अभिनंदन करण्यासाठी आपला वकील त्याच्या दरबारी पाठविला व आपली पूर्वोक्त मागणी पुनरपि केली तीस त्यानें असा जबाब दिला ह्मणतात कीं, देवाच्या कृपेनें मी आतां आपल्या सगळ्या शत्रूंस जिंकून आपले

सगळे मनोरथ सिद्धीस नेले आहेत मी शास्ताखानास दक्षिणेचा सुभेदार नेमिलें आहे. तो तुमच्या मागणीची व्यवस्था करील. असें सांगतात कीं, त्याने महाराजाला या समयी सन्मानसूचक शिरपाव पाठविला.[1]

त्याप्रमाणें शास्ताखानास औरंगजेबानें सन १६५९च्या जुलै महिन्यात दक्षिणच्या सुभ्यावर पाठविले त्याला त्याने अमीर-उल-उमराव असा बहुमानाचा किताब दिला. हा सरदार औरंगजेबाचा मामा होता हा पूर्वी गोवळकोंड्याच्या मोहिमेत औरंगजेबाबरोबर होता त्यानंतर तो माळवाप्राताचा सुभेदार झाला होता विजापूरकरांचा जो प्रात शिवाजीमहाराजानी, हस्तगत केला होता तो त्याच्याकडून घ्यावयाची कामगिरी त्यास सागितली होती त्याप्रमाणे दिल्लीच्या तक्तावर आपली स्थिरस्थापना होईपर्यंत त्याने महाराजाना स्नेहभाव दाखवून दक्षिणेंतील आपल्या सत्तेतल्या मुलखास त्याच्याकडून उपद्रव होऊं दिला नाहीं, आणि त्याच्याशीं करारमदार करण्याचे आमिष दाखविलें, परंतु आतून विजापूरकरास भर देऊन महाराजाशीं निकराचा सामना करण्यास प्रवृत्त केलें, आणि त्याच वेळी शास्ताखानाबरोबर जय्यत सेना देऊन महाराजावर पाठविलें विजापूरकरानी शिद्दीजोहाराला सलाबतखान हा किताब देऊन महाराजावर पाठविले, आणि कोकणातून हबसाणचा शिद्दी व वाडीचे सावंत यांसहि महाराजावर उठविलें याच्याशी झालेल्या युद्धप्रसगाचे वर्णन मागे तेराव्या भागात केलेच आहे आता शास्ताखानाशी केलेल्या युद्धप्रसगाचें वर्णन करूं[2] ह्या प्रसगीं महाराजास प्रथम बरीच हार खावी लागली यात काहीं नवल नाहीं एकाच वेळी

---

१ रा राजवाडेकृत आठवे खड पाहा

२ आम्ही पहिल्या आवृत्तींत शास्ताखानाची ही मोहीम स १६६२-६३ त झाली असे मराठी बखरींच्या व ग्रॅन्ट डफ याच्या आधारानें लिहिलें असून ती तेराव्या भागात वर्णिलेल्या विजापूरकराशी घडलेल्या समरप्रसगापासून अलग केली होती, व महाराजानीं आपल्या आरमाराच्या उभारणीची सुरुवात मोगलाच्या ह्या मोहिमेपूर्वी केल्याचें लिहिलें होतें त्याप्रमाणेच महाराजास पितृदर्शनहि ह्यापूर्वीच घडलें असें मानिले होतें परतु खाफीखान व प्रो. सरकार हे औरंगजेबाच्या कारकार्दीचा पहिल्या दहा वर्षाचा इत्थभूत इतिहास 'अलमगिरनामा' नांवाच्या मोगलदरबारीं ठेवलेल्या बखरीत नमूद केला आहे त्याच्या आधारानें असें ह्मणतात कीं, शास्ताखान स. १६५९ त दक्षिणेंत येऊन त्यानें स. १६६० च्या आरभीं शिवाजीमहाराजाच्या मुलखावर स्वारी केली. हें त्यांचें ह्मणणे खरें मानण्यास दुसरा आणखी असा आधार आहे की, जेध्याच्या शकावलींत शास्ताखानाच्या मोहिमेसंबधाच्या तारखा सदरील यवनी बखरींतील तारखांशीं जुळतात.

दोन प्रबळ शत्रूनीं चोहोंकडून घेरलें असून हबशी व सावंत हेहि कोंकणात आपला डाव साधण्यास टपले असता एवढ्याना टक्कर देऊन त्यांच्या कचाटींतून निभावणें कांहीं सोपे नव्हते

शास्ताखानाने दिल्लीहून निघताना अशी प्रतिज्ञा केली होती कीं, शिवाजीमहाराजास विलंब न लागता मारून गर्दीस मिळवितो, व त्याच्या ताब्यातला सगळा मुलूख हस्तगत करितो असें सागतात कीं, त्याच्याबरोबर एक लाख फौज पाचसातशे हत्ती, चारपाच हजार उंट, तीनहजार दारू गोळ्याचे छकडे, दोन हजार घोड्याचे छकडे व बत्तीस कोटीचा खजिना एवढी सामुग्री होती हे अवाढव्य सैन्य मुक्काम करी तेव्हा दोन गाव लाब व दीड गाव रुंद पसरे दिल्लीहून दक्षिणेत यावयास ह्या बादशाही फौजेला तीन महिने लागले

शास्ताखानाने पहिल्यानें औरंगाबादेस जाऊन तेथील सुभ्याचा बंदोबस्त केला व विजापूरकरास दक्षिणेकडून शिवाजीमहाराजावर चालून यावयास सूचना पाठविली त्याप्रमाणें त्यानी महाराजावर मोहीम केली तिची हकीकत तेराव्या भागात दिलीच आहे शास्ताखान स्वत सन १६६०च्या जानेवारी महिन्यात स्वसैन्यानिशीं त्याच्यावर मोहीम करावयास निघाला. तो अहमदनगराहून पुर्णे प्राताच्या पूर्वभागी चालून आला वाटेत जे जे किल्ले लागले ते तो काबीज करीत चालला ह्याप्रमाणें सोनवडी, सुपे, बारामती इत्यादि प्रात काबीज करीत तो निरानदीच्या खोऱ्यातून होळगावाच्या वाटेनें शिरवळास आला, आणि तेथून कांहीं लोक पाठवून राजगडाच्या आसपासची खेडी त्याने उध्वस्त करविलीं तेथून कूच करून तो सासवडास येऊन छावणी करून राहिला असें सागतात कीं, सिधखेडचा जाधवराव शास्ताखानाबरोबर होता त्यास तिकडील प्राताची चांगली माहिती असल्या कारणानें खानाला त्याचा चागला उपयोग झाला. सुपेप्रांत काबीज केला तो ह्या जाधवरावाच्या ताब्यात दिला. त्यानें जे जे किल्ले व ठाणीं काबीज केलीं त्यावर आपले लोक ठेवून दिले.सासवडास तळ देऊन राहिल्यावर(ता.१ली मे स.१६६० ) त्यानें आसपासचे किल्ले पाहून येण्यासाठीं लोक पाठविले, मनांत कीं, ही पाहणी करून झाल्यावर एकामागून एक किल्ले घेण्याचा सपाटा सुरू करावयाचा.

ही एवढी मोहीम होईपर्यंत महाराजांच्या लोकांना शास्ताखानाच्या प्रचंड सेनेशीं सामना करण्याचा आवांका मुळींच नव्हता हें उघड आहे. शत्रु ज्याज्या ठाण्यावर चालून येई तेंतें ते सोडून देऊन पळ काढीत. तरी मोगलसैन्याच्या

पिछाडीवर महाराजाचे स्वार वेळोवेळा छापे घालून त्यास हैराण करीत, त्यास दाणा वैरण मिळूं देत नसत, व त्याचीं घोडी व इतर चीजवस्त हातीं लागे ती ते लुटून नेत पुढे खानाने शिवापूर व कात्रजचा घाट काबीज करावयासाठी काहीं लोक पाठविले, त्याच्यावर महाराजाच्या तीन हजार स्वारानी हल्ला केला त्याची मोठी निकराची लढाई झाली. पण खानाचे लोक पुष्कळ असल्यामुळें त्याचे काहीं चालले नाहीं, आणि त्यास माघार घ्यावी लागली ह्यानंतर पुन खानाने काहीं लोक पुरदर किल्ल्याच्या आसपासची खेडीं उध्वस्त करावयास पाठविले, त्यावर महाराजाच्या तीन हजार लोकानी हल्ला केला त्याचा तेथे घोर सग्राम झाला त्यात मोगलाच्या सैन्याचा बहुतेक मोड होण्याचा समय प्राप्त झाला होता परतु इतक्यात खानाकडून आणखी पुष्कळ लोक त्याच्या कुमकेस आले ह्या ताज्या दमाच्या लोकापुढे महाराजाच्या लोकाचा निभाव न निघून ते पुरदरच्या खिडीकडे पळत सुटले तेव्हा किल्ल्यावरून शत्रूवर तोफाचा भडिमार झाला. त्यामुळे त्याची आणखी बरीच खराबी झाली तरी त्याने दम धरून महाराजाच्या लोकास पुरदराजवळून पिटाळून लाविले ह्या-नंतर खानाने सासवडचा तळ हालवून पुण्याकडे मोरचा फिरविला, आणि त्यात बिनहरकत छावणी केली ( ता ९ मे सन १६६० ). येथे त्याने पावसाळा घालवावयाचे ठरविले, परतु मोगल सैन्याचा प्रवेश पुण्यात व्हावयाच्या पूर्वीच महाराजाच्या लोकानी त्या शहराच्या आसपासच्या गावातील दाणावैरण वगैरे अगदी नाहींशी करून तेथली वस्ती साफ उठवून लाविली होती, आणि दूरच्या गावातून मोगलाच्या छावणीत ती मुळी पोचेनासें केले. मोगली अमलातून दाणावैरण आणण्याची तर या वेळी मुळी सोय नव्हती कारण पावसाळा सुरू होऊन नद्यानाल्यास पूर आले होते. त्यामुळे खानाच्या सैन्याचे पराकाष्ठेचे हाल होऊं लागले, तेव्हा त्याने असा बेत केला कीं, पुण्याच्या उत्तरेस अठरा मैलावर चाकण किल्ला आहे तो हस्तगत करून तेथे आपलें ठाणें करावे म्हणजे अहमद-नगराकडून दाणावैरण आणविणे सोईचें होईल

हा असा बेत करून भर पावसांत चाकण किल्यास त्यानें जातीनें वेढा दिला. त्याच्या सभोंवार त्यानें मोरचे लावून निरनिराळ्या किल्ल्यावरून आणलेल्या मोठमोठ्या तोफा त्यावर चढविल्या आणि किल्ल्यावर भडिमार सुरू केला, परंतु पाऊस सारखा कोसळत असल्यामुळें त्याचें दारूसामान बरेंच खराब झालें. किल्यावरून होणाऱ्या तोफांच्या सरबत्तीमुळे त्याचे लोक भराभर पडूं लागले,

खानाचा हिशोब असा होता कीं, हें ठाणें लहान आहे, हे आपल्या हातीं तत्काळ लागेल त्या किल्ल्यावर फिरंगोजी नरसाला हा हवालदार होता त्याने तो किल्ला मोठ्या शौर्याने दोन महिने लटविला मोगल सैन्याने आपली शिकस्त केली, परंतु कांहीं इलाज चालेना. किल्यातले लोक रात्रीच्या वेळी अकस्मात् खाली येऊन खानाच्या मोरच्यांवर वारवार हल्ले करीत, त्याप्रमाणेच महाराजांचे घोडेस्वार बाहेरून खानाच्या फौजेवर वरचेवर छापा घालून तिची पुष्कळ खराबी करीत हे त्याचे अचाट धैर्य व धमक पाहून खान अगदीं थक्क झाला पण त्याच्याकडे लोकाचा भरणा मनस्वी असल्याकारणाने त्याला असा नेट धरिता आला वेढा पडल्यापासून छप्पन्नावे दिवशी शास्ताखानाने सुरुंग लावून केल्याच्या ईशान्य दिशेचा बुरूज उडविला त्यामुळे किल्याला मोठे भगदाड पडले किल्यावरील कित्येक लोक ह्या बुरुजावर होते ते ठार झाले. मोगल त्या भगदाडातून किल्ल्यावर चढून जाऊ लागले त्या समयीं तो शूर किल्लेदार आपल्या उरलेल्या लोकासह शत्रूवर तुटून पडला त्यामुळे त्याला वर जाता येईना रात्रभर फिरंगोजीने मोठ्या शौर्याने लढून किल्ल्यात शत्रूचा प्रवेश होऊं दिला नाहीं दुसरे दिवशी निरुपाय होऊन फिरंगोजी शत्रूच्या हाती लागून किल्ला सर झाला[1] शास्ताखानाने त्याचे ते शौर्य पाहून त्याला फार वाखाणिले. व त्याचा मोठा सन्मान करून तो त्यास ह्मणाला कीं, तुह्मी बादशाही फौजेत नोकरी पतकराल तर तुह्मास मी मोठ्या योग्यतेस चढवितो खानाच्या ह्या लालचावणीस फिरंगोजी मुळीच भुलला नाहीं, परंतु त्याबद्दल खानास वाईट न वाटून त्याने त्याचा बहुमान करून त्यास सोडून दिले तो महाराजा-कडे आला तेव्हा त्यानी त्यास त्याच्या मर्दुमकीबद्दल व इमानाबद्दल नावाजून मोठे इनाम दिले आणि पुढे भूपालगडावर हवालदार नेमिले[2]

---

१ हा असा शत्रूचा निकराचा वेढा चाकण किल्ल्यास पडला असता महाराज स्वतः पन्हाळा किल्ल्यावर अडकून पडल्यामुळे त्याला त्यास कुमक पाठविता आली नाहीं त्याचे फिरंगोजीस असे सांगणे होते की, किल्ला लढवेल तेवढे दिवस लढवून निरुपाय झाल्यास शत्रूच्या स्वाधीन करावा

२ दिग्विजय ह्मणतो की, हा किल्लेदार महाराजाकडे असा नामोहरम होऊन आला तेव्हा किल्ला शत्रूच्या स्वाधीन केल्याबद्दल त्याच्यावर रागावून त्याला आपल्या नोकरीवरून दूर केल्यावर तो शास्ताखानास जाऊन मिळाला. त्याने त्याला मालकूर गांवाचा ठाणेदार केलें, परंतु पुढे महाराजानी नेताजी पालकराला पाठवून त्यास आपल्याकडे आणविले. ही त्या बखरकाराची चूक आहे. मोगलांकडे जो गेला

असें सांगतात की, पुण्यास बाबाजीराम व होनाप्पा देशपांड्ये[1] असे दोघे देशमुख होते ते काहीं कारणावरून नाराज होऊन शास्ताखानास बऱ्हाणपूराजवळ जाऊन मिळाले. शास्ताखानाने चाकणचा किल्ला काबीज करून पुन पुण्यास येऊन काही दिवस स्वस्थ राहिल्यावर ह्या मराठे सरदाराच्या मदतीस आपलें सैन्य देऊन महाराजाच्या ताब्यातला उत्तर कोकणाचा काही भाग काबीज केला ह्या वेळी कल्याण व भिवडी ही मोगलाच्या हातीं गेलीं. ( सन १६६१ ) हे वर्तमान ऐकून महाराजास त्या सरदाराचा फार राग आला त्याचा सभाजी नावाचा एक नातलग महाराजाच्या पदरी सरदार होता त्याला ते भरदरबारामध्ये त्याबद्दल टाकून बोलले कीं, तुमचे हे दोघे आश्रित असून आह्मास सोडून आमच्या शत्रूस जाऊन मिळाले तेव्हा आता तुमचाहि आह्मास भरवसा येत नाही हे टोचून बोलणे सभाजीला मुळीच सहन झालें नाही तो फारच रागावला आणि शास्ताखानास जाऊन मिळाला. ह्या संभाजी ज्वान असून मोटा बळकट होता त्यानें शास्ताखानाची प्रथम मुलाखत घेतली तेव्हा त्याने त्याला आपल्या अगच्या बळाचा प्रत्यय एक घोडा चार पायास धरून उचलून दाखविला खान हे त्याचे अचाट बळ पाहून खुष झाला, आणि त्यानें त्याला पाचशे स्वाराची सरदारी देऊन आपल्या लष्करात नोकरीस ठेविले पुढे हा संभाजी मोगलाच्या तर्फे मालकूर येथे ठाणबंदी करून राहिला असता त्याच्यावर महाराजानी त्याच्या गावचा नतोजी ह्मणून एक सरदार पदरी होता त्यास फौज देऊन पाठविले त्याने सभाजीवर हल्ला करून त्याचा मोड केला व त्यास रणात ठार केले. आणि मालकूरगाव जाळून टाकिला.

चाकणचा किल्ला हस्तगत करण्यात खानाचे बरेच लोक खलास झाल्यामुळे पुढें आणखी मुलूख काबीज करण्याचें सोडून तो परत पुण्यास येऊन राहिला. त्याची पहिल्यानें अशी धमक होती कीं, शिवाजीमहाराजाच्या ताब्यांतले किल्ले आपण हां हां ह्मणतां काबीज करू परतु ह्या एका किल्ल्याखालीं दोन महिने झटापट करावी लागून हजारो लोकांचे बळी द्यावे लागले, हें पाहून त्याचा तो भ्रम नाहींसा झाला. त्याची आता अशी खात्री झाली कीं, शिवाजीमहाराजाच्या

---

तो संभाजी नावाचा एक सरदार फिरगोजी नव्हे, हें पुढील मजकुरावरून ध्यानांत येईल.

१ चिटणीस यांचीं नांवें संभुजी कावजी व बाबाजीराम होनाप्पा देशपांड्ये अशीं देतो. अलमगिरनाम्यांत हीं नांवें बाबाजी भोंसले व रघुनाथ अशीं आहेत.

ताब्यातील किल्ले घेण्याचें काम मोठें बिकट आहे औरंगजेबाचा तरी समज पहिल्यानें असाच होता त्याला वाटे कीं, हे पहाडी किल्ले काबीज करण्यास आपणास मुळीच अवकाश लागणार नाहीं, व मराठे लोकासारख्या शत्रूस जिंकण्याचें काम फार सोपे आहे. परतु शिवाजीमहाराजाचे व त्यांच्या पदरच्या एकएका सरदाराचे पराक्रम व शौर्य याची वार्ता जसजशी त्याच्या कानी जाऊं लागली तसतसा त्याचा हा समज पालटत गेला त्याने जोधपूरचा राजा यशवंतसिंग यास शास्ताखानाच्या मदतीस आणखी दहाहजार लोक देऊन रवाना केले

खानाचे सगळे सैन्य काहींएक हालचाल न करिता पुण्याजवळ तळ देऊन दोन वर्षे स्वस्थ राहिले होते. हस्तगत केलेली ठाणीं परत महाराजाच्या हातीं न जाण्याविषयी मात्र बरीच चागली खबरदारी त्याने घेतली होती. इकडे नेताजी पालकराने आपल्या स्वारानिशी अहमदनगर व औरंगाबाद ह्या शहरापर्यंत स्वाऱ्या करून मोगली मुलूख उद्ध्वस्त करण्याचा धूम तडाका चालविला होता, आणि मोगली फौजेचे कहिकवाड व रसद बद करून व त्यावर अकस्मात् छापे घालून तीस त्राहित्राहि करून सोडले त्याच्यावर हल्ला करावयास जावें तर त्याचा वेग इतका काहीं विलक्षण असे कीं, तो शत्रूच्या तावडीतून सहज निसटून जात असे, व त्याचा पाठलाग करण्यात काहीएक अर्थ नाहीं असें शत्रूच्या लोकास वाटून ते जागच्या जागी राहत शास्ताखानानें नेताजीचा हा उपसर्ग नाहींसा करण्याचा निश्चय करून त्याच्यावर आपले सात हजार स्वार पाठविले त्यानी त्यास गाठून उभयपक्षाचे घनघोर युद्ध झालें शत्रुसैन्याचा जमाव फारच मोठा असल्याकारणाने नेताजीचा ह्या युद्धात पराभव झाला त्यानें ह्या प्रसगीं आपली अगदी शिकस्त केली त्यास पुष्कळ जखमा लागून तो बहुतेक घायाळ झाला. अशा स्थितीत तो शत्रूच्या हातून निसटून दक्षिणेकडे पळत सुटला, आणि मोगलांचे स्वार त्याच्या पाठीस लागले अशा आणीबाणीच्या प्रसगी महाराजांचा मित्र रुस्तम जमान याने मोगल सरदाराला भेटून असें सागितलें कीं, तुमच्या सैन्याला इकडला मुलूख माहीत नसल्याकारणानें तुमचा हेतु सिद्धीस जावयाचा नाहीं. तर तुह्मी माघारी जा मी नेताजीचा पाठलाग करून त्याला पकडतों. हें त्याचे ह्मणणे मोगल सरदारास पटून तो परत गेला, आणि नेताजी शत्रूच्या तावडीतून सुटला.[1]

---

१ ही हकीकत प्रो. सरकार सुरत येथील इग्रज वखारवाल्याच्या त्या काळच्या कागदपत्राच्या आधाराने देतात. पृ. ९७.

शास्ताखान वर्ष सवावर्ष धामधूम करून पुणे येथे छावणी करून पुढे दोन वर्षे स्वस्थ राहिला याची कारणे मुख्यत दोन असावी एक तर वर सांगितलेंच आहेच की, महाराजाच्या ताब्यांतले दुसरे किल्ले काबीज करण्याच्या भरीस आपण पडलों तर आपले सैन्य खलास होऊन आपणास रडत माघारी जावे लागेल किंवा प्राणास मुकावे लागेल असे त्यास वाटले असावे. दुसरे कारण अर्थात् असे दिसते की, महाराज विजापूरकराला खडे चारून त्यांच्या उपसर्गापासून मुक्त होऊन ह्या वेळी पुण्याच्या आसपास आले होते. त्याच्याशी सामना करण्याची छाती खानाला झाली नसावी खरे म्हटले असता महाराजाचे सगळे कोट, किल्ले व मुलूख काबीज करून त्याना गद्यास मिळविण्याची प्रतिज्ञा करून तो दक्षिणेत आला होता तेव्हा महाराज स्वत कोंकणातली मोहीम करून वर आले असता त्याच्यावर त्याने चालून जावयास हवे होते परतु तसें त्याने काहीच केले नाहीं. मोगल सैन्याची हालचाल ही अशी बद पडलेली पाहून महाराजानी स्वत मोगलाच्या मुलखात धामधूम सुरू केली मोगलानी कल्याणभिवडी स १६६१त काबीज केली होती ती प्रथम परत घ्यावी असा विचार करून त्यानी ह्या कामगिरीवर मोरोपंतास पाठविले त्याने ही फत्ते मिळवून आणखी जुन्नरच्या उत्तरेकडील मोगलाची सगळी ठाणी हस्तगत केली त्याप्रमाणेच नेताजी पालकराने आपला पूर्वीचा क्रम मोठ्या जोमाने चालू ठेवून आपल्या स्वारानिशी त्याने मोगलाच्या मुलखात लाबपर्यंत मोहीम केली, व गावचे गाव लुटून व शहरावर व पेठावर खड बसवून पुष्कळ द्रव्य मिळविले. ही त्याची दौड इतकी वेगाची असे की, आज येथे तर उद्या दूर कोठे तरी दुसऱ्याच ठिकाणी तो प्रगट होत असे ह्याप्रमाणे तो बालेघाट, परडे, हवेली, कलबुर्गे, आवसे, उदगीर वगैरे गाव लुटीत, मुलूख मारीत व खंडण्या घेत गोदावरी नदीच्या तीरापर्यंत गेला थेट औरंगाबादेपर्यंत दौड करून त्याने त्या शहराच्या आसपासचा मुलूख लुटला मोगलाचा सुभेदार महकूबसिंग म्हणून औरंगाबादेस होता, तो ही अदाधुद ऐकून दहाहजार लोकानिशीं नेताजी पालकरावर चालून आला. त्याच्याशी नगरानजीक युद्ध करून नेताजी पालकराने त्याचा पुरा मोड केला त्याचे हत्तीघोडे व दुसरे युद्धोपयोगी सामान

१ चिटणीस म्हणतो की, ह्या वेळी नेताजी पालकराकडची सरनोबती काढून प्रतापराव गुजर याला दिली होती, व ह्या गुजराने ही मोहीम केली. परतु हे अधिकारांतर जयसिंगाच्या मोहिमेच्या वेळी झाले असे दिसते.

नेताजीच्या हातीं पुष्कळ लागलें. ह्याप्रमाणें मोगलाच्या मुलखांत सारखा धुमाकूळ उडवून देऊन मिळविलेल्या लुटीची रुजवात तो महाराजाकडे करी

प्रबळगड ह्मणून एक बळकट किल्ला मोगलाच्या हातीं होता त्यावर केशरसिंग नामेकरून एक रजपूत सरदार होता त्याच्याशी भेद करून किल्ला हातीं येत नाहीं असें पाहून महाराजानी स्वत त्याजवर हल्ला केला केशरसिंगाने किल्ला बरेच दिवस लढविला, परतु महाराजापुढे आपले काहींच चालावयाचें नाहीं असें पाहून त्या रजपूत सरदारानें आपल्या कबिल्याचे जोहार केले, व आपल्या पदरच्या लोकासह तो महाराजावर तुटून पडला व त्याशी मोठ्या निकरानें लढून आपल्या एकंदर लोकानिशी समरभूमीवर पतन पावला मग महाराजानी रजपुताची प्रेतें ओळखून त्यास अग्नि देवविला केशरसिंगाची आई व एक मुलगी ह्या चुकून किल्ल्यावर राहिल्या होत्या, त्यास महाराजानी मोठ्या अदबीने वागवून आपल्याकडे ठेवून घेतले पुढे त्या बायानी आपली अशी इच्छा प्रगट केली कीं, आह्मास आमच्या देशी जावयाचे आहे, तर तिकडे जाण्याविषयी आह्मास परवानगी असावी त्यावरून त्यास वस्त्रे, भूषणें, द्रव्य आदिकरून देऊन त्यांनी त्यास मोठ्या इतमामाने पाठवून दिलें

असें सागतात की, महाराज पालखीत बसून हा किल्ला पाहावयास चालले असता त्याच्या शेल्यास बोरीची फादी लागून तो खाली पडला तेव्हा पालखी उभी करून ते ह्मणाले की, "ह्या ठिकाणी आह्मास उभे केले त्यापेक्षा येथे भुईखाली द्रव्य असावे." मग त्यानी तेथे खणविलें तो जमिनीत खरेंच द्रव्य लागलें. तेथे त्यास चार लाख मोहराचा चवुत्रा सापडला

इतकी धामधूम मोगलाच्या मुलखात केली तरी शास्ताखान पुण्याहून आपला तळ उठवून महाराजाशीं सामना करावयास आला नाही त्यानें पुण्याजवळ आपल्या सगळ्या लष्कराची कायमची छावणी देऊन महाराजाची घेतलेली ठाणीं सहसा सोडून द्यावयाची नाहींत असा त्याचा निर्धार होता त्याला तेथून कसा हलवावा या विचारात महाराज होते ते सिंहगडावर अनुकूळ सधीची वाट

२ रायरीच्या बखरीत असे ह्मटले आहे की, महकूबसिंग जागच्याजागी स्वस्थ बसला होता त्यास औरगजेबाने जरबेचा हुकूम केल्यावरून तो आपल्या सैन्यानिशी चालून आला त्याला अहमदनगरापाशी गाठून त्याचा पराभव प्रतापराव गुजर याने केला, व तो सुभेदार ह्या लढाईत पडला खाफीखान ह्मणतो कीं, शास्ताखान औरगाबाद सोडून निघाला तेव्हा मुमताजखान यास तेथला सुभेदार नेमिले होते.

पाहत बसले. इकडे शास्ताखान पुण्यास दादाजी कोंडदेवानें महाराजांसाठी बांधलेल्या वाड्यात जाऊन राहिला होता ह्या वाड्याचें नाव लालमहाल[1] असें होतें ह्या वेळी शिवाजीमहाराज सिंहगडावर होते हें खानास माहीत होते ते केव्हा काय युक्ति करून आपणावर अकस्मात् छापा घालतील याचा नेम नाहीं हें तो पूर्णपणें जाणून होता. आता खरें ह्मटले असता ह्या संधीस त्याने सिंहगडास वेढा देऊन त्यास आत कोंडावे व किल्ला हस्तगत करून त्यांस पकडण्याचा प्रयत्न करावा परंतु चाकणकिल्यापाशी त्याला जो अनुभव आला होता त्यावरून त्याने हा विचार मनात आणिला नाहीं दुसरें असें कीं, ज्या किल्यात खुद्द शिवाजीमहाराज राहत आहेत त्याचा बंदोबस्त बिलकुल लेचापेचा नसावयाचा हें त्यास पक्के ठाऊक होते पुण्याचा आपला मुक्काम सुरक्षित राहा व यासाठी त्याने आपल्याकडून होईल तितकी सावधगिरी राखिली होती त्यानें आपल्या लोकास असा एकसहा हुकूम देऊन ठेविला होता कीं, 'कोणाहि सशस्त्र मराठ्यास परवान्यावाचून शहरात प्रवेश करूं देऊं नये, व कोणत्याहि मराठे शिलेदारास आपल्या गोटात येऊं देऊ नये' जे मराठे सरदार बादशहाचे ताबेदार होते त्यास मात्र तो आपल्या जवळ येऊं देत असे[2] दुसऱ्या कोणाहि मराठ्याची तो मुलाखत घेत नसे ह्याप्रमाणे सर्व शहरभर जिकडेतिकडे चौकीपहारे ठेवून कडेकोट बंदोबस्त करून खान राहिला. पुढें शिवाजीमहाराजाशी सामना कसा करावा ह्या विचारात तो ह्या वेळी असावासे दिसते

महाराज सिंहगडावरून शत्रूची सर्व हालचाल पाहत होते[3] तो अशी प्रचंड सेना घेऊन आपल्या पारिपत्याचा विडा उचलून दक्षिणेंत येऊन पुणे, सुपें वगैरे प्रांत बळकावून बसला तेव्हा त्याला तेथून कसा हुसकून लावावा याविषयी मसलत करण्यासाठी महाराजानी आपल्या पदरच्या सरदारास व कारभाऱ्यास हुजूर बोलाविलें सर्वांचे मत असें पडले कीं, त्याच्याशी युद्ध करून आपला निभाव लागणार नाहीं आपली फौज ती किती आणि त्याची फौज केवढी मोठी! यास्तव त्याच्याशी सल्ला करून त्याची भेट घ्यावी; हे उत्तम परंतु हा सल्ला होतो कसा याची पंचाईत पडली कारण खानाच्या लष्करात असा

---

१ कोणी याचे नाव राजमहाल असे देतात.

२ मि किंकेड ह्मणतात की, त्याने आपल्या घोडदळातला एकूणएक शिलेदार काढून टाकला होता. पण त्यानें पायदळातले मराठे काढून टाकले नव्हते.

३ मि. किंकेड ह्मणतात की, महाराज या वेळी सिंहगडावरून राजगडास गेले होते.

कोणी नामांकित रजपूत सरदार नव्हता की जो हिंदुधर्म व हिंदुस्वराज्य यांचा अभिमान धरून खानगी हरयुक्तीनें सल्ला करून देईल शास्ताखान प्रत्यक्ष बादशाहाचा मामा असल्यामुळें त्यास लांचलुचपतीनें वश करून घेण्याचा मार्ग नव्हता त्याचें अभय वचन घेऊन व त्याच्या भेटीस जाऊन सल्ला करण्याची गोष्ट तर बोलावयासच नको होती कारण त्याची अशी दृढ प्रतिज्ञा होती कीं, शिवाजीमहाराजास पुरें शासन करावयाचें म्हणून महाराजानी ह्या प्रसंगी असा निश्चय केला कीं, शत्रूशी समोरासमोर युद्ध करून आपले लोक विनाकारण खराब करावयाचे नाहींत दुसऱ्या उपायांनी शत्रूस साधेल तेवढें जेर करावयाचे ते उपाय अर्थात हेच कीं, त्याचे लष्करवाड, सामान व रसद बंद करून त्याला घाबरा करावा, कोठें अडचणींत धरून त्याचे लोक मारून काढावे, एकाद्या किल्ल्यास तो मोर्चे देऊन बसला असता त्याच्या फौजेवर चोहोंकडून छापे घालून त्यास हैराण करावें

हें असे जबरदस्त काहूर येऊन त्या विचारात महाराज गुग्ग होऊन बसले असता त्यांच्या अंगात भवानी संचरून बोलली कीं, "माझ्या लेकरास म्हणावें कीं, शास्ताखानाची फिकीर किमपि न करणें जसा अफझुलखान प्रतापानें मारिला, तसाच हा दुष्ट यवन तुझ्या हस्तें शिक्षास्पद करितें याविषयी तूं कांहीं चिंता करूं नये." हीं देवीची वाक्यें जवळ होते त्यांनी लिहून ठेविली तीं महाराजानी सावध होऊन पाहिली तेव्हां त्यास संतोष झाला, व आपणावर जगदंबेचा प्रसाद आहे असें मानून आपली फत्ते होईल अशी शकुनगांठ त्यांनीं बांधिली, व पराक्रमेंकरून शत्रुपराभव करण्याची हिंमत धरिली

लालमहालांत राहत असतां शास्ताखानानें बाबाजीराम यांच्या मदतीनें संस्कृत जाणणाऱ्या एका ब्राह्मणास बोलावून आणिलें, व त्यास कांहीं द्रव्य देऊं करून शिवाजी महाराजास एक पत्र लिहविलें[1] त्यातील आशय असा कीं, 'तूं मर्कटा-सारखा डोंगरात राहणारा आहेस. तूं आपल्या किल्ल्यांच्या आश्रयास राहून वाटेल तशी बंडाळी करीत आहेस युद्धाचा प्रसंग आला म्हणजे तूं किल्ल्यांत दडी मारून बसतोस तूं किल्ल्यांत छपून कितीहि दिवस बसलास तरी तुझा पिच्छा मी सोडणार नाहीं. मी राजा इंद्र आहे. तुला मजबरोबर युद्ध करण्यास धैर्य नाहीं तूं माझ्या समोरून पळून जातोस.' ह्या पत्राचें उत्तर महाराजांनीं

१ मि. किंकेड म्हणतात की, हे पत्र त्याने फारशी भाषेंत लिहिलें,आणि महाराजांनीं त्याचा जबाब संस्कृत भाषेंत पाठविला.

असे पाठविले कीं, 'मी मर्कटासमान आहे ह्मणतोस, तर ज्या मर्कटानी रावणाचा नाश करून लंका हस्तगत केली त्याच्यासारखा मी आहे मी तुला पळता भुई थोडी करून सोडीन.[१]'

शास्ताखानाच्या पुणे येथील छावणीवर अकस्मात् घाला घालून त्यास जेर करण्याचे त्या वेळी साध्य नव्हते त्याचा बदोबस्त उत्कृष्ट होता, व त्याचे सैन्यबलहि मोठे होते यास्तव त्याच्या ह्या उद्दामपणाबद्दल व गर्विष्ठपणाबद्दल त्यास कसेंहि करून देहातशासन दिले ह्मणजे त्याच्या फौजेचा मोड सहज करिता येईल असे मनात आणून महाराज हा बेत सिद्धीस नेण्याच्या उद्योगास लागले त्यानी दोन ब्राह्मण पुण्यास पाठवून त्याच्याकरवी खानाच्या लष्करातील एक मराठा शिलेदार फितूर केला त्याला असा बहाणा करावयास सागितले कीं, आपण लग्नसमारभ करणार आहो, यास्तव आपणास शहरातून वाजत-गाजत वरात काढण्याची परवानगी मिळावी, असा त्याने खानापाशी अर्ज करावा त्याप्रमाणे त्या शिलेदाराने अर्ज करून परवानगी मिळविली मग त्याने आपल्या काही मित्रास सामील करून घेऊन ही वरात काढण्याचे त्या ब्राह्मणास वचन दिले इतकी तयारी झाल्यावर महाराज सिंहगडावरून हजार दीड हजार निवडक मावळे घेऊन निघाले येताना कात्रजाच्या घाटात झाडास जागोजाग पोत बाधविले, व तेथे काहीं बेल ठेवून त्याच्याहि शिगास पोत बाधविले आणखी तेथे डोगरात बिकट जागी वीसपचवीस करणकरी व शिगाडे ठेवून दिले खानाच्या गोटावर हल्ला करून फत्ते मिळवून सिंहगडाकडे जाताना इशारतीचा करणा वाजेल तेव्हा त्या ठिकाणी ठेवलेल्या माव-ळ्यानी झाडाचे व बैलाच्या शिगाचे पोत उजळावे व करणे आणि शिगे एकदम वाजवू लागावे, व तेथून सर्वांनी चालते व्हावे, असे त्यास सागून ठेविलें. ह्या युक्तीचा उद्देश अर्थात् असा होता कीं, खानाचे लोक पाठलागास निघाले ह्मणजे त्यानी कात्रजाच्या घाटात उजेड पाहून व वाद्याचा गजर ऐकून तिकडे चाल करावी व आपण सिंहगडावर सुरक्षित जाऊन पोंचावे. महाराज गडावरून उतरून पुण्याकडे जाताना वाटेत जागोजाग थोडेथोडे लोक ठेवीत गेले, व ह्या सर्व लोकास असे सागून ठेविलें की, करण्यातील बारीक नळीची इशारत होताच सर्वांनी येऊन मिळावे. आबेओहोळापाशी आल्यावर तेथें पाच-

१ रायरीची बखर. जेध्याच्या शकावलीत असा मजकूर आहे का, सोनाजी पंडित नावाच्या एका ब्राह्मणाने हा खानाचा निरोप राजगडावर महाराजांकडे आणिला.

सातशे लोक त्यांनी ठेवून दिले व खानाच्या छावणीबाहेर काहीं अंतरावर दोन-तीनशे लोक ठेविले.[1] पूर्वसंकेताप्रमाणे फितूर केलेल्या शिलेदाराची वरात मिरवत मिरवत शहराच्या वेशीपाशी आली तों महाराज आपल्याबरोबर फक्त पंचवीस असामी घेऊन तींत जाऊन मिळाले.[2] ह्या प्रसंगीं महाराजाबरोबर एसाजी कंक, तानाजी मालसुरे, दादाजी बापुजी देशपांड्ये व चिमणाजी बापुजी देशपांड्ये हे होते. मराठे लोकांचा त्या काळीं असा रिवाज असे कीं, वरातीस वगैरे निघताना ते आपली शस्त्रे बरोबर घेत. यास्तव त्यांच्या हातांत शस्त्र असल्याबद्दल कोणा-सहि शंका आली नाही.

या प्रसंगीं महाराजांनी अंगांत चिलखत चढवून वरून झगा घातला होता व डोकीस शिरस्त्राण घालून वरून मंदिल बांधिले होते. त्यांच्या एका हातांत तरवार असून दुसऱ्या हातांत वाघनख व बिचवा अशी होतीं. मिरवणुकीच्या साहाय्यानें खानाच्या गोटांत महाराजांचा व त्यांच्या बरोबरच्या माणसांचा प्रवेश झाल्यावर काहीं वेळानें जिकडेतिकडे सामसूम झालें. रात्र फार झाल्यामुळें सगळे लोक झोंपी जाऊन काहीं चौक्यावरचे लोक तेवढे अर्धवट जागे होते. गोटाबाहेर सक्त पाहारा असल्याकारणानें आतल्या चौक्यावरचे लोक अमळ बेफाम असत. खान राहत होता तो वाडा खुद्द महाराजांचा असल्यामुळें त्यांत कोठून कसा प्रवेश होईल हें त्यांस चांगलें ठाऊक होतें. महाराज आपल्या लोकां-निशीं थेट त्या वाड्यापाशीं गेले, आणि स्वयंपाकघराच्या भिंतीला एक खिडकी होती ती बुजविली होती, ती त्यांनी खणून आंत उतरावयास वाट केली, व त्या वाटे महाराज दोनतीन असामी बरोबर घेऊन आंत उतरले. त्यांची चाहूल लागताच खानाच्या जनान्यांतील बायका जाग्या झाल्या, व त्यांनीं आपल्या धन्यास जागें केलें. त्यासरशी तो घाबरून उठून एका खिडकीवाटे खालीं उतरूं लागला. इतक्यांत महाराजांची त्याच्यावर नजर पडून त्यांच्याकडे धावत जाऊन त्यांनी त्याच्या अंगावर आपल्या तरवारीचा वार केला. त्या वारानें

[1] सभासद ह्मणतो कीं, नेताजी पालकर व मोरोपंत यांस सैन्यासह छावणीबाहेर काहीं अंतरावर राहावयास सांगितलें होतें. प्रो. सरकारहि असेंच ह्मणतात.

[2] महाराजांचे दोनशें लोक मोगलाच्या पायदळांतल्या मराठे शिपायांचा वेश घेऊन नवरा मुलगा सजवून घेऊन शहरांत शिरले. ह्या तोतया नवऱ्याबरोबर महाराज चालले होते; आणि छावणीच्या दुसऱ्या बाजूकडून त्यांचे आणखी दोनशें लोक तसाच वेश घेऊन आपल्यांतलेच काहीं कैदी ह्मणून धरून त्यांस मारहाण करीत आंत शिरले, असें खाफीखान ह्मणतो.

त्याच्या हाताचें एक बोट तुटलें. इकडे त्याचा मुलगा अबदुल फत्तेखान व त्याच्या खास तैनातीचे शिपाई महाराजावर चालून आले. त्या सर्वांची कत्तल उडवून महाराज आपल्या लोकासह सुरक्षित बाहेर पडले. गलिमानें छापा घातल्याचा पुकारा खानाच्या लष्करात होऊन सर्व लोक गलबलून गेले. जिकडेतिकडे एकच गोधळ माजून राहिला. गलीम कोठे आहे म्हणून जो तो शोधूं लागला. महाराजहि ह्या गर्दीतून 'गलीम कोठे आहे' असें ओरडत आपल्या लोकासह धावत सुटून शहराबाहेर आले. जागोजाग ठेवलेल्या लोकास एकत्र करून ते

---

१ चिटणीस ही छाप्याची हकीकत निराळी देतो. तो अशी: खान वाड्यात राहत नसून बागेलगत डेरा देऊन राहिला होता. ह्या डेऱ्यात महाराज एक दोन असामी-सह शिरले, व तो निजला होता तेथ जाऊन त्याच्या उरावर बसले, व आता वार करणार तो खानाची स्त्री जागी झाली व तिने तो प्रकार पाहून महाराजाचे पाय धरून आपल्या पतास जीवदान द्यावे असा बहुत गयावाया करून प्रार्थना केली. तेव्हा महाराजाचे हृदय द्रवून त्याना असा विचार केला की, हा जिवत राहून आप त्याशी युद्ध करावयास आला तर ह्याला समरांगणात गाठून शासन करू, ह्याला ह्या वेळी मारू नये. मग खानास मोठ्या खबरदारीने दाबून धरून त्याच्या छातीवरून उठून त्याच्या मानेवर तरवार त्यानी ठेविली. व दुसऱ्या हातातले वाघनख त्याच्या पोटास रोवून त्याला म्हटले 'ऊठ, आणि मी जेथपर्यंत नेईन तेथपर्यंत माझ्या बरोबर चल. आम्ही बाहेर पडेपर्यंत गलबला केल्यास ठार करीन' असे बोलून त्याच्या हाताची दोन बोटे कापून त्याला त्याच्या बायकोसह हाती धरून महाराज आल्या वाटेनें आपल्या बाहेरच्या लोकास जाऊन मिळाले. बाहेर पडण्यापूर्वी ते त्यास म्हणाले की, शिवाजी तो मी. तू मजवर मोहीम करून आलास पण तुझें धारिपत्य करून तुला ठार मारण्यास मला उशीर लागणार नाही. तुला आपला जीव प्यारा असल्यास आमच्याशीं युद्ध करण्याचा बेत सोडून तू ह्या प्रांतातून चालता हो. सभासद व चित्रगुप्त हीच हकीकत निराळ्या रीतीनें देतात. ते म्हणतात की, खान ज्या डेऱ्यात राहत असे त्या डेऱ्यात महाराज शिरले तेव्हा काही बायका जाग्या होत्या, त्यानी गलबला केला. त्याबरोबर खान जागा झाला, व गलिमाने आपणावर अकस्मात् छापा घातला असे समजून बायकात शिरला. महाराज त्यास शोधू लागले. इतक्यात खान आपली तरवार घेऊन आपणावर वार करण्याच्या बेतात आहे असें महाराजाच्या दृष्टीस पडून त्यानी त्याच्यावर आपल्या तरवारीचा प्रहार केला. तो चुकविता चुकविता त्याच्या हाताची तीन बोटे तुटली. इकडे खानाचे लोक गलबला ऐकताच डेऱ्यात शिरू लागले. हें पाहून महाराज आपल्या लोकासह डेऱ्यातून बाहेर पडून पार निघून गेले. रायरीच्या बखरीत ही छाप्याची हकीगत येणेंप्रमाणें दिली आहे. खान लालमहालात उतरला होता. त्या महालापाशी एक माळी राहत असे. त्यास त्याच्या मेहुण्याच्या द्वारे फितर करून असें ठरविलें कीं, त्यानें महाराजांस

सिंहगडाकडे चालले तेव्हा इशाऱ्याचा करणा वाजला त्याबरोबर कात्रजाच्या

शास्ताखान निजे त्या खोलीत रात्रीच्या प्रहरी घेऊन जावे, व ह्या कामगिरीबद्दल पाचशे होन महाराजांनी त्याला द्यावे ह्याप्रमाणे व्यवस्था केल्यावर महाराज राजगडावरून रात्रीचे निघून मोठ्या वेगाने पुण्यास प्राप्त झाले, व कांहीं विश्वासू लोकांसह माळ्याच्या मदतीने वाड्यात शिरले दाराशी पंचवीस पाहारेकरी होते त्याला व एक खोजा जागा होता त्याला त्यांनी कापून काढिले माळ्याने चुकून महाराजांस खानाच्या मुलाच्या खोलीत नेले त्याला महाराजांनी तेथेच ठार केले, व एका दासीला धमकी देऊन शास्ताखानाची खोली दाखविण्यास सांगितले जिवाच्या भीतीस्तव ती तिने दाखविली इतक्यात गलबला होऊन खान उठला आणि घाबरून जाऊन खिडकीवाटे उडी टाकू लागला. त्याबरोबर महाराजांनी त्याच्यावर तरवारीचा वार केला तो निसटता लागून त्याच्या एका हाताचा आंगठा तुटला. मग अतिशयित गलबला होऊन खानाचे लोक मशाली पेटवून निकडून निकडून जमा झाले. तेव्हा महाराज आल्या वाटेने निघून गेले पण बागेच्या प्रत्येक बाजू खानाच्या लोकांनी वेढलेला पाहून त्याच्या अंगावर आपल्या लोकांनिशी मोठ्या आवेशाने हल्ला करून त्यास कापून काढून महाराज शहराबाहेर सरंक्षित पोचले व घोड्यावर बसून राजगडास निघून गेले शिवदिग्विजयांत याहून निराळाच मजकूर आहे तो असा: महाराज रंगमहालांत शिरून शास्ताखानाचा मुलगा निजला होता त्या खोलींत शिरले, व खान तो हाच असे समजून त्याच्यावर फिरंगेचा वार करून त्यास ठार केले. फिरंगेचा आवाज ऐकून त्याची बायको जवळ निजली होती ती जागी झाली तिला महाराज बोलले की, 'ओरडशील तर प्राणास मुकशील. शास्ताखान तो हाच काय? बोल' ती म्हणाली, 'हा त्याचा बेटा' मग तिला शास्ताखानाची खोली दाखवावयास सांगितल्यावरून तिने जिवाच्या भीतीस्तव त्याची खोली दाखविली तीत शिरून महाराजांनी खानावर तरवार उगारली ती दिव्याच्या उजेडाने चमकली त्यासरशी खानाची बायको किंचित जागी होती ती उठून बसली व आपल्या पतीस मारावयास मारेकरी आला आहे असे पाहून महाराजांच्या चरणी तिने मस्तक ठेविले व परम दीनतेनें अशी प्रार्थना केली की, यास मारू नये इतक्यात खान जागा झाला पण शस्त्र घेऊन त्याच्याशीं युद्ध करण्याचे त्यास धैर्य न होऊन तो तोंड झाकून घेऊन बिछान्यावर पडून राहिला मग तिच्या त्या विनवणीने महाराजांचे हृदय द्रवले, आणि ते तीस म्हणाले की, 'ह्यास मी जीवन सोडितो, पण आम्ही बाहेर निघून जाऊं तोपर्यंत आपण कांहीं एक गडबड करणार नाही अशी आणभाक तू आणि यानें करावी' ही अट त्या स्त्रीस मान्य होऊन तिने आपल्या पतीस उठवून केलेला करार सांगितला. तो त्यासहि मान्य झाला मग त्याच्या उजव्या हाताची एक करांगळी कापून त्यास हातास धरून वाड्याच्या दिंडीपर्यंत नेलें व म्हटले की, उद्या माझ्या वाड्यातून निघून जा, नाही तर प्राणास मुकशील. प्रो सरकार यवनी बखरीच्या आधारानें असें म्हणतात की, महाराजांनी नेताजी पालकर व मोरोपंत पिंगळे यांच्या बरोबर

घाटांत मशाली पेटून करणे व शिंगे वाजूं लागलीं तेव्हा छापा घालणारे लोक त्या वाटे निघून गेले असें खानाच्या लोकास वाटून ते त्याचा पाठलाग करीत

---

प्रत्येकी एकएक हजार लोक देऊन त्यास खानाच्या प्रचंड छावणीच्या दोन बाजूस एका मैलाच्या अंतरावर राहावयास सांगितलं, आणि आपण स्वत चारशे निवडक लोक घेऊन त्याच्या छावणीजवळ आले पहारेकऱ्यानी त्यास हटकले तेव्हा त्यानी त्यास असे सांगितले की, आह्मी बादशहाच्या लष्करातले लोक असून आह्मास नेमून दिलेल्या जागी जावयाचे आहे असा बहाणा करून त्याना छावणीत प्रवेश केला आणि रात्र पडेपर्यंत ते एके बाजूस थांबून राहिले नंतर महाराज दोनशे लोक बरोबर घेऊन खान राहत होता तेथे गेले ते दिवस रमजानचे असल्याकारणाने खानाचे नोकर सगळा दिवस उपास काढून रात्री चापून जेऊन स्वस्थ घोरत पडले होते खानाचे स्वयपाकी पहाटेचे जेवण तयार करावयास उठले होते, त्यास काही एक गलबला न करिता कापून काढून शय्यागृहाचे दार बुजविले होते ते ते खणून काढू लागले त्या खणण्याचा आवाज व ठार केलेल्या लोकाचे कण्हणे यानी खानाच्या कित्येक दासी जाग्या झाल्या, आणि काही गडबड आहे असा संशय येऊन त्या खानास उठवू लागल्या. पण आपली झोप मोडल्याबद्दल खान त्याच्यावर रागावला आणि पुन झोपी गेला दारातला माणूस आत शिरे इतके भगदाड पडताच महाराज चिमणाजी बापूजी यास बरोबर घेऊन आत शिरले आणि थेट शास्ताखान निजला होता त्या खोल्यात गेले त्याबरोबर खानाच्या बायका जाग्या होऊन त्याना खानास उठविले तेव्हा महाराजानी त्याच्यावर वार केला त्याने त्याचा आंगठा तुटला इतक्यात बायकानी दिवे विझविले, आणि त्या गर्दीतून त्यानी खानास पळविले इकडे महाराजांचे बाहेरले लोक आत शिरले व कत्तल सुरू झाली, तीत खानाचा एक मुलगा पडला, व दुसरे दोघे जखमी झाले खानाच्या सहा बायका व दोन दासी प्राणास मुकल्या ही अशी ओरड होताच महाराज निसटून गेले मि किंकेड ह्मणतात की, महाराज पहिल्याने त्या महालाच्या दरवाज्यापाशी गेले पण खानाच्या जनानखान्यात खोजे जागे असून आत दिवे होते ह्मणून ते पिछाडीस स्वयपाकघरातली खिडकी बुजविली होती ती खणू लागले, तेव्हा खानाच्या दासीनी भितीला भोक पडलेले पाहून धावत जाऊन खानास उठविलें त्यानें आत शिरलेल्या पहिल्या माणसाच्या छातीत बाण मारून त्याला खाली पाडलें पण त्याने पडतापडता खानावर तरवारीचा वार केला त्यामुळे खानाचा आंगठा तुटला. इतक्यात महाराजांचे दुसरे लोक पुढल्या दरवाजावरील खोजाना ठार करून आत शिरले, आणि खानाच्या नोकराची आणि त्याची मारामारी सुरू झाली. त्या गर्दीत खानाला दासींनी लपविलें. खानाचा मुलगा पडला, आणि खानाचा एक सरदार त्याच्या सारखाच दिसला त्याला त्यानी ठार केलें. तो खानच पडला असें समजून महाराज आपले लोक घेऊन त्या गर्दीतून निसटून पार गेले.

तिकडे धांवत सुटले.[1] इकडे महाराज आपल्या सर्व लोकांसह सिंहगडावर सुखरूप जाऊन पोंचले. खानाचे लोक कात्रजाच्या घाटाकडे दौड करीत गेले. ते प्रात:काळी तेथें पाहतात तों झाडास व बैलाच्या शिंगास पोत बांधलेले त्याच्या दृष्टीस पडले. तेव्हां निराश होऊन ते तिकडून माघारी फिरले, व गनिमानें हा शुद्ध कावा केला असून तो सिंहगडावरच परत गेला अशी खात्री होऊन ते सिंहगडाखालीं जमा झाले. अगदी किल्ल्यापाशीं येत तोंपर्यंत त्यास महाराजानी कांहींएक अटकाव केला नाहीं. ते लोक मोठ्या आवेशानें आपल्या नरवारी परजीत व रणवाद्यें वाजवीत गडापाशीं येऊन भिडले. त्याचा असा निश्चय झाला होता कीं, कांहीं झालें तरी किल्ला सर करून शिवाजीमहाराजास पकडून ठार करूं, परंतु ते किल्ल्यावरील तोफाच्या माऱ्यात येऊन त्यावर सरबत्ती होऊं लागली तेव्हां त्याची धादल उडून ते सैरावैरा पळत सुटले. शेंकडो लोक जेथल्या तेथें मरून पडले. निशाणाच्या हत्तीस गोळा लागून तो पडला. हा कहर पाहून किल्ल्याजवळ राहण्याचें कोणास धैर्य होईना. 'सबसे जीव प्यारा' या न्यायानें जो तो आपला प्राण वाचतो कसा तें पाहूं लागला. ह्याप्रमाणें मोगलाची दाणादाण होऊन ते वेढा उठवून माघारी पळत सुटले, तों दुसरीकडून नेताजी पालकरानें आपल्या स्वाराची एक टोळी कर्तोजी गुजराच्या हाताखालीं देऊन त्याच्यावर हल्ला करावयास पाठविली. ह्या टोळीनें त्याच्यावर अकस्मात् घाला घालून त्याची पुरी धूळधाण केली. मोगलाच्या पुष्कळ टोळ्या गुजरानें कापून काढिल्या. हें वर्तमान ता. ५ एप्रिल स. १६६३ त घडलें.

हा असा आपल्या लोकाचा पुरा मोड झाला हे पाहून शास्ताखान अगदी बेदिल झाला. आधीच मुलाच्या मृत्यूमुळे त्याचें चित्त शोकाकुल झालें होतें. त्यात आणखी आपल्या लोकाचा असा धुव्वा उडून बरेंच सैन्य खलास झालें, हें पाहून त्याची हिमत अगदींच खचली. पुढें मोहीम चालविण्याचा दम त्यास बिलकुल उरला नाहीं. त्याला आता असें वाटूं लागलें कीं, शिवाजीमहाराज मोठे दगेखोर असल्यामुळे ते केव्हां काय करितील याचा नेम नाहीं. आपला प्राण जाण्याची पाळी आली होती ती सुदैवानें चुकली. सिंहगडास वेढा देऊन बसावें तर पावसाचे दिवस आले. तशात आपल्या लोकाचा सगळा वकूबहि नाहींसा झाला. ते आता शिवाजीमहाराजांशीं सामना करण्याची गोष्टहि बोलूं

१ महाराजानी असली काही युक्ति योजिल्याचें किंवा सिंहगडास मोगलांनीं वेढा घातल्याचें प्रो. सरकार मानीत नाहींत.

देणार नाहींत. बादशहाच्या आग्रहास्तव मराठ्यांशीं लढत राहिल्यानें फौजेची नाहक खराबी होऊन ते काहीं हार जाणार नाहींत. शास्ताखानाच्या मनांत आणखी असा विचार आला कीं, आपण इतक्या कडेकोट बंदोबस्ताने राहिलो असता तेथे शिवाजीमहाराजानी प्रवेश करून आपला प्राण घेण्याचा घाट घातला. तेव्हा आपल्या गोटात फितुरी झाली आहे असें दिसते. यास्तव अशा फितूर झालेल्या लोकाचा इतबार धरून पुढे लढाई चालविण्यात काही अर्थ नाहीं अफझुलखानासारखी आपलीहि दशा व्हावयास चुकणार नाहीं असा विचार करून शास्ताखानानें सिंहगडास पुन वेढा घालण्याचा बेत मोडून व शिवाजीमहाराज जवळ असता पुण्यास तळ देऊन राहणें धोक्याचें आहे अशी त्याच्या मनाची पक्की खात्री होऊन तो तेथली छावणी उठवून पेडगावास जाऊन राहिला[1]

त्याला ह्या वेळी यशवतसिगाचा पुरा वहीम आला तो त्यास गाफीलगीरीबद्दल उघटउघट दोष देऊं लागला त्याने औरंगजेबास पत्र लिहून असें कळकळविले की, 'आपल्या सैन्यात फितुरी झाली असून यशवंतसिगास शिवाजीमहाराजानी लाच देऊन वश करून घेतले आहे[2] म्हणून आपली ही दशा त्यांनीं केली' हे वर्तमान बादशहास कळले तेव्हा तो पराकाष्ठेचा खिन्न झाला त्याच्या घराण्यातल्या सर्व माणसाना दु ख झाले त्याच्या दरबारच्या सगळ्या लोकाच्या मुद्रा उदास झाल्या शिवाजीमहाराजासारख्या य कश्चित् बडखोराने आपणास असे खाली पाहावयास लावले. याची त्याला मोठी शरम झाली त्याची आता अशी खात्री झाली की, शिवाजी मोटा सेतान पैदा झाला आहे कोणाच्या कधी ध्यानीमनी येणार नाहीं असें अचाट कर्म करून मोठमोठ्या शूर सरदाराचाहि नाश करण्यास तो चुकत नाहीं आपण एवढी मोठी सेना त्याच्यावर पाठविली असता तिचा काहींच उपयोग झाला नाहीं मोगलबादशाहीचा आब मात्र दवडिला असे मनात येऊन यापुढें दक्षिणेंतील मुलखाचे रक्षण कसे करावे ही चिंता त्यास उत्पन्न झाली. शास्ताखान व यशवंतसिग याच्यामध्ये बेबनाव आला आहे हे पाहून त्याच्या हाती दक्षिणेंतील व्यवस्था सोपविणे बरोबर नाहीं असा विचार

---

१ प्रो. सरकार ह्मणतात की, तो पुण्याची छावणी उठवून औरगाबादेस गेला

२ प्रो. सरकार ह्मणतात की, हा यशवतसिग महाराज ज्या वाटेन आले त्या वाटेजवळच आपल्या दहाहजार लोकाचा तळ देऊन होता त्याने महाराजास येते वेळी किंवा परत जाते वेळी मुळी अटकाव केला नाही किंवा त्याचा पाठलाग केला नाही, असा आरोप शास्ताखानाने त्याच्यावर ठेवला; परतु ह्या यशवतसिगास महाराजानी त्या वेळी वश करून घेतल्याचें कोणत्याहि बखरीत आढळत नाही.

करून त्यानें त्यांस माघारी बोलाविलें, आणि सुलतान मोअझिम यास दक्षिणेचा सुभेदार नेमिले शास्ताखानासारख्या बड्या सरदाराचा असा एकदम उपमर्द करूं नये म्हणून त्याला बंगालचा सुभेदार केले, व यशवंतसिग नाराज होऊन[1] कदाचित् मराठ्यास जाऊन मिळेल या भीतीने त्यास सुलतानाचा दुय्यम नेमून दक्षिणेतच ठेविलें. खरे म्हटले असता ह्या समयीं खुद्द औरंगजेबानेंच दक्षिणेंत स्वारी करून शिवाजीमहाराजाचे पारिपत्य करण्याचा निश्चय करावा, परंतु काश्मीराकडे काहीं राजकारण उपस्थित होऊन तो ह्या वेळी तिकडे जावयास निघाला होता

औरंगजेबाच्या आज्ञेमुळे शास्ताखान दक्षिणेतून निघून गेल्यावर यशवंत-सिगाने आपलें इमान व शौर्य याचे प्रदर्शन करण्याच्या इरायाने सिंहगडास पुन. वेढा दिला परतु महाराजाच्या लोकानी त्याच्यावर चोहोकडून घाले घालून त्याला असा काहीं घाबरवून सोडला कीं, त्याच्याने त्या किल्ल्यापाशी फार वेळ नेट धरवला नाहीं त्याचे पुष्कळ लोक मेले त्यात आणखी त्याच्या छावणीतील दारू-सामानाला आग लागून एकदम मोठा स्फोट झाल्यामुळे त्याचे वरेच लोक दगा-वले.तो थोड्याच दिवसात वेढा उठवून जेमतेम औरंगाबादेस जाऊन पाचला[2]

ह्याप्रमाणे शास्ताखानाची वाचटळ उडवून दिल्यावर महाराजानी लागलीच दक्षिण कोकणाकडे आपला मोर्चा पुन फिरविला ह्या वेळी अदिलशहा कानडा प्रातात मोहिमेवर गेला असून बेदनूरचा राजा शिवाप्पानायक हा तिकडे प्रबळ झाला होता त्याच्याशी लढत होता ही सधि साधून ते कोल्हापुरावरून व कुडाळावरून वेंगुर्ल्यापर्यंत आले ( मे स १६६३ ) ह्या वेळच्या इंग्रजा-च्या लेखात असें नमूद केले आहे कीं, महाराज ज्या ज्या गावावरून गेले त्या त्या गावच्या लोकास आपण किंवा आपले लोक मुळी उपद्रव करणार नाहींत असे कौल ते देत गेले वेंगुर्ल्याचे लोक ह्या वेळी महाराजाच्या तेथल्या

---

१ बर्निअर म्हणतो की, ह्या रजपूतसरदाराला बादशहानें दिल्लीस परत बोलाविले असता तो तिकडे न जाता आपल्या संस्थानास निघून गेला

२ जेध्याच्या शकावलीवरून असे दिसते की, यशवंतसिगाने स. १६६३ च्या डिसेंबर महिन्यात वेढा घातला असून स. १६६४ च्या जून महिन्यांत त्याला तो उठवून माघारी जावें लागलें. ह्या तारखा खऱ्या मानिल्या तर हा वेढा सहा महिने पडला होता असें म्हणावें लागतें.

ठाणेदारावर उठले होते ही बातमी लागताच ते त्या गांवीं गेले, आणि तेथल्या लोकास चागली शिक्षा देऊन व तेथल्या व्यापाऱ्यांस लुटून तेथे आपले दोन हजार लोक त्यानी ठेविले महाराज कोकणच्या बंदरापाशी परत आले असें कळताच साकळी, दिचोली वगैरे ठाण्यावरचे मुसलमान सुभेदार पळून गेले ही त्याची धामधूम ऐकून अदिलशहाने फोंडे येथील सुभेदाराला असा हुकूम पाठविला की, त्याने वाडीच्या सावंतास आपल्या लोकानिशी मदत करून राजापूर वगैरे ठिकाणच्या महाराजाच्या लोकास हाकून द्यावें, परतु त्याला ह्या हुकमाप्रमाणें वागण्याचा आवाका नव्हता वेंगुर्ल्याचा बदोबस्त करून महाराज लगबगीनें माघारी गेले

# भाग सतरावा.



## सुरत, बार्सिलोर वगैरे शहरांची लूट.

### स. १६६४—६५.

लढाईचा विचार सोडून यशवतसिग आरगबादेस परत जाऊन स्वस्थ बसल्यावर महाराजानी कल्याण व दडाराजपुरी ह्या दोन ठिकाणी आपल्या फौजेची जमाजम केली, आणि हे सैन्य जमा करण्याचा उद्देश लोकात असा खोटाच जाहीर केला कीं, वसई व चेऊल येथील फिरगी लोकावर स्वारी करावयाची आहे व शिद्दीस जेर करण्याचा पुन एक वेळ जोराचा प्रयत्न करावयाचा आहे परतु हे सैन्य एकत्र करण्याचा वास्तविक हेतु सुरतशहरावर हल्ला करून ते लुटण्याचा होता ह्या वेळीं हिदुस्थानात जी थोडी धनाढ्य शहरें होतीं त्यात सुरतशहराची गणना होत असे देशोदेशीचे व्यापारी ह्या शहरी येऊन हिदुस्थानाशी व्यापार करीत असत त्यामुळे तेथे मोठेमोठे व्यापारी पुष्कळ असत, व त्यापैकीं काहीं फारच सधन असत महाराजाच्या पदरी बहीरजी नाईक ह्या नावाचा एक अतिशयित हुशार मनुष्य होता. त्यास हेराचें काम सागितलें होतें तो नाना प्रकारचे वेश घेऊन सर्वत्र हिडत असे, व आपल्या धन्याला सर्व प्रकारची खरी माहिती नेहमी आणून देत असे त्यानें सुरतशहराची टेहळणी करून व तेथला बंदोबस्त वगैरे कसा काय आहे ते नीट बारकाईनें पाहून येऊन महाराजांस असें सागितले की, ह्या वेळी सुरतेवर हल्ला करून ती लुटल्यास अगणित द्रव्य मिळण्यासारखे आहे[1]

हेराने ही माहिती दिल्यावर महाराजानी पूर्वोक्त प्रकारे आपल्या सैन्याची तयारी करून त्या शहरावर स्वत मोहीम करण्याचे मनात आणिलें, कारण त्यांनी ह्यापूर्वी अनेक वेळां पाहिले होते कीं, कोणातरी सरदारास असली मोहीम सांगितल्यानें व्हावा तसा उपयोग होत नाहीं ह्या विचाराप्रमाणे ते दहा हजार

---

१ कित्येक इतिहासकारांचें असें ह्मणणे आहे की, शिवाजीमहाराजानी स्वत. वेश पालटून सुरतशहरांत प्रवेश केला, आणि तेथे तीन दिवस राहून अवश्य तेवढी माहिती मिळविली व श्रीमत सावकाराची घरें पाहून ठेविली.

निवडक मावळे बरोबर घेऊन ह्या स्वारीस निघाले त्याच्याबरोबर मोरोपंत, प्रतापराव गुजर, व्यंकाजीपंत, मकाजी आनंदराव, निळोपंत, अण्णाजीपत, दत्ताजीपंत, मानसिग मोरे व रुपाजी भोसले हे होते एवढ्या लोकानिशी त्यानीं कोंकणातून नीट सुरतेची वाट धरिली[1] परंतु आपण सुरतेवर हल्ला करावयास जात आहो असा सशय मोगलास येऊं नये ह्मणून त्यानी असा बहाणा केला कीं, आपण नाशिकतीर्थास जाऊन तेथून पुढे मोरोपनाने नुकतेच घेतलेल्या किल्ल्याची पाहणी करावयास चालले आहों हा खोटा बहाणा करून ते उत्तरेकडे कूच करून गेले, व मोठमोठ्या मजला करून अचानक सुरतेपाशी येऊन दाखल झाले सुरतेपासून २८ मैलावर गनदेवी ह्मणून एक गाव आहे तेथपर्यंत महाराज येऊन पोचले असून ते शहर लुटावयास येत आहेत अशी वार्ता शहरात येऊन पोचताच तेथले सगळे लोक अगदी घाबरून गेले आणि आपलीं बायकामुले घेऊन तापी नदीच्या पैलतीरी पळून जाऊं लागले काही श्रीमंत लोक किल्लेदारास लाच देऊन किल्ल्याच्या आश्रयास जाऊन राहिले महाराज पाच मैलाच्या टप्प्यात आले तेव्हा शहराचा मोगल सुभेदार इनायतखान यानें त्याच्याकडे एक माणूस खंडाचे बोलणे करण्यास पाठविला. त्याला त्यानी अटकेत ठेविले हे पाहून इनायतखान घाबरून गेला, आणि शहरातील लोकांचें काय होईल तें होवो, आपला जीव वाचवावा, अशा बुद्धीने हा ऱ्याट सुभेदार किल्ल्यावर जाऊन राहिला शहराचें रक्षण करण्याचा त्याने काहींच उपाय योजला नाहीं[2]

---

१ आमा ह्मणतो की, हा आपला बेत कोणास कळू नये ह्मणून त्यानी चेऊल व वसई ह्या शहरापुढे दोन छावण्या केल्या व असे भासविले की, ह्या दोन शहरावर आपणास हल्ला करावयाचा आहे मग वसईसमोरील छावणीतून चार हजार स्वार घेऊन ते निघाले व त्या छावणीत पूर्वीप्रमाणे बंदोबस्त ठेवावयास व रणवाद्ये वगैरे वाजवावयास त्यानी मागितले

२ कित्येक मराठी बखरकार ह्मणतात की, हा सुभेदार आपले लोक घेऊन महाराजांच्या लाकावर चालून आला पण सरकार त्या वेळच्या सुरतेच्या इंग्रज वगैरे व्यापाऱ्याच्या लेखाच्या आधाराने असे ह्मणतात की, ह्या सुभेदाराला शहराच्या रक्षणासाठी पाचशे लोक ठेवण्याचा खर्च मिळे, पण त्याने बहुतेक पैसे दाबून इतके लोक कधीहि ठेविले नव्हते, आणि शहरात मोठमोठे व्यापारी होते, पण आपल्या दौलतीच्या रक्षणासाठी त्यानी आपल्या पदरी मुळी लोक ठेविले नव्हते. बर्निअर व व्हालेन्टीन हे त्या काळचे प्रवासी असे ह्मणतात की, हा सुभेदार शिवाजी महाराजांला आडवा आला तेव्हां त्याची त्यांनी अशी समजूत केली की, आपण कांही शहरांत

महाराज ता. ६ जानेवारी स. १६६४ रोजी सुरतेजवळ येऊन बऱ्हाणपूर वेशीच्या बाहेरल्या बागेत उतरले. आदल्या रात्री त्यानी दोन जासूद पत्र देऊन शहरात पाठविले त्यात त्यानीं असें लिहिलें होतें कीं, शहराच्या सुभेदाराने आणि हाजी सय्यद बेग, बहारजी बोरा व हाजीकासम अशा तिघा अतिधनाढ्य सावकारानी आपल्याकडे येऊन शहराचा खंड ठरवावा, नाहीं तर आपण सगळें शहर जाळूनपोळून उध्वस्त करूं पण ह्या पत्राचा काहींच जबाब आला नाहीं तेव्हा महाराजाचे घोडेस्वार शहरात घुसले असें सागतात कीं, सुरतेजवळ आल्यावर त्यानी असें जाहीर केलें होतें कीं, शहरातील कोणाहि व्यापाऱ्यास उपद्रव करण्याचा आपला इरादा नाहीं तर औरंगजेबाने आपल्या राज्यावर स्वारी करून आपली बरीच खराबी केली व आपले काहीं संबंधी जन मारले त्याचा सूड उगविण्यासाठी मी आलों आहे. महाराजाचे लोक आत शिरू लागले तेव्हा किल्ल्यावरच्या लोकानी त्याच्यावर तोफाचा भडिमार चालविला. पण त्याची त्यानी मुळीं परवा केली नाहीं. त्या लोकानी किल्ल्यावरून खालीं उतरून आपल्या लुटीच्या कामास व्यत्यय आणूं नये म्हणून त्यानी किल्ल्यास मोरचे लावून त्याच्यावर खाली वंदुका वगैरे रोखीत राहून त्यास तेथेंच अडकवून ठेवण्यासाठी महाराजानी आपले काहीं लोक ठेवून दिले तो किल्ला मोठा बळकट होता तो सर होण्यासारखा नव्हता किल्ल्यावरून तोफा सुटत त्यामुळें महाराजाच्या लोकाची फारशी खराबी झाली नाहीं, पण त्यामुळें शहरातल्या घरादाराची मात्र पुष्कळ नासाडी झाली.

आत शिरून सावकाराचे वाडे काबीज करून महाराजानी चार दिवस तें शहर सावकाश लुटले जे श्रीमत लोक आपली लपवून ठेविलेली संपत्ति दाखवितात त्यांस मृत्यूची भीति घालून त्याजपासून ती हिरावून घेतली ह्या धामधुमींत महाराजांच्या तडाख्यात एक यहुदी सापडला हा कॉन्स्टन्टिनोपलचा व्यापारी असून यानें औरंगजेब बादशहास विकण्याकरिता अतिमोलवान् जवाहीर आणिलें होतें महाराजास हे वर्तमान लागून त्यानी त्यास आपल्यापुढें आणविलें, व जवाहीर कोठें ठेविलें आहे तें आणून द्यावयास सांगितलें. तो कांहीं केल्या

---

प्रवेश करणार नाही, असेच पुढे कूच करून जाणार ऑर्मी म्हणतो कीं, शहराचा सुभेदार व किल्ल्याचा सुभेदार असे दोघे घाबरून स्वरक्षणासाठी किल्ल्यात जाऊन राहिले; आणि जितक्या लोकाचा समावेश होण्याजोगा होता तितक्यास त्यानीं आत घेतलें.

कबूल होईना तेव्हा त्याला खाली पाडून त्याच्या मानेवर तीन वेळा तरवार ठेविली व ठार मारण्याची त्यास भीति घातली, परंतु तो यहुदी व्यापारी बिलकुल डगमगला नाहीं त्याला आपल्या जिवापेक्षा द्रव्य प्यारे वाटले दुसरा एक व्यापारी चाळीस बैलावर कापड लादून आग्र्याकडून सुरतेस आला होता त्याला पकडून आणून त्याच्याकडे नगदी नाणे मागू लागले तो ह्मणाला, माझ्याकडे हे कापड आहे हे अजून मी मुळी विकले नाहीं हे घेऊन मला सोडा पण त्याचे ते ह्मणणे महाराजाला खरे न वाटून त्याचा उजवा हात छाटला आणि त्याचे कापड महाराजाच्या लोकानी जाळून टाकले कारण असली अडगळ बरोबर वागविणे सोईचे नव्हते सोने, रुपे व जवाहीर जेवढे सापडे तेवढेच ते लुटीत असत

डच लोकाच्या वखारीजवळ वर सागितलेला वहरजी बोरा याचा वाडा होता ह्या व्यापाऱ्याची अपार संपत्ति होती असा सर्वत्र लौकिक होता त्याचा वाडा महाराजाचे लोक एक सबध अहोरात्र लुटीत होते तेथून त्यानी २८ शेर मोटी मोत्यें, हिरे, पाच, माणिक वगैरे पुष्कळ जवाहीर व अगणित द्रव्य लुटून नेले असे ह्मणतात तसाच इंग्रजाच्या वखारीपाशी वर सागितलेला हाजी सैयद बेग याचा वाडा व मोठमोठ्या वखारी होत्या, त्याच्या वाड्यात शिरून त्यानी पुष्कळ द्रव्य लुटले. ही ह्या वाड्याची लूट चालली असता इंग्रजाच्या वखारीच्या लगत्यास असलेला दुसऱ्या एका व्यापाऱ्याचा वाडा लुटून त्यास आग लावून देण्याच्या बेतात महाराजाचे लोक होते ह्या त्याच्या कृतीमुळे आपल्या वखारीला धोका आहे असे पाहून इंग्रज वखारवाल्याचे काहीं लोक त्यास प्रतिबंध करावयास बाहेर पडले त्याची व महाराजाच्या लोकाची काहीं वेळ चकमक होऊन ते तेथून निघून गेले सैय्यद बेग त्या वेळीं आपला वाडा सोडून किल्ल्यावर जीव घेऊन पळाला होता त्याच्या वाड्याच्या रक्षणार्थ इंग्रजानी आपले काही लोक ठेवून दिले त्यामुळे त्याच्या राहिलेल्या संपत्तीचा बचाव झाला असे ह्मणतात सुरत येथील इंग्रज वखारवाल्याचा मुख्य सर ऑक्झेन्डन याने शिवाजीमहाराज सुरत शहर लुटावयास येत आहेत असें ऐकताच आपल्या मत्तेचे रक्षण करावयाचें, ती सोडून पळून जावयाचे नाहीं असा निश्चय केला त्यानें स्वाली येथील आपल्या जहाजावरचे खलाशी वगैरे मिळून एकंदर दीडशें युरोपीअन व साठ देशी शिपाई यांस बंदुकावगैरे देऊन सज्ज केलें, आणि तारवावरच्या तोफा आणून त्या आपल्या वखारीच्या आसपास माऱ्याच्या

जागा पाहून रोखून ठेविल्या त्या अशा कीं, मराठे वखारीवर हल्ला करावयास आले तर त्याना तोफाच्या भडिमारामुळे पुढे येता येऊ नये त्याने हे आपले लोक महाराज शहरापाशी येण्यापूर्वी चोहोकडे फिरवून असें जाहिर केले होतें कीं, मराठ्याशी टक्कर देण्याची आपली तयारी आहे पुढे वर सागितल्याप्रमाणे सैयद बेग याच्या घराचा इग्रजानी बचाव करण्याचा घाट घातला आणि त्याचा वाडा लुटण्यास आपल्या लोकाना हरकत केली असें पाहून महाराजास त्याचा राग आला आणि त्यानी ऑक्झेन्डन यास सागून पाठविले की, आमच्याकडे तीन लाख रुपये पाठवून द्या अगर सैयद बेग याचा वाडा आह्मास लुटू द्या दोहोतली एकहि गोष्ट न कराल तर मी स्वत तुमच्यावर चालून येऊन तुमच्या एकूणएक माणसाची कत्तल करीन " ह्या त्याच्या निरोपास त्याने असा जबाब पाठविला की, यातली कोणतीहि गोष्ट करण्यास आह्मी तयार नाहीं तुम्ही आमच्यावर वाटेल तेव्हा चालून या ह्या त्याच्या धिटाईच्या जबाबावरून इंग्रजास शासन करावयास महाराज चुकले नसते, परतु त्याला माहीत होते कीं, त्याच्याशी भाडण्याच्या नादास लागून आपले लोक खराब केल्यासारखी त्याच्याकडून आपल्या लुटीत काहीं फारशी भर पडणार नाहीं शिवाय मोगलाची फौज तेथे येऊन पोचण्यापूर्वी शहरातून आपला पाय काढून मिळालेली मुबलक लूट सुरक्षितपणे आपल्या मुलखात होईल तितकी लौकर न्यावी हे बरे असा विचार त्याच्या मनात आला नसता तर त्याना गेदोनगे इग्रजाचा समाचार घ्यावयाचे मुळी कठीण गेले नसते. दुसरें असेंहि ह्मणावयाला हरकत नाहीं की, ह्या इंग्रजव्यापाऱ्याना होता होईतो आपण होऊन त्रास देऊ नये असे महाराजाना वाटत असे याचे एक उदाहरण येथे देतो महाराज सुरत शहरात शिरले तेव्हा अॅन्टनी स्मिथ नावाचा इस्टइन्डिआ कंपनीचा एक नोकर डच लोकाच्या जहाजातून उतरून किनाऱ्यावर येत होता त्याला महाराजाच्या लोकानी पकडून कैद केलें हा इग्रज गृहस्थ मराठ्याच्या छावणीत तीन दिवस इतर कैद्याबरोबर बंदीत होता तिसरे दिवशी त्याचा एक हात छाटण्याचा हुकूम महाराजानी केला, तेव्हा तो हिदुस्तानी भाषेत ह्मणाला, माझा हात छाटण्याऐवजी शिरच कापा त्यावरून त्याच्या डोक्याची टोपी काढली. त्याचे उघडे डोकें पाहताच तो इग्रज आहे असे ओळखून महाराजानीं त्याला मारूं नका ह्मणून सागितले, आणि त्याला ऑक्झेन्डन याच्याकडे कांहीं निरोप देऊन पाठविलें. ऑक्झेन्डन यानें त्याला उलट निरोप देऊन पाठविले नाहीं. ह्या इंग्रज-

गृहस्थानें महाराजाच्या छावणीत घडणारा सगळा प्रकार प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिला होता. तो म्हणतो कीं, महाराज एका तंबूंत बसत आणि पकडून आणलेल्या ज्या माणसावर असा आरोप होई की, यानीं आपलें द्रव्य लपवून ठेविलें आहे, दाखवित नाहींत, त्याचे हात किंवा डोकी तोडण्याचे हुकूम ते भराभर देत असत[1]

ह्या शहराची लूट चालविली असता महाराजांनी सर्वच लोकास आपलें उग्र स्वरूप दाखविलें नाहीं असें एकदोन गोष्टीवरून दिसून येतें एक गोष्ट अशी कीं, सुरतेस ह्या वेळी रेवरेन्ट फादर आम्ब्रोज ह्या नावाचा एक कापुशिअन पाद्री राहत असे त्याचे घर कोणीं दाखविले असता महाराजांनी त्याच्यावर हल्ला केला नाहीं त्या वेळी ते असें म्हणाले कीं, हे पाद्री लोक पवित्र आचरणाचे असतात, त्यास उपद्रव देणे बरोबर नाहीं दुसरी गोष्ट अशी कीं, त्या शहरात मोहनदास पारख या नावाचा एक डचलोकाचा दलाल होता हा चागला नीतिमान् असून मोठा धर्मशील होता हा काहीं वर्षापूर्वी मरण पावला असून त्याचे कुटुंब मागे होते ह्याच्या घरी पुष्कळ संपत्ति आहे, असें लोकानी महाराजाला सांगितलें, परतु त्या सत्पुरुषाची कीर्ति महाराजास विदित झाल्यामुळे त्यांनीं त्याच्या घरास बिलकुल हात लाविला नाहीं

ह्याप्रमाणे सुरतशहर लुटून झाल्यावर सगळी लूट घोड्यात भरून त्या घोड्यावर लादून महाराज रायगडावर सुरक्षित येऊन पोचले. त्यास अटकाव करण्याचे धैर्य कोणाहि मोगलसरदारास झालें नाहीं. ह्या मोहिमेत मिळालेल्या मालाचा हिशोब आकारून पाहता साडे आठ कोटि होनाची रक्कम झाली असें म्हणतात ह्या मोहिमेत मोगलाची व इतर सावकाराचीं पुष्कळ घोडीं आणिलीं होतीं, त्याच्या डाव्या टिरीवर चौकडीचे डाग देऊन खूण केली, व तेवढ्या घोड्याची नवी पागा केली. सुरतशहर लुटून आल्यावर त्यानी औरंगजेब बादशहास अशा आशयाचें पत्र पाठविलें कीं, "तुझा मामा शास्ताखान याला मीं शासन केलें. तुझ्या सुरतशहराची सुरत बिघडून टाकिली हिंदुस्थान हिंदूंचें आहे, त्याजवर तुझा हक्क नाहीं. दक्षिणेवरहि तुझा हक्क नाहीं. ती निजामसरकाराची असून त्या सरकारचा मी वजीर आहे." ह्या पत्रास त्या बादशहाकडून कांहींएक उत्तर आलें नाहीं.

---

१ हा सगळा मजकूर मुख्यत प्रो सरकाराच्या पुस्तकाच्या आधारानें दिला आहे. तो अर्थात् त्यानी त्या वेळच्या इग्रज व्यापाऱ्याच्या लेखावरून जुळविला आहे.

असें सांगतात कीं, इनायतखानाने महाराजांचा दग्यानें खून करण्याचा घाट घालून एका इसमास सलोख्याचें बोलणें करण्याच्या मिषानें पाठवून त्यांचा खून करावयास सांगितलें ह्या इसमानें महाराजाकडे जाऊन सुभेदाराकडच्या तहाच्या कांहीं अटी सांगितल्या त्या ऐकून महाराज त्यास ह्मणाले: "तुझा धनी बायकोसारखा किल्ल्यात लपून बसला आहे, त्याच्यासारख्या आह्मी बायका आहो काय, कीं त्याच्या असल्या अटी आह्मी मान्य कराव्या त्या?" त्यावर तो माणूस ह्मणाला "आह्मी कांहीं बायका नाहीं" तुह्मास आणखी कांहीं सांगावयाचें आहे असें बोलून तो लपवून आणलेला खंजीर चट्कन् बाहेर काढून महाराजाच्या उरात खुपसावयाला धावला त्याबरोबर महाराजाजवळ नागवी तरवार घेऊन एक शिलेदार उभा होता त्याने त्याचा तो खंजीर धरलेला हात छाटून टाकला तरी तो आवेशाने पुढे सरसावला असल्याकारणानें त्याच्या थुटक्या हाताचा महाराजावर असा जोराचा आघात झाला कीं, ते व तो असे दोघेहि जमिनीवर पडले त्या मारेकऱ्याला अर्थात् महाराजाच्या लोकानी छाटून पुरा केला, आणि त्या रागाच्या आवेशात ते कैद करून आणलेल्या लोकाची कत्तल करूं लागले इतक्यात महाराजानी वर उठून त्यांस त्या क्रूर कृत्यापासून परावृत्त केले

महाराज सुरत शहर सोडून परत गेल्यावर सातआठ दिवसानीं मोगलाचें सैन्य तेथे येऊन दाखल झाले तोपर्यंत महाराज परत येतील या धाकाने शहरातून पळून गेलेले लोक परत आले नव्हते ते आता हळूहळू येऊ लागले. इनायतखान किल्ल्यात लपून राहिला होता तो शहरात आला तेव्हा लोकानी त्याची छीथू केली, व त्याला शेणमार केला इंग्रज व्यापाऱ्यानी ह्या वेळी चांगली मर्दुमकी दाखविल्यावरून सर ऑक्झेन्डन याची सगळे लोक तारीफ करू लागले. असें सांगतात कीं, इंग्रज लोकाच्या धैर्यशालीपणामुळे त्याच्या वखारीच्या आसपासचा शहराचा बराच भाग शिवाजी महाराजाच्या हातून सुटला मोगलसेनापति शहरात आला तेव्हा सर ऑक्झेन्डन त्याच्या भेटीस गेला, आणि त्याच्या पुढें आपल्या हातची बंदूक ठेवून ह्मणाला "मी हे माझ्या हातचे शस्त्र आतां खालीं ठेविले आहे, आता ह्या शहराचे रक्षण करणें तुमच्याकडे आहे" तो सेनापति त्याची वाखाणणी करून ह्मणाला, 'तुह्माला शिरपाव व घोडा देऊन तुमच्या कमरेला तरवार बांधून तुमचें गौरव करणे मला उचित आहे.' तो ह्मणाला 'हा जामानिमा योद्ध्याला उचित आहे. मी कांहीं योद्धा नव्हें.

आह्मी व्यापारी आहों. आमच्या व्यापाराला सवलती तुमच्या बादशहाकडून मिळाव्या एवढीच आमची अपेक्षा आहे. औरंगजेबानें सुरतेतील व्यापाऱ्यांचें हें असें भयकर नुकसान झालें याबद्दल आपली सहानुभूति त्याना सर्वांना आयात मालावर एक वर्षपर्यंत जकात माफ करून प्रगट केली आणि इंग्रज व डच व्यापाऱ्यानी मर्दुमकी दाखविल्याबद्दल त्याच्या मालावर एक टक्का जकात माफ केली[1] इस्ट इन्डिआ कंपनीच्या व्यवस्थापकानी सर ऑक्सेन्डन यास ह्या शौर्याच्या कामगिरीबद्दल एक सुवर्णपदक दिले

सुरतेहून परत आल्यावर शहाजीराजे मरण पावल्याची अत्यंत शोकजनक वार्ता महाराजास कळली त्यामुळे त्याचे कांहीं दिवस दु खात व पित्याचे और्ध्वदेहिक करण्यात गेले ह्या वेळी महाराज सिंहगडावर होते सर्व विधि आटोपल्यावर ते पुन रायगडावर गेले तेथे राहून आपल्या एकदर कारभाराची व निरनिराळ्या खात्याची सुव्यवस्था त्यानी लाविली शहाजीराजे वारल्यावर त्यानी आपल्या नावास राजे हा किताब जोडला, व आपल्या नावाचे नाणे पाडले

ह्या वेळी महाराज अमळ स्वस्थ होते तरी त्याच्या लोकाचा मोगलाच्या मुलखात सारखा धुमाकूळ सुरू होता नेताजी पालकर आपल्या स्वारानिशीं वर्षाचे आठ महिने मुल्खगिरी करून वर्षाकाळाच्या आरभी पुष्कळ लूट घेऊन परत येत असे महाराजाचें आरमारहि स्वस्थ राहिले नव्हते समुद्रातून जाणारी-येणारी व्यापाऱ्याची तारवें लुटून किंवा धरून आणण्याचा क्रम त्याचा सर्व काळ चालू असे. मोगलाची जहाजे मक्केस जाणाऱ्या यात्रेकऱ्यास घेऊन जात, ती पकडून श्रीमंत यात्रेकऱ्याकडून ते दंड घेत असत खुद्द महाराजानी नंतर लवकरच अहमदनगरावर हल्ला करून तेथील पेठ लुटली,व औरंगाबादेपर्यंतचा मुलूख पुन लुटून उध्वस्त केला

ह्याप्रमाणे महाराज इकडे गुंतले आहेत असें पाहून, पन्हाळ्यावर विजापूरसरकारचे दोन सरदार होते, त्यानी महाराजाशी झालेला तह मोडून कोंकणपट्टी परत घेण्याचा मोठ्या जोराचा प्रयत्न केला. कित्येक ठाणी त्यानीं सर केलीं. ही त्याची धामधूम कानीं येताच महाराज अतिवेगानें त्या प्रातात येऊन दाखल झाले. इतक्या लवकर ते त्या मुलखात येऊन पोंचतील असें त्या सरदारांस

---

१ प्रो. सरकार पृ. ११८. कोणी ह्मणतात की, औरंगजेबानें ह्या वेळीं इंग्रजांच्या मालावर अडीच टक्के जकात माफ केली.

वाटलें नव्हतें. त्यानीं त्या सरदाराशीं सामना करून त्यांचा पराभव केला, व त्याच्या हजारों सैनिकाची कत्तल उडविली जवळजवळ सहा हजार लोक ह्या युद्धांत समरभूमीवर पतन पावले असा कारवार व विजापूर येथील इंग्रज व्यापाऱ्याचा लेख आहे[1] ( नवेंबर सन १६६४ )

विजापुरकराच्या सरदाराचा वर सागितल्याप्रमाणे पुरा पराभव करून ते पुन. सिंहगडावर लगबगीने आले कारण जुन्नर येथे मोगलाच्या सैन्याची छावणी होती तेथे आणखी लोक औरंगाबादेहून रवाना होऊन ते महाराजाच्या ताब्यातील ठाण्यावर हल्ले करण्याच्या तयारींत आहेत असें वर्तमान महाराजाच्या कानीं आलें होते, परतु महाराज पुन सिंहगडावर येऊन दाखल झाले असे पाहून मोगलानी आपली हालचाल बंद केली

ह्याप्रमाणें मोगल जागच्याजागी स्वस्थ बसले असें पाहून महाराजानी आपले काहीं स्वार कृष्णानदीच्या दक्षिणेस विजापूरकराच्या मुलखात लुटालूट करावयासाठी रवाना केले असें सागतात कीं, महाराजाच्या तीनशे घोडेस्वारानी स १६६४ सालच्या दिसेंबर महिन्यात हुबळी शहरावर घाला घालून ते यथेच्छ लुटले शहरातले लोक पळून गेले मराठे शहर लुटून परत गेल्यावर कित्येक दिवस ते पुन स्वस्थानी आले नाहींत ह्या शहराची लूट करावयास रुस्तमजमानाच्या[2] लोकानी मराठ्यास मदत केली असा इग्रज व्यापाऱ्यांचा त्या

१ ह्या लढाईत महाराजाचा पराभव होऊन ते एका किल्ल्यात पळून गेले, आणि तेथे त्यास मुसलमान सरदारानी घेरले असे इग्रज व्यापारी ह्मणतात परतु मराठा बखरकार ह्मणतात की, महाराजानी त्याचा पराभव केला बसातीन-इ-सलातिन नामक बखरीत ह्या लढाईच्या सबधाने असा उल्लेख आहे की, औरगजेबाने महाराजावर जयसिगास पाठविण्याची तयारी करून, अदिलशहाकडे वकाल पाठवून त्याला शिवाजीवर दक्षिणेकडून स्वारी करावयास सागितल्यावरून त्यास जयसिग दक्षिणेत येऊन पोंचण्यापूर्वींच खवासखानास मोठे सैन्य देऊन महाराजावर पाठविले तो आपणावर चालून येत आहे असे कळताच महाराजानी त्याला एका अडचणीच्या ठिकाणीं गाठून अगदी जेर केले ह्या युद्धात मुसलमानाचे तीनचार सरदार पडले हा असा आपला मोड होतो असे पाहून खवासखान जिवावर उदार होऊन, हाती तरवार घेऊन रणकदनात घुसला हे त्याचे धाडस पाहून त्याचे लोक त्याच्या मागून मराठ्यावर तुटून पडले, आणि महाराज पराभव पावून पळून गेले

२ मागल्या भागांत सागितल्याप्रमाणे रुस्तमजमान यानें मोगलास मुलथाप देऊन नेताजी पालकरास त्याच्या तावडींतून सोडविलें; ह्या त्याच्या गुन्ह्यास्तव अदिलशहानें त्याला आपल्या नोकरींतून दूर केलें होतें.

वेळचा लेख आहे हुबळीशिवाय आणखी बरीच शहरें महाराजाच्या लोकानी लुटलीं. हा असा त्रास तिकडून शह देऊन इकडून त्या सरकाराची बार्सिलोर वगैरे धनाढ्य शहरें खत जाऊन लुटण्याचा बेत त्यानी केला बार्सिलोरशहरास जलमार्गाने जाण्याचें ठरवून मालवणास सिधुदुर्गापाशीं आपलें मोठे आरमार महाराजानी सज्ज करावयास लाविले [1] हा आपला बेत अगदी गुप्त ठेवण्यासाठीं त्यानीं बाहेर अशी बातमी पसरविली कीं, मोगलाच्या जुन्नर येथील छावणीवर हल्ला करण्याच्या तयारीनें आपण चाललों आहों अशी गुलकावणी दाखवून ते एकाएकीं मालवणास प्राप्त झाले आणि जहाजात बसून गोव्यावरून बार्सिलोर-शहरास[2] गेले ( फेब्रुवारी स १६६५ ) त्या शहरापाशी पोंचून सूर्योदयाच्या सुमारास ते शहरात शिरले तेथले लोक अर्थात् अगदी बेसावध होते समुद्रातून कोणी शत्रु आपल्या शहरावर चालून येईल हे त्याच्या ध्यानीमनीहि नव्हतें एक दिवस तेथे राहून त्यानी सगळे शहर लुटून फस्त केलें सुरत शहराप्रमाणेंच ह्या शहरात पुष्कळ लूट मिळाली असें ह्मणतात लुटीचा एकंदर ऐवज दोनतीन कोटीचा होता

हे शहर लुटल्यावर तेथून पुढे कूच करून कडवाल,सिद्धेश्वर, मिर्जान, अकोला, कोद्रे,हुमाऊद वगैरे ठिकाणे त्यानी सर करून तेथे आपला अमल बसविला,त्यानी गोकर्णमहाबळेश्वर हस्तगत करून तेथल्या देवस्थानाचे दर्शन घेतलें व तेथं पुष्कळ दानधर्म केला शिवाप्पा नाईक[3] नामेंकरून एक जहागीरदार बेदनूरप्रातांत स्वतंत्र होऊन बसला होता त्याला तिकडे जाण्यापूर्वी महाराजानी असा निरोप पाठविला होता की, तुह्मी आह्मास प्रतिवर्षी काहीं पेशखुष देऊ करून तुमचा वकील आमच्याकडे ठेवावा ह्यास त्या मगरूर राजाने असा जबाब दिला होता की, आह्माकडून पेशखुष घेण्याची तुह्मास ताकद असल्यास ते येऊन घ्या हा

---

१ ह्या वेळी त्यानी ८५ साधारण जहाजें व तीन मोठी जहाजे मज्ज करविलीं असें ह्मणतात. ( प्रो सरकार पृ० ३०८ )

२ ह्या शहराचें नाव काही बखरीत बसनूर असे आहे. शि. दि यांत याचे नाव हरहमनूर असे आहे. रायरीच्या बखरीत नुसते हसनूर असें आहे प्रो सरकार याचे नांव बसरूर असे देतात.

३ पारशी बखरीत याचे नाव भद्राप्पा असें दिलें आहे. ह्या राजास स. १६६३ त अदिलशहानें आपला अकित केले असून तो त्याच वर्षी मरण पावला असे इग्रज व्यापाऱ्याच्या लेखावरून दिसून येतें. परतु तो स. १६७० त मृत्यु पावला असा इतरत्र उल्लेख आहे.

उद्दामपणाचा जबाब महाराजास सहन झाला नाहीं. पुढें तिकडील प्रांतांत वर सांगितल्याप्रमाणें स्वारी करून एकएक ठाणें ते सर करीत चालले, तेव्हां तो नाईक अगदीं घाबरून गेला. त्यानें आपला वकील तत्काळ महाराजांकडे पाठविला त्याच्याबरोबर त्यांस मोठा उंची पोषाख व एक लाख रुपयांचें जवाहीर त्यानें नजर पाठविलें ह्याप्रमाणें अतिशयित नम्रता व स्नेहभाव दाखवून तो स्वत महाराजाच्या भेटीस आला, आणि त्याने त्याच्यापाशीं असा करार केला की, आपण दरसाल तीन लक्ष रुपये खंडणीदाखल देत जाऊं ह्या त्याच्या करारानें व नम्रतेनें महाराज खुष झाले, व त्यास अभय देऊन त्यानी त्याच्यापाशी उमाजीपतास वकील ह्मणून ठेविलें त्या वेळीं सोमराणीचें ठाणें एका जमेदाराच्या हवाली होते ते त्यानें महाराजाच्या स्वाधीन केलें

गोकर्णास आल्यावर महाराजानीं फक्त बारा जहाजें ठेवून बाकीचें आरमार परत पाठविलें, व चार हजार लोकासह पुढे कूच करून आणखी कित्येक व्यापाराची शहरे लुटून ते कारवारास आले ते तिकडे येत आहेत असें ऐकून तेथल्या इग्रज व्यापाऱ्यानी आपली सगळी रोकड व इतर वाहून नेण्यासारखी चीजवस्त तेथल्या नदींत मस्कतच्या इमामाचें लहानसें गलबत होतें त्यात नेऊन भरली, आणि आपणहि त्यात जाऊन राहिले त्या शहरात त्या वेळी शेरखान आपल्या पाचशे लोकासह अवचित आला होता. त्याने महाराजास सागून पाठविले कीं, तुह्मी शहरात प्रवेश करावयास याल तर आह्मी त्याचे रक्षण करण्यास बिलकुल कसूर करणार नाहीं. महाराजानीं काळा नदीच्या मुखाशी आपल्या सैन्याचा तळ देऊन शेरखानास असा निरोप पाठविला की, इंग्रज लोक आमचे कट्टे दुस्मान आहेत त्याचा मला सूड घ्यावयाचा आहे शेरखानाने हा त्याचा निरोप इंग्रज व्यापाऱ्यास कळविला तेव्हां त्यानीं असें सागून पाठविलें कीं, आमच्याकडून तुह्मांस द्रव्याच्या ऐवजीं दारूगोळ्याची बिदागी मिळेल हे ऐकून महाराज पराकाष्ठेचे सतापले आणि त्यांनीं इंग्रजास पकडल्यावांचून जावयाचें नाहीं असा निश्चय केला हा त्याचा बेत ऐकून शेरखानानें कारवारच्या सगळ्या व्यापाऱ्याकडून काहीं द्रव्य घेऊन व इंग्रजाकडून एकशे बारा पौड घेऊन ते महाराजांस दिले ते हातीं पडल्यावर ते तेथून निघून गेले कारवाराजवळ असता जयसिंग दक्षिणेंत येऊन आपल्या मुलखावर स्वारी करण्याच्या बेतांत आहे, असें वर्तमान महाराजांच्या कानीं पडतांच ते वर सांगितल्याप्रमाणें कारवारच्या व्यापाऱ्यांकडून जें कांहीं द्रव्य

मिळालें तेवढ्यानें समाधान मानून ते स्वराज्यांत परत जावयास निघाले त्यांनीं आपलें सारें लष्कर खुषकीच्या मार्गाने रवाना केले, व आपण स्वत एका मोठ्या पालात बसून जलमार्गाने निघाले. मनात कीं, अनुकूळ वारा लागल्यास कोकणच्या किनाऱ्यावर लवकर जाऊन पोहंचता येऊन तिकडे शिद्दीची हालचाल काय आहे ते लागलीच कळेल परतु वारा प्रतिकूळ लागून जहाजे चालतनाशी झाली त्यामुळे त्यास बरेच दिवस पाण्यात खोळंबून राहावे लागले. अशा रीतीनें अफाट समुद्रात रखडत राहिल्याने आपल्या राज्यातील हालहवाल व शत्रूची हालचाल काहीएक कळतनाशी होते हे कांहीं ठीक नव्हे, असा विचार करून महाराज पुन कधी आरमार घेऊन जलमार्गाने मोहिमेस गेले नाहीत कारण उघडच आहे की ज्या पुरुषास क्षणभर स्वस्थ बसवत नसे, व प्रत्येक दिवशी हेराच्या व वाकिन्काच्या द्वारे चोहोकडची माहिती कळल्यावाचून चैन पडत नसे, त्यास दिवसाचे दिवस पाण्यात डुबत राहून जमिनीवरील माहिती मुळीच कळण्याचा मार्ग नसावा हे कसें आवडेल[१]

---

१ ह्या त्याच्या पराक्रमाचे वर्णन करिताना इग्रज व्यापाऱ्याना महाराजाच्या रणवेगाचा अत्यत अचबा वाटून ते असे लिहितात की, शिवाजीमहाराजाचा देह वायुरूप असून त्याला पख असावे असे ज्याला त्याला वाटू लागले आहे कारण ते कोणत्या वेळी कोठे प्रगट होतील याचा काहीच नेम नाही ते आज एका जागी आहेत तर उद्या दूर कोठे गेल्याची बातमी येते ज्या ठिकाणी कडेकोट बदोबस्त असतो त्यावर हल्ला करून आपल्या लोकाची खराबी करावयास ते कधीहि उद्युक्त होत नाहीत ज्या शहरास व गावास तटबदी वगैरे काही नाही व जेथे लष्करी बदोबस्त वगैरे फारसा नाही अशाच ठिकाणावर ते हल्ला करून ती लुटतात त्याच्या ठायी उद्योगशीलता, श्रमसहिष्णुता, जोम व चपलता ही विलक्षण आहेत असे जो तो बोलत असतो (प्रो सरकार पृष्ठ १८९) दक्षिण कोकण व उत्तर कानडा प्रातातील त्याच्या मोहिमासबधाने ह्या इग्रज व्यापाऱ्यानी आणखी असें लिहून ठेविले आहे की, दक्षिणेत व सगळ्या दक्षिण किनाऱ्यावरील प्रातात सारख्या लढाया सुरू आहेत येथले राजे परस्पराशी सारखे भांडत आहेत शिवाजीचा जिकडेतिकडे विजय होत आहे. त्याला आवरण्याचा आवाका कोणालाहि नाही. त्याचा सगळ्या लहानमोठ्या राजांना पराकाष्ठेचा धाक वाटत आहे. (प्रो. सरकार पृ. ३०६)

# भाग अठरावा.



## मिर्झाराजा जयसिंग याची स्वारी.

### १६६५–६६

दक्षिणेकडील मोहिमेवर असता जयपूरचा मिर्झाराजा जयसिंग व दिलेरखान अशा दोन सरदारास बरोबर मोठे सैन्य आणि युद्धोपयोगी सामान व सरजाम मुबलक देऊन औरंगजेबाने आपले पारिपत्य करण्यास रवाना केल्याचें कळताच महाराज मोठ्या त्वरेने रायगडावर येऊन दाखल झाले शास्ताखानाचा मोड होऊन तो परत गेल्यावर व यशवतसिंग हतपराक्रम होऊन जागच्या जागी स्वस्थ बसल्यावर महाराजावर औरंगजेब अतिशयित रुष्ट झाला असून त्याचा नाश करण्याचा पुन प्रयत्न करण्याचे त्याने इतके लाबणीवर टाकिलें याचे मुख्य कारण असें होते कीं, त्याला ह्या वेळी स्वताचीच सुरक्षितता वाटत नव्हती. त्याने आपल्या बापास कैदेत टाकून व भावास खडे चारून गादी बळकाविली असल्याकारणाने त्याच्यावर केव्हा कोणता प्रसग येईल याचा नेम नव्हता मोअझिम यास दक्षिणेतील सुभ्यावर त्याने पाठविले होते, पण त्याच्या हवाली मोठी फौज करून त्यास शिवाजीमहाराजाबरोबर युद्ध करावयास सागावें तर तो काय करील याचा नेम नव्हता कारण जसें आपण आपल्या बापाशी वर्तन केले तसेंच आपला मुलगा आपल्याशी करण्यास चुकणार नाहीं अशी औरंगजेबाला नेहमी भीति असे यास्तव त्यानें असा बेत केला होता कीं, उत्तरेकडे एकदर स्थिरस्थावर झाल्यावर व आपली सत्ता निवधपणें स्थापित झाल्यावर दक्षिणेवर आपण स्वत मोठ्या सन्यानिशी स्वारी करून शिवाजीमहाराजाचा व विजापूरच्या अदिलशाहीचा एकदम नाश करून टाकावयाचा. शिवाजीमहाराजानी शास्ताखानाला अवचित गाठून घाबरा केला तरी त्यात त्यानी काहीं पुरुषार्थ केला नाहीं, विजापूरसकारास ते भारी झाले होते तें तरी त्या सरकारच्या दुर्बलतेमुळें सभविलें, खरें झटलें असतां ते आपल्यापुढें केवळ क.पदार्थ आहेत; त्याला चिरडून टाकण्यास उशीर लागणार

नाहीं, असें औरंगजेबाला वाटत होतें. तो महाराजांला 'पहाडका चुवा' ह्मणत असे. महाराजांच्या वास्तविक सामर्थ्याची ही अशी कल्पना औरंगजेबाच्या मनात बरेच दिवस वागत होती.

महाराजानीं मोगलाच्या मुलखात सारखा धुमाकूळ उडवून देऊन बरींच ठाणीं सर केलीं, सुरतशहर लुटलें, आपल्या नांवास राजा हें पद जोडून आपल्या नावाचें नाणें पाडले, इत्यादि गोष्टीनी औरगजेबास त्याचा विशेषच राग आला होता त्यात आणखी त्यानी आरमार तयार करून मक्केस जाणाऱ्या मोगल व मुसलमान यात्रेकरूंची जहाजे पकडून लुटण्याचा धुमधडका चालविला, तेव्हा आपल्या धर्माविरुद्ध अशी आगळीक करणाऱ्या काफराचा एकदम नाश करून टाकावा असा निश्चय करून त्याने वर सागितल्याप्रमाणें मिर्झाराजा जयसिग व दिलेरखान यास बरोबर मोठी फौज देऊन रवाना केलें[१] आता, हे असे दोन सरदार पाठविण्यात औरगजेबाचा मतलब अर्थात् असा होता कीं, त्यांतकीं एक कोणी फितूर झाला तर दुसरा तरी आपल्याशी इमानाने वागेल कारण शिवाजीमहाराज शत्रूच्या सरदारास फितूर करण्याच्या कलेत मोठे प्रवीण होते हे त्याला कळून आलें होतं दिलेरखानास औरगजेबाने असा कानमत्र दिला होता कीं, 'जयसिग हिंदू असल्याकारणाने तो शिवाजीमहाराजाशी मिलाफी होऊन कांहीं फितवाफितवी करील तर ती त्यास करूं देऊ नको, सावध राहून बारीक बातमी ठेव व दगा खाऊ नको खरें ह्मटले असता ह्या दोन्ही सरदारावर औरगजेबाचा इतबार नव्हता परतु तूर्त दक्षिणेतील शत्रूस कमकुवत करण्याच्या कामी त्याचा उपयोग होईल असें समजून त्यास त्याने रवाना केलें होते

ह्या कामी अदिलशहाची मदत मिळावी ह्या इराद्यानें औरगजेबाने एका वकिलासमागमे त्या सरकारास पुढील आशयाचे पत्र पाठविलें " शिवाजी फार दंगा करून फंदफितूर व बड करीत आहे, मुसलमानास फार पीडा देत आहे, व सर्व रयतेस अत्यंत दु ख देऊन उपद्रव करण्यास मागेपुढें पाहत नाहीं याकरिता त्याचें पारिपत्य करण्याविषयी ढिलाई करून चालढकल केल्यास मुसलमानी राज्य बुडून जाईल याकरिता सर्व मुसलमानास व आह्मा उभयतां मुसलमान बादशहास ह्या सर्व फदफितुरीचे व बंडाचें मूळ कारण जो शिवाजी

१ ह्या सरदाराबरोबर आणखी दाऊद खान, राजारायसिंग, राजासुजनसिग बुंदेले, किरतसिंग ( ह्या जयसिगाचा मुलगा ), मुल्ला याह्यियन वैती ( पूर्वीचा विजापूरकरांचा सरदार) वगैरे इतर सरदार होते असे प्रो. सरकार ह्मणतात. (पृ १२०)

त्याचा समूळ नाश करून गोरगरीब रयतेस त्याच्या जाचांतून सोडविणें प्राप्त आहे याविषयीं यत्न करण्यास यत्किंचित्हि आळस करून उपयोग नाहीं. यास्तव आमची मनीषा अशी आहे कीं, इकडून त्या खराब शिवाजीच्या पारिपत्यावर मोठे शूर योद्धे व शिपाई रवाना होत आहेत, असेच आपणांकडूनहि रवाना व्हावे, आणि उभयतानीं त्या शिवरूपी सर्पाचें मस्तक फोडून त्याच्या गैररहा वागणुकीचा सूड घ्यावा या सर्व फंदफितुरीचा काटा मार्गातून उपटून काढावा असें केल्याशिवाय तो कधींहि वठणीस यावयाचा नाहीं, आणि हा जबरदस्त उपद्रव देऊं पाहणारा काटा फार बळावला नाहीं तोंच काढून टाकल्याशिवाय स्वस्थता प्राप्त होणार नाहीं. हें आपणास पसत पडल्यास आपण व आह्मी ह्या उभयता बादशहामध्ये साफी व मित्रता राहील, काहीं एक कपट किंवा वैर राहणार नाहीं " हा औरंगजेबाचा निरोप पसत वाटून अदिलशहानें मदत करण्याचें वचन दिलें, व त्यानें खवासखानाला महाराजावर जंगी फौजेनिशी पाठविलें ह्या सरदारास महाराजानी बिकट ठिकाणीं गांठून त्याशी मोठ्या निकराचा सामना केला, व त्याचा पराभव करून त्यास विजापुराकडे पिटाळून लाविलें हे मागल्या भागात सागितले आहे

मिर्झाराजा जयसिंग व दिलेरखान यास दक्षिणेंत पाठविलें तेव्हा मोअझिम व यशवंतसिंग यास दिल्लीस परत जावे लागलें त्यास परत बोलाविण्याचे कारण अर्थात् असें होते कीं, त्याच्या हातून काहींच पराक्रम झाला नव्हता, शिवाजी महाराजास दाबात ठेवण्याचा वकूब त्याच्यात मुळीच नव्हता, व ते कदाचित् शिवाजीमहाराजाशी मिलाफी होऊन त्यास हवा तसा धुडगूस घालूं देत असावे, असाहि वहीम त्या बादशहास आला असावा ह्या नवीन पाठविलेल्या सरदारास औरंगाबादेचा सुभा सागून मुख्य दोन कामगिऱ्या सागितल्या होत्या एक अशी कीं, त्यानी शिवाजीमहाराजाचा नायनाट करावा, व दुसरीं अशी कीं, विजापूर सरकाराकडून खडणी वेळच्या वेळीं पोंचत नसे ती त्याच्याकडून वसूल करावी, व त्यानी पुन मोगलाशी विरोध प्रगट केला होता, यास्तव शिवाजीमहाराजांचा समाचार घेतल्यावर त्या सरकाराचें पारिपत्य करावे.

जयसिंग मोठ्या जय्यत फौजेनिशी महाराजांचें पारिपत्य करावयास दक्षिणेंत मोठ्या उत्साहानें आला खरा, परंतु महाराजांचे पराक्रम त्याच्या कानी वेळोवेळां गेले होते आणि त्याची युक्तिमत्ता, साहस, शौर्य व धमक अप्रतिम असून

---

१ मोडककृत अदिलशाहीचा इतिहास पृ. २१२

त्यांच्या पदरचे लोक हातावर शिर घेऊन लढण्यास सर्वदा तयार असत, हे त्यास चांगलें कळून आले होते अशा प्रतापशाली पुरुषाशी सामना करण्याचें काम काहीं सोपें नव्हते हे तो जाणून होता यास्तव आपली मोहीम कशी यशस्वी करावी या चितेत तो रात्रंदिवस पडला होता असे त्या वेळी त्याने औरगजेबास पाठविलेल्या पत्रावरून दिसून येतें त्याने ह्या वेळी महाराजाच्या सगळ्या शत्रूंस उठवून त्याच्यावर चोहोंकडून एकदम हल्ला करविण्याचे योजिलें त्याने विजापूरकरास असें आमिष दाखविले कीं, ते शिवाजीमहाराजावर दक्षिणेकडून फौज पाठवून त्यास हैराण करितील तर त्या सरकाराला मोगलबादशहाला जी खंडणी प्रतिवर्षी द्यावी लागत असे ती बरीच कमी करण्यात येईल शिवाय बादशहाची त्या सरकारावरची वक्रदृष्टि नाहींशी होईल त्याने फ्रान्सिस व डिक अशा दोन युरोपिअन गृहस्थाच्या हाती युरोपिअन व्यापाऱ्याच्या पश्चिम किनाऱ्यावरील निरनिराळ्या ठाण्याच्या प्रमुखास अशी पत्रे पाठविली कीं, शिवाजीच्या पारिपत्यासाठी बादशाही फौज दक्षिणेत आली आहे तिला तुह्मी मदत करावी शिवाजीने आरमार तयार करून पश्चिम किनारा सगळा काबीज करण्याचा क्रम चालविला आहे, तरी त्याच्या आरमारास साधेल तेवढा शह द्यावा असेंच पत्र त्याने जंजिऱ्याच्या शिद्दीला लिहिले आणि औरगजेबास असे लिहून कळविलें कीं, गुजराथेकडून बादशाही आरमार दक्षिणेकडे येऊन शिवाजीच्या आरमारावर हल्ला करावयाची ही सधि उत्तम आहे दक्षिणेतील ज्या ज्या मराठे सरदाराशी व राजाशी महाराजानी विरोध केला होता त्यास महाराजावर उठविण्यासाठी जयसिगाने काहीं ब्राह्मण वकील चोहोकडे पाठविले. त्याने कर्नाटकातल्या जहागिरदारास व राजासहि पत्रे पाठवून बादशाही फौजेस येऊन मिळावे व विजापूरकरास व शिवाजीमहाराजास शह द्यावा असें सागितले ह्या त्याच्या पत्रावरून बेदनूरचा शिवप्पा नाईक व बसवपट्टनचा जहागिरदार हे आपल्या लोकानिशी जयसिगाच्या मदतीस गेले जव्हारच्या राजाने जयसिगाकडे आपला वकील पाठवून बादशहाची मोहीम यशस्वी होण्यासाठी मदत करण्याचें अभिवचन दिलें. त्यावरून जयसिंगाने त्या राजाला असें सागून पाठविलें कीं, तुम्ही आपल्या भावाबरोबर किंवा मुलाबरोबर आपले लोक देऊन इकडे पाठवावे ह्मणजे तुह्मांस बादशहाकडून मोठी मनसब देववितों जावळीच्या मोऱ्याचे दोघे मुलगे बाजी आणि अबांजी यानी जयसिगाकडे एक ब्राह्मण पाठवून असें कळविलें कीं, आह्मांस द्रव्याचें साहाय्य देऊन मोगलांच्या छावणीपर्यंत सुरक्षितपणें

न्याल तर तुमच्या लष्करांत नोकरीस राहण्याची आमची तयारी आहे. त्याप्र-माणें त्यास जयसिंगानें आपल्याकडे आणविलें त्याच्याबरोबर आणखी माण-कोजी धनगर गेला अफझुलखानाचा मुलगा फाझलखान आपल्या बापाच्या मृत्यूबद्दल शिवाजीमहाराजाचा सूड उगविण्यास एकसारखा पाहत होता, तो जयसिंगाला जाऊन मिळाला कल्याणप्रांताच्या उत्तरेस कित्येक कोळी राजे होते ते जयसिंगाच्या तोफखान्यावर एक युरोपिअन होता त्याच्या मध्यस्थीने मोग-लास जाऊन मिळाले जयसिंगाने महाराजाच्या पदरच्याहि काहीं अमलदारास द्रव्याची व मोठ्या हुद्याची लालूच दाखवून फितविण्याची खटपट केली तीमुळे पुरंदर किल्ल्यापाशी महाराजाचे तीन हजार घोडदळ होते त्यावरील अमलदार आत्माजी व कहर कोळी यांनी जयसिंगाकडे आपला माणूस पाठवून महाराजास सोडून मोगलाकडे येण्याची आपली तयारी आहे असे कळविले सुपेपरगण्याच्या मूळच्या जहागीरदाराचे दोन वंशज राम व हनुमंत हे चांदाच्या राजाचे सरदार होते त्यांना तिकडील मुलखाची चांगली माहिती असल्याकारणाने जयसिंगाने त्यास आपल्याकडे बोलावून घेतले ब्राह्मण हेर पाठवून महाराजाच्या संबंधाने ज्याच्या मनात द्वेष किंवा मत्सर होता त्या सर्वांस वर सांगितल्याप्रमाणे जय-सिंगानें आपल्या पक्षाचे करून घेतलें[1]

हे दोघे सरदार स १६६५ च्या फेब्रुवारी महिन्यात दिल्लीहून निघून नर्मदा नदी उतरून अलीकडे आले महाराजास त्यांच्या स्वारीची खबर मिळताच परत लौकर यावयास मिळावे ह्या हेतूने ते जलमार्गाने येत असता त्यांचा प्रति-कूल वाऱ्यामुळे कसा खोळंबा झाला ते मागल्या भागात सांगितलें आहे ह्या मोगलसरदारांनी प्रथम औरंगाबादेस जाऊन सुभ्याची व्यवस्था लाविली, व नंतर ते महाराजाच्या मुलखात शिरले जयसिंगाने सासवडास आपल्या सैन्याची छावणी केली कारण हे ठिकाण महाराजाच्या ताब्यातल्या मुख्यमुख्य किल्ल्याच्या व प्रांताच्या बहुतेक मध्यभागीं असून तेथून हव्या त्या दिशेस आपले लोक सहज पाठविता येतील असें त्याला आढळून आले होते शिवाय येथून विजा-पूरकराच्या मुलखावर स्वारी करावयास सोपे असून तिकडून महाराजाना साहाय्य आलें असता त्यास अटकाव करिता येण्याजोगा होता. सासवडास सैन्याचा

१ हा मजकूर प्रो सरकार याच्या ग्रंथातून घेतला आहे जयसिंगाने औरंगजेबास छावणींतून वेळोवेळा पाठविलेल्या पत्राच्या आधारानें हा त्यांनी आपल्या ग्रंथात नमूद केला आहे. पृ. १२५, १२६ व १२७

तळ देऊन त्यानें पुरंदर किल्ला काबीज करण्याचा बेत केला. त्यानें पुण्यास बरेच लोक ठेवून दिले लोहगडासमोर त्यानें ठाणें करून तेथे ३००० लोक ठेवून त्यास तिकडून महाराजाचे लोक येऊं देऊं नये किंवा जुन्नराकडे त्यांस जाऊं देऊं नये असें सांगितलें कुतुबखान याच्या हाताखालीं सात हजार घोडदळ देऊन पैनघाटापासून जुन्नरापर्यंतचा रस्ता राखावयास ठेविलें तळेगावाच्या रस्त्यानें मराठ्यांनी मोगली अमलातल्या मुलखावर हल्ला करूं नये ह्मणून तिकडेहि त्याने जागोजाग ठाणीं केलीं पुणें व आसपासचा प्रांत महाराजाच्या हातीं जाऊं नये ह्मणून इतिशामखानाला त्याने चार हजार घोडेस्वारानिशी पुण्यास ठेविलें लोहगड व पुणें याच्या दरम्यान दोन हजार घोडदळ त्यानें ठेवून दिले शिरवळच्या ठाण्यावर ३०००घोडदळ ठेवून दक्षिणेकडून पुरंदर किल्ल्यास कुमक पोंचू न देण्याची व्यवस्था त्याने केली ही कामगिरी सय्यद अबदुल अझिज यास सांगितली असून त्याच्याबरोबर बाजीचंद्र मोरे, अबाजी गोविंदराव व माणकोजी धनगर हे होते सुपे येथे मजबूत ठाणें करून पुष्कळ लोक त्याने ठेवून दिले ह्याप्रमाणे चोहोंकडून कडेकोट बंदोबस्त करून जयसिंग ता १४ मार्च स १६६५ रोजी पुण्याहून निघाला सासवडाजवळ आल्यावर त्याने दिलेरखानास तोफा वगैरे सामुग्री देऊन पुरंदराकडे पाठविलें आणि पुणें व सासवड याच्या दरम्यान कांहीं लोक ठेवून दिले दिलेरखान पुरंदराजवळ आला तेव्हा महाराजाच्या कांहीं लोकांनी त्याच्यावर हल्ला केला पण त्याचें कांहींएक चाललें नाहीं दिलेरखान पुरंदरापाशी पोंचल्यावर जयसिंगाने त्याच्या मदतीस आणखी तीन हजार लोक व वेढा घालण्यास लागणारी मुबलक सामुग्री रवाना केली, आणि आपल्या जवळच्या सैन्याचा तळ सासवड व पुरंदर याच्या दरम्यान देऊन स्वत सिंहगडास वेढा घातला शिवाय त्यानें सहासात हजार स्वार राजगड, सिंहगड, रोहिडा वगैरे किल्ल्याच्या आसपासचा सगळा प्रांत लुटून, जाळून पोळून बेचिराख करण्यासाठीं पाठविले त्यानीं शेकडो गाव लुटून जाळून उध्वस्त केले हजारो गुरें व शेतकरी धरून आणण्याचा सपाटा त्यानी सुरू केला ह्या कामगिरीवर जयसिंगानें दाऊदखान वगैरे सरदारास नेमिले. ह्या टोळ्याच्या व महाराजांच्या

---

१ हे सरदार शिवाजी महाराजास अनुकूल झाल्याचा वहीम जयसिंगास ह्या वेळीं आला होता कारण त्यानी महाराजाच्या लोकाच्या हालचालीवर करडी नजर न ठेवल्यामुळें त्यास पुरंदर किल्ल्यावर कुमक वगैरे पोंचती करावयास व मोगल सैन्यावर हल्ले करावयास चागले फावले होतें शिवाय कुतुबखान वारवार असें ह्मणे की,

लोकाच्या दररोज चकमकी झडूं लागल्या त्यापैकीं चिचवडाजवळ झालेल्या एका चकमकीचें थोडेसें विशेष वर्णन यवनी बखरींत आढळतें महाराजाचे पांचशें घोडेस्वार व एकहजार पायदळ लोहगडाकडून पुण्याकडे चालून येत आहे असें कळताच जयसिगानें त्यावर दोन सरदार मोठे सैन्य देऊन पाठवून त्याचा मोड केला [१]

इकडे महाराज किनाऱ्यास लागून तत्काळ रायगडावर येऊन पोहंचले, व प्राप्त झालेल्या प्रबल शत्रूशीं कोणत्या रीतीने सामना करावा याविषयी मसलत करण्यासाठीं त्यानी आपल्या मुख्यमुख्य सरदारास रायगडावर बोलाविलें ह्या वेळीं नेताजी पालकरावर महाराजाची इतराजी झाली कारण शत्रु आपल्या मुलखात चालून आला तेव्हा त्याच्यावर नजर ठेवून त्यास साधेल तेवढा त्रास द्यावा हे त्याचें काम असता तो आपल्या स्वारासह लाबच्या प्रांतात निघून गेला होता कोणी ह्मणतात कीं, त्यास जयसिगाने अवदाने चारल्यावरून त्याने आपल्या कामाची अशी हेळसाड केली [२] महाराजानी त्याला तत्काळ परत येण्याविषयीं हुकूम पाठविला तरी तो लागलाच परत आला नाहीं त्यामुळे महाराजास त्याचा अतिशयित राग येऊन त्यांनी त्याचा सर नौबताचा हुद्दा कमी केला, व तो कर्तोजी गुजर यास दिला [३] ह्या गुजरास प्रतापराव गुजर असें पुढे नाव दिलें ह्या सरदाराने ह्या वेळी फारच चपळाई दाखविली त्याने शत्रूच्या सैन्याची रसद बंद करून त्यास दाणावैरण मिळेनाशी केली, व त्याच्या हालचालीवर पुरी नजर ठेवून त्यासबधाची एकदर बातमी महाराजास एकसारखी पोंचविण्याची व्यवस्था केली

---

पुरदर किल्ला घेण्याच्या नादाम लागूं नये कारण तो केवळ अभेद्य आहे. आपल्या सैन्याची मात्र व्यर्थ खराबी होणार प्रो सरकार, पृष्ठ १३९

१ हा सगळा मजकूर प्रो सरकाराच्या पुस्तकावरून घेतला आहे

२ यवनी बखरीवरून असे दिसत की, नेताजी पालकराने मोगलाच्या सैन्यावर बारवार छापे घालून तीस बरीच हैराण केली होती एप्रिल महिन्यात त्याने परेंड्याच्या किल्ल्यावर हल्ला केला असता मोगल सैन्याने त्यास पिटाळून लाविले होते.

३ सभासद ह्मणतो की, पन्हाळा किल्यास शिद्दी जोहारानें वेढा दिला त्या वेळी गड नवाच हाती आला असल्यामुळे त्यावर सामुग्री वगैरे ठेवून त्याची मजबुती करण्यास अवकाश झाला नव्हता यास्तव नेताजी पालकरास लष्कर घेऊन उपराल्यास यावे असा महाराजानीं हुकूम पाठविला पण तो दूर गेल्यामुळें वेळेवर आला नाहीं ह्मणून त्याचा हुद्दा कमी केला

जयसिंगाबरोबर ऐशीं हजार फौज असून तींत चागले कडवे व कसलेले शिपाई पुष्कळ होते त्याची व्यवस्था फारच नामी होती, व तो मोठा हुशार योद्धा व सेनापति असल्याकारणाने त्याच्या हातून गाफिलगिरी किंवा गंदीपणा मुळीच होण्यासारखा नव्हता शिवाय त्याने महाराजाच्या सगळ्या शत्रूंस उठविलें होते त्याने महाराष्ट्रात प्रवेश करिताच एकदम दोन किल्ल्यास गराडा घातला, आणि चोहोकडून ठाणेबंदी करून प्रत्येक ठाण्यावर मोठमोठ्या सरदारास मोठी फौज देऊन ठेविले युद्ध मोठ्या जोमाने व आवेशाने करून बादशहाकडून बहादुरी मिळविण्याचा त्याचा पूर्ण निर्धार दिसला अशा बलाढ्य, शूर व फौजबंद सरदाराशी सामना करून आपला निभाव लागेल कीं नाहीं हा विचार महाराजास प्राप्त झाला अफझुलखान व शास्ताखान ह्या सरदारास हरहुन्नरे त्यानी नामोहरम केले, तसा काहीं प्रकार ह्या मोगलसरदारासबंधानें करणे शक्य नव्हते कारण ते आपणावर कोणत्याहि प्रकारे विश्वास ठेवणार नाहींत हे महाराजास पक्के माहीत होते जयसिंगासारख्या चाणाक्ष, दक्ष व युद्धकर्मात कसलेल्या वीरापुढे आपला काहींएक हुन्नर चालणार नाहीं अशी महाराजाची पूर्ण खात्री होती[१] बरे, त्यास स्वधर्म व स्वदेशस्वातंत्र्य ह्यासबधाने बोलून फितविण्याचा प्रयत्न करावा तर दिलेरखान त्याच्याबरोबर आहे, तो आपला फंदफितूर काहींच चालू देणार नाहीं, असा महाराजास चोहोंकडून पेच येऊन पडला पदरच्या लोकाची मसलत घेतली त्याचेहि असेंच उदासीनतेचे विचार निघाले पुढे काय करावे अशा विचारात महाराज अगदी मग्न असता त्याच्या अगात देवी संचरली व तिनें असें सागितले की, "अरे बाळा, ह्या वेळी प्रसग मोठा दुर्धर आहे जयसिंगराजाचा पराभव तुझ्या हातून होत नाहीं त्यास तुला भेटावे लागेल दिल्लीस बादशहाचे भेटीस जावे लागेल तेथे कठीण प्रसंग प्राप्त होईल. पण मी तुजसमागमें सरक्षणास येते तुला संकटातून सोडवून पुन स्वराज्यास घेऊन येते, राजा, तुला विजयी करीन याविषयीं तूं अणुमात्र

१ स्कार्टवीरग ह्मणतो कीं, जयसिंगास ठार मारण्यासाठीं प्रतापराव गुजरास महाराजानीं पाठविलें होते प्रतापरावाने जयसिंगापाशी जाऊन मला नोकरीस ठेवा ह्मटलें त्यावरून त्यास त्या सरदाराने आपल्या तैनातीस ठेविले तो त्याच्या जवळ नेहमी राहून त्याची पुढेंपुढें होऊन सेवा करीत असे. एके दिवशी जवळ फारसे लोक नाहीत असें पाहून त्यानें जयसिंगावर हल्ला करण्याची साधि साधिली, परतु जवळच्या लोकानी त्याला तत्काळ पकडून निःशस्त्र केलें. जयसिंगानें त्याला काहींएक शिक्षा न करितां सोडून दिलें.

चिंता करूं नकोस " हीं सगळीं वाक्यें चिटणीस व वाकनीस यानी लिहून ठेविलीं, व महाराज सावध झाल्यावर त्यांला वाचून दाखविलीं तीं ऐकून त्यास मोठे समाधान वाटलें.

वर सांगितल्याप्रमाणें जयसिंग सिंहगड व पुरंदर ह्या किल्ल्यास वेढा दिल्यावर त्या किल्ल्यांच्या दरम्यान आपल्या सैन्याचा तळ देऊन राहिला होता त्याला महाराजाचे येथपर्यंतचें सर्व कर्तृत्व महशूर होते स्वधर्मरक्षण व स्वराज्य-स्थापना याप्रीत्यर्थ ते अहर्निश उद्योग करीत आहेत, तो चांगला आहे असे त्यास वाटत असे अशा पवित्र कार्यास उद्युक्त झालेल्या तेजस्वी पुरुषाशी युद्ध करून आपणास जय मिळेल अशी त्याला खात्री नव्हती कारण त्याच्या सद्धेतूच्या सिध्यर्थ कायावाचामनेकरून झटणारी माणसें त्याच्या पदरी असून सर्व योद्धे त्याच्याशी इमानानें व हुशारीनें वागून स्वप्राणाचे बळी द्यावयास सर्वदा सिद्ध असत, हे त्या रजपूतसरदाराला पूर्णपणें माहीत होते तेव्हा अशा प्रबळ पुरुषाशी युद्धप्रसंग करण्याचे टाळून त्यास अन्य उपायानी वश करून घ्यावें व आपली अब्रू बचावून बादशहाचीहि कामगिरी बजाविल्यासारखे करावे असा विचार त्यानें मनात आणिला दुसरें असें कीं, अफझुलखान, शास्ताखान वगैरे सरदाराची जशी दशा झाली तशीच आपलीहि व्हावयास चुकणार नाही अशी दहशत त्याला दक्षिणेत पाय ठेवल्यापासून वाटू लागली होती तेव्हा आपली कामगिरी कशी तरी एकदाची उरकून महाराष्ट्रातून निसटता पाय घ्यावा असें त्याच्या मनाने घेतले होते [1] ह्मणून त्याने महाराजास जामुदाबरोबर पत्र पाठवून असे कळविले कीं, " औरंगजेब अतिबलाढ्य पातशहा आहे. त्याशीं तुह्मीं सख्य करावे हें उत्तम त्याच्याशी शत्रुत्व करून परिणाम लागणार नाहीं आह्मी जसे जयपूरचे राजे, त्याप्रमाणें तुह्मी उदेपूरच्या घराण्यातले शिसोदे तुह्मी थोर वंशात निपजला असून हिंदुधर्माचा तुह्मास पूर्ण अभिमान आहे हे पाहून आह्मास संतोष वाटतो स्वधर्मरक्षणार्थ व स्वसत्तास्थापनार्थ जो उद्योग तुह्मीं चालविला आहे त्यास आमची पूर्ण अनुकूलता आहे तुमचा बचाव करून तुमची सत्ता कायम राखावी असें आमच्या मनात आहे या प्रकरणीं तुमचा मानस कसा काय आहे तें कळवावें "

---

१ काहीं बखरकार ह्मणतात की, आपणास ह्या मोहिमेंत यश मिळावें ह्मणून जयसिंगानें व्रतें, जप व अनुष्ठानें चालविलीं होतीं !

अशा आशयाचें पत्र जयसिंगाकडून आल्यानें महाराजाची चिंता बरीच दूर झाली. देवीच्या आज्ञेप्रमाणें आपल्या मनात त्याच्याशीं युद्ध करावयाचें नाहीं, व त्याच्याकडूनहि सख्य करण्याविषयीचें पत्र आलें, तेव्हा आता त्याच्याशी साधेल त्या रीतीनें स्नेह करावा असें महाराजाच्या मनात आलें. पदरच्या माणसांचाहि असाच अभिप्राय पडला मग त्याच्याशी सख्याचें बोलणे करण्यास कोणातरी हुशार वकिलास पाठवावे असें ठरून ती कामगिरी रघुनाथपंतास सांगितली[१]. जयसिगराजास दिव्य वस्त्रे, अमूल्य अलंकार, उमदे घोडे व हत्ती हीं नजर पाठवून त्यास एक पत्रहि दिलें त्या पत्रातील आशय येणें-प्रमाणें होता " आपण वार्तिकाबरोबर पत्र पाठविलें ते पाहून अत्यानंद झाला. ते दोन्ही हातात घेऊन पितृदर्शनतुल्य समजून मी हृदयाशी धरिले आपणाकडून पत्र येण्याचा किमपि भास नसता ते आलें याबद्दल परम समाधान वाटलें. चिंता दूर झाली पत्रीचा भाव समजून ते ममतेने भरलें आहे असें वाटलें पत्र पावताक्षणीच दर्शनास बिनदिक्कत यावे, कोणत्याहि गोष्टीचा मनात अणुमात्र आक्षेप न आणिता व हे परकी आहेत अशी चिता मनात अल्पहि न करितां आपल्यावर अवलंबून राहिल्याने वाच्छित हेतु परिपूर्ण होऊन माझे सर्व प्रकारे कल्याण होईल असें मला वाटले. जसे आपले चिरजीव रामसिगराजे तद्वत् मला समजून आपण ममतापूर्वक पत्र लिहिलें तेणेकरून चित्त अतिसतोष पावलें ही अशी वृत्ति माझी झाली आहे कीं कसें ते एक जगदंबा जाणे तुमचे दिल्लीहून दक्षिणेंत आगमन झाले ही उत्तम गोष्ट घडून आली मनातील सर्व मनोरथ सिद्ध होतील अशी माझ्या दिलाची खात्री झाली माझे सारें भय नष्ट होऊन मन आनंदातिशय पावले. आपण वडील क्षात्रधर्मसरक्षणकर्ते बादशहाची आह्मावर इतराजी तर बहुत झाली आहे. पुढे काहीं तरणोपाय दिसत नाहीं ही विवंचना आह्मास लागून राहिली आहे बादशहा सर्वाचे खावद हे प्रमाण. परंतु क्षात्रधर्मास अवरोध झाला. म्लेच्छमय धरा झाली अविध उन्मत्त होऊन हिदुधर्म बुडवीत चालले सपूर्ण पुण्यक्षेत्रे भ्रष्ट करून त्या स्थळी ते गोवध करू लागले देवालये पाडून तेथे त्यानी मशिदी बाधिल्या. त्याचा हेतु कीं, हिदुधर्म-

---

१ ह्यापूर्वीं महाराजानीं जयसिगाकडे समेटाचे बोलणे करण्याकरिता अनेक वेळा पत्रें पाठविली होती, परतु त्यात त्याचे कपट आहे असे मानून जयसिगाने त्यांच्या लोकांस परत लाविले होते, जयसिंगाकडून महाराजानां पत्र गेलें नव्हतें असे प्रो. सरकार ह्मणतात

रहित धरा करावी हा सर्व प्रकार असह्य वाटून वडिलांच्या प्रतापानें व श्रीजगदंबेच्या अनुग्रहाने यवनांशीं आजपर्यंत मीं यथाशक्ति विरोध केला. हिंदुधर्माचा अभिमान हिंदुराजांनीं टाकिला हें कांहीं चांगलें नाहीं ह्या भूमीचें राज्य हिंदुराजे पुरातन काळापासून करीत आले असून सांप्रत ते पदभ्रष्ट होऊन यवनांचे अंकित झाले आहेत हे पाहून मन उद्विग्न होतें ह्या गोष्टीसंबधानें आपणास पूर्ण ईर्षा असावी आता बादशहाची मीं अनेक प्रकारीं आगळीक केल्यामुळे त्यास क्रोध येऊन त्याने आपणास मजवर पाठविलें आहे, तरी पादशहाचे दरबदगीस मी अंतर करणार नाहीं मजकडे जे किल्ले व प्रांत आहेत ते मी आपल्या बाहुबळे परराज्यातून काबीज केले आहेत त्यांस बादशहाकडून उपद्रव न होता त्याचे मन माझ्याविषयी स्वच्छ व्हावे हे मला इष्ट आहे त्याच्या मनात दक्षिण काबीज करावयाची आहे त्यास मी मनापासून मदत करीन " ह्या अशा मजकुराचे पत्र त्यांनी रघुनाथपंताच्या हाती दिलें व त्याला तोंडीहि पुष्कळ गोष्टी कळविण्यास सांगितले

जयसिंगानें रघुनाथपंताची भेट आदरपूर्वक घेतली, महाराजाकडून आलेल्या नजराण्याचा प्रीतिपूर्वक स्वीकार केला व मोठ्या प्रेमाने कुशल पुसले मग तें पत्र वाचून व तोंडचा निरोप ऐकून तो फार संतोष पावला व ह्मणाला, 'दिल्लीपति औरंगजेबबादशहा काहीं सामान्य नव्हे तो सार्वभौम असून अतिबलाढ्य आहे त्याशी स्पर्धा केल्याने कोणत्याहि प्रकारे बरे होणार नाहीं अशाने परिणाम लागतो कीं काय? यात स्वहित काय पाहिले? याउपर राजे यांनी अनमान न करिता आमच्या समागमे बादशहाच्या दर्शनास दिल्लीस चलावें. आह्मी स्वत त्यास घेऊन जाऊन मुलाखत करवितो ह्या संबधाने सर्व प्रकारचे साहाय्य त्यास करितों त्यांनी अणुमात्र भय चित्तात बागवू नये जसे आमचे पुत्र रामसिंग तसेच शिवाजीराजे आह्मास आहेत आह्मी रजपूत सत्यवक्ते आहो आमच्यापासून बेइमानपणा होणार नाहीं अशी निशा मानून राजे यांनी उदयिक प्रांजलचित्ते आमच्या भेटीस यावे मनांत काहीएक दिक्कत धरू नये. बादशहापाशी राजे यांची सर्व गोष्टींनी शिफारस करून त्यास स्वराज्यास यावयास निरोप देववितो तेथे त्याचा यथायोग्य बहुमान होईल असें करितो.' ह्या असा उलट निरोप देऊन व आलेल्या वकिलास वस्त्रालंकार देऊन त्यानें गौरविलें व महाराजास नजराणा पाठविला.

निघते वेळीं रघुनाथपंताने जयसिंगास एकांती गांठून त्याच्याशीं येणेंप्रमाणें भाषण केलें “तुम्ही शहाणे हिंदुराजे आहां. क्षात्रधर्म शास्त्रमर्यादेनुरूप रक्षण केल्यास त्यांत भूषण आहे. असें केल्याने ठाकूरजी तुमचें कल्याण पुत्र-पौत्रादि वंशपरंपरेनें करील अविधांनी स्वधर्मावरोध केला श्रीकाशी, यमुना, सरस्वती इत्यादि महातीर्थें अविधभयानें संपूर्ण जनाची राहिलीं दुष्ट यवन दुष्कर्मास प्रवर्तले आहेत यासंबंधाची ईर्षा तुह्मी अगदी टाकिली अशा यवनास वंद्य मानून तुह्मी सेवाधर्मास प्रवृत्त झालां, ही केवळ भ्रष्टता होय. ह्या गोष्टीचा तुह्मास अभिमान नाहींसा झाला आहे अशा स्थितीमध्ये जीवितरक्षण केल्याचा पुरुषार्थ तो कोणता? शिवाजीमहाराज तुमचें लेकरूं आहे त्याच्याकडून हिंदुधर्माचे रक्षण करविणे आपल्या हातीं आहे तरी त्याच्या कर्तृत्वाबद्दल योग्य अभिमान धरून त्याचें साधेल त्या मार्गानें कल्याण करणे हे आपले कर्तव्य आहे, असें मी समजतों हिंदुराजाच्या कुळांत तुम्हीं प्रतिसूर्य उदय पावलां आहां शिवाजीमहाराजाचा नाश केल्याची अपकीर्ति आपल्या वाट्यास येऊं देऊं नका त्याच्या जिवास दगा झाल्यानें आपला दुर्लौकिक होईल त्यानी तुमच्या चरणी मस्तक ठेविलें आहे प्राणदातेपणाचें यश तुह्मी घ्यावें” हे भाषण ऐकून जयसिंगास त्याचा राग तर मुळीच आला नाहीं, पण उलट तो अगदीं प्रेमळपणानें ह्मणाला कीं, ‘माझ्याकडून राजाला काहींएक दगा होणार नाहीं,’ व या बद्दल त्याच्यापाशी त्यानें आणभाकहि केली

मग जयसिंगानें रघुनाथपंताची दिलेरखानाशी भेट करविली महाराजानी त्याच्यासाठी पाठविलेला निराळा नजराणा त्याला दिला, व उभयतांच्या सल्ल्यानें असें ठरलें कीं, शिवाजीमहाराजानीं औरंगजेबापासून कोणत्या गोष्टी ठरवून घ्यावयाच्या त्या नीट खुलासेवार कळवाव्या, ह्मणजे त्यासारखा विचार करितां येईल रघुनाथपंत त्याचा निरोप घेऊन परत रायगडावर आला, व महाराजास सविस्तर हकीगत त्यानें निवेदन केली त्यावरून महाराजानी आपल्या कराराची एक यादी तयार केली तीतील आशय असा होता कीं, ‘आम्हीं जे प्रांत व किल्ले काबीज केले आहेत ते दरोबस्त आमचे आह्माकडे राहावे, आणि वरकड दक्षिणप्रांताची चौथाई व सरदेशमुखी आमच्याकडे चालावी. अशा अटीवर आपले व बादशहाचें सख्य व्हावें’ ही यादी घेऊन तो वकील पुनः जयसिंगाकडे गेला त्यानें ती यादी पाहिली तेव्हां त्याची बहुतेक खात्री झाली कीं, शिवाजीमहाराजाचा तह करण्याचा इरादा मनापासून आहे, यांत काहीं फसवाफसवीचा

प्रकार नाहीं. त्यासंबंधानें त्या वकिलाकडूनहि त्यानें शपथक्रियेवर खात्री घेतली, आणि त्यास असें सांगितलें कीं, 'राजे आमच्या भेटीस आल्यावर तहाच्या अटी नीटपणें ठरवू.'

जयसिंग शिवाजीमहाराजाची भेट घेऊन त्याशी तह करण्याच्या विचारात आहे हें दिलेरखानास कळलें तेव्हा त्याला स्वाभाविकपणे असा वहीम आला कीं, हे हिंदुहिंदु एक होऊन बादशाही कामगिरीस अडथळा येणार. मग तो जयसिंगाकडे येऊन ह्मणाला "शिवाजीची भेट घेऊन तहाची कलमें लागलीच ठरवूं नका. तो ह्मणत आहे त्या अटीवर तह होता कामा नये. सर्व गोष्टी खुलासेवार लिहून बादशहाकडे पाठवाव्या, व तिकडून हुकूम येईल तसें वर्तन करावें. तूर्त आपण त्याच्या दोन किल्ल्यास वेढा घातलाच आहे, तो पुढे नेटानें चालवावा. मी पुरंदर घेतो आणि तुह्मी सिंहगड घ्यावा." असा आग्रह त्यानें धरिला. जयसिंगाने त्याला असे सांगितलें कीं, 'शिवाजी आमच्याशीं तह करून मोगल बादशहाचा अंकित होत आहे हें फारच चांगले आहे. निजामशाहीपैकीं जे किल्ले व प्रांत त्यानें काबीज केले आहेत तेवढे आपणास ह्या तहानें सोडवून घेता आले ह्मणजे आमच्या मोहिमेचे काम झाले. हे किल्ले घेणे फार कठीण आहे. प्रत्येक किल्यापुढे हजारो माणसें खराब करावी लागतील, व इतकेंहि करून ते हाती येतील कीं नाहीं याची शंकाच आहे. यास्तव हे किल्ले काबीज करण्याचा नाद सोडून देऊन तूर्त सभोवतालच्या प्रांतातून किल्ल्यावर दाणावैरण जाण्याचे फार तर बंद करावें, याहून जास्त गडबड करण्याचें कारण नाहीं.' अशा रीतीनें जयसिंगाने त्याला पुष्कळ समजावून सांगितलें, परंतु तो आपला आग्रह सोडीना. तो जयसिंगास इतकेंच ह्मणाला कीं, 'तुम्ही सिंहगड घेणार असला तर घ्या, मी जाऊन पुरंदर नरम करणार. काहीं झाले तरी बादशहाची मंजुरी घेतल्यावाचून कोणत्याहि प्रकारचा तह ठरता कामा नये.'

इतके बोलून तो पुरंदरचा वेढा विशेष निकरानें चालविण्यासाठीं तिकडे निघून गेला. त्याने किल्ल्यास चोहोंकडून मोर्चेबंदी केली. या किल्ल्याचा हवाला मुरार बाजी प्रभु नावाच्या एका सरदाराकडे होता. शत्रूचे सैन्य जवळ येत आहे असें पाहून त्याने त्यास दाणा वैरण मिळूं नये अशी तजविज करून व त्यावर पुनःपुनः छापे घालून त्यास बरेंच हैराण केलें होतें. शत्रूचा दारूगोळा पेटवून देऊन त्याची युद्धसामुग्री लंबे करण्याचा धूमधडाका त्यानें चालविला होता. शत्रु पाठीस लागला ह्मणजे फरारी होऊन किल्ल्यात येऊन बसावयाचें

असा क्रम त्यानें कांहीं दिवस ठेविला होता, परंतु अखेरीस त्याला पुरंदर-किल्ल्यांत कोंडून त्याच्यासभोंवतीं शत्रूनें प्रचंड सैन्याचा वेढा दिला हा मुरार बाजी अतिशयित शूर व हुशार होता. त्याच्या हाताखालीं त्या वेळी अवघे दोन हजार मावळे व हेटकरी होते किल्ल्यात दारूगोळा व धान्यादि सामुग्री पुष्कळ भरून ठेविली होती. मुरार बाजीने व त्याच्या लोकानी किल्याचे रक्षण बरेच दिवस मोठ्या शौर्याने केलें, शत्रूचे सैन्य एवढे मोठे होते तरी त्यास मुळीच दाद दिली नाहीं किल्ल्याखालीं हजारो मोगल धडपड करून प्राणास मुकले त्यास किल्ल्याजवळ जाता येईना महाराजानी राजगडावरून केदारदरवाज्याकडून रसद पोचविली व लोकाची भरती केली किल्ल्याच्या एका माचीवर बुरुजाखालील खडकाला सुरुंग लावून तो पाडून आत शिरण्याचा बेत दिलेरखानाने करून त्या कामाला आपले लोक लाविले हे किल्ल्यावरच्या लोकानीं पाहून त्या माणसावर पुन पुन छापे घालून त्यास नको जीव असें केले त्या कामी शत्रूकडील शेकडो माणसाचे बळी पडले परतु त्याचा जमाव फारच मोठा असून त्यास आणखी वारवार कुमक पोंचत असल्याकारणाने हे सुरुंग लावण्याचे काम शेवटास जाऊन बुरूज जमीनदोस्त झाला, व शत्रूच्या लोकाचा किल्ल्याच्या त्या माचीवर प्रवेश झाला. त्यानी आत शिरताच घरे लुटून जाळून टाकण्याचा झपाटा चालविला तों इकडे हेटकरी लोकानी आपला अचुक गोळीबार असा झपाट्याने सुरू केला कीं, त्यासरशी शत्रूच्या लोकाची अगदीं वादल उडाली ते सैरावैरा पळत सुटले. जो तो आपला जीव बचावण्यासाठी कोठे तरी छपून राहण्यास जागा पाहूं लागला ह्याप्रमाणे त्याची दाणादाण झाली असता खानाचे आणखी पाच सहा हजार लोक मोठ्या जमावाने किल्ल्यावर चढून येऊं लागले त्याच्या-वर मुरार बाजी आपल्या सातशे निवडक मावळ्यासह एकदम चालून गेला. उभय पक्षाकडच्या लोकाचे मोठ्या निकराचे युद्ध झाले मावळ्याच्या तरवा-रींच्या सपाट्याखाली दोन हजार मोगल व पठाण रणात पडले मावळेहि बरेच धारातीर्थी पतन पावले तरी त्यानी शत्रूचा हल्ला डोंगराखाली मोठ्या नेटाने पिटून लाविला खानाचे लोक वाट मिळेल तिकडे पळत सुटले खान स्वत खालीं नारायणाच्या देवळापाशी हत्तीवर स्वार होऊन उभा होता आपल्या लोकाची दाणादाण झालेली पाहून त्यास अतिशयित चेव आला आणि त्यानें आपला तिरकमठा सज्ज केला, व पुढें सरसावून आपल्या पठाणांस मुरार बाजीवर चालून जावयास हुकूम केला. लोक पळत सुटले होते त्यांस मागें परतवून त्यांसह तो

स्वत: मावळ्यावर तुटून पडला ह्या समयीं मुरार बाजीनें आपल्या शौर्याची अगदीं शिकस्त केली. त्यानें दिलेरखानाचें पाऊल जरासुद्धां पुढें पडूं दिलें नाहीं. त्याच्या पदरचे पठाण एवढे कडवे होते तरी आवेशाचें वारें अगात पुरें संचरलेल्या मावळ्यांच्या तरवारीपुढे त्याचें कांहींएक चालेना मुरार बाजी तर अगदीं जिवावर उदार झाला होता खानाचे लोक फार, त्यानीं आपल्या किल्ल्याच्या एका माचीला सुरुग लावून ती कमजोर केली आहे, आपला ह्या रणकंदनांत मोड होऊन किल्ला हातचा जाणार, तेव्हा महाराजाचे शेकडो लोक व्यर्थ खर्ची घातल्याचें अपयश घेऊन त्यास काय तोंड दाखवावे, असा विचार करून तो स्वत ढालफिरग घेऊन आपल्या लोकापुढं होऊन त्यास धीर व उत्तेजन देत मोठ्या आवेशाने लढत होता लढतालढता त्याला समोर खानाचा हत्ती दिसला. त्यासरसा तो पुरुषसिंह त्याच्यावर चालून गेला त्या वेळी त्याची ढाल तुटून तो शत्रूचे प्रहार हातास शेला गुडाळून त्यावर घेत होता तो अगदीं जवळ आला असें पाहून खानानें त्याला हाक मारून ह्मटलें, 'तूं मोठा शूर शिपाई आहेस तुझा हा आजचा अद्भुत पराक्रम पाहून मी केवळ चकित झालों आहें. तू ह्या समयीं कौल घेऊन माझ्या स्वाधीन हो मी तुला मोठ्या योग्यतेस चढवितों' हे त्याचे शब्द ऐकून मुरारबाजी त्याचा धिक्कार करून बोलला. 'तुह्मी तुरुकडे, तुमचा हिसाब काय ! मी शिवाजीराजाचा नोकर आहें मी तुझा कौल घेतों कीं काय ? मी ह्या रणात आपला देहपात करीन, परंतु तुह्माम सहसा शरण येणार नाहीं.' असें बोलून खानावर आपल्या तरवारीचा वार करण्याच्या बेतात तो होता इतक्यात खानानें तीर मारून त्याचें शिर उडविलें[१] त्याप्रमाणें आपला सरदार पडला हें पाहून मावळ्यानीं माघार घेतली व लढतालढता चढून किल्ल्याचे दरवाजे लावून घेतले. इतक्यांत महाराजाकडून त्यास कुमक येऊन पोंचली. त्याबरोबर त्यांस नवा दम येऊन खानाच्या लोकाशीं पुन लढण्यास ते तयार झाले. किल्ल्यावर नगारे, करणे वगैरे रणवाद्यें वाजवूं लागून त्यानीं शत्रूच्या लोकांवर पूर्ववत् तोफाचा भडिमार सुरू केला

खानाच्या लोकांचा असा मोड होऊन पुष्कळ शिपाई प्राणास मुकले तरी किल्ला सर केल्यावाचून येथून जावयाचें नाहीं असा हट्ट त्यानें धरिला. असें सांगतात कीं, त्यानें आपल्या डोकीची पगडी उतरून अशी प्रतिज्ञा केली कीं,

---

१ मुरार बाजीचें शिर तुटल्यावर त्याच्या नुमत्या कबधानें कित्येक यवनांची कत्तल उडविली अशी आख्यायिका आहे.

हा गड घेईन तेव्हा पगडी परत घालीन. असा नियम करून त्याने खालची माची पुन काबीज केली, आणि किल्ल्याचा उत्तरेकडचा भाग अभेद्य आहे असें वाटून त्याने वायव्येस रुद्रमाळ[1] नावाचा एक लहानसा किल्ला आहे तो हस्तगत करावा आणि त्याच्यावर दमदमे रचून मुख्य किल्ल्यावर तोफांचा मारा चालवावा, असा बेत केला ह्या किल्ल्यावर बाबाजी बोवाजी व यशवंतराव बोवाजी हे दोघे बंधु हवालदार होते त्याच्याजवळ फारशी फौज नव्हती दिलेरखानाने त्या किल्ल्यावर हल्ला केला तेव्हा मुरार बाजी आपल्या मदतीस काहीं लोक पाठवील ह्या भरंवशावर त्या दोघा बंधूंनी आपल्या थोड्या लोकानिशी शत्रूशी मोठ्या निकराची लढाई चालविली त्यानी बराच वेळ टिकाव धरिला शेवटी हे उभय बंधु रणात पडले आणि किल्ला शत्रूच्या स्वाधीन झाला दिलेरखानाने ह्या किल्ल्यावरून मुख्य किल्ल्यावर तोफांचा भडिमार चालविला इतक्यात पाऊस सुरू झाला. तेणेंकरून त्याचा मारा चालावा तसा चालेना. किल्ल्यावरच्या लोकानी आपला मोहरा पडला ह्मणून यत्किंचित् नाउमेद न होता त्याच्या सारखेच आह्मी सर्व शूर असून स्वामिकार्यी स्वप्राणाची आहुति देण्यास उद्युक्त आहो हे दाखविण्याचा हुरूप त्याच्या अगात पुरा सचरला होता परतु खानाने किल्ल्यावर दोहोंकडून सारखा मारा चालविला तेव्हा त्याची हिमत अमळ खचली खरें पाहता अशा दुहेरी माऱ्याखालीं तो किल्ला जमीनदोस्त व्हावा परतु कर्मधर्मसयोगाने खानाचा तोफखाना असावा तसा मजबूत नव्हता, व तशात आणखी पाऊस पडल्यामुळे त्याचा बराच दारूगोळा भिजून खराब झाला होता. शत्रु असा अट्टीस पडून पुरंदरकिल्ल्यावर गर्दी करून राहिला आहे असें पाहून महाराजानी आपल्या तेथील लोकास साधेल तेवढी मदत करून आणखी काहीं दिवस असाच दम धरून राहावयास सागून पाठविलें मोगलानीहि आणखी तोफा, दारूगोळा वगैरे सामान मागवून किल्ल्यावर मोठ्या जोराचा भडिमार चालविला

ह्याप्रमाणे पुरदर किल्ल्याखालीं दिलेरखानाने धडपड चालविली असता तिकडे सिंहगड घेण्यासाठी एका सरदारास फौज देऊन जयसिंगानें पाठविलें होतें. तो सरदार त्या किल्ल्यापाशी जाऊन त्यास मोर्चे लावण्याच्या उद्योगास लागला असतां त्याच्यावर महाराजाच्या लोकानी पहाटेच्या सुमारास अकस्मात् छापा घालून त्याची फौज उधळून लाविली व सामानसुमान सारें लुटून नेलें तेव्हां तो मोगल-

---

१ ह्याला ग्राटडफ वज्रगड ह्मणतो.

सरदार रडत माघारी गेला मराठ्यांचा हा असा सपाटा पाहून जयसिंग अगदीं चकित झाला महाराजाचे लोक मोगलाच्या छावण्यावर रात्रीचे छापे घालीत, सर्व रस्ते, नाकीं व चोरवाटा यात दबा धरून पाळतीवर राहत, त्यास दाणा-वैरण कोठूनहि मिळूं नये असें करीत, त्याचे ओझ्याचे बैल, उंटें वगैरे हातास लागतील तेवढी घेऊन जात, व सभोवतालच्या रानास आग लावून त्यास घाबरवून सोडीत असा त्याचा हुतुतु चाललेला पाहून जयसिंगास येथून आपण केव्हा निसटून जाऊ असें झाले त्याप्रमाणेंच दिलेरखानाचे लोक पुरंदरकिल्ल्यापाशी अगदी जिकिरीस आले आहेत असें त्याला कळले तेव्हा त्याने खानास असें सांगून पाठविले की, 'तुमचा हा हटाग्रह काही चागला नव्हे शिवाजीमहाराजाची माणसे एकाहून एक अधिक आहेत किल्ला हातो येणे कठीण आहे. एका किल्ल्यास इतकीं माणसे खराब केलीं तर कोकणबंधारीचे व सह्याद्रीच्या दाट झाडीतील व रानातील बिकट किल्ले घ्यावयाचे झाल्यास तेथें कसें कराल? शिवाजीमहाराज आपण होऊन शरण येऊन भेटत होते, व तह करण्यास राजी झाले होते ती सर्व व्यर्थ दवडून आपला विश्वास मात्र गमाविला हे काहीं चागले झाले नाहीं' हे जयसिंगाचे म्हणणे खानास ह्या वेळी सयुक्तिक वाटूं लागले कारण त्यास पुरदर किल्ल्यापाशी जो थोडासा अनुभव आला त्यावरून त्यास असे वाटूं लागले होते कीं, शिवाजीमहाराजाचे किल्ले काबीज करण्याचें काम अतिबिकट आहे. मग त्याने जयसिंगास असा उलट निरोप पाठविला कीं, 'पुन एक वेळ राजकारण करून विश्वास दाखवून शिवाजीराजे भेटीस येऊन तह करतील असें करावें आम्हीं अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, किल्ला घेऊ तेव्हा उतरलेली पगडी परत डोकीस घालू तरी त्यानी आमचें निशाण त्या किल्ल्यावर नेऊन लावू द्यावें, आणि मग तहात पाहिजे तर तो किल्ला त्यानी आपल्याकडे ठेवावा'

दिलेरखानाच्या दुराग्रहास्तव जयसिंगाने महाराजाच्या वकिलास निरोप दिला होता, परतु त्याची आता बरीच रग जिरून तो आपण होऊन तहाची गोष्ट बोलत आहे असें पाहून त्याने महाराजाकडे आपला वकील पाठवून असें बोलणें लाविलें कीं, 'तुमचे म्हणणें आम्हास मान्य आहे मात्र पुरंदरकिल्ल्यावर खानाच्या आग्रहास्तव आमचें निशाण लावू द्यावें मग तहात तो किल्ला हवा असल्यास परत घ्यावा. तुम्ही आम्हास भेटून जे काहीं करार करावयाचे ते करावे. त्यांची यादी बादशहाकडे पाठवून त्यांस मंजुरी आणवितों तुम्हांला जो

त्रास पोंचला आहे तो मनास आणूं नये. आमच्यावर पूर्ण भरंवसा ठेवून बिनदिक्कत आमच्या भेटीस यावे हा निरोप महाराजांस आला तेव्हां त्यांस अंमळ बरें वाटलें. हें महत्सकट कसें दूर होतें याची त्यास चिंता लागून राहिली होती तरी ह्या वेळीं त्यांनी बाह्यात्कारी थोडेसे आढेवेढे घेतले. त्यानीं जयसिंगास असा उलट जबाब पाठविला कीं, 'तुमच्याकडून विश्वास राखला गेला नाहीं आह्मी तह करण्यास तयार असता तुम्हींच तो बिघडला पुरंदर किल्ल्यावर तुमचें निशाण लावूं देणे तर दूरच राहिलें. परतु त्या किल्ल्यापुढची खानाची फौज उठवून रुद्रमाळ ( वज्रगड ) त्याने घेतला आहे तो परत द्यावा, ह्मणजे मग भेटीस येऊन तह करण्याचा विचार पाहू' हे त्याच्याकडचे बोलणें आल्यावर जयसिंगाने त्याची अट कबूल करून त्यास पुन विश्वास वाटेल असा निरोप पाठविला

ह्याप्रमाणें जयसिगाने खातरजमा करून पुरा इतबार दाखविला[1] तेव्हा महाराजानी त्याच्या भेटीस जाण्याचे मनात आणिले आपले बडेबडे सरदार व मुत्सद्दी बरोबर घेऊन व महालदार, चोपदार वगैरे सर्व राजचिन्हानिशीं ते जयसिगाच्या भेटीस निघाले.[2] त्यानी खास सेवेसाठी घेतलेल्या नोकराच्या

---

१ मनुस्सी ह्मणून एक युरोपिअन अमलदार जयसिंगाच्या तोफखान्यावर होता तो आपल्या पुस्तकात ह्मणतो की, महाराजाचा आपल्यावर भरवसा बसावा ह्मणून जयसिंगाने हरप्रयत्न केला, आणि त्यास असे आश्वासन दिले की, तुह्मी मजवर पूर्ण विश्वास ठेवाल तर बादशहाकरवी तुमचे सर्व हेतु पूर्ण करवितो. हा युरोपिअन आणखी असें ह्मणतो की, शिवाजी महाराजाचे आणि आपले अनेक वेळां भाषण झालें. त्या वेळी त्याच्या अगीं चौकसपणाचा गुण अप्रतिम दिसून आला त्यानी युरोपिअन लोकासबधाने वगैरे आपणास शेकडो प्रश्न केले

२ बुदेले व ग्राटडफ हे ह्मणतात की, मोगलाचे सैन्य पुरदर किल्ल्यावर गर्दी करून राहिल्यामुळें शिवाजीमहाराज धाबरून जाऊन काही लोकानिशीं जयसिंगाच्या छावणींत आले, व बाहेरील एका चौकीदारास जयसिंगाकडे पाठवून त्यानी असे कळविलें कीं, आपण तुमच्या भेटीस आलो आहो जयसिंगाने आपला मुलगा किरतसिंग यास त्याला सामोरा पाठविला, व त्याला मोठ्या इतमामानें आपल्या जवळ आणिलें जयसिग स्वत· आपल्या तबूच्या दारापर्यंत त्यास भेटावयास आला, व मोठ्या आदरानें आलिंगन देऊन, अशा रीतीने आमच्या स्वाधीन होण्याचे कारण काय? असें त्यानें त्यांस विचारिले. ह्या शूर व पराक्रमी पुरुषास पाहावयास छावणींतील लोकाची तबूच्या दारापाशीं एकच गर्दी झाली. खाफीखान ह्मणतो कीं, शिवाजीमहाराजांची बायको व इतर कित्येक नातलग सिंहगडावर होत्तीं. मोगलांनीं त्या

अंगावर बहुमोल अलंकार व वस्त्रें होतीं. सरदार व मुत्सद्दी यांच्या अंगावर भरगच्ची पोषाख व जवाहीर होते बरोबर बरेच निवडक मावळे व हेटकरी घेतले होते. त्यालाहि उत्तम पेहराव दिले होते हत्ती व घोडे चांगले शृंगारले असून त्यावर मुत्सद्दी व सरदार आरूढ झाले होते खुद्द महाराजाचा पेहराव अगदी साधा होता. ते हातीं तीरकमान घेऊन हत्तीवर बसले होते अशा थाटानें ते जयसिंगाच्या भेटीस आले आपण येत आहो हें कळविण्यासाठी त्यानीं रघुनाथपंतास पुढें पाठविलें होतें ते जवळ आले असें कळताच जयसिंग बरोबर कांहीं लोक घेऊन त्यास सामोरा गेला जयसिंग आपणास सामोरा आला असें पाहून महाराज हत्तीवरून खालीं उतरून पुढें पायीं चालत गेले जयसिंगहि आपल्या हत्तीवरून उतरून पुढें चालत आला. त्यानी एकमेकास प्रेमालिंगन दिले त्याबरोबर उभयपक्षाची वाद्यें वाजू लागलीं मोगलाच्या लष्करातले अमीरउमराव सगळे आपआपल्या तंबूंतून बाहेर पडून महाराजास पाहावयास लगबगीने धावले त्याचे ते तेज व ऐश्वर्य पाहून ते केवळ चकित चाले हा दक्षिणचा राजा फार चांगला शोभतो असें ते आपआपसांत बोलूं लागले.

जयसिंगानें महाराजास आपल्या अंबारीत बसवून वाजतगाजत डेऱ्यास नेलें. तेथे गेल्यावर ते दोघे एका आसनावर बसले सरदारासरदाराच्या ओळखी करून दिल्या. महाराजाची ती इभ्रत पाहून जयसिंग अगदीं दंग होऊन गेला. तो त्याची बहुत तारीफ करून ह्मणाला ' तुह्मी स्वप्रतापानें हिंदु धर्माचें रक्षण करीत आहा दक्षिणेंतील मुसलमानबादशहास तुम्हीं जेर करून औरंगजेब बादशहासहि चिंतेंत पाडिलें आहे याबद्दल तुमची जितकी वाखाणणी करावी तितकी थोडीच आहे. आह्मी तुह्मास सर्व प्रकारीं अनुकूळ आहों आह्मास

---

किल्ल्यास वेढा घातला होता तो उठवावयास लावून किंवा अन्य प्रकारें त्यास तेथून सोडविणे शक्य नाही असें पाहून केवळ त्याच्या बचावासाठी त्यानें जयसिंगास शरण जाण्याचें मनांत आणून त्याची प्रत्यक्ष मुलाखत घेण्याची आपली इच्छा त्यास कळविली. तेव्हा त्या सरदारानें एका मुनशीच्या द्वारें असा उलट निरोप पाठविला कीं, तुह्मी निष्कपटपणें शरण येणार असून तुमचे किल्ले आमच्या स्वाधीन कराल तर तुमची विनति मान्य करू. नाहीं तर तुह्मी आल्या वाटेनें परत जाऊन लढाई सुरू ठेवा. ह्यावर महाराजांनीं त्याला असें कळविलें कीं, आपण अगदीं खऱ्या दिलानें तुह्मांस शरण आलों आहों. मग जयसिंगानें महाराजांस आणावयास एक मोठ्या दरजाचा सरदार सामोरा पाठविला.

तुमचा पूर्ण अभिमान आहे तुह्मीआह्मी काहीं निराळे नाहीं आमचा पुत्र रामसिंग तसे तुम्ही मला आहा इत पर काहींएक चिता करूं नका. तुमच्या इच्छेप्रमाणें बादशहाकडून सर्व काहीं व्यवस्था करवितों ' जयसिगाचें असें प्रेमाचे व आदराचे भाषण ऐकून महाराज ह्मणाले 'तुम्ही मला वडिलासमान आहा तुमच्या ठायी माझा पूर्ण भाव आहे मी मिळविलेले राज्य सारें तुमचें आहे मीहि तुमचाच आहे वडिलाच्या माडीवर माझे लेकराचें उसें आहे तुमच्या आज्ञेप्रमाणे मी दर्शनास आलों आहे या गोष्टीचा अभिमान धरून जे योग्य दिसेल ते करण्यास वडील समर्थ आहेत तुह्मास जे किल्ले पाहिजेत ते देण्यास मी तयार आहे ' हे अतिनम्रतेचे भाषण ऐकून जयसिगराजा सतोष पावला मग तो त्यास ह्मणाला 'दिलेरखान हा मोठा डौली अरब उमराव आहे तो बादशहाच्या मोठ्या मेहरबानीतला आहे त्यास आधी अनुकूळ करून घेतले पाहिजे तुह्मास त्याच्या भेटीस जाणे प्राप्त आहे तुमच्या-बरोबर माझे रजपूत नोकर व एक मोठा शूर व इभ्रतदार सरदार देतों ' महाराज ह्मणाले. 'मी तुमच्या सागण्या बाहेर नाहीं त्याच्या भेटीस जाण्यास मला हरकत नाहीं तुमचे अभय असल्यास मला त्याची भीति बिलकुल वाटत नाहीं ' मग जयसिगाने आपला मामा सुभानसिग यास बरोबर देऊन व महाराजास एका हत्तीवर बसवून दिलेरखानाकडे पाठविले हा खान त्या वेळी पुरंदर किल्ल्याच्या दरवाज्यापाशी होता महाराज जयसिगराजाच्या छावणींत येऊन त्याला भेटून आपल्याकडे येत आहेत हे ऐकून त्याला बरे वाटले नाहीं किल्ला सर करण्याची प्रतिज्ञा आपण केली ती आता व्यर्थ जाते हे मनात येऊन तो मानी पुरुष फारच खजील झाला, व शेवटी ह्या मोहिमेचें सगळे यश रजपूत सरदारास प्राप्त होते हे पाहून त्यास मत्सरहि वाटला हे हिंदुहिदु एक होऊन आपल्या मोहिमेस यानी खो आणिला, आणि जयसिगाने आपला विचार घेतल्यावाचून वाटेल तसा तह केला ह्याबद्दल त्यास राग व वहीम आला परतु महाराज जवळ आले असें कळताच केवळ सामोपचारार्थ तो त्यास सामोरा गेला, व त्यास आपल्या गोटात आणून दोघेहि एका बिछायतीवर लोडाशी टेंकून बसले खानास महाराजाचा इतबार बिलकुल नव्हता तो आपलीं शस्त्रे जवळ अगदी सज्ज ठेवून मोठ्या सावधगिरीनें बसला तहासंबंधानें बोलणें सुरू होऊन सुभानसिंगानें महाराजाचें ह्मणणें खानास समजून सांगितलें. तेव्हां खानानें थोडासा नसता आव दाखवून म्हटलें कीं, 'मी हा किल्ला हस्तगत

करून आंतील एकूणएक मनुष्याची कत्तल उडवीपर्यंत तुमचे काहींएक ऐकणार नाहीं ' महाराजानी त्यास म्हटले कीं, ' किल्ला आपलाच आहे. तो घेण्याची तसदी विनाकारण कशाला? ह्या किल्ल्याच्या दरवाजाच्या चाव्या आपणास द्यावयास आणिल्या आहेत ह्या घ्या माझे सगळे किल्ले व प्रांत आपल्या ताब्यात आज आले आहेत असे समजा मला माझ्या अपराधाबद्दल क्षमा करावी अशी माझी विनंति आहे बादशहाच्या पदरच्या आपल्यासारख्या शूर मरदाराशी झुंजण्याचे धाडस करणें हा शुद्ध वेडेपणा आहे तरी माझे आजपर्यंतचें वर्तन मनांस न आणिता माझी बादशहापाशी रदबदली करून तो मला आपल्या पदरी नोकरीस ठेवील असे करा- आपण शिफारस कराल तर माझें ऊर्जित होण्या-सारखे आहे ' हे नम्रतेचें भाषण ऐकून व किल्ल्याच्या चाव्या आपल्या हाती दिलेल्या पाहून खान अगदी खुश झाला आणि म्हणाला 'जयसिंगराजे वडील आहेत ते बादशहाच्या विश्वासातले आहेत आह्मी त्याचे केवळ अंकित आहों ते जे कांही करितील ते आह्मास मान्य आहे ' असें बोलून खानाने महाराजास दोन घोडे, एक तलवार, एक रत्नखचित खंजीर व दोन भरजरी वस्त्रे नजर केली मग त्याच्याबरोबर तो जयसिंगाच्या छावणीत आला आणि त्याचा हात धरून त्याला जयसिंगाच्या हाती दिलें मग त्याने पुरंदरकिल्ल्याचा वेढा उठविला महाराजानी जयसिंगास, खानास व त्याच्या बड्याबड्या सरदारास मोठ्या थाटाची मेजवानी दिली त्यानीहि महाराजास व त्याच्या निवडक लोकास मेजवानी दिली

महाराजास निरोप देताना जयसिंगाने त्यास एक झगा, एक घोडा, एक हत्ती व शिरपेच एवढी नजर केली महाराज ह्या वेळी जयसिंगाच्या भेटीस

१ प्रो. सरकार ह्मणतात की, पुरंदर किल्ल्यासभोवतालचे सगळे बुरूज व माच्या मोगलानी सर करून तथून मुख्य किल्ल्यावर तोफांचा मारा चालविला तेव्हा किल्ला शत्रूच्या हाती जाऊन आतल्या आपल्या उरलेल्या शूर शिपायाची कत्तल उडते व त्यांची बायका मुले त्याच्या हातीं लागून त्यांची विटंबना होते ती टाळावी ह्मणून महाराज फक्त सहा ब्राह्मण बरोबर घेऊन जयसिंगाच्या तंबूत तहाचे बोलणें करावयासाठी गेले ह्या वेळी जयसिंग त्या किल्ल्यापाशीच होता. तहाच्या अटी ठरत असता त्याने किल्ल्यावर सारखा भडिमार चालविण्याचा हुकूम दिला होता तो बंद करून किल्ल्यावरच्या लोकास वाचवावें ह्मणून महाराजानी आपला एक कामदार खानाच्या सरदाराबरोबर पाठवून आतल्या लोकांस लढण्याचें बंद. करून किल्ला खानाच्या स्वाधीन करावयास सांगितलें

नि:शस्त्र आले होते. खानानें दिलेली तलवार त्यानीं थोडा वेळ कमरेस अडकवून पुनः काढून ठेविली आणि ह्मटलें कीं, मी नि:शस्त्र सेवकाप्रमाणें बादशहाची एकनिष्ठपणें सेवा करीन ही अशी लीनता दाखवून त्यांनीं पुरंदर किल्ल्याचा वेढा उठवावयास लावून त्यात सात हजार माणसें अडकून पडलीं होतीं त्यास सोडविलें.

ह्याप्रमाणें त्यांच्याशी समेट करून महाराज परत राजगडास आले. पुढें आणखी थोडी भवतिनभवति होऊन उभयताच्या विचाराने असा तह ठरला कीं, शिवाजी महाराजानी मोगलाचे जे किल्ले व प्रात काबीज केले होते ते सगळे त्यानीं सोडून द्यावे, निजामशाही प्रातात त्यांनीं सर केलेले किंवा नवीन बाधलेले एकंदर बत्तीस किल्ले होते, त्यापैकीं वीस किल्ले[1] व त्याच्या आसपासचा प्रांत त्यानीं जयसिंगाच्या स्वाधीन करावा, बाकीचे बारा किल्ले व त्यालगतचा प्रात महाराजानी आपणाकडे जाहगिरदाखल ठेवावा, ह्याशिवाय विजापूरकराच्या राज्यातील जे प्रात व किल्ले महाराजानी काबीज केले होते ते त्याच्याकडे निर्वेध राहावे, आणि ही सगळी आपणांस दिल्लीच्या बादशहाकडून जहागीर मिळाली आहे असें समजून त्याचें अकितत्व स्वीकारून महाराजानी राहावे, त्याचा मुलगा संभाजी, जो ह्या वेळीं केवळ आठ वर्षांचा होता, त्याला बादशहाकडून पाच हजार स्वाराची मनसब मिळावी, निजामशाहींतील आपले वडिलोपार्जित हक्क महाराज सोडून देतील, त्याच्या मोबदल्यादाखल विजापूरसरकारच्या अमलातील प्राताचा जो मुलूख मोगल जिंकितील त्यातून घाटावरचा पाच लाख होन उत्पन्नाचा व कोंकणातला चार लाख होन उत्पन्नाचा प्रात महाराजाना द्यावा, अदिलशहाच्या अमलातील घाटावरच्या प्राताची चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा हक्क

---

१ कोणी ह्मणतात पचवीस किल्ले व कोणी ह्मणतात सत्तावीस किल्ले सोडून द्यावे असें ठरलें होते प्रो सरकार ह्मणतात कीं, तेवीस किल्ले सोडून देण्याचें त्यानी कबूल केलें. रा. राजवाडे यांनीं आपल्या आठव्या खडात मोगलांकडील एक यादी प्रसिद्ध केली आहे तींत ही सख्या वीस आहे. प्रो सरकार तर तेवीस किल्ल्यांचीं नावें देखील देतात. ह्या सगळ्या प्राताचें उत्पन्न चाळीस लाखांचें होतें असें खाफीखान ह्मणतो. ह्या प्राताचे उत्पन्न दहा लाख रुपये होतें असे म्हणतात. प्रो. सरकार वरील तेवीस किल्ल्यांचें उत्पन्न चार लक्ष होन ह्मणजे वीस लाख रुपये व बारा किल्ल्यांचें उत्पन्न एक लाख होन ह्मणजे चार लाख रुपये होतें असें ह्मणतात.

महाराजाना द्यावा, व जंजिरा त्याच्या स्वाधीन करावा[1] ह्या शेवटल्या तीन अटी औरंगजेबास मान्य होऊन त्याबद्दलचें त्याच्याकडून फरमान आलें तर महाराजानी त्यास चाळीस लाख होन पेशखुष ह्मणून द्यावे, ही रकम वर्षास तीन लाख रुपयाच्या हप्त्यानी भरावी, व मोगलास साहाय्य करण्यासाठी महाराजानी आणखी स्वार चाकरीस ठेवावे महाराजानी जयसिंगापाशी अशी अजिजी केली कीं, मी बादशहाचे अनेक अपराध केले आहेत, त्याच्यापुढे दाखवायाला मला तोंड नाहीं, तरी मला इतर सरदाराप्रमाणें बादशहाच्या दरबारात हजर राहण्याची सक्ती होऊं नये माझा सभाजी त्याच्या दरबारी राहील, अाणि तुह्मी दक्षिणेत मोहीम कराल तेव्हा मला सागाल ती नोकरी बजावण्यास मी तत्पर राहीन

ह्या अशा कलमाची यादी जयसिंगाने अर्जाच्या रूपानें औरगजेबाकडे पाठविली व अशी शिफारस केली कीं, 'शिवाजी महाराज बादशहाच्या फार उपयोगीं पडतील ते दक्षिण देशाचे केवळ किल्ली आहेत त्याची विजापूरकराशी अशाने पुरी फारकत होण्याचा सभव आहे शिवाय विजापूरकराचे इकडच्या डोंगरावरील व जगलातील किल्ले व प्रात काबीज करण्याचे काम अतिबिकट आहे, ते त्याच्या मदतीने सहज साध्य होईल हे आपल्या सेवकवर्गात सामील होतील तेव्हाच दक्षिणदेश जिकिता येईल' या अर्जात महाराजानी जयसिंगाच्या सूचनेवरून कृतापराधाची क्षमा मागून बादशहाचे दर्शन घेण्याची इच्छा दर्शविली होती

हा अर्ज औरंगजेबाकडे गेल्यावर त्याने महाराजास एक मोठे पत्र लिहून त्याच्या अर्जातील बहुतेक कलमे कबूल केली विजापूरच्या राज्यात चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वसूल करण्याचा अधिकार महाराजानी मागितला होता, तो त्याने त्यास अशा अटीवर देण्याचे कबूल केलें कीं, जयासगास विजापूरकरांवरील मोहिमेत महाराजानी आपल्या सैन्यानिशी मदत करावी, व ती शाही बुडविण्याच्या कामी मनापासून झटावे, व जे पेशखुष त्यानीं द्यावयाचें केलें होते त्याचा पहिला हप्ता भरावा जंजिऱ्यासबंधाचें कलम मात्र त्यानें कबूल केलें नाहीं. जयासिगाच्या विनतीवरून औरगजेबाने शिवाजी महाराजास फरमान व खिलात ( शिरपाव ) हीं पाठविलीं वर सागितल्याप्रमाणें त्यानी पुरदर मोगलाच्या स्वाधीन करून आणखी सिंहगड त्याचा सरदार किरतसिंग याच्या

१ प्रो. सरकार ह्या शेवटल्या दोन अटी देत नाहीत.

स्वाधीन केला; आणि संभाजीला मोगलांच्या उग्रसेननामक रजपूत सरदाराबरोबर जयसिंगाच्या छावणींत पाठवून दिलें

कराराप्रमाणे महाराजानी जयसिंगास विजापूरकरावरच्या मोहिमेंत दोन हजार स्वार व आठ हजार पायदळ एवढ्या सैन्यानिशी मदत केली पहिल्यानें त्यांनी फलटणच्या बजाजीराव निंबाळकराशी युद्ध करून त्याचा पुरा मोड केला व फलटण हस्तगत केलें हा निंबाळकर महाराजाचा नातलग असून त्याच्यांशीं सलोख्याने कधीहि वागला नव्हता तो विजापूरसरकारचा एकनिष्ठ सेवक ह्मणविण्यातच मोठें गौरव मानीत असे ह्या निंबाळकराच्या ताब्यात तत्तोरा नावाचा किल्ला होता तोहि महाराजाच्या मावळ्यानी छापा घालून घेतला ह्याप्रमाणें मार्गात जे जे किल्ले लागले ते ते महाराज काबीज करीत चालले

अलीआदिलशहा मोगलाशी झुजण्याची कडेकोट तयारी करीत होता, परंतु मोगलाच्या मागण्याचा कसाबसा निकाल लावून त्याची मोहीम मागे परतून लावण्याचीहि खटपट त्याने चालविली होती पण तीत त्यास यश मिळालें नाहीं जयसिंग व दिलेरखान यानी आपल्या फौजेसह विजापूरकराच्या मुलखात प्रवेश करून प्रांत व किल्ले काबीज करण्याचा सपाटा चालविला शेवटी मंगळवेढे येथे मोगलाची व विजापूरकराची गाठ पडून मोठ्या निकराची लढाई झाली ह्या वेळीं विजापूरकराच्या सैन्यात पुष्कळ मराठेसरदार होते त्यात महाराजाचे सावत्र भाऊ व्यंकोजीराजे हे प्रमुख होते ह्या मराठे सरदारानी ह्या युद्धात आपल्या शौर्याची व युद्धकौशल्याची अगदी परांकाष्ठा केली त्यातून विशेषत व्यंकोजी

[१] बजाजी निंबाळकराची बहीण सईबाई ही महाराजास दिली होती, आणि त्याची मुलगी सखूबाई हा बजाजीचा मुलगा महादाजी यास दिली होती असे सांगतात की, ह्या बजाजीला विजापुरास नेऊन आदिल शहाने अटकेत ठेविले आणि त्यास असे सांगितले की, तुला जिवानिशी सुटून जावयाचे असेल तर मुसलमान हो हे असे प्राणसंकट प्राप्त झाल्याकारणाने त्याने मुसलमानी धर्म नाइलाजास्तव स्वीकारिला तेणेकरून त्याच्या घराण्यात शेकडो वर्षे चालत आलेली जहागीर त्याच्याकडे कायम राहिली, आणि आदिलशहाच्या मुलगाने त्याच्याशी विवाह केला पण पुढे त्याला शिवाजी महाराजाच्या मातुश्री जिजाबाई यानी मराठामंडळ जमवून व प्राणात संकट ओढवल्यामुळे हे धर्मांतर त्याला करणे प्राप्त झाले ह्या सबबीवर त्याला शुद्ध करून घेण्यासाठी शास्त्राधार काढवून त्याला पुन हिंदुधर्मात घेतले, आणि तो असा पावन झाला याविषयी कोणाच्या मनात किंतु राहू नये ह्मणून त्यानी शिवाजी महाराजाची कन्या सखूबाई ही त्याचा मुलगा महादाजी यास दिली असें ह्मणतात.

राजानीं फारच पराक्रम केला इकडे मोगलाच्या तर्फेनें महाराज आणि प्रतापराव गुजर हे लढत होते. त्यांनी तर केवळ अचाट शौर्य व कुशलता प्रगट करून जयसिंगादि मोगलसरदारास अगदी थक्क करून सोडिले. जी जी कामगिरी त्यास सांगितली ती ती त्यांनी उत्तम प्रकारे बजावून तींत पूर्ण यश संपादिलें ह्या लढाईत विजापूरकराचा अर्थात् पराभव झाला पुन आणखी एक वेळ महाराजांनी किरतसिंगाबरोबर विजापूरकराच्या सैन्यावर हल्ला करून त्याचा पुरा मोड केला

महाराजाच्या अंगचे असें अलौकिक धैर्य, शौर्य व युद्धचापल्य पाहून जयसिंगराजा अगदी दंग होऊन गेला त्याने त्याची अतिशयित वाहवा करून औरंगजेबास लढाईच्या हकीगतीचे एक पत्र पाठविले, त्यात महाराजाची व त्याच्या लोकाची अतिशयित स्तुति केली त्यावरून त्या बादशहाने महाराजास पुन एक पत्र पाठवून त्याची त्यात फारच तारीफ केली, आपल्या फौजेस असें उत्तम साहाय्य केल्याबद्दल त्याचे यथोचित गौरव केले आणि आपल्या मेहरबानीचे सूचक म्हणून त्यास शिरपाव आणि रत्नखचित खंजीर हीं पाठवून दिली

जयसिंगाने विजापुरापर्यंत शत्रूच्या लोकास पिटाळीत नेले खरे, परंतु विजापुरास वेढा घालण्यास लागणारी तोफार्ची वगैरे सामुग्री त्याने बरोबर घेतली नसल्याकारणाने त्याला माघार घ्यावी लागली दुसरे असें कीं, अदिलशहाने मोगलाशी टक्कर देण्याची जय्यत तयारी केली असून विजापूरच्या किल्ल्यात अन्नसामुग्री, लोक व तोफा वगैरे याची उत्तम तरतूद करून ठेविली होती यास्तव ह्या वेळी त्याच्याशी सामना केल्याने यश प्राप्ति होण्याचा संभव त्याला फारसा दिसला नाहीं तो आपले लोक घेऊन माग फिरला तेंव्हा त्याच्यावर विजापूरकरानी वारवार हल्ले करून त्यास हैराण करण्याचा प्रयत्न केला पण महाराजाच्या लोकानी त्याचे फारसें काहीं चालू दिले नाहीं. ह्या वेळी नेताजी पालकर, ज्यास मोगल लोक प्रतिशिवाजी ह्मणत, त्याने अतिशयित मर्दुमकी दाखविली असें ह्मणतात ह्याप्रमाणे पिछेहाट करावी लागली ती केवळ शिवाजी महाराजांनी मनापासून साहाय्य केले नाही ह्मणून करावी लागली असें दिलेरखान वगैरे सरदार ह्मणू लागले आणि त्यास अटकेत ठेवावें असें ते जयसिंगास सांगूं लागलें [1] इकडे महाराजानी जयसिंगाला असें सुचविले कीं, आपल्या-

१ मनुस्सी ह्मणतो कीं, शिवाजीचा वध करावा अशी मसलत दिलेरखानाने जयसिंगाला अनेक वेळा दिली, आणि तो ही गोष्ट करावयास वजन नसेल तर आपणाला

बरोबर कांहीं लोक दिल्यास आपण जाऊन विजापूरकरांकडचा पन्हाळा किल्ला सर करितों हें त्यांचें ह्मणणें कबूल करून त्यानें त्यास ह्या मोहिमेवर रवाना केलें परंतु त्या किल्ल्यावर विजापूरकराचा बंदोबस्त उत्तम प्रकारचा असल्या कारणानें तींत त्यास यश आले नाहीं शिवाय नेताजी पालकर ह्या वेळी महाराजावर रुष्ट होऊन विजापूरकरास जाऊन मिळाला होता महाराजाचे हजार लोक ह्या किल्ल्यापुढे ठार झाले तेव्हा निराश होऊन ते स्वत विशाळगडाकडे निघून गेले, आणि त्याचे काहीं लोक पन्हाळा किल्ल्याच्या आसपास धामधूम करीत राहिले त्यामुळें त्या किल्ल्यावर सहा हजार लोक होते त्यास महाराजांचा किंवा मोगलाचा पाठलाग करिता आला नाहीं

विशाळगडास आल्यावर महाराजानी दोन हजार लोक एका मुसलमान सरदाराबरोबर देऊन फोंड्यास वेढा देण्यासाठीं पाठविले आतल्या विजापूरच्या लोकानी दोन महिने किल्ला लढविला पण शेवटी ते हार खाण्याच्या बेतात आले इकडे अदिलशहाने रुस्तमजमान, शिद्दीमसाऊद वगैरे सरदारास बरोबर पाच हजार घोडेस्वार व एक हजार पायदळ देऊन फोंड्याचा वेढा उठविण्यास पाठविलें हे लोक तिकडे चालले असता वाटेत एका टेकडीवर शिवाजी महाराज आपल्या थोड्या लोकानिशीं तळ देऊन आहेत अशी बातमी त्यास लागल्यावरून त्याच्यावर एकदम घाला घालण्याचा त्यानीं बेत केला, आणि त्या दिशेकडे त्यानी आपला मोरचा फिरविला त्रिनीच्या फाजेत महाराजाचा मित्र रुस्तमजमान होता त्याने रणवाद्ये वाजवून त्याना शत्रु जवळ आल्याचा इशारा दिला. त्याबरोबर त्यानी तेथून पळ काढला मसाऊदखानाने त्याचा पाठलाग केला व त्याचे दोनशे लोक ठार केले पण ते त्याच्या तावडीतून निसटून गेले शत्रूचे लोक पुष्कळ असल्याकारणाने त्यानी त्याच्याशीं सामना केला नाहीं त्याचा पाठलाग करण्याचें सोडून मसाऊद परत येत असतां महाराजानी रुस्तमजमानास स्नेहभावाची पत्रे पाठविली तीं त्याच्या हाती लागली ती त्याने आदि-

---

ती करावयास परवानगी द्यावी इंग्रज व्यापाऱ्याच्या त्या वेळच्या लेखावरून असे कळते कीं, शिवाजी महाराजांनी दिलेरखानास असे सांगितले की, आपण दोन दिवसांत विजापूर सर करू ही अशी त्यानी त्यास भर दिल्यावरून वीस हजार स्वार घेऊन तो विजापुरावर चालून गेला,परतु त्याला ह्या मोहिमेंत यश आलें नाहीं. यावरून दिलेरखान आपला प्राणघात करील ह्या भीतीनें महाराज पळून गेले. जेध्यांच्या शकावलीत ह्मटलें आहे कीं, महाराज जयसिंगाचा निरोप घेऊन राजगडास आले.

लश्कराकडे पाठवून दिली. ती पाहून अदिलशहानें रुस्तमखानास असें धमकीचें पत्र लिहिलें कीं, तुमच्या ह्या निमकहरामीबद्दल तुह्मास नोकरीवरून दूर करण्याची पाळी न यावी असें तुह्मास वाटत असल्यास फोंड्याचा वेढा उठविण्याची व्यवस्था करा त्यावरून रुस्तमजमानाने आपल्या तिकडील एका अमलदारास असा निरोप पाठविला कीं, साधेल तो उपाय करून फोंड्याचा वेढा उठवा ह्या अमलदाराने महाराजाच्या सरदारास वरून स्नेहभाव दाखवून त्याच्या छावणीवर अकस्मात् घाला घातला आणि त्याच्या लोकास फोंड्याजवळून उधळून लाविलें हा असा दगा केल्यामुळे रुस्तमजमानाविषयी महाराजाच्या मनात वितुष्ट आले रुस्तमजमान इतकेच करून राहिला नाहीं त्याने मोहीम पुढे चालवून फोंडे, कुडाळ, बादे, डिचोली, साकळी वगैरे लहानमोठे गाव त्याने हस्तगत केले. ह्यानंतर महाराजाना औरगजेबाच्या भेटीस जावे लागलें ह्मणून विजापूरकराच्या मुलखात त्याना पुनरपि लागलीच मोहिम करण्यास अवसर सापडला नाहीं

ह्याप्रमाणें महाराज आपल्या मुलखात परत गेले, आणि नेताजी पालकरासारखा शूर योद्धा विजापूरकरास जाऊन मिळाला हे काहीं ठीक नाहीं, असें मनात आणून जयसिगानें नेताजीस पाच हजाराची मनसब व अडतीस हजार रुपये रोख देऊ करून आपल्याकडे आणिले[१] ह्या वेळी आणखी कुतुबशहा आदिलशहाच्या मदतीस आल्याचें वर्तमान जयसिगाला लागले तेव्हा शिवाजी महाराज त्यास जाऊन मिळाले तर आपलें कार्य मुळींच साधावयाचें नाहीं, असें त्यास वाटून त्याने औरगजेबास असें लिहिले कीं, ह्या प्रसगी शिवाजीला कसेंहि करून अगदी आपलासा करून घेतला पाहिजे, तर त्यास तुमच्या भेटीस पाठवून देतो ह्या सूचनेवरून औरगजेबाने महाराजास एक पत्र पाठवून त्यात त्याचा पुष्कळ गौरव करून त्याला दिल्लीस आपल्या दरबारीं बोलाविले, व असें आश्वासन दिलें की तुम्ही इकडे आल्यावर तुमच्या सर्व

---

१ हा नेताजी पुढे काही दिवस जयसिगाच्या लष्करात होता शिवाजी महाराज आग्रा येथे औरगजेबाच्या भेटीस जाऊन त्याच्या अटकेंतून सुटून आल्यावर औरंगजेबानें नेताजीस कैद करून आग्र्यास नेले तेव्हा आपली सुटका व्हावी ह्मणून त्याने मुसलमानी धर्म स्वीकारिला, आणि तेथ तो लहानशी मनसब मिळवून राहिला. पण पुढें १६७६ त तो तेथून पळून दक्षिणेत आला, आणि मुसलमानी धर्माचा त्याग करून महाराजाकडे पुन नोकरीस राहिला. ( खाफीखान )

अटींचा पुन योग्य विचार करूं. तुह्मांस मोठ्या योग्यतेस चढवूं व मोठा किताब देऊन दक्षिणेंत परत जाण्यास रजा देऊं. ह्याप्रमाणें महाराजास पत्र पाठवून जयसिंगास असा हुकूम पाठविला कीं, शिवाजीराजे यास वाटखर्चास एक लाख रुपये तिकडील तिजोरीतून देऊन आमच्या दरबारी जरूर पाठवून द्यावें. हें पत्र आल्यावर जयसिंगानें महाराजांस अशी मसलत दिली कीं, तुम्हीं दिल्लीस अवश्य जावे, मनात काहींएक किंतु धरूं नये. तेथे माझा मुलगा रामसिंग आहे तो तुमची सर्व तरतूद ठेवील. तो तुह्माला कोणत्याहि प्रकारचा दगाफटका होऊं देणार नाहीं हा असा जयसिंगराजाचा आग्रह पडल्यामुळे महाराजानीं औरंगजेबाच्या भेटीस जाण्याचा निश्चय केला.

# भाग एकोणिसावा.



## आग्र्यास प्रयाण.

### १६६६–६७.

जयसिंगराजाचा अत्याग्रह पडल्यामुळें व औरंगजेबाचेहि मोठें उत्तेजनप्रद पत्र आल्यावरून महाराजानी दिल्लीस जाण्याचा ठराव केला, व जयसिंगाच्या छावणींतून निघून ते रायगडावर आले आपल्या मुख्यमुख्य सरदारास व अमलदारास आपल्याकडे बोलावून आणून त्यानी त्यास आपला दिल्लीस जाण्याचा विचार कळविला त्यावर कित्येकाचा अभिप्राय असा पडला कीं, 'औरंगजेब केवळ दैत्य आहे तो मोठा कपटी असून आपला हाडवैरी आहे त्याचा विश्वास धरणें नीट नाहीं शिवाय दिल्ली येथून दोन महिन्याच्या वाटेवर आहे मार्गात काय सकटे येतील याचा नेम नाहीं' महाराज ह्मणाले 'आता दिल्लीस जाणे प्राप्तच आहे श्रीभवानीनेहि ह्मटलें आहे कीं, 'दिल्लीस जाणें पडेल, पण तेथून मी निभावून आणीन' तिकडे गेल्यानें उत्तरेकडील मुलूख व दिल्लीदरबार हीं पाहावयास मिळतील आमच्या पूर्वजानीं उत्तरदेशी राज्यें केली त्या जागाचें आह्मास अवलोकन घडेल, व भागीरथी, यमुना आदिकरून महातीर्थाचें दर्शन घडेल जयसिंगराजानी आश्वासन दिलें आहे व आपणास अनुकूल असा तहनामा बादशहाकडून ठरून आला आहे तेव्हा आता भीतीचे काहीं कारण उरले नाहीं इतकेहि करून एकादा बिकट प्रसंग आला असता त्यातून आह्मी श्रीच्या कृपेने निभावून येऊं अशी आह्मास धमक आहे ह्याप्रमाणे त्याची हरकत मोडून काढून त्यानीं संभाजीसह दिल्लीस जाण्याचा विचार कायम केला

मग मोरोपंत पेशवे, अण्णाजी दत्तो सुरनीस व निळो सोनदेव मुजुमदार ह्या तिघास सर्वाध्यक्ष नेमून त्यानी त्याच्या स्वाधीन सगळा राज्यकारभार केला. त्यांस रायगडावर राहावयास सांगितलें, आणि एकंदर सरदारांस व कारकुनांस त्यांच्या हुकमाप्रमाणें वागण्याची ताकीद दिली. प्रतापराव वगैरे काहीं जिल्हा-

ळ्याच्या सरदारांस मातुश्री व राजाराम यास संभाळावयास सागून ते ह्मणाले: "एकंदर मुलखाची व्यवस्था व बंदोबस्त आजपर्यंत ठेविला आहे तसाच पुढें इमानानें व हुशारीनें ठेवा; राहिलेले गड, कोट, किल्ले व प्रात याचें जतन करा- संपादिलेल्या राज्यात साधल्यास भर घाला आह्मी दिल्लीस गेल्यावर आह्मा- कडील बातमी हमेशा काढीत राहा. तिकडे कसाहि प्रसंग आला तरी आह्मी डगमगणार नाहीं हरयुक्तीनें त्यातून पार पडून स्वदेशी येऊ आह्मास जयसि- गासारखे हिदुराजे अनुकूळ आहेत. आह्मास काहीं दगाफटका झाल्यास ते आमच्या वतीनें भाडण्यास तयार होतील अशी आमची पूर्ण खात्री आहे आह्मी तिकडे मोठ्या सावधगिरीने राहूं आमची चिता तुह्मी करूं नये मातुश्री- साहेबाचें समाधान मात्र तुह्मी वरचेवर करीत राहा आमच्यावर तिकडे यदा- कदाचित् असमानीसुलतानी गुदरली तरी तुह्मी बिलकुल न घाबरता स्वराज्याचें रक्षण करा राजारामाच्या नावे राज्यकारभार चालवा. तुमच्या इमानावर, हुशारीवर व हिमतीवर पूर्ण विश्वास ठेवून सर्व राज्य तुह्मास निरवून मी उत्तरेस जात आहे"

ह्याप्रमाणें मागली सगळी व्यवस्था लावून महाराजानी दिल्लीस जाण्याची सर्व तयारी केली आपल्याबरोबर अगदी निवडक लोक घेतले, ते असे कीं, कसाहि प्रसग आला असता बिलकुल न कचरता महाराजाप्रीत्यर्थ प्राणहि देण्यास ते सिद्ध होतील त्याच्या बरोबर निराजी रावजी शहाणे, त्रिंबकजी सोनदेव डबीर, दत्ताजी त्रिंबक, माणको हरि सबनीस[1] हे कारकून होते,[2] हिरोजी फर्जंद, राघोमित्र, दावलजी गाडगे,[3] जिवा महाल्या हे हुजरे होते शिवाय महाराजानी आपल्या बरोबर धारकरी व मावळे मिळून सरासरी चार हजार चागले निवडून घेतले होते[4] निघतेसमयी पुन सर्व सरदाराच्या भेटी घेऊन महाराजानी त्यास नीट

१ चिटणीस याचे नाव जिवनराम माणको असे देतो

२ याशिवाय आंणखी बाळाजी आवजी चिटणीस व नरहर बल्लाळ सबनीस हे होते असे चिटणीस ह्मणतो

३ याचीं नावे सभासद देत नाही शि दि रघुनाथराव कोरडे, येसाजी कक, तानाजी मालसुरे व बाळाजी आवजी याची नावें देतो जेध्याच्या शकावलीत असे सांगितले आहे की, त्रिंबकपत डबीर व रघुनाथपत कोरडे शिवाजीमहाराजाबरोबर गेले होते; आणि महाराज सुटून गेले तेव्हां त्यास कैद केले होतें.

४ ह्या लष्कराबरोबर प्रतापराव गुजर मरनोबत हा होता असे कित्येक बखरीत ह्मटले आहे.

हुशारीनें राहावयास सांगितलें, व श्रीभवानीचें दर्शन घेऊन ते मातुःश्रीचा निरोप घ्यावयास गेले तिने त्याला परमप्रीतीनें पोटाशीं धरून मस्तकीं दयाहस्त ठेविला, व डोळ्यात आसवें आणून सद्गदित वाणीनें असा आशीर्वाद दिला कीं, "बाळा, तूं श्रीशंभु व श्रीजगदंबा याच्या प्रसादानें यशस्वी होऊन परत सुरक्षित येशील. अविध परम कृतघ्न, दुरात्मे व करुणाहीन आहेत त्याच्या दरबारीं संभाजी-बाळास घेऊन जात आहेस, ही गोष्ट कांहीं सामान्य नव्हे शिवबा, प्रवासांत मोठ्या सावधपणानें वाग सभाजीबाळाच्या प्रकृतीस जप बादशहाची अदब रक्षून समयोचित वर्तन कर, व स्वकार्य सिद्धीस नेऊन लवकर स्वदेशीं ये. जय-सिगराजा सत्यवचनी आहे तो मोठा धर्मशील व क्रियावंत हिंदुराजा आहे. त्याच्या मसलतीप्रमाणें वागून इष्ट उद्देश सिद्धीस ने तूं सुशील, सदाचारी व स्वधर्माभि-मानी आहेस जसें पंडुसुतास श्रीकृष्णप्रसादानें भारतीयुद्धात यश आलें, तशी तुला तुझ्या वडिलाच्या पुण्याईनें व श्रीजगदबेच्या वरप्रसादानें यश प्राप्ति होईल " ह्याप्रमाणें मातु श्रीचा आशीर्वाद घेऊन तिचे चरण वंदून महाराजांनीं सईबाईचा निरोप घेतला

मग पुन एक वेळ औरगाबादेस जाऊन जयसिंगराजाची भेट महाराजानीं घेतली त्या वेळी जयसिगानें त्यास व त्याच्या लोकास मोठ्या थाटाची मेज-वानी दिली व दिल्लीस गेल्यावर कोणत्या रीतीनें वागावें ते त्यास सांगितलें त्याचा पुत्र रामसिग हा बादशहाच्या दरबारात होता[1] त्यास एक पत्र देऊन त्यात त्याने त्यास असें लिहिलें कीं, "महाराजाची बरदास्त उत्तम प्रकारें ठेवून त्यास लागेल ते साहाय्य करण्यास बिलकुल कसर करूं नये." शेवटीं जय-सिगानें महाराजाची अशी खातरजमा केली कीं, "तुम्ही दिल्लीहून परत येईपर्यंत मी दक्षिणेंत राहतो, व इकडे तुमच्या ताब्यातील प्रातास व किल्ल्यास मोग-लाकडून काहींएक उपद्रव होणार नाहीं असा बदोबस्त ठेवितों तिकडे गेल्यावर औरंगजेबानें तुमच्याशी काहीं दगाबाजी केल्यास माझा पुत्र रामसिंग तर तुमचा बचाव करण्यास अवश्य झटेल इतकेंच नव्हे तर तो त्याबद्दल बादश-हाशीं विरोध करण्यास चुकणार नाहीं, व मीहि इकडून त्याची खोड मोडण्यास तयार होईन "

---

१ काही बखरकार ह्मणतात कीं, हा रामसिंग दक्षिणेंत आपल्या बापाबरोबर आला असून तेथून त्याला महाराजांबरोबर पाठविलें.

येणेंप्रमाणें जयसिंग राजाचें पुनरपि आश्वासन घेऊन महाराज दिल्लीस जावयास निघाले जयसिगाने गाझीखाननामक एक सरदार महाराजांबरोबर मार्गदर्शक ह्मणून दिला आपण येत आहों हें कळविण्यासाठी त्यांनीं आपला वकील पूर्वींच पाठविला होता आपल्या भेटीस शिवाजीमहाराज येत आहेत असें कळलें तेव्हा त्याने त्यास एक पत्र पाठवून कळविले कीं, तुम्ही मनात किमपि किंतु न धरिता आमच्या दरबारी या आम्ही तुमचा बहुमान करून तुह्मास दक्षिणेत स्वदेशी जावयास निरोप देऊं ह्या सोबत तुह्मास खिलात पाठविला आहे. अशा आशयाचे त्यास पत्र पाठवून आणखी त्याने औरंगाबादेच्या तिजोरीतून त्याच्या वाटखर्चास एक लाख रुपये देण्याचा हुकूम पाठविला आणि आपले सर्व महालकरी व मोकासदार यास अशी ताकीदपत्रे पाठविली कीं, 'शिवाजीमहाराज आमच्या भेटीस येत आहेत यास्तव त्याचा जेथंजेथे फौजेसह मुक्काम होईल तेथील फौजदारानी त्यांला भेटून त्यास लागणाऱ्या घासदाणा वगैरे सामुग्रीची उत्तम तरतूद ठेवावी शहाजाद्याप्रमाणें त्याची अदब सर्वांनी चालवावी.' ही अशी आगाऊ सूचना गावोगाव गेल्यामुळे महाराजाचा मुक्काम जेथेंजेथे होई तेथेंतेथे आसपासच्या गावातले लोक ह्या अशा वीर्यशाली व प्रौढप्रताप पुरुषाचें दर्शन घ्यावयास उत्सुक होऊन लोटत असत महाराज स्वत अत्यंत स्वाभिमानी व इभ्रतदार असल्याकारणाने त्यास आपला यत्किंचित्‌हि अपमान सहन होत नाहीं हे गावोगावच्या माहालकऱ्यांच्या व मोकासदारांच्या कानावर पूर्वींच गेलें होते असा एक प्रकार महाराज औरंगाबादेस जयसिंगाच्या भेटीस दिल्लीकडे जावयास निघताना गेले तेव्हा घडला होता. तो असा महाराज शहारापाशी आले असें ऐकून तेथले लोक त्याची मोठ्या थाटाची स्वारी पाहावयास शहराबाहेर लोटले. शहरचा नायब सुभेदार साफशीखान हा महाराजाचा द्वेष करीत असल्या कारणानें त्यांना स्वत सामोरा न जाता त्याने आपल्या पुतण्यास त्याना सामोरा पाठविला ही बेपरवाई पाहून त्यास राग आला, व ते जयसिंगाच्या गोटाकडे जावयास निघाले. ते पाहून तो अमीर ह्मणाला, 'सुभेदार साहेब दरबार भरून आपली वाट पाहत आहेत, तिकडे पहिल्यानें चलावे.' हे ऐकून महाराज म्हणाले:' तुमच्या सुभेदारांच्या मनांतून आमचा बहुमान करावयाचें होते तर ते स्वतः आम्हांस कां नाहीं सामोरे आले? ' असें बोलून त्याला व त्याच्या बरोबरच्या लोकांला परत जावयास सांगून ते स्वत· आपल्या लोकांनिशीं जयसिंगाच्या वाड्यांत गेले.

मग तो सुभेदार आपल्या हाताखालच्या सर्व अमलदारासह महाराजाच्या भेटीस आला, व त्यानें झालेल्या गोष्टीबद्दल क्षमा मागून त्याचें समाधान केलें, व त्यांस मोठी मेजवानी दिली त्याप्रमाणेंच इतर उमरावानीहि महाराजास मेजवान्या वगैरे करून त्याचा बहुमान केला

स्वराज्य सोडून जाण्यापूर्वी आपल्या किल्ल्याचा बदोबस्त आपले लोक आपण लावून दिलेल्या शिस्तीप्रमाणें आपल्या मागे कसा काय ठेवितात हें पाहण्यासाठी महाराज एका किल्ल्यावर रात्रीच्या प्रहरी अकस्मात् गेले, आणि आतील हवालदारास हाक मारून म्हणाले कीं, किल्ल्याच्या दरवाजाशीं शिवाजीमहाराज आले आहेत गनिमाची झड मागे आहे त्यास दरवाजा उघडून आत घ्या हे ऐकून त्या किल्लेदारानें आपले लोक तटावर जमवून उत्तर दिलें कीं, रात्रीस दरवाजा कदापि उघडू नये अशी महाराजानी कैद करून दिली आहे, यास्तव दरवाजा ह्या वेळीं उघडता येत नाहीं शत्रु आला असल्यास घेऱ्याच्या लोकाकडून त्यास रोखून धरितों आपण तटालगत दरवाजानजीक असावे शत्रु पुढे चालून न येईल असा बदोबस्त करितों यावर महाराजानी असे म्हटलें कीं, 'आज्ञाहि आमचीच, व दरवाजा उघडण्यास परवानगीहि आमचीच आम्ही खुद्द सागत आहो मग तुम्हाला काय हरकत? दरवाजा उघडणार नाही तर तुम्हास शिक्षा होईल. तुम्ही इतबारी चाकर तुम्ही आमच्या हुकमाप्रमाणे वागलेंच पाहिजे ' असें त्यानीं दरडावून सागितले तरी किल्लेदार न घाबरता म्हणाला कीं, आता रात्र थोडी उरली आहे, मागून येणाऱ्या गनिमाचे काहींएक चालूं देत नाहीं. असे बोलून त्यानें महाराजास रात्रभर बाहेरच थोपवून धरिलें. प्रात काळ झाला तेव्हा हवालदार वगैरे किल्ल्यातील अमलदार हात बाधून दरवाजाजवळ आले, आणि कुलपे काढून महाराजास आत घेऊन म्हणाले, 'आम्ही अन्यायी आहों पारिपत्य करणें असेल ते करावें ' हें त्याचें वर्तन पाहून महाराज फार संतोष पावले, व त्यांस नावाजून त्यानीं त्याची बढती केली ह्याप्रमाणें आपल्यामागे आपल्या किल्ल्यांचा बंदोबस्त नीट राहील अशी खात्री वाटून महाराज आपल्या लोकासह दिल्लीस निघून गेले

ह्या समयीं औरंगजेब आम्र्यास जाऊन राहिला असून तेथेच त्याचा सगळा दरबार असे. यास्तव महाराज दिल्लीस न जातां आम्र्यास गेले. ते जवळ आले

१ स्कॉटवेरिंग व बुंदेले यांच्या इतिहासांतून हा मजकूर घेतला आहे.

२ मराठी बखरी व ग्रांटडफ यांच्या आधारावरून प्रथमावृत्तींत औरंगजेबाचा

असें कळलें तेव्हा औरंगजेबानें रामसिंग व दुसरा एक अंमळ कमी दरजाचा सरदार असे त्याला सामोरे पाठविले अशा सामान्य सरदारांस आपणाला सामोरे पाठविले हा आपला अपमान झाला असें महाराजास वाटले परंतु त्या वेळीं हा अपमान त्यानी मुकाट्याने सहन केला त्याच्यासाठी जी हवेली ठरविली होती तींत त्यानी आपल्या लोकांनिशी मुक्काम केला व बादशहाच्या भेटीचा दिवस ठरविण्याविषयीं रामसिंगास सांगितलें ह्या वेळी महाराजानी रामसिंगापाशी असा आग्रह धरिला कीं, 'बादशहाची व आपली भेट बरोबरीच्या नात्याने होईल अशी व्यवस्था करावी' परंतु त्यावर रामसिंगाचे ह्मणणें असें पडलें कीं, 'बादशहा सार्वभौम आहे तो आपल्यासारख्या छोट्या राजास बरोबरीचा मान देणार नाहीं यासाठी असली अट त्याला कळविणें प्रशस्त दिसत नाहीं'

इकडे औरंगजेबाने महाराजाच्या व त्याच्याबरोबर आलेल्या लोकांच्या खर्चाची वगैरे तरतूद चांगली ठेविली होती, परंतु त्याच्या मनात ह्या वेळी महाराजाविषयी अंमळ वैरभाव जागृत होऊन त्याचा नाश करण्याची बुद्धि त्याला सुचण्यास एक मोठे कारण झालें शास्ताखानाची बायको ह्या प्रसंगीं दिल्लींत होती तिच्या मनात अर्थात महाराजाविषयी पराकाष्ठेची द्वेषबुद्धि वागत होती, कारण तिच्या पुत्राचा वध महाराजाच्या हातून झाला असून तिच्या नवऱ्याच्या फजितीला तेच कारण झाले होते तिनें बादशहाच्या जनानखान्यात आपला वशिला लावून त्यातील स्त्रियांची मनें महाराजासंबंधानें कलुषित केलीं व त्याच्याकडून बादशहास अशी विनति करविली कीं, शिवाजीमहाराज हातीं सापडले आहेत, त्याचा काहींएक गौरव न करिता त्याचा वध करावा ह्यामुळे त्याचे मन फिरून तो महाराजाचा घात करण्यास उद्युक्त झाला हा त्याचा बेत दरबारच्या अमीरउमरावास कळला तेव्हा त्यांनी त्यास असा अर्ज केला कीं, हजरतीच्या शब्दावर आमच्यासारख्याचे जीवित अवलंबून आहे असा विश्वासघात केल्यानें जयसिंगराजासारखे

---

दरबार दिल्लीस असून महाराज त्या शहरी गेले असे लिहिले होते परंतु शहाजहान स. १६६६ च्या जानेवारी महिन्यात मरण पावल्यावर औरंगजेबानें आपला दरबार आग्र्यास नेला व तेथेच तो बहुतेक कायमचा राहिला, यावरून हे स्पष्ट होते की, महाराज रायगडावरून निघाले ते दिल्लीस जावयास ह्मणून गेले असावे परंतु औरंगजेबाचा दरबार आग्र्यास गेल्यामुळे ते तिकडे गेले खाफीखानाच्या बखरीत व जेध्यांच्या शकावलींत बादशहाची मुलाखत आग्र्यासच झाली असे आहे. रा. राजवाडे आठव्या खंडात असेच ह्मणतात.

बलाढ्य हिंदुसरदार आपल्या पदरी आहेत ते बेदिल होऊन बंड करितील ही मसलत ऐकून त्यानें आपला बेत रहित केला.

रामसिंगानें बादशहापाशीं जाऊन भेटीचा दिवस ठरविला बादशहाचा पन्नासावा वाढदिवस ता १२ मे स. १६६६ रोजीं होता त्या दिवशीं मोठा दरबार भरावयाचा असून सर्व अमीरउमराव त्याला मुजरा करावयास व नजर-नजराणा द्यावयास येणार होते ह्या दिवशी शिवाजीमहाराजास दरबारास घेऊन यावें असें बादशहानें रामसिंगास फर्माविलें बादशहाने त्या दिवशीं मोठ्या तरतुदीनें दरबार भरविला मोठमोठ्या इमानी सरदारास व पठाणास चांगले सज्ज करून आपल्या तक्ताच्या आसपास जागोजाग नंग्या तरवारीनिशी उभे केले कारण त्यास अशी दहशत होती कीं, शिवाजीमहाराज काहीं सामान्य पुरुष नव्हे, तो केवळ सैतान आहे प्रसंग पडल्यास तो पचवीसपचवीस हात उडी मारितो! बादशहाने असा कडेकोट बंदोबस्त करून आपल्या आसनाजवळ पाच हत्यारें अगदी तयार ठेविली असून अंगात चिलखत चढविले होते व वरून मझलीनचा झगा घातला होता त्या दिवशी दरबारास एकंदर सरदार व शेटसावकार आले होते महाराजास पाहण्याची सर्वांस उत्कंठा लागून राहिली होती जनानखान्यां-तील स्त्रियालाहि त्यास पाहण्याची उत्कट इच्छा झाल्यावरून त्याची पडद्याआड बसावयाची व्यवस्था केली होती

दरबारची वेळ झाली तेव्हा महाराज आपल्याबरोबर थोडेसे निवडक लोक घेऊन रामसिंगासमवेत कचेरीस आले त्यानी रीतीप्रमाणें कुरनिसात केरून[1] बादशहाच्या तक्तापुढे नजराणा ठेविला[2], त्याची रामसिंगाने नेहमीच्या रिवाजाप्रमाणे रुजवात केली औरंगजेबाने त्याला कुशलप्रश्न विचारिले त्याचीं समर्पक उत्तरें महाराजानी दिल्यावर त्याला उजव्या हातास साधारण प्रतीचे अमीर उभे होते त्यात जाऊन उभे राहावयास त्यानें हातानें खूण केली त्याप्रमाणे महाराजास त्या बाजूस रामसिंगाने नेलें त्याला त्याच्याबरोबर तिकडे निरुपायास्तव जावें

---

१ चिटणीस ह्मणतो की, त्यानी कुरनिसात केली नाहीं, व रामसिंगानें तो प्रसंग मारून नेला. सभासद ह्मणतो कीं, त्यानीं तीन वेळा भुईस हात लावून सलाम केला, पण तो मनांत असा अर्थ आणून केला की, एक सलाम शंभुमहादेवास, दुसरा श्रीजग-दंबेस आणि तिसरा शहाजी राजास

२ पधराशें मोहरा नजर ह्मणून व सहा हजार रुपये निसार ह्मणून बादशहा-पुढे ठेविले असें प्रो. सरकार ह्मणतात

लागलें. पण तेथें जाऊन बाकीच्याबरोबर उभे न राहता ते खालीं बसले;आणि रामसिगास त्यानी विचारलें कीं, ह्या अमिराचा दरजा काय आहे ?[१] ते पंचहजारी मनसबदार आहेत, असा जबाब त्याच्याकडून मिळाला तेव्हां त्यास अतिशयित राग आला, आणि ते त्याला ह्मणाले कीं, 'बादशहाने माझी गणना अशा साधारण अमिरात केली हा माझा मोठा अपमान झाला आहे मी याच्याबरोबर उभा राहण्यास राजी नाहीं ' असें बोलून त्यानी रामसिगापाशीं कटार मागितली[२] हा प्रकार बादशाहाने पाहून काय गडबड आहे ह्मणून विचारले तेव्हा जवळच्या अमिरानी महाराजाचे ह्मणणें त्याला कळविलें[३] त्याबरोबर बादशहा

१ कित्येक मराठी बखरीत व बुदेल्याच्या बखरीत असा उल्लेख आहे की, महाराजानी आपल्या पुढे उभा असलेल्या एका रजपूत सरदाराचे नाव रामसिगास विचारिले त्याने त्याचे नाव राजारायसिग शिसोदे ह्मणून सागितल्याबरोबर महाराज रागाने बोलले,' माझी रायसिंगाशी बरोबरी केली काय ? माझा सात वर्षांचा मुलगा व माझा नोकर नेताजी पालकर यास पाच पाच हजाराच्या मनसबी दिल्या. मी बादशहाची एवढी कामगिरी बजाविली असून मला असा हलका दरजा द्यावा काय? मी ह्या दरबारात आलो तो असा हलका दरजा स्वीकारण्यास काय ?" प्रो सरकार (पृ १७५), सभासद व चिटणीस ह्मणतात की,ह्या सरदाराचें नाव जस्वतासिग असे होतें पण तो सात हजारी मनसबदार असल्याकारणाने पुढल्या रांगेंत बादशहापुढे उभा असावा असे प्रो सरकार ह्मणतात

२ ह्यावरून असें अनुमान होते की,महाराजास दरबारात नि शस्त्र येण्यास सागितलें होते आता त्यांनी कटार कशासाठी मागितली ते समजत नाही. बुदेले ह्मणतो की, शिवाजीमहाराजाला ह्या अपमानाबद्दल फार वाईट वाटून त्या दु खाच्या झटक्यासरशी ते मूर्च्छित झाले. तेव्हा त्यास स्नानगृहात न्यावयास सागितलें. तेथे त्यास वारा घालून व गुलाबपाणी अगावर शिंपडून सावध केले दरबारचा थाटमाट व चकचकाट पाहून ते असे घाबरून बेशुद्ध झाले असा ह्या इतिहासकाराचा तर्क आहे ! तो आणखी ह्मणतो की, शुद्धीवर आल्यानतर त्यानी आपणास आपल्या बिऱ्हाडी न्यावयास सागितले. तेथें गेल्यावर ते वेड्यासारखे चाळे करून काहीं तरी बरळूं लागले ते मोठमोठ्याने ओरडून ह्मणत की, मी वेडा ह्या गरुडाच्या नखांत सापडलों. तो मला लवकर ठार का मारीत नाही ?

३ ऑर्मी म्हणतो कीं, महाराजास बादशहाच्या भेटीस नेले तेव्हा त्याच्या अतस्थ हेतूबद्दल त्यांनीं त्यास दोष दिला,व ते म्हणाले कीं,शास्ताखानावरील प्रसंग व सुरतेची लूट ह्या दोन गोष्टीवरून माझी योग्यता तुह्मांस कळलीच असेल, असें बोलून ते आपला खंजीर काढून आपल्या उरांत खुपसून घेऊं लागले. पण त्याचा हात जवळच्या लोकानीं धरिला, व बादशहानें त्यांचें समाधान करून असें आश्वासन दिलें

दचकला, व ह्या समयीं हा काय करील कोण जाणे अशी दशहत वाटून त्यानें रामसिंगास हुकूम केला कीं, शिवाजी राजास निरोपाचे विडे देऊन डेऱ्यास घेऊन जावे उदयिक पुन मुलाखत होईल त्यावरून रामसिंगानें महाराजास दरबारातून बिऱ्हाडीं नेलें [1]

त्यानंतर पुन महाराजास औरंगजेबाच्या मुलाखतीचा प्रसग आला नाहीं कारण बादशहा त्यास पुन भेटण्यास राजी नव्हता हा त्याचा ठराव कळला तेव्हा त्यास फार वाईट वाटलें, व बादशहाच्या मनात आपणाविषयी पुरें कपट वसत आहे अशी त्याची खात्री होऊन त्यास अमळ भीतिहि वाटली मग त्यानी बादशहाचा मानस तरी काय आहे तें समजण्यासाठी रामसिंगास त्याच्याकडे पाठविले औरगजेबाने त्यास असें सागितलें कीं, 'शिवाजीमहाराजास आमच्या दरबारींच ठेवून घेऊन मोठमोठी कामे सागावी असे आमच्या मनात आहे दक्षिणेतील त्याची जाहगीर आहे तीसबंधाने त्याच्या इच्छेप्रमाणें करार होऊन चुकलेच आहेत ही जाहगीर त्यानी आपल्या पुत्राच्या नावे चालवावी इकडे त्याला क्रोडो रुपयाची नवी जाहगीर करून देऊ लाख पन्नास हजार फौज हाताखालीं घेऊन त्यानी ह्या प्रातींच मोठमोठ्या कामगिऱ्या कराव्या त्याच्यासारख्या शूर, चतुर व कर्तबगार पुरुषाच्या गुणाचें चीज ह्या दरबारी उत्तम होईल

हा बादशहाचा विचार महाराजाला मुळीच आवडला नाहीं शिवाय हा विचार प्राजलपणाचा आहे असें तर त्यास बिलकुल वाटलें नाही तो कपटी व धूर्त असून आपणास इकडे गुंतवून टाकून आपला दक्षिणेंतील काटा अजीबात काढून टाकण्याचा त्याचा इरादा आहे, हें त्यास कळून चुकले होते मग त्यांनी आपला वकील रघुनाथपंत यास त्याच्याकडे पाठवून असा अर्ज केला कीं, बादशहाने मला विशेष बढतीची आशा दाखवून इकडे बोलाविलें [2] त्यावरून मी

---

की, तुमच्या जिवास जरासुद्धा धक्का लागणार नाही तुम्ही आमच्या पदरी राहून आह्मांस कदाहारच्या स्वारीत मदत करावी

१ त्यांला शिरपाव, जवाहीर व हत्ती देण्यासाठी बादशहाने तयार ठेविले होते, ते अर्थात् या गडबडीमुळें त्याने त्यास दिले नाहींत, असे खाफीखान ह्मणतो

२ मनुस्सी ह्मणतो की, महाराज मोगलदरबारी गेले ह्मणजे त्यांस बादशहाच्या सरदार मडळात पहिली जागा देण्याचें कलम जयसिग व बादशहा यानी शपथेवर केलेल्या करारांत होतें. हा करार त्यानीं पाळला नाही. महाराज आग्र्याहून परत आल्यावर त्यास मोगलांच्या दक्षिणेंतील प्रांताचे सुभेदार नेमण्यांत येईल, असें वच-

येथें आलों मीं त्याची कोणती कामगिरी केली आहे ती त्यास महशूर आहेच. जयसिंगराजाच्या विद्यमाने जे करारमदार झाले आहेत त्यांबरहुकूम वागण्यास मजकडून लवमात्रहि कसूर व्हावयाची नाहीं अदिलशाही व कुतुबशाही खालसा करण्याचा बादशहाचा इरादा आहे, तो सिद्धीस नेण्यास मी मनापासून साहाय्य करीन त्याच्या सैन्यास दक्षिणेत लागेल ती मदत मी करीन. इकडे परक्या मुलखात राहून बादशहाची नोकरी मजकडून जितकी होण्यासारखी आहे, तिजहून पुष्कळ चांगली नोकरी मी दक्षिणेंत राहिल्याने होणार आहे यास्तव मला इकडे राहण्याचा आग्रह करणे बादशहाच्या हिताचे नाहीं, व तें माझ्याहि हिताचे नाहीं शिवाय मला, माझ्याबरोबर आलेल्या माझ्या लहान मुलास व माणसास ह्या देशाची हवा मुळीच मानवणार नाहीं ह्यासाठी मला माझ्या लोकांसह दक्षिणेंत परत जाण्याची परवानगी द्यावी.'

ह्या अर्जास बादशहानें निश्चित असें कांहींच उत्तर दिले नाहीं महाराजाला दिल्लीसच ठेवून घेतले ह्मणजे दक्षिणेतील बहुतेक त्रास कमी होऊन आपला उद्देश बिनधोक शेवटास नेता येईल, असें त्याच्या मनानें पूर्णपणे घेतलें होतें. त्याला तेथे अडकवून ठेविल्यानें ते आज नाहीं उद्या वठणीस येऊन आपले पुरे ताबेदार होतील असें त्यास वाटलें होतें खरें ह्मटले असता महाराज त्याच्या तावडींत सापडले असल्यामुळे त्याचा पुरा नाश करण्याची उत्तम संधि ह्या समयीं प्राप्त झाली होती परंतु जयसिंगराजाच्या मध्यस्थीनें त्याच्याशी करार झाले असल्याकारणाने दगा करण्याचे धैर्य त्याला झाले नाहीं[२]. शिवाय अशा

सिंगानें त्यास अभिवचन दिले होते, असे कित्येक मराठी बखरकारांचे ह्मणणे आहे तें प्रो सरकार विश्वसनीय असावे असे ह्मणतात खाफीखान ह्मणतो कीं, महाराजास फार तर मोंगल दरबारातून सात हजाराची मनसब मिळाली असती कारण त्याचा पुत्र संभाजी व त्याचा सरदार नेताजी यास प्रत्येकी पांचपांच हजाराची मनसब अगोदर मिळाली होती तो आणखी ह्मणतो कीं, महाराजाशी केलेले करार जयसिंगानें बादशहास कळविले नव्हते.

१ सभासद ह्मणतो कीं, आपणास बादशहाने दक्षिणचा मुख्य सेनापति नेमिले तर आपण विजापूर व गोवळकोंडे जिंकून देतो असें महाराजानीं जयसिंगास सांगितले होते, आणि जयसिंग ह्या गोष्टीस कबूल झाला होता ह्या वेळी कंदाहार जिंकून देतो असें महाराजांनीं बादशहास कळविल्याचें एका यवनीं बखरींत आहे.

२ मुसलमान बखरकार ह्मणतात की, महाराजास पाहावयास आलेल्या जनानखान्यांतील स्त्रियामध्यें बादशहाची निसाबेगम नावाची एक मुलगी होती. तिनें

वीर्यशाली व तेजस्वी पुरुषाचा साधल्यास योग्य उपयोग करून घ्यावा असेंहि त्याच्या मनात आलें असावे मग बादशहानें रामसिंगाच्या मध्यस्थीनें महाराजास आपल्या दरबारीं राहण्याविषयी अनेक प्रकारी लालूच दाखवून पाहिलें, परतु ते त्याच्या त्या ह्मणण्यास बिलकुल कबूल होईनात

जाफरखाननामक[१] एक अमीर बादशहाच्या मोठ्या मजीतला होता त्याचे शास्ताखानाशी मेहुण्याचें नातें होते त्यानें बादशहाला अशी मसलत दिली कीं, शिवाजीमहाराज सामोपचाराने दरबारी सरदारी पतकरून राहण्यास कबूल होत नसल्यास त्याला वाटेल ती जरब दाखवून आपल्या कावृत ठेवावे, सोडून देऊ नये. ही मसलत त्यास पसत वाटून त्याने त्याप्रमाणे करण्याचे मनात आणिले. हें वर्तमान महाराजास कळले तेव्हा ते जाफरखानाच्या मुलाखतीस गेले व त्यास भेटून ह्मणाले कीं, 'आपण बादशहाच्या कृपेतले आहा आह्मास वचने दिल्याप्रमाणें सरजाम वगैरे देऊन परत दक्षिणेंत पाठविण्याची व्यवस्था आपण बादशहाकडून करविण्याचे यश घ्यावे ' ह्या विनतीस त्या कपटी खानानें वरवरून हुकार दिला. त्याचे असे बोलणे चालले असता त्या खानाची बायको, जी शास्ताखानाची बहीण होती, तिने अतर्गृहातून बाहेर खानास असें गुप्तपणें सागून पाठविले कीं, 'शिवाजीमहाराजाबरोबर फार वेळ बोलत बसू नका. त्याला लवकर निरोप द्या ते केव्हा काय करितील याचा नेम नाहीं ' ही सूचना येताच खानाने त्याला निरोपाचे विडे दिले हा वजीर वळत नाहीं असे पाहून आपणांस एकात भेटीचा लाभ दिल्यास आपणाला बादशहाशी काहीं गोष्टी बोलता येतील असा अर्ज महाराजानी केला, परंतु जाफरखानाला शास्ताखानाकडून असें पत्र आले होते कीं, शिवाजी महाराज मोठे चेटकी आहेत त्याच्याशी एकात भेटीचा योग आणून बादशहानी आपला जीव धोक्यात घालू नये हे पत्र बादशहाला दाखवून त्या वजिराने त्यास शिवाजी महाराजाची मुलाखत पुनरपि घेऊं नये अशी मसलत दिली खरे ह्मटले असता ह्या अशा सूचनेची त्याला मुळी गरज नव्हती. ज्याने अफझुलखानास त्याच्या दहा हजार लोका-

महाराजाची कीर्ति व पराक्रम पूर्वी ऐकिलेच होते त्याचे स्वरूप व तेज ह्या वेळा प्रत्यक्ष पाहून व त्यांचा स्वाभिमान व वीरपुरुषास अनुरूप असे उद्धत आचरण पाहून ती मोहित व चकित झाली. आणि तिने आपल्या बापापाशीं त्याच्या सबधाने रदबदली करून त्याच्या दुष्ट उद्देशापासून त्यास परावृत्त केले.

१ हा त्याचा वजीर होता असे प्रो. सरकार ह्मणतात.

देखत भर दिवसा पुरा केला, व शास्ताखान वीस हजार सैन्याच्या मध्यभागीं आपल्या जनानखान्यात कडेकोट बदोबस्तानें निजला असता त्याला गांठून जखमी करून जो सहज निसटून गेला, त्याचा असा भरंवसा औरगजेबासारख्या मोठ्या धूर्त व कपटी मनुष्याला वाटणें शक्य नव्हते शिवाजी महाराज मोठा पंचाक्षरी आहे त्याचा वायुमय देह असून त्याला पंख आहेत आणि तो आपल्या शत्रूवर चाळीसपन्नास हातावरून झडप घालतो असा प्रवाद सर्वत्र पसरला होता तेव्हा अर्थात् त्याची सदरील विनंति बादशहानें मनास आणिली नाहीं.

औरगजेबानें महाराजास जरब दाखवून आपल्या ह्मणण्यास अनुकूळ करून घेण्याचा इरादा कायम करून शहरचा कोत्वाल पोलादखान यास असा हुकूम केला कीं, शिवाजी महाराजाच्या हवेलीस पाचहजार लोकानिशी चौकी द्यावी.[१] कोणास आतबाहेर परवान्यावाचून जाऊ देऊं नये. शिवाजीमहाराजास कोठे जाणे झाल्यास आपल्या लोकाचा सक्त पहारा त्याच्याबरोबर असावा. ही अशी सक्त चौकी ठेवण्याविषयीचा हुकूम सुटला तेव्हा महाराजानी रामसिंगाकडून बादशहास असें सागविलें कीं, ‘मी तुमची ताबेदारी स्वीकारून सर्व दक्षिण हस्तगत करून देण्यास तयार झालो असता मजवर भरवसा पटत नाहीं, व मला दक्षिणेत जावयास करारप्रमाणे हुकूम मिळत नाहीं, त्यापेक्षा बादशहाच्या मर्जीप्रमाणे येथेच सरदारी पतकरून राहण्यास मी सिद्ध आहे’ ह्यावर बादशहाचें असे ह्मणणे पडलें कीं, ‘राजाचे अत करण शुद्ध आहे असें वाटत नाहीं हुजूरची चाकरी पतकरून राहावयास सागितले असता ते ऐकतना. यास्तव आम्हास असा बंदोबस्त करणें प्राप्त झाले आहे. त्याच्या मनातील एकदर किल्मिष जाऊन त्याचें दिल आमच्याविषयी साफ होईपर्यंत त्यास अशा अटकावात ठेवावयाचे आहे बाकी म्हणाल तर जयसिंगराजे व दिलेरखान याच्या विद्यमानें झालेल्या करारनाम्याने आम्ही गुतलो आहो तेव्हा त्यास शिक्षा करण्याचें आम्हांला काय प्रयोजन आहे? जसे तुम्ही आमचे विश्वासू सरदार आहा तसेच ते आमचे सरदार होऊन आमच्या आज्ञेत निखालसपणें वागतील असें करा, म्हणजे सर्व काहीं ठीक होईल.’

१ शहराच्या तटाबाहेर जयपूरवाडा होता त्यात त्यास नेऊन ठेवावें असा हुकूम बादशहानें रामसिंगास केला, आणि त्याच्या अटकेची सारी जबाबदारी त्याच्यावर टाकली असें प्रो. सरकार ह्मणातात.

बादशहाचें हें म्हणणें रामसिंगानें महाराजांस कळविलें. ते ऐकून त्यांचा निरुपाय झाला. त्याच्या सभोंवतीं बादशहाच्या लोकाचे चौक्यापाहारे कायमचे बसले. यांतून सुटून जावें कसें हा विचार आतां त्यास प्राप्त झाला. परंतु आपल्या शत्रूस किंवा आपल्या पदरच्या लोकास आपण घाबरलों आहों असें बिलकुल न दाखविता त्यानी ह्या सकटांतून पार पडण्याची अजब युक्ति योजिली. मग त्यानी असा विचार केला कीं, आपल्या बरोबर आलेले लोक शत्रूच्या तावडीतून सुटून निघून गेल्यानें आपल्या मागचा बराच गुंता नाहींसा होऊन आपली सुटून जाण्याची युक्ति निर्विघ्नपणे पार पडेल यास्तव त्यानीं बादशहापाशी असा अर्ज केला कीं, 'आमच्या बरोबर आलेल्या लोकास उत्तर-देशाची हवा मानवत नाहीं, ते वारंवार आजारी पडतात ह्याकरिता त्यास तरी स्वदेशीं निघून जाण्याची परवानगी मिळावी जेवढी माणसें अवश्य लाग-तील तेवढींच ठेवून घेतो असें केल्याने सरकारास विनाकारण होणारा खर्चहि टळेल.' बादशहाला हा त्याचा विचार पसत पडला, आणि त्यानें त्यास निघून जाण्याचे परवाने दिले मग महाराजानी काहीं निवडक लोक व थोडी कारकून मंडळी मागे ठेवून इतरास रवाना केले हे लोक महाराजास शत्रूच्या कचाटींत सोडून जाण्यास राजी होईनात तेव्हा त्यानी त्याची अनेक प्रकारी समजूत करून असे आश्वासन दिले कीं, 'तुम्ही माझ्याविषयीं काहींएक काळजी करू नका मी शत्रूच्या तावडींतून सुटून लवकरच परत येतों तुम्ही बेलाशक निघून जा तुम्ही येथें राहिल्यानें माझी युक्ति साधणे दुरापास्त होईल' असें निक्षून सागितल्यावरून ते विश्वासू व स्वामिनिष्ठ सेवक निरुपायास्तव त्याला सोडून स्वदेशीं निघून गेले

इकडे औरगजेबानें जयसिगास पत्र पाठवून शिवाजी महाराजास कोणतीं अभिवचनें दिलीं होतीं ह्मणून विचारलें असता जयसिगानें पुरंदरच्या तहाच्या कलमाखेरीज आणखी कोणत्याहि प्रकारचा करार महाराजांशीं केला नव्हता असा जबाब पाठविला, परंतु महाराजास बंदींत ठेवल्याचें त्याला कळलें तेव्हां त्यास मोठा विचार पडला. आपली दक्षिणेंतील मोहीम यशस्वी व्हावयास महाराजामुळे जबरदस्त प्रत्यवाय येणार हें जाणून त्यानें त्यांस हरयुक्तीनें उत्तरेस पाठवून देऊन त्याच्या जिवास यत्किंचित्हि धक्का न पोंचता त्यास परत स्वदेशीं यावयास मिळेल असें आश्वासन दिलें होतें हें आपलें वचन आतां खोटें होऊं पाहतें हें मनांत येऊन तो फार खिन्न झाला आणि त्यानें बाद-

शहास पुन:पुन पत्रे पाठवून अशी विनवणी केली कीं, शिवाजीमहाराजाच्या जिवास अपाय झाल्यानें परिणाम चागला होणार नाहीं, बादशहाच्या एका मोठ्या सरदारानें केलेली आणभाक खोटी ठरून आमच्यावर कोणी हि कसल्याहि बाबतींत विश्वास ठेवणार नाहीं अशानें आमची बेअब्रू होईल शिवाजी महाराजांचा प्राण-घात केला तरी त्याच्या राज्याचा असा कडेकोट बदोबस्त आहे कीं, ते आमच्या हातीं येणें अतिशयित कठीण आहे त्याचा नाश करण्याऐवजी त्यास आपला दोस्त केल्याने दक्षिणेत आपला राज्यविस्तार करण्यास पुष्कळ मदत होणार आहे ह्या आशयाची पत्रे जयसिगाकडून औरगजेबाला गेलीं तरी तो जात्या महाकपटी असल्याकारणाने त्याने महाराजास स्वदेशी जाऊ देण्याचा विचार लाबणीवर टाकला इतकेच नव्हे तर त्याना मुळी पळून जाता येऊं नये ह्मणून त्याना अफगाणिस्थानात पाठविण्याचे त्याने मनात आणिले होते असें ह्मणतात. परतु जयसिगासारख्या थोर सरदारास व इतर रजपूत सरदारास हे करणें मुळी पसंत न वाटून ते नाराज होतील ह्मणून त्याने हा बेत रहित केला असावा. त्याने रामसिगाला असें मात्र बजाविलें होते कीं, शिवाजी महाराज नीट बदो-बस्ताने अटकेत ठेवण्याची सगळी जबाबदारी तुजवर आहे ही कामगिरी धोक्याची आहे असें जयसिगास वाटून त्याने रामसिगास ती कसेंहि करून आपल्यावरची दूर करावी ह्मणून पत्र लिहिले पुढे दक्षिणेतल्या मोहिमेवर स्वत जावे असें औरगजेबाच्या मनात आले तेव्हा जयसिगाने त्यास असें पत्र लिहून सुचविलें कीं, दक्षिणेंतली आपली मोहीम यशस्वी होण्याचा सभव साप्रत फारच कमी दिसत अ हे अशा प्रसगी शिवाजीमहाराजास दक्षिणेंत मुळी येऊं देऊं नये, दिलें तर आपल्या मोहिमेची अखेर अपयशाची होण्याचा दृढ सभव आहे तरी त्याच्या जिवास बिलकुल धक्का लावू नये त्याचा प्राणघात केल्यास त्याचे लोक बिथरून अदिलशहास जाऊन मिळनील अस झाल्याने आमचें अतोनात नुकसान होणार आहे त्याप्रमाणेंच त्यास अशा रीतीने अटकेत ठेवावें कीं, ते सुटून स्वदेशीं खास येतील अशी त्याच्या लोकास आशा वाटावी[१]

वर सागितल्याप्रमाणें आपल्या लोकास पाठवून दिल्यावर महाराजांनीं बादशहापाशी पुन अज केला कीं, 'मला ह्या दरबारीं राहणें प्राप्त आहे त्यापेक्षां येथील अमी-उमरावाच्या व माझ्या ओळखीमुलाखती व्हाव्या हें इष्ट आहे. ह्या

---

१ हा मजकूर प्रो. सरकार यांच्या ग्रथावरून घेतला आहे.

साठी मला त्यास यथावकाश भेटून त्याशी परिचय करण्याची परवानगी असावी. ह्या अर्जास बादशहाकडून मजुरी मिळण्यास अडचण आली नाहीं मग ते रामसिंगाला बरोबर घेऊन सरदाराच्या भेटीस जाऊ लागले महाराजाचे बोलणेचालणे अतिमोहक असल्याकारणाने त्या सरदाराचा स्नेह सपादन करण्यास त्याला बिलकुल विलंब लागला नाहीं त्याशी बोलताना त्यानी ह्मणावे कीं, बादशहाची नोकरी इमानेंइतबारे करून बहादुरी व बढती मिळविण्याचा आपला पूर्ण निर्धार झाला आहे. हे त्याचें मानभावीपणाचे बोलणे त्या सरदारास खरे वाटून ते त्याच्याशीं विशेष रहसाळीने वागू लागले, व महाराजाचे हे ह्मणणे बादशहाच्याहि कानावर वारवार जाऊ लागले

नंतर आपण गुरुवारचे व्रत करून मोठा उत्सव करितो असा बहाणा महाराजानी केला, व त्यानिमित्त आपल्या नूतन दोस्त उमरावाच्या घरी मेवामिठाई पाठविण्याचा क्रम आरंभिला ती मिठाई नेण्याआणण्यासाठी त्यानी वेळवाचे मोठेमोठे दहा पेटारे केले त्यात मिठाई भरली ह्मणजे ते इतके जड होत असत कीं, त्यास दोऱ्या बाधून मध्ये वासे घालून दोनदोन माणसाला ते वाहून न्यावे लागत ह्या पेटाऱ्यातून मिठाई जाऊ लागली ह्मणजे चौक्यावरील लोक ती उघडून पाहत व मग पुढे जाऊ देत हा असा क्रम प्रतिगुरुवारी चालू असल्यामुळे पाहारेकऱ्यास सहजी असे वाटू लागले कीं, हे सगळे पेटारे उघडून पाहण्याचे कारण नाहीं, एक दोन पाहिले ह्मणजे पुरे ह्या चौक्यावरच्या लोकास वेळोवेळा इनामें व बक्षिसें देऊन महाराजानी खुष ठेविलें होतें त्यास त्यानी जवळ बोलवावें, त्याच्याशीं मोठ्या प्रेमळपणानें बोलावे, त्याचीं सुखदु खे ऐकून घ्यावीं, व त्यास लागेल ती मदत सढळ हातानें करावी त्याप्रमाणेंच त्यांच्यावरच्या अमलदारापाशीं बादशहाविषयींची आपली निष्ठा बोलून दाखवावी अशा गोड वर्तनामुळे ते लोक अमळ गाफील राहू लागले.

ह्याप्रमाणें आपली सुटून जाण्याची युक्ति सिद्धीस जाण्याचा दृढ संभव दिसूं लागला तेव्हां त्यानीं आपल्याजवळ बाकी राहिलेल्या लोकांसहि हळूहळू निघून जावयास सांगितलें कोणी आपणास ही हवाच मानत नसून आपण आजारी पडलों असें मिष करून निघाले, कोणी चाकरीस कटाळून ती सोडून जाण्याचा बहाणा करून निघाले; ह्याप्रमाणें कोणी कांहीं कोणी काहीं सबब सागून परवाने मिळवून तेथून निघून गेले. त्यांपैकीं कांहीं जणास अमुक ठिकाणीं आपली वाट पाहत राहावें असें महाराजांनीं सांगितलें. ह्याप्रमाणें जवळच्या बहुतेक लोकास तेथून

रवाना केल्यावर महाराजानी आपल्या नैनातीस तेथीलच हुजरे व चाकर ठेवून दिले शेवटी पुत्र संभाजी, हिरोजी फर्जंद व दुसरे एकदोन चाकर एवढेच काय ते महाराजापाशीं राहिले आपले सर्व लोक बरेपणी निभावून गेल्यावर महाराजानी आपण आजारी आहो असा बहाणा करून वैद्यास बोलावू पाठविलें व त्याच्याकडून काही औषधोपचार चालविला आपल्या प्रकृतीस आराम नाहीं, आपणाजवळ कोणी फारसे येऊ नये, काय कामकाज करणे असेल ते दुरूनच करावे असें त्यानी सर्वास फर्माविले असा गैरराबता राखून त्यानी आणखी थोडे दिवस तेथे काटिले मग आपल्या प्रकृतीस अमळ आराम पडला असे दाखवून वैद्यास व अमीरउमरावास खुशालीदाखल ते मेवामिठाई पाठवू लागले, ब्राह्मणास व गोरगरिबास पुष्कळ दानधर्म करू लागले व मशिदीतून फकिरास खैरात करण्यासाठी मेवामिठाईचे पटारे एकसारखे पाठवू लागले असा नेहमीचा पाठ चालला असता एके दिवशी संध्याकाळी त्यानी चारपाच पेटारे भरून तयार करविले, एका पेटाऱ्यात आपण बसले व एका पेटाऱ्यात संभाजीस बसविले, आणि हे सगळे पेटारे चौक्यावरून चालविले तेव्हा नित्याच्या परिपाठाप्रमाणे रखवालदारानी एकदोन पेटारे उघडून पाहून सगळे पेटारे बिनदिक्कत जाऊ दिले त्या रीतीने महाराज शहराबाहेर पडून आपल्या लोकास जाऊन मिळाले

महाराज आपल्या मुक्कामावरून निघाले तेव्हा त्यानी आपल्या जागी हिरोजी फरजंद यास ठेवून त्यास आपला पेहराव घालून आपल्या बिछान्यावर निजाव-

---

१ ही मिठाई मथुरेस ब्राह्मणाला व फकिराला वाटावयासाठी नेत आहेत असा बहाणा केला, असे एका बखरीत म्हटले आहे

२ बुदले म्हणतो की, शिवाजीमहाराजानी प्रत्येक गुरुवारी गरीबगुरिबास मेवामिठाई वाटण्याचा परिपाठ ठेविला होता त्यामुळे हजारो गरीब लोक त्याच्या दारापाशी त्या वारी जमू लागले एवढ्या लोकास पुरेशी मिठाई आणण्यासाठी मोठेमोठे हारे तयार करून ते भरून आणू लागले हारे रिकामे झाले म्हणजे अर्थात् ते पुन मिठाई भरून आणण्यासाठी हलवायाच्या दुकानी नेत अशा दोन रिकाम्या हाऱ्यात महाराज व संभाजी बसून पळून गेले खाफीखान म्हणतो की, महाराजानी तीन उत्तम घोडे खरेदी करून ते ब्राम्हणास दान करावयास म्हणून शहराबाहेर नेवविले व तेथून चवदा कोसावर एका गावी सज्ज करून ठेवावयास मानितलें. अलमगीरनामानामक एका बखरीत असें आहे की, शिवाजीमहाराजाला अटकेत ठेवल्याचे वर्तमान जयसिंगाला कळलें तेव्हा त्यानें असे करणें ठीक नाहीं असे बादशहास पत्र लिहून कळविले त्यावरून महाराजाच्या हवेलीजवळची चौकी उठविली होती.

ण्यास सांगितले, व संधि साधून त्यानेंहि आपल्या मागोमाग निसटून यावें असें ठरविलें त्या विश्वासू सेवकानें ही गोष्ट कबूल केली तो म्हणाला "आपण बेला-शक निघून जावें मजवर कसाहि प्रसंग आला तरी मी डगमगत नाहीं आपल्या कृपेनें मीहि येथून सुटून येईन" मग तो महाराजाच्या बिछान्यावर निजून राहिला त्यानें आपलें सर्व अंग पांघरुणांत झांकून घेऊन एका हातांत महाराजांची आंगठी घातली होती, तो अमळ उघडा ठेविला व जवळ एका मुलास आपले पाय चेपीत बसविलें ह्या रीतीनें त्यानें सर्व रात्र काढली प्रातःकाळ झाला, चार घटका दिवस आला, तरी महाराजांची गोली उघडत नाहीं असें पाहून पाहारेकरी दाराशीं येऊन त्या मुलास विचारूं लागले कीं, 'महाराज आज फार वेळ कां निजले?' त्या मुलास शिकवून ठेविलें होतेंच, त्यानें उत्तर केलें, 'महार-जांचें शिर फार दुखत आहे' हें ऐकून ते तेथून निघून गेले मग कांहीं वेळानें हिरोजी उठून आपला चोळणा मुंडासें चढवून त्या मुलास घेऊन बाहेर पडला, आणि बाहेर नोकर व हुजुरे होते त्यांस अशी ताकीद दिली कीं, 'महाराजांची प्रकृति गेल्या रात्रीं फारच बिघडली असून आतां अमळ डोळा लागला आहे. कोणी गडबड करूं नये, व आंत जाऊं नये मी कांहीं औषध आणावयास वैद्याकडे जातो' अशी वर्दी देऊन तो निघाला तो चालला असतां त्यास चौकीवरच्या लोकांनीं महाराज फार वेळ निजण्याचें कारण विचारिलें त्यास प्रकृति बिघड-ल्याचें निमित्त सांगून व आपण औषध आणावयास जात आहे असें बोलून तो मोठ्या लगबगीनें निघाला तेथून तो रामसिंगापाशीं गेला, व त्यास महा-राज सुखरूपपणें पार पडल्याची हकीगत गुप्तपणें सांगून त्याचा निरोप घेऊन स्वदेशीं चालता झाला

इकडे महाराज शहराबाहेर पडले ते, दूर एके जागीं त्याच्यासाठीं घोडा तयार ठेवला होता, त्यावर स्वार होऊन व संभाजीला आपल्यापुढें घेऊन[1] भर-धाव घोडा काढून आपल्या कारकून वगैरे कांहीं मंडळीला ज्या गांवीं जाऊन राहावयास सांगितलें होतें तेथें जाऊन पोहचले[2] आपल्या लोकांस मिळाल्यावर पुढें

१ संभाजीला घोड्यावर बसवून आपण त्याची लगाम धरून महाराज मथुरेकडे गेले असें बुंदेले म्हणतो.

२ रायरीच्या बखरींत असें आहे कीं, शहराबाहेर एक दक्षिणी कुंभार राहत असे त्याच्याशीं हिरोजी फर्जंदानें संधान बांधिलें होतें महाराज शहराबाहेर पडल्यावर त्या कुंभाराच्या घरीं गेले व तेथें वेश पालटून एक महिना छपून राहिले होते. और

कोठच्या मार्गाने कोठे कसे जावयाचे ते त्यानी ठरविले तेथून एकदम सरळ मार्गाने स्वदेशी जाणे सुरक्षित नव्हते चोहोकडून चौकशी चालली असल्यामुळें पुन शत्रूच्या हातीं लागण्याची भीति होती यास्तव त्यानी आपल्या बरोबरच्या आणखी काहीं लोकास वेश पालटून स्वदेशी जावयास सागून आपल्याबरोबर चारपाच कारकून व दोनतीन हुजरे ठेवून घेतले मग त्यानी बैराग्याचा वेश धारण करून तीर्थयात्रा करीत करीत सावकाश स्वदेशी जावे असा विचार केला ते पहिल्याने मथुरेस आले तेथ मोरो त्रिंबक पिंगळे याचे मेहुणे कृष्णाजीपंत, काशीपत व विसाजीपंत असे तिघे बंधु ओळखीचे भेटले त्यास महाराजानी आपले सगळे वृत्त कथन करून संभाजीस तुमच्यापाशीं ठेविता काय असें विचारले त्यानीं ती गोष्ट मोठ्या खुशीने कबूल केली महाराजानी त्यास असें सागून ठेविले कीं, "आम्ही स्वदेशी जाऊन पोहचल्यावर तुह्मास पत्र पाठवू मग तुह्मीं आपले सारे कुटुंब घेऊन संभाजीसहवर्तमान आमच्या राज्यास यावे तेथे आल्यावर तुमचे आम्ही बरे करू " अशी व्यवस्था केल्यावर त्या बधुत्रयापैकी कृष्णाजीपंतास आपल्या समागमे काशीपर्यंत नेले येथ महाराज दाढी, मिशी व शेंडी याचे मुंडन करून पुरे गोसावी बनले. त्यानीं आपल्या हाती सन्यासी वागवितात तसला एक मोठा दड ठेवून त्यात बहुमोल रत्ने व सोन्याची नाणी भरून ठेविली. काहीं नाणी जोड्यात शिवून भरलीं, आणि काहीं जवाहीर मेणानें मढवून ते आपल्याबरोबरच्या लोकाच्या पेहरावात शिवून ठेवले

मथुरेस असता महाराज नित्य नदीवर स्नानास जात एके दिवशी तेथला घांट पाहून ते सहज बोलले कीं, हे एवढे मोठे तीर्थ असून ह्या घाटाची व्यवस्था

---

गजेबाने त्याच्या शोधासाठी चोहोकडे पाठविलल्या माणसाची निराशा होऊन ते माघारी आल्यावर महाराज बैराग्याचा वेश घेऊन तीर्थयात्रा करीत गेले. ऑर्मी ह्मणतो की, शहराच्या एका शेवटास यमुनानदीच्या तीरी एक होडी महाराजाला पलीकडे घेऊन जाण्यासाठी तयार ठेविली होती तीत ते बसून पैलतीरी गेले, व होडीवाल्यास त्यानी कांही द्रव्य देऊन असे सागितले कीं, 'औरगजेबास जाऊन सांग की, मी शिवाजीराजास नदीच्या पलीकडे नेऊन सोडले " महाराज तेथून भरधाव घोडा काढून नदीच्या तीरानें बरेच खाली गेले व पुन अलीकडच्या तीरी येऊन तेथून एका आडवाटेने डोंगरदऱ्या ओलाडून पार निघून गेले

१ रायरीच्या बखरीत असे ह्मटले आहे की, काशीस कोणी नानाजी विश्वासराव ह्मणून होता, त्याच्या घरीं संभाजीस ठेविले कारण तो त्या दौडीच्या दगदगीने वारंवार आजारी पडू लागला. विश्वासराव हा किताब सदरील ब्राह्मणास महाराजांनीं आपण व संभाजी स्वदेशी सुखरूप पोंचल्यावर दिला.

कोणींच कशी नीट केली नाहीं ? असें बोलून त्यांनी त्या घाटाच्या रचनेवर टीका करून ती कशी असावी ते सुचविलें ही चर्चा ऐकून एक चोबा ह्मणाला, 'तुह्मी इमारतीची कामे जाणता तुह्मी बैरागी नाहीं, कोणी तरी वेषधारी आहा' हे ऐकून कृष्णाजीपताने त्याचा हात दाबिला, त्यास पुष्कळ द्रव्य देऊन आपल्या बरोबर तीर्थयात्रेस नेले, व तेथून स्वदेशी आणून महाराजानी त्याला नेमणूक करून दिली.

इकडे महाराज पळून गेल्यावर आग्र्यास काय वर्तमान झाले ते पाहू चौकीवरच्या लोकाच्या नजरेस लवकरच असें आले की, महाराजाच्या चाकरमाणसाची हालचाल काहीच दिसत नाहीं, त्याची प्रकृति बेआराम आहे असें त्याच्या एका नोकराने बाहेर जाताना सागितलें, आणि औषध आणावयाला जातो असे बोलून तो गेला, तोहि अद्यापि परत आला नाहीं तेव्हा हे काय वर्तमान आहे ते पाहण्यासाठी चौकीवरचे अमलदार महाराजाच्या निजावयाच्या खोलीच्या दारापाशी आले व आत डोकावून पाहतात तो पलगावर महाराज नाहींत व जवळपास कोणी नोकरहि नाहींत हा प्रकार पाहून ते घाबरून गेले त्यानी एकच गूल केली जिकडेतिकडे धावपळ करून ते शोधतपास करू लागले पण त्यास महाराज किंवा महाराजाचा एक मनुष्यहि सापडेना तेथलेच जे नोकर त्यानी सेवेस ठेविले होते त्यास विचारता ते ह्मणाले कीं, महाराज ह्या खोलीत निजलें असून त्याचे पाय एक पोर रगडीत होता एवढे काय ते आम्ही सकाळी पाहिलें. त्यानतर ते खोलीतून बाहेर केव्हा आले व कोठे निघून गेले हे आह्मी काहींच पाहिलें नाहीं. ही सगळी बिना त्या पाहारेकऱ्यानी पोलादखानास जाऊन कळविली तेव्हा तो घाबरून जाऊन बादशहाकडे धावत गेला, व शिवाजीमहाराज कोठे गडप झाले असें त्याने त्यास कळविलें. तो ह्मणाला 'माझे पाहाऱ्यावरचे लोक अतिशयित विश्वासू व हुशार असून त्याच्या हातावर तुरी देऊन तो गुप्त झाला तो त्यास फितवून पळून जाण्याची तर गोष्टच बोलावयास नको तेव्हा एक तर तो जमिनीत गडप झाला असावा किंवा अस्मानात उडून गेला असावा. त्याला गौडबगालविद्या अवगत असावी कारण माझे लोक त्याच्या हवेलीसभोंवतीं अहोरात्र सक्त पाहारा करीत असता तो फरारी झाला आहे यात माझ्या लोकाची तकशीर मुळीच नाहीं' हें वर्तमान ऐकून बादशहास पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें पोलादखान जात्या अत्यंत इमानी असून त्यानें चौकीपाहाऱ्यास अगदी निवडक लोक ठेविले होते हें त्यास माहीत

होते, तरी तो त्या कोतवालावर फारच रागावला मग शिवाजीमहाराजांचा शोध लावण्यास त्याने सर्व दिशास स्वार पाठविले प्रत्येक प्रातातील सुभेदारास व तालुकदारास पत्रे पाठवून असा हुकूम सोडला की, शिवाजीराजे आग्र्यास अटकेत होते ते पळून गेले आहेत ते कोणाच्या हद्दीतून जाताना सापडले असता त्याने त्याला एकदम पकडून कैद करून हुजुरास पाठवावे त्याप्रमाणेच त्याने जयसिंगाला असें पत्र पाठविले की, शिवाजीमहाराजाचा जो सरदार तुमच्या लष्करात तुह्माला साहाय्य करण्यास ह्मणून ठेविला आहे त्याला पकडून आमच्या दरबारी पाठवून द्यावे, आणि हा पक्षी आमच्या पिंजऱ्यातून उडून गेला आहे त्याच्यावर नीट नजर ठेवावी, व त्याला आपल्या जागी पुन जाऊन गडबड करू देऊ नये

महाराज बिनहरकत शहराबाहेर निघून गेल्यावर हिरोजी फरजंदाने रामसिंगास झालेली हकीगत कळविली तेव्हा त्याने बादशहाकडे तावडतोब जाऊन त्यास असा अर्ज केला की, आमच्या तीर्थरूपाच्या व आमच्या मार्फतीने शिवाजीमहाराज आपल्या दरबारात येऊन दाखल झाले असून त्याच्याशी कराराप्रमाणे वर्तन न होता त्यास अटकेत ठेविले तेव्हा अर्थात् त्याच्या सबधाचे हरएक पकारचे जोखीम आमच्या शिरीचे नाहींसे झाले आहे आता त्याचे आपणास काय वाटेल ते करावे त्यावर बादशहाने असा जबाब दिला की, शिवाजीराजे आमचे ताबेदार आहेत त्याची आह्मी वाटेल ती व्यवस्था करू ते आमच्या मर्जीप्रमाणें वागू लागल्यास त्याची सर्फराजी करण्यास आम्हाला विलब लागणार नाहीं त्याबद्दल तुम्हास किंवा तुमच्या वडिलास काळजी नको ' ह्याप्रमाणे रामसिंगाने आपल्यावरचा वहीम उडविण्याची खटपट केली खरी, परतु पुढे महाराज कोणती युक्ति योजून पळून गेले याचा सुगावा औरंगजेबास लागला तेव्हा त्याचा अंदेशा त्यास आल्यावाचून राहिला नाहीं त्याची रामसिंगावर इतराजी होऊन त्यास दरबार बंद झाला, व त्याची मनसब काढून घेतली.[1]

---

१ चिटणीस म्हणतो की, रामसिंगाला महाराजाची हा कपटयुक्ति ठाऊक होती पण त्याने ता उघडकीस आणिली नाही काहीं दाक्षिणी ब्राह्मणास शिवाजीमहाराज पळून गेल्यावर पकडून कैद केले होते त्याना पुष्कळ मारहाण केल्यामुळें त्यानी असे कबूल केलें की, महाराज पळून गेले हें रामसिंगास ठाऊक होते जयसिंगाला आपल्या

पोलादखानासारख्या परम विश्वासू कोतवालानें असा कडेकोट चोकीपाहारा ठेविला असून त्यातून कोणास नकळत अचानक शिवाजीमहाराज निसटून गेल्याचे वर्तमान तेथील अमीरउमरावास समजले तेव्हा जोतो तोंडात बोट घालून राहिला, आणि चोहोंकडे अशी चर्चा सुरू झाली कीं, जयसिंगराजासारख्या थोर व विश्वासू सरदारानें शिवाजीराजाला पुरे इमान दाखवून व आश्वासन देऊन आपलेसे करून घेतलें, आणि बादशहाच्या हुकमावरून विशेष बढतीची आशा दाखवून त्याना इकडे रवाना केले असें असता त्याशी केलेला करार मोडून व जयसिंगराजास खालीं पाहावयास लावून बादशहानें त्यांच्याशी दग्याचें वर्तन केले, हे काहीं ठीक झाले नाहीं अशा शूर, हुशार व वीर्यशाली पुरुषाचा गौरव करून व त्याच्याशी कराराप्रमाणे वागून त्याला आपलासा करण्याची अमूल्य संधि आली असता बादशहानें ती व्यर्थ घालविली, हा काहीं शहाणपणा झाला नाहीं दक्षिणदेश काबीज करण्याच्या कामी अशा पराक्रमी व कुशल पुरुषाचे साहाय्य केवळ अमोल होतें परंतु बादशहाच्या दुर्बुद्धीनें त्यास तें लाभलें नाहीं शिवाजीमहाराज पक्के हुनरी असून त्याजवर देवाची मेहर आहे असा प्रबळ रिपु बादशहास दक्षिणेत असल्यावर त्याचें तिकडे काय चालणार ? जयसिंगाच्या भाकेस गुंतून त्यानें स्वपराक्रमानें हस्तगत केलेले कोट, किल्ले व प्रांत बादशहाच्या हवाली केले व आपण स्वत त्याचा ताबेदार होऊन राहण्यास तयार झाला, असें असता बादशहाच्या कपटी वर्तनामुळे तो अगदीं बिथरून गेला आहे तो आता पुन काबूत येणें शक्य नाहीं हा लोकप्रवाद बादशहाच्या कानी जाऊन तो फारच खिन्न झाला महाराजाच्या शोधास पाठवि-

---

पुत्रावर बादशहानें हा आरोप केल्याचें समजले तेव्हा त्यानें बादशहास असें पत्र लिहिलें कीं, माझा पुत्र रामसिंग केवळ निरपराध आहे, तो बादशहाशी अशी निमकहरामी कदापि करणार नाही ब्राह्मणास पकडून कैद केल्याचा उल्लेख जेध्याच्या शकावलीत आहे जयसिंग एवढेच करून राहिला नाही, तर त्यानें बादशहाच्या वजिरास असे लिहिलें की, शिवाजीमहाराजाशी शरीरसंबधाचें बोलणें करण्याचें मिष करून त्याची मुलगी माझ्या मुलास मागतों अशा रीतीनें त्यास माझ्या छावणीत आणून ठार मारितो, म्हणजे मी बादशहाचा किती एकनिष्ठ सेवक आहें हे प्रत्ययास येईल. (हास-अंजुमान नामक ग्रंथात जयसिंगाचें अशा आशयाचें पत्र दिलं आहे असें प्रो. सरकार म्हणतात ) परंतु असा काहीं प्रयत्न जयसिंगानें केल्याचें दिसत नाही पुढें अकरा महिन्यांनी जयसिंग मरण पावल्यावर रामसिंगास पुन चारहजारी मनसब देऊन आसाम प्रांताकडे मोहिमेवर पाठविलें. तिकडे तो निवर्तला

लेले लोक निराश होऊन परत आले सुभेदार व तालुकदार यांसहि ते कोठे आढळतना. तेव्हा त्यास अशी दहशत वाटूं लागली कीं, महाराज शहरांतच कोठें तरी लपून राहिले असून सधि साधून आपणास केव्हा कसा दगा करितील याचा नेम नाहीं ह्या भीतीने तो फारच जपून व बदोबस्ताने राहू लागला त्याला रात्रीची झोपहि स्वस्थ लागू नये अशी त्याची अवस्था होऊन गेली.

महाराज आपल्या लोकासह मथुरेहून गोसाव्याच्या वेशाने वैराग्याच्या ताड्यात मिसळून तीर्थाटन करावयास निघाले ते प्रत्येक तीर्थाच्या ठिकाणी सर्व विधि यथासाग करून दानधर्म वगैरे बेताबाताने करीत गेले उत्तरेस हरिद्वारापासून तहत खालपर्यंत मुख्यमुख्य तीर्थ व देवस्थाने याचे दर्शन घेतघेत ते दक्षिणेत आले. ह्या प्रवासात त्यास फार त्रास झाला ते आग्र्याहून निघाले तेव्हा पावसाळा सुरू झाला होता नद्यास पूर येऊन कोठेकोठे मुळीच उतार मिळत नसे अशा ठिकाणीं त्याला कित्येक प्रसगी पोहून पलीकडच्या तीरास जावे लागे कित्येक प्रातात बिकट अरण्ये व डोगर लागत- त्यातून पायानी मजला करणे फार कठीण असे परतु ह्या सर्व श्रमास व अडचणीस न जुमानता ते मोठ्या धीराने मार्गक्रमण करीत गेले एका गावच्या फौजदाराने त्यास काही वहिमावरून अटकेत ठेविले असता त्यास आपण कोण कोठचे हे सागितले तेव्हा तो दचकला व क्षमा मागू लागला महाराजानी त्यास थोडे द्रव्य देऊन ह्मटले कीं, आह्मी ह्या वाटेने गेलों असे कोणा मोगल अमलदारास कळवू नका [१] एके समयी एका तीर्थावर स्नानास जाऊन महाराज पाण्यात उतरले, व त्यानी ब्राह्मणास मत्र ह्मणावयास सागितलें, इतक्यात तेथे दुसऱ्या एका ब्राह्मणाने ह्मटले की, 'दक्षिणेचा राजा शिवाजी हा आग्र्यास अटकेत होता, तेथून तो सुटून फरारी झाला आहे' ते ऐकताच महाराज लगबगीने स्नान करून तेथून लागलीच निघून गेले [२] महाराज कटकप्रातानून

[१] खाफीखान म्हणता की, ह्या फौजदाराने महाराजाना व बरोबरच्या लोकाना पकडून कैद केले, व त्याचा तपास चालविला, तेव्हा महाराजाना त्याला मध्यरात्रीच्या सुमारास गाठून आपण कोण ते कळविले आणि त्याच्या हातात एक हिरा ठेविला, तेव्हा त्याने त्याला सोडून दिले.

[२] खाफीखानाच्या ग्रथातून ह्या दोन गोष्टी घेतल्या आहेत हा ग्रथकार म्हणतो का महाराजास मत्र सागणारा हा ब्राह्मण त्यास सुरतेच्या बदरात पुढे भेटला हा तेथें त्या वेळा वैद्यकीचा धदा करी त्याने खाफीखानास असे सागितलें की, मी काशीस एका ब्राह्मणाच्या घरी नोकरास होतो तेथे शिवाजी महाराजाना मी मत्र सागितल्या-

प्रवास करीत असता फार थकले ह्मणून त्यानी एक साधारणसा घोडा विकत घ्यावयाचे मनात आणून एक घोडा ठरविला, परतु त्यास द्यावयास जवळ रुप्याचें नाणें नसल्यामुळें त्यानी होनाची थैली बेसावधपणे घोडा विकणाराच्या समक्ष उघडली, तें पाहून तो घोड्याचा मालक ह्मणाला ‘ तू अशा घोड्यास इतके पैसे देऊ करीत आहेस यावरून असें वाटते कीं, तू शिवाजीराजा असावास ’ त्यासरशी ती सगळी थैली त्याच्या अगावर टाकून महाराजानी तेथून निसटता पाय घेतला[1]

हे असें तीर्थाटन करीत महाराज दक्षिणेत आले, ते एकदम स्वराज्यात न जाता गोडवण, भागानगर, विजापूर ह्या प्रातातून पन्हाळ्यास आले व आपण स्वदेशी आलो अशी आपल्या लोकास सूचना देऊन त्याच वेशाने रायगडास दाखल झाले ह्याप्रमाणे स्वराज्य सोडून गेल्यापासून नऊ महिन्यानी ते स्वदेशी आले रायगडकिल्ल्याच्या दरवाजापाशीं गोसाव्याच्या वेशाने जाऊन ते तेथील रखवालदारांस ह्मणाले की, आह्मास जिजाबाईसाहेबाची भेट घ्यावयाची आहे तेव्हा त्यानी कोणी बैरागी आपणास भेटू इच्छीत आहेत अशी वर्दी तिला दिली तिने त्यास आत घेऊन यावयास सागितले तिच्या सन्निध ते गेले तेव्हा निराजीपताने तिला बैराग्याच्या भाषेंत आशीर्वाद दिला, परतु महाराजानी एकदम पुढे सरसावून तिच्या पायाशी दडवत् घातला तिनें त्याला ओळखलें नाहीं इतकी त्याची चर्या बदलून गेली होती गोसाव्याच्या ह्या वर्तनाबद्दल तिला आश्चर्य वाटले महाराजानी आपल्या डोकीची टोपी काढून तिच्या माडी-वर शिर ठेविले तेव्हा काहीं खुणा पटून तिने त्याला ओळखून आलिगन दिले, व प्रेमाश्रूनी त्यास न्हाणिले माताच ती ! तिच्या आनंदास पारावार नाहींसा झाला महाराजाचा तो केवळ नवाच जन्म झाला असें तिला वाटलें.

ह्याप्रमाणे प्रथम आपल्या प्रिय मातेचे दर्शन घेऊन मग त्यानी आपल्या सर्व सरदाराच्या, कारभाऱ्याच्या व इतर मातबर लोकाच्या भेटी घेतल्या जिकडेतिकडे आनंद झाला जोतो महाराजाच्या दर्शनास येऊं लागला महाराजानी मोठा उत्सव करून ब्राह्मणास पुष्कळ दानधर्म केला, गोरगरिबांस अन्नवस्त्र मुबलक दिले, श्रीभवानीचा उत्सव करून तिला मुक्ताफळाचा अभि-

---

बद्दल मला त्यानी जी दक्षणा दिली ती घेऊन मी स्वदेशीं आलो, आणि त्या द्रव्यानें ह्या माझ्या हवेल्या बाधून मी येथे सुखवस्तु राहत आहे

[1] ही गोष्ट बुदेले देतो.

षेक केला हत्तीवरून साखर वाटली सर्व सरदारास व किल्लेदारास साखर पाठविली. राज्यातील मोठमोठी देवस्थानें, ब्राह्मण, तपस्वी, सत व साधु यांस दक्षिणा व शर्करा पाठविली गडोगडी तोफाची सरबत्ती करविली महाराज परत सुखरूप आल्याची वार्ता एकदर राज्यात पसरून सर्व प्रजेस अत्यानद झाला शत्रूच्या चित्तात पुनरपि दहशत उत्पन्न झाली, व शिवाजीमहाराज केवळ अजिक्य असून त्याच्यापुढे कोणाचे काही चालणार नाहीं, ते आता यवनाच्या सर्व पादशाहती बुडवितात असें त्याला वाटू लागले त्याच्या अलौकिक युक्तिमत्तेची व अप्रतिम धैर्याची कीर्ति सर्वत्र अधिकच पसरली

ह्या आनंदभरात महाराज आपल्याबरोबर गेलेल्या लोकास विसरले नाहींत ज्यानी ज्या मानाने श्रमसाहस केले होतें त्यास त्या मानाने इनामे व बढती देऊन गौरविले, कोणाची तैनात वाढविली, कोणास वस्त्रालंकार, कोणास हत्तीघोडे, कोणास गाव व महाल असे ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे दिले. हिरोजी फरजंद याचें साहाय्य ह्या सकटमय प्रवासात अतिशयित झाले ह्मणून महाराजानी त्याला पागेवर सरदारी देऊन पालखी अबदागिरी दिली बरोबर गेलेल्या कारकुनानी मोठ्या हुशारीने व इमानाने वागून प्राप्त झालेल्या सकटातून निभावण्यास मन पूर्वक साहाय्य केलें ह्मणून त्याच्यावर महाराजाचा इतबार अधिकच बसला.

यात्रेहून परत येत असता महाराज एका कुणब्याच्या घरी एके रात्री वस्तीस राहिले आणि त्याच्याकडे शिधासामुग्री मागू लागले तेव्हा त्या कुणब्याची वृद्ध आई होती ती त्यास ह्मणाली, ‘तुह्मा बैराग्यास काहीं शिधासामुग्री दिली असती पण नुकताच शिवाजीराजाच्या लोकानी आमचा गाव लुटला त्यांत आमचाहि बराच माल लुटीस गेला शिवाजीराजा दिल्लीस गेला आहे, तेथे त्याचें औरगजेबबादशहा अद्यापि पारिपत्य का करीत नाहीं न कळे त्याच्या पासून आह्मा गरिबास बहुत उपद्रव होतो ’ हे तिचें बोलणें ऐकून महाराजाच्या लक्षात येऊन चुकले कीं, आपल्या मागें आपले लोक स्वस्थ न बसतां त्यानी पूर्ववत् मुलूखगिऱ्या करण्याचा क्रम चालू ठेविला आहे, ह्याबद्दल त्यास अर्थात् संतोष वाटला महाराजानी त्या म्हातारीला तुमचे कल्याण होईल असा आशीर्वाद देऊन त्या कुणब्याचें नावगाव विचारून घेतलें पुढे स्वराज्यात येऊन पोचल्यावर महाराजानी ह्या कुणब्यास सहकुटुंब बोलावून आणिलें, व

त्याचा किती माल लुटीस गेला तें विचारून घेऊन त्याची त्यास भरपाई करून दिली, व त्यास आपल्या नोकरीस ठेविलें

मग पूर्वसंकेताप्रमाणें मथुरेस काशीपंताला पत्र पाठवून कळविलें कीं, आह्मी स्वराज्यास येऊन पोंचलो तुम्ही सगळे बंधु सहकुटुंब संभाजीस घेऊन इकडे यावें हें पत्र पावताच तो ब्राह्मण संभाजीस घेऊन निघाला वाटेंत एक मोगलअमलदार त्यास भेटला संभाजीचें ते तेज व स्वरूप पाहून त्याला असा संशय आला की, हा शिवाजीमहाराजाचा पुत्र असावा [1] त्यावरून त्याने त्यास अटकाव केला ते दोघे बंधु ह्मणाले कीं, आम्ही मथुरेस राहणारे ब्राह्मण असून हा आमचा मुलगा आहे तेव्हा तो अमलदार ह्मणाला, हा तुमचा मुलगा आहे हे खरे तर तुह्मीं त्याला घेऊन एका पात्री भोजन करावे काशीपंतास ती अट मान्य करणे प्राप्त झालें त्याने दह्यात पोहे कालवून ते केळीच्या पानावर वाढले व संभाजीसह भक्षण केले हे पाहून त्या यवनाने त्याला सोडून दिले [2] ते ब्राह्मण संभाजीस घेऊन रायगडावर सुखरूप येऊन पोचले संभाजीस पाहून सर्वांस आनंद झाला काशीपंताने आपल्या पुत्राचें संगोपन करून त्यास मोठ्या युक्तीनें संभाळून आणिले ह्मणून त्यास महाराजानी पुष्कळ द्रव्य दिले, व विश्वासराव असा किताब देऊन गौरविले त्याला व त्याच्या दुसऱ्या दोघा बंधूंला त्यानीं चांगले हुद्दे देऊन आपल्या पदरी ठेवून घेतले [3]

ह्या प्रमाणे महाराज अटकेतून सुटून सुखरूपपणे स्वदेशी जाऊन पोंचल्याचें ऐकून औरंगजेबास पराकाष्टेचे दुःख वाटलें आपल्या तावडींत पक्का सापडलेला हा शूर व युक्तिमान् पुरुष असा सहज सुटून गेला याबद्दल त्याला आमरण खेद वाटत होता असें त्याच्या शेवटल्या मृत्युपत्रातल्या उल्लेखावरून लक्ष्यात येते त्यात तो असें लिहितो कीं, "कोणतेहि राज्य कायम राहावयाचे

---

१ बुदले म्हणतो की, संभाजीचे केस चांगले लांब असल्यावरून त्यास मुलीचा वेश देऊन काशीपंत आपल्या स्त्रीसह निघाला होता

२ काही बखरींत असे आहे की, काशीपंताच्या घरी संभाजी आहे असे औरंगजेबास कळल्यावरून त्यानें त्याच्या घरास चौकी बसविली तेव्हा त्या ब्राम्हणानें वर सांगितल्याप्रमाणे मोगलअमलदाराची खात्री करून आपल्यावरचा वहीम नाहीसा केला

३ शि दि म्हणतो की, सर्वच भावांस विश्वासराव हा किताब दिला यास महाराजानीं दिलेली सनद रा राजवाडे यानी आपल्या आठव्या खंडात प्रसिद्ध केली आहे. ह्या सनदेवरूनहि असे सिद्ध होतें की, महाराज आग्र्यासच गेले होते.

असेल तर त्याला सर्वांत मोठा आधार ह्मटला ह्मणजे राज्यात कायकाय चाललें आहे त्याची बातमी सर्वदा उत्तम प्रकारें ठेवण्याची व्यवस्था करावी हा होय. ह्या बाबतीत एक क्षण हलगरजीपणा केला तर त्याचा परिणाम लज्जास्पद होऊन तो पुढे कैक वर्षेपर्यंत भोगावा लागतो त्या हरामखोर शिवाजीला माझ्या गाफीलपणामुळे माझ्या हातून सुटून जाता आले, आणि त्यामुळे मला माझ्या सगळ्या मोहिमात आमरण अपयश आले [१]"

ह्या आग्र्याच्या प्रयाणात आणखी एक गोष्ट घडल्याचे काही मुसलमान बखरकार लिहितात ती अशी महाराज बादशहाच्या भेटीस दरबारात गेले तेव्हा जनानखान्यातील स्त्रियास त्याला पाहण्याची इच्छा होऊन त्या पडद्याआड बसून त्याला पाहत होत्या ह्या स्त्रियात ये औरंगजेबाची निसाबेगम ह्या नावाची एक अविवाहित मुलगी होती तिचे वय त्या वेळी सत्तावीस वर्षांचे होते ती महाराजास पाहून मोहित झाली, व तिची त्याजवर पराकाष्ठेची प्रीति जडली हा वेळपावेतो ती महाराजाची कीर्ति कर्णोपकर्णी ऐकत होती ते मोठे शूर, पराक्रमी, धाडसी व हुशार असून स्वदेश स्वतंत्र करण्याविषयी जीवापाड परिश्रम करीत आहेत असें तिनें ऐकिल होते त्याच्या अचाट कृत्याच्या गोष्टी ऐकून तिला नेहमी कौतुक वाटत असे त्याप्रमाणेच त्याचे पाडाव झालेल्या शत्रूशी मोठ्या औदार्याचे वर्तन, मातापितराशी अत्यंत प्रेमाची वागणूक, स्वधर्मातील देवावर त्याची अतिशयित भक्ति ह्याविषयीच्या गोष्टी ऐकून तिला ते फार प्रिय झाले होते शिवाय तिचा बाप एवढा सार्वभौम बादशहा असून, व त्याच्या पदरी शूर सरदार व प्रचंड सेना असून त्याची ते अगदी परवा न करिता स्वराज्यवृद्धि एकसारखी करीत आहेत, हे कळून ती त्याची तारीफ करीत असे असा वीर्यशाली व तेजस्वी पुरुष तिच्या बापाचा दोस्त होऊन त्याच्या दरबारी पाहुणा ह्मणून आत्यावर जेव्हा तिच्या दृष्टीस पडला तेव्हा त्याचें तें तेज व रूप पाहून व दरबारातील स्वाभिमानाचे वर्तन पाहून ती तत्काळ मोहित झाली आणि विवाह करावयाचा तर अशाच योग्य व अप्रतिम पुरुषाशी करावयाचा, नाहींतर जन्मभर अविवाहित राहावयाचे असा तिनें आपल्या मनाशी संकल्प केला.

असें सांगतात कीं, महाराजास हे तिचें प्रेम आपल्यावर जडल्याचे कळलें असून तिच्या वतीने कोणीं त्याच्याशीं असेंहि बोलणें केलें कीं, तुह्मी मुसलमानी

---

१ प्रो. सरकार पृष्ठ १९३.

धर्माचा स्वीकार कराल तर शहाजादी तुमच्याशी विवाह करण्यास तयार आहे. परंतु महाराज ह्या गोष्टीला मुळीच कबूल झाले नाहींत अशा मोठ्या सार्वभौम बादशहाचा जावई होऊन राहण्यापेक्षा स्वधर्म व स्वजाति हीं त्यास विशेष प्रिय वाटलीं नुसत्या राज्यतृष्णेनेच जर ते प्रोत्साहित झाले असते तर हा संबंध जुळवून ते कदाचित् नर्मदानदीच्या अलीकडे एकंदर दक्षिणेचे पादशहा होऊन राहिले असते परंतु राज्यतृष्णा व विषयवासना यापेक्षा स्वातंत्र्यप्रीति, स्वधर्माभिमान व स्वकुलाभिमान ह्या वृत्ति त्याच्या ठायीं प्रबल होत्या, हे ह्या गोष्टीवरून चांगले निदर्शनास येते

पुढे ही बेगम स्वनिर्धाराप्रमाणे आमरण अविवाहित राहिली औरंगजेब दक्षिणेत आला तेव्हा त्याच्याबरोबर ती इकडे आली होती ती स. १७०२ त ब्रह्मपुरी येथे आपल्या बापाच्या छावणींत मरण पावली तिचा देह जेथे दफन केला तेथे तिच्या बापाने एक सुंदर कबर बांधून त्या गावास बेगमपूर असें नाव दिले ही निसाबेगम चांगली शिकलेली होती असें ह्मणतात[१] ह्या बेगमेच्या हृदयात महाराजाविषयी शेवटपर्यंत केवढी आदरबुद्धि वसत होती याचे एक ऐतिहासिक उदाहरण आहे ते असें औरंगजेबाने संभाजीस पकडून हाल करून ठार मारल्यावर रायगड किल्ला हस्तगत केला त्या किल्ल्यातून जी माणसें कैद करून आणिली त्यात संभाजीराजाचा एक लहान मुलगा होता त्यास निसाबेगम हिने आपल्याकडे मागून घेतले, व तो आपला नातू मानून त्याचें लालनपालन मोठ्या प्रेमानें आमरण केलें. हाच मुलगा पुढे शाहूराजा झाला हें सर्वांस विदित आहेच

---

१ तिला तिच्या बापाप्रमाणें कुराण मुखोद्गत होतें, व तिनें काहीं कवितादि केली होती असें ह्मणतात (मासीर-इ-अलमगीर एलिअट भा. ७ पृ. १९६ व प्रो. सरकारकृत औरंगजेबाचें चरित्र भा. १. पाहा.)

# भाग विसावा.



## गेलेले किल्ले व प्रांत परत घेतले.

### १६६७–६९

महाराज दिल्लीस अटकून पडले हे वर्तमान दक्षिणेत कळताच त्यांच्या लोकांनी मोगलांच्या प्रांतांत पुन धामधूम सुरू केली, व पुढे ते अटकेतून सुटून स्वदेशी यावयास निघाले हे समजले तेव्हा त्यांच्या सरदारांस अधिकच चेव येऊन ते मोगलांस चोहोंकडून त्रास देऊ लागले तो इतका कीं, त्या वेळच्या इंग्रज व्यापाऱ्याचा असा लेख आहे कीं, ‘शिवाजीमहाराज औरंगजेबाच्या अटकेतून सुटून पळाले हे खरे असेल तर आतां ते त्या बादशहास त्राहित्राहि करून सोडितील आपण हा काय प्रकार केला असें त्याला होऊन जाईल’ हे त्याचे ह्मणणें पुढे खरे झाले

महाराज दक्षिणेंत येऊन पोंचण्यापूर्वी मोगलांची आणि विजापूरकरांची लढाई पुन जुंपून मोगलांच्या सैन्याची पुष्कळ खराबी झाली जयसिंगानें विजापुरास वेढा घातला असतां त्याच्या सैन्यास दक्षिणेंतील शिलेदारांनी चांगलाच हात दाखविला त्यास दाणावैरण कोठूनहि मिळेनाशी होऊन त्याच्या सैन्याचा पुरा उपासमार झाला शिवाय त्या वर्षी अवर्षण झाल्यामुळे लोकांस पाणीहि मिळेनासें झाले विजापूरकरांच्या मदतीस गोवळकोंड्याच्या कुतुबशहानें फौज पाठविल्यामुळें तर मोगलांचा त्यांच्यापुढे मुळींच दम निघेना, आणि औरंगजेब कांहीं आणखी फौज जयसिंगाच्या मदतीस पाठविना कारण त्याला असा वहीम आला होता कीं, जयसिंग शिवाजीराजाला आतून वश झाला असून मागेंपुढें आपणास तो डोईजड होईल, व शिवाजीमहाराजांशी तो एक होऊन आपल्या सत्तेस धक्का पोंचण्यास उशीर लागणार नाहीं ह्याप्रमाणे औरंगजेब दक्षिणेंतील मोहिमेविषयीं अमळ बेपरवाई दाखवूं लागला तेव्हां अर्थात् जयसिंगानें असा विचार केला कीं, आपले उमदे रजपूत शिपाई विनाकारण बळी देऊन अपयशाचा वाटा पदरीं घ्यावा त्यापेक्षां ही लढाई सोडून परत जावें हेंच नीट दिसतें. मग तो शत्रूशीं युद्ध करण्याचें सोडून औरंगाबादेकडे पिच्छेहाट करूं

लागला तेव्हा अर्थात् शत्रूने त्याचा पाठलाग केला पण तो शूर सरदार त्याच्या तावडीतून जेमतेम निभावून औरंगाबादेस जाऊन पोंचला.

शिवाजीमहाराजाकडून जे किल्ले त्याच्या हाती आले होते व जे त्याने त्याच्या मदतीने पूर्वी काबीज केले होते त्यांचा योग्य बंदोबस्त ठेवण्यास देखील पुरेसे लोक त्याच्यापाशी उरले नव्हते, व त्या कामीं लागणारा खर्चहि करण्यापुरते द्रव्य त्याच्या हातीं नव्हते यास्तव त्याने घाटावर लोहगड, सिंहगड व पुरंदर आणि कोंकणात माहुली व कर्नाळा अशा मुख्य पाच किल्ल्यावर बरेच लोक ठेवून ठेऊन त्याचा बंदोबस्त नीट राखिला याशिवाय ज्या कित्येक गडास अन्नादिकाची सामुग्री मिळण्यासारखी होती त्यावर त्याने थोडेसे लोक ठेविले, आणि बाकीच्या किल्ल्याचे दरवाजे जाळून टाकून व तटाचे सहज पडण्यासारखे भाग होते ते पाडून टाकून त्यावर लोक ठेवून बंदोबस्त करण्याची मुळीं गरजच उरू दिली नाहीं त्याप्रमाणे जिकडीलतिकडील व्यवस्था लावून जयसिंग औरंगाबादेस जाऊन स्वस्थ बसला असता त्याच्यावर औरंगजेबाची इतराजी होऊन त्याने त्याला परत बोलाविले, व दक्षिणच्या सुभ्यावर यशवंतसिंग व शहाजादा मोअझीम याची नेमणूक केली हा उमदा व शूर रजपूत सरदार खिन्न होऊन परत चालला असता वाटेत आजारी पडून बऱ्हाणपूर येथे स १६६७ च्या जुलै महिन्यात मरण पावला

इकडे मोरोपंत पिंगळ्याने मोगलानी अजीबात मोडून दिलेल्या किल्ल्याची पुन दागदुजी करून त्यावर आपली ठाणी बसविली, व त्याच्या आसपासच्या मुलखावर आपला अमल पुन स्थापित केला ज्या किल्ल्यावर मोगलाचा बंदोबस्त अमळ बेताचाच होता तेथल्या लोकास हुसकून लावून ते पुनरपि हस्तगत करण्याचा क्रम त्याने निरलसपणे चालविला त्याप्रमाणे महाराज परत दक्षिणेत येऊन दाखल होण्यापूर्वी मोगलाकडे गेलेले बरेच किल्ले त्याच्या सरदारानीं पुन हस्तगत केले, व ते परत आल्यावर सगळा कल्याणप्रांत त्यानी पुनरपि काबीज केला[1]

जयसिंग व दिलेरखान याच्याबरोबर एवढी मोठी फौज देऊन दक्षिणदेश काबीज करण्याकरिता त्यास पाठविले असून काहींएक उपयोग झाला नाहीं, शिवाजीमहाराज हातीं सांपडले होते तेहि सुटून गेले, व विजापूरकर व भाग-

---

१ कल्याणभिवंडी मोगलाच्या हाती पुढे बरेच दिवस होती असें प्रो सरकार ह्मणतात

नगरकर एक झाले असून त्यास आणखी शिवाजीमहाराज जाऊन मिळाले म्हणजे दक्षिणेतील मोगली सत्तेचें समूळ उत्पाटन होण्यास विलंब लागणार नाहीं, असे विचार औरंगजेबाच्या मनात येऊन त्याने स्वत दक्षिणेत स्वारी करण्याचा बेत केला होता इतक्यात उत्तरेकडे काहीं कुरबूर उपस्थित झाल्यामुळे त्याला तिकडे जावे लागून हा बेत रहित करावा लागला. शिवाजीमहाराजासारखा महापराक्रमी पुरुष आपण आपला कट्टा शत्रु करून सोडिला याची त्याला मोठीच धास्ती लागून राहिली बरे, शहाजाद्याला व यशवंतसिगाला ही दक्षिणेतील मोहीम मागून त्याच्या ताब्यात मोठी फौज द्यावी तर त्यात आपल्या मुलाचा पराजय झाल्याने आपला सगळा आब जाणार, व त्याला यदाकदाचित् जय आला तर तोच तिकडे फदफितुरी करून आपणास मोजिनासा होईल, ह्या वहिमाने त्याने त्यास ही मोहीम मागितली नाहीं ह्या अशा वहीमखोरपणाचा व दिरगाईचा पुरा फायदा आमच्या प्रतापशाली चरित्रनायकाने हवा तसा घेण्यास बिलकुल आळस केला नाहीं

सुलतान मोअझीम व यशवंतसिग याची दक्षिणच्या सुभ्यावर नेमणूक झाली ती महाराजाला पुष्कळ अनुकूल झाली त्यानी दिल्लीस असता यशवंतसिगाशी स्नेह केला होता हा रजपूत सरदार मोठा बाणेदार व स्वधर्माभिमानी होता औरंगजेबाने आपल्या बापाविरुद्ध बंड केले तेव्हा हा पहिल्याने त्याच्या विरुद्ध होता, परतु पुढे त्याची सरशी होण्याचा रग दिसला तेव्हा हा त्यास सामील झाला होता तरी हा औरंगजेबाच्या फारसा विश्वासातला होता असें नाहीं त्याचा मोठा दोष काय तो द्रव्यलोभ हा होता परतु हा त्याचा दोष महाराजाच्या पथ्यावर चागला पडला. 'हें द्रव्याचें लालची पेढीचें ढोर आहे,' असा महाराजाचा त्याच्याविषयीं अभिप्राय होता. त्यानी त्याला मुबलक अवदानें चारून अगदीं आपलासा करून घेतलें शहाजादाहि स्वभावानें फार चागला असून मनाचा थोर व शूर होता बापाचा वहीमखोरपणा त्याच्यात बिलकुल नव्हता. तो हाताचा सढळ असून ऐषआराम त्याला फार आवडत असे त्याला कोणी कांहीं सागितलें असता त्याचें मन सहज फिरत असे. यशवंतसिंगाचें त्याच्यावर फारच वजन असे त्याच्या सागण्याबाहेर तो फारसा जात नसे. त्याला दक्षिणेंत पाठविताना बादशहानें असें बजावून सांगितलें होतें कीं,'तुम्ही शिवाजीराजांच्या गळां पडूं नका. तुमच्या हातून त्याच्याशीं मसलत निभावणार नाहीं. त्यांच्याशीं होतां होईतों द्वेष करूं नका. त्यांनीं आजपर्यंत पुष्कळ

सरदारास बुडविलें आहे तशी तुमची दशा झाल्यास दुर्लौकिक होऊन पातशाहीस अपाय होईल. यास्तव त्याच्याशी सलोखा करून आपला तिकडील प्रांत राखा ' बादशहाच्या ह्या सूचनेप्रमाणें शहाजाद्याच्या मनात शिवाजीमहाराजांशी तह करण्याचें होतें ते दिल्लीस गेले तेव्हा त्यास अटकेत ठेवण्याचा प्रयत्न बादशहाने केला होता तो ह्या शहाजाद्यास मुळींच पसत वाटला नव्हता शिवाजीमहाराजासारखा शूर व हुशार अमीर हातीं राखण्यातच हित आहे असें त्याचे मत होते

असें सागतात कीं, हा शहाजादा दक्षिणेत येत आहे असें कळलें तेव्हा महाराजानी गरीब शेतकऱ्याचा वेश धारण करून, त्यास ब्रह्मपुरीजवळील एका गावी गाठून काहीं दहीं नजर केले ते उत्कृष्ट आहे असें पाहून शहाजाद्याने त्याचा स्वीकार केला व ते आपणास भोजनाच्या वेळी वाढावयास सागितले. त्या दह्यात एक मेणाची गोळी त्याला सापडली ह्या गोळीत एक चिठ्ठी होती. तीत महाराजानी असा मजकूर लिहिला होता कीं, ' माझ्याशीं युद्ध करून विजय सपादण्यास पराक्रमी शहाजादा येत आहे तो कसा आहे हे स्वत डोळ्यानी पाहावे ह्मणून मी ही युक्ति योजिली ' यावरून शहाजाद्याच्या मनात महाराजाविषयी कोणती वृत्ति उत्पन्न झाली असेल याची कल्पना सहज होण्यासारखी आहे अशा युक्तिमान् व साहसी पुरुषाशी विरोध करणें मोठे धोक्याचे आहे अशी त्याची पुरी खात्री झाली औरगाबादेस येऊन पोहचल्यावर त्याने यशवंतसिगाकरवीं महाराजाशी तहाचे बोलणे लाविले[१] महाराजानी

---

१ प्रो सरकार अखबरात नावाच्या यवनी बखराच्या आधाराने असे ह्मणतात की, शिवाजीमहाराजास आपल्या राज्यसत्तेची नीट व्यवस्था लावावयाची होती, आपल्या किल्ल्याची डागडुजी करून त्यावरील बदोबस्त नीट करावयाचा होता आणि पश्चिम किनाऱ्यावर शिद्दी व अदिलशहा यास पुरा शह देऊन तिकडील आपली सत्ता वाढवून दृढ करावयाची होती, ह्मणून त्याला ह्या वेळी मोगलाशी सलोखा राखावयाचा होता ह्या हेतूने त्यानी औरगजेबास असे पत्र लिहिले की, बादशाही सैन्य मजवर पाठविल्याची खबर मला लागली आहे ही ऐकून माझा प्राणावर धारण बसली आहे. मी पुनरपि बादशहाचा अकित होण्यास तयार आहे आणि माझा मुलगा सभाजी याच्याबरोबर चारशे लोक देऊन मोगलाच्या लष्करात त्याला पाठवितो, हें त्याचे ह्मणणे बादशहानें मनास आणिलें नाही. तेव्हा महाराजानी यशवतसिंगास शहाजाद्यापाशी मध्यस्थी करण्याविषयी असे पत्र लिहिलें की, बादशहाने माझा अव्हेर केला आहे, नाही तर मी त्यास कदाहार प्रात पुनरपि जिंकून दिला असता माझा जीव

यशवंतसिंगास द्रव्याची लालूच दाखवून पूर्वीच आपलासा करून घेतलें होते. यास्तव आपणास अनुकूल असा तह करून घेण्यास त्याला मुळींच कठीण गेलें नाहीं. मोगलबादशहाशी एवढ्यात पुरा विरोध करणें हिताचे नाहीं असें त्यास वाटत होते, व तशात शहाजाद्यासारख्या उमद्या पुरुषाशी स्नेह जुळवून ठेविल्याने आपला डाव मागेपुढे साधणे सुलभ होईल, असें त्याचें धोरण होतें. तेव्हा शहाजादा आपण होऊन सलोखा करण्यास उद्युक्त आहे असें कळल्यावर महाराजानी बाळाजी आवजी चिटणीस यास मोठा लवाजमा देऊन यशवंसिंगाकडे पाठविले त्यात त्याचा हेतु अर्थात् असा होता कीं, शहाजाद्याचा वास्तविक मनसोबा काय आहे तो नीट कळावा त्यानी त्याला नजराणा म्हणून बहुमोल वस्त्रे, जवाहीर व हत्ती अशी पाठविली यशवतसिगाने चिटणिसाला शहाजाद्याकडे नेलें तेव्हा तो त्याला म्हणाला "आमचे महाराज जयसिगाच्या विद्यमाने तहनामा ठरवून बादशहाच्या मुलाखतीस दिल्लीदरबारी गेले तेथे समक्ष मुलाखत झाल्यावर कित्येक मुद्याचा पक्का ठराव करून घेऊन बादशहाची नोकरी पतकरून राहावयाचे असा त्याचा इरादा होता जयसिग, रामसिग वगैरे मानबर सरदारानी मध्यस्थी केली असून बादशहास त्याचा विश्वास न वाटून त्याने त्यास अटकेत ठेविले हे काहीं नीट झाले नाहीं' त्यावर शहाजाद्याने येणेंप्रमाणें उत्तर केले "बादशहाच्या मनात शिवाजीमहाराजाविषयी विपरीत भाव काहींएक नव्हता, व हल्लीहि नाहीं त्याचा मानस एवढाच होता कीं, उभयतामधील प्रपच मुळीच नाहींसा व्हावा, व राजानी त्याच्या पदरी सरदारी पतकरून राहावे परंतु त्यास ते पसत झाले नाहीं तेव्हा त्यास दपटशहा देऊन आपल्याकडे ठेवून घ्यावे अशा विचाराने त्याने त्यास प्रतिबधात ठेविलें राजास अर्थात् ते न मानून ते तेथून निसटून आले आम्हास बादशहाने येते वेळी अशी आज्ञा केली आहे कीं, 'राजाशीं विरोध करूं नये त्याच्यासारखे पुरुष मागे झाले नाहींत व पुढे होणार नाहींत म्हणून ते आमच्या पदरी राहावे ह्यासाठी आम्ही प्रयत्न केला, पण तो विफल झाला आता झाले ते ठीकच झाले त्याची मर्जी तिकडेच राहावें अशी आहे त्यापेक्षा त्याच्याशी पूर्वी झालेले करार कायम

---

बचावण्याकरिता मी आग्र्याहून पळून आलो माझा साहाय्यकर्ता मिर्झा राजा जयसिग नर मरण पावला तुम्ही माझ्यासाठी रदबदली करून मला माफी करावयास लावा, म्हणने मी माझा मुलगा संभाजी यास माझे लोक देऊन शहाजाद्याच्या नोकरीस पाठवितो

करून त्यांच्याकडून कामगिऱ्या करून घ्याव्या व त्याच्या विचारें वागावें, आह्मांस काहीं वाकडे करणें असते तर त्याच समयी करितो ' हें असें बाद-शहाचे ह्मणणें आहे त्यावर आपला काय मनसोबा आहे तो कळवावा "

हें असें शहाजाद्याशी भाषण झाल्यावर त्याचा हेतु कसा काय आहे ते चिटणिसानें महाराजांस लिहून कळविलें तेव्हा महाराजानी त्याच्याशीं तह करण्यास राजी होऊन तहाची कलमे कशी असावी हे उभयताच्या विचारानें ठरलें ती कलमे अशी होतीं (१) परस्परानी परस्पराशी इत पर स्नेहभावानें वागावे, (२) पूर्वी झालेला तह कायम करावा, (३) उभय पक्षाचे परस्परा-विषयीं दिल साफ झाल्याखेरीज महाराजानी आपली सगळी फौज मोगलान्च्या कुमकेस पाठवू नये, व परस्पराच्या भेटीमुलाखती होऊ नयेत. (४) फौजेन्च्या खर्चास काहीं मुलूख लावून दिल्यास तूर्त पाच हजार फौज महाराजाना मोग-लाच्या कुमकेस पाठवावी. (५) पूर्वीच्या तहात ठरल्याप्रमाणे सभाजीस पाच हजार स्वाराची मनसब द्यावयाची, तिच्या सरंजामासाठी वऱ्हाडप्रातातील आवढ व बालापूर हे तालुके लावून द्यावे, (६) पूर्वीच्या कराराप्रमाणे चौथाई व सर-देशमुखी हे हक्क वसूल करण्याची महाराजास पूर्ण मुभा असावी (७) आणि निजामशाहींतील व अदिलशाहींतील जे किल्ले व प्रांत महाराजापाशी सध्या आहेत ते त्याच्याकडे राहू द्यावे[1] हा असा तहनामा होऊन त्यावर शहाजा-द्यानें आपली सही केली, आणि महाराजास असें सागितलें कीं, 'तुह्मी तहाच्या या अटी नमूद करून एक अर्ज आह्मास केवळ बाह्योपचारार्थ करावा, ह्मणजे आह्मी तो बादशहाकडे स्वताची शिफारस करून पाठवून देऊं ' ह्या सूचनेप्रमाणे अर्ज तयार करून तो शहाजाद्यानें औरंगजेबाकडे पाठवून दिला व त्यावर अशी मोठी जोराची शिफारस लिहिली की,'शिवाजीमहाराजासारखा महाप्रतापी पुरुष आपणास पुनरपि असा अल्प आयासाने वश होत आहे तर त्याच्या अटी कबूल करून त्याशीं स्नेहभाव जोडावा ' हा शहाजाद्याच्या शिफारशीसह गेलेला अर्ज बादश-हास त्या वेळी मंजूर करणे सोइचे वाटले, व त्याने महाराजास 'राजा' हा किताब देऊन सभाजीस देऊ केलेली मनसब कायम केली आणि वऱ्हाडप्रातात त्याला जी जाहगीर करून द्यावी असें सुचविलें होतें, तिची सनद पाठवून दिली.[2]

---

[1] चिटणीस म्हणता की, ह्या तहनाम्याअन्वयें पुर्वा मोडून दिलेले सत्तावीस किल्ले पुन मोगलाच्या स्वाधीन करावे लागले

[2] रा. राजवाड्याचा आठवा खड पृ १७ पाहा

ह्या नवीन मिळालेल्या जाहगिरीची व्यवस्था लावण्यासाठी रावजी सोमनाथ नावाच्या एका ब्राह्मण कारकुनास मोकासदार असा नवा किताब देऊन योग्य सरंजामानिशी महाराजानी रवाना केले. सभाजी मोगलाचा मनसबदार झाल्यावरून त्याच्याबरोबर प्रतापराव गुजरास पांच हजार स्वारानिशी देऊन औरंगाबादेस पाठविले (सन १६६७ आक्टोबर) त्याची शहाजाद्याने मोठ्या सन्मानानें भेट घेऊन त्याला राहावयास स्वतत्र जागा नेमून दिली व तो एक नवाच पुरा वसविला, परंतु सभाजीचे वय ह्या वेळीं अगदी अल्प असल्यामुळे त्याला शहाजाद्यानें परत पाठविले, व प्रतापराव गुजरास आपल्यापाशी स्वारासह ठेवून घेतलें महाराजानी स्वत मनसबदारी स्वीकारून मोगलाची ताबेदारी पतकरण्याचा प्रसग मोठ्या युक्तीने टाळला

ह्या सलोख्यामुळे पुणें, सुपे वगैरे प्रात महाराजाच्या कबजात पुनरपि बिनतक्रार येऊन पूर्वीच्या तहाने हातचा गेलेला बहुतेक मुलूख त्यास मिळाला मात्र पुरदर व सिंहगड हे किल्ले त्याच्या हाती अद्यापि आले नव्हते[1] ही अशी लालूच महाराजास दाखविण्यात त्या कपटी बादशहाचा मतलब अर्थात् हा होता कीं, त्याला असे फुसलावून पुनरपि आपल्या काबूत आणून त्याचा पुरा घात करावा परंतु शहाजाद्याचा उद्देश असा बिलकुल नव्हता तो जात्या उदार व मनाचा निष्कपटी होता

असें सागतात कीं, ह्या शहाजाद्याला आपल्या बापाचा कपटी स्वभाव व वहीमखोरपणा सहन न होऊन त्याने त्याच्याविरुद्ध बड करण्याचा घाट घातला व शिवाजीमहाराजापाशी मदत मागितली ह्या गोष्टीचा त्यास अदेशा येऊन त्यानी शहाजाद्यास असा निरोप पाठविला कीं, 'तुमची व बादशहाची खरीखुरी लटाई सुरू झाली ह्मणजे मी आपल्या फौजेनिशी तुमच्या लष्करास येऊन मिळतो' महाराजास आपला सशय आला असें लक्षात येऊन शहाजाद्यानें त्याची खात्री होण्यासाठी आपल्या सैन्यासहवर्तमान उत्तरेकडे कूच केले, व पुनः महाराजाना निकडीचा निरोप पाठविला, व त्याचा संशय दूर व्हावा ह्मणून आपल्या वतीचे मोठमोठे हुद्देदार नेमिले. त्यावर महाराजानी असा जबाब पाठविला कीं, दक्षिणेंतील तुमच्या मुलखाचे रक्षण तुमच्या पश्चात् मी इकडे राहून करितो. तुमचे सैन्य बादशहाशी लढण्यास पुरेसे आहे इतकेहि करून तुमचा पराभव

१ प्रो सरकार ह्मणतात की, चाकण खेरीज करून कोणतेच किल्ले त्याच्या हाती परत आले नव्हते असे दिसते

झाल्यास माझ्या अमलांतील प्रांतात तुह्मीं खुशाल येऊन राहावें' ह्या नंतर शहाजाद्याने महाराजास आपल्या सर्व सैन्याचें आधिपत्य तुमच्याकडे देतो असें आमिष दाखविलें, परंतु त्यासहि ते लुब्ध झाले नाहींत शेवटी त्याचें साहाय्य न मिळाल्यामुळें शहाजादा हताश होऊन माघारीं फिरला व आपल्या बापाची क्षमा मागून पुन: औरंगाबादेस येऊन राहिला महाराजानी त्याला ह्या प्रसंगी साहाय्य केले नाहीं ह्या गोष्टीचा राग तर त्या थोर मनाच्या शहाजाद्यास आला नाहींच, परंतु उलट तो त्याच्याशी अधिकाधिक स्नेह वाढविण्याचा प्रयत्न करू लागला [१]

औरंगजेबाने शहाजाद्यास असें सांगून पाठविलें कीं, 'शिवाजीमहाराजास अदिलशाही व कुतुबशाही प्रांतावर स्वाऱ्या करण्यास उत्तेजन द्यावें त्या अशा रीतीनें कमजोर झाल्या ह्मणजे आपणास त्या बुडविण्यास कठीण जाणार नाहीं त्या प्रांतावर स्वाऱ्या करून जो मुलूख ते काबीज करितील त्यातला कांहीं त्यांच्या सरंजामास ह्मणून लावून द्यावा' बादशहाच्या ह्या सूचनेप्रमाणें महाराज त्या मुलखात वारवार स्वाऱ्या करू लागले. मोगलसैन्याच्या मदतीनें शिवाजीमहाराज आपला उरलेला मुलूख काबीज करू लागले आहेत असें पाहून विजापूरकरानी मोगलाशी तह करण्याचा मानस दर्शविला त्याप्रमाणें उभय पक्षामध्ये तह होऊन असें ठरलें कीं, सोलापूरचा किल्ला व त्यालगतचा अठरा हजार होन वसुलाचा मुलूख विजापूरकरानी मोगलास द्यावा ह्या तहाची हकीगत महाराजास कळताच त्यांनी यशवंतसिंग व शहाजादा यास भेदून त्यांच्याकडून असें कबूल

१ मनुस्मी ह्मणतो की, औरंगजेबाने शहाजादा मोअझिम याचे हे खोटेंच बंड उपस्थित करावयास फर्माविले होते यांत त्या कपटी बादशहाचा तिहेरी हेतु होता एक तर शिवाजीमहाराजास पुनरपि फसवून गिरफदार करावें, दुसरा हेतु असा की, आपल्या सेनापतीचे इमान कसास लावावें, आणि तिसरा हेतु असा की, पुढें कधीं मोअझिम याने बादशहाविरुद्ध खरेखुरें बंड उभारलें तर त्याचा कोणास विश्वास येऊ नये प्रो. सरकार (पृ २१२-२१९) ह्मणतात कीं, औरंगजेबाने स १६७० त दिलेरखानास शहाजाद्याच्या मदतीस पाठवून महाराजावर चढाई करावयास फर्माविले असता त्या दोघाचे भांडण होऊन ते इतके विकोपास गेले की, उभयतामध्ये लढाई सुरू झाली आणि तिला बहुतेक बंडाचे स्वरूप आले ह्या लढाईच्या वेळी शहाजादा व यशवंतसिंग यानीं दिलेरखानाचा खानदेशात पाठलाग केला, आणि त्यानी शिवाजी महाराजाला मदतीस बोलाविलें. महाराजाशी त्यानी ह्या वेळीं उगीच नावाला लढाई सुरू केली होती.

करून घेतलें कीं, त्यानी विजापूरकराच्या व भागानगरकरांच्या राज्यात वाटेल तशी धामधूम केली तरी त्याकडे मोगलसरदारानीं कानाडोळा करावा. असा बंदोबस्त करून महाराजानी अदिलशहाच्या मुलखांत चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वसूल करण्याचा धूम धडाका चालविला ह्या त्याच्या सतत होणाऱ्या त्रासापासून आपला मुलूख सोडविण्याच्या इराद्यानें अदिलशहाचा वजीर अबदुल महमद यानें महाराजाशींहि तह करून त्यास वर्षास तीन लाख होन खंडणी देण्याचें पुन कबूल केले[1], व त्यानी अदिलशाही मुलखात कोणत्याहि निमित्ताने गडबड करूं नये असें ठरले हाहि तह त्या वजिरानें गुप्तपणें केला कारण हिंदूंशी तह करून त्यास खडणी देण्याचे कबूल केल्यास यवनी बादशाहीचा पाणउतारा केला असे दरबारच्या अमीरउमरावास वाटून त्यानी नसता गोंधळ माडला असता, परतु खुद्द अदिलशहास हा तह पसत होऊन त्याने महाराजाचा वकील विजापूरच्या दरबारात ठेवून घेतला ह्या वकिलीच्या कामगिरीवर शामजी नाईक पाडे ह्याची महाराजानी नेमणूक केली[2]

हा असा अदिलशहाशी तह होऊन त्याच्या राज्यात मोहिमा करण्याचे बद पडलें तेव्हा महाराज कुतुबशहाच्या मुलखाकडे वळले, व त्यात वेळोवेळा स्वाऱ्या करून देश लुटून उध्वस्त करूं लागले त्या बादशहाला महाराजाचें पारिपत्य करण्याचे सामर्थ्य मुळींच नव्हते त्यात आणखी त्याला मोगलाचें पाठबळ आहे असें कळल्यावर तर त्याच्याशी युद्ध करण्याचे त्याला धैर्य होईना तेव्हा त्याची ही आपल्या राज्यावरील झडप बंद करण्यासाठी त्याला सामोपचाराचाच उपाय योजणें भाग पडले, आणि त्याचे दिवाण मादण्णा व आकण्णा यानीहि त्याला अशीच मसलत दिली मग ह्या हिदु दिवाणाच्या मध्यस्थीनें कुतुबशहाने

---

[1] कित्येक बखरकाराच्या मते ही खडणी सात लाख होन ठरली होती असे आहे हा खडणी देण्याचा करार विजापूरकरानी अर्थात् दुसऱ्यांदा केला होता.

[2] हा असा विजापूरकराशी तह झाल्याचे प्रो सरकार लिहीत नाहीत तथापि त्या वेळच्या सुरत वगैरे ठिकाणच्या इंग्रेज व्यापाऱ्याच्या लेखाचे उतारे त्यानी दिले आहेत त्यावरून असे दिसते की, महाराजाचा ह्या वेळी विजापूरकराशी कोणत्याहि प्रकारचा बखेडा चालू नव्हता ( पृ २०४ व ३१६ ) जेध्याच्या शकावलीत हा तह १६६७ च्या मे महिन्यात झाल्याचा उल्लेख आहे ह्या शकावलीत बावाजी नाईक पाडे यास वकील नेमल्याचें नमूद केलें आहे मागे तेराव्या भागात अदिलशहाचा वजीर अबदुल महमद याने महाराजाशी गुप्त तह केल्याचा उल्लेख आहे, त्या वेळी हा शामजी नाईकच वकील होता.

महाराजाशीं संधि करून असें ठरविलें कीं, त्यानें 'त्याला प्रतिवर्षी पाच लाख रुपये खंडणी द्यावी, परस्परांनीं परस्पराशी इत पर स्नेहभावानें वागावे, व परस्पराचे वकील परस्पराच्या दरबारीं राहावे' ह्या कराराअन्वये महाराजांनी निराजी रावजी नावाचा वकील तानशहा कुतुबशहाच्या दरबारी ठेवून दिला[1].

ह्याप्रमाणें ह्या दोन्ही पादशाहतींस दीन करून त्याच्यावर वार्षिक खंड बसविल्यावर महाराज कोंकणपट्टीकडे वळले तेथे अजून फिरंगी व शिद्दी याचा सुळसुळाट चालू होता तो मोडून काढून सर्व कोंकणप्रातावर आपली मत्ता निर्वेध बसवावी असा त्याचा हेतु होता मग त्यानी गोव्यावर अकस्मात् घाला घालून तेथील फिरग्यास हाकून देण्याचा बेत केला परतु तो सिद्धीस गेला नाहीं असें दिसते त्याच्या व महाराजाच्या ह्या समयी झालेल्या युद्धप्रसगाचें वर्णन कोठेहि आढळत नाहीं त्यावरून ते मुळी झालेच नसावे असें वाटते नतर त्यानी शिद्दीचा जंजिरा हस्तगत करण्याचा पुन एकवार मोठ्या जोराचा प्रयत्न केला, परतु त्याचा काहींएक उपयोग झाला नाहीं असें सागतात कीं, शिद्दी ह्या वेळी बराच जेरीस येऊन त्याने मुंबईच्या इंग्रज व्यापाऱ्यांपाशी मदतहि मागितली होती ह्याप्रमाणे महाराजाचे हे दोन्ही बेत ह्या वेळी असिद्ध राहिले

१ खाफीखान ( इलिअट, सातवा भाग, पृ २८६–८७ ) ह्मणतो की, शिवाजी महाराजानी आग्र्याहून परत आल्यावर गोवळकोड्याचा सुलतान अब्दुल कुतुबशहा याची भेट घेऊन त्याच्याशी सगनमत केले आणि त्याचे ज किल्ले विजापुरकरानी काबीज केले होते ते परत घेऊन देण्याचे वचन त्यास दिले त्याप्रमाणे त्यानी हे किल्ले जिंकून त्यातले काही कुतुबशहास दिले व काही आपल्या ताब्यात ठेविले, परतु ज्या किल्ल्याची नावे खाफीखान देतो त्यातले कित्येक पुढे काही दिवसानी महाराजानी जिंकिले असे दिसते शिवाय हाच बखरकार पुढे ह्मणतो की, महाराज सुलतान अबुलहसन गादीवर बसल्यावर दोनतीन वर्षानी पहिल्याने हैद्राबादेस [ भागानगरीस ] गेले सदरील तहाची हकीगत मराठी बखरीच्या व स्कॉटकृत दक्षिणेच्या इतिहासाच्या आधाराने दिली आहे ग्राट डफहि ह्या तहाचा उल्लेख करितो. जेध्याच्या शकावलीत असा उल्लेख आहे की, निराजी रावजी यानें कुतुबशहाशी स. १६७२ च्या जून महिन्यात तह करून एक लाख होन खडणी त्या सुलतानानें द्यावी असा करार केला असून त्यापैकी ६६००० होन महाराजाकडे आणून दिले. ही खडणी सुलतान अबुल हसन गादीवर बसल्यावर पुनरपि आणखी घेतली असावी असें दिसतें. स. १६६९ च्या सुमारास निराजी औरंगाबादेस मोगलांजवळ प्रतापराव गुजराबरोबर होता असा जेध्याच्या शकावलीत उल्लेख आहे.

वर सांगितल्याप्रमाणे अदिलशहा, कुतुबशहा व मोगल यांच्याशीं तह होऊन जिकडेतिकडे स्थिरस्थावर झाल्यावर महाराजाला एकदोन वर्षे थोडीशी विश्राति मिळाली ह्या विश्रातीचा उपयोग त्यानीं सपादिलेल्या राज्याची व्यवस्था नीट लावण्याकडे केला ही व्यवस्था कशी काय लाविली तें पुढे एका स्वतंत्र भागात सविस्तर कथन करूं[1]. येथे पूर्वकथानुपंगाने पुढे काय घडलें त्याचे निवेदन करूं

कोणाच्याच प्रातावर स्वाऱ्याशिकाऱ्या करण्याची सोय न राहून महाराज ह्या वेळीं स्वस्थ बसले तेव्हा पुष्कळाचा असा समज झाला कीं, त्यास त्याच्या हेतूप्रमाणें स्वराज्यप्राप्ति होऊन त्याच्या सर्व इच्छा तृप्त झाल्या आता ते संपादित राज्याचा नीट बदोबस्त राखून स्वस्थ राहतील मोगलाशीं लढण्याचा त्याच्यात वकूब असता तर ते पुन त्याच्याशी तह करून त्याचे अकित झाले नसते ह्यापुढे ते मोगलसुभेदाराला नजरनजराणे पाठवून त्यास खुष राखून त्याच्या तंत्रानें वागतील व फार तर स्वसपादित दौलत काहीं दिवस कायम राखितील. परतु हा लोकाचा समज अगदी चुकीचा होता असें त्याच्या पुढील चरित्रक्रमावरून सहज ध्यानात येईल मोगलाशीं टक्कर द्यावयास सध्या आपली तयारी असावी तशी नाहीं हे महाराज पूर्णपणें जाणून होते तेव्हा त्याच्याशी तूर्त स्नेहभावच राखावा असें त्यास वाटलें बरें, विजापूरकर व भागानगरकर याच्याशी केलेला तह मोडून त्याच्या राज्यात पुनरपि धामधूम करूं लागल्यास ते दोन्ही पादशहा एक होऊन आपल्याशी सग्राम करण्यास सिद्ध होतील, हे त्यास आता पक्के कळून आलें होते. कारण नुकतेंच विजापूरकराचे मोगलाशी युद्ध जुपले होते त्यात कुतुबशहाच्या मदतीनें अदिलशहाने मोगलाच्या सरदारार्चें काहींएक चालूं दिले नव्हते तेव्हा असाच एकोपा ते पुन करितील असा दृढसभव होता यास्तव मोगलाचाच आश्रय धरून राहणें आपल्या हिताचे आहे असें महाराजाच्या लक्षात पूर्णपणें येऊन चुकलें होते शिवाय त्या पादशहातींशीं विरोध प्रकट करून युद्धास सिद्ध झाल्यास मोगलसुभेदार आपणास साहाय्य करितील अशी आशा महाराजास मुळीच नव्हती कारण, एक तर मोगलाचा विजापूरकराशीं नुकताच तह झाला होता, व दुसरें असें कीं, काफर यवनपादशाह्या बुडविण्यास उद्युक्त झाला असता त्यास औरगजेबासारखा कट्टा स्वधर्माभिमानी बादशहा साहाय्य करील हें सहसा सभवनीय नव्हतें. हें सर्व ध्यानात आणून महाराजानी ह्या वेळीं

---

[1] भाग चोविसावा पाहा.

मोगलांच्याच तंत्रानें वागून कुतुबशाही व अदिलशाही हळूहळू कमजोर करण्याचा विचार मनात आणिला. आणखी असें कीं, औरंगजेबाच्या मनात दक्षिणेंतील ह्या दोन्ही पादशाहती बुडवून टाकून तेथे आपली सत्ता स्थापित करण्याचा विचार पुष्कळ दिवस वागत होता, व तत्सिद्धयर्थ त्यानें हा काळ पावेतों अनेक प्रयत्नहि केले होते. असाच उद्देश महाराजांचाहि होता तेव्हां एका भक्ष्याच्या प्राप्तीसाठी दोन सिंह जेथे टपलेले असतात तेथ जो सिंह अद्यापि बाल्यदशेत आहे त्याने दुसऱ्या जरठ सिंहाशी एकदम स्पर्धा करूं जाणें अविचाराचें होणार असून अपेक्षित भक्ष्यलाभ न होता जवळ असेल नसेल तेहि सर्व जावयाचें हे महाराजास समजत असे यास्तव आपले स्नायु मजबूत होऊन आपल्या दाढा व पंजे सुदृढ होत तोपर्यंत त्या बड्या सिंहाशी सलोखा राखून त्याच्या तन्त्रानें जो काहीं अपेक्षित भक्ष्याचा अंश प्राप्त होईल तो ग्रहण करावा, व हा आधीच जरठ झालेला सिंह सृष्टिक्रमानुसार अशक्त व रोड झाल्यावर त्याने मिळविलेलें हे सबंध भक्ष्य व त्याचे पूर्वीचें काहीं असेल तेहि हळूहळू हाताशीं घालावे असें त्याचें धोरण होते हे अगदी योग्य होते, व हे साधण्याचा रंगहि थोडथोडा दिसूं लागला होता मोगलाशीं सख्य केल्यामुळे कुतुबशहा व अदिलशहा याच्यावर महाराजाचा पुरा शह बसून ते त्याला पूर्वोक्त प्रकारें वार्षिक खंड देण्यास तयार झाले

पण हे मोगलाशी केलेले सख्य फार दिवस टिकलें नाहीं. त्या वहीमखोर मोगल बादशहाला लवकरच असें वाटूं लागलें कीं, शिवाजीमहाराजानी आपणास मानभावी नम्रता दाखवून केवळ भुरळ घातली आहे शहाजादा व यशवंतसिंग यास अनेक प्रकारीं लालूच दाखवून हे आपला डाव साधणार आहेत असा संशय त्याच्या मनात पुरा भरून त्याने शहाजाद्यास असा हुकूम पाठविला कीं, शिवाजी महाराजाशी अशा सलोख्याने वागणे ठीक नाहीं ते अधिकच बळावत चालले आहेत त्याचा दक्षिणेतील यवनी पादशाहतीवर पुरा डोळा असून ते त्या घेण्याच्या उद्योगात आहेत त्या हस्तगत करून ते प्रबळ झाले म्हणजे आपल्याहि पादशाहतीवर उलटतील मग त्यास आटोपणें कठीण जाईल त्या यवनी शाहींतील जे कोट, किल्ले व प्रात त्यांनी आमच्या साहाय्यानें घेतले त्याचें उत्पन्न त्यांनी आमच्या पोत्यास जमा करावे ते न करिता त्याचा उपभोग ते आपणच घेत आहेत, हे कांहीं ठीक नाहीं. यास्तव त्यांच्याशी केलेला तह मोडून त्यास दिलेले किल्ले व प्रांत माघारीं घ्यावे, त्याची फौज आपल्या मदतीस म्हणून ठेवून घेतली आहे ती माघारी पाठवावी, किंवा साधल्यास तिचा नाश करावा, आणि

प्रतापराव गुजर, शिवाजी महाराज व इतर बडेबडे सरदार यास ताबडतोब कैद करावें ह्या हुकमाप्रमाणें तुह्मी वागणार नाहीं तर तुमच्यावर माझी फार इतराजी होईल[१] ' हा असा हुकमाचा खलिता दिल्लीहून निघाल्याचें वर्तमान शहाजाद्याच्या गुप्त बातमीदारानी त्याला आगाऊ कळविताच त्याने ही बातमी प्रतापराव गुजराला गुप्त रीतीने कळविली, व आताच्या आता येथून पळून जा, असा त्यास इशारा केला त्याबरोबर प्रतापराव आपले स्वार घेऊन महाराजाचा औरंगाबादेस असलेला निराजी रामजी नावाचा वकील यासह रातोरात मोगलाची छावणी सोडून औरंगाबादेहून निघाला, व सुखरूपपणे पुण्यास येऊन दाखल झाला. तिकडे बादशहाचा सदरी निर्दिष्ट केलेला हुकूम शहाजाद्याच्या हातीं पडताच त्याने मराठे पळून जात होते त्याचा पाठलाग करण्यासाठीं काहीं लोक पाठविले, ते अर्थात् अशा उद्देशाने कीं, आपल्या मसलतीने ते पळून गेले असा अंदेशा बादशहास येऊं नये, परंतु ह्या पाठलागास पाठविलेल्या सैन्याच्या हातून काहींएक न होऊन ते परत औरंगाबादेस गेलें मग शहाजाद्याने त्या बादशाही फरमानास असा जबाब पाठविला कीं, मराठे हरामजादे, मोठे लबाड ते आपले फरमान येण्यापूर्वीच आमच्या लष्करातून फरारी झाले त्यामुळें त्यास पकडून कैद करण्याचें साधले नाहीं हें वर्तमान एकताच औरंगजेबाने शहाजाद्याच्या मदतींला दिलेरखान व दाऊदखान यास दुसरीकडल्या मोहिमा सोडून औरंगाबादेस पाठविले, त्याशिवाय आणखी कित्येक सरदार उत्तरेकडून पाठविले.

प्रतापराव गुजर सर्व फौज व चीजवस्त घेऊन व शहाजाद्याने गुप्तपणे दिलेला पुष्कळ नजरनजराणा घेऊन सुरक्षितपणें परत आल्याने महाराजास आनंद वाटला मोगलाशी झालेला तह अशा रीतीनें एकाएकीं मोडल्याबद्दल त्यास वाईट वाटले नाहीं कारण त्यास आता स्वस्थ बसून राहणे बरें वाटत नव्हतें. दोन वर्षांची स्वस्थस्ता मिळून आपल्या राज्याची व्यवस्था नीट लागली, व आपल्या एवढ्या फौजेचें दोन वर्षं बिनघोर पोट भरलें यातच त्यास समाधान वाटले

१ डुदेले ह्मणतो की, बादशहाने संभाजीला दिलेली जाहगीर काढून घेतली ती अशा निमित्तानें कीं, शिवाजी महाराजास दिल्लीस जाताना एक लाख रुपये खर्चीसाठी ह्मणून दिले होते, त्याच्या मोबदल्यादाखल ही जाहगीर खालसा करावी असें बादशहाने ठरविलें, त्याप्रमाणें ती जाहगीर मोगलानी परत घेतल्याचे वर्तमान कळताच महाराजानी प्रतापराव गुजरास स्वसेनेसह लागोलाग परत बोलाविलें, व त्यांचे लोक वऱ्हाडांतील जाहगिरीवर होते ते सांपडला तेवढा माल लुटून स्वराज्यास परत आले

# भाग एकविसावा



## मोगलांच्या मुलखांत पुनः स्वाऱ्या.

### १६७०–७२.

मोगलांशीं केलेला सलोखा मोडला तेव्हां महाराजांनी त्यास आपलें उग्र स्वरूप पुनः दाखविण्यास सुरुवात केली. त्यांच्या प्रांतांत त्यांनी जिकडून तिकडून धामधूम आरंभिली. ह्या समयीं त्यांनी व त्यांच्या लोकांनी असा कांहीं विलक्षण जोम व शौर्य हीं प्रगट केलीं कीं, तशीं त्यांनीं पूर्वी कधींहि दाखविलीं नव्हतीं असें ह्मटलें असतां चालेल. सिंहगड व पुरंदर हे किल्ले शत्रूच्या ताब्यांत होते ते हस्तगत करण्याचा निर्धार महाराजांनी प्रथमतः केला. याचें कारण असें कीं, ते किल्ले शत्रूच्या हातीं असल्यामुळे पुणे, चाकण वगैरे प्रांतांत जाणेंयेणें निर्भयपणें होणें अमळ कठीण असे. ह्या किल्ल्यावर जयसिंगराजानें ठेवून दिलेले रजपूत लोक सर्वदा हुशार राहून किल्ल्याचें रक्षण करण्यांत चांगले दक्ष असत. प्रथम सिंहगड काबीज करावा असा विचार महाराजांनी केला.[1] ह्या किल्ल्यावर उदयभानु नांवाचा मोठा शूर व बलाढ्य सरदार मुख्य होता. तो मोगलसरकाराशीं पुरा इमानी असल्याकारणानें तो कोणत्याहि उपायानें वश होण्यासारखा नव्हता. त्याच्या हाताखालील रजपूत शिपाई अगदीं निवडक व शूर योद्धे होते. तेव्हां असा हा सर्व प्रकारें अभेद्य गड आपल्या हातीं येतो

१ जिजाबाईच्या आग्रहास्तव महाराजांनीं हा किल्ला हस्तगत करण्याचें मनांत आणिलें असें पवाड्यावरून दिसतें. एके दिवशीं जिजाबाई महाराजांशीं सोंगट्या खेळावयास बसली असतां डाव महाराजांवर आला. तेव्हां तिनें ह्याबद्दल सिंहगड किल्ला मागितला. म्हणून अर्थात् महाराजांला तो मोगलांच्या हातचा कसा तरी काबीज करणें प्राप्त झालें. तेव्हां ही कामगिरी तानाजी मालुसरे यास सांगावयाचें ठरून तो आपला मुलगा रायबा याच्या लग्नासाठीं स्वग्रामीं गेला होता, त्याला आपले मावळे घेऊन ताबडतोब परत येण्याविषयीं हुकूम पाठविला. त्यावरून तो शूर पुरुष लग्नसमारंभ तहकूब ठेवून लागोलाग राजगडावर महाराजांपाशीं आला, असें पवाड्यांत ह्मटलें आहे.

कसा, हा विचार महाराजास प्राप्त झाला तेव्हां तानाजी मालुसरे[1] पुढें होऊन ह्मणाला कीं, मजबरोबर माझा धाकटा भाऊ सूर्याजी यास द्यावे व मी निवडीन ते एक हजार मावळे मजबरोबर द्यावे, ह्मणजे मी हा किल्ला हस्तगत करून येतों[2]. त्याचें हें ह्मणणें त्यानी कबूल केलें

सिंहगड हा किल्ला सह्याद्रीच्या पूर्वेकडील बाजूस आहे पुरंदरकिल्ल्याच्या टेकड्या ह्या किल्ल्यापर्यंत आलेल्या असून त्यावर जावयास एका उंच व अरुंद कड्यावरून वाट आहे हा कडा पूर्वपश्चिम आहे, आणि उत्तरेकडून व दक्षिणेकडून हा किल्ला एकाद्या विशाळ व खडकाळ डोंगरासारखा दिसतो ह्याचा चढाव अर्ध्या मैलाचा आहे हा कित्येक भागी केवळ उभा सुळासारखा आहे. इतकें उंच चढून गेल्यावर मग काळ्याभोर खडकाचा प्रचंड कडा आहे हा चाळीस फूट उंच आहे ह्या भव्य कड्यावर दगडाचा भक्कम तट बांधिलेला असून त्यावर मोठमोठे बुरूज आहेत. किल्ल्याचा आकार तिकोनी आहे आतील घेर अजमासें दोन मैलाचा आहे किल्ल्यात दरवाजावाचून दुसऱ्या कोठूनहि प्रवेश होणें शक्य नाहीं, असें पाहणारास वाटते. ह्या किल्ल्यावरून पाहिलें असता पूर्वेस नीरानदीचें अरुंद पण सुंदर पात्र दृष्टीस पडते, उत्तरेस विस्तीर्ण मैदानप्रदेश व पुणेंशहर नजरेस पडते, व दक्षिणेस आणि पश्चिमेस पर्वताच्या उंच रांगा दिसतात त्या दुरून पाहिल्या ह्मणजे जशा काय त्या गगनास जाऊन मिळाल्या आहेतशा भासतात. ह्याच दिशेला रायगड किल्ला आहे

तानाजी मालुसरे हा किल्ला हस्तगत करण्याची प्रतिज्ञा करून रायगडावरून एक हजार मावळ्यानिशीं निघाला[3] हे मावळे सिंहगडाकडे एका जमावानें गेले नाहींत. डोंगरातून व खोऱ्यातूच निरनिराळ्या वाटानी जाऊन ते ठरलेल्या

१ ह्याचे वर्णन बखरीतून येणेप्रमाणे केले आहे तो अंगाने अतिशयित धिप्पाड व सुदृढ होता त्याचे रूप भयानक दिसे त्याचे श्मश्रु पिंगट व नेत्र आरक्त असत. त्याच्या मिशा हस्तदंडप्राय मोठ्या व लांब असून उभय भागी लिंबे ठेविली असता ती अचल राहत. त्याचे मस्तक विशाळ होते तो हत्तीसारखा पुरुष असून त्याने हत्तीला सुळ्यास धरून जागच्या जागी उभा करून ठेवावा, असे त्याचे प्रचंड बळ असे समरांगणात त्याच्यापुढे कोणाचाहि टिकाव लागत नसे. त्याच्या तोडीचा पुरुष महाराजाच्या साऱ्या लष्करात एकहि नव्हता. तो सराईत, दांडाईत व पटाईत असा असून सर्व शस्त्राच्या कारवीत अत्यंत प्रवीण होता.

२ पवाड्यात ह्मटले आहे की, तो बारा हजार फौज घेऊन किल्ल्यापाशी गेला.

३ तीनशें निवडक मावळे घेऊन तो गेला, असें मुसलमानी बखरीत आहे.

ठिकाणीं काळोख्या रात्री एकवट झाले ही माघमहिन्यांतील कृष्णपक्षाची अष्टमी होती सर्व जण जमा झाल्यावर तानाजीने त्यातल्या अर्ध्या लोकास काहीं अतरावर राहावयास सागितले, व इशारा होताच त्यानी पुढे चालून यावे असें ठरविलें. बाकीचे लोक किल्ल्याच्या तटापाशी जाऊन गुपचूप उभे राहिले मग तटाच्या ज्या भागी शत्रूचा प्रवेश होण्याचा सभव नाहीं असें गडावरील रखवालदारास वाटण्यासारखे असून विशेष बंदोबस्त ठेवण्याची त्यानी खबरदारी घेतली नसावी असें वाटले, त्या भागी एका हुशार मावळ्यास घोरपडीच्या साहाय्यानें चढवून दोरीची शिडी एका खडकास बाधविली[1] त्या शिडीवरून एकएक असे तीनशे मावळे तटावर चढून गेले[2] ते तेथे दबून छपून जिकडे तिकडे राहिले इतक्यात त्याची चाहूल लागून ते वर चढून येत होते त्या बाजूस किल्ल्याचे रखवालदार धावत आले, व त्यापैकीं एक जण काय आहे तें पाहण्यासाठी अमळ धीर करून पुढे आला त्याच्यावर एका मावळ्याने लगेच बाण मारून त्याला तेथल्या तेथे पुरा केला तेव्हा किल्ल्यावरच्या रखवालदारात एकच कल्ला होऊन जोतो आपआपलीं शस्त्रे घेण्यास धावला[3] ही अशी त्याची गडबड उडाली आहे तोच त्याच्यावर हल्ला केल्यास आपला डाव साधेल असें तानाजीस वाटून तो आपल्याबरोबर वर आले होते तेवढ्याच लोकानिशी पुढे सरसावला. जिकडून गडबड ऐकूं येत होती तिकडे मावळ्यानी बाणाचा मारा सुरू केला रखवालदारानी दिवट्यामशाली पेटवून उजेड केला तेव्हा त्यास आपल्यावर कोण चालून आले आहेत ते स्पष्ट दिसले, व त्याची एकच धादल उडाली कित्येकांस तर आपली शस्त्रे घ्यावयासहि अवकाश मिळाला नाहीं उभयपक्षाचे तत्काळ युद्ध सुरू होऊन दोहोकडचे योद्धे मोठ्या आवेशाने लढूं लागले किल्ल्यावरील लोकांची संख्या वर आलेल्या मावळ्याहून फारच मोठी होती. तरी तानाजीचे कसलेले योद्धे बिलकुल न डगमगता मोठ्या शौर्यानें रजपुतास सारखे चेपीत पुढें चालले. किल्ल्यावरील लोकाचा मोड होण्याचा रंग दिसूं लागला इतक्यांत उदयभानु व तानाजी याची त्या युद्धाच्या गर्दीत दृष्टादृष्ट होऊन त्याचे द्वंद्वयुद्ध जुंपले. दोघेहि

---

१ कल्याण दरवाजापाशी अशी शिडी लाविली असे मुसलमान इतिहासकार ह्मणतात

२ पन्नास मावळे तटावर चढल्यावर मोल तुटला असे पवाड्यात ह्मटले आहे.

३ अफूच्या निशेत असल्यामुळे त्याना युद्धास सिद्ध व्हावयास विलब लागला असे ह्मणतात.

वीर मोठे शूर, युद्धकुशल व बलवान् असल्याकारणानें त्यांची झटापट बराच वेळ मोठ्या निकराची झाली. दोघासहि पुष्कळ जखमा झाल्या, आणि शेवटीं परस्पराचे वार परस्परांच्या वर्मीं लागून ते दोघेहि एकेच वेळी समरभूमीवर चीत होऊन गतप्राण झाले. आपला मोहरप्या पडला असून शत्रूचा जमावहि फार मोठा आहे, तेव्हा आता आपली येथे धडगत नाहीं असें वाटून मावळ्यानीं माघार घेतली ते जेथून वर चढून आले होते तिकडे ते पळत सुटले. इकडे तानाजीचा भाऊ सूर्याजी वर काय प्रकार झाला आहे तो पाहण्यासाठी खालीं जे लोक उरले होते त्यास घेऊन तटावर येऊन पोचला होता त्यास आपला भाऊ रणात पडला असून मावळे पळत सुटले आहेत असें कळताच तो पुढें सरसावून त्या पळणाऱ्या मावळ्यास ह्मणाला, 'तुमच्या बापाचे प्रेत महारानी उचलून टाकावे हे तुम्हापैकी कोणास बरे वाटेल ते सागा खालीं उतरून जाण्याची आशा मुळींच धरूं नका कारण दोऱ्या मी केव्हाच तोडून नाहीतशा करून टाकिल्या आहेत. तुम्ही शिवाजी महाराजाचे कट्टे इमानी व शूर शिपाई आहा हें सिद्ध करून दाखविण्याचा हा समय आहे. शत्रूस पाठ दाखवून मरणभीतीस्तव रणभूमीवरून पलायन करणें हे खऱ्या वीरास शोभत नाहीं. तर चला, माग फिरा, आणि शत्रूला आपले शौर्य दाखवा' हे वीर्योत्साह प्रदीप्त करणारे भाषण ऐकून, व आपले नव्या दमाचे सोबती वर आले असून आपणास सूर्याजीसारखा मोहरा[१] अद्यापि आहे हे त्याच्या मनात येऊन त्यास पुन हुरूप चढला, व आपला अतिशूर व प्रिय मोहरा रणात पडला त्याचा बचपा घ्यावयाचा असा त्यानीं निश्चय केला, व शत्रूवर पुन मोठ्या आवेशानें हल्ला करण्यास सगळे सिद्ध झाले मावळेलोकाच्या अगात एकदा आवेशाचे वारे शिरलें ह्मणजे ते जिवाची परवा न करिता आपल्या समोरचा शत्रु कितीहि प्रबळ असला तरी त्याशी झगडण्यास तयार होत त्यात आणखी तानाजीनें निवडून काढलेले ते लोक मग काय विचारिता! त्यानी 'हर हर महादेव' अशी गर्जना करीत शत्रूवर एकच गर्दी केली, व त्याचा पुरा मोड करून किल्ला कबजात घेतला. ह्या घोर सग्रामात सुमारें तीनशे मावळे रणात पडले. अजमासे पाचशे रजपुताची प्रेतें समरभूमीवर सापडलीं, आणि थोडेसे लोक छपून राहिले होते ते शरण आले पुष्कळानी तटाखालीं उड्या टाकून प्राणत्याग केला.

---

१ ह्या वेळी सूर्याजीने कल्याण दरवाजा उघडून [illegible] लोक आत घेतले.

आपली फत्ते होऊन गड काबीज झाला ही आनंदाची बातमी आपल्या धन्यास कळविण्यासाठीं पूर्वसकेताप्रमाणें किल्ल्यांतील एका केबळयाच्या घरास सूर्याजीनें आग लाविली. महाराजास ह्या छाप्याचा परिणाम काय होतो ते कळण्याची उत्कठा लागून राहिली होती. त्यानी ही आग पाहिली नेव्हा त्यास हर्ष झाला. परंतु ह्या जिवावरच्या कामगिरीत आपल्या अत्यंत इमानी व जिवलग मित्राची प्राणाहुति पडली हे कळलें तेव्हा त्याला पराकाष्ठेचें दु ख वाटलें. त्यानीं ह्या वेळी असा दु खोद्गार काढिला ह्मणतात की, 'गड हातीं आला पण सिंह गेला'[१]; मग ज्या मावळे लोकानी ही बहादुरी केली त्यास महाराजानी इनामे दिली. प्रत्येकास एकएक रुप्याचें कडे बक्षीस दिलें, व त्याच्यावरच्या अमलदारास त्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे इनामें दिली सूर्याजीनें ह्या प्रसगी अप्रतिम पराक्रम करून आपली सरशी केली ह्मणून त्याची पुष्कळ तारीफ करून त्याला सिंहगडावर मुख्य अधिकारी नेमिले

सिंहगड हाती आल्यावर पुरदरकिल्ला हस्तगत व्हावयास विलब लागला नाहीं. हा गड घेतल्यावर सुमारे एका महिन्याने सयाजी आपल्या मावळ्यानिशी त्या किल्ल्यावर रात्रीचा एकाएकीं चढून गेला, व वरील लोकास कापून काढून तेथें त्यानें महाराजाचे निशाण उभारले ह्या किल्ल्यावरील रजपुतास, सिंहगडावर मावळ्यानीं छापा घालून आपल्या बन्धूची कशी धुळधाण करून मोडिलीं होती हे पूर्वीच कळलें असल्यावरून ते ह्या आपल्यावरच्या छाप्याच्या वेळीं अगदी घाबरून गेले, व त्याचा समुदाय फार मोठा होता तरी त्यास मावळ्याशीं सग्राम करण्याचा आवाका मुळीच राहिला नाहीं, ह्मणून येथें महाराजाच्या लोकाचीं फारशी खराबी झाली नाहीं नंतर काहीं दिवसानी चादोरशहरावर चालून जाऊन महाराजानी तेथला चाळीस हजार रुपयाचा बादशाही खजिना, एक हत्ती व बारा घोडे हस्तगत केले व ते शहर लुटले

त्यानतर, माहुलीचा किल्ला मोगलाच्या ताब्यात होता तो सर करण्याचा विचार करून महाराजानी ही कामगिरी मोरोपतास सागितली. त्याने त्या किल्ल्यास वेढा घालून त्यावर एकदम चाल केली तेव्हा उभय पक्षाकडील लोकानीं मोठ्या आवेशानें युद्ध केलें मोरोपताचे एक हजार लोक रणागणात पडले, व त्याचा

१ कित्येक इतिहासकाराचे असे ह्मणणे आहे की, हा वेळपावेतो ह्या किल्ल्याचे नाव कोंडाणा असे असून महाराजाच्या ह्या खेदोद्गारावरून त्यास सिंहगड असे नाव पडले

मोड होऊन त्यास मागे हटावें लागले, परतु तो बिलकुल नाउमेद झाला नाहीं. त्यानें किल्ल्याचा वेढा मोठ्या नेटानें चालविला किल्ल्यांतील लोकहि इरेस चढून किल्ला मोठ्या शौर्याने लढवीत राहिले पेशव्याने थोडासा दम खाऊन पुन किल्ल्यावर छापा घातला पण ह्या वेळींहि किल्ल्यावरच्या लोकानी त्यास मागे हटविले याप्रमाणें दोन वेळा मागे परतावें लागलें तरी पेशव्याचे लोक हताश झाले नाहींत किल्ल्यावरच्या लोकास जुन्नराहून मदत मिळण्याची आशा होती, ह्मणून त्यानींहि शेवटपर्यंत हिमत सोडिली नव्हती ही अशी उभय पक्षाकडील योद्धयाची झटापट सारखी दोन महिने चालली होती दोन्हीकडचे योद्धे ईर्षेनें लढत होते. परतु शेवटी शत्रूचे लोक हतवीर्य होऊन किल्ला पेशव्याच्या हातीं आला [1] त्यानंतर करनाळाकिल्लाहि महाराजाच्या लोकानी छापा घालन सर केला, व पावसाळा सुरू होण्यापूर्वी सगळा कल्याणप्रात पुन काबीज केला. लोहगड, शिवनेरी, त्रिबक, रोहिडा, अहिवंत, रावळाजावळा, मकरदगड वगैरे काहीं किल्ले मोगलाच्या हातीं अद्यापि राहिले होते ते छापे घालून सर केले स १६७० च्या एप्रिल अखेरपर्यंत अहमदनगर, जुन्नर व परेन्डा याच्या आसपासचे मोगलाचे ५१ गाव महाराजाच्या लोकानी लुटले. [2]

मोगलाच्या प्रातात महाराजाच्या लोकानी हा धुमाकूळ चालविला तेव्हा खानदेशात दाऊदखान होता तो आपलें घोडदळ घेऊन अहमदनगरास आला,

---

१ बुंदले ह्मणतो की, ह्या किल्ल्यास महाराजानी स्वत वेढा घातला होता किल्लेदार मनोहरदास नामेकरून एक रजपूत सरदार होता त्यास अन्नसामुग्रीची टचाई पडून तो अगदी टेकीस आला, आणि त्याने महाराजास असा निरोप पाठविला की, आह्मी जातीचे रजपूत आहो, एकूणएक माणूस रणात पडेपर्यंत किल्ला सोडून देणार नाहीं महाराजाला त्या किल्ल्याच्या चोरवाटा ठाऊक होत्या त्यापैकी एका वाटेनं ते आपले काहीं लोक घेऊन वर चढू लागले परतु शत्रूचे लोक चोहोंकडे सावध असल्यामुळे त्यास त्याची चाहूल लागून ते त्याच्यावर तुटून पडले, व त्या हातघाईत महाराजाचे पुष्कळ लोक जायबंदी झाले. हा अशी त्याच्या लोकाची खराबी झाल्यामुळे त्यास त्या वेळी वेढा उठवून जावे लागले परतु पुढे मनोहरदास आपल्या मदतीस लोक मिळत नाहीत असे पाहून निराश झाला आणि आपल्या हुद्याचा राजीनामा देऊन किल्ला सोडून गेला, तेव्हा महाराजानी त्यावर छापा घालून तो सर केला

२ सभासद ह्मणतो की, मोगलास दिलेले २७ किल्ले महाराजानी चार महिन्याच्या अवधींत पुनरपि काबीज केले. ही अत्युक्ति आहे असे प्रो सरकार ह्मणतात

आणि त्यानें त्याच्यावर सात हजार घोडेस्वार रवाना केले. ह्या वेळी महाराजांच्या लोकानी त्या प्रातातल्या तीन किल्ल्याना वेढा घातला होता तो त्यास उठवावा लागला ही अशी ह्या मोगल सरदाराकडून त्यास हरकत आली तरी ह्या वेळी औरंगाबादेस मोअझिम व दिलेरखान याच्यामध्ये कलह सुरू झाला असून औरंगजेबास आपल्या ह्या मुलाचा संशय आला असल्याकारणानें तिकडील मोगल सैन्याकडून महाराजास फारशी हरकत झाली नाहीं. ह्यामुळे त्याला मोगलाच्या प्रातात हवातसा धुडगूस घालता आला [1]

ह्या सुमारास महाराजानी आपले काहीं लोक जंजिऱ्याच्या शिद्दीवर रवाना केले होते. त्यानीं त्याच्या मुलखावर एकसारखे हल्ले करून त्यास अगदी हैराण करून सोडले तेव्हा त्याने मोगलाची मदत मागितली असावी असें दिसते, कारण स १६६९ त औरंगजेबाने महाराजास एक पत्र लिहून असें फर्मोविले होते कीं, त्यानी शिद्दीच्या वाटेस जाऊं नये ह्या शिद्दीने ह्या प्रसंगीं सुरतेच्या इग्रज व्यापाऱ्याना असें लिहून कळविले होते कीं, मराठ्याशीं शेवटपर्यंत लढत राहावयाचा आपला सकल्प आहे, व शेवटी उपासमार होऊन जेरीस आल्यावर किल्ला मोगलाच्या हवाली करावा असा आपला बेत आहे हा त्याचा बेत महाराजाना चागला ठाऊक होता. शिवाय विजापूरकरावर जयसिगाने स्वारी केली होती तेव्हा हा शिद्दी अदिलशहाचा अकित म्हणवीत असूनहि त्याने जयसिगाच्या लालचीस भुलून त्याला त्या वेळी साहाय्य केले होते पुढे महाराजानी पुरदर येथे जयसिगाशी तह केला त्या वेळी त्यानी जंजिरा आपल्या स्वाधीन करावा अशी अट घातली होती पण ती त्यानें मान्य केली नव्हती तेव्हा अर्थात् हा जंजिरा मोगलाच्या ताब्यात गेल्यास पश्चिमकिनारा आपल्या हातीं निर्वेध राहणार नाहीं व आरमार तयार करण्याचा जो आपला उद्देश तो असिद्ध राहील असें त्यास वाटलें, आणि त्यानी शिद्दीला नाहींसा करण्याचा दृढ सकल्प केला; म्हणून त्यानी स. १६७० त स्वत जजिऱ्यावर स्वारी करून त्यास जमिनीवरून वेढा घालून त्यावर तोफाचा सारखा मारा चालविला पावसाळा सुरू झाला तरी हा वेढा त्यानी उठ-

१ ह्या वेळी सुरतेचे इग्रज व्यापारी लिहितात की, शिवाजी काही आता चोरासारखे छापे घालीत नाही. तो बरोबर तीस हजार लोक घेऊन मोगलाच्या प्रातात स्वाऱ्या करून विजय मिळवीत चालला आहे. औरगाबादेस शहाजादा बसला आहे, पण त्याची त्याला मुळी परवा वाटत नाही

विला नाहीं, व तोफाचा भडिमार कांहीं कमी केला नाहीं पावसाळा संपण्या-पूर्वी तो किल्ला हस्तगत करण्याचा त्याचा कृतसंकल्प होऊन त्यांनीं आपली शिकस्त चालविली होती त्या किल्ल्यास नुसता वेढा देऊनच ते राहिले नाहींत, तर त्याचा मालक फत्तेखान ह्याला तो सोडून दिल्यास मोठी रकम व जहागीर देण्याची त्यानी लालूच दाखविली ह्या लालचावणीस फत्तेखान पहिल्यानें भुलला नाहीं, उलट आपणाला अशी लालूच त्यानी दाखविली ह्मणून त्याला मोठा रागहि आला पण पुढें महाराज मोठ्या नेटानें एकसारखा मारा करू लागले तेव्हां त्याचा धीर निघेना शिवाय आपला धनी अदिलशहा याजकडून मदत मिळण्याचीहि त्याला या वेळीं मुळीं आशा नव्हती ह्याप्रमाणें तो निरुपाय होऊन,महाराजास शरण येऊन त्याच्या आश्रयाने राहावयास सिद्ध झाला परंतु त्याच्या हाताखाली दुसरे तिघे सरदार होते, त्याचा महाराजावर पुरा दात होता त्यांला हा फत्तेखानाचा बेत मुळीच पसंत वाटला नाहीं त्याला स्वधर्माचा मोठा अभिमान असून हिंदूचा व त्यातून विशेषतः मराठ्याचा ते अतिशयित तिरस्कार करीत काफरास शरण जावून त्याचे अंकित होऊन राहणे त्यास बिलकुल रुचले नाहीं फत्तेखान हार खाऊन महाराजाचा अंकित झाला असता आपली धडगत लागणार नाहीं अशी दहशत त्याला पडून त्यानी त्याचा हा बेत साधेल त्या उपायानें हाणून पाडावयाचा असा निर्धार केला मग त्यानी आपल्या सर्व स्वदेशीयाशीं संगनमत करून त्याच्या मदतीनें फत्तेखानास कैद केले, व किल्ला लढविण्याचें काम नेटानें चालू ठेविलें इतकेंहि करून शिवाजीमहाराजापुढें ह्या समयीं आपला निभाव लागणे कठीण आहे असें वाटून त्यानी सुरत येथील मोगलसरदाराशी[१] असें बोलणे लाविलें कीं, 'आह्मास ह्या प्रसंगी अवश्य तेवढें साहाय्य कराल व पुढेंहि प्रसंगानुसार मदत करण्याचें अभिवचन द्याल तर विजापूरसरकाराचें अंकितत्व झुगारून देऊन आमच्या ताब्यातील आरमारासह आम्ही मोगलबादशहाची सेवा करण्यास राजी होऊ, व जंजिराकिल्ला आह्मांस मोगलबादशहाकडून जाहगीर मिळाला आहे असें मानून चालूं ' हे त्याचें बोलणे त्या सुभेदारास पसंत वाटून त्यानें त्याबद्दल औरंगजेबापाशीं शिफारस केली. त्यानें

१ प्रो. सरकार ह्मणतात कीं, हे बोलणे त्यानी मोगलाच्या दक्षिणेतील सुभेदाराशी लाविलें, परंतु ह्या शिद्दींना सुरतेकडूनच मदत मिळाली असली पाहिजे, आणि त्याना सुरतच्या सुभेदाराशींच पत्रव्यवहार करिता आला असावा.

तौ त्यांचा अर्ज मंजूर करून त्यापैकीं एकास इतरांच्या सल्ल्यानें त्या किल्ल्याचा मालक ठरविलें व त्यास याकूतखान असा नवा किताब दिला.[1]

ही अशी मोगलाची मदत शिद्दीला मिळाल्यामुळें महाराजाच्या माऱ्यास त्यांनी मुळीच जुमानिलें नाहीं तेव्हां त्या एका किल्ल्यापाशीं इतके दिवस धडपड करीत राहून इतर महत्त्वाच्या कामगिऱ्याकडे दुर्लक्ष करणें नीट न वाटून त्यानी आपला सकल्प असिद्ध ठेवून तेथला तळ हलविला, व पुढें अनुकूळ संधि साधून त्या शिद्दीची पुरी खोड मोडावयाची असा निश्चय केला

आता सुरतेच्या सुभेदारानें शिद्दीस मदत करून आपला बहुतेक सिद्धीस गेलेला उद्देश हाणून पाडिला, तरी त्याच्या शहरावर पुन एक वेळ हल्ला करून त्याची रग जिरवावी असा महाराजानी विचार करून पावसाळा संपतो न सपतो तों पंधरा हजार स्वारानिशीं त्या शहरावर अकस्मात् घाला घातला पण त्या सुमारास तो सुभेदार एकाएकीं काहीं उपद्रव होऊन मरण पावला होता, व त्या शहराच्या रक्षणास ठेवलेल्या बऱ्याच लोकास यशवंतसिंगाने किंवा शहाजाद्यानें काढून नेले होतें हा प्रकार त्यानी केवळ यदृच्छेनें केला असावा किंवा शिवाजी-महाराजाचा डाव नीट साधावा ह्मणून केला असावा कसेंहि असो, महाराजांला ते शहर पुन एक वेळ यथेच्छ लुटावयास सापडलें किल्ला सर करून त्यात आपले थोडेसे लोक ठेवून ठेऊन त्यानी ते शहर तीन दिवस सावकाश लागेल तसें लुटलें[2]

सुरत शहरावर महाराजाचा हल्ला होणार अशी भीति गुजरातच्या मोगल सुभेदारास वाटून त्याच्याशी युद्ध करण्याची त्यानें तयारी चालविली त्यानें विजापूरकरांस बारा हजार लोक आपल्या कुमकेस पाठवावयास लिहिलें तसेंच मुंबईच्या इंग्रज व्यापाऱ्याकडे दारूगोळ्याची त्यानें मागणी केली, परंतु ही

१ प्रो सरकार ह्मणतात की, त्या तिघा सरदारापैकी एकाचे नाव शिद्दी संबळ असे होते त्याला मोगल आरमाराचा सेनापति नेमून त्याला तीन लाखाचा जहागीर करून दिली, आणि शिद्दी कासीम व शिद्दी खेरात यास जजिरा व त्याला लागून असलेला मुलूख याची व्यवस्था सांगितली ह्याप्रमाणे शिद्दीचे सगळ आरमार मोगलाच्या ताब्यांत गेले.

२ त्या काळचा इंग्रज प्रवासी डा. फ्रिअर ह्मणतो की, हा किल्ला सुरुंग लावून जमीनदोस्त करण्याचा प्रयत्न महाराजानी चालविला असता मोगलफौजेने त्यांस पटाऊन लाविलें

सगळी जमाजम होण्यापूर्वींच महाराजाचा सुरत शहरावर ता ३ आक्टोबर स. १६७० सालीं अचानक हल्ला आला सप्टेंबर महिन्यापासून त्यानी कल्याणाजवळ आपल्या लोकाची जमवाजम केली असून त्याची गुजरातेवर स्वारी होणार हें सुरतच्या इंग्रजव्यापाऱ्याना अगोदरच कळलें होते, आणि त्याचा पहिला हल्ला सुरत शहरावर खात्रीने व्हावयाचा असें वाटून इंग्रज, फ्रेंच, दच वगैरे व्यापाऱ्यांनी सुरत येथील आपल्या वखारींतला सगळा माल दहाबारा मैलावर स्वाली नावाचें बेट आहे त्यात भरून ठेवून त्याच्या सभोवर फळ्याच्या भिंती केल्या, व त्यांवर तोफा चढवून ठेविल्या इंग्रजानी सुरत येथील आपल्या वखारींची नासधूस होऊ नये ह्मणून काहीं लोक त्याच्या रक्षणासाठी ठेवून दिले. शहरातले मोठमोठे व्यापारी व अमलदार सगळे पळून गेले ह्या वेळी औरंगजेबाच्या हुकमावरून सुरत शहरास तटबदी केली होती पण शहरात ह्या प्रसगी अवघे तीनशे मोगल सैन्य होते त्याचा महाराजाच्या सेनेपुढे टिकाव न निघून ते किल्ल्यात पळून गेले, आणि महाराजाचे लोक किल्ल्यात शिरले त्यानी शहरात सगळ्या घरावर चौक्या ठेवून त्यातला माल लुटला इंग्रज, फ्रेंच व दच लोकाच्या वखारीस मात्र त्यानी उपद्रव दिला नाहीं इंग्रज वखारीच्या रखवालीस ठेवलेल्या लोकानीं महाराजाच्या लोकावर तोफाबदुकाचा थोडासा भडीमार केल्यामुळें त्याचे काहीं लोक दगावले तिसरे दिवशी पुन ते इंग्रजाच्या वखारीवर हल्ला करावयास आले तेव्हा इंग्रजाकडून दोन असामीनी नजरनजराणा घेऊन महाराजाच्या शहराबाहेरील तबूत जाऊन त्याशी स्नेहभावाचे बोलणें लाविलें तेव्हा महाराजानी त्याच्या हातात हात घालून त्यास असें आश्वासन दिलें कीं, इंग्रज आमचे दोस्त आहेत, त्याचे आह्मी मुळी नुकसान करणार नाहीं. महाराजानी दच लोकांना पहिल्याच दिवशी असा निरोप पाठविला होता कीं, तुह्मी काहींएक गडबड न करिता आपल्या ठिकाणीं स्वस्थ राहाल तर तुह्मास आह्मी उपद्रव करणार नाहीं ह्या निरोपाप्रमाणे वागण्यास ते कबूल झाल्यामुळे अर्थात् त्याच्या वाटेस महाराजांचे लोक गेले नाहींत फ्रेंच वखारवाल्यानी महाराजाशी प्रथमपासून नम्रतेने वागून व त्यास काहीं खंड देऊन आपला बचाव करून घेतला त्या वेळीं कास्कारचा तारतार जातीच राजा सुरतेस येऊन राहिला होता. त्याला त्याच्या पुत्रानें पदच्युत केल्यावरून तो मक्केची यात्रा करून येऊन येथे औरगजेबबादशहाच्या आश्रयाने राहिल होता. त्याच्या वाड्यावर हल्ला केला असता पुष्कळ द्रव्य सांपडेल असें वाट-

त्यावरून महाराजाच्या मनांत तिकडे जावें असें आलें. त्याच्या वाड्यास जावयाची वाट फ्रेंचलोकाच्या वखारीवरून होती. परंतु त्यांस फ्रेंचानीं तिकडून बिनहरकत जाऊं दिलें ह्या वाड्याच्या लुटीत महाराजास सोनें, रुपें, जवाहीर वगैरे बहुमोल माल पुष्कळच सापडला.

शहर लुटून झाल्यावर स्वाली बेटावर महाराजांचा मोरचा फिरणार व तेथें पळून गेलेले व्यापारी आपल्या स्वाधीन करावे व आपणास खंड द्यावा अशी मागणी ते युरोपियन व्यापाऱ्याकडे करणार अशी दशहत पडल्यावरून त्या व्यापाऱ्यानी आपला तेथला सगळा माल तारवावर चढविला पण तो दिवस उधाणाचा असल्याकारणाने मराठ्यास तेथवर चाल करून जाता आले नाहीं असें ह्मणतात

तिसऱ्या दिवशी बऱ्हाणपुराहून महाराजाला असें वर्तमान कळलें कीं, मोगलाचें मोठे सैन्य सुरतशहराच्या रक्षणास येत आहे त्यावरून त्यांनी आपल्या फौजेचा तळ लगबगीने हलवून सर्व लुटीसह स्वदेशाकडे कूच केलें तेथून निघतेवेळी त्या शहराच्या रहिवाशास त्यांनी असें पत्र लिहून ठेविले कीं, तुम्ही प्रतिवर्षी बारा लाख रुपये खंडणी बिनबोभाट पावती केल्यास तुमच्या शहरास पुन लुटीची भीति उरणार नाहीं ह्या वेळी महाराजांनी ६६ लक्षाची लूट नेली असें ह्मणतात

शिवाजीमहाराजानी सुरतशहर लुटून जाळून टाकिलें अशी वार्ता औरंगाबादेस पोचताच तेथील सुभेदारानें मोहबतखान व दाऊदखान अशा दोन सरदारांस बरोबर आठदहा हजार फौज देऊन सुरतेच्या कुमकेस रवाना केलें महाराज साल्हेरच्या मोठ्या रस्त्यानें माघारीं यावयास निघून चांदोराजवळ कंचनमंचनावरून गेले न गेले तो ह्या मोगल सरदारानी त्याला वणीदिंडोरीजवळ गाठलें. नाशकाजवळील खिंडीतून कोळवणात उतरावें असा महाराजाचा बेत होता. इतक्यात मोगल सरदाराची बरीच फौज त्या घाटापाशी येऊन पोचली. शत्रूनें असा मार्ग अडविला तेव्हा आपली सगळी लूट खिंडींतून सुरक्षित जाते कशी हा विचार महाराजास प्राप्त झाला. मग त्यांनी आपल्या फौजेच्या चारपांच तुकड्या करून एकीला शत्रूच्या तोंडावर राहून ताशेरे झाडावयास सांगितलें; दुसऱ्या दोन तुकड्यांस शत्रूच्या दोन्ही बाजूंवर चालून जावयास हुकूम केला; व एका तुकडीच्या स्वाधीन लुटीचा सगळा ऐवज करून तीस असें सांगितलें कीं, शत्रूवर तीन बाजूंनी हल्ला होऊन त्याचे लोक तिकडे गुंतले असता तिनें

त्याच्या तळावरून झपाट्याने निघून जाऊन पहाड उतरून पलिकडे जावें. त्याप्रमाणें ही तुकडी घेऊन महाराज मोठ्या वेगाने चालले असतां दाऊदखानानें त्याचा पाठलाग केला त्यासरशी महाराज स्वत काहीं लोकानिशी त्याच्यावर उलटून पडले, व त्यास थोपवून धरून आपली लूट सुरक्षितपणें खिडीतून खालीं पाठविली महाराजाच्या लोकाचा असा चोहोंकडून हल्ला झाला तेव्हा मोगल सरदारानीं आपल्या एकदर फौजेस एका तळ्यापाशीं एकवट करून महाराजाच्या सैन्याशी सामना सुरू केला महाराज स्वत त्या वेळी अगात चिलखत चढवून, डोकीस शिरस्त्राण घालून, दोन हातात दोन पट्टे चढवून व घोड्यावर स्वार होऊन लढत होते प्रतापराव सरनोबत वगैरे सरदारास पिछाडीचे रक्षण करावयास सागून ते स्वत शत्रुसैन्यावर चालून गेले. तेव्हा दोन्ही सैन्याचे घोर रणकंदन माजले उभय पक्षाकडचे लोक मोठ्या त्वेषाने लढले आपल्या लोकास उत्तेजन यावे ह्मणून महाराज स्वत आघाडीस राहून शत्रूशी लढत होते त्यामुळे त्यास पराकाष्ठेचा आवेश चढून त्यानी आपल्या शूरत्वाची अगदीं सीमा केली हे तुंबल युद्ध सारखे दोन प्रहर चाललें होते. तीन हजार मोगल रणात पडले, व मोगलसरदार जखमी होऊन रणातून पळून गेले त्याप्रमाणे मोगलाच्या फौजेचा फडशा उडून ती सैरावैरा पळत सुटली तेव्हा तिचा पाठलाग न करिता त्याच्या तळावर सापडले तेवढे सामानसुमान, हत्ती, घोडे वगैरे बुचाडून महाराज खिडीकडे निघाले, तो त्यास रायबागीण नावाच्या एका शूर बाईने आपला मुलगा जगजीवन यासह कांहीं फौजेनिशी अडविले ही रायबागीण माहूरचा देशमुख उदाराम याची बायको होती एका लढाईत हिचा नवरा पडला असता हिने पुढे होऊन आपल्या लोकात धीर देऊन लढाई जिंकिल्यावरून ओरंगजेबाने हिची तारीफ करून हिला रायबागीण असा किताब दिला होता. ती आडवी आली तेव्हा महाराजाच्या फौजेने तिला चोहोंकडून घेरून अगदी जेरीस आणिले. तेव्हा ती दाती तृण धरून महाराजास शरण आली त्यांनी तिचा मोठा आदरमान करून व तिला वस्त्रालंकार देऊन परत पाठविलें

सुरतेहून परत आल्यावर महाराजानी आपलें आरमार व फौज यांची जय्यत तयारी केली, व प्रतापराव गुजराच्या हाताखालीं दहा हजार स्वार व मोरोपंताबरोबर वीस हजार पायदळ देऊन त्यांस मोगलाच्या उत्तरेकडील प्रांतांत स्वाऱ्या करावयास पाठविलें. त्या प्रांतांतील लोक धनत्तर असून तिकडील बंदोबस्त

चागला नव्हता. यास्तव तिकडे स्वारी केल्याने पुष्कळ धनलाभ होईल असा त्याचा अदाज होता, आणि हा अगदीं बरोबर ठरला प्रतापराव गुजरानें खानदेशात स्वारी केली हा प्रात त्या काळी सधन असून त्यात लोकवसतिहि पुष्कळ होती. प्रतापरावाने बऱ्हाणपुरापर्यंत दौड करून त्या शहराजवळचा बहादूरपूरनावाचा गाव लुटला या वेळी तो बऱ्हाणपुरावरहि चालून गेला असता, परंतु तेथे यशवंतसिग होता,[१] त्यानें त्याला त्या शहरावर चाल करूं नको असा निरोप पाठविल्यावरून त्यानें तिकडचा मोरचा फिरविला, आणि इतर मोठमोठी शहरें लुटून त्यावर वार्षिक खड बसविला प्रत्येक गावाच्या प्रमुखाकडून त्याने असे लेखी ठराव करून घेतले कीं, मोगलसरकारास जो वार्षिक वसूल द्यावयाचा त्याचा चवथा हिस्सा शिवाजीमहाराजाला किवा त्याच्या अमलदाराना प्रतिवर्षी द्यावा ही अशी चौथाई ते दरवर्षी देत गेल्यास त्याच्या गावाची लूट होण्याची भीति उरणार नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यास कोणीं उपद्रव दिल्यास त्याचे महाराजांचे लोक रक्षण करितील मराठ्यानी मोगलाच्या मुलखात चोथाई बसविली ती पहिल्याने त्याच वेळी होय. ह्या मुलूखगिरीत प्रतापरावाने कारजे शहर लुटून तेथ तीन दिवस मुक्काम केला. तिकडचे लोक आपल्या घरात द्रव्य पुरून ठेवीत असत हे प्रतापरावाला कळल्यावरून त्याने मोठमोठ्या लोकाचे वाडे पाडून खणती लावून द्रव्य काढिलें व तेथील बड्या लोकास कैद करून आणिलें जे कोणी स्त्रीवेष धारण करून लपून छपून राहिले तेवढे काय ते त्याच्या हातून सुटले. कारण महाराजाची आपल्या लोकास अशी एकसहा ताकीद असे कीं, कोठेहि व केव्हाहि स्त्रीजातीस कसल्याहि प्रकारचा उपद्रव करूं नये[२] ह्या शहरास प्रतापरावाला अगणित लूट

१ बऱ्हाणपूर हे खानदेशाचें मुख्य शहर हे दाऊदखानाच्या ताब्यात होते पण तो ह्या वेळी अहमदनगराजवळ लढाईच्या कामात गुतला होता. त्याचा मुलगा अहमदखान हा त्याचे काम पाहत होता यशवतसिग ह्या वेळी तेथे येऊन शहाजादा मोअज्जिम याच्या खर्चासाठी पाच लाख रुपयाची मागणी करीत होता त्याला अहमदखानाने मागितले की, बादशहाचा हुकूम घेऊन या ह्मणजे तुह्माला पाचांच्या ठिकाणी वीस लाख रुपये देतो. हा असा जबाब मिळाला तेव्हा यशवतसिगाने क्रोधाविष्ट होऊन ते शहर लुटण्याची भीति घातली. ह्या अशा खटपटीत यशवतसिग असल्या कारणाने त्यानें प्रतापरावाला वरल्यासारखा निरोप पाठविला असावा.

२ सभासद ह्मणतो की,ही कारजेशहराची लूट खुद्द महाराजानी केली. जेध्यांच्या शकावलींत असा उल्लेख आहे कीं, वणीदिंडोरीच्या लढाईनतर महाराज कुंजरगडास

मिळाली. ती त्यानें चार हजार बैलांवर व उटांवर लादून नेली. ह्या लुटींत उंची कपडा, सोनेंरुपे व इतर जडजवाहीर मिळून एकंदर एक कोटीचा ऐवज त्यानें ह्या एका शहरातून नेला असें ह्मणतात ह्या असा कहर प्रतापरावानें शत्रूच्या मुलखांत करून मोडला असता मोरोपंतानें आपल्या पायदळानिशीं मोगलाच्या मुलखात शिरून औंध, पट्टा, साल्हेरी,[१] मुल्हेरी, त्रिंबकगड, रामनगर वगैरे ठिकाणें काबीज केलीं व जागोजाग नवे गड बांधिले.

महाराजानी आरमार तयार केलें त्यात एकशे साठ जहाजे होती महाराजांच्या लोकानीं भडोचशहरावर जमिनीवरून हल्ला केला ह्मणजे त्यास पाण्यातून ह्या आरमारानें कुमक करावी असें ठरून तें तिकडे रवाना झालें त्याप्रमाणें तें मुंबई सोडून पलीकडे गेले असता त्यास महाराजानीं मागे बोलाविले त्यावरून तें माघारीं येत असता त्यास वाटेत दमनजवळ फिरगीलोकाचें एक मोटं जहाज सापडलें. ते पकडून त्याने दाभोळच्या खाडीत आणिले ह्याच सुमारास फिरग्यानी महाराजाचीं दहाबारा जहाजे पकडून वसईच्या खाडीत नेलीं होती असें ह्मणतात ह्यावरून असें दिसते कीं, महाराजाच्या आरमाराचें व फिरग्याच्या आरमाराचें दमन व मुंबई याच्या दरम्यान कोठें तरी युद्ध झालें असावे

ही अशी धामधूम मोगलाच्या राज्यात महाराजानी चोहोंकडून चालविली असता मोगलाकडून त्याला ह्मणण्यासारखा काहींच प्रतीकार होऊं नये याचा चमत्कार वाटतो. पण ह्या गोष्टीचें मुख्य कारण असें असावें कीं, मोगलबादशहाच्या दक्षिणेंतील सुभेदारापाशीं ह्या वेळी सैन्यबळ बेताचेंच होतें,आणि त्याच्या मदतीस आणखी फौज पाठविणे अमळ जोखमाचे आहे असें औरंगजेबाच्या वहीमखोर मनानें घेतलें होते माहुलीकिल्ल्यावर पेशव्यानें गर्दी केली तेव्हा जुन्नर येथें आणखी फौज ठेवणें इष्ट वाटून तेथें लोकाची भरती केली होती, व आसपासच्या मुलखास उपयोग व्हावा ह्मणून सुरत येथें पाच हजार लोक जादा ठेविले होते त्याप्रमाणेंच औरंगाबादेसहि काहीं फौज होती, परतु ही सगळी फौज महाराजाच्या फौजेशीं

---

गेले, आणि पुढल्या महिन्यात करज्याकडे गेले, व अहिवत, रावळाजावळा आणि मार्कंडगड जे मोगलानीं काबीज केले होते ते त्यानी परत घेतले सुरत येथील इंग्रज व्यापाऱ्याचाहि असाच उल्लेख आहे

२ हा किल्ला महाराजानी स्वत लढून सर केला असे ह्मणतात. ह्या किल्ल्याला त्यानीं वीस हजार सैन्यानिशीं वेढा घातला होता, व तेथला मोगल सुभेदार लढाईंत पडल्यावर त्या किल्ल्यास सोलाच्या शिड्या लावून ते वर गेले, आणि तो त्यांनीं हस्तगत केला, असें प्रो. सरकार ह्मणतात.

ताब्यून पाहतां कांहींच नव्हती. हें सगळें मोगलसैन्य एकवट होऊन महाराजांशीं लढण्यास आलें असतें तर त्याच्याशीं सामना करण्यास हाहां ह्मणतां चाळीस हजार फौज जमा करण्याचें त्यास अनुकूळ होतें याशिवाय प्रत्येक गडावर व ठाण्यावर पुरेसे लोक रखवालीस टेविले होते ते निराळेच ह्याप्रमाणें सैन्याची कमतरता हे एक कारण असून आणखी चोहोकडे अशी अफवा पसरली होती कीं, सुलतान मोअझीम याचें महाराजाशीं गुप्त कारस्थान असून तो त्यास हरएक बाबतीत अनुकूळ आहे, आणि यशवतसिगाशी तर त्यांचा चांगलाच स्नेह आहे. शहाजाद्याने औरंगजेबाकडे जेव्हातेव्हा आणखी लोक मदतीस पाठवून देण्याविषयीं अर्ज करावा, परतु तो वहीमखोर बादशहा त्याचें मुळींच ऐकत नसे शहाजाद्याचा वास्तविक इरादा असा होता कीं, दक्षिणहिंदुस्थानात आपला पक्ष होईल तितका सबळ करून ठेवावा कारण बादशहा मरण पावल्यावर आपणाला गादी मिळावी असें त्यास वाटणे साहजिक होतें दुसऱ्या कोणीं गादी बळकाविली तर त्यास तुरुंगवास प्राप्त होण्याचा दृढसभव होता शिवाजीमहाराज चोहोकडून धामधूम करून दिवसेंदिवस प्रबळ होत चालले तेव्हा त्यास बादशहाकडून अधिकाधिक फौज मागून घेण्याचे निमित्त सापडलें इकडील हालहवाल बादशहाला तो वेळोवेळा लिहून पाठवी, व हवी तितकी फौज हाताशीं नसल्यामुळे शत्रूचा मोड करण्याचें साधत नाहीं असें कळवी असा तगादा एकसारखा लाविल्याने बादशहा केव्हानाकेव्हा तरी वळून आपली मागणी कबूल करून आणखी फौज आपल्या मदतीस पाठवील, व ही अशी फौज आपल्याकडे जमत चालली ह्मणजे अर्थात् आपला पक्ष प्रबळ होईल असें शहाजाद्याचे धोरण होतें. ह्याच कारणास्तव त्यानें जवळ असलेल्या फौजेनिशी शिवाजीमहाराजांशी सामना करण्याचा विचार मनात आणिला नाहीं त्याच्यासारख्या महाप्रतापी पुरुषाशी साधेल तेवढा सलोखा ठेविल्याने पुढे त्याचे आपणास पुष्कळ साहाय्य होईल असें त्यास वाटे त्याने एकदोन वेळा महाराजावर आपलें सैन्य पाठविलें हे खरें, परंतु तें केवळ बादशहाच्या डोळ्यास पाणी लावण्यापुरते. महाराजाची सरशी होईल अशा बेताची फौज तो त्यांच्यावर पाठवी.

परंतु औरंगजेबाने हें शहाजाद्याचे धोरण मुळींच चालूं दिले नाहीं. त्यानें यशवंतसिंगाला परत बोलावून त्याच्या जागीं मोहबतखानाला चाळीस हजार लोकानिशीं दक्षिणेंत रवाना केलें. या सरदाराला स्वतन्त्र अधिकार दिला व त्याच्यावर शहाजाद्याची कांहींएक हुकमत चालूं नये असें ठरविलें. औरंगा-

बादेस शहाजाद्याकडे अवघे एक हजार लोक राहूं देऊन बाकीची सर्व फौज मोहबतखानाच्या ताब्यात दिली त्याप्रमाणेंच सुरतेच्या सुभेदारावर बादशहाची इतराजी होऊन त्यावर कामाची हेळसांड केल्याचा आरोप त्यानें ठेविला तो सहन न होऊन त्या मानी सुभेदारानें विषप्राशन करून आत्मघात केला तेव्हा त्याच्या जागीं बादशहाने दुसरा सुभेदार नेमून सुरत व खंबायत येथे पुष्कळ लढाऊ जहाजें बाधविण्याचा हुकूम दिला. हे असें आरमार वाढविण्याचा हेतु अर्थात् असा होता कीं, महाराजाच्या आरमाराचा उपद्रव नाहीसा करण्याच्या कामीं जंजिऱ्याच्या शिद्दीला चागलें साहाय्य व्हावे.

मोहबतखानाने दक्षिणेंत येताच महाराजाशी युद्ध आरंभिले औध व पट्टा हे किल्ले त्याने त्याच्या हातचे प्रथम घेतले इतक्यात पावसाळा सुरू झाल्यामुळे त्याला आपली मोहीम बद राखून छावणीस परत जावे लागलें पावसाळा सप-ल्यावर त्याने आपल्या फौजेचे दोन भाग केले एका सैन्यभागावर दिलेरखानास मुख्य करून चाकणच्या किल्ल्यावर हल्ला करावयास त्यानें पाठविलें त्यानें तो तत्काळ काबीज करून आतील नऊ वर्षांहून अधिक वयाच्या सर्व माणसाची कत्तल उडविली ही फत्ते त्यास मिळाल्यावर त्याला रावळाजवळा व अहिवंत हे किल्ले घ्यावयास मोहबतखानानें पाठविलें पहिल्या किल्ल्यावर त्यानें हल्ला केला असता गडकरी यानी मोठ्या शौर्यानें गडाचें रक्षण करून शत्रूचा हल्ला मागे हटविला. इतक्यात मोरोपंतानें त्याच्या कुमकेस बारा हजार लोक पाठविले तेव्हा दिलेरखानानें ते किल्ले घेण्याचा बेत सोडून कणेरगडाकडे[1] कूच केलें व तो गड सर केला तो परत घ्यावा ह्या इरायानें रामाजी पागारे[2] ह्मणून एक शूर सरदार हशमाचा नाईक होता, त्यानें दोन हजार[3] मावळ्यांनिशीं त्यावर छापा घातला हे लोक थोडे आहेत असें पाहून दिलेरखान आपल्या लोकांनिशीं त्याच्यावर चालून आला. शत्रूचे पुष्कळ लोक आहेत हें पाहून तो पागारे गडबडला नाहीं. त्याने आपल्या लोकास ह्मटलें कीं, तुमच्यात जे कोणी निदान करावयास माझ्या बरोबर येण्याला तयार असतील त्यांनी पुढें व्हावें. तें ऐकून सातशे मावळे दंड ठोकून पुढें झाले त्यानीं शत्रुसैन्यावर एकदम

१ चिटणीस कोणारगड असें नांव देतो

२ चिटणीस याचें नांव रूमाजी नलगे असें देतो.

३ किल्लेकांच्या मतें हे लोक एक हजारच होते. ही लढाई साल्हेरच्या युद्धानंतर झाली असें प्रो० सरकार यांचें ह्मणणें आहे.

तुटून पडून मोठया आवेशानें युद्ध चालविलें, दोन हजार पठाण रणात पडले. आणि हे सातशे वीर आपल्या मोहरप्यासह मोठमोठया जखमा लागून धारातीर्थी पतन पावले हे त्याचें अलौकिक शौर्य पाहून दिलेरखान अगदीं चकित झाला. बाकीच्या लोकासहि चेव येऊन ते मोगलाशी काहीं वेळ लढत राहिले, परंतु अखेरीस त्याचा मोड होऊन ते पळत सुटले मोहबतखान व दाऊदखान या दोघानी मिळून अहिवत किल्ल्यास वेढा दिला. आतल्या लोकांनी एक महिनापर्यंत शत्रूस दाद दिली नाहीं. शेवटी दाऊदखानानें सुरुंग लावून किल्ल्यात प्रवेश केला, तेव्हा आतल्या लोकाचा निरुपाय होऊन ते शत्रूच्या स्वाधीन [1]झाले ह्या लढाईचे यश दाऊदखानास मिळाले ह्मणून मोहबतखानास पराकाष्ठेचा राग आला, आणि त्या दोघाचें मुळी जमेना ह्मणून औरगजेबाने दाऊदखानास परत बोलाविले पुढे पावसाळा सुरू झाला तेव्हा मोहबतखानानें पारनीर येथे आपली छावणी केली पाऊस अतिशयित पडूं लागल्यामुळे त्याच्या छावणींतलीं जनावरें व माणसें साथीच्या रोगानें पटापट मरूं लागली पण त्याची काहींएक परवा न करिता मोहबतखानाने ते दिवस ख्यालीखुशालींत व सरदारांच्या घरी मेजवान्या झोडण्यात घालविले. ह्या वेळी मोगलाच्या छावणींत अफगाणिस्थान व पंजाब येथल्या चारशे नृत्यागना होत्या, असें ह्मणतात.

मोहबतखानाने पहित्याने थोडीशी धडपड करून पुढे बरेच महिने काहींएक काम न करिता घालविल्यावरून बादशहाला त्याचाहि वहीम आला शिवाजीमहाराजानी त्याला अवदाने चारून वश करून घेतलें असावे असें त्याला वाटले ह्मणून त्याने बहादूरशहा व दिलेरखान यास गुजराथतून बागलानप्रातात पाठवून शिवाजीमहाराजाचा तेथला अमल उठवावयास सागितलें. त्यानी येऊन साल्हेरीस वेढा दिला, आणि त्या वेढ्याचे काम इखलासखान, राव अमरसिह वगैरे सरदारावर सोपवून ते अहमदनगराकडे गेले. तेथून बहादूरखान सुपेप्रातावर चाल करून गेला आणि दिलेरखान पुण्यावर उतरला त्यानें पुणें शहर काबीज करून तेथल्या नऊ वर्षावरच्या सगळ्या रहिवाशांची कत्तल उडविली ! आपल्या प्रांतावर आलेली ही मोगलांची वावटळ घालवून देण्यासाठीं महाराजांनीं आपल्या किल्ल्यावरील लोक महाड येथे जमवून मोठ्या सैन्यानिशी त्यांच्याशी सामना करण्याचा बेत केला इतक्यात साल्हेरीस वेढा पडल्याचें वर्तमान आलें. हें ठाणें विशेष महत्त्वाचे असल्याकारणानें महाराजानी त्याचें रक्षण

---

१ प्रो. सरकार पृ० २४१

साधेल त्या उपायानें करण्याचा निश्चय केला त्या किल्ल्यांत अन्नसामुग्री अमळ कमी आहे असें कळतांच त्यांनी ती पुरविण्याचें मनांत आणिलें, परंतु शत्रूच्या लोकाचा त्या किल्ल्यास चोहोंकडून गराडा पडल्यामुळें हा बेत साधतो कसा याचा विचार प्राप्त झाला मग त्यानीं आपल्याबरोबर मोठी फौज घेऊन दिलेरखानाशी युद्ध करण्यासाठी ह्मणून त्या दिशेला कूच केले हा त्यांचा बेत खानास कळताच तो आपले लोक एकवट करून त्यांच्याशी सामना करा-वयास अगदी सिद्ध होऊन राहिला परंतु ह्या वेळीं महाराजानी त्याला पुरें फसविले साल्हेरीच्या किल्ल्याभोवतालील त्याचा गराडा कमी होताच त्यांनी उत्तरेकडून त्या किल्ल्यात अन्नसामुग्री व दारूगोळा याचा पुरवठा करून दिला महाराजानी दिलेरखानाच्या फौजेवर बाहेरून छापा घालण्याकरिता दोन हजार लोक पाठविले, परंतु दिलेरखानानें त्याच्यावर हल्ला करून त्यास कापून काढिलें ही अशी आपल्या लोकाची खरावी झालेली ऐकून महाराजानी मोरोपतास कोक-णातून हुगमानिशीं तिकडे रवाना केले, व प्रतापरावास आपल्या स्वारानिशी साल्हेरीच्या रक्षणासाठी तत्काळ निघून जावें असें पत्र पाठविलें ह्याप्रमाणें महाराजाची वीस हजार फौज मोगल सैन्यावर चालून गेली ही फौज जवळ आल्याचें कळताच मोगलसेनापतीनें तिला पुढे येऊ न देण्यासाठी आपले बरेच लोक तिजवर पाठविले ह्या मोगल सैन्यावर इखलासखान ह्या नावाचा सरदार मुख्य नेमिला होता ही मोगलाची फौज आपल्या अगावर चालून येत आहे असें पाहून प्रतापरावानें पुढे कूच करावयाचें बद करून आपली सगळी फौज लढाईस तयार ठेविली मोगलानी त्याच्यावर मोठ्या आवेशानें हल्ला केला तेव्हा त्याच्याशीं काहीं वेळ युद्ध केलेसें करून आपल्या लोकास प्रतापरावान पळण्याचा इशारा केला त्यासरशी ते जिकडेतिकडे पागून धावत सुटले हे पाहून मोगलसैन्यानें जयानदभरात त्याचा पाठलाग आरभिला ह्या पाठलाग करिताना अर्थात् त्याच्या रांगा फुटून ते जिकडेतिकडे पसरले इतक्यात प्रतापरावानें अकस्मात् उलट खाऊन आपल्या लोकास एकवट होण्याचा इशारा केला. त्याबरोबर ते जमून शत्रूवर तुटून पडले ही अशी त्याची झटापट चालली असता मोरोपंत आपल्या लोकानिशीं तेथें प्राप्त झाला, व त्याच्या मदतीनें मोग-लाच्या त्या सैन्याचा पुरा फडशा उडाला इतक्यानें इखलासखानाची रग जिरली नाहीं. त्यानें आपल्या लोकांची जमाजम करून व आणखी पुष्कळ लोक मदतीला मागवून मराठ्यावर पुन निकराचा हल्ला केला. परंतु ह्या वेळींहि

महाराजाच्या शूर लोकानी त्याचा पुरा धुव्वा उडविला पाच हजार मोगल रणात पडले. त्याचे मोठमोठे तीस अमलदार प्राणास मुकले इखलासखान वगैरे कित्येक सरदार जायबंदी होऊन मराठ्याच्या हातीं लागले राव अमरसिंह लढाईत पडला मोगलाच्या छावणीचे एकूणएक सामान मराठ्याच्या हाती लागलें. महाराजाचेहि हजार दीड हजार लोक प्राणास मुकले. त्याचा सुरराव[1] काकडे या नावाचा एक शूर समशेरबहादर सरदार ह्या घनघोर सग्रामात जंबिऱ्याचा गोळा लागून पतन पावला हा काकडे महाराजाच्या अगदी जुन्या मदतगारापैकीं असून पाच हजार मावळ्याचा सरदार होता महाराजानी जावळीवर हल्ला केला त्या वेळी चागला पराक्रम करून हा प्रसिद्धीस आला होता रोहिडा किल्ला त्यानेच छापा घालून घेतला होता महाराजास तो रणात पडल्याचे कळले तेव्हा फार वाईट वाटले, व 'माझा एक जुना, इमानी व शूर सरदार मला सोडून गेला,' असा खेदोद्गार त्यानी काढिला इखलासखानाचा असा पुरा पराभव होऊन पुष्कळ फौज गारद झाली हे पाहून बहादुरखानाचा आवाका सगळा नष्ट झाला त्याला उरलेल्या लोकानिशीं मराठ्याबरोबर लढण्याचे धैर्य न होऊन साल्हेरीचा वेढा उठवून त्याने औरगाबादेकडे एकसारखी धूम ठोकली मराठ्यानी त्याचा पिच्छा शेवटपर्यंत सोडला नाहीं. हे साल्हेरीचे युद्ध स १६७२ त झाले

ह्या युद्धात १२५ हत्ती, ७०० उट, ६००० घोडे, पुष्कळ जडजवाहीर शेकडो बैल व इतर युद्धोपयोगी समान महाराजास मिळालें ह्या प्रसगी आनंदराव, व्यकोजी दत्तो, रुपाजी भोसले, खडोजी जगताप, सताजी जगताप, मानसिग मोरे, विसाजी बल्लाळ, मोरो रगनाथ, मुकुंद बल्लाळ वगैरे सरदारानी बहुत शर्त केली ह्मणून त्यास महाराजानी नावाजून वस्त्रेभूषणें दिली लढाईत पाडाव केलेल्या लोकापैकीं जे मोगलसरदार व वडेबडे अमलदार रायगडावर पाठवून दिले होते त्याचा महाराजानी चागला परामर्ष घेतला, व त्याच्या जखमा बऱ्या झाल्यावर त्याचा बहुमान करून व त्यास नजरनजराणा देऊन सोडून दिलें बंदिवान् केलेल्या लोकापैकीं ज्याची इच्छा आपल्या पदरी राहण्याची दिसली त्यास महाराजानी ठेवून घेतले अशा रीतीने त्याच्या लष्करात पुष्कळच भरती झाली[2]

१ सभासद याचे नाव सूर्यराव असे देतो. शेडगावकराच्या बखरीत सुरेराव असे याचें नाव दिले आहे.

२ युद्धात कैद केलेल्या शत्रूच्या लोकांस त्या काळी अशा रीतीने वागविणाराच्या अगी किती भूतदया असली पाहिजे हें स्पष्टच आहे. अशा महामनस्क पुरुषास क्रूर

मोगलांच्या सैन्याशीं समोरासमोर संग्राम करून ह्या वेळपावेतों महाराजांस जे विजय प्राप्त झाले त्यांमध्ये साल्हेरीजवळील ह्या विजयाची गणना पहिली आहे. असा मोठा विजय त्यास पूर्वी कधींच प्राप्त झाला नव्हता. ह्या घनघोर संग्रामात महाराजांच्या लोकांनी दाखविलेल्या शौर्याची व युद्धकौशल्याची कीर्ति चोहोकडे पसरून त्याचा दरारा पूर्वीपेक्षा पुष्कळ वाढला मराठ्याच्या अर्थीच्या शौर्यवीर्यादि उज्ज्वल गुणाचें हें अप्रतीम प्रदर्शन पाहून मोगलसरदार अगदी थक्क होऊन गेले त्याला महाराजाच्या लोकाची विशेपच दहशत वाटू लागली मराठे शिपाई विजापूरकराची व मोगलाची नोकरी सोडून महाराजापाशी येऊं लागले त्याला त्याच्या योग्यतेप्रमाणे महाराज आपल्या लष्करांत नोकरी देऊन ठेवीत. साल्हेरी घेतल्यावर त्या किल्ल्यासमोरील मुल्हेरी नावाचा किल्ला त्यानी हस्तगत करून सगळ्या बागलान प्रातावर आपला शह बसविला, तेणेकरून सुरत शहरास कायमची दहशत बसली.

ह्या सुमारास बुन्देलखंडाचा राजा छत्रसाल हा महाराजाच्या भेटीस आला हा चंपतराय बुंदेले याचा मुलगा हा जयसिंगाच्या शिफारशीवरून मोगलबादशहाच्या लष्करात राहिला होता. परतु तेथे त्यास त्याच्या कर्तबगारीप्रमाणें बढती मिळेना ह्मणून तो नाराज झाला, आणि एके दिवशी शिकारीस जाण्याच्या मिषानें गोंडप्रातात मोगलाची छावणी होती तेथून निसटून आपल्या पत्नीसह महाराष्ट्रात आला. महाराजानी त्याचा बहुत आदरमान केला तो ह्मणाला कीं, आपल्या पदरीं राहून औरंगजेबाशी युद्ध करावें अशी माझी उत्कट इच्छा आहे, ती आपण पुरी करावी महाराजानी त्याच्या ह्या हिंमतीची व मर्दपणाची तारीफ करून ह्मटलें; "हे प्रतापी राजा, तूं स्वदेशीं जा, आणि तेथून औरंगजेबावर ऊठ आपल्या शत्रूशी लढून त्याजवर विजय संपादन कर आपला देश शत्रूच्या हातून सोडवून त्यावर राज्य कर तू आपल्या देशात राहून शत्रूशी लढण्यास सिद्ध होशील तर तुझ्या कीर्तीप्रमाणें तुला पुष्कळ लोक सहाय होतील जेव्हाजेव्हां मोगल तुजवर चढाई करावयास तयार होतील तेव्हातेव्हा मी

---

ह्मणणारास काय ह्मणावे ते कळत नाही रणात कैद केलेले लोक, शत्रूकडील बायका मुले, निरनिराळ्या धर्माचे धर्मगुरु, मशिदी व देवळे याच्यासबधाने महाराजाचे जे वर्तन असे त्याची अलीकडे युरोपातल्या युद्धाच्या वेळी घडलेल्या घोर कर्माशीं तुलना केली असतां सुधारणेच्या शिखरास जाऊन पोचल्याचा गर्व वाहणाऱ्या ख्रिस्ती जनांस लज्जेने खालीं मान घालावी लागेल

त्यांचे लक्ष दुसरीकडे वेधेलसें करीन व त्यांचे बेत व योजना हाणून पाडीन," असा हुरूप देऊन महाराजानीं त्यास निरोप दिला. त्या काळचा इतिहासकार भीमसेन ह्मणतो कीं, छत्रसाल निराश होऊन रायगडावरून परत गेला कारण उत्तरहिंदुस्थानातील लोकावर भरवसा ठेवून त्यास जबाबदारीचे हुद्दे देणें बरोबर नाहीं असें महाराजाचें मत होतें

मोगलाच्या मोठमोठ्या सरदारानी जय्यत सेना घेऊन महाराजावर ह्या वेळीं स्वारी केली असता त्याचा पुरा मोड करून त्याची दाणादाण केल्यामुळें महाराजाचा वचक चोहोकडे बसला त्याचें प्राबल्य पुष्कळ वाढले, आणि आता मोगलाची किंवा इतर कोणत्याहि यवनी पादशाहतीची त्याना तमा वाटेनाशी झाली. त्या वेळच्या इंग्लिश व्यापाऱ्याचा असा लेख आहे कीं, मोगलाचे दोन मोठे सरदार मोठ्या सैन्यानिशी शिवाजीच्या मुलखात शिरले होते. परतु त्याची मोठी फजिती व नुकसान होऊन त्यास परत जावे लागले प्रो सरकार ह्मणतात कीं, ह्या सुमाराम सतनामी लोकानी व खैबर येथील आफगाणलोकानी बंडे केल्यामुळे मोगलबादशहाला दक्षिणेतली आपली झालेली फजिती दूर करण्याचा प्रयत्न सुरू करण्याम सवड नव्हती थोड्याच दिवसानी मोहबतखान व शहाजादा मोअझीम याम उत्तरेकडे जावे लागले, आणि बहादुरखानाला दक्षिणेचा सुभेदार नेमले, परतु तो जागच्या जागी स्वस्थ राहिला.

ह्यानंतर महाराजानी मोरोपंतास दहा हजार लोक देऊन सुरतेकडे पाठविले. मागे सागितल्याप्रमाणें औरगजेबाने सुरत शहरापाशी आरमार तयार करवून तें शिद्दीच्या साहाय्यास देऊन महाराजाच्या कोकणपट्टीवर समुद्रातून स्वाऱ्या करण्याचा व त्याच्या आरमाराचा नाश करण्याचा बेत केला होता हे मोगलाचें आरमार तयार होऊन शिद्दीच्या आरमाराम मिळून आपल्या प्राताम उपद्रव देण्यास तयार होण्यापूर्वी तें जाळून टाकण्याची कामगिरी त्यानी मोरोपतास सागितली, परतु ही कामगिरी त्याच्या हातून सिद्धीस गेली नाहीं कारण तो तिकडे जाऊन पोचण्यापूर्वीच मोगलाचें आरमार त्या बंदरातून निघून शिद्दीच्या जंजिऱ्यापाशीं जाऊन राहिले. हा बेत फसला तरी त्याने सुरतशहरास वेढा दिला. आत जाणारी अन्नसामुग्री व इतर व्यापार त्यानें अजीबात बंद केला, व तो जबरदस्त खंड मागूं लागला. यानें त्या शहरास वेढा घालण्यापूर्वी तेथल्या सुभेदारास तीन पत्रे महाराजाच्या नावानें पाठविलीं; त्यातल्या शेवटल्या पत्राचा आशय येणेंप्रमाणें होता 'तुझ्या ताब्यातल्या प्रांताचा जो वसूल तूं बादशहास प्रतिवर्षी देत असतोस त्याचा

चौथा हिस्सा तूं आमच्याकडे पावता केला पाहिजे ह्यासंबंधाचीं दोन पत्रें आह्मीं तुला लिहिलीं अता हें पत्र शेवटलें आहे माझा मुलूख व माझे लोक याच्या रक्षणासाठी आह्माला मोठे सैन्य ठेवणे तुझ्या बादशहामुळें भाग पडत आहे तरी ह्या सैन्याचा खर्च त्याच्याच प्रजेकडून मिळाला पाहिजे. ही रकम त्वरित पाठवून देणार नाहींस तर आमच्यासाठीं तेथे एक घर तयार ठेव. आह्मी तेथे बसून सरकारदेणें व जकात स्वत वसूल करूं आम्हास तुझ्या शहरात वाटेल तेव्हा यावयास हरकत करणारा कोणीहि उरला नाहीं ' हीं पत्रे आल्यावर सुरतच्या सुभेदाराने तेथल्या मोठमोठ्या मुसलमान व हिंदु व्यापाऱ्यास जमवून त्याच्याशी असें बोलणें केले कीं, शहराचें रक्षण करण्यासाठीं दोन महिनेपर्यंत तीन हजार पायदळ व पाचशे घोडेस्वार ठेवावे लागतील, तरी त्याच्या खर्चासाठीं रु ४'५००० आपसात वर्गणी करून आम्हास द्यावे मग त्याने शहरातल्या घराची यादी करून त्याच्याकडून सदरील निमित्ताने बराच पैसा गोळा केला पण त्यानें त्या पैशाचा वचनाप्रमाणें उपयोग न करिता तो आपल्या खासगी तिजोरींत जमा केला. सदरी नमूद केलेले मोरोपंताचे तिसरे जरबेचे पत्र आलें तेव्हा व्यापारी वगैरे लोक घाबरून जाऊन शहर सोडून पळून जाण्याची परवानगी त्या सुभेदाराकडे मागू लागले पण तो त्यास ती देईना त्याने खंडाची रकम जमविण्यासाठी व्यापाऱ्याकडे एक लाख रुपयाची व जमीनदार देसायाकडे साठ हजार रुपयाची मागणी केली, परतु त्याला त्याचा विश्वास न येऊन त्यानी त्याच्या मागणीप्रमाणें रकमा देण्याचे नाकारिले तरी त्याने श्रीमत रहिवाशाकडून पुष्कळ पैका गोळा केला, व त्यातील काहीं खड म्हणून मोरोपतास देऊन सतुष्ट केलें, व बाकीचा आपल्या खासगी तिजोरीत ठेवून दिला.

इकडे महाराजानी असा विचार केला कीं, सुरतेजवळचा साधेल तेवढा प्रात काबीज करून त्या शहरास पक्का शह बसवावा या उद्देशाने त्यांनी आपल्या फौजेनिशी जव्हार ( घोडबदर ) व रामनगर ह्या प्रातात दोन छोटे कोळी राजे राज्य करीत होते त्याच्या राज्यात स्वारी केली महाराज दोन वेळा सुरतेवर हल्ला करावयास गेले तेव्हा त्यास ह्या राजानी, आपल्या डोंगरी मुलखातून जाऊ दिले होते मोगल अमलदारास आपण सुरतेवर चाल करून जात आह्मो याचा सुगावा लागून त्याच्याकडून आपणास हरकत होऊं नये ह्या

१ ही कामगिरी मोरो त्रिबक पिंगळे यास सांगितली होती, आणि ती त्यानें सुरतेवर मोहीम करताना बजावली असें प्रो. सरकार ह्मणतात पृ० २४४.

उद्देशानें महाराजानीं ही त्याच्या राज्यातून आडवाट काढली होती त्याप्रमाणें त्या राजांनीं आपणास बिनहरकत जाऊं दिल्याबद्दल महाराजानीं त्यास पुष्कळ द्रव्य देऊन त्याच्याशी स्नेह केला होता ह्या वेळीं तरी त्याच्या राज्यात त्यानी मित्रभावानेंच प्रवेश केला, जव्हारचा राजा विक्रमशहा[1] यास अंकित करून जव्हार हस्तगत केले आणि त्याच्या तिजोरींतले सत्रा लाख रुपये जप्त केले तेथून ते रामनगरावर[2] चालून गेले. तेथल्या राजाने त्यास आपल्या किल्ल्यात घेताच ते म्हणाले की, ' हा किल्ला आमच्या हाती असणे इष्ट आहे. आमच्या खजिन्याची म्हणजे अर्थात् सुरतेची किल्ली तुमच्या हाता असणे सोईचें नाहीं हे त्याचे म्हणणे त्या राजाला मान्य करणे भाग पडलें ह्या राजाच्या ताब्यात थोडेसे डोगरी किल्ले काय ते होते, व ममोननालचा मुलूख फिरंग्याच्या ताब्यात होता. आपल्या प्रातात ह्या राजानें लुटालूट करू नये म्हणून फिरंगी त्यास प्रतिवर्षी काहीं खडणी देत असत त्याचे सगळे किल्ले कबजात घेतल्यावर महाराजानी फिरंग्याच्या दमन येथील किल्ल्यावर काही लोक रवाना केले ते आपल्यावर चालून येत आहेत हें पाहून फिरंग्याचीं पाचावर धारण बसली किल्ल्यास तटबदी केली होती पण त्यावर तोफा वगैरे ठेवण्याची व्यवस्था चागलीशी केली नव्हती त्यांनी काही तोफा किल्ल्याच्या बुरजावर चढवून जेमतेम तयारी करून आपला एक अमलदार महाराजाचे लोक चाल करून येत होते त्याच्याकडे पाठवून ते का येत आहेत ते विचारिलें. त्यानीं महाराजाच्या मागण्यावरून असा जबाब दिला की, तुम्ही रामनगरच्या राजास खंडणी देत असा ती यापुढे कायम करण्यासाठी आम्ही आलो आहों हे अरिष्ट एवढ्यानेच टळत आहे हे पाहून त्यानी वार्षिक खडणी नेमाने देण्याचा करार मोठ्या आनदाने केला

---

१ हा विक्रमशहा राज्यभ्रष्ट झाला तेव्हा तो मोगलाच्या अमलातील नाशिक प्रातात पळून गेला. तिकडे राहून तो आपल्या लोकानिशी महाराजाच्या ठाणे प्रांतातील उत्तर भागीं वेळोवेळा लुटालूट करीत असे पुढे मोरोपतानें म. १६७८ त नाशिक प्रातावर स्वारी केली तेव्हा तेथल्या फौजदाराच्या सैन्यास मिळून तो मराठ्यांशी मोठ्या आवेशानें लढला. परतु शेवटीं तो पराभव पावून रणांत पडला. (प्रो. सरकार. पृ. १४८.)

२ हें संस्थान आतां धरमपूर या नांवाने नादत आहे, आणि रामनगर आतां नगर या नावानें प्रसिद्ध असून तें धरमपुरापासून २४ मैलांवर आहे.

औरंगाबादेस पुन अधिकारातर झाल्याचें वर सांगितलेंच आहे मोहबत-खानाचा पूर्वोक्त प्रकारें पराभव होऊन पुष्कळ सेनेची खराबी झाली हें औरंगजेबास कळले तेव्हा त्याचा त्यास फार राग येऊन त्यानें त्याला व शहाजाद्याला परत बोलाविले आणि गुजराथेचा सुभेदार बहादूरखान यास दक्षिणचा सुभेदार नेमिलें, व त्याच्या ताब्यात सत्तर हजार फौज देऊन त्याला मराठ्याशी युद्ध करावयास सांगितलें परंतु त्याचीहि कशी फजिती झाली ते वर सांगितलच आहे तो दक्षिणेतील सुभ्यावर आला तेव्हा तिकडील सगळी स्थिति त्याच्या लक्ष्यात येऊन त्यानें असा विचार केला की, आपल्याजवळ असलेली फौज मराठ्याशी टक्कर देण्यास पुरेशी नाहीं, यास्तव त्याच्याशी युद्ध करण्याच्या भानगडीत न पडता आपल्या मुलखात त्याच्या वारंवार स्वाऱ्या होऊन रयतेस उपद्रव होतो तो नाहीसा करण्यास तूर्त झटावे

वर सांगितल्याप्रमाणे कोळी राजाचीं संस्थानें काबीज केल्यामुळे मोरोपंत पिंगळ्यास मोगलाच्या नाशिक प्रांतात सहज शिरता आलें त्यानें स १६७२ च्या जुलै महिन्यात निकडचा घाट ओलांडून त्या प्रांतात स्वारी केली नाशिक निबकच ठाणे लष्करी जाधवाच्या पणतूच्या स्वाधीन होते त्याच्याजवळ चार हजार लोक होते परंतु त्याचें काहींएक चाललें नाहीं मोरोपंतानें त्याचा पराभव करून निकडचा प्रांत हस्तगत केला त्याप्रमाणेच वणीदिंडोरीच्या ठाण्यावर शिद्दी हिलाल होता त्याचाहि त्यानें पराभव करून त्या प्रांतावर आपला ताबा बसविला ह्याप्रमाणे हे सरदार नामोहरम झाल्यामुळे औरंगजेबाचा त्याजवर मोठा रोष झाला तेव्हा हे दोघे सरदार व तसेच आणखी दोघे मोगल सरदार बादशहाची नोकरी सोडून आपल्या मोठ्या घोडदळा-निशी महाराजास येऊन मिळाले ह्यामुळे दिलेरखानाचे धाबे दणाणलें आता गुजराथेचे रक्षण कसे होते याची त्याला मोठी फिकीर पडली इकडे महाराजाची मोठी फौज रामनगरापाशी पुन येऊन थडकली तेव्हा सुरतकराची पुनरपि पाचावर धारण बसली परंतु ह्या फौजेने तेथून मोर्चा फिरवून वऱ्हाडाकडे दौड केली, आणि तो प्रांत व तेलगण लुटण्याचा सपाटा चालविला तेव्हा बहादूरखानानें तिचा पाठलाग चालविला, पण त्याला झुकांडी देऊन ती तेथून निसटली ती भागानगराकडे गेली परत येताना ती दोन भाग करून दोन दिशानी दौड करीत सुटली त्यातल्या एका भागाच्या मागे बहादूरखान लागला व दुसऱ्याच्या मागे दिलेरखान लागला, परंतु त्यांला त्यानीं दाद

दिली नाहीं. एके ठिकाणीं महाराजाच्या साडेसातशें घोडदळानें मोगलाच्या दहा हजार लोकावर हल्ला केला,आणि त्याची अगदीं धादल उडवून दिली परतु मोगलास आणखी कुमक येऊन पोचल्यामुळे मराठ्याना शेवटी हार खावी लागली त्याचे चारशे लोक रणात पडले

मग ज्या घाटातून मराठे लोक स्वाऱ्या करण्यासाठी येनात त्या घाटावर आपले लोक ठेवून देऊन त्यास प्रतिबध करावा व पहाडातील खिंडीतून तोफा रचून ठेवाव्या असा बहादूरखानाचे बेत केला हा बेत दिलेरखानास पसत वाटला नाहीं चाकणचा किल्ला वेढा घालून घेतल्यामुळे त्याचे पारडे अमळ जड झाले होते तो मोठा हुशार सरदार आहे असा औरगजेबाचा अभिप्राय झाला होता ह्या सरदाराची रग अद्यापि चागलीशी जिरली नव्हती मराठ्याशी युद्ध करण्याची धमक त्याच्या अगो अद्यापि कायम होती त्याने खान-जहानास असा सल्ला दिला की, अशा रीतीने पहाडातून फौज अडकवून ठेवण्यात काहीं हाशील नाहीं, जवळ असलेल्या फौजेनिशी शिवाजीमहाराजाच्या ताब्यातील किल्ल्यावर हल्ले करून ते घेण्याचा उद्योग नेटाने चालवावा परंतु हा सल्ला त्या सरदारास पसत न होऊन त्याने आपला पूर्वोक्त बेतच अमलात आणिला ह्या व्यवस्थेचा परिणाम असा झाला कीं, महाराजाचे लोक खानदेशात स्वाऱ्या करण्याचे सोडून निरनिराळ्या टोळ्या करून अहमदनगर व औरगाबाद ह्या शहराच्या आसपास घिरट्या घालू लागले ह्या नव्या सुभेदाराने त्याचा जिर-इनतिकडून पाठलाग करून मोड करण्याचा प्रयत्न केला पण त्यात त्यास मुळीच यश येईना शेवटी पावसाळा सुरू होऊन त्याला भीमातीरी पेडगावास छावणी करून राहावे लागले येथे असता त्याने आपल्या रक्षणासाठी एक भुईकोट उभारून त्यास बहादूरगड असे नाव दिले हे ठिकाण मराठ्यावर चोहोकडून हल्ला करण्यास सोईचे असल्याकारणाने बहादूरशहाने आपली छावणी येथे बरीच वर्षे केली होती

ह्या वेळी शिवनेरी किल्ला मोगलाच्या ताब्यात गेला असून त्यावर त्याचे बरेच लोक होते हा किल्ला आपल्या हाती यावा अशी महाराजास उत्कट इच्छा झाली; कारण एक तर हे ठिकाण मोगलाच्या ताब्यातल्या प्राताच्या सरहद्दीवर असल्या-मुळे त्याच्या योगाने त्या प्राताचे चागले रक्षण होत असून उत्तर कोकणातून मोगलाच्या प्रातात शिरण्यास यामुळे मोठीच अडचण असे, दुसरे असें कीं, हा किल्ला महाराजाचे जन्मस्थान असल्याकारणाने तो शत्रूच्या हातीं असणें इष्ट

नाहीं असें त्यास वाटे. ह्मणून त्यानी हा किल्ला हस्तगत करण्याचा विचार केला. हा अबदुल अझिजखान ह्या नावाच्या एका सरदाराच्या हाती होता हा पूर्वी ब्राह्मण असून यानें मुसलमानी धर्माचा स्वीकार केला होता हा औरंगजेबाचा मोठा विश्वासू सरदार होता याला महाराजानी पुष्कळ द्रव्य देऊ करून किल्ला आपल्या ताब्यात देण्याविषयी निरोप पाठविला त्या सरदाराने त्याना देऊं केलेले द्रव्य हाताखालीं घालून किल्ला स्वाधीन करून देण्याचे वचन दिले, आणि महाराजानी सात हजार घोडेस्वार अमुक दिवशी किल्ला ताब्यात घ्यावयास पाठवावे असें सागून पाठविले. त्याप्रमाणे त्यानी आपले घोडदळ तिकडे पाठविलें. परंतु त्या सरदाराने दगा केला त्याने बहादूरशहाला आपला दग्याचा बेत कळवून पुष्कळ मोगल सैन्य किल्ल्यापाशी आणविले, आणि महाराजाचे लोक किल्ल्यापाशीं आले तेव्हा त्याच्यावर एकदम हल्ला केला. ह्या झटापटींत महाराजाच्या लोकाचा मोड होऊन त्यास मागे पाय घ्यावा लागला

त्याप्रमाणे हा मोगलसरदार निरुपाय होऊन जागच्या जागी बसून राहिला असता महाराजानी एक दूरची मोहीम केली गोवळकोंड्याच्या कुतुबशहाच्या राज्यात फ्रेंच लोकानी काहीं गडबड केल्यावरून तो शहा तिकडे मोठ्या सैन्यानिशीं जाण्याच्या विचारात आहे असे त्याच्या दरबारात महाराजाचा वकील होता त्याने त्यास कळविल्यावरून ते रायगडावरून दहा हजार लोक घेऊन तिकडे मोहीम करण्यास निघाले आपल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे त्यानी आपण कोठे चाललो आहो हे कोणासहि कळू दिले नाहीं ते औरंगाबादेवर कीं अहमदनगरावर कीं विजापुरावर निघाले आहेत हे त्याच्या पहिल्या रोखावरून कोणास काहींच कळेना पण ते मोठमोठ्या मजला करून एकदम कुतुबशहाच्या मुलखात शिरले व हैदराबाद शहरापाशी अकस्मात जाऊन थडकले हा एकाएकीं आलेला घाला पाहून शहरातले लोक गडबडून गेले. महाराजानी शहरच्या पुढाऱ्यास व अमलदारास असा धाक घातला कीं, वीस लाख होन खड बिनतकार पावता करा, नाहींतर तुमचे शहर जाळून उध्वस्त करितो त्यास ती अट मान्य होऊन त्यानी तेवढा ऐवज जमा करून त्याच्याकडे नेला व त्याच्या कचाटींतून तें शहर सोडविलें महाराज एवढ्या रकमेने तृप्त होऊन त्या किंवा दुसऱ्या

---

१ फ्रेंचांच्या गव्हर्नराने सेंट थॉमी नावाच्या ठाण्यातील कुतुबशहाच्या लोकांस हांकून देऊन तें हस्तगत केल्यावरून ह्या शहानें तें परत घेण्यासाठी तिकडे आपले सैन्य पाठविलें होतें.

कोणत्याहि शहरास बिलकुल उपद्रव न करितां परत मोठ्या वेगानें रायगडास येऊन दाखल झाले.

ह्या मोहिमेवर महाराज गेले असता मागे मोगलाच्या सुरत येथील आरमारानें व शिद्दीच्या आरमारानें एकवट होऊन कोंकणपट्टींतील समुद्रकिनाऱ्याच्या गांवांवर स्वाऱ्या करून त्याची फारच नासाडी केली दंडाराजपुरीस महाराजानीं जे कोट उभारले होते, त्यावर छापा घालून त्याचा त्यानी नाश केला राघो बल्लाळाच्या ताब्यात हे कोट होते तो मोगलाशी मोठ्या निकराने लढला परतु शेवटीं त्याचा पराभव होऊन तो रणात पडला दंडाराजपुरीवर शिद्दीनी हा हल्ला होळीच्या सणात केला कोटावरील रखवालदार झोपी गेले असता रात्रीच्या वेळीं हा त्याचा हल्ला अकस्मात आला शिद्दी खैरात जमिनीवरून चाल करून येत आहे असें पाहून मराठे त्याच्याशी सामना करावयास तिकडे गेले असता, याकूतखानानें समुद्राच्या बाजूने चाळीस तारवानिशी हल्ला करून तट सर केला, आणि त्याच्या लोकानी आत शिरून कत्तल चालविली या धामधुमीत तेथल्या दारूच्या कोठारास आग लागून त्याचा भडका उडाला त्यामुळे पुष्कळ लोक प्राणास मुकले. असें सागतात कीं, महाराज त्या वेळी चाळीस मलावर होते, त्याच्या कानी ह्या भडक्याचा आवाज जाऊन ते धडबडून जागे झाले आणि ह्मणाले कीं, दंडाराजपुरीस काहींतरी घात झाला असावा हा काय प्रकार आहे त्याची चोकशी करण्याकरिता त्यानी तिकडे माणसेहि पाठविली असें ह्मणतात दंडाराजपुरीच्या लगत्यास महाराजाचे सात किल्ले होते, त्यावर याकूतखानाने हल्ला केला त्यातले लोक दोनतीन दिवस लढले, परतु शेवटी त्याचा नाइलाज होऊन त्यातले सहा किल्ले याकूतखानानें सर केले एका किल्ल्यावरच्या लोकानीं मात्र सात आठ दिवस टिकाव धरिला एवढ्या अवधीत महाराजाकडून कुमक येईल अशी त्याना आशा होती, पण ती व्यर्थ आहे असें पाहून शेवटीं त्याला तो किल्ला शत्रूच्या स्वाधीन करावा लागला याकूतखानानें आंतल्या लोकांस अभय दिल्यावरून ते किल्ल्याबाहेर आले. हीं एकंदर सातशें माणसें होतीं. परंतु किल्ला हातीं आल्याबरोबर याकूतखानानें दगा करून त्यांतल्या देखण्या बायका व मुलें होतीं त्यास पकडून गुलाम केलें व त्यांस मुसलमानी धर्माची दीक्षा दिली ज्या म्हाताऱ्या व कुरूप बायका होत्या त्यांस त्यानें सोडून दिलें आणि सगळ्या पुरुषांची कत्तल केली. या आपल्या अत्यंत अधमपणाची व क्रूर कर्माची हकीगत त्यानें मोगल सेनापतींला लिहून कळविली. त्यांनीं त्याच्या

ह्या दुष्कर्माची तारीफ करून त्याची मनसब वाढविली, आणि त्याला शिरपाव नजर केला. पुढे महाराजानी गोवळकोंड्याहून परत आल्यावर याचा चागलाच वचपा घेतला

शिद्दीने केलेल्या भयंकर क्रूरकर्माबद्दल त्यास चागले शासन करण्याचा महाराजानी दृढ सकल्प करून त्याच्या प्रातात सारखा धुमाकूळ माडिला दंडा-राजपुरी काबीज करण्यासाठी त्यानी मुबईच्या इंग्रजाकडे मदत मागितली परंतु सुरतेच्या काउन्सिलाने व अध्यक्षाने मुबईच्या व्यापाऱ्यास अशी सल्ला दिली कीं, "शिवाजीला साहाय्य केले असता आपल्यावर मोगलाची इतराजी होऊन आपला ह्या देशातून उठावा होईल शिवाजी दारूगोळा वगैरे मागत आहे, त्यास तो देऊं नये, व देत नाहीं असेंहि स्पष्ट सागून त्याचाहि आपणावर रोष होऊं देऊ नये असे त्यास झुलवीत राहावे दंडाराजपुरी शिवाजीच्या हाती गेली तर त्यात आपलें नुकसान आहे कारण त्यामुळे मुबईबंदराला त्याच्याकडून नेहमीचा उपद्रव होण्याचा सभव आहे " ह्या सल्लाप्रमाणे वागून मुबईच्या इंग्रज व्यापाऱ्यानी तटस्थ वृत्ति धरिली तरी पुढे औरगजेबाने ३६ तारवाचें आरमार महाराजांच्या कोकणकिनाऱ्यावरील शहरावर हल्ला करावयासाठी पाठविलें ह्या आरमाराने महाराजाच्या बऱ्याच लहानसान व्यापारी जहाजाचा नाश केला ह्या आरमाराच्या भीताने महाराजानी आपलीं सहा जहाजे मुबईच्या बदरात ठेविली होती त्याचा सुगावा मोगल आरमारास लागला तेव्हा ती काबीज करण्याचा त्याने बेत केला परंतु इंग्रज व्यापाऱ्यानी त्याजकडे असा बहाणा केला कीं, शिवाजीनें स १६६० त राजापुर येथील आपली वखार लुटली होती, तिचा बदला घेण्यासाठीं हीं त्याची तारवे आपण काबीज केली आहेत हे त्याचें ह्मणणे खरें वाटून मोगल आरमार त्या तारवाच्या वाटेस गेलें नाहीं मुंबईच्या इंग्रजानी शिवाजीमहाराजास राजी ठेवून मोगलाचा आपणावर कोप होऊ न देण्याविषयीं ही अशी हिकमत लढविली फ्रेंच व्यापारीहि महाराजास राजी ठेवण्याविषयी झटत असत फ्रेंच लोक मोगलाना कळूं न देता महाराजास दारूगोळा व बंदुकातोफा पुरवीत असत महाराजाच्या आरमाराच्या व मोगलाचा आश्रय धरिलेल्या शिद्दीच्या आरमाराच्या लढाया वर सागितल्याप्रमाणे चालल्या असतां एका फ्रेंच जहाजानें राजापुरास ओरवा करून महाराजाच्या आरमाराला ८० लहान तोफा व २००० मण गोळे गुप्तपणें विकले असें ह्मणतात मोगलांच्या

१ ही हकीकत खाफीखानाच्या बखरीच्या आधारानें दिली आहे.

व शिद्दीच्या आरमारावरील सरदारानीं ह्या वेळी मुंबईच्या बंदरात शिरून महाराजाच्या ताब्यातला कुर्ला प्रात उद्ध्वस्त करण्याचा घाट घातला, व त्या बेटातील इंग्रज गवर्नर आगिअर याजपाशीं बंदरात प्रवेश करण्याविषयी परवानगी मागितली ती त्याने दिली नाहीं पुढे वर सागितल्याप्रमाणे किनाऱ्यावरील काहीं गावाची खराबी करून शिद्दी मागे परतला व इंग्रजाची परवानगी न घेता मुंबईच्या बंदरात शिरला तेथे गेल्यावर त्याने त्याच्याशी असे बोलणे लाविलें कीं, 'तुह्मी आह्मी मिलाफी होऊन शिवाजीमहाराजावर शस्त्र धरूं ' हा प्रकार तेथे महाराजाचा वकील होता त्यास कळला तेव्हा त्याने इंग्रजास अशी दहशत घातली कीं, 'तुह्मी शिद्दीस मिलाफी व्हाल तर आमचा धनी तुमच्यावर खास स्वारी करील ' तेव्हा अर्थात् हे प्रचड अरिष्ट टाळण्यासाठी आगिअर याने ह्या प्रसगी तिऱ्हाइतपणा स्वीकारून राहणें विशेष सोईचे व हिताचे आहे असे मनात आणून शिद्दीच्या बोलण्यास रुकार दिला नाहीं. तरी शिद्दीने मुंबईच्या बंदरातून काहीं तारवे पेण व नागोटना येथील खाड्यात पाठवून त्या बाजूच्या महाराजाच्या अमलातील गावाची नासधूस चालविली आणि तेथले लोक पकडून नेण्याचा क्रम चालविला, तेव्हा महाराजाच्या लोकानी रायगडावरून उतरून शिद्दीच्या लोकावर हल्ला केला व त्याची कत्तल उडविली त्याच्या कित्येक अमलदाराची डोकीं कापून महाराजाकडे नेली असे ह्मणतात[१]

ह्या सुमारास दच लोकाचे इंग्रजाशी वैर वाढून ते एकमेकाशी युद्धे करूं लागले दच लोकाचा एक सेनापति बावीस तारवाचे आरमार घेऊन मलबार किनाऱ्याजवळून उत्तरेस आला त्याच्या मनात मुंबईबेटावर हल्ला करून ते हस्तगत करावे असें होते त्याच्या कानी महाराजाची कीर्ति अगोदरच गेली होती त्यास त्यानें असा निरोप पाठविला कीं, तुह्मी आह्मास तीन हजार लोकाची कुमक जमिनीवरून करून मुंबईबेट घेण्यास मदत कराल तर दंडाराजपुरी व जंजिरा घेण्यास तुह्माला आह्मी आमच्या आरमाराची मदत देऊ ' ह्या निरोपास महाराजांकडून काय जबाब मिळतो याची तो सरदार वाट पाहत राहिला परंतु महाराज ह्या वेळीं दुसऱ्याच एका महत्त्वाच्या बेतात गुतले असल्यामुळे व ह्या दच सेनापतीवर भरंवसा ठेवून इंग्रजाशी विरोध करणे बरोबर नाहीं असें त्यांना वाटल्यामुळे त्यांनीं त्याचें ह्मणणे मनास आणिलें नाहीं. त्याच्याकडून मदत मिळत नाही असें पाहून तो दच सरदार हताश होऊन माघारीं गेला.

---

१ प्रो. सरकार, पृष्ठ २४९.

# भाग बात्तिसावा



## विजापुरकरांशीं पुनः युद्धप्रसंग.

### १६७३–७४.

मागें सांगितलें आहे कीं, अदिलशहाचा मुख्य वजीर अबदुल महमद यानें महाराजाशीं गुप्त तह करून दरसाल तीन लक्ष रुपये खंडणी त्यास देण्याचें कबूल केलें होतें. त्याप्रमाणें महाराजास प्रतिवर्षी खंडणीचा ऐवज पावता होता असे. त्यामुळें त्यांनीं विजापुरकरांच्या ताब्यांतील मुलखांत अलीकडे गडबड करण्याचें सोडून दिलें होतें. परंतु स. १६७३ त अदिलशहा मरण पावला,[1] व त्याचा एक पांच वर्षांचा मुलगा गादीवर बसून त्याचा मुख्य कारभारी खवासखान हा झाला. त्यामुळें अबदुल महमदाच्या हातचा कारभार जाऊन महाराजाशीं केलेला तह विघडला. खवासखान अधिकारारूढ होताच कोणालाहि मोजीनासा झाला. इतर सरदार त्याची स्पर्धा करूं लागले. ते आपआपला पक्ष सबळ करून परस्परांशीं कलह करूं लागले. हें त्यांचें आपआपसांतलें वैमनस्य महाराजास त्यांच्या ब्राह्मण कारभाऱ्याकडून इत्थंभूत कळत असे. तेव्हां त्यांनीं पाहिलें कीं, विजापुरकरांच्या राज्यांत पुनः गडबड करण्यास हा समय उत्कृष्ट आहे. मग त्यांनीं विशाळगडावर मोठी फौज जमा करून अदिलशाही मुलखांत पुनः मोहीम करण्याची तयारी केली. इकडे त्या सरकारचा मुख्य सेनापति अबदुल करीम बहिलोलखान हा मोंगलांशीं सख्य करून महाराजाशीं युद्ध करण्यास सिद्ध झाला.

जमा केलेल्या फौजेपैकीं पंधरा हजार लोक पन्हाळा परत घ्यावयास महाराजांनीं पाठविले. त्यांनीं त्या किल्ल्यास वेढा घातला असतां हा अबदुल करीम मोठ्या सैन्यानिशीं त्यांच्यावर चालून आला. उभय पक्षाचें घनघोर युद्ध झालें. त्यांत खानास पहिल्यानें जय आला. तेव्हां तो आपल्या थकलेल्या सेनेस विश्रांति मिळावी ह्मणून तिकोट्यास कांहीं वेळ तळ देऊन राहिला. इतक्यांत महाराजां-

---

१ प्रो. सरकार याच्या मृत्यूची तारीख स. १६७२ नवेंबर २४ अशी देतात.

त्च्या फौजेस वेळींच कुमक येऊन पावताच त्यांनी पुन शत्रूवर मोठ्या आवेशानें चाल करून त्याचा पुरा मोड केला[1] ह्याप्रमाणें पन्हाळा किल्ला हस्तगत झाल्यावर महाराजांनीं सातारा किल्ला त्यावरील रखवालदारास लाचानें वश करून घेऊन हाताखालीं घातला ( सपटेंबर स १६७३ )

महाराजास प्राप्त झालेल्या ह्या विजयाची वार्ता इंग्रज व्यापाऱ्यास कळली तेव्हा त्याचा अ[illegible] आगिअर याने ता. १६ सप्टेंबर १६७३ त असें लिहून ठेविलें आहे कीं, "शिवाजी आता आपल्या सगळ्या शत्रूशी टक्कर देण्यास समर्थ झाला आहे आता तो त्यास मुळीं जुमानीत नाहीं मोगलाचे सैन्य त्याच्या मुलखात उतरण्याचा संभव आहे, आणि दुसरीकडून विजापूरकराचा सरदार बहिलोलखान त्याच्यावर चालून येईल असेंहि वाटते परंतु त्यास दाणावैरण मिळण्याची पंचाईत पडून त्याला फार दिवस नेट धरून त्याच्याशी लढता यावयाचें नाहीं विजापूरच्या सरदाराचा असा काहीं कावा दिसतो की, शिवाजीशी नेटानें युद्ध करून त्याचा सफाई नाश करण्यास ते तयार नाहींत" महाराज दक्षिणेकडे वळले तेव्हा त्याच्या पाठीवर जाण्याचें सोडून बहिलोलखानानें कोल्हापुरास तळ दिला. तो अशा निमित्तानें कीं, ते कानडा प्रातातून परत येऊ लागले कीं त्यास अटकाव करावा[2] हा विजय प्राप्त झाल्यावर महाराजानी पुढें कूच करून विजापूरकराचे कित्येक गाव व शहरें लुटीत जाऊन हुबळीशहरावर हल्ला केला हे शहर त्या काळीं मोठें धनाढ्य असून येथे मोठा व्यापार चाले नाना देशीचे सावकार ह्या शहरी व्यापारासाठीं येऊन राहिले होते ह्या शहराची लूट त्यानी बिनहरकत यथेच्छ केली. ह्या लुटींत जेवढें द्रव्य त्याना मिळालें तेवढें दुसऱ्या कोणत्याहि शहराच्या लुटीत मिळाले नव्हतें असें ह्मणतात ह्या शहरात इंग्रज व्यापारी होते त्यालाहि महाराजानी लुटलें त्यामुळे त्याचे सातआठ हजार होनाचें नुकसान

---

१ मोडककृत इतिहासात ह्या लढाईसंबधानें असा उल्लेख आहे की, महाराजांनीं आपले जे लोक लढाई सोडून पळून गेले त्यापैकीं कांही जणास देहात शासन दिलें जेध्याच्या शकावलींत असा उल्लेख आहे की, अन्नाजी दत्तो याने पन्हाळा किल्ल्यावरील लोकांस वश करून घेऊन तो हस्तगत केला प्रो सरकारहि असे ह्मणतात कीं, ता. ५ मे, स. १६७३ रोजी पन्हाळाकिल्ल्याच्या रखवालदारास लाच देऊन महाराजानीं किल्ला परत आपल्या स्वाधीन करून घेतला

२ ही मोहीम प्रतापरावानें केली, असें प्रो. सरकार ह्मणतात.

३ प्रो. सरकार पृ, २५५

झाले, असा त्याचा लेख आहे. त्या वेळचा मुबईचा गवर्नर आगिअर यानें महाराजाशी मोठ्या अदबीने वागून त्याचा सलोखा राखला होता. त्यानें त्यांला कधीहि नाखुष करण्याचा प्रसग येऊ दिला नव्हता हुबळी येथील इग्रज व्यापाऱ्याचें झालेलें नुकसान भरून देण्याविषयीं त्याने महाराजापाशी अनुकूल सधि साधून मागणी केली त्यास त्यानी असा जबाब दिला कीं, 'त्या शहरी असलेल्या तुमच्या व्यापाऱ्यास माझ्या लोकाकडून मुळीच उपद्रव झाला नाहीं, व तुह्मी ह्मणता तितके त्याचे नुकसान झालें नाहीं' ह्या गोष्टीसबधाने त्याची खात्री करण्यासाठी महाराजानी आपल्या अमलदाराकडून लुटीच्या याद्या आणविल्या व त्यावरून त्यास असें दाखवून दिलें की, फक्त दोनशे होन किमतीचा माल इग्रजाच्या वखारीतून लुटला होता एवढ्या नुकसानाची व मागे राजापुरास झालेल्या नुकसानाची भरपाई करून देण्यास आपण तयार असून ती सवडीनुसार करून देऊ असे त्यास महाराजानी कळविले हे मित्रभावाचे बोलणे चालले असता महाराजानी इग्रजास राजापुर येथे पुन वखार घालण्याविषयी आग्रह केला ही सूचना त्यास मान्य झाली परतु ते आगिअर यजपाशी आपलें आरमार चागल सज्ज करण्यासाठी काहीं तोफा मागूं लागले त्या देण्यास तो राजी होइना कारण त्याला मोगलाची व शिद्दीची भीति होती हा असा इग्रजाशी सलोखा राखून त्याच्या नुकसानाची भरपाई करून देण्यास महाराज तयार झाले याचे कारण अर्थात असें की, त्याजकडून आपणास शिद्दीशी व मोगलाच्या आरमाराशी झगडताना मदत मिळण्याचा सभव आहे असें त्यास वाटे त्यानी आगिअर यास असेंहि सागून पाठविले की, 'तुमच्याशीं सलोख्याचा तह करण्याची आमची इच्छा आहे तुह्मी शिद्दीला आपला शत्रु समजून त्याचा जजिरा काबीज करण्यास आह्माला मदत कराल तर तुमचें सर्व नुकसान आह्मी भरून देऊ' ही अट त्या

---

१ ह्या शहरात मराठे शिरून लुटालूट करू लागल्याचे वर्तमान मुझफरखान यास कळले तेव्हा तो पाच हजार घोडदळ घेऊन त्याच्या रक्षणासाठी आला तो येत आहे अशी बातमी कळताच मराठे लुटीचा ऐवज घेऊन तेथून निसटले त्या घाईत लुटीचा कांही माल ते रस्त्यात टाकून गले ते गेल्यावर दुसऱ्या दिवशीं मुझफरखान तेथें येऊन पोंचला. हा सरदार महाराजाशीं मिलाफी झाल्यामुळें त्यानें ही अशी दिरगाई मुद्दाम केल्याचा वहीम त्याजवर येऊन त्याच्या हाताखालच्या सरदारांनीं व लोकानीं त्याला सोडिलें, आणि कानडाप्राताच्या सुभेदारीवरून त्याला विजापूरसरकारनें दूर केलें, असें ह्मणतात. प्रो. सरकार पृ० ३१९.

गवर्नरास मान्य झाली नाहीं. कारण सुरतेस इंग्रजाचा व्यापार उत्तम चालला होता आणि ते शहर मोगलाच्या ताब्यात असल्यामुळे त्याचें बरेवाईट मोगल-बादशहाच्या हातीं होतें यास्तव त्याला यत्किंचित्हि दुखविणे त्यास हिताचें न वाटणें साहजिक होते शिवाजीमहाराजास इंग्रज मदत करितात असें त्या बादशहाला समजल्यास तो त्याचा सुरतेहून उठावा करण्यास चुकणार नाही हे त्यास पक्के माहीत होते शिवाय शिद्दी मोगलाचा अंकित झाला असल्याकारणाने त्याच्या विरुद्ध शिवाजीमहाराजाशी त्यानी संगनमत केले असता ते औरंगजेबाला मुळीच आवडले नसते परंतु, शिवाजीमहाराजाशी विरोध करून शिद्दीशी स्नेह करावा तर तिकडूनहि त्यास भीतिच होती कारण महाराजाचा अमल मुंबई बेटाच्या आसपास सर्वत्र स्थापित झाला असून त्याच्या मुलखात इंग्रजाचा पुष्कळ व्यापार चालत असे तेव्हा त्याचा आपणावर कोप झाला असता आपणास मुंबईबेटात बिलकुल थारा व्हावयाचा नाहीं अशी त्याला सदोदित धास्ती असे यास्तव आगिअर कोणत्याहि पक्षास सामील न होता केवळ निःपक्षपाताप्रमाणे वागे शिद्दी त्याच्यापाशी वेळोवेळा साहाय्य मागत असे परंतु तो त्यास नेहमी नकार सांगे शिद्दी मुंबईच्या बंदरात आपलीं जहाजे जाऊ देण्याविषयी त्याच्यापाशीं परवानगी मागत असे परंतु तो कोणत्याच पक्षाच्या आरमारास आपल्या बंदरात येऊ देत नसे मोगलाची मात्र चार जहाजे आपल्या बंदरात त्यानें राहू दिली होती पण त्यावरील माणसास जमिनीवर कोणत्याहि निमित्ताने उतरण्याची त्याजकडून सक्त मनाई असे ह्या त्याच्या निःपक्षपातीपणाबद्दल उभय पक्ष त्याला मोठा मान देत[1] असो, आता इंग्रज व महाराज याच्यामध्ये घडलेल्या ह्यापुढील खटपटीचें निरूपण पुढे एका स्वतंत्र भागात करू येथे आता पूर्वक्रमानुसाराने विजापूरकराशी त्यानी ह्या समयीं केलेल्या आणखी युद्धप्रसंगाचें वर्णन करू

महाराजाच्या मनात असे होते की, सर्व पश्चिमकिनारा आपल्या ताब्यात निर्वेधपणे यावा ह्या हेतूच्या सिद्धयर्थ त्यानी आपले आरमार चांगले सज्ज करून कारवार, आकोला वगैरे शहरावर पुन हल्ले करण्यासाठी तिकडे पाठविले, व आतील प्रांतातल्या देशमुखास विजापूरसरकाराविरुद्ध बंडे उभारण्याची फूस दिली ह्या देशमुखानीं आपल्या प्रांतातील मुसलमान ठाणेदारास आपआपलीं ठाणीं सोडून पळून जावयास लाविलें.

---

१ प्रो. सरकार पृ. ३४५, ३४७ पाहा.

विजापूरकरांशीं आरंभिलेलें युद्ध आपणास निर्वेधपणें व निश्चयानें चालवितां यावें ह्यासाठीं मोगलास गुलकावण्या दाखवून काहीं दिवस तरी जागच्या जागीं स्वस्थ बसावयास लावावे ह्या उद्देशाने त्यानी खानजहानापाशीं असें सामोपचाराचें बोलणें लाविले कीं, आमचे अपराध क्षमा करून आमच्या तर्फे बादशहापाशीं रदबदली करावी, व आह्मास दक्षिणेची देशमुखी देऊं केली आहे ती देऊन बादशहानें आपल्या पदरीं घ्यावे आमचा मुलगा संभाजी यास जी मनसब देण्याचें ठरलें आहे ती पुन द्यावी, ह्मणजे इतउत्तर बादशहाच्या सेवेंत आह्मी अतर पडू न देता सर्व काळ इमानानें वागू ह्या आशयाचा अर्ज त्या खानानें औरंगजेबाकडे रवाना केला व तो मंजूर करण्याविषयी त्यास आग्रहपूर्वक विनति केली ह्यातला वास्तविक प्रकार असा होता की, खानजहानाने निरुपाय होऊन महाराजाशी गुप्त रीतीनें सलोखा केला होता कारण दक्षिणेत आल्यावर त्याला लवकरच असे कळून आले होते की, महाराजाशीं युद्ध करून त्यास जेरीस आणण्याचें काम मोठे कठीण आहे शिवाय त्याची फौजहि ह्या वेळीं बरीच कमी होत आली होती, आणि बादशहा काहीं नवी फौज पाठविण्यास राजी नव्हता अशा स्थितीत त्यानें असा पोक्त विचार केला कीं, महाराजाशी विरोध करण्याचें सोडून त्याच्या तत्रानें वागावें, व त्याचा आपल्या मुलखास उपद्रव न होईल तर पाहावें पुढ महाराज विजापूरसरकाराशीं पुन युद्ध करण्यात गुंतले असता त्याच्या मुलखावर ह्या मोगलसरदारानें खरें ह्मटलें असता स्वारी करावी परंतु ती तो न करिता जागच्याजागी स्वस्थ राहिला ह्याबद्दल औरंगजेबाचा आपणास टपका येईल ह्या रीतीनें त्यानेंच महाराजांस ही अशी शकल सुचविली असावी कसेंहि असो पण महाराजानीं विजापूरकराशी युद्ध चालविलें असता मोगलानी त्याच्या मुलखास काहींएक उपद्रव केला नाहीं; आणि मराठ्यानीहि मोगली अमलात मुळींच धामधूम केली नाहीं

ह्या सुमारास कारवारचा फौजदार मियानसाहेब यानें बंड करून आपल्या हाताखालच्या मुसलमान अमलदारास कैद केलें, व जे देशमुख त्याच्या बंडास सामील होईनात त्यास त्यानें जेर केलें गोव्याच्या फिरंगी प्रजेला व मालमत्तेलाहि तो उपद्रव देऊ लागला. कारवारास इंग्रजाची वखार होती. त्यांजपाशीं तो बंदुका व दारूगोळा मागू लागला. तो ते त्याला देईनात. ह्मणून त्यानें त्यांची वखार लुटली. असा त्यानें तिकडे पुंडावा मांडिला, हें विजापूरसरकारास कळून त्यानें त्याच्या पारिपत्यासाठीं आठ हजार लोक रवाना केले. हें वर्तमान

महाराजांस कळण्यास विलंब लागला नाहीं. त्यानी ही संधि साधून त्या सरकारच्या मुलखांत उघडपणें स्वारी केली. पुढें मिआन राजूच्या ताब्यानली कारवार, अकोला व शिवेश्वर हीं ठाणीं सर करून त्यास त्यानी जेर केलें ह्या समयी महाराज तिकडे चाल करून कारवारापासून एका दिवसाच्या टप्प्यावर तळ देऊन राहिले ते ह्या वेळीं तेथल्या एका उंच टेकडीवर किल्ला बांधण्याच्या विचारात होते, असा इंग्रज व्यापाऱ्याचा लेख आहे, आणि कारवारच्या फौजदारास त्यानीच बंड करावयास उत्तेजन दिले होते असें त्याचे ह्मणणे आहे

परळीचा किल्ला त्या वेळी विजापूरकराच्या ताब्यात होता, तो काहीं मावळे पाठवून त्यानी छापा घालून घेतला, व त्याजवळील साताऱ्याचा किल्लाहि ते छापा घालून सर करण्याच्या बेतात होते पण त्या किल्ल्यावरचे लोक मोठ्या बंदोबस्ताने राहिल्यामुळे तो असा सहज हातीं लागेना तेव्हा महाराजाच्या लोकानी त्याला वेढा दिला. त्यानंतर अन्नसामुग्रीचा वगैरे पुरवठा चांगला असल्यामुळे त्यावरच्या लोकानी तो चारपाच महिने मोठ्या निकराने लढविला पण शेवटी तो महाराजाच्या हाती आला यात त्यास पुष्कळ लूट मिळाली ती त्यानी रायगडावर पाठवून दिली नंतर चंदनवंदन, पांडवगड, नंदगिरि, ताटोरा वगैरे किल्ले त्यानी हस्तगत केले त्याप्रमाणे वाई, कऱ्हाड, शिरोळ व कोल्हापूर हीं काबीज करून हुकेरी रायबागपर्यंत आपली सत्ता त्यानी बसविली ह्या मोहिमेत त्यास पुष्कळ लूट मिळाली ती सगळी घेऊन ते रायगडास आले मग ते पुन. आपल्या लोकाची तयारी करून वीस हजार पडशा तयार करवीत आहेत अशी बदता मोगलास कळली ही तयारी ते कोणते तरी शहर लुटण्याच्या इराद्याने करीत आहेत असें त्यास वाटून त्यानीं सुरतशहराचा बंदोबस्त उत्तम ठेविला इकडे विजापूरकरास असें वाटले कीं, कारवारच्या बंडखोर फौजदारास मदत करावयास ते चालले आहेत परंतु तिकडे मोगलानीं आपल्या शहराचा कडेकोट बंदोबस्त केल्याचें कळले तेव्हा विजापूरकराची ती दहशत अमळ कमी झाली. परंतु महाराजानी त्या दोघासहि फसविलें. त्याच्या पंचवीस हजार लोकानी घाटातून निरनिराळया वाटानी खालीं उतरून एकवट होऊन अकस्मात् फोंड्याच्या किल्ल्यावर हल्ला केला, व त्यास ते वेढा देऊन बसले. गलीम अगदीं नजीक येऊन ठेपला असें पाहून कारवारच्या बंडखोराचें पारिपत्य करावयास आलेली विजापूरकराची फौज घाबरून गेली व त्याच्याशीं लढण्याचे सोडून माघारा निघून गेली.

हा असा धुमाकूळ महाराजाच्या लोकांनीं विजापूरसरकाराच्या मुलखांत मांडिल्यामुळे खवासखानानें बहिलोलखानें[1] ह्यास मोठी फौज बरोबर देऊन त्याच्यावर पाठविलें त्यानें एकदम पन्हाळयाकडे चाल करून जाऊन आसपासचा प्रांत काबीज केला व त्या किल्ल्यास वेढा दिला हे वर्तमान कानीं पडताच महाराजांनीं प्रतापराव गुजरास त्याच्यावर पाठविलें पण पन्हाळयाच्या किल्लेदारास कुमक करावयास जाऊन शत्रूशी लढत राहिले असता आपल्या लोकाची विनाकारण खराबी व्हावयाची, ती न होता पन्हाळयाचा वेढा तर उठावा, अशी युक्ति ह्या वेळी योजिली पाहिजे, असा विचार प्रतापरावाच्या मनात येऊन त्याने त्या सरदारावर चालून न जाता विजापुराकडे आपल्या फौजेचा रोख फिरविला, व तिकडील प्रांत लुटीत लुटीत तो थेट विजापूरशहरापाशी जाऊन थडकला गनीम असा आपल्या वेशीपाशी येऊन भिडला हे पाहून खवासखान घाबरून गेला प्रतापरावाशी सामना करण्यास पुरेशी फौज शहरात नव्हती यास्तव बहिलोलखान यास पन्हाळयाचा वेढा उठवून राजधानीच्या रक्षणासाठी लागोलाग परत यावे असा निरोप पाठविणे खवासखानास भाग पडले त्याप्रमाणे तो सरदार परत येत असता त्याला मिरज व विजापूर याच्या दरम्यान उमराणी येथे गाठून प्रतापरावानें त्याची वाटच बंद केली त्याने मुसलमानाच्या फौजेस चोहोंकडून गराडा घालून अगदीं जेरीस आणिलें तिला दाणा, पाणी, वैरण वगैरे काहींएक मिळेनासे होऊन तिचा उपासमार होऊ लागला छावणी सोडून कोणी मुसलमान अमळ इकडेतिकडे फिरताना आढळला कीं त्यास कापून काढावे, असा क्रम महाराजाच्या लोकांनी चालविला, व समोरून तर मोठ्या जोराचा हल्ला करण्याचा धाक घातला त्यामुळे तो खान अगदी जिकिरीस येऊन दांती तृण धरून शरण आला, व तहाचें बोलणे लावून तेथून बिनहरकत जाऊ देण्याविषयी अजिजी करू लागला तेव्हा प्रतापरावानें त्याला काहींएक उपद्रव न करिता विजापुरास जाऊं दिलें त्याचा तह कसा काय ठरला होता ते काहीं कळत नाहीं परंतु हे प्रतापरावाचे करणे महाराजास मुळीच पसंत वाटलें नाहीं त्यांनी त्याला ह्याबद्दल मोठा दोष दिला व तत्प्रदर्शक एक पत्रहि त्याला पाठविले हे त्या मानी सरदारास सहन न होऊन तो तेथून निघून दूरच्या मोहिमेस गेला. ही त्याची मोहीम त्या वेळी वऱ्हाडप्रांतातील पैनघाटात

---

१ मराठी बखरींत याचें नाव अबदुल करीम असें दिले आहे मुळांतलें नाव प्रो. सरकार याच्या आधारावरून घेतलें आहे.

झाली असें ह्मणतात ही मोहीम ह्या वेळी त्यानें करणें बरोबर नव्हतें. कारण महाराज स्वत फोंड्यास वेढा घालून तो घेण्याच्या प्रयत्नात गुंतले होते. यास्तव शत्रूनें दुसरीकडून गडबड केल्यास त्याला दाबात ठेवण्यास त्याला प्रतापरावाचें साहाय्य अवश्य हवें होते

ह्याप्रमाणें प्रतापराव महाराजावर रुसून दूरच्या मोहिमेस निघून गेला असें पाहून बहिलोलखानानें आपल्या फौजेची जमाजम करून व विजापुरकराकडून आणखी कुमक मागवून पन्हाळा किल्ला सर करण्याची खटपट पुन चालविली आहे असें महाराजास कळले हा त्या मुसलमान सरदाराचा बेत हाणून पाडण्याची कामगिरी करण्यास कोणीहि सरदार जवळ नाहीं हें पाहून त्याला अमळ सकट वाटले कारण दक्षिणेंत नुकता मिळविलेला मुलूख व आपला जुना मुलूख ह्यामधें फोंडे वगैरे जी ठाणी होतीं तीं हस्तगत करून आपला ताबा एकसारखा करण्याविषयींचा जो त्याचा सकल्प तो तेथून निघून गेल्यानें असिद्ध राहतो असें त्यास वाटलें इकडे बहिलोलखान सैन्यानिशी पन्हाळ्यापर्यंत तर चालून गेलाच इतक्यात प्रतापराव गुजरास ते वर्तमान लागून तो आपल्या घोडदळासह त्या प्रातात अतिवेगानें येऊन दाखल झाला व शत्रूवर हल्ला करण्याच्या तयारीत होता, इतक्यात महाराजाकडून त्याला असा हुकूम आला कीं, 'तुह्मी आपल्या बेफिकद वर्तनानें आह्मास नाखुश केले आहे तुह्मी ज्याला तह करून सोडिले तोच पुन फौज घेऊन आमच्या मुलखात शिरला आहे तेव्हां अशा मनुष्याचा इतबार तुह्मी कोणत्या आधारानें धरिला होता? त्याचा त्याच वेळी नाश केला असता तर त्याच्यापासून आज आह्मास त्रास झाला नसता ह्या तुमच्या कृत्याबद्दल आह्मी तुह्मास दोष लाविला आहे आता विजापुरकराची फौज सफई बुडविल्याखेरीज आमच्या समोर कदापि येऊ नका ' ह्या निरोपामुळे प्रतापरावास पराकाष्ठेचा त्वेष आला तो शत्रूवर एकदम मोठ्या आवेशानें चालून गेला शत्रूचे सैन्य फार मोठे होते याचा त्यानें विचारहि केला नाहीं त्याची नेहमीची लढण्याची पद्धत अशी असे कीं, शत्रुसैन्य प्रबळ असलें ह्मणजे त्याला आपल्या अगावर चागलें घेऊन त्याच्यापुढें आपला मोड झाला असे दर्शवून पळून जाण्याचें मिष करावे,आणि शत्रूचे सैन्य विसकळून पाठीस लागले ह्मणजे

१ सभासद ह्मणतो की, तो भागानगराचा देश, चादे, देवगड, रामगिरि, बाजेदेश हे लुटीत दूर निघून गेला. प्रो सरकारहि असेच ह्मणतात.

त्यावर अकस्मात् उलटून एकवट होऊन त्याचा सप्पा उडवून द्यावा हा गनिमी कावा प्रतापरावानें ह्या वेळी केला नाहीं व एकदम रागाच्या आवेशात शत्रूवर हल्ला केला त्यामुळें मराठ्याचा मोड होऊन शेकडो लोक रणात पडले ह्या हातघाईत स्वत प्रतापराव धारातीर्थी पतन पावला आपला सेनापति पडला हे पाहून मराठ्याचे धैर्य खचून ते पळत सुटले बहिलोलखान याने त्याचा पाठलाग करून आणखी पुष्कळ लोकाची कत्तल उडविली मराठे पळाले ते थेट पन्हाळा-किल्ल्याच्या आश्रयास गेले मागून शत्रु चालून आला त्याच्यावर किल्ल्यावरून तोफाचा भडिमार सुरू झाला तो इकडे हसाजी मोहिते ह्मणून एक पंचहजारी सरदार आपल्या लोकानिशी मागे होता, त्याला प्रतापरावाबरोबर हल्ला करावयास गेलेल्या लोकाची ही अशी वाटल उडालेली कळताच तो तेथे मोठ्या वेगाने धावत आला, आणि शत्रूचे लोक पन्हाळ्यापाशी जेसरी येथे गर्दी करून होते त्याच्यावर निकराचा हल्ला करून त्याचा त्याने पुरा फडशा उडविला व विजय संपादन केला ह्याप्रमाणे मुसलमान आपणास विजय प्राप्त झाला ह्या हर्षानें मराठ्याच्या पाठीस लागले होते, त्याचाच उलट मोड होऊन त्यास सैरावैरा पळण्याची पाळी आली, आणि मराठे पूर्वी पळत सुटले होते ते उलटून त्याच्या पाठीस लागले त्याच्या त्या वेगापुढे मुसलमानाचा टिकाव न निघून त्याच्या हजारो लोकाचा नाश झाला बहिलोलखान अगदी नामोहरम व खिन्न होऊन विजापुरास जेमतेम जाऊन पोहोचला ही जेसरीची लढाई १६७४ साली झाली.

हसाजी मोहित्याने ह्या प्रसगी विलक्षण पराक्रम करून शत्रूवर विजय मिळविला, त्यामुळे महाराजास मोठा सतोष वाटला त्यानी त्याची पुष्कळ तारीफ करून त्याला सरनोबत केले व हंबीरराव असा किताब दिला ह्या समरप्रसगी हंसाजीच्या हाताखाली आणखी दोन मराठे सरदारानी अतिशयित शौर्यानें लढून मोठा वर्णनीय पराक्रम केला होता त्याची नावे सताजी घोरपडे व धनाजी जाधव अशी होती. ह्या सरदाराची महाराजानी पाट थोपटून त्याचा बहुमान केला व त्यास मोठ्या अधिकाराच्या जागा दिल्या प्रतापराव गुजर केवळ आपल्या

---

१ महाराजाच्या मदरील निरोपामुळे अतिशयित दु ख होऊन तो अगदीं जिवावर उदार झाला, आणि त्याचे देहभान सुटून तो सहा घोडेस्वारानिशीं एकदम बहिलोलखानावर चालून गेला असें ह्मणतात. प्रो. सरकार पृ. २५९

२ याचें नांव प्रो. सरकार आनंदराव असें देतात.

टपक्यामुळें रागास चढून असा आवेशानें शत्रूशीं लढून समरभूमीवर पडला, हें आपलें मोठेंच नुकसान झालें असें महाराजाला वाटलें असा शूर व पराक्रमी पुरुष आपणास अतरला ह्मणून त्यानीं पुष्कळ खेद केला इतकेंच करून महाराज राहिले नाहींत, तर त्याने आपली सेवा मोठ्या इमानानें व शौर्यानें केली तिचें चीज करण्याकरिता त्यानी त्याच्या नातलगास व पदरच्या सर्व लोकांस चागल्या नेमणुका करून दिल्या, व त्याच्या एका मुलीशी आपला पुत्र राजाराम याचें लग्न करून त्याच्या कुटुबास आपलें नातलग केलें

ह्या हंबीररावाला महाराजानीं अशी आज्ञा केली कीं, शत्रूचा पुरा पराभव केल्यावाचून परत जीवंत येऊ नको ही अशी निकराची आज्ञा होताच तो आपलें घोडदळ घेऊन विजापूरकराच्या मुलखात शिरून बहिलोलखानाच्या पाठीवर गेला इकडे बहिलोलखानाचा मराठ्यानीं असा पिच्छा पुरविल्याचें ऐकून मोगल सरदार दिलेरखान आपलें सैन्य घेऊन त्याच्या मदतीस आला. तेव्हा ह्या दोघा सरदाराशी टक्कर देऊन आपला निभाव लागणार नाहीं असा विचार करून हबीररावानें त्यास झुकाडी देऊन कानडा प्राताकडे भरारी मारिली सदरील दोन सरदारानीं त्याचा पाठलाग करण्याचा आव काहीं वेळ घातला. परंतु तो दिवसाला पचेचाळीस मैलाची मजल मारीत होता, त्यामुळें त्याच्या हाती तो लागणे मुळी शक्य नव्हतें ह्मणून ते निराश झाले, आणि दिलेरखान परत आपल्या ठाण्यावर गेला आणि बहिलोलखान कोल्हापुरास गेला. हंबीररावानें कानडा प्रातात शिरून बहिलोलखानाच्या जहागिरींतील पेंच नावाचें शहर लुटलें ह्या लुटीत येथे त्याला दीड लाख होनाचा ऐवज मिळाला असें ह्मणतात ही लूट घेऊन तो परत येत असता त्याला बहिलोलखान व खिजरखान यांनीं बंकापुरापाशी गाठलें. त्याची तेथें मोठ्या निकराची लढाई झाली. तींत मुसलमानाचा पुरा पराभव होऊन ते पळून गेले. ह्या लढाईत हंबीररावाला शत्रूकडचे पाचशे घोडे, दोन हत्ती व इतर पुष्कळ युद्धोपयोगी सामान मिळाले. ही लढाई स. १६७४ च्या मार्च महिन्यात झाली [१] ह्या पराभवाबद्दल बहि-

१ सभासद ह्मणतो कीं, हबीरराव मोठे सैन्य घेऊन सपगावावर चालून गेला त्याच्यावर विजापूरकरानीं हुसेनखान मिआना यास पाच हजार पठाण देऊन पाठविले. त्याची तेथें दीड दिवस लढाई झाली हुसेनखान पराभव पावून पाडाव झाला, विजापूरकराचे चार हजार घोडे, बारा हत्ती व पुष्कळ उटे हबीररावाच्या हाती लागली.

लोलखानास अतिशय खेद वाटून त्याने पुन आपल्या मदतीला आणखी लोक घेतले आणि हंबीररावावर हल्ला केला पण त्याच्याशीं लढाई करण्याचें सोडून मिळविलेली लूट हंबीररावाने कशीबशी एकदाची स्वराज्यात पोचती केली. तरी मुसलमानाच्या ह्या पाठलागामुळे त्याचें बरेच नुकसान झालें सदरील लूट सुरक्षित स्थानी पोचती केल्यावर त्याने बालेघाटाकडे भरारी मारिली या वेळीं त्याने खानदेश, बागलान, बऱ्हाणपूर, वऱ्हाड, गुजराथ ह्या मोगलाच्य प्रातावर मोहीम करून तिकडची शहरें लुटली मोगलाचे सैन्य त्याच्या पाठीस लागले परतु त्याची दौड अशी वेगाची असे कीं, मोगल सैन्यास तो तीस चाळीस मैल मागे टाकू लागला यामुळें ते निराश होऊन माघारीं गेले

वर सागितल्याप्रमाणें मराठे विजापुरकराशी लढण्यात गुतले असता दिलेरखानाने ही सधि साधून महाराजाच्या कोकणातील प्रातात उतरण्याचा प्रयत्न केला परतु महाराजानी निरनिराळ्या घाटात लोक ठेवून त्याला अडविण्याची तयारी केली होती त्याच्या लोकानी त्याला एके ठिकाणी गाठून त्याचा पुरा मोड केला.ह्या लढाईत त्याचे हजार पठाण पडले आणि महाराजाचेहि पाचसहाशे लोक मेले हा असा पराभव झाल्यामुळें तो परत आपल्या ठाण्यावर गेला पुढे उत्तरेस खबरी अफगाणानी बंड केल्यामुळे औरगजेबास तिकडे लक्ष पुरवावे लागून दक्षिणेतून दिलेरखान वगैरे सरदारास तिकडे बोलवावे लागले, आणि औरगाबादेच्या ठाण्यावर एकटा बहादूरखान थोड्याशा लोकानिशी राहिला ह्यामुळे महाराजास मोगलांकडून काहीं काळपर्यंत तरी उपद्रव होण्याची भीति राहिली नाहीं शिवाय विजापूरकराचीहि या वेळी चागलीच रग जिरली होती, ह्मणून ते त्याच्याशी सामना करावयास पुन लौकर तयार होतीलसे वाटत नव्हते ही अनुकूल सधि साधून त्यानी आपणास मोठ्या थाटाने राज्याभिषेक करवून घेण्याचा बेत करून तो सिद्धीस नेला. त्याची हकीकत पुढील भागात सविस्तर दिली आहे

महाराजानी फोड्यास वेढा घातल्याचें वर सागितलें आहे हा वेढा बरेच दिवस घालून ते तेथे नेट धरून राहिले परंतु काहीं केल्या किल्ला हाती लागेना तेव्हा एवढ्याशा एका किल्ल्यापाशी आपली फौज अडवून ठेवावी हे ठीक न

---

[1] जेध्याच्या शकावलींत सपगाव लुटल्याचाच उल्लेख आहे चिटणीस व दिग्विजयकारादि असेंच ह्मणतात. मुळांतला मजकूर प्रो सरकार यानीं नारायण शेणवी नावाच्या रायगडावरील वकिलाच्या पत्राच्या आधारानें दिलेल्या माहितीवरून घेतला आहे. [ पृ. २६१. ]

वाटून त्यानीं तो वेढा उठविला, व तो उठविते वेळी त्या किल्ल्याच्या सुभेदाराकडून असा करार करून घेतला कीं, विजापूरसरकारांचें सैन्य घाटातून खालीं उतरूं न देण्यासाठी आपले काहीं लोक तिकडे ठेवू त्यास त्याने काहींएक हरकत करूं नये हा करार पाळल्यास आपण त्याच्या किल्ल्यास किंवा त्याच्या ताब्यातील प्रातास मुळीच उपद्रव करणार नाहीं ह्या किल्ल्यास महाराजानी वेढा घातला तेव्हा सुरत येथील फ्रेंचलोकापासून पुष्कळ दारूगोळा व ऐंशी तोफा विकत घेऊन ही युद्धसामग्री राजापुरास नेऊन ठेविली होती, असे ह्मणतात ह्या मोहिमेत महाराजानी राजापुरापासून बारदेशापर्यंत सगळा किनारा आपल्या ताब्यात घेतला, व तिकडील बदोबस्त करण्याकरिता काहीं लोक ठेवून ते रायगडास परत आले ह्या वर्षी घाटावर अवर्षण होऊन लष्कराला दाणावैरण व पाणी मिळण्याची पंचाइत पडूं लागली ह्मणून महाराजानी आपले घोडदळ चिपळुणास आणून ठेविले

वर सागितल्याप्रमाणे महाराज फोड्याच्या किल्ल्यास वेढा घालून तिकडे गुतून राहिले असता इकडे मोगलाच्या व शिद्दीच्या आरमाराने जूट करून त्याच्या कोकणकिनाऱ्यास पुन उपद्रव देण्यास सुरुवात केली महाराजाच्या व त्याच्या आरमाराच्या पुष्कळ झटापटी झाल्या परतु त्यात महाराजाच्या आरमारास फारसे यश आले नाहीं त्याचीं पुष्कळ जहाजे शत्रूंनी पकडून नेली हीं मोगलाची व शिद्दीची एकवट झालेली आरमारे इंग्रजाच्या परवानगीची दरकार न करिता मुबईच्या बदरात शिरली, व त्याच्या लोकानी महाराजाच्या ताब्यातील कुर्लाप्रातात उतरून पुष्कळ गाव लुटून उद्ध्वस्त करून टाकिले त्यानी पुष्कळ प्रजेची कत्तल केली, व पुरुष, बायका व मुलें पकडून त्यास गुलाम ह्मणून विकिले हे त्याचे करणे मुंबईचा इंग्रज गवर्नर आगिअर यास मुळींच आवडलें नाहीं त्याने त्याच्या वरिष्ठापाशी त्याबद्दल तक्रार केली, व तो ह्मणाला कीं, तुमच्या अशा कृत्यानें शिवाजीमहाराज आपणावर नाहक आग पाखडतील परतु ह्या त्याच्या तक्रारीचा काहींएक उपयोग झाला नाहीं शिद्दी त्याच्या हाकाटीकडे मुळीच लक्ष न पुरविता आपलीं जहाजे मुंबईबदरात नागरून ठेवून कुर्लाप्रातावर एकसारखे हल्ले करीत राहिला त्याच्या पारिपत्यास रायगडाहून तीन हजार लोक रवाना झाले. त्यानी शिद्दीच्या लोकांशीं संग्राम करून त्याचा पराभव केला व त्यास पिटाळून लाविलें. हा असा मराठ्यांकडून सज्जर

मार त्यास मिळून त्याचे पुष्कळ लोक प्राणास मुकले तेव्हा त्याने आपलीं जहाजें गलीम जाळून टाकतील ह्या भीतीनें मुबईच्या बंदरांतून काढून नेलीं. स १६७४ च्या मार्चमहिन्यात शिद्दी सबळ यानें महाराजाचें आरमार सात-वलीच्या खाडीत असता त्यावर हल्ला केला महाराजाच्या आरमारावर दौलत खान मुख्य होता उभय आरमाराची मोठी निकराची लढाई झाली. तींत शिद्दी सबळ व दौलतखान ह्या दोघासहि मोठमोठ्या जखमा झाल्या पण शेवटी महाराजाचें आरमार विजयी होऊन शत्रूच्या आरमाराला पळ काढावा लागली. पुढे कारवाराकडून परत आल्यावर महाराजानी असा निश्चय केला कीं, कितीहि लोक खर्ची पडले व केवढाहि खर्च झाला तरी शिद्दीची दडाराजपुरी काबीज करून त्याची पुरी खोड मोडावयाची ह्या उद्देशानें ते तिकडे दारू-गोळा, नौका व फौज स १६७८ च्या मेमहिन्याच्या सुमारास एकसारखी पाठवीत राहिले

# भाग तेविसावा.



## राज्याभिषेक.

## १६७४.

हंबीरराव मोहित्याने बहिलोलखान याचा पराभव केला, त्यात विजापूर सरकाराची पुष्कळ सेना गारद झाली त्यामुळे त्यास शिवाजीमहाराजांशी लढण्यास पुरेशी फौज पुन जमविण्याचे त्राण राहिले नाहीं, व दुसरा कोणीहि सरदार मराठ्यावर स्वारी करण्यास तयार होईना अशा स्थितीमध्ये त्या सरकाराचा मुख्य वजीर खवासखान याने असा विचार केला कीं, तूर्त महाराजाच्या वाटेस जाऊं नये पुढे चागली तयारी करून त्याच्यावर स्वारी करावी हे वर्तमान महाराजास कळून ते त्या सरकाराविषयीं अमळ निर्धास्त झाले आता औरगाबाद येथील मोगलसुभेदारास तर त्यानी पूर्वोक्त प्रकारे पुरा भारून टाकला होता तोहि आपला सुभा सभाळून स्वस्थ होना आपल्या मुलखावर मराठ्यानी स्वाऱ्याशिकाऱ्या करण्याचे सोडून दिले एवढेच मिळवित्याने तो आपणास कृतकृत्य समजून महाराजाच्या तत्राने वागू लागला बरें, औरंगजेबाने तरी काहीं हालचाल करावी, तर तो उत्तरेस काहीं गडबडी चालल्या होत्या त्याचा बंदोबस्त करण्यात गुतला होता शिवाय त्याला आतां महाराजाची अमळ दहशतहि वाटूं लागली असावी असे मानण्यास हरकत नाहीं तो जात्या मानी असल्यामुळें महाराजाचें पारिपत्य करण्यास दक्षिणेंत स्वत स्वारी करावी तर तींत आपणास यश आल्यास बरे, आणि जरकरिता आपला पराभव झाला तर त्यासारखी दुसरी फजिती नाहीं, असें त्यास वाटे त्याच्या मनात आणखी हाहि विचार येई कीं, आपण शिवाजीमहाराजांशी अनेक वेळा विश्वासघाताचें वर्तन केलें आहे, यास्तव दक्षिणेंत आपण त्याच्या तावडीत सापडल्यावर ते मागील अपकाराबद्दल केव्हा कसा वचपा घेतील याचा नेम नाहीं दुसरें असें कीं, महाराजाच्या पदरच्या एकाहून एक शूर व इमानी सरदाराचे पराक्रम त्याच्या कानीं जाऊन तो थक्क होत असे, आणि अशा सरदारांपुढें आपल्या रडतराव घोड्यावर बसणाऱ्या सेनापतींचा कसला निभाव

लागतो, असें त्यास आता वाटूं लागलें होतें बरें भागानगरकर व विजापूरकर त्याला मदत करून शिवाजीमहाराजास जेर करण्यास उद्युक्त होतील ह्मणावें तर त्याचीहि आशा नव्हती कारण त्या पादशाहती बुडविण्याचा सकल्प मोगलबादशहाचा झाला असून त्याचा रोख त्यावर नेहमी असे औरगजेबाने तर ह्या दोन्ही सरकारास पुष्कळच घाबरवून सोडले होते तेव्हा अर्थात् हे मुसलमान लोक मोगलास नेहमी पाण्यात पाहत ह्या दोन्ही पादशाहतींची सत्ता शिवाजीमहाराज हळूहळू कमी करीत चालले आहेत, ही गोष्ट आपणास अनुकूळ अशीच घडत आहे असें औरगजेबाला वाटे कारण त्याचा बेत असा होता कीं, योग्य सधि प्राप्त होताच दक्षिणवर मोठ्या सैन्यानिशी स्वारी करून पहिल्यानें ह्या कमजोर झालेल्या पादशाहती बुडवाव्या आणि मग मराठ्याची खबर घ्यावी असा त्याचा निर्धार झाल्यामुळे त्याने ह्या वेळी दक्षिणेतील आपल्या सुभेदारास महाराजाशी कोणत्याहि प्रकारचा विरोध करण्याची निकड लाविली नाहीं किवा कुमक पाठविली नाहीं मागे त्या सुभेदाराने महाराजाचा एक अर्ज त्याच्याकडे पाठविला होता, त्याचाहि विचार करण्याचे त्याने लावणीवर टाकले खरें ह्मटलें असता हा अर्ज निवळ लबाडीचा होता हे त्या धूर्त बादशहास तेव्हाच कळून आल होतें. असो, तर अशी ही मोगल बादशहाच्या मनाची स्थिति झाली असल्याकारणाने तो महाराजाविषयी अमळ बेफिकीरच राहिला होता शिवाय महाराजानीहि अलीकडे त्याच्या मुलखात स्वाऱ्या करण्याचे सोडून दिलें होते त्यामुळे त्यास राग येण्यासारखे काहीं कारण ह्या वेळी तरी निदान उपस्थित झालें नव्हते कोणीकडूनहि पाहता मोगल ह्या वेळी स्वस्थ बसले आहेत अशी महाराजाची खात्री होऊन चुकली होती. आता भागानगरच्या कुतुबशहाकडून आपणास काहीं भय आहे असें महाराजास मुळीच वाटत नव्हते त्या सरकाराकडून त्यास वार्षिक खडणी नियमाने येत असून तेथला मुख्य प्रधान मादण्णा हा त्यास सर्व प्रकारें अनुकूळ होता

ह्याप्रमाणे सर्व यवन पादशहास जागच्या जागी तटस्थ केल्यावर महाराजानीं स्वतांस राज्याभिषेक करवून घेण्याचा विचार मनात आणिला. शहाजीराजे मृत्यु पावल्यापासून महाराज आपणास राजा तर ह्मणवीत असतच. त्याप्रमाणेंच ते आपल्या नावाचें नाणेंहि पाडूं लागले होते. महाराजांस ह्या वेळीं असें वाटूं

लागलें कीं, शास्त्रविधीप्रमाणें राज्याभिषेक होऊन छत्रसिंहासनादि राजचिन्हें धारण केल्यावाचून आपल्याविषयीं लोकाच्या मनात पूज्यभाव उत्पन्न व्हावयाचा नाहीं, शत्रु आपणास नेहमीं पुडपाळेगारांनच लेखतील, इतर राजे व पादशहा आपणास द्यावा तसा मान देणार नाहींत, व आपल्याशीं ते जे करारमदार व तह करितील ते ते आपला धाक आहे तोंपर्यंत फार तर पाळतील, आपण केवळ बंडखोर आहों असें त्यांस वाटून अनुकूळ संधि येताच ते मोडण्यास ते प्रवृत्त होतील, यात कांहीं राजनीतीचा भंग झाला असें त्यास वाटणार नाहीं, तसेंच जे कांहीं परस्थ लोक ह्या देशात येऊन राहिले आहेत ते सुद्धा आपणास केवळ लुटारू समजून आपला तिरस्कार करितील, शिवाय जे मराठे सरदार अद्यापि यवन पादशहाच्या आश्रयानें आहेत किंवा स्वतंत्रपणें पुडावा करीत आहेत त्याच्या मनात आपणाविषयीं मान्यताबुद्धि उत्पन्न व्हावयाची नाहीं, व आपल्या सत्तेचा कांहीं न्यायिकपणा नाहीं असें समजून ते आपणास आपल्या सारखाच एक पुडावा करणारा बडा सरदार आहे असें मानून आपल्या पक्षास येऊन मिळणार नाहींत, इतकेंच नव्हे तर खुद्द आपले प्रजाजन आपल्या सत्तेला योग्य मान देऊन आपल्याशी राजनिष्ठेने वर्तण्यास सहसा तयार होणार नाहींत, आणि आपण त्यास दिलेले कौल व लावलेली शिस्त ते योग्य प्रकारें मानण्यास प्रवृत्त होणार नाहींत, आपण अजून मोगलाचे किंवा मुसलमानाचे प्रजाजन आहों, आपला असा कोणी राजा नाहीं ही समजूत हिंदुजनाच्या ठायीं कायम राहणार, व ते आपल्या सत्तेविषयीं बेदरकार राहणार, आणि महाराष्ट्र-राज्यसंस्थापना करून व सर्व मराठ्यास एकवट करून त्यास स्वराज्य आणि स्वातंत्र्य याची किंमत व गोडी लावून देण्याचा जो आपला आज तीस वर्षांचा सत्संकल्प त्यास यावें तसें यश येणार नाहीं, हे विचार त्याच्या मनांत नेहमीं घोळत असत

सतत तीस वर्षे स्वराज्यस्थापनेची जीवापाड खटपट करून तींत असें उत्तम यश संपादून व सभोवतालच्या यवनपादशाहतींस सर्व प्रकारें कमजोर करून त्यांजवर त्यांनी आपलें तेज पाडलें व छाप बसविली, असें असता स्वतास राजचिन्हानीं शास्त्ररीत्या मंडित करण्याचा विचार अद्यापि त्याच्या मनात आला नव्हता याचेंच एकाद्यास नवल वाटण्यासारखे होतें. परंतु शहाजीराजे जीवंत होते तोंपर्यंत ही गोष्ट महाराजाला मुळीं करणेंच नव्हती; आणि ते

महाराष्ट्रांत आले तेव्हां इकडेच राहिले असते तर त्याच्याच हातीं सर्व राज्य-कारभार त्यानी दिला असता, व त्याच्या नावाने गादी स्थापिली असती पुढे ते मरण पावल्यानंतरचीं दहा वर्षें मोगलाशी व मुसलमानाशीं रणसंग्राम करण्यात, व नेहमीं जय्यत ठेवाव्या लागणाऱ्या प्रचड सैन्याच्या खर्चासाठी व काबीज केलेल्या शेकडो किल्ल्याच्या दागदुजीकडे व व्यवस्थेकडे होणाऱ्या उदड खर्चासाठी माधेल तिकडून द्रव्य मिळविण्याच्या उद्योगात कशी अगदी गुंतून गेली होतीं हे वाचकानी येथवर वाचलेंच आहे यास्तव यथाशास्त्र सिंहा-सनारूढ होण्याची ही कल्पना त्याच्या मनात पुन पुन आली असूनहि ती त्याला हा काळपावेतो स्वास्थ्याभावास्तव असिद्धच ठेवावी लागली होती परंतु आरभी निर्दिष्ट केल्याप्रमाणे त्यास अमळ स्वस्थता व निर्भयता प्राप्त होताच त्यानीं हा स्तुत्य उद्देश सिद्धीस नेण्याचें मनात आणिलें

हा उद्देश त्वरित सिद्धीस नेण्यास आणखी एका गोष्टीमुळे कारण झाले एके समयी महाराजाच्या वाड्यात एक प्रयोजन झालें त्यानिमित्त सर्व मानकरी व सरदार यास आमंत्रणें केलीं भोजनसमारभाची व्यवस्था होऊन कारभारी मंडळीने सदरेस मोठा चौरग ठेवून त्यावर गादी घातली हे उच्च आसन त्यानी अर्थात् महाराजासाठी केले, व दुतर्फा वरकड मडळीने बसावें अशी व्यवस्था केली समारभास आलेल्या मडळीत मोहिते, महाडीक, शिर्के, निंबाळकर, धाडगे, जाधव आदिकरून मराठे सरदार होते महाराजासाठी असें उंच आसन केलेले पाहून त्यास विषाद वाटला, व ते ह्मणू लागले कीं, 'शिवाजीमहा-राजाकडे आता थोरपणा आला काय? आह्मी कदीम, तालेवार सरदार, आह्मी मोरचेलाचे अधिकारी ह्याच्या वडिलास हा अधिकार कधीहि प्राप्त झाला नव्हता असें असता आमची मानखंडना करून हे उच्च स्थानी बसणार व आह्मी त्याच्या-जवळ खालीं बसणार, हे आह्मास कमीपणा आणणारे आहे. अशी अमर्यादा करून घेण्यापेक्षा ह्या सदरेस आह्मी बसूच नये हे उत्तम ' असें बोलून ते उठून चालले. तेव्हा कारभाऱ्यानी त्याची समजूत करून त्यास असें सांगितलें कीं 'ह्या प्रकरणीं तुह्मी महाराजापाशी प्रत्यक्ष बोला ह्या समयी त्याचा रोष होईल असें करूं नका ' महाराजाच्या कानीं हा गवगवा गेला तेव्हा त्यांस मोठा विचार पडला मग त्यांनीं त्यांतल्या काहीं सामान्य दरजाच्या मराठे सरदारांस एकांतीं आणून त्यांची त्या सदरेस भोजनास बसण्याविषयीं मान्यता घेतली. नतर

घोरपडे, निंबाळकर वगैरे कांहीं बड्या मानाच्या सरदारास एकांतीं बोलावून, तुमची हरकत कोणती आहे असें त्यास त्यानी विचारलें. त्यावर त्या मानी सरदारानी असा जबाब दिला कीं, 'आह्मी यवनपादशहाचे पुरातन नोकर, चारपाचशे वर्षांचे जुने सरदार आह्मांला ही अमर्यादा सहन होणार नाहीं तरी याचा विचार तुह्मीच पाहावा ' हा त्याचा जबाब ऐकून महाराजानी त्यास ह्मटलें कीं, ज्यास आपल्या प्रतिष्ठितपणाचा एवढा अभिमान वाटत असेल त्यानी आमच्या कचेरीस येऊं नये कारण पडेल त्या वेळी त्यास बोलावून आणूं उगाच बखेडा माजविण्याचें कारण नाहीं ज्यास ही व्यवस्था रुचत नाहीं त्यानी ह्या समयीं येथून निघून जावें 'असें ह्मणून बखेडखोर मंडळीस निरोपाचे विडे देऊन कचेरी बरखास्त केली ह्यावरून महाराजाच्या लक्षात हे येऊन चुकले कीं, आपल्या पदरच्या मराठेसरदारासहि आपल्याविषयीं विशेष मान्यताबुद्धि नाहीं, याचे कारण आपण अभिषिक्त सत्ताधीश नाहीं हे होय

ह्याप्रमाणें स्वराज्याभिषेक करून घेण्याचा निर्धार करून त्या विचारात गुग होऊन महाराज निद्रिस्त झाले असता भवानी स्वप्नात येऊन त्यास ह्मणाली की, तूं स्वधर्मरक्षणार्थ इतका उद्योग केलास त्यापेक्षा तूं सिंहासनाधीश होण्यास योग्य आहेस तुझा हा हेतु माझ्या प्रसादाने पूर्ण होईल असे देवीकडून आश्वासन मिळाल्यावर त्यानी आपल्या प्रिय मातुश्रीकडे ही गोष्ट पहिल्याने काढिली तिला हा त्याचा हेतु पसंत वाटला मग रामदासस्वामीकडे कारकून पाठवून त्यास हा उद्देश कळविला त्यानीहि त्यास आपली संमति दिली त्याचप्रमाणे चिंचवडचे देव वगैरे जे साधुसंत स्वराज्यात होते त्याचेहि अनुमत त्यानी कारकून पाठवून घेतले नंतर त्यानी स्वराज्यातील मोठमोठे पंडित, विद्वान् व प्रतिष्ठित ब्राह्मण यास पालख्याम्याने पाठवून मोठ्या सन्मानाने आणिलें, मुख्यमुख्य सर्व कारभारी व सरदार यास जमा केले, व आपले इष्टमित्र व सुहृत्संबंधी यास बोलावून आणिले ह्या सर्वांची सभा करून त्यास हे आपलें मनोगत कळविले व त्याचा त्याबद्दल सल्ला विचारिला तेव्हा ह्या गोष्टीचा त्यास मोठा आनंद वाटून सर्वानुमतें असें ठरले कीं, त्यानी राजोचित छत्रसिंहासनादि चिन्हें यथासांग शास्त्ररीत्या धारण करावी

*

मग, हा राज्याभिषेकविधि सशास्त्र करावयाचा असल्यास कोणकोणत्या गोष्टींची अनुकूलता व सिद्धता पाहिजे या संबंधानें शिष्ट जनांचें मत घेता

महाराजांस असें समजलें कीं, व्रतबंध ज्याचा झाला आहे त्यालाच राज्याभिषेकविधि शास्त्रानुसार करिता येतो महाराजाचा हा व्रतबंध झाला नसल्यामुळें त्याची पडितजनमते शूद्रात गणना होत असे ह्मणून त्याचा हा हेतु सिद्धीस जाणें कठीण आहे असें महाराष्ट्रातील पंडित ह्मणू लागले. महाराज त्या वेळी शेचाळीस वर्षाचे असून त्याचे अनेक विवाह होऊन त्यास सततिहि झाली होती अशा वयातीत पुरुपाचा व्रतबंध शास्त्रोक्त प्रकारे होणे शक्य नाहीं, असा त्या पंडिताचा अभिप्राय पडला ह्या पडिताच्या मतामुळे हा एक नवीनच प्रत्यवाय उपस्थित झाला, त्यातून कसें पार पडावे हा विचार महाराजास प्राप्त झाला

ह्या समयी महाराजाच्या पदरी असलेल्या एका अत्यत हुशार, प्रामाणिक व स्वामिनिष्ठ सेवकाने त्यास ह्या पेचातून सुटण्याची मसलत दिली हा सेवक कोण ह्मणाल तर बाळाजी आवजी चिटणीस हा होय त्याने महाराजास अशी विनंति केली कीं, ' महाराष्ट्रातील पंडिताच्या ह्या अभिप्रायाने महाराजानी निरुत्साह होऊ नये स्वामीनी आजपर्यंत जे जे दुर्घट मनोरथ चित्ती आणिले ते सगळे ईशकृपेनें सिद्धीस गेले तेव्हा हाच मनोरथ तेवढा का असिद्ध राहावा ? काशीक्षेत्रात गागाभट्ट[1] ह्मणून एक महापडित आहे तो चार वेद, सहा शास्त्र व स्मृत्यादि ग्रथ याचे सागोपाग अध्ययन करून मोठा लौकिक पावला आहे त्यानें सागितलेले शास्त्रार्थ इतर स्थलीच्या मोठमोठ्या पंडितास शिरसावद्य होतात असा त्याचा महान् अधिकार आहे त्यास ह्या प्रकरणी शास्त्रार्थ विचारावा हे युक्त दिसते हल्लीं हा पंडित पैठणास आला आहे तरी त्याला व पैठणच्या इतर महापंडिताला स्वामीनी बोलावून आणावे. स्वामीची उज्ज्वल कीर्ति त्यास

१ याचे खरे नाव विश्वेश्वरभट्ट असे असून त्याच्या बापाने त्याचें गागा असे लाडके नाव ठेविले होतें याच नावाने तो पुढे प्रसिद्धि पावला. याचे घराणे मुळचे पैठणचे असून तेथे त्याचे पूर्वज विद्यापीठ स्थापित करून त्यात वेदशास्त्रादिकाच पठण ते विद्यार्थ्याकडून करवीत त्याच्या पूर्वजानी अनेक टीकात्मक व स्वतत्र शास्त्रग्रथ रचून पैठणास व काशीस पडितमडळात अग्रणीत्व सपादिले होते त्याचा रामेश्वर भट्ट नावाचा विख्यात पूर्वज काशीस जाऊन राहिला गागाभट्टहि आपल्या पूर्वज परपरेप्रमाणें विद्याप्रवीण झाला असून न्याय, अलंकार व वेदान्त ह्या विषयांत त्याची पारगतता विशेषच होती. त्यानें अनेक ग्रथ लिहिले. त्यांत जैमिनी सूत्रांवरील त्याची टीका, न्यायशास्त्रावरील त्याचा भट्टचिंतामणि नावाचा ग्रथ व कायस्थधर्मप्रदीप हे प्रसिद्ध आहेत.

विश्रुत आहेच यास्तव तो आपल्या निमंत्रणास नकार सांगणार नाहीं ' ही तोड ऐकून महाराजास मोठे समाधान वाटलें, व इतर कारभाऱ्यासहि ती योग्य वाटली मग त्या पंडितास बोलावून आणण्याची कामगिरी बाळाजी आवजीस सागून केशव पंडित, भालचंद्रभट्ट पुरोहित, व सोमनाथ कात्रे यास त्याच्या बरोबर दिले. गागाभट्टास व पैठणच्या महापडितास आणण्यासाठीं त्याच्या बरोबर पालख्याम्याने वगैरे इतमाम व दहा हजार रुपये खर्चासाठी ह्मणून दिले.[१]

बाळाजी आवजी पैठणास जाऊन गागाभट्टास भेटला, व त्यास महाराजाचा हेतु कळवून तेथल्या इतर पंडिताची सभा त्याने भरविली, आणि तीपुढे हा प्रश्न विचारिला ह्या सभत पडिताचा काहीं वेळ वादविवाद होऊन शेवटीं सर्वांची अशी एकवाक्यता झाली कीं, जयपूर, उदेपूर वगैरे ठिकाणी रजपूत-राजास जसा राज्याभिषेक होतो तद्वत् तो शिवाजीमहाराजासहि होण्यास काहीं प्रत्यवाय नसावा ह्याप्रमाणे त्या पडिताची अनुकूलता झाल्यावर त्यास बाळाजी आवजीने रायगडावर आणिले हे पडित येत आहेत असें कळताच महाराजानी त्यास मोठ्या आदराने सामोरे जाऊन गडावर वाजतगाजत मोठ्या थाटानें आणिले त्याचा त्यानी बहुमान करून त्यास राहावयास उत्तम स्थळ नेमून दिलें, व त्याची बरदास्त उत्कृष्ट प्रकारे ठेविली

१ सभासद व चित्रगुप्त असे ह्मणतात की, गागाभट्टास कोणी बोलवावयास गेले नव्हते तर तो आपण होऊनच महाराजाची कीर्ति ऐकून त्याच्या भेटीस आला. त्या वेळी त्याचा त्यानी यथायोग्य आदरसत्कार केल्यावरून तो पडित खुष झाला आणि महाराजाची पुष्कळ स्तुति करून येणेप्रमाणे बालला 'ह्या कलियुगी क्षात्रधर्म अगदी बुडाला सपूण पृथ्वी यवनमय होऊन यवन सिंहासनारूढ झाले सूर्यवश व चद्रवश यात त्राण उरलें नाही यजनयाजन बद पडले सर्वत्र अनाचार माजला ब्राह्मणधर्म अगदी लोपला महाक्षेत्रे कुठित झाली तुह्मा स्वपराक्रमाने दक्षिणेतल्या पादशहास हतवीर्य केले, दिल्लीच्या औरगजेबबादशहास ठायी बसविले, त्याचे मोठमोठे सुभेदार चालून आले त्याचा पराभव केला एवढे राज्य तुह्मी सपादिले. लक्ष घोडा व तीनशेसाठ किल्ले तुमच्या ताब्यात असून धनसपदाहि बहुत आहे असें असता तुह्मास तख्त नाही. यास्तव तुह्मास सिंहासनारूढ करून सर्व राज्याधिपतींकडून छत्रपति ह्मणवावे ही इच्छा माझ्या व इतर हिंदूच्या मनात उत्पन्न झाली आहे राजा सिंहासनारूढ झाल्याविना त्यास जगी भूषण नाही तुम्ही सिंहासनस्थ झाल्याने औरगजेबादि यवनपादशहाच्या नाकास चुना लाविल्यासारखें होईल. हा आमचा हेतु तुम्हीं पूर्ण करावा ' ह्या त्याच्या भाषणानें महाराजांच्या मनांत ती गोष्ट भरली.

मग महाराजांनी आपल्या पदरचे कारभारी व पंडित आणि इतर शिष्ट जन यांची सभा पुनरपि भरवून तिला गागाभट्ट व पैठणचे पंडित यास आणिलें, आणि आपल्या राज्याभिषेकाच्या युक्तायुक्ततेविषयींचा प्रश्न त्या सभेला पुनः केला. त्या सबंधाने पंडितजनात भवतिनभवति होऊन अखेरीस गागाभट्टानें असा निर्णय दिला कीं, ' शिवाजीमहाराज शिसोदेराजवंशात उत्पन्न झाले असून मूळचे क्षत्रिय आहेत त्याचे पूर्वज नर्मदानदीच्या अलीकडे येऊन आपणास मराठे ह्मणवूं लागले, व व्रतबंधादि कित्येक सस्कारास त्यानी फाटा दिला तरी त्याचे क्षत्रियत्व काहीं नष्ट होत नाहीं उदेपूर, जयपूर इत्यादि ठिकाणी जसे रजपूतराजाचे व्रतबध होऊन मग राज्याभिषेक होतात, तसा महाराजाचा व्हावयास कोणत्याहि प्रकारचा प्रत्यवाय नाहीं यास शास्त्र किंवा रूढि मुळींच आड येणार नाहीं याच्या उदेपूर येथील कुलात जर अद्यापि छत्रसिंहासनाचा अधिकार चालू आहे, तर मग यासच तेवढा प्रतिरोध का असावा, हे समजत नाहीं आता महाराजाचे वय मोठे झाले असून त्याचे अनेक विवाह होऊन पुत्रसततिहि झाली आहे तेव्हा त्याचा व्रतबध व्हावा कसा ? असा जो प्रश्न आहे त्याचे समाधान एवढेच आहे कीं, ह्या प्रसगीं आपद्धर्माचा अवलब करून व्रतबध हा राज्याभिषेकविधीचे एक अग आहे म्हणून समजावे, व तो मुख्य विधीच्या अनुषगानें बेलाशक करावा ' हा गागाभट्टाचा निर्णय पैठणच्या व महाराष्ट्रातील पडितास मान्य होऊन, व्रतबध करून राज्यभिषेक करावा असें सर्वानुमते ठरले

महाराजास आपल्या इच्छेप्रमाणे शास्त्रनिर्णय मिळाल्याने बहुत संतोष झाला मग गागाभट्टादि पंडितानी जे जे साहित्य ह्या विधिप्रीत्यर्थ जमवावयास सागितले तें विलंब न लाविता महाराजानी जमविले महानद्याची पुण्योदके, समुद्रोदके, सुलक्षण अश्व व गज, व्याघ्रचर्मे, मृगचर्मे इत्यादि आणविलीं, सिंहासन, पीठ, सुवर्णादिकाचे कलश व इतर पात्रे तयार करविलीं मोठमोठ्या विद्वान् ज्योतिष्यास सशास्त्र सुमुहूर्त पाहावयास सांगितलें. त्याच्या अनुमताने ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी ( आनंदनाम सवत्सर ) सिद्ध केली.

मग संपूर्ण क्षेत्रातील व इतर स्थळीचे प्रतिष्ठित व विद्वान् ब्राह्मण, एकदर माडलिक व इतर राजे, सर्व सुहृत्संबंधी, स्वराज्यांतील सगळे मातबर लोक व सेवकजन यास आमंत्रणपत्रे पाठविलीं. जेथे सिंहासन स्थापावयाचें तें राजधानीचें

स्थल पुण्यभूमि असून त्याच्या आसमंताद्भागीं पुण्यक्षेत्रे व महानदी असावी तेथें विपुल उदक असून पुष्करिण्यादि कृत्रिम जलाशय अनेक असावे. त्याच्या सभों-वतालील प्रदेशात नाना तऱ्हांची धान्ये उत्पन्न होत असावीं तें स्थल शत्रूंस दु साध्य असावे असें शिष्टजनानीं सुचविल्यावरून रायगडकिल्ला ह्यापैकीं बहुतेक लक्षणानीं युक्त असून शत्रूंस दु साध्य असें स्थल स्वराज्यात दुसरे कोणतेंहि नाहीं असें ठरलें, व ह्या गडावर राज्याभिषेकसमारभ करण्याचा निश्चय झाला.

महाराजानी ह्या गडावर आपणास राहावयासाठी उत्तम वाडा बाधिला होता. त्याप्रमाणेंच अठरा कारखान्याची स्थलें, व प्रधान, सरकारकून वगैरे अधिकाऱ्यांस राहावयासाठी घरे बाधिली होतीं सिंहासनासाठी सभागृह करविलें होतें [1] ते एवढे मोठे होते कीं, त्यात हजारो माणसाचा समावेश व्हावा त्याची रचना अशी चागली केली होती कीं, आत बसणारास शीतोष्णबाधा सहसा होऊ नये ह्या सर्व व्यवस्थेवरून असें स्पष्ट दिसते कीं,ह्याच गडावर आपली गादी स्थापण्याचा महाराजाचा इरादा मूळापासूनच होता. त्यास पंडितजनाची समति मिळाल्यावर तेथील वाड्याच्या भिती वगैरे रगवून व त्यावर चित्रे काढवून त्या परम रमणीय केल्या ज्या मुख्य सदरेस सिंहासन माडावयाचे तेथे उंची वस्त्राचे चादवे, पडदे वगैरे लावून ती अतिमनोहर केली सिंहासन जेथे ठेवावयाचें तेथे सोन्यानें मढविलेले चार स्तभ रोवून त्यास अमूल्य जरीचा चादवा लाविला व त्यास मुक्ताफळाच्या गेदाचे घोस लटकविले त्याप्रमाणेच गडावरील इतर जागा व इमारती रगवून व साफसूफ करवून सुशोभित केल्या. राज्याभिषेकानिमित्त येणाऱ्या थोरथोर ब्राह्मणास व माडलिक राजास उतरावयासाठी चागल्या सोईच्या जागा पाहून तेथे सर्व व्यवस्था उत्तम ठेविली. भोजनाच्या पंक्ति बसण्यासाठीं व सभादिकासाठीं मोठेमोठे विस्तीर्ण मंडप निरनिराळ्या स्थलीं उभारून दिले सर्व राज्यातील मोठमोठे गुणिजन, गवय्ये, बजवय्ये, कला-

---

१ या सभेशिवाय आणखी विवेकसभा ( जेथे पडिताचे पूर्वोत्तरपक्ष व्हावे ), न्याय सभा (जेथे लोकाचे खटले ऐकावे), प्रगट सभा (जेथे गोरगरिबाच्या फिर्यादी ऐकाव्या), प्रबोधसभा ( जेथे कीर्तनपुराणादिश्रवण व्हावे ), रत्नागरसभा ( जेथे अलकारवस्त्रा-दिकाच्या किंमती व्हाव्या ), नीतिसभा ( जेथे परकीयाचा आदरसत्कार व भेटी व्हाव्या ) इत्यादि सभाच्या जागा वाड्यात निरनिराळ्या करून आणखी अतर्गृहें, देवागारें, भोजनगृहें इत्यादि केलीं होतीं शि. दि.

कंतिणी वगैरे बोलावून आणकून आलेल्या पाहुण्याची करमणूक होईल अशी व्यवस्था केली ब्राह्मणभोजनासाठीं एकएके जागी पाचपाच हजार ब्राह्मणाच्या पंक्ति बसाव्या अशी दहापाच स्थलें करविलीं त्या प्रत्येक स्थलीं भोजन तयार करण्यासाठी पाककर्ते, वाढणारे व पारिपत्यगार नेमून सर्व प्रकारची तरतूद उत्तम करविली जेवढे ब्राह्मण येतील तेवढ्यासाठी नित्य नूतन पक्वान्नें तयार करावी अशी व्यवस्था केली सुहृद , आप्त, व सेवकजन येतील त्याच्या बिऱ्हाडाची सोय यथास्थित करून त्यास कोणत्याहि गोष्टीचें उणे पडू न देण्याची ताकीद दिली त्याच्या भोजनासाठीहि मोठेमोठे मंडप तयार केले

ह्याप्रमाणे किल्ल्यावर व किल्ल्याच्या खालच्या माचीवर जिकडेतिकडे मंडप, तबू, राहुट्या याची एकच गर्दी होऊन राहिली समारभास येणाऱ्या एकंदर लहानथोर मंडळीस कोणत्याहि प्रकारची केव्हाहि न्यूनता पडूं नये ह्यासाठी धान्यादिकाची पर्वतप्राय कोठारे करवून त्यावर अधिकारी नेमिले, व त्या सर्वावर अध्यक्ष नेमिला. एकएक पदार्थ एकएका अधिकाऱ्याच्या हवाली असून त्याच्या हाताखाली इतर कारकून व नोकर ठेविले त्यानी ज्याला जो जिन्नस लागेल तो तत्काळ पुरवावा, त्या जिनसाची उणीव कोणत्याहि प्रसगी पडू देऊ नये, व कोणालाहि कधी नाहीं ह्मणू नये, असा एकसहा हुकूम देऊन ठेविला तसेच सर्व दर्जाच्या लोकाची त्याच्या योग्यतेप्रमाणे व इतमामाप्रमाणे यथास्थित सोय होत आहे कीं कसें यावर देखरेख ठेवण्यासाठी जागोजाग कामगार नेमिले सवास अशी निक्षून ताकीद होती कीं, सर्व लहानथोर लोकाचा यथोचित आदरसत्कार करण्यात कोणी यत्किंचित्‌हि कसूर करू नये त्या आदरसत्काराच्या कामावर चागल्या इमानी व स्वामिकार्यनिष्ठ अशा कामगाराची निवड करून समारभाच्या पहिल्या दिवसापासून शेवटल्या दिवसापर्यंत प्रत्येक दिवशी प्रात काळापासून सायंकाळपावेतो प्रत्येकाने कोणकोणती कामे करावी, कसकसे साहित्य मिळवावे व तयार करावे, कोणकोणास कायकाय द्यावे याचे नियम करून जाबते लिहून ज्याचे त्याजपाशी देऊन ठेविले पुन घ्या घ्या ह्मणण्याची किंवा आह्मांला अमुक काहीं मिळालें नाहीं असें ह्मणण्याची पाळी न येऊन सर्व व्यवहार बिनबोभाट व अगदीं घोटाळा न होता व्हावा असा बंदोबस्त करून ठेविला त्यामुळें गडावर व गडाखालीं हजारों लोकाचा जमाव जमला असूनहि त्या सर्वांची बरदास्त नेमलेल्या कामगारांनीं उत्तम प्रकारें ठेविली. ज्यांनीं त्यांनीं

आपणास नेमून दिलेलीं कामें ठरविलेल्या नियमानुसार मोठ्या उत्साहानें व निरलसपणें केली

ह्याप्रमाणें समारंभास लागणारी एकंदर सामुग्री सिद्ध होऊन येणाऱ्या पाहुण्याची सर्व सोय यथास्थित केल्यावर पहिल्यानें ज्येष्ठ शुद्ध चतुर्थीस व्रतबंधसमारभ सुरू झाला[१] हा विधि दोन दिवसात उरकून घेतला ह्या दोन दिवसात एक लक्ष ब्राह्मणभोजन झाले सर्व ब्राह्मणास एकएक रुपया दक्षिणा दिली पंडित, वैदिक व इतर शिष्ट ब्राह्मण याची सभावना यथायोग्य केली एकट्या गागाभट्टास सात हजार होन ह्या वेळी मिळाले, व इतर ब्राह्मणास १७००० होन मिळाले व्रतबध केल्यावर महाराजास गायत्रीमत्र शिकविला, आणि क्षत्रियानी पाळावयाच्या शास्त्रविहित नियमाचे त्याजकडून पठन करविलें, असें ह्मणतात[२] नंतर षष्ठीस प्रथमपटबंधनविधि करून पुण्याहवाचनपूर्वक यज्ञास आरभ

---

[१] ह्या समारभापूर्वी महाराजानी स महिन्यात चिपळुणास जाऊन तेथल्या परशुरामाचे दर्शन घेतले, आणि परत रायगडावर आल्यावर चार दिवसानी प्रतापगडावर जाऊन तेथे स्वत प्रतिष्ठापित केलेल्या भवानीचे दर्शन घेतले ह्या वेळी ह्या देवीला त्यानी सवामण सोन्याची छत्री व इतर बहुमोल वस्तु वाहिल्या तिकडून आल्यावर त्यानी आपल्या घराण्याचा उपाध्याय बाळभट्ट याच्या साहाय्याने महादेव व भवानी याची बरेच दिवस एकसारखी पूजाअर्चा केली

[२] ह्या वेळी महाराजानी असा आग्रह धरला ह्मणतात की, माझे क्षत्रियत्व ज्या अर्थी आता सिद्ध व मान्य झाले आहे त्या अर्थी माझ्या राज्याभिषेकविषयक पुढील कार्यात वेदोक्त मत्र ह्मणावे, इतर द्विजाप्रमाणे मलाहि ते श्रवण करण्याचा अधिकार आता प्राप्त झाला आहे हे त्याचे ह्मणणे जमलेल्या ब्रह्मवृंदास बिलकूल मान्य झाले नाही त्याच्या सारखी खळबळ उडाली ते ह्मणू लागले की, कलियुगात फक्त ब्राह्मण तेवढे द्विज उरले आहेत ह्या त्याच्या अट्टाहासामुळे प्रत्यक्ष गागाभट्टसुद्धा गागरून गेला, आणि त्याने वैदिक मत्राचा उच्चार त्या समारभात मुळी केला नाही असे ह्मणतात ' सगळे विधि पुराणोक्त मत्र ह्मणून उरकून घेतले ' कोणी ह्मणतात की, त्या वेळच्या द्रव्यलोभी ब्राह्मणानी वेदमत्र ह्मटले असावे, पण ते महाराजाच्या कानी न पडतील अशा बेताने उच्चारले असावे तारीख इ शिवाजी नामक यवनी बखरीत असा उल्लेख आहे की, आपल्या कार्यात वेदमत्र ह्मणण्यास हरकत घेणाऱ्या ब्राह्मणास आपल्या दिवाणी व लष्करी खात्यातून काढून टाकावे व धर्मकर्मविधि व देवपूजा करण्याच्याच कामास ते लायक आहेत असे ठरवावे, असे महाराजानी मनात आणून आपल्या पदरच्या पुष्कळ ब्राह्मणास कामावरून दूर करून त्याच्या जागी कायस्थास नेमिलें. परतु मोरोपत पिंगळ्याने ब्राह्मणाच्या तर्फे रदबदली केल्यामुळें महाराजानीं असे करण्याचें रहित केले.

झाला विनायकशाति, नक्षत्रशांति, ग्रहशाति आदिकरून राज्याभिषेकांगभूत सर्व शास्त्रविधि यथासाग केले.[१] ऋत्विज व यजमान ( महाराज ) इतके दिवस दुग्धफलादिकाचा आहार करून व्रतस्थ राहिले ह्या सहासात दिवसात नित्य पन्नास हजार ब्राह्मणभोजन झालें समारभास आलेल्या पाहुण्यास दररोज निरनिराळ्या प्रकारचें मिष्टान्नभोजन घातलें, व त्याच्या जागोजाग सभा करवून गायनवादनादिकेकरून त्याचे मनोरजन केलें नाना प्रकारच्या मंगलवाद्यानी तो गड जसा काय दणाणून गेला[२]

शेवटी त्रयोदशीचा सुमगल दिवस प्राप्त झाला. इष्टमित्राची व स्वामिनिष्ट सेवकजनाचीं हृदयें आनदोर्मीनी उचवळू लागलीं. अभिषेकसमारभ अवलोकन करण्याची सर्वास उत्कठा लागून राहिली मग महाराजानी अष्ट प्रधानाची योजना केली, लेखकद्वय–एक पत्रलेखक व दुसरा गणकलेखक असे नेमिले, द्वादशकोश ( बारा महाल ), अष्टादश शाला (अठरा कारखाने) इत्यादिकावरील अधिकारी, देशाधिकारी, नगराधिकारी असे पृथक्पृथक् नेमिले ह्या सर्वास मगलस्नान करावयास सागून महाराजानी स्वत मगलस्नान केले. मृत्तिकास्नान, पचगव्यस्नान, गगादिपुण्यतीर्थोदकस्नान, पचामृतस्नान हीं त्यानी विधियुक्त केलीं. सर्वानी शुभ्र वस्त्रे, गंध, पुष्पे व अलकार हीं धारण केलीं क्षीरवृक्षाचे आसन सवाहात उच व तितकेच रुद करून ते सुवर्णाने मढविले होते, त्यावर महाराजानी आरोहण केलें पट्टराणी सोयराबाई पटबंधन करून जवळ बसली व युव-

---

१ ह्या वेळीं कित्येक ब्राह्मण ह्मणू लागले का, महाराजानी आजपर्यंत अनेक शहरे लुटून जाळूनपोळून टाकली आहेत, त्यामुळे पुष्कळ ब्राह्मण, गाई, स्त्रिया व मुले यांचा नाश झाला आहे याचे त्यास मोठे पातक लागले आहे ह्या पातकाचे क्षालन झाल्यावाचून त्याची शुद्धि होऊन ते प्रस्तुत विधींस पात्र व्हावयाचे नाहीत ही पातकमुक्ति होण्याचा सोपा उपाय त्यानी असा सुचविला की, त्याबद्दल ब्राह्मणास आठ हजार रुपये दक्षिणा म्हणून वाटावे ही रक्कम अर्थात् महाराजानी ब्राह्मणासे तत्काळ दिली. प्रो. सरकार पृ २७४

२ इग्रज व डच व्यापाऱ्यांच्या ह्या वेळच्या लेखावरून असे कळते की, महाराजानी व्रतबधविधि आटोपल्यावर लागलीच आपला आणखी एक विवाह करविला हा अर्थात् त्याचा तिसरा विवाह होय हा विवाह त्यानी वेदमत्र ह्मणावयास लावून करविला असा जेध्याच्या शकावलीत उल्लेख आहे अभिषेकसमारभ झाल्यावर त्यानी आपला आणखी एक विवाह करविला, असेहि ह्या व्यापाऱ्याच्या लेखावरून कळते.

राज संभाजीहि सन्निध बसला. पूर्वेस मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे हाती घृतपूर्ण सुवर्णकलश घेऊन उभा राहिला दक्षिणेस सेनापति हंबीरराव मोहिते दुग्धपूर्ण रौप्यकलश घेऊन उभा राहिला पश्चिमेस रामचंद्र नीलकंठ पंडित[1] अमात्य दधिपूर्ण ताम्रकलश घेऊन उभा राहिला उत्तरेस छंदोगामात्य प्रधान रघुनाथ पंडितराव मधुपूर्ण सुवर्णकलश घेऊन उभा राहिला ह्याजपाशी मृत्तिकामय कुंभात समुद्र-जल व महानद्यांचे[2] जल भरून ठेविलें उपदिशाच्या ठायी कर्मेंकरून आग्नेयीस अण्णाजी दत्तो पंडित सचिव छत्र घेऊन उभा राहिला नैर्ऋत्यभागी जनार्दन पंडित हणमंते[3] सुमंत व्यजन घेऊन उभा राहिला वायव्यदिशेस [illegible] पंडित मंत्री[4] चामर घेऊन उभा राहिला ईशान्य भागी बाळाजी पंडित[5] न्यायाधीश दुसरे चामर घेऊन उभा राहिला सन्मुख मध्यभागी पत्रलेखक बाळाजी आवजी लेखनपात्र घेऊन उभा राहिला वामभागी [illegible]लेखक चिमणाजी आवजी लेखनपात्र घेऊन उभा राहिला आसमंताद्भागी सर्व [illegible] व शाला यांचे अधिकारी उभे राहिले सुहृज्जन व मांडलिक राजे सभोंवते उभे राहिले याप्रमाणे सर्व जण उभे राहिल्यावर अभिषेकास आरंभ झाला सुवर्णपात्र शतछिद्र करून त्यात उदक घालून त्याचा, व प्रधान जे कलश घेऊन उभे राहिले होते त्यातील द्रव्याचा महाराजास यथाशास्त्र मंत्रोच्चारपूर्वक अभिषेक केला त्या समयी सर्व मंगल वाद्यांचा व कलावंतिणी, गवय्ये इत्यादिकांच्या नृत्यगायनाचा एकच घोष सुरू झाला हा विधि आटोपल्यावर महाराजास पुनः मंगलस्नान घालून सुवासिनींनी आरत्या केल्या कांस्यपात्र घृतपूरित करून त्यात व आदर्शांत त्यास स्वमुख पाहावयास सांगितलें एवढा विधि झाल्यावर ब्राह्मणास दक्षिणा दिल्या नंतर पुनः शुभ्र वस्त्रे परिधान करून ते सिंहासनावर आरोहण करण्याच्या मुहूर्ताची वाट पाहत राहिले

महाराजानीं सिंहासनहि शास्त्रोक्त प्रकारें तयार केलें होते तो प्रकार असा. प्रथम क्षीर, वट व औदुंबर ह्या वृक्षांच्या लाकडाची वेदी करून ती सुवर्णाच्या

---

१ सभासद यांचे नाव नारो नीलकंठ असे देतो.

२ ह्या महानद्या ह्मटल्या म्हणजे कृष्णा, गोदावरी, यमुना, गंगा व कावेरी ह्या होत.

३ चिटणीस याचे नाव त्रिंबक सोनदेव असे देतो, व सभासद त्रिंबक सोनदेवाचा पुत्र रामचंद्रपंत असें नांव देतो.

४ सभासद याचे नांव निराजीपंत असें देतो.

५ चिटणीस याचे नांव निराजी रावजी असें देतो.

तगटांनी मढवून रत्नखचित केली होती. त्या तगटावर वृषभ, मार्जार, तरस, सिंह व व्याघ्र याची चित्रे अनुक्रमें एकावर एक अशी चोहों बाजूंस कोरलीं होतीं याला सोन्याचे आठ स्तभ असून त्या प्रत्येकावर एक एक सिंह सोन्याचा बसविला होता, आणि त्यावर चित्रविचित्र वृक्ष, फले, पुष्पे, वेली, पक्षी, व मच्छ कूर्मादि जलचर याची चित्रे दाखविलीं होती त्याप्रमाणेंच नृत्यागना ततुवाद्ये हातीं घेऊन नाचताहेत अशी चित्र त्यावर कोरली होती [1] अशा सशास्त्र सिद्ध केलेल्या सिंहासनावर प्रथम मृगचर्म घालून त्याच्यावर काहीं सुवर्णद्रव्य घातलें होते मग त्याच्यावर व्याघ्रचर्म घालून त्याच्यावर मृदु कार्पास आसन घातले होते, व ते मखमालीने मढविले होते त्यावर लोडे व तक्के ठेविले होते त्यास बादलीजरी वस्त्राचीं आच्छादने घातली होती सिंहासनास मागे प्रभावळ करून त्यास छत्र लाविले होते हे छत्र जडावाचे असून त्याला मोत्याच्या झालरी होत्या त्यावर मडप असून त्यास सुवर्णमय वस्त्राचा चादवा लाविला होता, व त्यास मुक्ताफळाचे घोस अटकविले होते ही अशी सिंहासनाची व्यवस्था करून उत्तम लक्षणाचे गज व अश्व चागले सजवून व सुवर्णाच्या अलकारानी सुशोभित करून सभामंडपासमोर उभे केले होते सिंहासनारोहणमुहूर्त समीप आला तेव्हा श्रीविष्णूची सुवर्णमय प्रतिमा तयार केली होती, तिची षोडशोपचारे पूजा करून महाराजानी ती सव्य हस्ताच्या ठायी स्थापन केली, व मुहूर्तघटिका भरताच सर्व ब्रह्मवृंदास नमस्कार करून त्याचा वेदमत्रोच्चारपूर्वक आशीवाद घेतला, आणि मातुश्रीस नमस्कार करून तिचा प्रेमपुर सर आशीर्वाद घेतला, व ती विष्णुमूर्ति तशीच हातात धारण करून ते सिंहासनारूढ व्हावयास गेले महाराजानी सिंहासनाच्या सव्य अगास पहिल्याने जाऊन सव्य जानु टेकून नमस्कार करून पाय न लाविता पूर्वेकडे मुख करून आरोहण केले, व सिंहासनाच्या अष्ट स्तंभी अष्टप्रधान बद्धाजलि उभे राहिले ते येणेप्रमाणे पहिल्याने उजवे बाजूस धर्माध्यक्ष पंडितराव, डावे बाजूस मुख्य प्रधान ( पेशवे ), त्याच्या मागे उजवे बाजूस सेनापति ( सरनोबत ), डावे बाजूस अमात्य ( मुजुमदार ), त्यांच्या मागें उजवे बाजूस सुमंत ( डबीर ), डावे बाजूस सचिव ( सुरनीस ), त्याच्या मागें उजवे बाजूस मंत्री ( वाकनीस ) व डावे बाजूस न्यायाधीश. युवराज

---

१ ह्या सगळ्यास एकदर तीन खडी बत्तीस शेर व बत्तीस मासे सोने लागलें होते असें काही बखरकार ह्मणतात.

संभाजी, महोपाध्याय गागाभट्ट व मुख्य प्रधान मोरो त्रिंबक पिंगळे हे सिंहासना-सन्निध उच्चासनावर बसले; आणि इतर दरबारचे लोक व आमंत्रित महाजन आपआपल्या दर्जाप्रमाणे आपल्या नेमलेल्या जागीं उभे राहिले सिंहासनारोहण झाल्याबरोबर नौबती, चौघडे वगैरे एकदर मंगलवाद्यांचा एकच गजर होऊन राहिला, नृत्यगायनादि सुरू झालीं सर्व प्रेक्षकांनी एकच जयघोष केला त्या नादाने सर्व दिशा दणाणून गेल्या एकदर ब्रह्मवृंदाने आशीर्वादवचनाचा दीर्घ स्वराने उच्चार केला महोपाध्याय गागाभट्ट पुढे सरसावून सोन्यामोत्याच्या झालरी लावलेले छत्र स्वहस्ते उचलून महाराजाच्या मस्तकावर धरून दीर्घ स्वराने ह्मणाला "शिवछत्रपति सदा विजयी होवो" तोफांची सरबत्ती सुरू झाली स्वराज्यांतील प्रत्येक किल्ल्यास अशी सूचना केली होती की, एका किल्ल्या-वरच्या तोफा दुसऱ्या किल्ल्यावर ऐकू जाताच तेथे त्या सुरू कराव्या त्याप्रमाणे राज्यांतील एकंदर किल्ल्यांवर एकदम तोफांची सरबत्ती सुरू झाली

सिंहासनारूढ झाल्यावर महाराजांनी पूर्वीचा शुभ्र पेहराव उतरून लाल वस्त्रे परिधान केली चौकडे, कंठ्या, माळा, शिरपेच, तुरा, झगा पोंच्या असे अलंकार अंगावर घातले, व धनुष्यबाण व तलवार यांचे पूजन मंत्रविधिपूर्वक करून तीं शस्त्रे हातांत घेतली त्या समयी त्यांजवर लोकांनी सोन्यारुप्याच्या पुष्पांची वृष्टि केली ब्राह्मणांच्या सोळा सुवासिनींनी त्याला आरत्या केल्या, त्यास वस्त्रे भूषणे दिली सिंहासनावर बसल्यावर जे काहीं आणखी मंत्रविधि करावयाचे होते ते करून महाराजांनी ब्राह्मणांचे आशीर्वाद घेतले ऋत्विज, आचार्य व ब्राह्मण यांची पूजा करून त्यास मुबलक दक्षिणा दिल्या ह्या वेळी गागाभट्टास एक लक्ष रुपये दक्षिणा व बहुमोल वस्त्रभूषणादिक देऊन गौरविले सर्व ऋत्विजास पांच पांच हजार रुपये दक्षिणा दिली पुरोहितास चोवीस हजार रुपये दक्षिणा दिली शिष्ट ब्राह्मणमंडळीपैकीं जे जसे न्यूनाधिक विद्वान् होते त्या मानाने त्यास हजारहजार, पांचपांचशे, दोनदोनशे रुपये दक्षिणा दिल्या इतर झाडून साऱ्या ब्राह्मणास पंचवीसपंचवीस रुपये सरसकट दिले शिवाय गोसावी तडीतापसी, गोरगरीब, भिकारी वगैरे लोकास पांचपांच, चारचार, दोनदोन असे रुपये वाटले मोठमोठ्या साधुसंतास व धर्मपरायण ब्राह्मणास गांव व वतनें इनाम करून दिली महाराजानीं ह्या वेळी आपली सुवर्णतुला केली तिचे सोळा हजार होन वजन भरलें हे होन अर्थात् ब्राह्मणास वाटून दिले[1]

---

१ ह्या सोळा हजार होनांचे वजन सरासरी एकशे चाळीस रत्तल ह्मणजे मुंबईचे पांच मण होते. नुसती सुवर्णतुला करवूनच ब्राह्मण तृप्त झाले नाहीत. त्यांस सुवर्णादि

ह्यानंतर अष्टप्रधान, सुभेदार, दरखदार, महालदार, कारखानदार व इतर अधिकारी यास अधिकाराची वस्त्रे दिली मुख्य प्रधान व सेनापति यास बादली वस्त्रे पाच, सणगे व शिरपेच, मोत्याचे तुरे, कंठ्या, चौकडे, झगे, शिकेकटार, ढालतलवार, चौघडे, नोबती जरीपटके, हत्ती, घोडे, सोन्याच्या दांडीच्या चवऱ्या इत्यादि देऊन करारपत्रे करून पदे दिली अमात्यास बादली वस्त्रे, पोषाख, ढालतलवार, चौकडा, कंठी, तुरा, शिरपेच, शिकेकटार, रुप्याचे कलमदान, चवरी, हत्ती, घोडा अशी दिली असेच सचिव सुमंत, मंत्री पंडितराव व न्यायाधीश यास वस्त्रालंकार दिले ही दिलेली पदे अष्टप्रधानानी बहुमानपुरःसर घेऊन महाराजांस नजरा करून मुजरे केले प्रत्येक प्रधानास महाराजानी एकएक लक्ष होन बक्षीस दिले मग बाळाजी आवजी यास चिटणिशीची वस्त्रे दिली त्यास मंदील, दुमजला दुपेटा, जगा, विजार, कंठी, शिरपेच, चौकडा, रुप्याचे कलमदान चवरी घोडा, अशी दिली अशीच चिमणाजी आवजीस गणकलेखकाची वस्त्रे दिली त्यानीहि नजरा करून मुजरे केले अष्टप्रधानास मुतालिक करून दिले ह्या मुतालिकासहि वस्त्रे दिली राजाज्ञापत्र शंकराजी नीलकंठ महागावकर यास दिले शामजी नाईक पुंडे यास फौजेच्या बक्षीगिरीची वस्त्रे देऊन ढालतलवार व दांडीचे कलमदान अशी दिली वरकड सुभेदार, महालदार, कारखानदार, फौजेचे सरदार व मानकरी यास अधिकाराची वस्त्रे दिली

याप्रमाणे सर्व अधिकाऱ्यास वस्त्रे देऊन व त्यांच्या नजरा व मुजरे घेऊन महाराज चांगला सुलक्षण घोडा सोन्याचे व जडावाचे सामान घालून सज्ज करून आणिला होता त्यावर बसून राजांगणात आले, व येथे सोन्याची अंबारी, मोत्याचे अलंकार, जरीबाब गाशे व झालरा अशी घालून सुशोभित करून एक हत्ती उभा केला होता त्यावर आरूढ झाले ह्या हत्तीच्या मस्तकी सेनापति एका हातात मोरचेल व एका हातात अंकुश घेऊन बसला पाठीमागे खवासीत मुख्य प्रधान मोरचेल घेऊन बसला वरकड प्रधान व मुतालिक दुसऱ्या हत्तीवर बसले. नंतर खाशामागून चालणारे तेवढे सरदार हत्तींवर व घोड्यावर बसले, आणि स्वारी देवदर्शनास चालली ह्या स्वारीची रचना येणेंप्रमाणें केली होती. अघाडीस

---

सप्त धातूंशी तोललें, आणि तलम ताग, रेशीम, कर्पूर, लवण, जायफळ वगैरे मसाले, घृत, शर्करा, नानाप्रकारचीं फळें, मद्ये, तांबूल व इतर खाद्य पदार्थ यांच्याशींहि त्यांस निरनिराळें तोललें, आणि ह्या सगळ्या तोललेल्या वस्तु ब्राह्मणास वांटून दिल्या.

जरीपटका व भगवे निशाण याचे दोन हत्ती चालले, त्याच्यामागे प्रधान व सेनापति याचे जरीपटक्याचे हत्ती व सर्व फौजेंतील निशाणे चालली, ह्या निशाणाबरोबर हुजूरपागेचे व करोलटोकाचे अमलदार आपआपले घोडे सोन्यारुप्याच्या सामानाने शृंगारून, उत्तम वस्त्राभरणे लेवून व हाती बंदुका घेऊन बिनीच्या संरक्षणासाठी चालले त्याच्या मागून गाड्यावरून तोफा चालविल्या, त्याच्या मागून घोड्याच्या गाड्या चालविल्या, त्याच्या मागून शूर योद्धे कोणी हत्तीवर व कोणी घोड्यावर बसून चालले, त्याच्या मागून बिटेकरी, पट्टेकरी, सांगबर्चीवाले, बाणकरी असे निरनिराळे पायदळचे लोक चालले त्याच्या मागून खासबारदार व बंदुकवाले लोक चालले, त्याच्या मागून तासे, मर्फे, हलग्या वगैरे रणवाद्ये वाजवीत वाजंत्री चालले, त्याच्या मागून पन्नास कोतवाल हत्ती, शंभर सांडणीस्वार व उंटावरून बाणाच्या कैच्या चालल्या, त्याच्या मागून पन्नास कोतवाल घोडे चालले, त्याच्या मागून शहाबाजे वाजविणारे, काळूसनया वाजविणारे, घोड्यावरून नगारे वाजविणारे, करणेकरी, शिंगाडे इत्यादि मंगलवाद्ये वाजवीत चालले, त्याच्या मागून धाडी गाणारे, भाट व बंदिजन प्रतापवर्णन करीत चालले, त्याच्या मागून लग्या, निशाणे भाले व बोथाट्या घेतलेले लोक, चोपदार व वेत्रधारी हे चालले, त्याच्या मागून मराठे शूर मल्ल व जेठीलोक हत्तीवर बसून चालले, त्याच्यामागे महाराजाचा हत्ती चालला असून त्याच्या सभोवती मावळे सरदार मोठमोठे अलंकार व पोषाख लेवून दुरून चालले, त्याच्या मागून प्रधानमुत्सद्दी व इतर बडे अधिकारी यांचे हत्ती चालले व ह्या सर्वांच्या मागून आणखी कांहीं फौज चालली अशा थाटाने स्वारी देवदर्शनास गेली

सर्व रस्ते झाडून साफ करून शृंगारले होते मार्गात जागोजाग सडे घालून रांगोळ्या घातल्या होत्या सर्व घरे रंगवून सुशोभित केलीं होती जिकडेतिकडे ध्वज, पताका, तोरणे लाविली होती सर्व नगरदेवताच्या पूजा यथासांग करून त्यांस नैवेद्यादिकाचे अर्पण करविले होते स्वारी मिरवतमिरवत निघून देवतांचें दर्शन करून, त्यांस वस्त्रालंकार अर्पण करून व ब्राह्मणादि पुजाऱ्यास दक्षिणादिकानीं संतुष्ट करून माघारीं फिरली परत येताना रस्त्यांतून सुवासिनींनी मंगल आरत्या केल्या, व माड्यावरून दहीं, लाह्या, पुष्पे, दुर्वा यांची महाराजांवर वृष्टि केली. ह्याप्रमाणे परत राजद्वारीं आल्यावर महाराज रथात बसून

राजांगणात गेले, व तेथून शिबिकेंत बसून सभाद्वारीं आले. तेथे पोंचल्यावर त्यांच्या वरून भरलेला कलश व निंबलोण हीं उतरून टाकिली असें करणारांस वस्त्रालंकार देऊन त्यांनी गृहप्रवेश केला

वाड्यात आल्यावर प्रथम महाराजानी कुलदेवतेचें दर्शन घेतलें, व मग प्रिय मातेस नमस्कार केला राण्यांनीं आरत्या ओवाळिल्या, त्यास अमूल्य वस्त्राभरणे दिलीं मग पुन माघारीं येऊन ते सिंहासनावर बसले, व सर्वांच्या नजरा[1] व मुजरे घेऊन त्यास पान, गुलाब अत्तर वगैरे देऊन त्यांनी निरोप दिला मग ब्राह्मणभोजनें झाली व महाराजांनी सर्व सुहृज्जन व इष्टमित्र यासमवेत बसून भोजन केले माडलिक राजे व इतर आप्तजन याचा बहुमान करून व त्यास वस्त्रालंकारादिकानी गौरवून निरोप दिला गुणिजन आले होते त्यास मोठमोठ्या बिदाग्या देऊन संतुष्ट केलें ह्याप्रमाणे हा राज्याभिषेकसमारंभ मोठ्या थाटानें व निर्विघ्नपणे पार पडला समारंभास आलेले एकदर लोक मोठा संतोष पावून महाराजांच्या ऐश्वर्यसंपन्नतेची व औदार्याची वाखाणणी करीत स्वस्थानी गेले ह्या समारंभास लागलेल्या एकदर खर्चाचा आकडा एक कोटि बेचाळीस लक्ष होन एवढा झाला असें ह्मणतात

महाराजानी क्षत्रियकुलावतंस श्रीराजाशिवछत्रपति असा किताब धारण केला कागदोपत्रीं आपल्या राज्याभिषेकापासून नवा शक लावू लागले, व स्वराज्यातील एकदर लोकास हा शक चालू करण्याची ताकीद दिली राज्याभिषेक शके १५९६ ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशीस झाला ह्या दिवशी इंग्रजी तारीख ६ जून इ स० १६७४ ही होती ह्याप्रमाणे अगदी लहान वयात जो अत्यंत स्तुत्य हेतु मनात धरून इतकीं वर्षे तत्सिद्ध्यर्थ अव्याहत परिश्रम केला तो पूर्ण होऊन त्यांनी स्वराज्यसंस्थापना व सशास्त्र सिंहासनारोहण करून महाराष्ट्रात स्वताचा नूतन शक चालू केला[2]

---

[1] ह्या वेळी कित्येक राजेरजवाड्याकडून महाराजास नजराणे आले असे ह्मणतात परंतु त्यांचीं नावें कोठेहि दिलेली नाहींत गोवळकोड्याच्या कुतुबशहाचा वकील हत्ती, घोडे, जवाहीर वगैरे नजर घेऊन आल्याचा मात्र स्पष्ट उल्लेख आहे

[2] यास राज्याभिषेक-शक अशी संज्ञा दिली ह्या एका गोष्टीवरून महाराजाच्या ठायीं निरभिमानता किती वसत होती हे व्यक्त होते विक्रम शक, शालिवाहन शक हे जसे त्या त्या राज्यसंस्थापकाच्या नावानी प्रवृत्त झाले, तद्वत् महाराजानीं हा नवा शक स्वनामाने चालू करणे पूर्वक्रमसिद्ध होतें. तथापि स्वनामाचा बडेजाव वाढ-

त्यांचा हा अभिषेकसमारंभ असा थाटाचा झाल्याचें वर्तमान यवनपादशहांस कळलें तेव्हा ते किती खिन्न झाले असतील हें काहीं सागावयास नको. त्याचा हा वेळपावेतो असा समज होता कीं, शिवाजीमहाराज किती झाले तरी एक मोठेसे पुंड किंवा पाळेगार ह्मणता येतील, ते कांहीं आपल्या सारखे राजपदाधिकारी पादशहा नव्हत यास्तव त्याच्याविषयी भाविक प्रजाजनाच्या ठायी वास्तविक पूज्यभाव बसावयाचा नाहीं त्याचे बड मोडून टाकिलें ह्मणजे ते होते नव्हते असें होऊन त्याची कोणाला आठवण सुद्धा उरणार नाहीं परंतु हा त्याचा हिशोब अगदी चुकला. ज्या महावीर्यशाली पुरुषाचा स्वराज्यस्थापनेविषयींचा दृढ सकल्प पहिल्यापासून झाला होता तो नुसते यवनाचे प्रात व किल्ले काबीज करूनच राहील व सर्व प्रजेच्या चित्ताच्या ठायी स्वताविषयीं वास्तविक पूज्यत्वबुद्धि उत्पन्न होईल असे करण्याचा एक मोठा उपाय जो सशास्त्र राज्याभिषेकविधि त्याचा अवलब करण्यास ह्मणजे तो चुकेल हें कालत्रयीं घडणें नाहीं महाराष्ट्रातील ब्राह्मणानी महाराजाच्या ह्या विचारास शास्त्राच्या हरकती दाखविल्या तरी यत्किंचित्‌हि निरुत्साह न होता त्यानी काशीच्या व पैठणच्या महापंडिताच्या साहाय्याने हा विधि यथासाग करविला. खरें ह्मटले असता महाराज क्षत्रियकुलोत्पन्न असल्याविषयी त्या वेळच्या कोणत्याहि पडितास व ब्राह्मणास सशय नव्हता परतु सस्कारलोपास्तव त्याच्या पदरी शूद्रत्व बाधण्याचा कित्येकाचा प्रयत्न होता अशा पडिताची तोडें बद करण्यासाठी त्यास गागाभट्टादि परस्थ पडिताचे साहाय्य घ्यावे लागले कसेंहि असो परंतु खऱ्या क्षत्रियास उत्तम प्रकारे शोभणारे महापराक्रम करून ज्या महापुरुषाने महाराष्ट्रीयास यवनाच्या ताबेदारीतून सोडवून स्वराज्य व स्वातंत्र्य याचा अनुभव घडविला त्याचे क्षत्रियत्व त्या वेळच्या सर्व समजस व कृतज्ञ जनास अमान्य होणे शक्य नव्हतें सपादिलेलें स्वराज्य चिरायु करण्याचा व हिंदुपदपादशाहीचा खंबीर पाया घालण्याचा हा राजपदारोहणरूप उपाय योजण्यात महा-

---

विणें त्यास युक्त दिसले नाही हा राज्याभिषेक शक महाराष्ट्रात जवळ जवळ १०४ वर्षें चालला स १७७७ त पेशव्याच्या हाती राज्यसूत्रें सर्वस्वी जाऊन साताराचे छत्रपति त्याच्या हाती केवळ बाहुल्यासारखे झाले तेव्हा नानाफडणीस व सखाराम बापू यांनीं दुसरा शाहू स. १७७७ त गादीवर बसल्यावर महाराजांनीं सुरू केलेला हा शक बंद करून त्याच्याविषयींच्या कृतज्ञतेचा व पूज्यताबुद्धीचा होम आत्मपरता व स्वयमन्यता एतद्रूप अग्निकुडात केला !

राजांनी मोठीच दीर्घदृष्टि दर्शविली यांत कांहीं शंका नाहीं. ह्यानंतर सर्व रजपूतराजे व इंग्रज, डच, फ्रेंच, फिरंगी वगैरे परदेशस्थ[1] लोक महाराजास विशेष मान देऊं लागले हें उघडच आहे. पण अदिलशहा, कुतुबशहा व मोगलबादशहा यांसहि आतां महाराजाला बरोबरीचा मान देणें प्राप्त झालें. ह्यापूर्वी एकंदर लोकांस त्याचा धाकच विशेष वाटत असे. परंतु आतां धाक व मान ह्या दोन वृत्ति त्याच्या ठायीं उत्पन्न झाल्या.

राज्यारोहणानिमित्त महाराजाच्या राज्यांत सर्वत्र आनंदोत्सव चालला असतां एक अत्यंत खेदजनक गोष्ट घडून आली. ती अर्थात् जिजाबाईमातुश्रीचें देहावसान ही होय. ज्या परमपूज्य व अत्यंत प्रेमळ मातेच्या शिक्षणानें उपदेशानें व सतत प्रोत्साहनानें हा एवढा प्रचंड उद्योग महाराजांनीं हातीं घेऊन असा यशोलाभास आणिला, व स्वपुत्र सर्वत्र विजयी होऊन व राजपदारूढ होऊन नृतन शककर्ता झाल्यानें जिच्या आनंदास पारावार नाहींसा झाला होता, ती हा सुखसोहळा पाहावयास फार दिवस जीवंत राहिली नाहीं. राज्याभिषेकसमारंभ आटोपल्यावर दहाबारा दिवस झाले नाहींत तोंच एकाएकीं कांहीं विकार होऊन तिचा त्यांत अंत झाला. ह्या ऐन आनंदभरांत असा अकस्मात् मातृवियोग झाल्यामुळें महाराजाला अतोनात दुःख झालें. आपली ऐश्वर्यवृद्धि पाहून जिला वास्तविक समाधान व उत्साह वाटावयाचा ती आपली अत्यंत प्रिय जननी आपणास सोडून गेल्यामुळें त्यास सर्व ऐश्वर्य शून्यवत वाटूं लागलें. महाराजाच्या ठायीं मातृभक्ति किती निःसीम होती हें ह्या समयीं लोकांच्या नजरेस उत्तम प्रकारें आलें. मातेची उत्तरक्रिया त्यांनीं लक्षावधि रुपये खर्चून यथासांग

---

१ ह्या परस्थ व्यापाऱ्यांचे प्रतिनिधि राज्यारोहणसमारंभाच्या समयीं रायगडावर गेले असून त्यांनीं सगळे विधि प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहून त्यांचें वर्णन आपल्या लेखांत नमूद करून ठेविलें आहे. तें बहुतेक सदरील वृत्तांताशीं बरेच जुळतें आहे. मुंबइचा इंग्रज व्यापाऱ्यांचा अध्यक्ष हेन्री ऑक्सेन्डन व त्याचा दुभाषा नारायण शेणवी व वेंगुर्लें येथील डच व्यापारी आब्राहाम यांचे एतत्संबंधाचे लेख आहेत. ऑक्सेन्डन यानें एक हिऱ्याची आंगठी महाराजास नजर करावयास नेली होती. महाराज सिंहासनारूढ होऊन लोकांचे नजराणे स्वीकारूं लागले तेव्हां नारोजीपंतानें ऑक्सेन्डन व नारायण शेणवी यास महाराजापुढें नेलें. त्यांनीं दुरूनच मस्तक लववून मुजरा केला आणि नजराणा पुढें केला. महाराजांनीं त्यांचा मुजरा घेऊन व नजराणा स्वीकारून त्यांस सिंहासनापाशीं बोलाविलें आणि शिरपाव नजर करून निरोप दिला.

केली, व ते पर्जन्याचे च र महिने त्यानी रायगडावरच राहून मातृशोकांत घाल-
विले.[1] एवढ्या दिवसात सिहासनारोहण बिलकुल केलें नाहीं मग आश्विन शुद्ध
पचमीच्या सुमुहूर्तावर पुनरपि सिहासनारोहणसभा केली ह्यानंतर अष्टप्रधान व
फौजफाटा बरोबर घेऊन ते रायगडावरून निघून प्रतापगडावर देवीच्या दर्श-
नास गेले तेथून ते रामदासस्वामीच्या दर्शनास गेले, आणि मग शिखरचा महादेव
व जेजुरीचा खडोबा याचे दर्शन घेऊन ते परत रायगडावर आले

---

१ जिजाबाई ता. १८ जून रोजी मरण पावली तिची पाच लाख होन किमतीची
खासगी मत्ता होती, ती सगळी अर्थात् तिनें मरणसमयीं महाराजाच्या स्वाधीन केली

# भाग चोत्रिसावा



## राज्यव्यवस्था.

राज्याभिषेकविधीने स्वराज्यस्थापनेची पूर्तता करून महाराजानी हिंदुपद-पादशाहीची इमारत खबीर पायावर उभारली व सतत तीस वर्षे केलेल्या अविश्रान्त परिश्रमाची सार्थकता केली आता ही पादशाहत सुघटित व चिरायु व्हावी एतदर्थ जे उत्कृष्ट नियम व निषेध त्यानी केले त्याचें यथोपलब्ध वर्णन प्रस्तुत भागात करून मग सिंहासनारूढ झाल्यानतरच्या चरित्र-भागाचे निरूपण करणें इष्ट दिसते ही राज्यव्यवस्था त्यानीं राज्यारोहणविधी-नतर केली असें मात्र कोणी समजूं नये ती त्यानी पूर्वीपासूनच प्रसगोपात्त लावून ठेविली होती किंबहुना तिचा आरभ सैन्य जमवून किल्ले व प्रात काबीज करू लागल्यापासूनच झाला असें ह्मणण्यास हरकत नाहीं

त्या काळी प्रचलित असलेल्या हिंदु व यवनी राज्यपद्धतींची माहिती त्यास उत्कृष्ट होती तीशिवाय आणखी प्राचीन राज्यपद्धतींचें वर्णन ग्रंथातरी आढळते त्याचे पर्यालोचन त्यानी यथावकाश केले होते या सर्व राज्यपद्धतीतील गुण-दोषाचें मनन त्यानी दीर्घ काल करून कालदेशवर्तमानास अनुरूप व रयतेस अत्यत सुखावह अशी राज्यपद्धति कोणती असावी हें त्यानी आपल्या मनाशी ठरवून तिची स्थापना यथाप्रसगी केली यात त्यानी जे धोरण व जी बुद्धिमत्ता प्रगट केली तीस अर्वाचीन किंवा प्राचीन काळच्या इतिहासात जोड मिळणें नाही असें ह्मटले असता अतिशयोक्ति होणार नाहीं राज्य सपादण्यास लाग-णारे वीर्य, शौर्य, युक्तिमत्ता इत्यादि गुण महाराजाच्या ठायी परिपूर्ण वसत असून आणखी सपादित राज्याची सुव्यवस्था लावण्यास लागणारे राज्यव्यवहार-चातुर्य, प्रजापालनपटुत्व इत्यादि गुणहि त्याच्या अगीं अप्रतिम वसत होते हें ह्यावरून सिद्ध होते

राजा एकाद्या दिवाणाच्या मसलतीनें किंवा स्वतांच्याच बुद्धीनें राज्यकारभार चालवूं लागल्यानें सर्व व्यवस्था यथान्याय व यथायोग्य होत नाहीं, व प्रजा-जनास सुख प्राप्त होत नाहीं. याचें कारण उघडच आहे कीं, कोणी कसाहि बुद्धिमान्

पुरुष असला तरी त्याला एकट्याला राज्यांतील एकूणएक घडामोडींचे इत्थंभूत ज्ञान असणे शक्य नसते, त्याप्रमाणेच तो कितीहि नीतिमान् असला तरी त्याच्या हातून सर्व कारभार नि पक्षपानाने व निरपेक्षबुद्धीने होईल हे सहसा शक्य नव्हे आणखी असें कीं, निरनिराळ्या खात्याची व्यवस्था लाविताना एकापासून दुसऱ्यास हरकत किंवा अडचण कोणती आहे ते एकट्यादुकट्याच्या लक्षात येण्याजोगे नसते, आणि सगळ्या खात्याची व्यवस्था सुयत्र लागल्या-वाचून ती सर्व जनास हितकर होणे नाहीं, आणि प्रजाजन नाराज झाल्यानें राज्याच्या बळकटीस अपाय होतो हे तत्त्व महाराजाच्या लक्षात पूर्णपणे येऊन त्यानी सर्व राज्यसूत्रे स्वनाच्या हातीच न ठेविता ती वागविण्याच्या कामी अष्टप्रधानाचें साहाय्य घेतले ही अष्टप्रधानमंडळाची संस्था त्या काळच्या कोण त्याहि राज्यात नसून तिचे अवलबन महाराजाच्या मागे कोणीहि करावे तसें केले नाही पेशव्याच्या हाती सर्व राज्यसूत्रे जाऊन राजा केवळ नामधारी झाला तेव्हापासून तर तिचा सर्वस्वी लोप झाला सांप्रत परकीयाच्या सुधार-लेल्या राज्यपद्धतींत मात्र हे प्रधानमडळाचे तत्त्व आढळते

राज्याभिषेकाच्या वेळी हे अष्टप्रधान कोण कोण होते हे मागल्या भागात सागितलेच आहे आता त्याच्या कामाच्या सबधाने येथे थोडेसें दिग्दर्शन करितो.

( १ ) मुख्य प्रधान ह्मणजे पेशवा, त्याची पदवी अर्थात् राजाच्या खालो-खाल असून त्याची देखरेख मुलखी व लष्करी अशा दोन्ही खात्यावर असे राज्याची एकंदर व्यवस्था सुयत्र चालते कीं कसें ते हा पाही राजाच्या गैर-हजेरीत त्याच्या जागी यानें व्यवस्था पाहावी असें असे राज्यातील इतर काम-दार व अमलदार हे एक दिलाने चालून राज्यव्यवस्थेला योग्य मदत करितील असा बदोबस्त हा ठेवी एकंदर खलित्यावर व फर्मानावर राजाच्या शिक्या-मोर्तबाखाली याचा मोर्तब असे.

( २ ) सेनापति ह्मणजे सरनौबत, ह्याचा अधिकार सर्व लष्करावर असून त्या सबंधाची सगळी व्यवस्था त्याने पाहावी असें असे हे सेनापति दोन असत–एक घोडदळावरचा व एक पायदळावरचा घोडदळावरील सेनापतीचा हुद्दा मोठा असून पायदळावरचा सेनापति त्याच्या हुकमतींत असे असें दिसते. कारण पायदळावरच्या सेनापतीस प्रधानमंडळात जागा नसे.

( ३ ) पंतअमात्य ह्मणजे मुजुमदार, ह्याची देखरेख स्वराज्यातील एकंदर जमाखर्चावर असे सर्व लष्करी व मुलखी खात्याचे व किल्ल्याचे हिशोब ह्यानें पाहावे असें असे सर्व प्रातातील जमाखर्चाचे तक्ते ह्याच्याकडे तपासावयास येत त्यामुळे सर्व अधिकाऱ्याच्या जमाखर्चावर दाब राहून काहीं चूक किंवा अफरातफर झाल्यास ती लागलीच उघडकीस येत असे फाजील खर्चाला मजुरी किंवा कोठलाहि खर्च कमी करण्यासबंधाचा हुकूम हुजरातून मिळावयाचा तो ह्या प्रधानाच्या अनुमतीने व शिफारशीने मिळत असे ह्या कारणास्तव ह्या प्रधानाच्या हाताखाली पुष्कळ कारकून असत व निरनिराळ्या प्रांताचे, लष्कराचे व किल्ल्याचे हिशोब तपासावयास निरनिराळे सरकारकुन नेमिले असत

( ४ ) पंत सचिव ह्मणजे सुरनीस, याची देखरेख सरकारी दफ्तरावर असे स्वराज्यातील निरनिराळ्या प्रांतातील अधिकारी लष्करी अमलदार व किल्लेदार यांच्याकडून येणारी पत्रे व सरकारातून त्यास जाणारे खलिते याची पाहणी करून त्यातील मतलब तपासून पाहण्याचे काम ह्याच्याकडे असे किल्लेदारास द्यावयाची हवालपत्रे इनामपत्रे, सनदा इत्यादिकाची नोंद ह्याने ठेवावी असें असे एकदर सरकारी खात्याच्या दफ्तराची व्यवस्था नीट शिस्तवार ठेविली आहे किंवा कसे ते ह्याने पाहावे ह्या प्रधानाच्याहि हाताखाली पुष्कळ कारकून असत त्याच्या शिक्क्यावाचून कोणताहि सरकारी कागद किंवा खलिता मुलखी किंवा लष्करी अमलदारास जात नसे पंत अमात्य व पंत सचिव हे आपल्या वतीने वर्षाच्या वर्षास आपल्या हाताखालच्या कारकुनास प्रांतोप्रांतीच्या अधिकाऱ्याच्या व किल्लेदाराच्या हिशोबाची व दफ्तराची व्यवस्था नीट आहे की कसें ते तपासण्यास पाठवीत असत हिशोबाचे वगैरे ताळेबंद पाहून काहीं चुका आढळून आल्यास कारकुनास शिक्षा करण्याचा अधिकार त्यास असे कधीं-कधी हे प्रधान स्वत जाऊन एकाद्यादुसऱ्या खात्याची तपासणी करीत असत

(५ ) मंत्री ह्मणजे वाकनीस, याच्याकडे खासगीकडील व्यवस्था असे अठरा कारखाने, बारा महाल, हुजूरपागा व जिलबीचे पायदळ याचा बंदोबस्त नीट राहतो किंवा कसें ते याने पाहावे खासगीकडील दफ्तर व पत्रव्यवहार याच्यावरहि ह्या प्रधानाची देखरेख असे हा आणखी राजाचीं दररोजची कृत्ये, व राज्यात होणाऱ्या घडामोडी याची नोंद ठेवी शिवाय राजाचे आमंत्रित पाहुणे किंवा भेटीस येणारे लोक याच्या तैनातीचे लोक व मानकरी यांच्यावर त्याची सक्त नजर असे. यामुळे राजाचा घात करण्यास कोणाला सवड मिळत नसे.

( ६ ) सुमत ह्मणजे डबीर,ह्याच्याकडे परमुलखाशी होणाऱ्या एकंदर व्यवहाराची देखरेख असे अन्य राजाशीं साम किंवा युद्ध करण्याच्या वगैरे बाबतीत राजाला योग्य सल्ला हा देत असे परराष्ट्रातील बातमी काढण्याचे व परराष्ट्राच्या वकिलाशी बोलणे वगैरे करण्याचे काम याचें असे. परराजाकडून येणारे खलिते व जासूद व त्यास सरकारातून जाणारे खलिते व जासूद याची व्यवस्था लावण्याचे काम याजकडे असे

( ७ ) न्यायशास्त्री किंवा पंडितराव, ह्याने राजास प्रसंगोपात्त शास्त्रार्थ सांगावे, जातीजातीचे बखेडे निवडावे आणि देवस्थाने व सत्पुरुष यास दिलेल्या नेमणुकाची व्यवस्था पाहावी त्याचप्रमाणे सरकारातून होणारे धर्मादाय व धर्मविधि याची व्यवस्था याने पाहावी फौजदारी खटल्यात प्रजेस धर्मशास्त्रानुसार न्याय मिळतो की कसे हे पाहावे, आणि कोणी धर्मबाह्य आचरण केले किंवा काहीं अत्याचार केला तर त्यास शासन करावे व प्रायश्चित सांगावे

( ८ ) न्यायाधीश, याच्याकडे हरएक मुलखी व दिवाणी खटल्यासबधाने लोकास योग्य न्याय मिळत आहे की कसें ते पाहण्याचे काम असे पंचाच्या किंवा मुलखी अधिकाऱ्याच्या हातून मिळालेला न्याय कोणास बरोबर न वाटल्यास त्याने हुजुरास अर्ज करावा, व त्याचा निकाल ह्या प्रधानाने पुरावा पाहून द्यावा, असें असे जमिनीचे हक्क, ग्रामाध्यक्षत्वाचे हक्क इत्यादिकासबधाचे निकाल ह्या प्रधानाच्या सहीने जाहीर होत

ही अशी स्वराज्यातील सर्व खात्याची व्यवस्था निरनिराळ्या प्रधानांकडे सोंपविली असे [१] त्यामुळे जो तो आपआपले काम नीट हुशारीने करण्यास झटत असे एकादें तसेंच बिकट प्रकरण असले तर त्याची सुनावणी ह्या प्रधानानी महाराजापाशी पहिल्याने एकाती करावी त्या प्रकरणाचा ज्या अधिकाऱ्याशीं संबध असे त्यासहि हुजूर बोलवावे ह्याप्रमाणे एकांतीं खलबत झाल्यावर इष्ट दिसल्यास त्याचा खल पुन प्रधानमंडळात व्हावा. ज्यात सर्व राज्याचा सबंध असे अशा बाबींची वाटाघाट प्रधानमंडळात होऊन त्याची शहानिशा सर्वानुमतें

१ ह्या प्रधानाचीं वार्षिक वेतनें येणेप्रमाणें होतीं मुख्य प्रधान, पत अमात्य आणि पंत सचिव यास प्रत्येकीं पधरा हजार होन, आणि मंत्री, सुमंत, सेनापति, न्यायाधीश व पंडितराव यास प्रत्येकीं दहा हजार होन देत असत.

एक चिटणीस, एक फडणीस व एक पोतनीस असे कामगार व इतर कारकून-मंडळी तिच्या एकंदर व्यवहाराची व्यवस्था लावण्यासाठी नेमिली होती तिला कोणत्याहि गोष्टीची उणीव वाटू नये व तिच्या सुखासमाधानात यत्किंचित्‌हि अंतर पडू नये ह्याविषयी महाराज मन पूर्वक जपत.

येथे कथानुषंगाने महाराजाच्या दरबाराच्या रचनेची थोडीशी माहिती देणें इष्ट दिसते दरबारात मध्यभागी मांडलेल्या सिंहासनावर छत्रपति शिवराय अधिष्ठित झाले ह्मणजे त्याच्या मागे हुजरे, मोर्चेले, चामरे पंखे, पानदाने इत्यादि घेऊन उभे राहत असत सिंहासनाच्या पार्श्वभागी अत्यंत विश्वासू असे कित्येक आप्तजन उभे राहत सिंहासनाजवळ खाली उजव्या रांगत मुख्य प्रधान, पंत अमात्य, पंत सचीव, मंत्री, चिटणीस व परराज्यातील वकील अनुक्रमानें बसत असत, आणि डाव्या रांगत सेनापति सुमंत, न्यायाधीश, पंडितराव, फडणीस, सेनाधिकारी सरदार व नामांकित शूर पुरुष बसत असत प्रधान मंडळाचे मुतालिक व कारकून आपआपल्या मालकाच्या मागे बसत, आणि महाराजाच्या द्वादशकोशाचे व अष्टादश कारखान्याचे अधिकारी सिंहासनाच्या दोन्ही बाजूस मागं उभे असत इतर कारभारी, तालुकदार, मामलतदार, किल्लेदार वगैरे कामदाराच्या जागा दरबारात ठरलेल्या असत दरबारात राजदर्शनास कोणाला जावयाचे असल्यास त्याची वर्दी आत पोचवून त्यास त्याच्या योग्यतेप्रमाणे बसविण्याचे काम दोन चोपदार दरबाराच्या द्वाराशी उभे राहून करीत

आता त्यानी आपल्या लष्कराची व्यवस्था कशी केली होती तें पाहू पाय-दळात मुख्य दोन प्रकारचे लोक असत-एक घाटमाथ्यावरचे मावळे आणि दुसरे घाटाखालील कोकणातले हेटकरी मावळे तरवारबहादर असत व हेटकरी अचूक नेम मारण्यात कुशल असत प्रत्येकापाशी ढालतलवार व बंदूक हीं शस्त्रें असत हीं हत्यारे त्यानीं स्वतःचीं आणावी असा बहुतेक नियम असे. त्यास लागणारा दारूगोळा मात्र सरकारांतून मिळत असे त्याचा पोषाख मुख्यत ह्मटला ह्मणजे मांडचोळणा असून कबरेला काचा कसलेला असे, व त्यावरून एक उपरणें गुंडाळलेलें असे, कित्येकाच्या अंगांत रूदार अंगरखा असे, व डोकीस पागोटें असे हे मावळे व हेटकरी सर्वदा डोंगराळ प्रदेशांत राहणारे असल्याकारणानें अवघड डोंगरांवर व कड्यांवर चढण्यात ते अत्यंत कुशल

असत असे चपळ लोक इतर कोणत्याहि प्रातात किंवा देशात आढळणें नाहीं असें ह्मटल्यास अत्युक्ति होणार नाहीं

पायदळात दहा माणसाचा एक दाहिजा केलेला असे त्यात नऊ पाईक किंवा शिपाई व एक नाईक असे असत अशा पाच दाहिज्यावर किंवा नायकावर एक हवालदार असे दोन हवालदारावर एक जुमलेदार असे दहा जुमलेदारावर एक हजारी असे[1] त्याशिवाय काहीं पाचहजारी[2] सरदार असत. हे सगळे हजारी व पाचहजारी सरदार सरनोबताच्या हुकमात असत. पायदळातील काहीं शिपायाच्या हाती तिरकमठे, पट्टे, इटे, बरच्या व साग असत व काही खामबारदार असत त्याप्रमाणें जो ज्या शस्त्राच्या कारवींत कुशल असे त्यान ते शस्त्र वागवावे असा नियम असे ही हत्यारें त्यानीं आपल्या खर्चान घ्यावी असें असे, दारूगोळा मात्र त्याना सरकारातून पुरवीत असत. शिपायास व नायकास दरमहा एक, दोन किंवा तीन होन पगार असे जुमलेदारास वर्षाची शभर होन तैनात असे, हजारी सरदारास पाचशे होन तनात असे, आणि पाचहजारीस मालीना अडीच हजार होन तनात असून त्याला सरकारातून पालखी, अबदागीर वगैरे नेमणूक असे

घोडदळात दोन प्रकारचे लोक असत-एक बारगीर व दुसरे शिलेदार. बारगिराच्या घोडदळास पागा अशी सज्ञा असे पागेतील सगळी घोडी सरकारी असत, व त्याची निगा सरकारामार्फत होत असे शिलेदाराच्या घोडदळातील घोडी प्रत्येक शिलेदारानें आपआपली आणावी व त्याची जोपासना ज्याची त्यानें करावी असे असे त्याबद्दल त्यास सरकारातून जादा तैनात मिळत असे हे शिलेदाराचे घोडदळ ठेवण्याची पद्धत यवनी पादशाहतींतील होती. ही महाराजास फारशी आवडत नसे कारण अशानें घोडीं राहावीं तशी हुशार राहत नसत, व कोणी शिलेदार चाकरीस कटाळला असता तो आपल्या घोड्यासकट निघून जाण्याचा सभव असे यास्तव ह्या शिलेदाराची सख्या कमी करण्याचे धोरण महाराजाचें नेहमी असे अशी शिलेदारी करून उदरनिर्वाह

१ चिटणीस ह्मणतो कीं, मावळ्याच्या पायदळांत पांच हवालदारांवर एक जुमलेदार असे, व पाच जुमलेदारावर एक हजारी सरदार असे.

२ महाराजाच्या लष्करांत पाचहजारी कोणी नसून सात हजारी मात्र असत, असें कित्येकाचें ह्मणणें आहे.

करणाऱ्या लोकाचीच संख्या त्या काळी पुष्कळ असल्याकारणाने महाराजांस त्याला ह्या अटीवर नोकरीस ठेवणे प्राप्त असे कोणी शिलेदार आपली घोडी सरकारास देण्यास राजी झाले असता त्याच्या योग्य किमती ठरवून त्या त्यास देऊन ती घोडी पागेस लावीत व अशा शिलेदारास खासपागेत नोकरीस ठेवीत. सरकारी घोड्याच्या मागल्या चौकावर ओळखीसाठी शिक्के मारीत असत. घोडेस्वाराच्या पायात तग तुमान असून अगात रुंदार अगरखा असे, कबरेस शेला गुडाळलेला असे, व डोकीस पागोटे असून ते दौडीच्या कामात पडू नये ह्मणून त्याचा एक लफा हनवटीखालून घेतलेला असे तरवार कबरेच्या शेल्यात अडकवलेली असे, व पाठीस ढाल लटकावलेली असे सर्वांच्या हातात भाले असत व काहींकाच्या हातात बदुका असत ही सगळी शस्त्रे ज्याची त्यांनी आणावीं असा बहुतेक नियम असे बारगिरास दारुगोळा सरकरातून मिळत असे, व शिलेदारानी तो आपल्या पदरचा आणावा असें असे.

पंचवीस बारगीर किंवा शिलेदार याजवर एक हवालदार असे पाच हवालदारावर एक जुमलेदार असे पाच जुमलेदारावर एक सुभेदार असे[1] अशा दहा सुभेदारावर एक पाचहजारी असे हे सगळे सुभेदार व पाचहजारी सरनोबताच्या हुकुमात असत घोडदळाचा सरनोबत अर्थात् निराळा असे पचवीस घोड्यास एक पखाली व एक नालबद असे हवालदाराने आपल्या ताब्यातील घोड्यास दाणावैरण वगैरे नीट मिळून त्याची चाकरीचुकरी बरोबर होते किंवा कसें ते पाहावे, व त्याच्या सामानासुमानाचा बदोबस्त ठेवावा असें असे घोडदळातील प्रत्येक बारगिरास त्याच्या दर्जाप्रमाणें दोनपासून पाच होनपर्यंत पगार असे.शिलेदारास सहापासून बारा होनपर्यंत पगार असे. जुमलेदारास वीस होन पगार असे[2]. सुभेदारास वर्षाची एक हजार होन तैनात असे व त्याला पालखीबद्दल नेमणूक असे पाचहजारीस वर्षाची दोन हजार होन तैनात असून पालखी आणि अबदागिरी याची नेमणूक असे. शिलेदाराचे सुभेदार अर्थात् निराळे असून ते सगळे सरनोबताच्या हुकमात असत. प्रत्येक सुभेदार, पाचहजारी व सरनोबत याच्यापाशीं जासूद व हरकारे असत.

---

१ कित्येकांच्या मते दहा जुमल्यास एकहजारी असे, व अशा पांच हजारावर एक पाचहजारी असे.

२ सभासद ह्मणतो कीं, जुमलेदारास पाचशें होन तैनात व पालखी यांची नेमणूक असे.

ह्या लष्कराशिवाय आणखी महाराजानी आपल्या स्वारीबरोबर जिलबीने पाच हजार लोक ठेविले असत हे असे निराळे नेमण्याचे कारण अर्थात असे होते कीं, महाराज यवनपादशाहाचे दावेदार असल्यामुळे त्याच्यावर केव्हा काय प्रसग येईल याचा नेम नसे यास्तव खाशाच्या रक्षणासाठी नेहमी जय्यत असे लोक ठेवणे इष्ट असे महाराजानी मावळ्याची पाहणी करून त्याची निवडक पथके केलीं त्याचे तीस, चाळीस, साठ, शभर असे जथे करून त्याजवर चागले शूर, मर्द व इमानी सरदार नेमिले ह्या जिलबीच्या पायदळास सरकारातून उची पोषाख मिळत ते त्यानी स्वारीच्या वेळेस घालावे असे असे त्याच्या डोकीस मदील, अगात घालावयास सकलादी अगरखे, व अगावर घ्यावयास ताडपदरी किवा पैठणी पासोडे दिलेले असत कोणास सोन्याची कडी, कोणास रुप्याच्या मोहनमाला, कोणास कड्या असे अलकार घालावयास दिले असत त्याच्या हत्यारास कट, अबनाल, तहनाल वगैरे सोन्याचे करून दिले असत ह्या हुजूरपायदळाप्रमाणेच हुजूरपागाहि केली होती तीत पाच हजार घोडी असत त्याचे जीनसामान सोन्यारुप्याचे असे व त्यावरील करोल किवा स्वार चागले हुशार व शूर बारगीर पाहून ठेविले असत ह्याशिवाय आणखी दोनशे उमदी घोडी खाशासाठी ह्मणून निराळी ठेविली असत ह्या घोड्यावरील जीनसामान फारच उची असे. खाशाची स्वारी निघाली ह्मणजे ह्या उभय प्रकारच्या हुजरसेनेतील लोकानी ठरलेल्या पद्धतीने मागे, पुढे व दोन्ही बाजूस अतराअतराने चालावें असें असे

घोडदळातील व पायदळातील प्रत्येक माणूस महाराज स्वत पाहून पारखून ठेवीत लष्करात नवीन नोकरीस लागणाऱ्या प्रत्येक मनुष्याने जुन्या शिपायाची खात्री द्यावी लागत असे अशा खात्री देणाऱ्या शिपायाकडून जामीनपत्र लिहून घेत असत जुमलेदार, सुभेदार, हजारी व पाचहजारी सरदार नेमावयाचे ते चागले शूर, मर्द, कुलीन व युद्धाच्या कामात पुरे कसलेले मराठे पाहून नेमीत असत. प्रत्येक सुभेदाराच्या व हजारी सरदाराच्या हाताखाली एक ब्राह्मण सबनीस व प्रभु कारखाननीस किंवा ब्राह्मण मुजुमदार व प्रभु जाबनीस असे हुद्देदार दिले असत. त्याप्रमाणेच पाचहजारी सरदारास एक दिवाण, एक सबनीस व एक कारखाननीस असे हुद्देदार दिले असत. ह्या हुद्देदाराच्या हाताखालीं कमीजास्त कारकून असत. ह्याशिवाय आणखी लागतील तेवढे

कारकून हे सरदार आपल्या खर्चानें ठेवीत सुभेदारास व हजारी सरदारांस अशी सक्त ताकीद असे कीं, त्यानी आपल्या हाताखालच्या लोकास वेतने वगैरे वेळच्यावेळी मिळतात कीं कसे तें पाहावें

आता स्वराज्यातील किल्ल्याचा बदोबस्त कसा केला होता ते पाहू महाराजाच्या ताब्यात सुमारे २८० किल्ले होते असें बखरकारानी दिलेल्या यादावरून दिसून येते ह्या किल्ल्याचे व विशेषत डोंगरी किल्ले ज्याना गड ह्मणत त्याचे महत्त्व महाराजास मोठे वाटे कारण काबीज केलेल्या प्रातांचे रक्षण यथास्थित व्हावयास ह्या किल्ल्यानी आवश्यकता त्या धामधुमीच्या काळात अतिशयित होती कसाहि मोठा शत्रु आला तरी त्यास न जुमानता ह्या किल्ल्याच्या आश्रयान त्याच्याशी महिन्याचे महिने व वर्षांची वर्षे लढत राहण्याचे सामर्थ्य येत असे कारण किल्ले बहुश अवघड डोंगरावर बाधले असून त्यावर जावयास एखादी दुसरी वाट असे, आणि बाकीचे चढाव सोपे असल्यास ते सगळे सुरुग वगैरे लावून तासून काढून उभे मुळासारखे केले असल्यामुळे ते निखालस बेलाग असत गनीम जवळ आला असता वाट बद केली ह्मणजे किल्ल्यावर फार थोडे लोक असले तरी त्याचे काहींएक चालत नसे, आणि प्रत्येक किल्ल्यावर दाणागोटा, दारूगोळा व इतर निर्वाहाच्या व उपयोगाच्या वस्तु याचा साठा नेहमी भरपूर असे शत्रूवर मैदानप्रदेशात हल्ला करून तो जेरीस न येई तर त्याच्या हातातून निसटून ह्या किल्ल्यात सुरक्षित येऊन राहण्याची उत्तम सोय असे ह्या किल्ल्याच्या आसपास असलेल्या प्रातावर शत्रूचा अमल कदापि बसण्याचा सभव नसे कारण त्याच्यावर वाटेल त्या रीतीने हल्ले करून त्याचा तेथून उठावा करण्यास ह्या किल्ल्याच्या आश्रयाने चागले साधत असे इतकेच नव्हे तर थोड्या लोकाच्या साह्याने शत्रूच्या मोठमोठ्या सैन्याशी टक्कर देण्याचे सामर्थ्य ह्या किल्ल्याच्या योगाने चागले येत असे साराश हे केल्ले स्वराज्याचे केवळ जीवप्राण आहेत असें महाराजास वाटणें साहजिक असे. ह्मणूनच ह्या किल्ल्याची दागदुजी करण्यास व नवे किल्ले योग्य जागी बाधण्यास कितीहि पैका लागला तरी तो खर्चण्यास महाराज सर्वदा तत्पर असत पदरच्या केत्येक लोकानी एकदा महाराजास असा अर्ज केला कीं, किल्ले बहुत झाले, त्याच्या मागे पैका विनाकारण खर्च होत आहे. त्यास त्यानी असा जबाब दिला कीं, जसा

१ पुढें एकतिसाव्या भागांत ही यादी दिलली आहे.

कुळंबी शेतास माळा घालून तें राखतो तसे किल्ले राज्याच्या रक्षणासाठीं आहेत. तारवास खिळे मारून बळकट करितात तशी राज्यास बळकटी किल्ल्याची आहे. किल्ल्याच्या योगाने औरंगशहासारख्याची उमर गुजरून जाईल आम्हाला धर्म-संस्थापना व राज्यस्थापना करणें आहे सर्वांस अन्नास लावून त्याचा बचाव करावयाचा आहे दिल्लीचा बादशहा आमच्या स्वराज्याचा नाश करावयास टपला आहे त्याची स्वारी आमच्यावर झाली तर त्याला जुनेनवे तीनशेसाठ किल्ले आहेत एकेक किल्ला तो वर्ष वर्ष लढला तरी त्यास ३६ वर्षे लागतील हे असें किल्ल्याचें महत्त्व त्यास वाटत असल्याकारणाने त्यानी त्याची व्यवस्था फार बारकाईने लावून दिली होती

प्रत्येक किल्ल्यावर चागला इतबारी, घरदाज कुलीन, मर्द व शहाणा असा मराठा पाहून त्यास हवालदार नेमीत त्याच्या हाताखालीं एक सरनोबत, एक किंवा अनेक तटसरनोबत[1] असे अमलदार चागले हुशार मराठे पाहून ठेवीत ह्याशिवाय आणखी एक सुभेदार, एक सबनीस, एक फडणीस व एक कारखान-नीस असे हुद्देदार असत सुभेदार, फडणीस व सबनीस हे बहुतकरून जातीचे ब्राह्मण असत व कारखाननीस जातीचा प्रभु असे हे सगळे कामगार चागले विश्वासू, शहाणे व स्वामिसेवातत्पर असे पाहून ठेवीत त्याची खात्री हुजूरच्या कारभाऱ्यानीं किंवा कोणी मोठ्या दर्जाच्या सरदाराने द्यावी लागत असे. हवालदाराकडे किल्ल्याचा एकदर कारभार असे त्याच्या हुकमात इतर हुद्दे-दारानी वागावे असे असे किल्ल्याच्या दरवाजाच्या चाव्या त्याच्यापाशी असत किल्ल्यास लागणारे सामानसुमान, दारूगोळा व दाणागल्ला हीं त्याच्या विद्यमानें आणीत शिक्कामोर्तब त्याच्या नावे असे किल्ल्यावर ठेवलेल्या लष्कराचा एकदर बदोबस्त त्याच्याकडे असे रोखापत्र करणे,सरकारी खलिते येणे ते सगळे त्याच्या नावे होत सुभेदाराकडे मुलखी कारभार असे आसपासच्या गावाच्या वसुलाची व्यवस्था त्याजकडे असे हा सगळा कारभार त्यानें हवालदाराच्या अनुमते करावा असें असे सबनिसाकडे किल्ल्यासंबधाचें लिहिणें करण्याचे काम असे किल्ल्यावरील लोकाची हजिरी व चौकशी त्याने करावी असें असे कारखाननिसाकडे कोठीची व दारूगोळ्याची व्यवस्था असे त्यांचा सगळा

---

[1] पुरदर, सिंहगड, प्रतापगड वगैरे काही किल्ल्याच्या प्रत्येक बाजूला एकएक तट सरनोबत नेमिला असून त्याला तट वाटून दिलेला असे

हिशोब तो ठेवी लोकास रोजमुरा त्याने वाटावा व किल्ल्याच्या इमारतींची देखरेख व दुरुस्ती ठेवावी असें असे. ह्याप्रमाणे प्रत्येक किल्यासंबंधाची कामें निरनिराळ्या मुख्य जातीच्या हातीं ठेविल्यामुळे दगाफटका होण्याची फारशी भीति नसे. किल्ल्यावर लष्कर ठेवावयाचे ते त्याचे महत्त्व पाहून कमीजास्त ठेवीत. या शिवाय आणखी त्यावर कायमची वस्ती असे. ह्याप्रमाणे एक किल्ला ह्मणजे एक लहानसा स्वतंत्र राज्यविभाग मानीत. किल्ल्याखालील फौज बाहेर लढाईवर गेली ह्मणजे सुभेदार व कारखानर्नीस हे किल्ल्याची डागडुजी करून त्यावर सामानासुमानाचा व पैशाचा पुरवठा करण्यात गुंतले असत. कारण बाहेरील फौजेस सामानसुमान पुरविण्याची पाळी कोणत्या किल्ल्यास केव्हा येईल याचा नेम नसे. एकदरीत पाहता किल्ल्याच्या व्यवस्थेसंबंधाचे सगळे नियम अगदी बारकाइने ठरविले असून प्रत्येक कामदाराने ते पाळण्याविषयीं त्याची अगदीं कडक शिस्त असे. किल्ल्याच्या बंदोबस्ताकडे त्याचा खर्च फारच काटकसरीचा असे. प्रत्येक किल्ल्याच्या मगदुराप्रमाणे त्यात अन्नादि सामुग्री, दारूगोळा वगैरेची तरतूद नीट आहे कीं कसें त्याची तपासणी ते वेळोवेळा करवीत.

हा झाला किल्ल्यावरील बंदोबस्त. आता किल्ल्याच्या तटाखालील डोंगराचा व त्याच्या पायऱ्याचा बंदोबस्त कसा काय ठेविला असे ते पाहू. तटाखालीं किल्ल्याच्या माचीमाचीला मेठे असत, तीं राखण्यासाठी जागोजाग मेठकरी ठेविले असत. त्यानीं आपआपल्या चौक्यावर रात्रंदिवस राहून आसपास शत्रूची काहीं हालचाल होत असल्यास तिच्यावर नजर ठेवावी, व तेथलें रान राखावें असें असे. किल्ल्याच्या पायऱ्याशीं वाटावर नाक्यानाक्यानी रामोशी परवारी, महार, माग बेरड वगैरे लोकाच्या चोक्या असत. त्यानी हरएक प्रकारची बातमी ठेवून काहीं कमीजास्त असल्यास त्याची वर्दी तत्काळ किल्लेदारास द्यावी व त्यास सावध करावे, किल्ल्यासंबंधानें कोणी भेद काढावयास आलें असता त्यास भलतेच काहीं तरी सागून चकवावें, व शत्रूचे लोक किल्ल्याच्या आसपास घिरट्या घालूं लागले असता ते थोडे असल्यास त्याच्यावर अकस्मात् घाले घालून त्यास कापून काढावे.

संध्याकाळ झाला ह्मणजे किल्ल्याचा दरवाजा बंद करून त्यास कुलूप लावावें, हवालदारानें जातीनें येऊन तें ओढून पाहावें, व किल्ल्या घेऊन जाऊन आपल्या उशास ठेवाव्या. किल्ल्यावरील अंमलदारांनीं रात्रीची सर्व किल्ल्यासभोंवतीं

पाळीपाळीनें गस्त घालावी जागोजाग पाहारे बरोबर आहेत कीं कसें तें हवालदारानें रात्रीस एकदोन वेळा स्वत येऊन पाहावे सरनोबतानें गस्तीच्या लोकाची देखरेख ठेवावी किल्ल्याच्या दोनचार नाजूक जागी ठेवलेल्या रखवालदाराची चौकशी तटसरनोबताने करावी हवालदाराने रात्रदिवस सदरेस हत्यारबद लोकासह जागरूक राहावे. विशेषत रात्रीच्या वेळी बिलकुल गाफील राहू नये. ह्या सगळ्या हुद्देदाराच्या व अमलदाराच्या वागणुकीचे जाबतेकान् करून ठेविले असत त्याबरहुकूम सर्वांनी वागण्यात बिलकुल कसूर करू नये असे असे एकमेकानी एकमेकाच्या कामात सहसा हात घालू नये ज्यास जी कामे नेमून दिलीं असत ती त्याने दक्षतेने व हुशारीने करावी असे असे कोणीं कांहीं बाचाबाची केल्यास किंवा आपल्या कामात टिलाई केल्यास त्याला मोठे शासन होत असे

किल्ल्यावरील लोकास अडिस्री, नगदी वगैरे वेतन वेळच्या वेळीं पावतें व्हावे, त्याची नाराजी कोणत्याहि कारणाने होऊ नये, असा सक्त बंदोबस्त ठेविला असे किल्ल्यावर दाणागल्ला, लाकूडफाटे, दारूगोळा, कुटलेला चुना वगैरे नेहमीं लागणाऱ्या जिनसाची बेगमी दोनचार वर्षे पुरे इतकी करून ठेवीत अमक्या किल्ल्यास अमकें सामान पोचावें असे धारे बाधून दिले असत किल्ल्याचे चढाव जेथे सोपे होते तेथे ते नासून, सुरुग लावून व इमारती करून बेलाग करविले असत ह्या सबंधाची एक चमत्कारिक गोष्ट सागतात ती अशी –आपलें राजधानीचें स्थान सुरक्षित असावे, व त्यावर शत्रूचा गिल्ला सहसा होऊं नये, यासाठीं महाराजानी रायगड किल्ल्याची चागली मजबुदी करून तें ठिकाण आपली राजधानी केले. हा किल्ला सर्व बाजूंनी बेलाग करून त्यावर जावयास एकच वाट ठेविली आणि असें जाहीर केलें कीं, ह्या वाटेखेरीज दुसऱ्या वाटेनें जो कोणी किल्ल्यावर चढून जाऊन तेथे निशाण लावील त्यास शभर होन व एक सोन्याचें कडे बक्षीस देण्यात येईल. ह्या जाहिरातीवरून एका धेडानें किल्ल्यावर एका अति कठिण वाटेनें चढून जाऊन निशाण लाविलें, त्यावरून त्यास ठरलेलें बक्षीस दिलें,पण त्याचे पाय तोडले, आणि ती वाट साफ बुजवून टाकली. आता ह्या हवालदार, सुमेदार, तटसरनोबत वगैरे कामगारास तैनाती काय असत हें कळत नाहीं. हवालदारास पालखी व दिवटी याची नेमणूक असे. किल्ल्यांवर लष्कर असे त्यास इतर लष्कराप्रमाणेंच वेतनें मिळत असत प्रत्येक किल्ल्याच्या रक्षणासाठीं लष्कराशिवाय आणखी जे कांहीं मेठकरी, रामोशी,

परवारी, महार, माग, बेरड वगैरे लोक ठेविले असत त्यास नियमित वेतनें करून दिलेली नसत, तर किल्ल्याच्या आसपासच्या जमिनी त्यास लावून दिल्या होत्या. त्याची नागरणी पेरणी करून त्यानी उदरनिर्वाह करावा व त्याच जागी घरेंदारे करून राहावे असें असे ह्या अशा सर्व लोकास गडकरी अशी सज्ञा असे ह्या शहाणपणाच्या व्यवस्थेमुळे ह्या गडकऱ्यास असे वाटे कीं, ह्या गडाचे आपण मोठ्या इमानानें रक्षण केलें पाहिजे, कारण ही आपली दूध पाजणारी आई आहे, ती शत्रूच्या हाती गेली असता आपल्या उत्पन्नावर गदा येऊन आपला नाश होईल अशा समजुतीमुळे प्रत्येक गडावर पुष्कळ इमानी व शूर पुरुषाची वाढ होत गेली. जुन्या कमलेल्या वृद्ध शिपायाच्या चाकरीबद्दल त्यास योग्य पारितोषिक द्यावयाचें ह्मटले ह्मणजे त्यास गडावरील अमलदारी द्यावी असा महाराजाचा परिपाठ असे

प्रत्येक किल्ला आसपासच्या तालुक्याच्या निसबतीत लावून दिला असून त्यावर सामानासुमानाची भरती करण्याचे काम तालुकदारानें किंवा मामलतदारानें सुभेदाराच्या सल्ल्यानें करावे असें असे किल्ल्यावरील लोकापैकी कोणाची तगिरी, बहाली किंवा गयाळी करणें ती हुजूरच्या आज्ञापत्रानें करीत त्याचा इतला दुसऱ्या कोणाकडेहि नसे

आता तोफखान्याची व्यवस्था कशी केली होती ते पाहूं त्याच्या बदोबस्ताकडे योग्य कामगार नेमिले असत त्याच्या नावाचा किंवा दर्जाचा उल्लेख कोठेहि आढळत नाहीं निरनिराळ्या किल्ल्यावर योग्य जागीं तोफा लावून ठेविल्या असत लष्कराबरोबर जाणाऱ्या तोफासाठी मोठमोठे गाडे तयार करविले असत. त्याप्रमाणेच दारूगोळ्यासाठी छकडे तयार करविले असत हे गाडे व छकडे ओढण्यास लागणारे बैल पाळलेले असत प्रसगी अडचण पडूं नये ह्मणून प्रत्येक गाड्यास बैलाच्या दुहेरी जोड्या लष्करावरोबर चालवीत. सुतार, लोहार, चाभार, रस्सीददार, तलफदार, गोलदाज वगैरे कामकऱ्याचा भरणा चांगला केला असे काहीं फारच जड तोफा असत त्या ओढण्याकडे हत्तीची योजना करीत प्रत्येक तोफेस अमके गारदीपायदळ असावे असा नियम केलेला असे. तोफखान्याकडील अधिकाऱ्यानीं त्यास लागणाऱ्या दारूगोळा वगैरे सामानाची तरतूद नेहमीं दक्षतेनें ठेवावी असें असे तोफा लावणें, काढणें वगैरे कामें करण्यास फारच जवामर्दी लागत असे, यास्तव ह्या कामांत पुरे

वाकबगार असेच लोक पाहून ठेवीत निरनिराळ्या किल्ल्यावर ठेवलेल्या तोफा खेरीज लष्कराबरोबर चालविण्यासाठी सुमारे दोनशे तोफा गाड्यावर घातलेल्या असत ह्या फिरंगी, फ्रेंच, इंग्रज वगैरे परस्थ व्यापाऱ्याकडून विकत घेऊन किंवा तहाच्या मिषाने घेऊन त्याचा संग्रह करीत

ह्याशिवाय आणखी महाराजानी आरमार तयार केलें होते शेकडो लहानमोठी जहाजे बाधून त्यावर लढाऊ सामानाची चांगली व्यवस्था केली होती ह्या आरमाराचे महाराजास मोठे महत्त्व वाटत असे परंतु त्याची व्यवस्था कशी काय लाविली होती ते कोणत्याहि बखरीत नमूद केलेले नाहीं बारदेशापासून अलिबागपर्यंतच्या पश्चिम किनाऱ्यावर त्यानी अनेक किल्ले व जजिरे हस्तगत केले व नवीन बाधिले, आणि शिद्दी मोगल, पोर्तुगीज, दच व इंग्रज याच्या जहाजावर आपला शह ठेवून त्याच्याकडून आपल्या सत्तेतील मुलखास उपसर्ग लागू नये ह्मणून त्यानी हे आरमार तयार केलें होते शिवाय इतर दर्यावर्दी व्यापाऱ्याप्रमाणे आपलाहि व्यापार चालवावा अशी त्याची इच्छा होती, व तीस अनुसरून त्यानी थोडासा आरभहि केला होता.

येथवर लष्कराच्या किल्ल्याच्या व आरमाराच्या व्यवस्थेचे यथोपलब्ध वर्णन केलें आता काबीज केलेल्या मुलखाचा बदोबस्त कसा केला होता ते पाहू स्वराज्यातील मुलखाचे महाल व प्रात असे विभाग केले होते लाख पाऊणलाख किंवा सवालाख रुपये उत्पन्न होई एवढे गाव एका महालात मोडत असे दोन किंवा तीन महाल मिळून एक प्रात किंवा सुभा होत असे प्रत्येक महालावर एक महालकरी असे यासच तरफदार किंवा तालुकदार ह्मणत हा अधिकारी जातीचा ब्राह्मण किंवा प्रभु असे प्रत्येक महालास एक मराठा हवालदार नेमिला असे प्रत्येक प्रातावर किंवा सुभ्यावर एक सुभेदार नेमिला असे यासच मामलतदार ह्मणत सुभेदाराच्या ताब्यात एकदोन किल्लेहि असत दोन किंवा तीन खेड्यावर एक कमावीसदार नेमिला असे त्याने सरकारी वसूल महालकऱ्याच्या किंवा तालुकदाराच्या संमतीने जमा करून त्याचा हिशोब सुभेदाराच्या कचेरीस गुजरावा असे असे. सुभेदाराच्या हाताखालीं एक मुजुमदार, एक चिटणीस, एक फडनीस, एक दफ्तरदार असे हुद्देदार हुजुरातून नेमून दिले असत. ह्याशिवाय आणखी प्रत्येकाच्या हाताखालीं कामाच्या मानाने कमीजास्त कारकून नेमिले असत. महालकऱ्यानी कमावीसदाराच्या कामावर देखरेख ठेवावी, व सुभेदारानें महालकऱ्यावर हुकमत चालवावी असें असे कोणाच्या काहीं तक्रारी असल्यास

त्याचा निकाल सुमेदाराने लावावा, फौजदारी खटले त्यानें निवडावे, दिवाणी खटले उपस्थित झाले असता त्याचा निकाल गाव पंचाकडून करवावा, व पंचाच्या अशा निकालाबरहुकूम लोकाकडून वागणूक करवावी सरहद्दीच्या मुलखात नेहमी धामधूम होण्याचा संभव असे यास्तव त्या मुलखातील महालकरी व सुभेदार याच्या जिमेस पायदळ व स्वार दिले असत वसूल केलेला दाणागल्ला व नगदी नाणे सुभेदाराने आपल्या हद्दीतील एकाद्या किल्ल्यात सुरक्षित राहण्यासाठी ठेवून द्यावें असे असे सुभेदारास चारशे होनाची वार्षिक तैनात असे, व त्यास पालखीअबदागिरीची नेमणूक असे त्याच्या मुजुमदारास शभरसवाशे होनाची तैनात असे ह्याच मानाने इतर हुद्देदारास कमीजास्त पगार असे महालकरी व कमावीसदार यास किती पगार मिळे ते कळत नाहीं

स्वराज्यातील एकदर जमिनीची मोजणी करून ती लागवड करणाराच्या नावे लावून तिची नोंद महालकऱ्याच्या दफ्तरी असे जमीन मापण्यासाठी काठी केलेली असे ती पाच हात पाच मुठी लाब असे एका हाताची लाबी चौदा तसू असून एका काठीची लाबी ८२ तसू असे वीस काठ्याचा एक बिघा व एकशेवीस बिघ्याचा एक चावर असें मोजणीचे प्रमाण धरिले असे प्रत्येक बिघ्यास किती पीक व्हावे हे उभ्या पिकाची पाहणी करून ठरवीत ह्या उत्पन्नाच्या पाच तक्षिमा करून तीन तक्षिमा जमिनीची लागवड करणाऱ्या शेतकऱ्याने भोगाव्या व दोन तक्षिमा सरकारास द्याव्या असा करार असे हे सरकारदेणें शेतकऱ्याने धान्याच्या किंवा नगदीच्या रूपाने द्यावे असें असे ह्या सरकारदेण्याबद्दल रयतेकडून प्रतिवर्षी कबुलायती घेत [1] अवर्षणादि संकटसमयीं शेतकऱ्यास सढळ हाताने तगाई देत ही तगाईची रकम त्यानीं चारपाच वर्षांच्या हप्त्यानी फेडावी असें असे. लागवडीस न आलेल्या जमिनी नव्या रयतेस द्यावयाच्या झाल्या ह्मणजे तिच्यापाशीं गुरेंढोरे नसल्यास ती तिला सरकारातून द्यावी, तिला बिजास दाणा द्यावा, व पीक होईपर्यंत निर्वाहासाठी धान्य व पैका द्यावा. दोनचार वर्षांनीं हा ऐवज उगवून घ्यावा ह्याप्रमाणे रयतेस कौल करून देऊन जमिनी इस्ताव्यानें दिल्या, व बहुतेक सुपीक जमीन लागवडींत आणिली. उत्पन्नाचा अजमास बरोबर पाहून रयतेवर कर बसवावा, जुलूम असा कोणावर करू नये, अशी अधिकाऱ्यांस सक्त ताकीद असे.

---

१ रा. राजवाडेकृत खंड १५, लेखांक ३४० यावरून जमिनीचा वसूल ठरविण्याच्या बाबतींत महाराजांनी कशी उत्तम शिस्त लावून दिली होती तें दिसून येतें.

ह्या जमीनमहसुलाच्या बंदोबस्तात एक मोठी रयतेच्या हिताची गोष्ट महाराजानी केली, तिचा निर्देश ह्या स्थलीं अवश्य केला पाहिजे महाराजानी काबीज केलेल्या यवनी मुलखात अशी पुरातन वहिवाट होती की, महालोमहाली व गावगन्ना देशमुख, देशपांडे, देसाई, पाटील, कुळकरणी, खोत, मिरासदार, जमीदार वगैरे असत त्याच्या ताब्यात महाल व गाव असून रयतेकडून जमिनीचा वसूल त्यानी करावा असें असे सरकारी अधिकारी रयतेकडून प्रत्यक्ष वसूल घेत नसत त्याची सर्व जबाबदारी देशमुख वगैरे जमीदाराकडे असे त्यामुळें असे होई कीं, सर्व रयत ह्या मिरासदाराच्या ताब्यात सर्वस्वी असे. त्याला वाटे तसा ते रयतेकडून वसूल चोपून घेत एकाद्या गावाचे सरकारदेणे दोनशे किंवा तीनशे रुपये असले तर हे मिरासदार त्या गावच्या रयतेकडून दोन हजार किंवा तीन हजार रुपये वसूल उगवीत असत त्या रीतीने आपला तळीराम गार करण्यासाठी ते रयतेस नाहक त्रास देत व सरकारासहि बेसुमार फसवीत ते आपल्या वसतीच्या गावास हुडे, वाडे, कोट वगैरे बाधून शिपाईप्यादे व बदुकातरवारी बाळगून जळावत असत त्याचा हा बेकायदेशीर कारभार सरकारी अधिकाऱ्याच्या कानी गेला ह्मणजे ते त्याच्याकडे सरकारदेणें अधिक मागत परतु त्यास कित्येक देशमुख वगैरे प्रबळ जमीदार दाद देत नसत, प्रसग पडल्यास त्याच्याशी भाडावयासहि तयार होत अशा व्यवस्थेमुळें जिकडेतिकडे पुंडपाळेगाराचा सुळसुळाट झाला होता

ही अव्यवस्था महाराजानी अजीबात मोडून टाकिली रयतेकडून वसुलाची कमाविशी करण्यासाठी आपले वेतनी कामगार सर्वत्र नेमून दिले पूर्वीच्या मिरासदारानीं व जमीदारानी रयतेस कोणत्याहि बाबतींत काडीइतका त्रास देऊं नये, त्यास पूर्वीच्या अमलात जे टक्के मिळत असत त्याचे योग्य प्रमाण ठरवून त्यास ते सरकारी कामगाराकडून प्रतिवर्षी मिळत जावे, त्यानीं ते रयतेकडून प्रत्यक्ष वसूल करूं नयेत, असें ठरविलें हा जो सरकारी उत्पन्नाचा ठरीव अश त्यास कोणतेंहि जोखीम शिरीं न बसता मिळत असे, त्यास सरकारातून प्रतिवर्षी मंजुरी मिळवावी लागे ह्यामुळें त्यांच्या वर्तनावर पुरा दाब बसून रयत त्याच्या कचाटींतून साफ सुटली ह्यामुळें ती सुखी व स्वतंत्र झाली. पूर्वी ती ह्या जमीदारांची व मिरासदारांची केवळ गुलाम बनलेली असे ह्या देशमुख, देसाई, देशपांडे वगैरे ग्रामाधिकाऱ्यांचे वाडे, हुडे व कोट महाराजांनीं पाडून जमीनदोस्त केले; व त्यांनीं इतःपर असले फंद करूं नयेत, इतर रयतेसारखीं साधीं

घरें बांधून राहावे, असा एकमहा हुकूम सोडला कमावीसदार, महालकरी व सुभेदार यास त्यांच्यावर करडी नजर ठेवावयास सांगितलें ह्याप्रमाणें ह्या जमीदाराची अरेरावी बंद झाल्यामुळे ते महाराजांच्या अमलास अमळ त्रासत हें साहजिक आहे परंतु अशा लोकांस लष्करी व मुलखी खात्यांत भराभर नोकऱ्या मिळून त्यांची बढती व उत्कर्ष अंगच्या पराक्रमानुसार होऊं लागला त्यामुळें ही त्यांची नाराजी केवळ अल्पकालिक असे कारण असे पाहा कीं, नोकरीबद्दल वेतनें मिळून शिवाय वंशपरंपरागत चालत आलेले मिराशीचे हक्क व्यवस्थित बांधून दिले होते त्याप्रमाणे आणखी उत्पन्न त्यांस बिनबोभाट पावते होत असे ह्याप्रमाणे महाराजांनी रयतेस अक्षय्याची सुखी करून आणखी ह्या मिरासदारांसहि खुष राखिले

जमीनमहसुलाच्या बाबतींत आणखी एक महत्त्वाची गोष्ट येथे नमूद करणे इष्ट आहे तीवरून महाराजांचे धोरण केवढ होते ते दिसून येते ती गोष्ट अशी प्रत्येक प्रांताचा ह्मणजे सुभ्याचा जो वसूल होई तो सगळाच खर्चून टाकू नये, तर त्यांतून कांहीं शिल्लक टाकावा, असा त्यांनी नियम लावून दिला होता या शिलकेस खजाना ह्मणत ह्या खजान्यास तसाच प्रसंग आला तर हात लावावा नाहीं तर तो वाढत जावा किंवा निदान जशाचा तसा राखून ठेवावा असे असे मोगलाचा हल्ला येऊन फाजील खर्च करावा लागला तर तो आधीं साधेल तेवढा बाहेरल्याबाहेर वारावा आणि तो नच भागला तर ह्या राखून ठेवलेल्या खजान्यांतून तो भागवावा असे असे कोणत्याहि बाबीसंबधानें विशेष खर्च करावयाचा झाल्यास त्यासंबधाची आगाऊ मंजुरी घ्यावी असे असे ह्या प्रत्येक प्रांताच्या सुभेदारापाशी अशी शिल्लक कायमची ठेवण्यांत येत असे कोणत्या प्रांतांत किती शिल्लक राखावी ते त्या त्या प्रांताच्या मगदुराप्रमाणें ठरविलेलें असे ह्याप्रमाणे महाराजांच्या ताब्यांतील एकंदर मुलखांतल्या खजान्याची गोळाबेरीज सवालाख होनांची असे.

आतां मुलूखगिरी करावयाची तीसंबंधानें महाराजांनी कोणते नियम केले होते ते येथे सांगू आसपास यवनाचा अमल असून त्यांच्या दाढेंतून सोडविलेला मुलुख आपल्या कबजांत कायमचा राखावयाचा ह्मणजे त्यास या काळी पुष्कळ फौज बाळगून राहणे प्राप्त असे महाराज फौजेच्या वास्तविक खर्चासंबंधानें अतिशयित काटकसर करीत. तरी तिची संख्या नेहमीं वाढत्या

१ रा राजवाडेकृत खंड ८ लेखांक २१ व २२ पाहा

प्रमाणावर ठेवण्यातच स्वराज्याचें सरक्षण व वर्धन होण्याचा सभव असे. शिवाय प्रत्येक किल्ल्यावर काहीं लष्कर कायमचे ठेवून त्याचा निर्वाह आसपासच्या गावच्या उत्पन्नावर भागवावा लागे त्यामुळें जमीनमहमूल जमा होई तेवढ्यानें एवढ्या लष्कराचे पोषण होणे केवळ दुरापास्त होते दुसरे असें कीं, मोगल व विजापूरकर अशा सवन पादशहाच्या मोठमोठ्या सेनाशी सतत युद्ध करावे लागल्यामुळे द्रव्यव्यय अतोनात होत असे यास्तव महाराजास प्रतिवर्षी आपल्या काहीं फाजेस मुल्खगिरीवर पाठवावे लागे यात अर्थात् त्याचा दुहेरी हेतु असे. लष्कराचे पोट बाहेरल्या बाहेर भरून आणखी आपल्या खजिन्यातहि काहीं भर पडावी हा एक हेतु, व दुसरा विशेष महत्त्वाचा हेतु असा कीं, यवनी अमलास असा सर्वदा त्रास देत राहिल्याने तो हळूहळू कमकुवत होऊन त्याचा इष्ट उद्देश जो भरतभूमि यवनाच्या सत्तेतून सोडविण्याचा तो सुसाध्य व्हावा

सरनोबताने आपले घोडदळ घेऊन प्रतिवर्षी आठ महिने मुलखगिरीस जावे. त्याने विजापूरकराच्या व मोगलाच्या मुलखात चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वसूल करावे, व शत्रूच्या मुलखातील सवन शहरे लुटावी स्वारीस जाताना प्रत्येक शिपायाच्या बिशादीची तपशीलवार यादी करून तिची किमत त्यात नमूद करावी ती अशाकरिता कीं, स्वारीहून परत आल्यावर त्याच्यापाशी असलेल्या सामानाचा झाडा घेऊन ते त्या यादीशी ताडून पाहावे त्याच्याजवळ काहीं अधिक माल आढळल्यास तो त्याने कोठून आणिला हे त्यास विचारावे. तो लुटीचा आहे असे ठरल्यास तो जप्त करावा, किंवा तेवढ्या मालाची किमत ठरवून ती त्याच्या पगारातून वसूल करून घ्यावी परतु त्याच्या बिशादीपैकीं एकदादुसरा जिन्नस गहाळ झाला असता त्याची भरपाई सरकारातून व्हावी. सरकारी कामगिरीत अपरिहार्य कारणामुळे एकाद्या शिलेदाराचा घोडा मेला किंवा निरुपयोगी झाला असता त्याची जी किमत यादींत नमूद केली असे तेवढी त्यास तत्काळ मिळे स्वारीस जाणाऱ्या लष्करापैकीं कोणीहि इसमानें आपली बायको, बटीक किंवा कलावंतीण बरोबर नेऊ नये, व त्याप्रमाणेंच स्वारी-बरोबर कलाल नसावे अशी सक्त ताकीद असे. जो कोणी हा नियम मोडी त्यास देहात शासन होई हा नियम करण्याचें कारण अर्थात् असें होते कीं, प्रत्येक माणूस निर्व्यसनी असल्यावाचून त्याच्या हातून सरकारचाकरी हुशारीनें व जोमानें होत नाहीं, हें महाराजास चागलें कळून आलें होतें.

मुलूखगिरीत ब्राह्मणवसतीस व देवस्थानास उपद्रव देऊं नये गाई लुटींत पकडू नयेत, ओझ्यास हवे असतील तर बैल मात्र लागतील तेवढे धरावे. शेतकऱ्यास व स्त्रियास कदापि लुटूं नये श्रीमत मुसलमान किंवा त्याच्या पदरच्या श्रीमत हिंदूस खंड देण्याचे सामर्थ्य आहे असे पाहून त्यासच फक्त पकडावे, व ठरविलेला खंड देताच त्यास सोडून द्यावे इतर प्रजेस सहसा त्रास देऊं नये अशा पकडापकडींत मुले व बायका त्यास कधीहि हात लावू नये खंड बसविताना ब्राह्मणास ओल घेऊ नये, यवनास घेत जावे

पावसाळा सुरू होऊन नद्यानाले भरले नाहींत तो स्वारीस गेलेल्या सगळ्या लष्कराने स्वदेशी छावणीस यावे स्वदेशाच्या सरहद्दीपाशी येताच लष्करातील एकंदर लोकाचे झाडे घ्यावे, व पूर्वीचे बिशादीचे जाबते रुजू घालावे कोणापाशी काही अधिक माल सापडल्यास त्याची यादी किंवा जप्ती व्हावी एकादा मोठ्या किमतीचा जिन्नस सापडल्यास तो सरकारी लुटीत सामील करावा एकंदर लुटीची तपशीलवार यादी करावी सरकारी लुटीची अफरातफर कोणीं कधीहि करू नये, केल्यास त्याला शिक्षा होत असे स्वराज्यात आल्यावर पागा नेमलेल्या जागी छावणीस न्यावी ह्या छावण्या मुख्य दोनतीन ठिकाणी असत. येथे घोड्यासाठी तबेले व स्वारास राहावयासाठी घरें बाधलेली असत छावणीस गेल्यावर सुभेदारानी आपआपल्या ताब्यातील घोड्याच्या दाणावैरणीची, औषधपाण्याची वगैरे व्यवस्था करावी, माणसाची हजिरी गैरहजिरी पाहावी व त्याच्या पगाराचे हिशोब तयार करवावे

सरकारी लुटीची यादी तयार झाल्यावर सरनोबताने ती सगळी लूट घेऊन राजदर्शनास जावे तेथे सगळा हिशोब समजून सागून लूट सरकारपोत्यास जमा करावी वस्त्रे, डागिने वगैरे असतील ते धुववून दुरुस्त करून त्यास अदमासानें किमती घालून ठेवाव्या कोणा शिपायास किंवा अमलदारास ह्या लुटीतील एकादा जिन्नस हवा असल्यास त्याची किमत त्याच्या वेतनात बाद करून त्यास तो द्यावा ज्यानी स्वारींत चागल्या कामगिऱ्या केल्या असतील त्याची हुजुरास शिफारस करून त्याला इनाम किंवा बढती सरनोबतानें सुभेदाराच्या इतल्यानें देववावी. कोणी लढाईत मरण पावले असतील त्याच्या बायकामुलांस सरकारातून नेमणुका मिळत. कोणास जबर जखमा लागून ते पुढें नोकरीस नालायक ठरल्यास त्यांला काहीं तहहयात वेतन सरकारातून मिळत असे. कोणी स्वारीच्या

कामात जखमा लागून किंवा दुसऱ्या कारणाने आजारी झाल्यास त्याच्या औषधपाण्यास पैसा मिळे कोणास कशा कोठे जखमा झाल्या त्याची पाहणी करून त्या मानानें त्याच्या नुकसानीच्या भरपाईदाखल त्यास बढती किंवा मानाची पदवी देत असत ज्याला ज्या कामावर नेमिले असे त्याला तो नालायक आहे असे समजून आल्यास त्याला त्या कामावरून काढून दुसरे काम देत, किंवा त्यास लष्करातून कमी करून दुसऱ्या एकाद्या खात्यात नोकरी देत सरकारी नोकरीवरून त्यास सहसा दूर करीत नसत स्वारीत कोणी बेकैद वर्तणूक केली किंवा नामर्दी केली तर त्याची चौकशी करून त्यास शासन करीत व तो असा गुन्हा वारवार करू लागल्यास त्याला नोकरीवरून दूर करीत लुटीच्या मालापैकीं एकाद्या जिन्नसाची अफरातफर कोणीं केल्यास त्याला फारच कडक शिक्षा करीत ह्या सर्व गोष्टी सरनोबताने हुजूरच्या हुकमाने कराव्या, आपण होऊन करूं नयेत असें असे

पावसाळा संपताच दसऱ्याच्या मुहूर्ताने पुन स्वारीस निघण्याविषयी घोडदळाला सूचना होत असे पावसाळा संपतासंपता हा दसऱ्याचा सण येतो ह्या सणात महाराज मोठा उत्सव करीत असत ज्या शिलेदाराला, बारगिराला किंवा शिपायाला लष्करात नोकरी धरावयाची असे त्यानी विजयादशमीला हुजुरास येऊन आपले कसब व बळ दाखवावे त्याची योग्य परीक्षा महाराज स्वत जातीनें करीत,व जे ज्या कामाला लायक असत त्यास त्या कामावर नेमीत. मुलूखगिरीस जावयास सिद्ध झालेल्या एकदर लष्कराची पाहणी ते स्वत करीत. त्या वेळी प्रत्येक घोडा ते निरखून पाहत असत मग पुन ह्या लष्करातल्या नोकराच्या खासगी सामानाच्या याद्या होत असत सरनोबत व इतर सरदार ह्या वेळीं महाराजाच्या दर्शनास येत, व ज्या मुलखात स्वारीस जाण्याची आज्ञा त्याजकडून होई तिकडे ते आपल्या हाताखालचें लष्कर घेऊन निघत

स्वारीस जाणाऱ्या सरदाराचे व इतर बड्याबड्या अमलदाराचे पगार आगाऊ देत असत; व लष्करातील शिपायाचा व इतर नोकराचा पगार स्वारीहून परत आल्यावर लागलींच देत असत त्याप्रमाणे एकदम मिळालेल्या पगारांत त्यांनीं आपल्या कुटुंबाची उभ्या वर्षाची तरतूद करून ठेवावी असें असे. पावसाळ्याच्या चार महिन्यांचा पगार त्याला दसऱ्याला मिळत असे असें दिसते. स्वारीस गेल्यावर त्याला आठ महिनेपर्यंत पदरमोड सहसा करावी लागत नसे. त्यांचें पोट बाहे-

रल्या बाहेर भरत असे लष्करातल्या प्रत्येक नोकरास राजी राखण्याची खबरदारी महाराज घेत असत त्यामुळे त्याच्या सैन्यात फितुरी किंवा नाराजी अशी बिलकुल होत नसे जो तो बहादुरी करून महाराजाकडून शाबासकी व बढती मिळविण्यास मनापासून झटे ह्या बाबतींत लष्करातील लोकाची जशी काय परस्पराशी स्पर्धा लागून राहिलेली असे

इतर खात्यातील नोकराचे पगार, वेतने व तैनाती वेळच्या वेळी देण्याची व्यवस्था महाराज मोठ्या दक्षतेने ठेवीत वर्षाच्या वर्षास सर्वाच्या वेतनाचा हिशोब पावता होऊन सरकाराकडे कोणाचे येणे शिल्लक राहू देऊ नये अशी त्याचा ताकीद असे नोकरास मुशाहिरा वेळच्या वेळी पावल्याने ते राजी राहतात, त्याच्या गैरहजिरीत त्याच्या कुटुबाचे हाल होत नाहींत, व ते कजबाजारी होत नाहींत हे ते पूर्णपणे जाणून असत माणूस दिलगीर असल्यास फितवाफितवी करून राज्यास अपाय करिते, कामचोरपणा करिते, व सोपलेले काम हुशारीने व इमानाने बजावीत नाहीं, हे त्याच्या लक्षात येऊन चुकले होते आपले लष्करी व मुलखी खात्यातील नोकर कर्जबाजारी होऊ नयत त्याविषयी त फारच खबरदारी घेत असत कर्जबाजारीपणामुळे मनुष्य लाचार व निरुत्साह होतो, व एखादे अनन्वित कर्म करण्यास तयार होतो हें जाणून त्यानी असा नियम केला होता कीं, कोणी कर्ज करू नये लग्नकार्यादि प्रसगी गरीबगुरिबास व तालेवारासहि कर्ज काढणे प्राप्त होत असते यास्तव अशा कार्यास कोणाला मदत हवी असल्यास त्याने सरकारास अर्ज करावा. मग त्याची जशी योग्यता असेल त्या मानाने त्यास मदत मिळत असे इतकेहि करून कोणी उत्पन्नापेक्षा अधिक खर्च करून किंवा दुसऱ्या प्रकारें उधळपट्टी करून कर्जबाजारी झाला असता त्यास सरकारनोकरीवरून तत्काळ दूर करीत.

मोठमोठ्या अमलदाराचा पगार रोख देत असत, किंवा वसुलावरील अधिकाऱ्यास त्याच्या नावे वराता देत ह्या अधिकाऱ्यानीं त्या वराताबरहुकूम दाणा किंवा नगदी नाणे ज्याचें त्यास वेळच्या वेळी देत जावे असें असे अशा वरातानी मिळणाऱ्या वेतनाचा हिशोब वर्षाच्या वर्षास होऊन सालझाडा होत असे. कोणाची बाकी अशी कधींहि ठेवीत नसत. एखादा पगारी नोकर शेतकरी असला तर त्याच्या ताब्यातील जमिनीचा धारा इतर शेतकऱ्याप्रमाणें ठरवून तो त्याच्या वेतनात धरीत असत. तो असा बाद होऊन जें काहीं देणें निघे तें

त्यास वराता देऊन गल्ला व नगदी याच्या रूपानें वेळच्यावेळीं पावतें होत असे. कोणा लष्करी अमलदारास किंवा इतर खात्यातील हुद्देदारास त्याच्या तैनाती-दाखल एकाद्यादुसऱ्या गांवाचें उत्पन्न लावून देत नसत अशा देण्याला मोकासा ह्मणत हे असे मोकाशे लावून देण्याची चाल यवनी अमलांत जिकडे तिकडे असे ह्या चालीमुळें मोकासदार लोक गावातील रयतेस हवा तसा त्रास देत जमिदार व ते एक होऊन रयतेस खुशाल नागवीत सरकारी अमलाच्या जोरावर ते रयतेकडून हवी तीं कामे करून घेत हा प्रकार अगदीं अनिष्ट वाटल्यावरून गावगन्ना वसुलावर सरकारी कारकून नेमून देऊन जें काहीं वरातानीं देणें तें ह्या वसूल करणाऱ्या अधिकाऱ्यानी सरकारी उत्पन्नातून द्यावे, ज्यास वराता मिळत त्याची मालकी कोणत्याहि गावावर किंवा महालावर कोणत्याहि प्रकारे चालू नये, असा सक्त बदोबस्त केला होता

त्याप्रमाणेंच जाहगिरी देण्याची पद्धत महाराजानी अगदी वंद केली यवनी अमलात बड्याबड्या सरदाराला व कामगाराला सरकारी कामगिरी चागली केल्याबद्दल जाहगिरी देत असत ह्या जाहगिरीतील गावाचें उत्पन्न जाहगीरदारानीं आपल्या वतीनें लोक ठेवून जमा करावे, आणि त्याचा काहीं अश खंडादाखल सरकारात भरावा किवा युद्धादि प्रसगी अमुक इतक्या सैन्याची सरकारास मदत करावी, असें असे त्याप्रमाणे जाहगीरदार केवळ माडलिक राजाप्रमाणेच होऊन बसत त्याच्या जाहगिरीतील रयतेवर त्याचा तावा सर्व प्रकार चाले त्यामुळें रयतेस असें वाटे कीं, हेच आपले सत्ताधीश जाहगीरदार फौजफाटा ठेवीत, व आपल्या जाहगिरीत कोटकिल्ले बाधून मोठ्या बंदोबस्तानें राहत. दुसरें असें कीं, ह्या जाहगिरी वंशपरपरा चालत त्यामुळे ज्यानीं पहिल्याने ह्या जाहगिरी कमाविल्या असत त्याचें वरिष्ठ सरकाराविषयीचें प्रेम व इमान त्याच्या वंशजात कायम राहणें शक्य नसे व मूळपुरुषाची कर्तबगारी त्याच्या वंशजात असण्याचा सभव नसे. यास्तव वरिष्ठ सरकाराशीं हे जाहगीरदार अमळ बेपरवाईनें वागूं लागत. इतकेंच नव्हे तर त्या सरकाराविरुद्ध बंडे उभारण्यासहि ते तयार होत, आणि परचक्रादि अरिष्टामुळे मुख्य सरकार कमजोर होण्याचा किवा अजीबात नष्ट होण्याचा समय आला असता, ह्या जाहगीरदाराकडून त्यास मदत मिळण्याचें एकीकडेच राहून हे स्वतंत्र होऊन बसत हा अनिष्ट प्रकार महाराजानीं आपल्या राज्यात मुळींच चालूं दिला नाहीं काबीज केलेल्या मुलखात कोणी असें जाहगीरदार आढळल्यास त्याच्या जाहगिरी त्याजकडे पूर्वीप्रमाणें मालकी

हक्कानें महाराज ठेवीत नसत. त्यांस फार तर त्याच्या ताब्यातील गावाच्या उत्पन्नाचा अमुकएक अंश हक्कादाखल मिळावा असें ठरवीत, व त्या गावातील रयतेकडून वसूल जमा करण्याचें काम सरकारी कारकुनाकडून करवीत. जाहगीरदाराचा कोणत्याहि प्रकारचा ताबा रयतेवर चालूं देत नसत त्या जाहगीरदारापैकी जे सरदार हुशार व कर्तबगार असत त्यास अर्थात् ते आपल्या लष्करात किंवा इतर खात्यात त्याच्या योग्यतेप्रमाणे नोकऱ्या देऊन ठेवीत. अशा खालसा केलेल्या जाहगिरीत जाहगीरदारानी वाडे, हुडे, कोट, किल्ले वगैरे बांधिले असत ते सगळे महाराजानी जमीनदोस्त केले त्यानी सामान्य रयतेप्रमाणे घरे बांधून राहावें असे ठरविले जे किल्ले मजबूत असत त्यावर अर्थात् आपलीं ठाणीं बसवून ते आपल्या कबजात महाराज घेत असत

ह्याप्रमाणे महाराजानीं पाटील, कुळकर्णी, खोत, देशमुख, देसाई, देशपांडे, जमीदार, मोकासदार, मिरासदार, जाहगीरदार वगैरे लोकाच्या तावडीतून रयत सोडवून तिला सुखी केले आता अशा हक्कदारासहि महाराजानी नाखुष न करण्याविषयीं शक्य दिसले तेवढे उपाय केले. जाहगिरीच्या पद्धतीस आपल्या राज्यात थारा न दिल्यामुळेच महाराजाच्या कारकीर्दीत मोठमोठे पराक्रम करून प्रसिद्धि पावलेल्या सरदारास व अधिकाऱ्यास जाहगिरी वगैरे न मिळून त्याच्या घराण्याची फारशी कोठे नावेंहि ऐकूं येत नाहींत मोरोपंत पिंगळे, आबाजी सोनदेव, तानाजी मालुसरे, येसाजी कंक, बाजी पासलकर, बाजी प्रभु, नेताजी पालकर, प्रतापराव गुजर, हंबीरराव मोहिते वगैरे सरदाराचीं घराणीं, ही जाहगिरीची पद्धत महाराजानी चालू ठेविली असती तर, आज कदाचित् ह्या तहि असतीं

आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीसंबंधाने महाराजानी उत्तम शिस्त घालून ठेविली होती, तिचें दिग्दर्शन ह्या ठिकाणीं करणें उचित होय. ती अशी कीं, कोणताहि सरकारी हुद्दा वंशपरपरा कोणाच्याहि कुळात चालू ठेवूं नये. बाप कितीहि हुशार व कर्तबगार असला तरी त्याच्या कामगिरीबद्दल त्याच्या पश्चात् त्याच्या मुलास मोबदला द्यावयाचा झाल्यास त्याची वास्तविक योग्यता किती आहे तें पाहून द्यावा; केवळ बडे बापका बेटा असें समजून त्याच्या बापाचा हुद्दा त्यास अंगीं कर्तबगारी नसल्यास सांगूं नये, किंवा दुसरा कोणताहि मोठा हुद्दा त्याच्या अंगीं तो वहिवाटावयास लागणारी अक्कल व हुशारी नसल्यास देऊं नये.

असा त्यांचा नियम असे त्यामुळे ज्याच्या त्याच्या अंगच्या वास्तविक गुणांची बूज होऊन सरकारी काम हुशारीनें व योग्य प्रकारें बजावण्यात येत असे महाराजाच्या पदरीं पेशवा, सेनापति वगैरे प्रधान व सुभेदार, हवालदार वगैरे अमलदार हुशार व कर्तबगार असून त्याच्या हातून स्वराज्यसाधनास इतके मोठे साहाय्य झालें असूनहि त्याचा हुद्दा त्यांच्या वशात कायम राखण्याचा अविचार त्यानीं कोणाच्याहि बाबतीत केला नाहीं. इतकेच नव्हे तर कोणी केवढाहि मोठा हुद्देदार असला तरी त्याच्या हातून आपल्या कामांत कसूर झाली असता किंवा त्याच्याकडून बेकैद वर्तन होऊ लागले असता त्याला त्याच्या हुद्द्यावरून दूर करण्यास महाराज कधीहि चुकत नसत, आणि अशा हुद्देदारास किंवा सरदारास जाहगिरी दिल्या नसल्यामुळे त्यास त्याप्रमाणे वाटेल तेव्हा दूर करण्यास अडचण पडत नसे. ही शिस्त अर्थात् अगदीं नवी होती. कारण पुरातन राज्यपद्धतीत किंवा यवनी राज्यपद्धतीत हिच्या उलट प्रकार आढळतो शाहूराजाच्या वेळापासून पेशवाई माजून ह्या शिस्तीस पुरा खो मिळाल्यामुळे मराठी साम्राज्याचे कसे वाटोळे झाले हे सर्वांस महशूर आहेच.

येथपर्यंत महाराजानी आपल्या लष्करी व मुलखी खात्याची व्यवस्था कशी लाविली होती त्याचे दिग्दर्शन केले आता स्वराज्यात नेमलेले अधिकारी आपआपली कामे लावून दिलेल्या शिस्तीप्रमाणे वेळच्या वेळी इमानाने करितात किंवा नाहीं याची देखरेख प्रधानमडळ व महाराज आपण खत फुरसतीप्रमाणें ठेवीत असत. परंतु प्रत्येक किल्ला, प्रत्येक महाल, प्रत्येक सुभा, व प्रत्येक छावणी व स्वारी यांतील अधिकाऱ्याच्या हालचालींवर वेळोवेळा नजर ठेवण्याचें प्रमुख अधिकाऱ्यास साधण्यासारखे नसे म्हणून त्यानी हेर व बातमीदार ठेविले असत. ह्या सर्वांचा नाईक बहीरजी हा होता त्याजवर महाराजाचा पूर्ण इतबार असे. मुलूखगिरीवर पाठविलेल्या लष्करांतील अंमलदार केलेल्या लुटीचा व मिळविलेल्या खंडाचा हिशोब बरोबर देतात किंवा काहीं अफरातफर करितात हें पाहण्यासाठीं महाराज प्रत्येक स्वारीबरोबर हेर पाठवीत. प्रत्येक किल्ल्यावरील अमलदार आपलीं कामे शिस्तवार करितात किंवा कसे, व ते शत्रूस मिलाफी होऊन कांहीं दगाफटका करितात किंवा कसें तें पाहण्यासाठीं हे हेर जिकडेतिकडे फिरत असत. त्याप्रमाणेंच महालकरी, सुभेदार वगैरे मुलखी खात्यातील अधिकारी रयतेस त्रास देतात कीं काय, व वसूल केलेल्या

उत्पन्नाचा ऐवज सरकारात इमानानें जमा करितात किंवा कसें हें पाहण्यासाठीं प्रत्येक प्रातातून व महालातून महाराजाचे हेर फिरत त्या हेरांचें व जासुदांचें एवढेच काम नसे त्यास आणखी परमुलखातील हालहवाल काय आहे, शत्रूची हालचाल काय आहे, अदिलशाही, कुतुबशाही, मोगली वगैरे दरबारांत काय मसलती चालल्या आहेत, त्याची माहिती वेळोवेळा मिळवावी लागे हे महाराजाचे हेर जिकडेतिकडे अनेक वेशानी सर्वदा फिरत असत जी काहीं माहिती त्यास मिळे ती तपशीलवार लिहून ते महाराजास जेव्हाची तेव्हा कळवीत हीं हेराकडून आलेलीं पत्रे महाराज एकातीं बाळाजी आवजी चिटणीस याजकडून वाचवीत स्वराज्यातील एकाद्या अमलदाराने किवा अधिकाऱ्यानें काहीं बेकैद वर्तन केल्याचे त्या बातमीदाराकडून कळल्यास त्याची बारीक चौकशी करून तो खरोखरीच गुन्हेगार ठरल्यास त्याला लागलीच शिक्षा होत असे त्यामुळें सर्व नोकरावर सारखी जरब राहून जो तो आपल्या कामात दक्ष राही.

महाराजाना त्या वेळी न्यायखाते स्वतत्र नेमण्याची आवश्यकता फारशी वाटली नाहीं जमिनीसबधाचे व देवघेवीसबधाचे खटले उपस्थित झाले असतां त्याचा निकाल लावण्याचे काम प्राताच्या किवा महालाच्या अधिकाऱ्यानीं पंचाकडे सोपवावे असे असे त्या काळी ग्रामपंचायतीची पद्धत चोहोकडे चालू असे तीच रयतेच्या मर्जीची वाटल्यावरून महाराजानी कायम ठेविली आपल्या खटल्याच्या निकालासाठी रयतेला लाब कोठें जावे लागू नये, तिचा न्याय जागच्या तेथें वस्तुस्थिति प्रत्यक्ष डोळ्यानी पाहणाऱ्या पंचानीं फुकट करावा हें त्यास इष्ट वाटे पचानीं दिलेले निकाल अर्थात् महालकरी व सुभेदार कायम करून त्याबद्दल हुकूम अमलबजावणी करीत असत इतकेंहि करून हा पचाचा निकाल कोणास पसत न वाटल्यास त्याने हुजुरास त्या सबधाने अर्ज करावा, व त्या खटल्याची चौकशी न्यायाधीशाने करावी असें असे आता फौजदारी खटले उपस्थित झाले असता त्याचा निकाल प्राताच्या सुभेदारानें द्यावा असें असे. त्या सुभेदाराच्या निकालावर कोणास तक्रार घेणें असल्यास त्यानें हुजुरात अर्ज करावा, व त्या निकालासंबंधाची फेरतपासणी पंडितरावानें करावी असें असे. लष्करात काहीं तटेबखेडे किवा गुन्हे झाल्यास त्याची चौकशी लष्करी सुभेदारानें किवा दुसऱ्या वरिष्ठ अमलदाराने करावी, व त्यानें दिलेल्या निकालावर तक्रार घेणें असल्यास त्यानें हुजुरांत अर्ज करावा, व त्याची तपासणी सरनोबत यानें करावी असें असे.

स्वराज्यांत चोरभय फार असे. तें महाराजानीं अगदीं नाहींसें करून टाकलें. जागोजाग चोर व बेरड असत त्यांस धरून आणून कित्येकाचे शिरच्छेद करीत. कित्येकास शेतें लागवडीस देऊन एकाद्या किल्ल्याच्या आश्रयाने ठेवीत तेथील गडकऱ्याची त्याच्यावर कडी नजर असावी असें असे कित्येकास गडकऱ्यात नोकरीस ठेवून त्याची उपजीविका चाले असें करीत ज्या गावात चोरवडा फार असे त्या गावाच्या रखवालीस एकादादुसरा बेरड ठेवून देत त्याने स्वत: चोरी केली असता त्याचा तत्काळ शिरच्छेद होई, व त्याच्या रखवालीच्या गावात दुसऱ्या कोणी चोरी केली असता तिचा त्याने पत्ता लावून द्यावा किंवा ती भरून द्यावी असे केलें

स्वराज्यात मोठमोठी देवस्थाने व तीर्थस्थाने होती त्यास प्राचीन धर्मादाय चालत आले होते ते महाराजानी पुन यथास्थित चालू केले ज्या कित्येक देवस्थानास पुरेशा नेमणुका नव्हत्या त्यास त्या भरपूर लावून दिल्या कित्येक नव्या देवस्थानास मुळीच नेमणुका नव्हत्या, त्याची पूजाअर्चा, नैवेद्य, उत्सव, अभिषेक, नंदादीप वगैरे यथास्थित चालावी ह्मणून त्यास जमिनीचे उत्पन्न लावून दिलें ह्या सर्व देवस्थानाची व्यवस्था नीट चालावी ह्मणून त्यास पारिपत्यगार नेमून दिले लावून दिलेल्या उत्पन्नाचा व्यय ब्राह्मणानी व पुजाऱ्यानी वाटेल तसा करू नये ह्मणून त्यानी सर्व खर्चाचा हिशेब तपशीलवार ठेवावा असे असे हे हिशेब प्रतिवर्षी सरकारी अधिकारी तपासून पाहत असत मोठमोठ्या क्षेत्रातील कित्येक सत्पात्र ब्राह्मणास वर्षासनें करून देऊन त्यानी स्नानसंध्या करून सुखानें कालक्रमणा करावी असें केले. त्याप्रमाणेच थोरथोर सत्पुरुषाचा योगक्षेम यथास्थित चालून त्याचे उत्सव वगैरे चागले व्हावे ह्मणून त्यास गाव किंवा जमिनी लावून दिलेल्या असत.

महाराज केवळ आपल्या धर्माच्या देवस्थानासच नेमणुका करून देत असत असें नाहीं, तर स्वराज्यांत मुसलमानाच्या कबरी, मशिदी, पीर वगैरे असत, त्यांस यवनी अमलाच्या वेळी लावून दिलेल्या नेमणुका ते पुढे चालवीत, त्या कदापि खालसा करीत नसत. इतकेच नव्हे तर कित्येकास पुरेशा नेमणुका नसल्या तर त्या भरपूर करून देत असत. ह्यावरून यवनांच्या पूज्यस्थानांसंबंधानें त्यांच्या मनांत तिरस्कार किंवा द्वेष बिलकुल वसत नसे हें सिद्ध होतें. महाराजानीं किंवा महाराजांच्या सरदारांनी इतक्या स्वाऱ्याछापा केल्या,

पण एकाहि प्रसंगीं मुसलमानांच्या पवित्र स्थानाला उपद्रव दिल्याचें कोठेंहि लिहिलेलें आढळत नाहीं खरे ह्मटलें असतां यवन जसे हिंदूच्या देवस्थानाची वेळोवेळा नासधूस करीत असत, तसा प्रकार त्यांनी त्याच्या मशिदी वगैरे पूज्य स्थानाचा केला असता तर त्यास कोणीं दोष लाविला नसता परंतु महाराजाची धर्मसंबंधाने उदारबुद्धि असून धर्मवेड त्याच्या ठायी बिलकुल नव्हतें.

यवनी अमल सर्वत्र स्थापित होऊन महाराष्ट्रातील वेदशास्त्राचें अध्ययन अगदीं लोपल्यासारखे झालें होते त्यास उत्तेजन यावे ह्मणून महाराजानीं अशी व्यवस्था केली होती कीं, पढलेल्या ब्राह्मणानीं प्रतिवर्षी श्रावण मासात हुजुरास यावें, व त्याची परीक्षा पडितरावाने घ्यावी ज्याने एका ग्रथाचे अध्ययन केलें असे त्याला एक मण धान्य, दोन ग्रंथाचें अध्ययन केलें असे त्याला दोन मण धान्य, पंचग्रंथी व दशग्रथी याम पाचपाच दहादहा मण धान्य प्रतिवर्षी देत जावें कोणी मोठे पंडित, वैदिक, ज्योतिषी वगैरे आले असता त्याच्या योग्यतेप्रमाणें त्यांचा सत्कार करून त्यास शभरशभर, पन्नासपन्नास रुपये दक्षिणा देत असत. ब्राह्मण परमुलखातला असल्यास त्याची सभावना द्रव्य देऊन करावी, व स्वराज्यातला असल्यास त्याला धान्य देण्याविषयी, ज्या गावीं त्याची वसति असे, त्या गावच्या अधिकाऱ्यावर वरात देत जावी. ह्याप्रमाणें सस्कृत धर्मग्रथाच्या अध्ययनास महाराजानी उत्तेजन दिलें ह्याशिवाय जे ब्राह्मण अग्निहोत्र घ्यावयास सिद्ध होत किवा काहीं अनुष्ठान किंवा यज्ञ करण्याचें मनात आणीत त्यास द्रव्यादिकाचें यथोचित साहाय्य महाराज करीत आपल्या राज्यांतील सत्पात्र ब्राह्मणानीं व सत्पुरुषानीं दुसरीकडे कोठे याचना करावयास जाऊ नये, किवा त्याचा योगक्षेम चालण्यास अडचण पडूं नये, अशी खबरदारी महाराज सर्वदा घेत असत

राज्यात जागोजाग अन्नसत्रे घालून गरीबगुरिबाच्या निर्वाहाची सोय केली, व मोठमोठ्या देवस्थानात वेळोवेळा ब्राह्मणभोजनें घालण्याची व्यवस्था गेली. ह्याशिवाय नित्यनैमित्तिक दानें मुबलक करण्याचा परिपाठ महाराजानीं घातला.

महाराजानी गाईंचीं खिल्लारें मानदेश, भीमथडी वगैरे गवताचीं कुरणें पाहून जागोजाग ठेविलीं होतीं. गाईंची जोपासना करण्यासाठीं गवळी व चाकर ठेविले होते. लष्करास वगैरे बैल हवे असत ते ह्या खिल्लारांत तयार होत असत. ह्याप्रमाणेंच कोणा शेतकऱ्यास बैल सरकारांतून देण्याचें ठरल्यास ते ह्या

खिल्लारातून देत असत गाईच्या खिल्लारांप्रमाणेंच महिषींचींहि खिल्लारें जागोजाग ठेविलीं होतीं तीं धनगर व गौळी यांच्या स्वाधीन केलीं असून त्यांनीं देशात किंवा डोंगरात चाऱ्याच्या जागा असतील तेथें राहावें असें असे. त्या खिल्लाराची मोजदाद वर्षाच्या वर्षास होऊन अमुकाकडून अमुक लोणी किंवा तूप यावे, व ब्राह्मणभोजनास लागणारें दूध अमक्याने अमके पुरवावें असें ठरवून ठेविलें त्याप्रमाणेंच वीसपंचवीस हजार शेळ्यामेंढरांचे कळप धनगराकडे राखणीस दिले असत. त्याचीहि मोजदाद प्रतिवर्षी होऊन अमुकानें अमुक इतकीं मेंढरें दसऱ्याच्या वगैरे प्रयोजनास व सरकारी खर्चास पाठवावीं असें ठरविले असे

त्याप्रमाणें सर्व दौलतीचा बदोबस्त शक्य तितका चागला करून त्याचे नियम बाधून दिले तसेंच त्यानी आपल्या स्वताच्या दिनचर्येचे नियम करून ठेविले. ते उष कालीं उठत पहाटेची नौबत व्हावी, व गायकांनीं वीणामृदंगादि मंजुल वाद्याच्या साजासह भगवताचे स्तुतिपाठ गावे, व त्या नादानें त्यानीं उठून कांहीं वेळ प्रात स्मरण करावें. नंतर शौचादि विधि उरकून गोदर्शन व मंगलालंभन करावें, व गंगादि महानद्याच्या तीर्थानें युक्त अशा उदकाचें स्नान करून, जप व देवार्चन करावें नंतर काहीं वेळ पुराण श्रवण करावें. ह्या सगळ्या गोष्टी चार घटका दिवस आला नाहीं तो आटपाव्या मग वस्त्रालंकार लेवून तिरंदाजी व निशाण मारणें याचा व्यायाम एक घटका करून सभेस जावें तेथें कारभारी आपआपल्या कामाची सुनावणी करून हुकूम किंवा मंजुरी घ्यावयची ती घेत. कोणी दर्शनास येत त्याचे मुजरे घ्यावे व त्याजकडे कृपादृष्टीनें पाहावें. कोणाकडे नुसतें अवलोकन करून स्मितहास्य करावें, कोणाशीं दोन शब्द बोलावे, कोणाला काहीं कामगिरी सागावी, अशीं सर्वांचीं अत करणें वेधून घ्यावीं. त्यावरून सगळ्यास वाटे कीं, आपल्यावर महाराजाची कृपा आहे. कोणी गुणिजन आले असता त्याच्या गुणाच्या मानानें त्यांचें गौरव करून त्यांस इनामें वगैरे देऊन खुश करावे. ह्याप्रमाणें दहा घटका दिवस येईपर्यंत सभेस बसून मग कोणाशीं कांहीं एकातीं मसलती करावयाच्या असल्यास त्या निरनिराळ्या ठिकाणीं बसून कराव्या. मग बारा घटका दिवसास ब्राह्मणभोजनाचें उदक सोडून नैवेद्य करून पंक्तिभोजन करणारांस बरोबर घेऊन भोजन करावें. तांबूलसेवन केल्यावर पुनः येऊन मंत्रसभेस बसावें, आणि पत्रें आलीं असतील तीं चिटणीसाकडून वाचवावीं, त्यास त्या पत्रांचे जबाब लिहावयास सांगावें, व कोणांस पाठ-

वावयासाठीं लिहून तयार केलेले पत्रांचे मसुदे चिटणिसानें वाचून दाखवावे. नंतर काहीं कार्ययोजना करावयाची असल्यास ती करावी, आणि मागल्या दिवशीं आयव्यय झाला असेल तो व पुढल्या दिवशीं करावयाचा तो पाहावा. इतकें काम आटोपल्यावर अत पुरात जाऊन दोनतीन घटका वामकुक्षी करावी नंतर पुन मुख प्रक्षालन करून सभेस यावे व कारखाने व महाल याची व्यवस्था कशी काय ठेवण्यांत येत असे ती जातीनें पाहावी, अधिकाऱ्यानी न्यायमनसोबा केला असेल तो पाहावा व त्यास यथोचित मंजुरी द्यावी कोणाची काहीं फिर्याद किंवा अर्ज असल्यास तो मनास आणावा चार घटका दिवस उरला ह्मणजे स्वारी बाहेर फिरावयास निघे कारखाने, महाल वगैरे पाहावयाचे असल्यास ते जातीनें जाऊन पाहावे देवदर्शन करावे मग बागबगीच्यात किवा आरामवटिकेत जाऊन तेथ घोडी फेरणें, बोथाट्या फिरविणे, इत्यादि मर्दानीचे खेळ खेळून सायंकाळ झाला ह्मणजे पुन परत येऊन सभेस बसावे तेथे पुनः लोकाचे मुजरे व भेटी घेऊन दोन घटका रात्रीस जपध्यान करून पुराणादिकाचें श्रवण करावे; आणि मग भोजन करावे ताबूल सेवन केल्यावर पुन सदरेस येऊन राज्यकार-भाराचा विचार करीत एकदोन कारभाऱ्यासह एकाती बसावें तदनंतर हेरा-कडून आलेल्या बातम्या, नाजूक कामे व पत्रे पाहावी, व धान्यादिकाचे निरख ऐकून अत पुरात जावे ह्याप्रमाणें आपल्या दिनचर्येचें नियमन करून प्रत्येक घटकेस जे काम करावयाचे ते त्या घटकेस करावे ह्या घटकेचे त्या घटकेस असें कदापि होऊ नये याची खबरदारी महाराज घेत असत आपण आपलीं कामें वक्तशीर केली तर आपले नोकरहि आपलीं कामे वेळच्या वेळी करण्यास झटतात, व ती त्याजकडून तशी झालीं नाहींत तर त्यास बोल लावण्यास आपणाला जोर येतो, हे तत्त्व महाराजास चागले कळत असे. काम वेळच्या-वेळी नियमितपणे करावे, आजचें उद्यावर टाकूं नये, व यत्किंचित्‌हि आळस करूं नये, ही गोष्ट महाराज स्वताच्या वर्तनानें आपल्या सेवकाच्या चित्तात अह-र्निश ठसविण्याचा प्रयत्न करीत

आपल्या आयुष्याचा एक क्षणहि व्यर्थ जाऊं नये अशी महाराजांची नेहमीं उत्कट इच्छा असे. त्याप्रमाणेंच आपल्या सेवकानीहि आपआपलीं कामें निरलस-पणें व दक्षतेनें वेळच्या वेळीं करावीं अशी त्यांची फार इच्छा असे. जो मनुष्य मेहनती व हुषार असून आपल्या कामांत दक्ष असे तो महाराजांस आवडत असे. कोणास बढती किंवा मान द्यावयाचा त्याच्या अगीं मुख्यतः हे गुण आहेत

किंवा करें तें महाराज पाहत असत. गुणांची नीट पारख करून व हुशारी पाहून कोणास बढत्या द्यावयाच्या त्या ते देत. केवळ कोणी मर्जींतला असला, किंवा स्नेहीसबंधी असला, किवा कोणीं त्याची शिफारस केली असली तर तेवढ्या-वरून त्यास एकादा हुद्दा किवा बढती महाराज देत नसत. प्रत्येकाची शिफारस महाराजापाशीं व्हावयाची झटली झणजे त्याच्या अगच्या वास्तविक गुणावरूनच फक्त व्हावी असें असे येणेकरून गुणाची खरी बूज व चहा होऊन लायक माणसास उत्तेजन मिळे आळशी, खुशालचंद नातेवाइकाची डाळ महाराजाकडे बिलकुल शिजत नसे

महाराज सभेस बसले झणजे तेथे हास्यविनोदादि प्रकार कोणीं बिलकुल करूं नयेत असा त्याचा दरारा असे खुषमस्करे, नकले, खुशामते याचा महाराजास पुरा तिटकारा असे बीभत्स व अश्लील गोष्टी त्यास कधीहि आवडत नसत. त्याप्रमाणेच कोणाहि व्यसनी किवा छदी मनुष्यास ते आपल्या जवळ कधीहि येऊं देत नसत सर्वदा युद्धप्रसग, घोडी, शस्त्रे व परराज्यसाधन याच्या चर्चेत त्याचा काळ जात असे कधी काहीं करमणूक करण्यास सवड मिळाली असता निर्व्यसनी व निष्कपट अशा दोनचार कृपेतल्या मनुष्याबरोबर एकातीं बसून हास्यविनोद करावा, किवा भूषणकवीसारख्या कवीच्या वाग्रत्नाचे श्रवण करून मन रिझवावे, असा त्याचा परिपाठ असे कोणी उत्तम गायक किवा विद्वान् पुरुष आला असता त्याचे गायन किवा वाक्चातुर्य श्रवण करून त्याची यथोचित बिदागी किवा सभावना करावी नृत्यगायनादि कलाचा महाराजास वीट होता असें नाहीं त्याच्या श्रवणावलोकनादिकेकरून ते आपलें मनोरंजन कधींकधी करीत असत, परतु त्यात ते आसक्त होऊन जात नसत त्याप्रमाणेंच त्यास शिकारीचा झणजे फारसा नाद होता असें नाहीं परंतु मृगया करण्याचा मुख्य उद्देश जो हिंसक पशूंचा संहार करण्याचा तो क्षात्रधर्मास अनुसरून आहे असें मनात आणून ते फुरसत मिळाल्यास एकदोन महिन्यानी एकदा शिकारीस जात. त्या वेळीं हरिणादि गरीब पशूंचा ते सहसा वध करीत नसत. श्राद्धादिविधींस त्याची आवश्यकता असल्यास क्वचित् प्रसगी ह्या पशूंची ते मृगया करीत.

आपल्या नोकरानी एकमेकांशीं सलोख्यानें वागावें, कोणीं कोणांचा द्वेषमत्सर करूं नये अशी त्यांची सक्त ताकीद असे ज्यानें त्यानें आपआपलीं कामें करावीं दुसऱ्यांच्या कामात ढवळाढवळ करूं नये, व कोणत्याहि गोष्टीचा आग्रह धरून एकमेकांशीं स्पर्धा किंवा द्वेष करूं नये असा निर्बंध असे. कोणाहि नोकरानें मुख-

त्यांची नालस्ती सांगण्याचा प्रयत्न केला असता महाराज त्याला ती आपल्याकडे बोलूं देत नसत कोणी अधिकारी दुसऱ्या अधिकाऱ्याचा द्वेष करूं लागून परस्परांमध्ये वैरभाव उत्पन्न झाला असता त्याच्यात मध्यस्थी करून महाराजांनीं त्याचें वैमनस्य नाहींसें करावे. इतकेहि करून हा त्याचा वैराग्नि नच शमला तर ते एका जातीचे असल्यास त्याच्यामध्ये त्यानी शरीरसबंध जुळवून देऊन तो कायमचा मिटवावा लहान हुद्देदारानी मोठ्या हुद्देदाराची अमर्यादा सहसा करू नये महाराजाच्या तैनातीस असलेले माणूस निकट सबंधास्तव कितीहि कृपेंतले असले तरी त्यानी त्याच्या जोरावर कोणाहि मोठ्या हुद्देदाराची बेअदवी किंवा मानखडना करू नये त्यानी कारभाराविषयी काहींएक बोलू नये त्यानीं महाराजांशी सलगी करून आपल्यासबंधाने किंवा आपल्या इष्टमित्रासबंधाने काहींएक बोलं नये. जे काहीं बोलणे असेल तें योग्य अधिकाऱ्याच्या द्वारें बोलावें महाराजांच्या अगदीं जवळच्या नातलगानीं किंवा कृपेंतल्या सरदारानीं सुद्धा जें काहीं महाराजापाशीं बोलावयाचे तें प्रत्यक्ष न बोलता योग्य अधिकाऱ्याच्या द्वारें बोलावें असें असताहि कोणी काहीं विनंति महाराजास प्रत्यक्ष केली असता तिचा जबाब अमुक कारभाऱ्यापाशी सागतों असें बोलून त्यास ते निरोप देत असत. एकाद्या अधिकाऱ्याविरुद्ध कोणी काहीं मागावयास आला असता तें ते मनास आणीत नसत तशात त्या अधिकाऱ्याचा खरोखरीच वाक आहे असें लक्षात आल्यास त्याची योग्य चौकशी करून खात्री झाल्यावाचून त्यास टपका किंवा शिक्षा देत नसत राजा कानाचा हलका किंवा चलबुद्धि असला ह्मणजे त्याचें मन मत्सरी, कपटी व लबाड लोक एकाद्या सेवकाविषयीं कलुषित करण्यास चुकत नाहींत, व तेणेकरून चागल्या सेवकाविषयी विनाकारण संशय येऊन त्याचें तो राजा अन्यायानें नुकसान करितो. ही गोष्ट महाराजास चागली कळत असे, व लबाडाचीं पावलें ओळखण्यास त्याना विलंब लागत नसे. ह्या वृत्तीमुळें सेवकजनास असा पक्का भरंवसा असे कीं, आपल्या हातून एकादा मोठा अपराध झाल्यावांचून किंवा आपल्या कामांत आपल्याकडून कसूर झाल्यावाचून महाराजाची आपणांवर कदापि इतराजी व्हावयाची नाहीं.

आतां महाराजानीं आपला दरबार भरण्यासंबंधाची व स्वारी निघण्यासंबंधाची शिस्त कशी काय लावून दिली होती तिचें येथें दिग्दर्शन करणें उचित होय. पहिल्यानें दरबार भरण्याची रीत सांग. दरबाराच्या ठिकाणीं मध्यभागीं

सिंहासन मांडलें असून त्यावर छत्रपति बसत पाठीमागें हुजरे मोरचेलें, चामरें, पंखे, पानदानें वगैरे घेऊन उभे राहत सिंहासनाच्या दोन्ही बाजूंस आप्त व विश्वासू असे दहाबारा मानकरी उभे राहत. सिंहासनाच्या उजवे बाजूस खालीं अनुक्रमे मुख्य प्रधान, पंत अमात्य, पत सचिव, मंत्री, चिटणीस, परराज्यातील वकील, मामलतदार व किल्लेदार आपआपल्या योग्यतेप्रमाणें बसत. डावे बाजूस पडितराव, सेनापति, सुमत, न्यायाधीश, फडणीस, सेनाधिकारी, सरदार व शूर शिलेदार आपआपल्या योग्यतेप्रमाणे क्रमवार बसत असत प्रधानाचे, सरदाराचे व इतर अधिकाऱ्याचे मुतालिक व कारकून आपआपल्या वरिष्ठाच्या मागे बसत त्याच्या पाठीमागे दोन्ही बाजूस कारखान्याचे व महालाचे दरोगे बसत, व हवालदार, नाईक वगैरे उभे राहत अग्रभागी दोन चोपदार उभे राहत. आलेल्या सभासदाकडून मुजरे करविणें, त्यास योग्यतेप्रमाणें बसविणें, कोणी परकी आल्यास त्याची वर्दी लावणे हीं कामें ह्या चोपदारांचीं असत दरबारच्या देवडीची चौकी चोपदाराच्या ताब्यात असे कोणा इसमास दरबारास बोलवावयाचें झाल्यास ह्या देवडीवरचे चोपदार शिपायास किंवा स्वारास पाठवीत.

आता स्वारीची शिस्त कशी ठरविली होती ते पाहू महाराजाची स्वारी निघाली ह्मणजे तिच्यापुढं पहिल्याने जरीपटका व भगवे निशाण याचे दोन हत्ती चालत त्याच्या मागून मुख्य प्रधान व सेनापति याचे जरीपटक्याचे दोन हत्ती चालत. त्याच्या मागून लष्करातील एकदर निशाणें चालत, आणि त्याच्या बरोबर पागेचे व शिलेदाराचे सरदार आपल्या काहीं लोकासह बिनीच्या रक्षणार्थ घोड्यावर बसून चालत त्याच्या मागून तोफखाना व दारूगोळ्याचे छकडे व गाड्या चालत त्याच्या मागून शूर सरदार घोड्यांवर व हत्तींवर बसून चालत त्याच्या मागून पायदळ लष्करातील पट्टेकरी, विटेकरी, सांगबर्चीवाले, तीरकमानवाले, खासबारदार व बंदुकावाले रागांरागानीं चालत. त्याच्या मागून ताशे, मार्फे, हलग्या, शिंगें, करणे वगैरे रणवाद्ये चालत. त्याच्या मागून कोतवाल हत्ती व बाणाच्या कैच्या उंटावरून चालत. त्यांच्या मागून खासे घोडे व कोतवालघोडे चालत. त्याच्या मागून शाहाबाजे, कानूसनया वगैरे मंगलवाद्यें व घोड्यावरील नगारे चालत. त्याच्यामागून भाट व बंदिजन चालत. त्याच्या मागून लग्या, निशाणें, जरित्वतोमर, भाले व सोट्या घेतलेले लोक, बाणदार, चोपदार, भालदार व वेत्रधारी हे चालत. त्यांच्या मागून जेठी, मल्ल वगैरे पायांनीं चालत. इतके लोक पुढें चालत व मग त्यांच्यामागून महाराज हत्तीवर

अंबारींत बसून निघत व त्याच्या सभोंवतालीं हुजरे व विश्वासू मावळे व त्यांचे सरदार चालत महाराजाच्या हत्तीच्या मागोमाग जनानखाना चाले. त्यामागें अंतरानें अष्टप्रधान दरबारात ज्या क्रमाने बसत त्या क्रमाने हत्तीवर बसून चालत; त्याच्यामागें चिटणीस, फडणीस, कोटणीस, मानकरी व इतर सरदार घोड्यावर बसून चालत सगळ्याच्या मागून साहेबी नौबत असून तीबरोबर सरलष्कर व इतर सरदार चालत

महाराज गुणिजनाचा परामर्ष घेण्यांत व त्याचा सग्रह करण्यात किती तत्पर असत याचें एक इतिहासप्रसिद्ध उदाहरण बखरीतून दिले आहे त्याचा येथें उल्लेख करून ह्या लाबलेल्या प्रकरणाचा समारोप करूं दिल्लीस बादशहाच्या पदरीं चिंतामणि नावाचा एक कवि होता[1] तो आपली कवनें गावून बादशहाचें मनोरंजन करीत असे त्या कवीचा भूषणनामा एक बधु होता हाहि मोठा कवि होता तरी त्यास काहीं प्राप्ति नसे तो आपल्या भावाच्या आश्रयाने असे हा घरातच बसून राहतो असें कोणी ह्मटल्यावरून ह्या कवीस मोठा राग आला, आणि यवनाचे अन्न भक्षून राहावयाचें नाहीं असा निर्धार करून तो दिल्लीहून निघाला. तो फिरतफिरत कमाहूंच्या पाहाडातील एका राजापाशी गेला[2] त्यानें त्याला आपल्या पदरी ठेवून घेतले काहीं वर्षे तेथे राहिल्यावर ह्या कवीस स्वदेशी जाण्याची इच्छा झाली त्यावरून त्या राजाने त्याला एक लाख रुपये देऊन जावयास निरोप दिला निरोप देताना तो ह्मणाला कीं, असा दाता तुला पृथ्वीवर दुसरा कोणीहि आढळणार नाहीं. ही गर्वोक्ति त्या स्वाभिमानी कवीस रुचली नाहीं त्याने त्यास तत्क्षणींच असा जबाब दिला कीं, तुझ्यासारखे किंबहुना तुझ्याहून मोठे दाते पृथ्वीवर सहस्रावधि असतील परंतु अशी गर्वोक्ति बोलून दिलेले लाख रुपये तुच्छ मानून जाणारा याचक मात्र कोणी नसेल. असें ह्मणून तो निस्पृह कवि तें द्रव्य न घेता निघून गेला. मग पुन. भ्रमण करीत-करीत तो शिवाजीमहाराजांची कीर्ति ऐकून दक्षिणेंत आला. महाराजाचें दर्शन घेऊन तो ह्मणाला. जो यवनाचा द्वेष्टा आहे अशाच्या पदरीं राहण्याचा माझा मानस आहे. त्यावरून त्यानीं त्याला आपल्यापाशीं ठेवून

---

१ हा प्रथम नागपूरचा राजा भोसला मकरंदशहा याच्या पदरीं बहुत वर्षे होता असे ह्मणतात.

२ हा कवि प्रथम पन्नाचा राजा छत्रसाल ह्याच्या पदरीं सहा महिने होता व तेथून महाराजांपाशीं सन १६६४ त आला असें काव्येतिहाससग्रहकार ह्मणतात.

घेऊन चांगली तैनात करून दिली. तो नाना विषयांवर सुंदर कविता ब्रीज भाषेंत करून महाराजांचें मनोरंजन वेळोवेळां करीत असे त्यानें महाराजाच्या प्रतापाचें वर्णन काव्यरूपानें केलें आणि ह्या काव्यास 'शिवराजभूषणकाव्य' असें नाव दिलें [1] हें सुरस काव्य पाहून महाराज फार खुष झाले. त्याच्या पदरीं कांहीं वर्षें राहिल्यावर तो स्वदेशी जावयास निघाला जाते समयीं त्यानी त्यास पुष्कळ द्रव्य देऊन परत येण्याविषयीं आग्रहपूर्वक सागितलें, व त्यानेंहि परत येण्याचें कबूल केलें

भूषणकवि शिवाजीमहाराजाकडून सन्मान पावून व पुष्कळ द्रव्य घेऊन परत दिल्लीस आल्याचे वर्तमान औरंगजेबबादशहास कळलें तेव्हा त्याला आपल्या भेटीस आणावे असें त्याने चिंतामणिकवीस सागितलें बादशहाची ही इच्छा त्यानें आपल्या बंधूस कळविली तेव्हा तो ह्मणाला, 'बादशहा आमच्या यजमानाचा शत्रु आहे त्याचे दर्शन आह्माला कशास हवे? कारण आमच्या मुखातून शिवाजीमहाराजाच्या प्रतापावाचून दुसरें कांहीं निघावयाचे नाहीं. त्यामुळें त्याला क्रोध मात्र येईल ' परतु चिंतामणिकवीने आपल्या बंधूस फारच आग्रह केल्यावरून तो बादशहाच्या दरबारास जावयास कबूल झाला. पण त्यानें अशी अट सागितली कीं, 'आह्माला दरबारात कांहीं कविता ह्मणावयास सागितली असता आह्मी फक्त शिवाजीमहाराजाचे प्रताप गाऊं. ही अट बादशहास कबूल झाल्यास आह्मी दरबारास येऊ ' चिंतामणिकवीनें आपल्या बंधूची ही अट बादशहास कळविली ती त्यास मान्य होऊन भूषणकवि दरबारास गेला, व बादशहाने त्याला कांहीं वर्णन करावयास सागितलें तेव्हा तो त्याला ह्मणाला कीं, 'आपण हात धुऊन बसा कारण माझा बंधु शृंगाररसपर कविता ह्मणून आपलें मन रिझवितो, त्या वेळी आपला हात वारंवार विजारीस लागतो मी वीररसपर कविता ह्मणणार, तेव्हा तो हात मिशावर जाणार आहे ' हे ऐकून बादशहा बोलला कीं, 'आमचा हात तुझे काव्य ऐकून मिशावर गेला नाहीं तर तुझा शिरच्छेद होईल ' अशी धमकी देऊन त्यास कविता ह्मणण्याचा हुकूम त्याने केला त्यावरून तो महा-

---

१ हें काव्य काव्येतिहाससंग्रहनामक मासिक पुस्तकात पुष्कळ वर्षापूर्वी छापून निघालें आहे. हें त्याने राज्याभिषेकाच्या आदल्या वर्षी पुरे केलें असून त्यात काव्यातील अलंकाराचे वर्णन केलें आहे, व त्याच्या उदाहरणार्थ जी पद्ये त्यानें रचिलीं आहेत त्यात शिवाजीमहाराजाचे वर्णन केले आहे.

राजांचे प्रताप वर्णू लागला ते ऐकून बादशहानें त्याला असा हुकूम केला कीं, आह्मी सार्वभौम राजे असून आह्मांस सर्व राजे करभार देतात असें वर्णन कर. तेव्हा त्या कवीने सर्व राजास वृक्षाची उपमा देऊन बादशहास भ्रमराची उपमा दिली, व तो सर्व वृक्षाच्या पुष्पातील मधु सेवन करीत असतो, असें वर्णन केले त्या वर्णनात त्यानें शिवाजीमहाराजास चंपकवृक्षाची उपमा दिली. याचें कारण उघडच होते कीं, जसा चंपकपुष्पास मात्र भ्रमर स्पर्श करीत नाहीं, तसें बादशहाचें शहाणपण एका शिवाजीराजापुढे मात्र चालत नाहीं, हा भाव कवीस व्यक्त करावयाचा होता. मग बादशहानें त्याला विचारिलें कीं, आह्माला हात धुऊन बसावयास सागितलें ते कशाला ? तेव्हा कवीनें आणखी फक्त सहा पद्यें ह्मटलीं त्यात त्यानें असें काहीं उत्कृष्ट वर्णन केलें कीं, सहाव्या पद्याच्या अतीं बादशहास पुरा आवेश चढून त्याचा हात त्या झटक्यासरशी अकस्मात् मिशावर गेला तें पाहून कवीने आपलें कवन आटोपले बादशहा त्याचे तें चातुर्य व कवित्वशक्ति पाहून अतिशयित खुष झाला, व त्याने त्याचा यथोचित सन्मान करून चागली सभावना केली. त्या दरबारी महाराजाचा वकील होता, त्यानें ही इत्थभूत हकीकत त्यास लिहून कळविली ती ऐकून महाराज परम संतोष पावले, व त्या कवीस त्वरित पाठवून देण्याविषयीं त्या वकिलास त्यानी पत्र लिहिलें. तें पत्र पाहताच भूषणकवि पुनरपि महाराजापाशी येऊन राहिला होता असें ह्मणतात.

# भाग पंचविसावा.



## मोगलांशीं व विजापूरकरांशीं पुनः कलह.

## १६७४–१६७६.

मोगलांचा सुभेदार खानजहान याच्याशी सलोखा करून औरंगजेब बादशहाकडे त्याच्या द्वारे एक अर्ज महाराजानी पाठवून त्यास मधाचें बोट दाखविण्याचा प्रयत्न केला होता, व मोगलसैन्याची हालचाल आपल्या विरुद्ध होऊ नये असें केले होते, हे मागे सांगितलेंच आहे परंतु हा सलोखा फार दिवस टिकला नाहीं महाराजानीं स्वतास मोठ्या थाटानें राज्याभिषेक करून घेतला व चिरवाञ्छित हिंदुपदपादशाहीची पुन स्थापना केली, हें वर्तमान औरंगजेबास कळले तेंव्हा त्यास अतिशयित वाईट वाटलें. आपला दक्षिणेंतील सुभेदार त्याला मिलाफी आहे असा त्याला वहीम आला, आणि स्वस्थ बसून राहिल्याबद्दल त्याने त्याला टपका दिला ह्या वेळीं हा खान आपल्या पेडगाव येथील छावणींत स्वस्थपणे चैन करीत राहिला होता राज्याभिषेकाची गडबड आटोपल्यावर दुसऱ्या महिन्यात त्याची छावणी लुटण्याचा बेत महाराजानीं केला, आणि दोन हजार घोडदळ तिकडे पाठवून देऊन मोगलांचा प्रात लुटण्याचा घाट घातला तेंव्हा अर्थात् हा खान त्या घोडदळाला हाकून देण्याकरिता त्याच्यावर चालून गेला. त्याने त्याला गुलकावण्या दाखवीत त्याच्या छावणीपासून बरेच दूर नेले. खान असा छावणी सोडून दूर गेला तेंव्हा महाराजानी सात हजार लोकानिशीं त्याच्या छावणीवर अकस्मात् हल्ला करून तेथल्या लोकास उधळून लाविलें आणि त्याची छावणी यथेष्ट लुटली. ह्या लुटींत त्याना एक कोटि रुपये व इतर बरीच चीजवस्त सापडली. बादशहाला नजर करण्याकरिता खानाने दोनशे उत्तम घोडे मिळविले होते, ते सगळे महाराजाच्या हाती लागले. मोगलांचे तंबू वगैरे सामान जाळून टाकलें.[१] मग दिलेरखानानें आपल्या फौजेनिशी महाराजाच्या मुलखांत शिरून लढाई आरंभिली.

---

१ प्रो. सरकार, पृ. २८३.

महाराजांनीं मोरोपंतास त्याच्यावर पाठविलें त्यानें खानाशीं समोरासमोर सामना करण्याचें सोडून मोगलाच्या मुलखात प्रवेश करून त्याचीं ठाणीं सर करण्याचा सपाटा चालविला मोगलानी परत घेतलेलीं औंध व पट्टा हीं ठाणीं त्यानें पुनरपि काबीज केलीं शिवनेरीकिल्ला ह्या वेळीं मोगलाच्या ताब्यात होता, तो परत घेण्याचा मोरोपंताने पुष्कळ प्रयत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं ह्याप्रमाणें मोरोपंत तिकडे गुंतला असता हंबीरराव सेनापति सुरतेजवळील घाटातून वर चढून गेला त्यानें आपल्या फौजेच्या अनेक टोळ्या करून त्या चोहोंकडे सोडल्या,व मोगलाच्या ताब्यातला तिकडील सगळा मुलूख लुटून उध्वस्त केला त्याच्या फौजेची एक टोळी तर नर्मदानदी ओलांडून भडोचप्रातात शिरली, व तिनें तिकडील लोकावर जबरदस्त खंड बसविले ह्या धामधुमीमुळें अर्थात् दिलेरखानास आपल्या सुभ्यातील मुलखाचा बदोबस्त नीट ठेवण्यासाठी महाराजाच्या मुलखातून फौज काढून न्यावी लागली

दिलेरखान माघारी गेल्यावर मोरोपंत दहा हजार लोकासह कल्याणास तळ देऊन राहिला तेथून त्यानें वसईच्या फिरंग्याकडे वकील पाठवून त्याच्या ताब्यातील सगळ्या प्राताच्या उत्पन्नाच्या चवथ्या हिश्शाची मागणी केली ही चौथाईची मागणी फिरगी लोकाकडे महाराजानीं पहिल्यानेच केली असें दिसतें. फिरंग्यानी पूर्वी तह करून तोफा, दारूगोळा वगैरे प्रतिवर्षी महाराजास पुरविण्याचें कबूल केलें होतें, व त्या तहाबरहुकूम ते वागतहि असत ह्या वेळीं त्याच्या प्रातावर चौथाईचा हक्क बसविण्याचे कारण असें झालें कीं, त्यांनीं आपल्या प्रातातील पुष्कळ हिंदुकुटुंबावर ख्रिस्तीधर्म स्वीकारण्याविषयीं जुलूम केला असून,जी कुटुंबें तो स्वीकारण्यास तयार झालीं नाहींत त्याचा त्यानी भयंकर रीतीने छळ चालविला होता ह्याबद्दल महाराजास फार वाईट वाटून त्यानीं हा खंड त्याच्यावर बसविण्याचे मनात्त आणिलें. मोरोपताने पाठविलेल्या वकिलास त्यानी बहुतकरून नकार सांगितला नसावा. कारण ह्या वेळी त्याचे युद्ध झाल्याचें कोठेहि लिहिलेलें आढळत नाहीं फिरंग्यानी काहीं तरी तोड करून मोरोपंताच्या कचाटीतून आपली मुक्तता अवश्य करून घेतली असावी एरवीं त्यास त्याच्याशीं लढण्याचें सामर्थ्य मुळींच नव्हतें, आणि मोरोपंतानेंहि त्याच्या प्रातास उपद्रव केला नाहीं असें दिसतें.

ह्याप्रमाणे सांष्टीबेटासमोर मोरोपंताचा तळ पडला असून तो तेथें बरेच दिवस राहिला. ह्यामुळे सिद्दीला मोठीच दहशत वाटूं लागली. त्यात आणखी

त्याला असें कळलें कीं, महाराजांची पुष्कळ फौज घाटावरून खालीं उतरत आहे. त्याचें आरमार ह्या वेळीं मुबईच्या बंदराजवळ होतें. त्याला हे मराठे आग लावून देण्यास काहीं कमी करावयाचे नाहींत अशी शिद्दीला भीति वाटणें साहजिक होतें ह्मणून त्यानें तें तेथून त्वरित काढून नेलें मोरोपंत सैन्यानिशीं घाट उतरून कल्याणास तळ देऊन राहिल्याचे वर्तमान सुरतेस पोंचतांच तेथील लोकाची पाचावर धारण बसली. त्यांत आणखी हंबीरराव सेनापति भडोच-पर्यंत पोचून तिकडील मुलखात धामधूम करीत होताच असा दुहेरी हल्ला आपल्या शहरावर येऊन आपली काय दशा होईल कोण जाणे असें त्यास वाटणें साहजिक होतें

ह्याप्रमाणे हे दोन प्रधान इकडे गुंतले असता स्वत महाराज काहीं स्वस्थ बसले नव्हते घाटावरून एकसारखी फौज उतरत होती. ती सगळी मोरो-पंताच्या छावणीत जमा झाली ही एवढी फौज इकडे का जमत आहे ते कोणा-सहि काहीं दिवस कळले नाहीं मोरोपंतापाशी एकंदर पंचवीस हजार फौज जमा झाल्यावर त्याच्या छावणीची तयारी कशी काय आहे तें पाहण्याच्या मिषानें महाराज रायगडावरून निघून कोकणात आले इतक्या लगबगीने तिकडे जाण्याचा हेतु काय ते कोणासच कळलें नाहीं ह्या वेळी जुन्नरास मोगलांचें मोठे ठाणे असून तेथ त्याची जवळजवळ चाळीस हजार फौज जमली होती. ह्या सर्व फोजेचा रोख महाराजाच्या मुलखात शिरून युद्धप्रसग करण्याचा होता हे महाराजास कळल्यावरून त्यानीं शत्रूस कळू न देता ही तयारी कर-विली, व आपण स्वत ते सैन्य घेऊन, जुन्नराकडे मोठ्या वेगानें कूच करून त्या मोठ्या फोजेवर अकस्मात् हल्ला केला. उभय पक्षाचें मोठे घनघोर युद्ध झालें त्यात मोगलाच्या सैन्याचा पुरा मोड होऊन ते सैरावैरा पळत सुटले. ह्या लढाईत महाराजाचे जें नुकसान झालें त्याच्या दसपट मोगलाचें झालें. शत्रूचें सैन्य अष्टदिशास उधळलें होते, त्याच्या मागें महाराजाचे लोक टोळ्या करून लागले ह्या लढाईत शत्रूचीं पुष्कळ घोडी व दुसरे मुबलक युद्धो-पयोगी सामान महाराजाच्या हातीं लागलें. शत्रुसैन्य पळत सुटलें होतें त्याच्या पाठीस लागलेल्या टोळ्यानीं त्याची सारखी पाठ पुरविली. वाटेत मोगलाचा जितका मुलूख लागला तितका सगळा त्यांनीं लुटून उध्वस्त केला. एका टोळीनें तर शत्रूच्या सैन्याचा ब्रह्मपुरीपर्यंत सारखा पिच्छा पुरविला. एकंदर पेठा लुटून खंडोगणती माल ह्या टोळ्यानीं आणिला. त्याप्रमाणेंच सुरतेस अशा

रस्त्यानें व्यापाराचा माल जात असे त्या रस्त्यावर महाराजाचे लोक राहून सांपडला तेवढा माल लुटून आणू लागले ह्या वेळी रामनगरच्या तीनचार हजार कोळ्यानी तिकडील रानातले व पाहाडी रस्ते रोखून मराठ्याचा पुढें प्रवेश होऊं न देण्याचा प्रयत्न केला, असें ह्मणतात

इकडे महाराजानी जुन्नरचे ठाणे घेण्याचा निश्चय करून त्या किल्ल्यास वेढा दिला व त्यावर जोराचा मारा चालविला परतु काहीं केल्या किल्ला हातीं येईना. महाराजाच्या दोघा मनुष्यानीं किल्ल्यावर चढून जाऊन त्याचा दरवाजा उघडण्याची युक्ति योजण्याचा बेत केला. परतु ते किल्ल्यावरील लोकाच्या दृष्टीस पडून त्यानी त्याच्यावर मोठमोठे खडक लोटले त्यामुळे त्याचा नाश झाला. खडक खाली लोटून वेटा घातलेल्या लोकाचा नाश करण्याची ही युक्ति बरी आहे असे वाटून त्यानी मराठ्यावर वरून खडक लोटून देण्याचा धूमधडाका चालविला त्यामुळे महाराजाच्या लोकाची पुष्कळ नासाडी होऊं लागली, व त्याचे धैर्य सुटून ते पळू लागले गलीम पळताहेत असें पाहून मोगलाचे लोक त्याच्या पाठीस लागले परतु त्यामुळे त्याचा फार नाश झाला कारण शत्रूपुढून पळण्याची मराठ्याची रीत फारच विलक्षण असे ते पळत सुटले ह्मणजे अमळ दूर जाऊन पुन अकस्मात् एकवट होऊन शत्रूवर तुटून पडत, व शत्रु प्रबल असल्यास त्याची पुन दाणादाण झाली असता ते परत काहीं वेळ पळत सुटत आणि पुन एकदम एकत्र होऊन शत्रूवर उलटत. अशा गनिमी काव्यामुळे त्याचा पाठलाग करून पुरा मोड करूं असें कोणी मनात आणिल्यास त्याची पुरी फजिती होत असे ह्या गनिमी काव्याने त्यानी ह्या वेळी मोगलाची पुष्कळ फौज खराब केली परतु उलट खाऊन पुन जुन्नरास वेटा देण्यात काहीं हाशील नाहीं असें महाराजास वाटल्यावरून ते आपल्या लोकासह रायगडास गेले.

रायगडावर येताच त्याला असें कळले कीं, फोड्याच्या सुभेदाराने आपण दूरच्या मोहिमेंत गुंतलों आहो असें पाहून आपणांशी केलेला तह मोडून पुन विजापूरसरकाराची ताबेदारी स्वीकारिली, व तो आपल्या तिकडील घाटातल्या ठाणेदारांस त्रास देऊं लागला. ह्मणून महाराजानीं त्याची चांगली खोड मोडण्याचा निश्चय करून त्या किल्ल्यावर स्वारी करण्यासाठीं मोठी फौज तयार केली. ह्या स्वारीवर महाराज स्वत गेले ह्या मोहिमेसाठीं पधरा हजार घोडदळ, चौदा

हजार पायदळ व इतर दहा हजार माणसें जमवून ते राजापुरास गेले आणि तेथे तीन दिवस मुक्काम करून चाळीस जहाजे तयार करून त्यास वेंगुर्ल्याच्या बंदरात जाऊन राहावयाचा हुकूम केला, आणि मग कुडाळास जाऊन तेथून फोंड्याकडे वळून किल्ल्यास बळकट वेढा दिला हा किल्ला अतिशयित मजबूत असून आतील लोक मोठ्या हिमतीने लढले किल्ला काहीं केल्या हाती येईना तेव्हा किल्ल्यावरील लोकास अन्नसामुग्री वगैरे पोचेनासे करून आतील लोकाचा उपासमार करून त्यास जेर करण्याचा त्यानी बेत केला, आणि पावसाळा आला तरी किल्ल्याचा वेढा कायम राखण्याची तजवीज केली. किल्ल्याचा सुभेदार महमदखान याच्या पाशी फक्त चार महिने पुरे इतकी अन्नसामुग्री होती विजापूरसरकाराकडून त्यास मदत मिळण्याची मुळी आशा नव्हती. पोर्तुगीज लोकाकडून त्यास मदत मिळण्यासारखी होती, परतु त्यास आपला गोवेप्रात कसा बचतो याचीच फिकीर पडल्यामुळे त्यास महाराजाशी उघड विरोध करण्याचें धैर्य झाले नाही तिकडचा सुभेदार रुस्तम जमान याच्याकडे द्रव्य व माणसें फारशी नसल्यामुळे त्यालाहि त्यास या प्रसगी मदत करण्याचे सामर्थ्य नव्हते ह्या वेळी बहिलोलखान मिरज येथे पंधरा हजार लोकानिशी तळ देऊन होता त्याच्या मनांत फोंड्याच्या किल्लेदाराच्या मदतीस जावयाचे होते परतु त्या किल्ल्याकडे जावयाच्या वाटावर झाडे तोडून त्याचे मेढेकोट महाराजानी रचले होते, व त्यावर आपले लोक ठेवून दिले होते ह्या अडचणीतून पार पडणे अतिशयित धोक्याचे आहे व तिकडे जाण्याचा प्रयत्न केला तर तो निष्फळ होऊन आपल्या लोकाची पुष्कळ नासाडी होईल असे त्यास वाटून त्याने आपला बेत रहित केला. पण त्याने फोंड्याच्या किल्लेदारास मदत न केल्याचें कारण दरबारचे लोक असें सागू लागले कीं, बहिलोलखानास शिवाजीमहाराजानी लाच दिल्यामुळे तो असा जागच्या जागी स्वस्थ राहिला. महमदखानाची अशी चोहोकडून निराशा झाली तरी त्याने मोठ्या शौर्याने व हुशारीने किल्ला बरेच दिवस लढविला. महाराजानीहि मोठ्या नेटाने वेढ्याचें काम चालू ठेविले त्यानीं किल्ल्याचा बाहेरला कोट हस्तगत करून त्याच्या सभोंवतालचा खदक बुजविला व पाचशे शिड्या तयार करविल्या, आणि अर्धा अर्धा शेर सोन्याची पाचशे कडीं तयार करून आपल्या लोकास असें सागितलें कीं, जे कोणी शिड्या लावून किल्ल्यावर चढून जातील त्यास हीं कडीं इनाम देण्यांत येतील. ह्या झटापटींत महाराजांचे पुष्कळ लोक ठार झाले, व शेकडो जायबंदी झाले. मग महाराजांनीं त्या

किल्ल्यास मोठमोठे सुरुंग लाविले. ते उडाल्यामुळें त्यास मोठें असेलें भगदाड पडलें, व त्यावरचे पुष्कळ लोक त्यांत सांपडून प्राणांस मुकले. ह्याप्रमाणें किल्ल्यांत प्रवेश होऊन उभय पक्षांकडील वीरांची झटापट मोठ्या आवेशानें झाली. किल्ल्यावरील लोकाचा पुरा पराभव झाला, व किल्ला महाराजाच्या कबजांत आला. किल्ल्यावरील एकूणएक पुरुषाची कत्तल केली. त्या गर्दींत महमदखान व दुसरे पाच असामी काय ते बचले याचे कारण असें कीं, महमदखानानें विजापूरकराचा तिकडील सगळा प्रांत व किल्ले महाराजांच्या स्वाधीन करण्याचें वचन दिलें, आणि त्यानें तिकडच्या किल्लेदारास किल्ले मराठ्याच्या स्वाधीन करण्याविषयी पत्रे लिहिलीं. तीं त्यानी जुमानलीं नाहींत, ह्मणून खानास कैद करून ठेविलें, इकडे अकोल्याचा फौजदार इनामतखान याने महमदखानाच्या ताब्यातला मुलूख आपल्या कबजात घेऊन तिकडील किल्ल्यावर आपले लोक ठेवून दिले परंतु महाराजापुढें त्याचा निभाव लागणे शक्य नसल्यामुळें त्यानें त्यांच्याकडून काहीं पैसा घेऊन ते किल्ले व त्यासभोवतालचा प्रात त्याच्या स्वाधीन केला पुढें थोडक्या अवकाशात अकोला, शिवेश्वर, व कादा हीं शहरें त्याच्या हातीं आली, आणि दक्षिणेस गंगावती नदीपर्यंतचा विजापूरसरकाराच्या सगळ्या मुलखावर त्याचा ताबा बसला

फोंड्याच्या किल्ल्यास वेढा घालून नेटानें लढण्याच्या कामी महाराजांच्या लष्करांतल्या इब्राहीम नावाच्या एका शूर सरदारानें मोठा पराक्रम केल्यावरून त्यास नांवाजून त्याची त्या किल्ल्यावर नेमणूक केली किल्ल्याची हवालदारी मुसलमानास दिली ती हीच पहिल्यानें होय. एरवीं ती मराठ्यावाचून कोणांस देऊं नये असा त्यांचा नेम असे. ह्यावरून हें स्पष्ट होतें कीं, त्या मुसलमान-सरदाराच्या इमानीपणाविषयीं महाराजांची पूर्ण खात्री झाली होती. नाहीं तर अशा सरहद्दीच्या किल्ल्यावर त्यास हवालदार नेमण्याचें धाडस त्यानीं सहसा केलें नसतें

फोंडेकिल्ल्यावर आपलें ठाणें बसविल्यानंतर आसपासचा प्रांत महाराजांनीं हस्तगत केला, आणि तो आपल्या हातीं कायमचा राहण्यासाठीं त्यांत भीमगड व पारगड असे आणखी दोन नवे किल्ले बांधिले, व त्यांवर आपले लोक ठेवून दिले. नंतर त्यांनीं सुंदा प्रांतांत घिरून तेथले पुष्कळ किल्ले काबीज केले. कारवारचा किल्ला तेथील किल्लेदार सामोपचारानें स्वाधीन करून देईना, ह्मणून त्या

शहरास आग लावून देण्याचा हुकूम महाराजानीं आपल्या लोकास दिला. ह्या शहरांत इंग्रज व्यापारी होते, त्यांशीं मात्र ते चागल्या रीतीनें वागले. त्याच्या वखारीस त्यांनी उपद्रव दिला नाहीं ह्या वेळीं महाराजानी सगळें दक्षिण कोकण व कानडाप्राताचा उत्तरेकडील सगळा मुलूख काबीज केला. बेदनूर-प्रांतांत एक स्त्री त्या वेळी राज्य करीत होती [१] यास्तव त्या प्रातास उपद्रव करणें बरोबर नाहीं असें महाराजास वाटलें ह्या राणीने महाराजास पुष्कळ नजरनजराणा पाठवून अशी विनंति केली कीं, 'माझे काहीं कारभारी व नातलग मजवर उठले आहेत त्याचे पारिपत्य करण्यासाठीं मला आपण मदत करावी.' ह्या तिच्या विनंतीस महाराजानीं मोठ्या सतोषाने मान देऊन तिच्या मदतीस आपले काहीं लोक रवाना केले, व तिचे संकट निवारण केलें ह्या राणीने महाराजास काहीं खंडणी देण्याचें कबूल करून त्याचा एक वकील आपल्या दरबारात ठेवून घेतला.

महाराज फोंडेप्रातात मोहिमेस गेल्याची बातमी कळताच फलटणचे निंबाळकर व मलवडीचे घाटगे अशा दोन विजापूरसरकाराच्या जाहगीरदारानी पन्हाळा व तातोरा ह्या दोन किल्ल्याच्या दरम्यान असलेली सगळी ठाणीं महाराजाच्या लोकाकडून घेतलीं, व त्याचें तिकडील सर्व लष्कर हाकून दिलें ह्या किल्ल्याच्या आसपासचा एकंदर मुलूख त्यानीं हस्तगत करून विजापूरसरकारास दिला. परंतु दक्षिणेंतील मोहीम फत्ते करून महाराजानीं घाटावर येताच हा प्रात व हीं ठाणीं पुन काबीज केलीं, व यापुढे हा प्रात पुनरपि विजापूरकराच्या जाहगीरदारांच्या हातीं असा सहज जाऊं नये ह्मणून पन्हाळा व तातोरा ह्या किल्ल्याच्या दरम्यान त्यानी किल्ल्यांची एक रांगची राग उभारून दिली. ह्या किल्ल्यांची नावे वर्धनगड, भूषणगड व सदाशिवगड अशीं होतीं. हे नवीन बाधलेले किल्ले कांहीं फारसे बळकट होते असें नाहीं परंतु त्याच्या योगाने आसपासच्या मुलखाचें रक्षण चागलें होऊं लागलें.

असें सांगतात कीं, दक्षिणेस फोंड्याकडे मोहिमेस गेल्यावर मोगलांनी आपल्या प्रांतास उपद्रव देऊं नये ह्मणून त्या वेळीं त्यानीं बाहादूरखानाशीं पुन तहाचें बोलणें लाविलें. त्यातील मुख्य कलमें अशीं होती कीं, महाराजानीं औरंगजेबास सतरा किल्ले द्यावे व आपला मुलगा संभाजी यास कांहीं लोकांनिशीं मोगलसुभे-

१ ही विधवा असून हिचा मुलगा अगदीं लहान असल्यामुळें ती त्याच्या वतीनें राज्यकारभार पाहत होती.

दाराच्या मदतीसाठी औरंगाबादेस पाठवावें हा असा तह व्हावा हें इष्ट वाटून औरंगजेबानें फरमान पाठवून तहाची हीं कलमे कबूल केली व त्यात शिवाजी-महाराजांस मागील अपराधांबद्दल क्षमा केली आहे असें नमूद केलें. ह्या बादशाही फरमानाचा स्वीकार करून किल्ले स्वाधीन करून द्यावे असा निरोप बाहादूर-खानाने महाराजास पाठविला एवढ्या अवधीत महाराजाचा फोंड्याकडील मोहिमेत फत्ते होऊन ते तिकडून मोकळे झाले होते. ह्मणून त्यानी सदरील निरोप घेऊन येणाऱ्या लोकाकडे खानास असा उलट निरोप पाठविला कीं, "तुह्मी आमच्यावर असा कोणता प्रसंग आणला आहे कीं, आह्मी तुमच्याशीं तह करावयास पाहावे?" हा जबाब ऐकून बाहादूरखान चकित झाला. शिवाजीमहाराजानी आपणास खोट्या नादास लावून साफ फसविल्याबद्दल त्याला अतिशयित वाईट वाटलें, आणि त्याला शासन करण्याचा निश्चय करून त्याने विजापूरचा वजीर खवासखान याशी संगनमत केलें आणि दोघानी दोहोंकडून महाराजावर स्वारी करण्याचा बेत केला. औरंगजेबाला हा बेत पसंत वाटून विजापूरकरानी शिवाजी महाराजाना जेर करण्याच्या कामी ही अशी मदत केल्यास त्याना एक वर्षाची खंडणी माफ करण्याचे त्यानें वचन दिलें. परंतु इतक्यात विजापूरदरबारात उलटापालट होऊन खवासखानाच्या हातचा कारभार गेला, त्यामुळे मोगलाचा सदरील बेत असिद्ध राहिला.

इकडे हंबीररावसेनापति गुजराथेत सर्वत्र एकसारखा धुमाकूळ उडवून देत होता. तो मोगलाच्या प्रातात यथेष्ट लुटालूट करून परत स्वदेशी यावयास निघाला. त्याच्या हालचालीवर दिलेरखानाचें पुरे लक्ष होते. हंबीरराव त्यास टाळा देऊन लुटीच्या एवजासह चालला असता त्या खानाने त्याचा मोठ्या आवेशानें पाठलाग केला. तरी त्याच्या हातून पार निसटून जाऊन हा महाराजाचा महाप्रतापी सेनापति लुटीच्या एकदर मालासह रायगडास सुरक्षित जाऊन पोचला, व दिलेरखान चुरमुरे खात माघारी गेला. पावसाळा सपताच हंबीररावाने पुन: मोगलाच्या मुलखात शिरून त्याची फारच खराबी केली. त्याला हरकत करावयास कोणीहि मोगल सरदार आला नाहीं. कारण ह्या वेळी मोगलाचे व विजापूरकराचें काहीं कारणावरून युद्ध जुंपले असून दिलेरखान वगैरे सरदार तिकडे गुतून राहिले होते. ह्यामुळें हंबीररावाला चागलेंच फावलें.

ह्या वेळी विजापूरसरकाराचा कारभार खवासखान पाहत होता. त्यानें मोगलांची आपणावर एकच गर्दी झालेली पाहून बहादूरखानाशीं असा तह करण्याचें

योजिलें कीं, विजापूरसरकार मोगलबादशहाचें मांडलिक आहे असें समजून चालावे, व बालराजाची बहीण पादशाबिबी ही औरंगजेबाच्या एका मुलास द्यावी परंतु हा तह दरबारच्या इतर सरदाराला पसंत न होऊन त्यानी खवासखानाचा खून केला ह्या सरदारमंडळाचा प्रमुख अबदुल करीम[1] हा होता. ह्याने सर्व कारभार आपल्या हातीं घेऊन मोगलाशी लढण्याची तयारी केली. बहादरखान स्वसैन्यानिशी विजापूरावर चालून आला उभय पक्षाच्या कित्येक चकमकी झाल्या त्यात विजापूरकराची सरशीच झाली हा असा मोगलसैन्याचा मोड होण्याचा रंग दिसू लागल्यावरून दिलेरखानाने मध्यस्थी करून लढाई बंद केली, व उभयपक्षांमध्ये तह होऊन सलोखा झाला

मोगलानी विजापुरावर चढाई केली तेव्हा सदरील नव्या वजिराने गोवळकोंड्याचा दिवाण मादण्णा याच्या मध्यस्थीने शिवाजीमहाराजाशी तह केला त्याची कलमें येणेप्रमाणे होती विजापूरसरकाराने महाराजाला तीन लाख होन पेशखुश म्हणून द्यावे मोगलाच्या उपसर्गापासून बचाव करण्यासाठी त्यास प्रतिवर्षी एक लाख होन खंडणीदाखल द्यावे, प्रथम कृष्णानदीपासून पश्चिमेकडला सगळा मुलूख महाराजाच्या कबजात गेला आहे तो त्याच्याकडे कायमचा राहावा यांत कोल्हापूर प्रांताचाहि समावेश व्हावा परंतु हा तह फार दिवस टिकला नाही, आणि तो मोडल्याबद्दल महाराजाना मुळीच परवा वाटली नाहीं कारण त्या वेळी विजापूरदरबारात गोंधळ माजला असून कोणाच्याच हाती कायमची सत्ता राहणे अशक्य झाले होते.

घाटाखाली कोंकणात महाराजाचा अमल बहुतेक प्रांतावर कायमचा बसला होता शिद्दीच्या व मोगलाच्या आरमाराने व सैन्यानें त्यास वारंवार उपद्रव द्यावा परंतु तो प्रांत त्यास त्याच्या हातचा हिसकावून घेण्याची ताकद नव्हती. विशेषत मोगलाच्या व फिरंग्याच्या सरहद्दीला लागून जे कल्याण, कुर्ला वगैरे प्रांत महाराजाच्या ताब्यात होते त्यावर मोगलाचा डोळा विशेष असे. हे प्रांत काबीज करण्याचा घाट घालून खानजहान कोंकणात उतरून धामधूम करूं लागला होता, परंतु हा त्याचा आपल्या प्रांतास होणारा त्रास नाहींसा करण्याची त्यानी अशी सोपी युक्ति काढिली कीं, ह्या मोगलसुभेदारास दहा हजार होन देऊन त्याची मूठ दाबिली. एवढं आमिष मिळाल्यावर तो खान कोंकणां-

१ प्रो. सरकार याचें नाव 'बहिलोलखान' असें देतात.

तली स्वारी रद्द करून परत घाटावर गेला. परंतु शिद्दी काहीं उगी बसला नाहीं. त्यानें आपलें आरमार सज्ज करून महाराजांच्या ताब्यांतील कोंकणकिनाऱ्यावरील गावास त्रास देण्याचा तडाका सुरू केला त्यानें वेंगुर्ल्यास उतरून तेथील लोकास लुटून त्याची घरेंदारे जाळून टाकिलीं. ह्या वेळीं येथे दच लोकाची एक वखार होती, तिच्यावर शिद्दीनें हल्ला केला असता दचलोकानीं त्याच्याशीं लढून आपला मोठ्या शौर्यानें बचाव केला, असें ह्मणतात महाराजाचे आरमार विजयदुर्ग व राजापूर येथे सज्ज होऊन शिद्दीच्या पाठलागास निघाले परंतु त्याचें आरमार त्यास कोठेंच गाठले नाहीं शेवटी मराठ्याच्या आरमारानें त्याच्या जजिऱ्यास समुद्रातून वेढा दिला तेव्हा तो त्याच्या रक्षणासाठी तेथे प्राप्त झाला उभय आरमाराची लढाई झाली तीत कांहींएक निष्पन्न न होऊन मराठ्याच्या आरमारास त्या वेळी वेढा उठवून जावें लागले.

वर सागितल्याप्रमाणें मोमलाच्या सुभेदारास कोकणातून वाहून लाविल्यावर महाराजानीं असा विचार केला कीं, साष्टीप्रातात फिरग्यास चागला शह देण्यासारखें आपलें ठाणें नाहीं, ते निर्माण केल्यानें त्याच्या व इतर शत्रूंच्या तिकडील हालचालीवर आपणास चागली नजर ठेविता येईल ह्या इरायानें त्यानी वसईनजीक सिबोन नावाचा एक किल्ला फिरंग्याच्या ताब्यात होता त्याच्या समोरासमोर एक नवा किल्ला बांधण्याचे काम सुरू केले फिरग्यानी ते बद पाडण्याविषयीं पुष्कळ खटपट करून पाहिली परंतु त्याचा काहींएक उपाय न चालून किल्ल्याचे काम मराठ्यानी मोठ्या झपाट्यानें चालविले.

ह्या सुमारास महाराजाची प्रकृति बेआराम होऊन ते साताऱ्यास सातआठ महिने अडकून पडले. तेव्हा जिकडेतिकडे अशी अफवा उठली कीं, शिवाजी महाराज आजारी पडले असता त्यास त्यांचा पुत्र सभाजी यानें विषप्रयोग केल्यामुळें ते मृत्यु पावले. परंतु ही वदंता कोणास फारशी खरी वाटली नाहीं. कारण अशा खोट्या कंड्या पूर्वी अनेक वेळा उठल्या होत्या महाराजाच्या तीसबत्तीस वर्षाच्या आयुष्यक्रमांत त्यांची ही पहिल्यानेंच प्रकृति बिघडली असावी असें वाटतें. कारण ती अशी पूर्वी नादुरुस्त झाल्याचा उल्लेख आणखी कोठेंहि आढळत नाहीं. इतकीं वर्षे सतत परिश्रम करून व अनेक प्रसग टाळून स्वराज्यसिद्धि केल्यावर त्यास काहीं विश्राति अवश्य हवी होती. पण ती त्यास प्राप्त होणें अशक्य होतें. कारण आसमंतात् असलेल्या प्रबळ शत्रूंचा रोख

त्यांच्यावर सारखा असल्यामुळे त्याच्याशी टक्कर द्यावयास सर्वदा उद्युक्त राहिल्यावांचून मुळी गतिच नव्हती. प्रकृति अतिश्रमामुळें नादुरुस्त झाल्या-कारणानेंच केवळ ते एवढे महिने सातान्यास पडून राहिले. परंतु ह्या आजारी-पणातहि त्यानीं एका मोठ्या मोहिमेस निघण्याचा बेत केला, व प्रकृति नीट होताच तीवर ते स्वत निघाले. ही मोहीम त्यानी कर्नाटकावर केली. तिचें वर्णन पुढील भागात करूं.

ह्या कर्नाटकावरील मोहिमेचा विचार सातान्यास चालला असतां इकडे मोरोपंत पिंगळे दहा हजार लोकानिशी कल्याणाकडे गेला त्यानें प्रथम रामनगराच्या कोळी राजाला हाकून देऊन त्याचे सस्थान काबीज केलें, आणि सुरतेपासून तीन दिवसाच्या वाटेवरील काहीं गाव काबीज करून तेथे आपलीं ठाणी बसविलीं ह्या वेळीं त्याने काहीं लोक व मजूर पारनेल नावाच्या मोड-कळीस आलेल्या किल्ल्यावर पाठविले त्या लोकानी तो किल्ला ताब्यात घेऊन त्याची दुरुस्ती करून तो चागला मजबूत करण्याचें काम मोठ्या झपाट्यानें चालविलें आता हा किल्ला ताब्यात घेण्यात महाराजाचे धोरण अर्थात् असें होतें कीं, तेणेकरून दमन येथील फिरंग्यांवर चांगला वचक बसावा, व सुरतेच्या रस्त्यालगत तो किल्ला असल्याकारणाने मोगलाच्या तिकडील हालचालीवर चागली नजर ठेविता यावी फिरंग्याच्यानें अर्थात् ह्या कामासहि मुळींच हरकत करवली नाहीं किल्ला चागला दुरुस्त झाल्यावर तो कसा काय मजबूत झाला आहे हें पाहण्यासाठीं महाराज स्वत प्रकृति बरी झाल्यावर पहिल्यानें तिकडे गेले, आणि मग तेथून येऊन कर्नाटकच्या मोहिमेवर निघाले.

# भाग सव्विसावा.



## कर्नाटकांतील मोहीम.

### १६७६-७८.

महाराज साताऱ्यास प्रकृति बिघडल्यामुळे राहिले असता व्यंकोजीराजाचा मुख्य कारभारी रघुनाथ नारायण हणमते हा त्याच्याकडे आला. हा रघुनाथपंत शहाजीराजाचा पहिला मुख्य कारभारी नारो त्रिमळ हणमते याचा पुत्र. बाप निवर्तल्यावर शहाजीराजाचा कारभार हा रघुनाथपंत पाहत असे. शहाजीराजे मरण पावल्यावर व्यंकोजीराजे अर्थात् कर्नाटकातील जहागिरीचे मालक झाले, व रघुनाथपंताकडेच सगळा कारभार राहिला. परंतु पुढे काही वर्षांनीं व्यंकोजीराजाच्या मनात असें आले कीं, सगळा कारभार आपल्या बुद्धीनें चालवावा, वडिलाच्या वेळच्या ह्या कारभाऱ्याची कोणत्याहि बाबतींत मसलत मुद्दा घेऊ नये. ह्याप्रमाणे व्यंकोजीराजानी कारभार आपल्या हातीं घेऊन रघुनाथपंताचे काहीएक चालेनासे केले. हलके व सामान्य लोक जवळ करून त्याच्या तंत्रानें ते वागूं लागले, व रघुनाथपंताची पदोपदीं मानखंडना करूं लागले. तेव्हा रघुनाथपंताने पाहिले कीं, आता आपला बोज येथे राहणे कठीण आहे. वडिलानी मिळविलेली कीर्ति कायम राखण्याची आशा आता काहींएक उरली नाहीं. तर आता तुम्ही जवळ असून दौलतीस अपाय कसा घडूं दिला, असा दोष यांचे वडील बंधु शिवाजीमहाराज यांचा आपणावर येईल, तो न यावा ह्यासाठी कारभारातले आपलें अंग अजीबात काढून घेऊन कोठे तरी क्षेत्रास जावे व तेथे स्नानसंध्या करून उरलेलें आयुष्य घालवावे, असा बेत त्यानें मनात आणिला. परंतु पुन त्यानें असा विचार केला कीं, आपल्या धन्याची दौलत आपण हयात असता बुडालेली पाहणें बरोबर नाहीं. तर ह्या वेळीं कारभार सोडून न जाता साधेल तेवढी दौलतीची सेवा करीत राहावे, व राजे कांहीं सुविचार ऐकतील तर पाहावें. असें

मनांत आणून तो काहीं दिवस आपल्या तरुण वन्याकडून होणारी मानखंडना सोशीत तसाच राहिला.

रघुनाथपंतानें एके समयी व्यंकोजीराजांस येणेंप्रमाणें बोध केला 'साहेब, आह्मी तुमचे पिटीजाद सेवक तुमचे साधेल तेवढे हित करणे हेच आह्मांस श्रेयस्कर आहे असे मानून आह्मी तुमची सेवा करीत आहो पण ती तुह्मास रुचत नाहीं हलक्या माणसाशी सहवास करून त्याची मसलत ऐकत असता हें काहीं चागले नव्हे तुमच्या वडिलानी स्वपराक्रमानें कशी कीर्ति मिळविली, व तुमचे वडील बधु शिवाजीराजे यानी स्वराज्यस्थापना करून दिगत लौकिक कसा सपादिला आहे याचा काहीं विचार मनात आणा तुह्मीहि त्याच्याप्रमाणेंच पराक्रम करावा अशी आमची मनापासून इच्छा आहे आह्मी तुमच्या पदरी सेवक असता तुमच्या हातून नाव घेण्यासारखे काहींच घडले नाहीं तर शिवाजी राजे आह्मास दोष देतील तुह्मी आह्मास वाटेल ती सेवा सागावी व आह्मीं ती जीवेंभावें करावी, हेच आह्मास उचित होय तुमच्या पदरी लोक व द्रव्य उदंड असता त्याचे काहीच चीज होत नाहीं हलक्या लोकाच्या नादी लागून द्रव्याचा मात्र व्यर्थ नाश तुह्मी करीत आहा वडिलानी मिळविलेल्या कीर्ताहून अधिक कीर्ति मिळवावी तरच त्याच्या कुळात जन्म घेतल्याचे सार्थक्य ' ह्याप्रमाणे त्या विश्वासू सेवकानें व्यंकोजीराजाशी अनेक वेळा बुद्धिवाद केला पण ते काहीं केल्या वाटेवर येईनात त्याचा तो बोध त्याला विषतुल्य वाटू लागला त्याचा त्यास अतिशयित कटाळा येऊ लागला ते त्याचा उघडउघड अनादर करू लागले.

ही त्याची अशी उद्दाम वृत्ति पाहून रघुनाथपंताने त्याच्या सबंधानें एक पत्र शिवाजीमहाराजास पाठविलें ते वाचून महाराजानी व्यकोजीराजास एक बोध-पर पत्र लिहिले त्यातील आशय येणेप्रमाणे होता ' तुह्मी उदासीन राहून क्षुद्र लोकाच्या मसलतीप्रमाणे चालता, असे ऐकतो रिकाम्या, खुशालचद लोकास वाटेल तितके द्रव्य चारून त्याची मिजास वाढविता वडिलानी जी थोर, विश्वासु व योग्य माणसें जोडिली त्याचा अनादर करून मनास वाटेल तसे वागता. हें काहीं ठीक नव्हे तरी इत पर आपलें वर्तन सुधारून रघुनाथपतासारख्या थोर, अनुभविक व विश्वासू कारभाऱ्याच्या मसलतीने वागून स्वहित साधाल व यशस्तावृद्धि कराल अशी आह्मास पूर्ण उमेद आहे ' ह्या पत्रानेंहि व्यंकोजी राजे शुद्धीवर आले नाहीत, व त्यानी आपला पूर्वक्रम सोडला नाहीं. त्याच्या जवळ

नेहमीं असणाऱ्या नीच मनुष्यांनीं त्याच्या बुद्धीस पक्का भ्रंश केला असल्यामुळें त्यांला आपलें वास्तविक हित कशात आहे तें समजेना रघुनाथपंतानें आपल्या वडील बंधूकडे ही आपल्या विरुद्ध कागाळी केल्यामुळे ते त्याचा पूर्वींहून अधिकच उपमर्द करू लागले तो त्या इमानी सेवकास असह्य होऊन त्याने तेथून बरेपणीं निघून शिवाजीमहाराजाकडे येण्याचा निर्धार केला. मग आपल्या कुटुंबास तिकडेच ठेवून तो महाराजाच्या भेटीस निघाला

शिवाजीमहाराजास नूतन राज्य संपादण्याचा हव्यास अमर्याद आहे हें जाणून त्याने कर्नाटकातून येताना तिकडील काहीं सस्थानिकाशीं बरेच राजकारण केलें, व शिवाजीमहाराजास व्यंकोजीराजाच्या पारिपत्यासाठी कर्नाटकात न्यावें असा त्याचा बेत असल्यामुळें त्याला वाटेत कोणाचीहि अडचण राहूं नये म्हणून भागानगरच्या कुतुबशहाशीं राजकारण करण्याचा विचार मनात आणून तो तिकडे गेला.

कुतुबशाहींत त्या वेळी आकण्णा व मादण्णा असे दोन बंधु मुख्य वजीर होते, त्यांच्या हातीं त्या शाहीचा एकंदर कारभार होता. त्या वजिरास भेटण्याचा रघुनाथपंतानें विचार केला. पण त्यास एकदम भेटून ओळख देऊन राजकारणाचा परिस्फोट करणे ठीक न वाटून त्यानें त्यास पंडित ह्या नात्याने प्रथम भेटण्याचा बेत केला. कारण हे वजीर मोठे धर्मशील व दानशूर असून त्यांनीं अन्नसत्रें घातलीं होतीं. रघुनाथपंत आपला लवाजमा दूर एका गांवीं ठेवून एकटाच त्यांच्या राजधानीत गेला, व त्याच्या स्नानसंध्येच्या समयास त्यांची भेट घ्यावयास गेला. कोणी पंडित भेटीस आला असता त्याचा बहुमान करून यथोचित संभावना करावी असा त्याचा क्रम असे. त्यास अनुसरून त्यांनीं रघुनाथपंताचें आदरातिथ्य उत्तम प्रकारें केलें त्या समयीं त्याच्या वाड्यात दुसरे कांहीं पंडित आले होते. त्याचा परस्परात, शिव सर्वोत्तम कीं विष्णु सर्वोत्तम, असा वाद उपस्थित झाला. रघुनाथपंतहि त्याच्या त्या वादांत पडला. तो स्वत. वैष्णव असतां त्यानें प्रथमतः शिव सर्वोत्तम होय असें प्रतिपादन करून प्रतिपक्षास अगदीं निरुत्तर केलें. त्याप्रमाणें विष्णुपक्ष निर्बल झाला असतां पुनः रघुनाथपंतानें विष्णुपक्षाचें समर्थन करून तो निर्विवाद स्थापित केला. हें त्याचें अप्रतिम वादपटुत्व पाहून मादण्णापंत अगदीं थक्क झाला; व हा अतिशयित मोठा विद्वान् आहे अशी त्याची पूर्ण खात्री झाली. मग तो

रघुनाथपंतास ह्मणाला 'स्वामिराज, आपण थोर व सत्पात्र आहां. आपण आला कोठून व आपलें अपेक्षित कार्य काय आहे तें निवेदन करा.' त्यावरून रघुनाथपंत ह्मणाला 'आह्मास द्रव्याची किंवा भूमिग्रामजीविकेची अपेक्षा किमपि नाहीं. आपण सुज्ञ व धर्मनिष्ठ आहा आपणाशी एकातात दोन घटका बोलावयाचें आहे.' मग ते बंधु रघुनाथपंतास एकात स्थलीं घेऊन गेले. तेव्हा तो त्यास ह्मणाला,'मी काहीं याचक पडित नव्हें मी शिवाजीमहाराजाचा सेवक आहे माझें नाव रघुनाथपंत आमच्या महाराजाकडे कर्नाटकातली काहीं राजकारणे घेऊन मी चाललो आहे त्यास तीं साधावयास त्या मुलखात जावयाचा प्रसग येणार आहे. परतु ह्या त्याच्या मोहिमेस आपली अनुकूलता अवश्य हवी आहे आपलें व आपल्या शहाचें त्यास समयपरत्वे साहाय्य मिळावे व त्याच्याकडूनहि आपणास साहाय्य व्हावे एतदर्थ आपल्या पादशहाशीं स्नेहभावाचें बोलणें करण्याविषयीं त्याची मला आज्ञा झाल्यावरून मी आपल्या दर्शनास आलों आहे आपण धर्मशील आहा, व शिवाजीमहाराज स्वधर्मरक्षणार्थ परिश्रम करीत आहेत यास्तव आपण त्यास अवश्य सहाय असावें. असें करण्यात आपल्याकडून आपल्या धन्याशी द्रोह घडावा असें माझें मुळीच ह्मणणें नाहीं तर आपण त्याच्याविषयी आपल्या पादशहाचें मन स्नेहयुक्त करावे एवढीच अपेक्षा आहे.' हें त्याचे भाषण ऐकून ते वजीर बहुत सतोप पावले त्याच्या मनात महाराजाविषयी पूर्वीपासूनच आदरबुद्धि वसत होती, व त्याच्या अतुल पराक्रमाची वार्ता त्याच्या कानी एकसारखी दुमदुमत होती. शिवाय कुतुबशहाकडून त्यास खडणी देवविण्याच्या कामी त्यानीं पूर्वी पुष्कळ खटपट केलीच होती. रघुनाथपंताकडून असें मित्रभावाचें बोलणें आलेलें त्यास सर्व प्रकारें मान्य होऊन त्यानीं त्यास कुतुबशहाच्या भेटीस नेलें, व त्याचें राजकारण कायम केलें. शिवाजीमहाराजानी कर्नाटकात जाताना भागानगरावरून जावें, व परस्पराच्या भेटी व्हाव्या असें ठरलें मग त्या वजिरानीं रघुनाथपंतास मोठ्या थाटाची मेजवानी करून व वस्त्रालंकारानीं गौरवून प्रेमानें निरोप दिला. निघते वेळीं त्याच्या हातीं शिवाजीमहाराजांस पादशहाकडून एक पत्र देवविलें.

ह्याप्रमाणें भागानगरचें राजकारण सिद्ध करून रघुनाथपंत प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें शिवाजीमहाराजांस सातान्यास येऊन भेटला. हा आपल्या वडिलांचा विश्वासू व हुशार कारभारी आपल्या भेटीस येत आहे हें महाराजांस कळलें तेव्हां ते त्याला स्वतः सामोरे गेले, व त्यास त्यांनीं मोठ्या सन्मानानें स्वस्थानीं

आणिलें.[1] त्यानें कर्नाटकातून अनेक अपरूप वस्तु महाराजासाठी आणिल्या होत्या त्या त्यानें त्यास नजर केल्या. शिवाय बहुमोल जवाहीरहि त्याने पुष्कळ आणिलें होते, ते सारे त्याने त्याच्या स्वाधीन केले हा नजराणा पाहून व त्याची आपल्या ठायीं एवढी निष्ठा आहे हे पाहून महाराज बहुत संतोष पावले; आणि आपल्या वडिलाचा हा जुना, अनुभवशीर, हुशार व इमानी कारभारी आपणास येऊन मिळाला हे आपले मोठे हित झाले असे मानून त्यानी त्याचें बहुत गौरव केलें व त्याला अमात्यप्रधानाचा हुद्दा देऊन आपल्या पदरी ठेवून घेण्याचा विचार मनात आणिला हा हुद्दा ह्या वेळी रामचंद्रपंत याजकडे होता. त्याला त्यावरून दूर करून तो रघुनाथपंतास सांगितला असें ह्मणतात[2].

रघुनाथपंत महाराजाकडे आला तेव्हा महाराजाची प्रकृति नादुरुस्त असल्यामुळे ते सातान्यास राहिले होते हे मागें सांगितलेच आहे त्यात आणखी ते पावसाळ्याचे दिवस असल्याकारण ते चार महिने त्याचा मुक्काम तेथेंच झाला ह्या फुरसतीच्या वेळी रघुनाथपंताने महाराजाजवळ व्यंकोजीराजासंबधाने जे काहीं सांगावयाचे होते ते सर्व सांगितले व कर्नाटकात मोहीम करून आपल्या वडिलाच्या तिकडील दौलतीचा योग्य बंदोबस्त करण्याचा विचार त्याच्या मनात पुरा भरून दिला ही मोहीम फत्ते व्हावी ह्यासाठी आपण तिकडील संस्थानिकाशी राजकारणें करून आलो आहे असेंहि त्याने त्यास सांगितले. त्याप्रमाणेच भागानगरच्या कुतुबशहाशीं केलेले राजकारणहि त्याने महाराजास निवेदन केले. ह्या त्याच्या सांगण्यावरून महाराजानी असा विचार मनात आणिला की,आपणास आपल्या वडिलाच्या तिकडील दौलतीच्या अर्ध्या हिश्शाचा

---

१ रायरीच्या बखरीत असे आहे की, रघुनाथपंत कर्नाटकातून येताना विजापुरास गेला. तेव्हा त्यास अदिलशहाने आपल्या पदरी ठेवून वजिरी देतो असे ह्मटले. हे वर्तमान महाराजास कळताच त्यानी रघुनाथपंतास असा निरोप पाठविला की,आह्मी जीवंत आहो तोपर्यंत आमच्या वडिलाच्या विश्वासू सेवकाने यवनाची नोकरी पतकरणे ठीक नाही तुह्मी वेलाशक आमच्याकडे निघून यावे. आह्मी तुमचा अव्हेर कदापि करणार नाही

२ चिटणीस ह्मणतो की, ' आपला मजमूचा धंदा परंपरागत असल्यामुळे तो आपणास सांगावा, ' अशी रघुनाथपंताने विनंति केल्यावरून तो हुद्दा महाराजानी त्यास दिला. रायरीच्या बखरीत असे ह्मटले आहे की, निरू सोनदेव मुजुमदार हा ह्या सुमारास वारला होता. त्याचा हुद्दा महाराजानी रघुनाथपंतास दिला.

हक्क हिंदुशास्त्राप्रमाणें आहेच त्या अर्थी ह्या मिषानें तिकडे स्वारी करून व्यंकोजीराजांकडे ह्या हक्काची मागणी करावी शिवाय तिकडे गेल्याने काहीं नवीन मुलूखहि हाती येण्याचा संभव आहे, व अशाने निदान वडिलांच्या तिकडील दौलतीची व्यवस्था तरी नीट लावता येईल.

हा समय ह्या मोहिमेस अनेक प्रकारी अनुकूल होता कुतुबशहाच्या राज्यांतून कर्नाटकात जावयास काहींएक हरकत आता उरली नव्हती. त्या शाहींतून त्यांस खंडणी मिळत असून तिचे वजीर जे मादण्णा व आकण्णा ते त्यास सर्व प्रकारे अनुकूल होते. त्यात आणखी रघुनाथपंतानें ह्या स्नेहाची बळकटी महाराष्ट्रात येतेवेळी चांगलीच केली होती दुसरे असें कीं, विजापूरकर व मोगल याचा ह्या वेळी सल्ला होऊन स्नेहभाव जुळल्यासारखा झाला होता, तो कुतुबशहास मुळीच पसंत नव्हता विजापूरकराचा मुख्य कारभारी व दिलेरखान याचें काहीं नाते असल्यामुळे हा त्यांचा स्नेह जमला होता आता हा दिलेरखान गोवळकोंड्याच्या कुतुबशाहीचा केवळ हाडवैरी होता, व तो खान शिवाजीमहाराजासहि अगदी पाण्यात पाहत असे यास्तव दोघांचाहि वैरी एकच असल्यामुळे त्यांचा स्नेहभाव दृढ होण्यास मुळींच पंचाईत पडली नाहीं[१]

आता आपण आपला देश सोडून दूर गेल्यावर मागे मोगलांनी काहीं गडबड करू नये व आपल्या सत्तेतील मुलखास उपसर्ग लावूं नये ह्मणून महाराजांनी निराजीपंत न्यायाधिशाला मोगलाचा सुभेदार खानजहान बहादूर याजकडे सलो-

---

१ प्रो. सरकार ह्मणतात की, ह्या समयी विजापूरदरबारात मोठी दुफळी झाली होती. तेथे अफगाण व दक्षिणी अशा दोन फळ्या झाल्या होत्या अफगाणफळीचा प्रमुख बहिलोलखान यानें गादीवर शिकंदर नावाचा लहान मुलगा बसविला होता, त्याच्या वतीने राज्यकारभार पाहण्याचे काम बळकावून खवासखान, जो अगोदर राज्यकारभार पाहत होता, त्याचा खून केला दक्षिणी फळीने सदरील नवीन कारभाऱ्याच्या खिजरखान नामक एका हुशार मदतगाराचा खून केला. ह्यानंतर ह्या दोन्ही फळ्यांमध्यें कलह सुरू होऊन बहिलोलखानानें मोगल सुभेदार बाहादूरखान यास आपल्या पक्षाचा करून घेतला या सुभेदाराने विजापुरावर स्वारी करण्याची तयारी ह्या वेळी चालविली होती. ह्याप्रमाणे अदिलशाही दरबार कमकुवत झाले असल्याकारणानें शिवाजीमहाराजाच्या कर्नाटकांतील मोहिमेस तिकडून हरकत होण्याचा संभव मुळीं नव्हता.

त्याचें बोलणें करावयास पाठविलें तो खान लांचलुचपतीस वळणारा असल्या-मुळें त्याला त्यानीं पुष्कळ द्रव्य व जवाहीर नजर पाठविलें त्या विषयास भुलून त्या खानानें महाराजांच्या मुलखास आपण बिलकुल त्रास देणार नाहीं असें वचन दिलें ह्या वेळीं महाराजानी आणखी असा कावा केला कीं, त्या खानास खासगी रीतीनें पुष्कळ द्रव्य देऊन आणखी मोगलबादशहासहि माड-लिक ह्या नात्यानें खंडादाखल पुष्कळ पैका दिला असें सागतात कीं, महारा-जांनीं ह्या वेळी चार लाख होन खंडणी मोगलबादशहास देऊं करून खान-जहानास पाच हजार स्वारानिशी साहाय्य करण्याचे वचन दिले ही खंडणी देतांना महाराज असें ह्मणाले कीं, ही दुभत्या गाईला आपण पेंड देत आहो ' औरंगजेबाला हा तह मान्य झाला. तो त्या वेळीं सिधुनदाच्या अलीकडे पठा-णाशीं लढण्यात गुंतला होता त्यानें आपल्या पुत्रास असें सागून पाठविले कीं, शिवाजीमहाराजाशी युद्ध करण्याचे तूर्त तहकूब करून त्याच्याशीं तह करावा हे बरें. असें केल्यानें आपल्या इभ्रतीस काहीं कमीपणा येईल हे मनात आणूं नये

ह्याप्रमाणें मोगलसुभेदाराची मूठ दाबून त्याचा उपसर्ग आपल्या सत्तेस न होईसें महाराजांनीं केलें आपल्या दक्षिणेकडील सरहद्दीवर किल्ले बाधण्याचें काम त्यांनीं चालू केलें होतें तें ह्या वेळीं पुरे होऊन त्यावर लोक ठेवून तिकडील बंदोबस्त यथास्थित केला त्यामुळें निबाळकर, घाटगे वगैरे आदिलशाही जाहगी-रदारानीं तिकडून हल्ले केले असता त्यांचे काहींएक चालू नये असें झालें महा-राजास दुसरी काळजी आपल्या कोंकणपट्टीची होती तिजवर शिद्दीचा पुरा डोळा असून त्याचा त्या प्रांतास सततचा त्रास होता आपल्या पश्चात् तो कांहीं गडबड करील तर ती वेळींच मोडून काढण्याचें काम त्यानीं अण्णाजी दत्तोपंत सचिव ह्यास सागितलें. ह्या प्रधानाच्या हाताखालीं त्यानी पुष्कळ सैन्य देऊन ठेविलें. कल्याणापासून फोंड्यापर्यंत असलेल्या एकदर किल्ल्याची व प्रांतांची व्यवस्था ह्या सरदाराकडे दिली. इकडील किल्ल्यावर त्यानी असा नामी बंदो-बस्त ठेविला होता कीं, शत्रूनें कोणत्याहि किल्ल्यावर हल्ला केला असतां त्यास जिकडूनतिकडून लागोलाग कुमक होऊन तो त्याच्या हातीं सहसा जाऊं नये; तो हवे तितके दिवस लढवितां यावा ह्याप्रमाणें सर्व मुलखाचा बंदोबस्त उत्कृष्ट करून सगळा राज्यकारभार त्यांनीं मोरोपंताकडे सोंपला, व इतर सर्व प्रधानांनीं

व सरदारानी त्याच्या आज्ञेत वागून त्याला लागेल ती मदत वेळच्या वेळी करीत जावे असा सर्वास हुकूम देऊन ठेविला

त्याप्रमाणे सगळी व्यवस्था नीट लावून महाराज कर्नाटकात जावयास सन १६७६ सालच्या अखेरीस निघाले त्यानी आपल्या बरोबर तीस हजार स्वार[२] व चाळीस हजार पायदळ एवढी सेना घेतली एवढ्या मोठ्या सेनेस इतके दूर परमुलखात न्यावयाचें ह्मणजे हे खर्चाचे मोठेच कलम होते हा एवढा खर्च आपल्या खजिन्यातून न करिता तो बाहेरच्या बाहेर भागेल तर पाहावे असा विचार त्यानी केला, आणि भागानगरकराच्या राज्यात द्रव्य विपुल आहे, त्या दरबारात द्रव्याची मागणी करावी असें त्यानी मनात आणिले ह्या बाबतीत त्या सरकारावर जुलूम करणे त्याना नीट वाटले नाहीं कारण त्याजकडून त्यास करभार मिळत असे शिवाय मादण्णा व आकण्णा यास रघुनाथपतानें अनुकूल करून घेतलें होते यास्तव महाराजानी त्या दरबारातला आपला वकील प्रल्हाद[३] निराजी यास असें लिहून पाठविले कीं, 'आमच्या मनात कर्नाटकात मोहीम करावयाची आहे तेव्हा स्वारीखर्चास काहीं द्रव्य तानशहा बादशहापाशी मागावे, व तिकडे जातेवेळी त्याची प्रत्यक्ष भेट घ्यावी अशी आमची इच्छा आहे ' ही गोष्ट त्या वकिलाने तानशहास कळविली तेव्हा तो अगदी घाबरून गेला शिवाजीमहाराज सैन्यासह आपल्या भेटीस येणे त्याला अमळ धोक्याचे वाटले ही बाबटळ बाहेरच्या बाहेर जावी ह्मणून तो त्यास लागेल तेवढे द्रव्य देण्यास कबूल झाला, आणि शिवाजीमहाराजानी आपल्या भेटीस मुद्दाम येण्याचें काहीं कारण नाहीं असे त्याने त्या वकिलास सागितले ही बिना प्रल्हाद निराजीने महाराजास लिहून कळविली

---

१ प्रो सरकार इग्रज व्यापाऱ्याच्या लेखाच्या आधाराने ह्मणतात की, ह्या वेळी महाराजाचा मोठा पराक्रमी सरदार नेताजी पालकर जो महाराजावर रुसून मोगलास जाऊन मिळाला होता तो दिल्लीकडे दहा वर्षे राहून परत महाराष्ट्रात आला. तिकडे गेल्यावर त्याने मुसलमानी धर्माचा स्वीकार केला होता परतु दक्षिणेत आल्यावर त्याला पुन हिंदु धर्मात घेऊन महाराजानी कर्नाटकात जाताना काही तरी कामगिरी सागितली असावा पण ह्या गोष्टीचा कोणत्याहि बखरीत उल्लेख नाही

२ ईस्ट इन्डिआ कपनीचे येथील प्रतिनिधि ह्मणतात की, त्याच्या बरोबर वीस हजार घोडेस्वार व चाळीस हजार पायदळ होते

३ हा निराजी रावजीचा पुत्र ह्याला निराजी मरण पावल्यावर कुतुबशाहींत वकील नेमिलें होते

परंतु पूर्वी रघुनाथपंताने मादण्णा व आकण्णा याजपाशी ठराव केल्याप्रमाणें महाराज आपल्या लष्करासहवर्तमान भागानगराकडे जावयास निघाले आपण भेटीच्या इच्छेने जवळ आलो आहो हे तानशहास कळविण्यासाठी त्यानी रघुनाथपंत व निराजी रावजी यास पुढ पाठविले महाराज जवळ आले हे वर्तमान त्या बादशहास कळले तेव्हा तो फारच घाबरला त्या राज्यातील एकदर लोकास मोठी दहशत पडली परतु रघुनाथपंताने व प्रल्हाद निराजीने त्याजपाशी अशी शपथक्रिया केली कीं, शिवाजीमहाराज केवळ स्नेहभावाने आपल्या मुलाखतीस येत आहेत यात त्याचा दुसरा काहीएक उद्देश नाहीं मादण्णा व आकण्णा यास त्याचे ह्मणणे अर्थात् खरे वाटले, व त्यानी बादशहाची अशी समजूत केली कीं, शिवाजीमहाराजाशी स्नेह केल्याने आपले पुष्कळ कल्याण होण्यासारखे आहे ही आपल्याहि मुत्सद्द्याची खात्री एकून त्या बादशहाची धास्ती असल कमी झाली

महाराजानी आपल्या एकदर सैन्यास अशी सक्त ताकीद देऊन ठेविली होती कीं, 'कुतुबशाही राज्याच्या सरहद्दीत पाय ठेवल्यावर त्या प्रातातील रयतेस तिलप्राय उपसर्ग करू नये जे जेथ मुक्काम होईल तेथे दाणावैरण, लाकूडफाटे वगैरे लागणारा सगळा माल खुपखरेदीने विकत घ्यावा रयतेच्या एका काडीसहि स्पर्श करू नये ही मर्यादा मोडून कोणी लूटफाट केल्यास त्याला कडक शिक्षा होईल ' ह्या हुकुमाकडे दुर्लक्ष करून कोणी कुतुबशहाच्या रयतेस त्रास दिला असता त्याच्या हातानी बोटे किंवा सबद हात तोडावा, व गुन्हा फारच मोठा असल्यास त्याचा शिरच्छेद करावा असे करू लागल्यामुळे सर्व सैन्यास धाक लागून कुतुबशहाच्या रयतेस यत्किंचित्‌हि उपसर्ग लागेनासें झाले ही हकीगत कुतुबशहाच्या कानी जाऊन त्यास मोठे समाधान वाटलें

असें सागतात कीं, शिवाजीमहाराजाची स्वारी जवळ आल्याचे कळलें तेव्हा त्याना सामोरे जाण्याची तयारी त्याने केली हे महाराजास कळलें तेव्हा त्यानी त्यास असा निरोप पाठविला कीं, "आपण माझे वडील बधु आहा वडिलानी धाकट्याला हा असा मान देणें उचित नाहीं ह्यावरून कुतुबशहानें स्वत जाण्याचा बेत रहित करून आपले वजीर मादण्णा व आकण्णा यास व इतर मातबर गृहस्थास मोठ्या लवाजम्यानिशीं नगराबाहेर कित्येक मैलपर्यंत सामोरें पाठविलें त्यानीं महाराजास वाजतगाजत नगरापाशीं आणिलें. तेथे त्याच्या सगळ्या सैन्यानें तळ दिला दुसरे दिवशीं कुतुबशहाची मुलाखत

घेण्याचे ठरले[1] ह्या भेटीस जाण्याच्या वेळी महाराजानीं आपल्या निवडक लोकास मोठे उंची पोषाख दिले त्याना मोत्याचे तुरे, सोन्याची कडीं, नवीं झगझगीत चिलखते वगैरे लष्करी जामानिमा देऊन त्यास मोठ्या पिढीजाद उमरावाप्रमाणें सजविले त्याचे हत्तीघोडेहि बहुमोल अलंकारादिकानी शृंगारिले ह्याप्रमाणे एकाद्या बादशहास शोभेगी मोठ्या थाटाची स्वारी तयार करून महाराजानी पन्नास हजार सैन्यानिशी नगरप्रवेश केला तिकडे कुतुबशहानेंहि सर्व नगर शृंगारावयास लावून गुढ्या, तोरणे व पताका जिकडेतिकडे उभारावयास व वाद्ये वाजवावयास सागितले नगरातील एकदर लोकाना शिवाजी महाराजास व त्याच्या एकाहून एक शूर, बलाढ्य व पराक्रमी सरदारास पाहण्याची अत्यत उत्कठा वाटून सर्व रस्ते लोकाच्या गर्दीनें अगदी भरून गेले ज्यानी उत्तरेकडील व दक्षिणेतील पातशहातीस हतवीर्य केले, ज्यानीं आदिलशहाच्या दरबारास विलाप करावयास लाविले, ज्यानी दिल्लीदरबारच्या अमीर-उमरावास व खुद्द मोगल बादशहास घाबरवून सोडलें, ते महा प्रतापी वीर डोळ्यानी पाहून नागरिकाच्या हृदयात धाक व कौतुक ह्या वृत्ति उद्भवणें स्वाभाविक होते मगळ्याचे डोळे अर्थात् महाराजाकडे लागले होते त्याच्या सभोवती त्याचे मत्री व सरदार होते ते दृष्टीस पडले ह्मणजे प्रेक्षकजन " शिवछत्रपतीचा सदा विजय असो ! " असे शब्द दीर्घ स्वराने उच्चारीत रस्त्यातील घराच्या गच्च्यावरून वगैरे त्याजवर सोन्यारुप्याच्या पुष्पाची वृष्टि होऊं लागली मधूनमधून सुवासिनी बाया पुढे येऊन त्यास आरत्या ओवाळीत व पुरुष मडळी येऊन त्यास पुष्पहारानी मडित करीत महाराज ह्या सत्काराने परम सतोष पावून सोन्यारुप्याची नाणी मुठीनीं रस्त्याच्या दोन्ही बाजूंस उधळीत चालले जागोजाग सुवासिनी बायास व गृहस्थास ते वस्त्राभरणें नजर करीत गेले. महाराजानी त्या दिवशी नगरातील एकदर गोरगरीब व फकीर यास मुबलक खैरात केली

ही मुलाखत होण्याची जागा दादमहालावर ठरून तेथे बादशहानें बैठकीची वगैरे सुदर व्यवस्था करविली होती ह्या महालाजवळ महाराजाची स्वारी पोंचल्यावर आपला सगळा लवाजमा खालीं जय्यत उभा ठेवून महाराज स्वत कांहीं कारभाऱ्यानिशी कुतुबशहाच्या महालात गेले. बादशहा माडी उतरून खालीं येऊं

[1] जेध्याच्या शकावलींत ह्या भेटीची तारीख सन १६७७ चा मार्च महिना अशी दिली आहे

लागला, त्यास त्यानी असें सागून पाठविलें कीं, आपण महालाखालीं येण्याची तसदी घेऊं नये वर गेल्यावर उभयतानी एकमेकास क्षेमालिगन दिलें व ते एकासनी बसले मादण्णा व आकण्णा हे जवळ बसले इतर सारे अमीरउमराव उभेच राहिले महाराजाबरोबर आलेले कारभारी हबीरराव सरनोबत, रघुनाथपत, निराजीपंत, दत्तोपत वाकनीस व बाळाजी आवजी चिटणीस[१] एवढ्यास मात्र बसावयास सागितले कुतुबशहाच्या जनानखान्यातल्या बायाना महाराजास पाहण्याची उत्कंठा लागली असल्याकारणानें दरबाराच्या सभोवतालील खिडक्यास जाळ्या लावून त्यातून त्या त्याजकडे मोठ्या कौतुकाने टकमक पाहत होत्या नंतर काहीं वेळ बादशहाचे व महाराजाचे मोठ्या स्नेहभावाचे भाषण झालें बादशहाने महाराजाबरोबर आलेल्या एकदर सरदाराच्या भेटी घेतल्या व त्याचा यथोचित सन्मान केला त्याच्या सैन्याची शिस्त व वस्त्रालकार पाहून बादशहा फार खुष झाला मग त्यास व त्याच्या सगळ्या लवाजम्यास विडे व अत्तरगुलाब दिले महाराजास व त्याच्या मुख्य कारभाऱ्यास व सरदारास बहुमोल जवाहीर, शिरपाव, हत्ती व घोडे बहुमानपुरस्मर नजर केले ह्या वेळी बादशहाने आपल्या हाताने महाराजाच्या अगास अत्तर लाविले व विडे दिले, आणि महाराज जावयास निघाले तेव्हा त्यास पोचवीत माडीवरून जिन्याच्या तळापर्यंत तो स्वत आला ह्याप्रमाणे सुमारे प्रहरभर दादमहालात राहून बादशहाचा अतिप्रेमाचा आदरोपचार अनुभवून महाराज आपल्या लोकासह परत आपल्या मुक्कामासाठी तयार केलेल्या वाड्यात गेले वाटेने जाताना त्यानी पुन रस्त्यातील गोरगरिबास द्रव्यदान केले

ह्याप्रमाणें शिवाजीमहाराज कुतुबशहाच्या आदरातिथ्याने पूर्ण सतोप पावून दादमहालातून परत गेल्यावर त्या शहाचें चित्त अमळ स्वस्थ झाले. अफझुलखानासारख्या बलाढ्य सरदारास ज्याने एकट्याने पुरा केला, शास्ताखान कडेकोट बंदोबस्ताने आपल्या जनानखान्यात निजला असता ज्याने त्याच्यावर झडप घातली, औरगजेबासारख्या अतिप्रबळ बादशहाच्या भर दरबारात सभोवतालीं मोठे खंदे योद्धे नागव्या तरवारी घेऊन उभे राहिले असता ज्याने त्या बादशहाचा धिक्कार करण्यास मागेपुढे पाहिलें नाहीं, ज्याने सुरतेसारखी मातबर शहरे बिनहरकत लुटून फस्त केलीं, तो महावीर त्या नेभळ्या व ऐष-

१ सभासद महाराजाबरोबर दादमहालात गेलेल्या कारभाऱ्यापैकी सोमजी नाईक, बसनागार व जनार्दनपत याची नावें आणखी देतो

आरामात आजन्म निमग्न असलेल्या शहाच्या मुलाखतीस आला असता त्याच्या मनाला केवढा धाक वाटला असावा हे काहीं येथे सांगावयास नको. तरी ह्या भेटीच्या अतीं त्याची अशी खात्री झाली कीं, शिवाजीमहाराज खऱ्या दिलाच्या मनुष्याशी खरेपणाने वागणारे असून आपल्याशी स्नेहसंबंध जोडावा अशी त्याची वास्तविक इच्छा आहे महाराजाचा जो वकील त्याच्या दरबारी होता त्याने आपणास फसविलें नाहीं ह्याबद्दल त्याने त्याला चांगलें पारितोषिक दिलें

महाराजानी भागानगरास एक महिना मुक्काम केला असें ह्मणतात मादण्णाच्या विद्यमाने बादशहाशी त्याचे राजकारणी पुष्कळ बोलणें झाले मादण्णापंताने महाराजास अपल्या घरीं मोठ्या थाटाची मेजवानी केली, त्याच्या बरोबरच्या सरदारास व कारभाऱ्यास वस्त्रे दिलीं, व खुद्द महाराजास वस्त्रालंकार व हत्तीघोडे नजर केले ह्या मेजवानीच्या समयी मादण्णाच्या वृद्ध मातोश्रीनें स्वत आपल्या हाताने स्वयंपाक करून महाराजास भोजन वाढले, आणि ते जेवीपर्यंत मादण्णा व आकण्णा हे त्याच्यापाशीं मोठ्या अदबीने बसले होते असें ह्मणतात महाराजानीहि त्या बंधुद्वयास मोठी मेजवानी दिली, व त्यास हत्तीघोडे देऊन व त्याच्या बरोबरच्या मंडळीस वस्त्रे देऊन गौरविले बादशहास व त्याच्या पदरच्या अमीरउमरावास महाराजानी एक मोठी टोलेजंग मेजवानी दिली, व सर्वास बहुमोल वस्त्रे व जवाहीर देऊन संतुष्ट केलें नगरातील एकंदर अमीन व मनसबदार याच्या भेटी घेऊन महाराजानीं त्याच्याशी स्नेह संपादिला

ह्या मुलाखतीच्या वेळीं एक मजेची गोष्ट घडल्याचें एका बखरीत लिहिले आहे[१] ती अशी कुतुबशहा एके समयीं सहज बोलताबोलता रघुनाथपंतास ह्मणाला कीं, 'शिवाजी महाराजाच्या पदरच्या लोकाची शिपाईगिरीविषयीं मोठी आख्या ऐकतों तर त्याची ती शिपाईगिरी प्रत्यक्ष पाहावी असें

१ शिवदिग्विजय प्रो सरकार ह्मणतात की, ही गोष्ट हैदराबादच्या अमीरउमरावानीं महाराजास व त्यांच्या सरदारांस मोठी मेजवानी दिली त्या समयीं घडली. एका बखरीत असे आहे की, "तुमच्याकडे किती नामांकित हत्ती आहेत ?" असा प्रश्न कुतुबशहानें केला तेव्हां त्यांनीं आपल्या हजारो मावळे वीराकडे बोट दाखवून ह्मटलें कीं, हे सारे माझे हत्ती होत.

आमच्या मनात आले आहे ' रघुनाथपंत ह्मणाला 'त्याच्या पदरचा एकएक शिपाई हत्तीच्या बरोबरीचा आहे ' त्यावर बादशहा ह्मणाला 'ते हत्तीशी झुंजतील काय ?' रघुनाथपत बोलला 'अशक्य काय ? ते हत्तीची तमा वरीत नाहींत ' कुतुबशहा ह्मणाला 'हत्तीशी कसे लढतील ? आज ही त्याची लढाई पाहूं एक शिपाई घेऊन या ' बादशहाची ही मनीषा महाराजास कळवून त्याच्या हुकमानें येसाजी कंकास दहा चागले मजबूत शिपाई निवडून काढून कुतुबशहाकडे न्यावयास सागितले हे शिपाई निवडून घेऊन येसाजी कंक रघुनाथपंताबरोबर बादशहाच्या भेटीस गेला त्या शिपायास बादशहानें वस्त्र देऊन गारविले, आणि मग एक मदोन्मत्त हत्ती आणून त्याच्या पुढे मोकळा सोडिला तो नीट येसाजी कंकाच्या अगावर धावत आला, तेव्हा त्याने तीळ-भरहि न कचरता आपली तलवार उपसून मोठ्या चपळाईने हत्तीच्या तोंडावर सज्जर वार केला त्या सरशी त्या हत्तीची सोंड दातापासून पुरी उतरली हे पाहून बादशहा अगदी चकित झाला येसाजीस जवळ बोलावून त्यानी त्याने फार तारीफ केली, व त्यास सोन्याची कडी, तोडे व गळयातील गोफ ही बक्षीस दिली बादशहा इतकेच करून थाबला नाहीं, तर त्याने येसाजीस पाच हजार रुपये उत्पन्नाचा गाव इनाम करून देण्याचे मनात आणिले हा त्याचा मानस येसाजीस कळला तेव्हा तो बादशहास मोठ्या अदबीनें मुजरा करून ह्मणाला की, 'मी महाराजाचे अन्न खातो ते आपलेच आहे त्याच्या आज्ञेनें मी येथे येऊन माझी करामत आपण पाहिली तरी आपले हे बक्षीस मी घेणे नीट नव्हे आह्मास महाराजानी काय उणे केले आहे की आपले बक्षीस घेऊन मी निर्वाह करावा ? आपले बक्षीस घेऊन मी आपला ओशाळा झालो असता माझी बुद्धि भ्रष्ट होऊन महाराजाच्या सेवेत अतर पडेल यास्तव जे काहीं देणे ते महाराजाकडे द्यावे ते धनी आहेत चाकरी करणे हा आमचा धर्म आहे.' ही त्या इमानी पुरुषाची निस्पृहता व निःसीम स्वामिनिष्ठा पाहून बादशहास केवढे चोज वाटले असेल ते येथे सागणे नलगे

ह्याप्रमाणे कुतुबशहाचा व त्याच्या वजिराचा पाहुणचार घेऊन महाराजानी तेथून पुढे निघून जाण्याचा सकल्प केला व बादशहाचा निरोप मागितला त्या वेळी त्याने पुन दरबार भरवून सर्वाच्या परस्पर भेटी झाल्या, व निरोपास हत्ती पाच, घोडे पाच व पोषाख पाच असे त्याने महाराजास अर्पण केले, व त्यांच्या सरदारास आणि कारभाऱ्यासहि वस्त्रेभूषणे देऊन सतुष्ट केले परस्परानी

परस्परास हरएक प्रसंगीं साहाय्य करावें अशी उभय पक्षाची शपथक्रिया झाली. महाराजानी स्वारीखर्चासाठी मागितलेले द्रव्य बादशहाने मोठ्या खुशीने दिले [2] व उभयताचा असा करार झाला कीं, कर्नाटकात शहाजीराजाची जाहगीर आहे तिच्या बाहेर आणखी मुलूख महाराज जिंकितील त्यातला निम्मे कुतुबशहास द्यावा, व कुतुबशहाने आपला तोफखाना महाराजाच्या सैन्याबरोबर पाठवावा. कुतुबशहाने आपली काही फौजहि मदतीस देतो म्हटले परंतु महाराजानी ती घेतली नाही [3] ह्या उभयताच्या करारात आणखी एक कलम असें होतें म्हणतात कीं, कर्नाटकाला जो विजापूरकराचा प्रांत शिवाजीमहाराज हस्तगत करितील त्यातला काहीं त्या सरकारास त्यानी अशा अटीवर सोडून द्यावा कीं अबदुल-करीम याला अदिलशाहीच्या राज्यकारभारातून दूर करून आकण्णा यास त्याच्या जागी नेमावे.

ह्याप्रमाणे मुबलक द्रव्य व भक्कम तोफखाना मिळवून महाराज कर्नाटकाकडे जावयास निघाले वाटेत पहिल्याने तुंगभद्रातीरी करनाळेकडप्पे म्हणून एक संस्थान आहे तथील संस्थानिकाने पाच लाख होन खंडणी महाराजास देण्याचे कबूल केले त्यावरून त्याच्या प्रांतास काहीएक उपद्रव न करिता त्यानी पुढे प्रयाण केले ह्या शहरापासून सुमारे पंचवीस मैलावर निवृत्तिसंगम लागतो त्यावर स्नान करून कृष्णानदी उतरून महाराज पलीकडे गेले, आणि पायदळ सैन्य कडप्याच्या वाटेने पुढे रवाना करून ते स्वत काही घोडेस्वारासह, पूर्वेस

---

१ ह्या मुलाखतीच्या वेळी महाराज कुतुबशहास असे बोलले म्हणतात कीं, अदिलशहा आणि तुम्ही मला मदत कराल तर मी तुम्हास सर्व हिंदुस्थान जिंकून देईन

२ ह्या वेळी कुतुबशहाने महाराजास दहा लाख होन रोख व शिवाय काही जवाहीर दिले होते असे उरकीज म्हणतो पाच लाख होन दिले होते असे रायरीच्या बखरीत लिहिले आहे प्रो सरकार म्हणतात कीं कुतुबशहाने महाराजांच्या खर्चासाठी दररोज तीन हजार होन म्हणजे दरमहा साडेचार लाख रुपये [illegible] होते

३ प्रो सरकार म्हणतात कीं, कुतुबशहाने आपला सरलष्कर मिर्झा महमद अमीन यास बरोबर आपले पाच हजार लोक देऊन महाराजाच्या मदतीस दिले

४ शि दि ह्या वेळी आणखी असे एक कराराचे कलम ठरले कीं, कुतुबशहाने महाराजास प्रतिवर्षी एक लाख होन खंडणी देत राहावे, म्हणजे मोगलाशीं लढण्याचा प्रसंग आला असता महाराजानी त्यास लागेल ते साहाय्य करावे

५ याचे नाव आनंदराव देशमुख असे होते उरकीज

श्रीशैलमल्लिकार्जुनाचें देवालय आहे त्याच्या दर्शनास गेले. अतरपुरीवर सर्व फौज ठेवून ते थोड्याशा लोकानिशी गगास्नानास गेले तेथल्या पर्वताचा देखावा व वनश्री अत्युत्तम असून कृष्णानदीचें प्रशस्त पात्र घाट उतरून पूर्वसमुद्राकडे चालले आहे ते रमणीय व परमपूज्य स्थान पाहून महाराज अगदीं तल्लीन झाले हा दुसरा कैलासच आहे असा त्यास भास झाला ते देवदर्शनास गेले असता तेथे त्याच्या ठायी असा काहीं विलक्षण भक्तिभाव प्रज्वलित झाला कीं, ह्या देवस्थानास आपल्या देहाचे अर्पण करून जीवितसार्थक्य करावे असे त्याच्या मनानें घेतले, आणि त्या आवेशाच्या झटक्यासरशी तरवार उपसून ते आपले शिरकमल देवास अर्पण करावयास सिद्ध झाले परतु हा आवेश अनावर होऊन त्याच्या अगी भवानी सचरली व असे बोलली कीं, 'तुला असें केल्यानें मोक्ष प्राप्त होणे नाहीं तुझ्या हातानें अद्यापि उदड कर्तव्यता होणे आहे स्वधर्मरक्षणासाठी तू निर्माण झाला आहेस, यास्तव असे साहस करू नको' महाराज सावध झाल्यावर त्याना जवळच्या लोकानी भवानीची ही आज्ञा निवेदन केली ती ऐकून त्यानी अशा प्रकारे आत्मयज्ञ करण्याचा विचार रहित केला परतु अशा पूज्य व रम्य स्थानी राहून तपस्व्याची वृत्ति धारण करावी व आमरण तपश्चरण करून शेष जीवित घालवावें अशी इच्छा त्यास झाली. मग कारभारी व सरदार लोकास ते ह्मणाले की, 'आमचे सर्व मनोरथ श्रीजगदंबेच्या प्रसादानें पूर्ण झाले आहेत आता ससारापासून निवृत्त होऊन अशा पवित्रस्थानी

---

१ याचे नाव ग्राट डफ व उरफीज पर्वतम् असे देतात, व सभासद शैलपर्वत असे देतो हे दक्षिण हिंदुस्थानातले अतिप्राचीन देवालय आहे या ठिकाणी कृष्णानदी सातआठशे हात खोल खोऱ्यातून वाहते. ह्या खोऱ्यातून हजारबाराशे हात उच चढाव आहे, तेथें एका निबीड व निर्जन अरण्याच्या मध्यभागी हे देवालय आहे. ह्या स्थलासभोवार लहान टकड्या आहेत, आणि देवालयाच्या सभोवार चौदा पधरा हात उच व भक्कम भिंतीचे आवार आहे ह्या आवाराची लाबी सुमारे साडेचारशे हात व रुदी सुमारे साडेतीनशे हात आहे ह्या आवाराच्या भिती रुद असून त्या करड्या रगाच्या दगडाच्या आहेत हे सगळे दगड चौरस असून सारख्या आकारमानाचे आहेत, आणि त्यावर हत्ती, घोडे, वाघ, पारधी, योद्धे, योगी इत्यादिकाच्या आकृति कोरल्या असून आणखी पुराणातरीच्या कित्येक प्रसगाची चित्रे कोरली आहेत ह्या आवाराच्या मध्यभागीं देवालय आहे तें चौरस आहे. याच्या भिंती व छप्पर हीं विजयनगरच्या कृष्णदेव राजानें पितळेच्या पत्र्यानें मढविली आहेत. येथून खालीं कृष्णेच्या पात्रापर्यंत घाट बाधून काढला आहे.

राहावें व उरलेलें आयुष्य मोक्षसाधनांत घालवावें असें आमच्या मनानें पूर्णपणें घेतलें आहे तरी तुह्मी ही मोहीम येथेंच पुरी करून स्वराज्यास परत जावे, व माझ्या पुत्रास गादीवर बसवून त्याच्या नावे राज्यकारभार चालवावा हें ऐकून जवळच्या लोकास मोठे सकट पडले त्यानी त्याची अनेक प्रकारी समजून घालण्याचा प्रयत्न केला, व भवानीच्या आज्ञेप्रमाणे वर्तन करण्यातच जीवितसार्थक्य आहे असें त्यास ह्मटले. परतु त्याचा काहींएक उपयोग झाला नाहीं त्यानी तपस्वीवेश धारण करून सर्वांग भस्मचर्चित केले ते एकसारखे ध्यानमग्न होऊन बसू लागले एकाद्या परमहसासारखे त्याचे देहभान नष्ट होऊन ते ईश्वरचिंतनात सर्व काळ घालवू लागले ही अशी त्याची वृत्ति झालेली पाहून त्याच्या पदरच्या लोकास मोठी चिंता पडली महाराजासभोवती अहर्निश पहारा ठेवून ते काय करितात ते ते पाहूं लागले ध्यान विसर्जन करून ते अमळ देहभानावर आले ह्मणजे त्याशी रघुनाथपताने बोलावे, व धर्मशास्त्रातील अनेक वचनाच्या आधाराने त्यास असे सिद्ध करून दाखवावे कीं, ह्या वृत्तीचा अवलब करणे क्षत्रियास उचित नव्हे ही अशी विरक्तावस्था त्याच्या ठायी नऊ दिवस राहिली[1] मग रघुनाथपंताच्या समयोचित बोधाने त्यास हा असा स्वजीवितक्षय करणें नीट न वाटून ते पुढील क्रमास लागले त्या देवस्थानी त्यानी एक लक्ष ब्राह्मणास भोजन घालून दानधर्म अतोनात केला, तेथे एक उत्तम घाट बाधून त्याचे नाव श्रीगगेश असें ठेविले, तपस्वीजनास तपश्चरण करण्यासाठी अनेक गुहा तयार करविल्या, व धर्मशाळा व मठादि बाधिले. ह्या प्रमाणे आणखी आठ दहा दिवस त्या स्थलीं मुक्काम करून त्यानी पुढे प्रयाण केलें

इकडे त्याचे पायदळ सैन्य पइनघाट व्यंकटरमणगिरीच्या खिंडीने उतरून कर्नाटकात गेले होते त्यास गाठून अवजड सामानासह हलक्या हलक्या मजला करीत यावयास सागून महाराजानीं काहीं मावळे व घोडदळ यासह पुढे कूच केलें ते मद्रास शहरापासून सात मैलावरील एका गावीं सन १६७७ साली मेमहिन्याच्या पहिल्या आठवड्यात पोचून तेथे त्यानीं थोडे दिवस मुक्काम केला महाराजानीं मद्रास येथील इंग्रज व्यापाऱ्याना ता १४ मे रोजीं एक पत्र पाठवून त्याच्याकडे काहीं औषधी जिनसांची मागणी केली तेव्हा त्या व्यापाऱ्यांनीं अदमासें साठ होन किंमतीचा माल व काहीं उंची कापड महाराजास नजर केलें ह्या नजराण्याबद्दल आभारप्रदर्शक पत्र त्यांना

१ उल्कीजकृत म्हैसूरचा इतिहास पाहा.

मेच्या पंचवीस तारखेला पाठवून आणखी तसाच माल आपणास किमत घेऊन देण्याविषयी कळविले त्यावरून इंग्रज व्यापाऱ्यानी त्यास आणखी काहीं माल नजर केला त्याची किमत ५२होन होती असें ह्मणतात ह्याप्रमाणे उभयपक्षी स्नेहभाव प्रगट झाला असताहि महाराजाच्या लोकानी पुढे काहीं दिवसानी व्यकोजी-राजाच्या ताब्यातील प्रातात तिमरी येथे इंग्रजाची एक वखार होती ती लुटली. येथून पुढे कूच करून महाराज कर्नाटकातील कित्येक लहानमोठ्या सरदाराच्या ताब्यातले प्रात रघुनाथपताच्या कारस्थानाच्या योगाने काबीज करीत चालले त्याना त्याच्याशी युद्धप्रसग करण्याची पाळी आली नाहीं चदीचा मोठा भक्कम किल्ला त्याच्या हाती असाच विनबोभाट आला त्यानी त्या किल्ल्यापाशी येऊन त्यास मोचबदी करून वेढा दिला हे ठाणे विजापूरकराच्या ताब्यातले असून अबरखानाचे पुत्र रूपखान व नासरखान ह्याच्या हवाली होते त्याच्याशी रघुनाथपताने पूर्वीच राजकारण करून ठेविले होते यास्तव हा किल्ला हस्तगत व्हावयास मुळीच पचाईत पडली नाहीं महाराजानी किल्ल्यास मोर्चे

१ त्या किल्ल्याचे नाव जिंजी असे डफ वगैरे काही ग्रथकार देतात, व काही मराठा बखरकार चजी असे नाव देतात

२ काही मराठी बखरकार याचे नाव ग्यानखान असे देतात

३ रायगडच्या बखरीत हा किल्ला घेतल्याचा हकीकत येणेप्रमाणे दिली आहे किल्लेदार अबरखान यास महाराजानी असे सागून पाठविले की, 'आह्मी विजापूरकर व भागानगरकर याच्याशी तट करून इकडे आलो आहो, तरी तुह्मी आह्मास येऊन भेटावे' हे त्या किल्लेदारास खरे वाटून तो आपल्या आठ पुत्रासह महाराजाला भेटावयास आला असता त्याला त्याना पकडून कैद केले व किल्ला हस्तगत केला शिव दिग्विजयकार ह्मणतो की, अबरखान महाराजास नजरनजराणा घेऊन भेटावयास आला असता त्यास त्यानी सागितले की, 'तुमच्या प्राताचा बचाव व्हावा असा तुमचा मनोदय असल्यास चदीचा किल्ला आह्मास द्यावा, नाहीतर तुह्मी आमच्या लष्करात राहावे, चदीस जाऊ नये आह्मी वाटेल त्या रीतीने हा किल्ला सर करू' त्यावरून त्याने तो किल्ला खाली करून देण्याचे कबूल केले,व त्याच्या सोडचिठ्ठ्या दिल्या महाराजाशी सलोख्याने राहण्यातच आपला निभाव आहे असे त्यास वाटले परतु अबरखानाचे आठ पुत्र किल्ल्यावर होते, ते किल्ला स्वाधीन करून देण्यास राजी न होऊन ते महाराजाशी लढाई करण्यास सिद्ध झाले परतु रघुनाथपताने आतून राजकारण करून ठेविलें असल्यामुळे त्याच्या पक्षाकडे फार थोडे लोक होते हा असा आपला पक्ष दुर्बल पाहून ते घाबरून गेले व किल्ला देण्यास कबूल झाले मग त्यास काहीं गावाचे वतन तोडून देऊन सरजामानिशीं त्यानी चाकरी करावी असें महाराजानी

लावितांच सदरील किल्लेदारानी किल्ल्याचे दरवाजे खुले करून महाराजांच्या लोकांस आत घेतलें आणि किल्ला त्यांच्या स्वाधीन केला. हा किल्ला हातीं आल्यावर त्याचा हवाला त्यांनी रामजी नलगे नावाच्या एका अत्यंत इमानी मावळे सरदारास दिला, तिमाजी केशव यास त्याचा सबनीस नेमिलें, व रुद्राजी साळवी यास कारखानवीस केलें. त्या किल्ल्याची एकंदर व्यवस्था त्यांनी महाराष्ट्रांतील आपल्या किल्ल्यासारखीच केली. त्या वेळीं मदुरा येथें एक जेसुइटपंथाचा पाद्री होता, त्याचा असा लेख आहे कीं, शिवाजीमहाराजांनी ह्या किल्ल्यास नवीन तटबंदी करून सभोंवतालीं मोठा खंदक खणला, किल्ल्यावर मोठमोठे बुरूज रचून माऱ्याच्या नवीन जागा केल्या. हें सगळें बांधकाम त्यांनी इतकें उत्तम करविलें कीं युरोपांतल्या मोठमोठ्या कुशल कारागिरांना तें पाहून खालीं मान घालावी लागेल. ह्या ठाण्याच्या आसपासचा सगळा प्रांत काबीज करून त्यावर विठ्ठल पिळदेव गोराडकर यास त्यांनी सुभेदार नेमिलें, व त्यास स्वराज्यांतील जमाबंदीची पद्धत तिकडे सुरू करावयास सांगितलें. रूपखान व नासरखान यास कांहीं नेमणूक करून देऊन संतुष्ट केलें.

ह्या मोहिमेंत पहिल्यापासून महाराजांनी असा बहाणा केला होता कीं, आपण गोवळकोंड्याच्या कुतुबशहाच्या तर्फे ही स्वारी करीत आहों. हा बहाणा करण्याचें कारण अर्थात असें होतें कीं, त्याला त्या सरकाराकडून पुष्कळ द्रव्यसाहाय्य झालें होतें, व आणखी पुष्कळ होण्याची आशा होती. परंतु पुढें लव-

ठरविलें. उलट [illegible] म्हणतो कीं, [illegible] जातांना वाटेत जो प्रदेश लागला त्यांतील प्रजेस महाराजांनी मुळींच उपद्रव दिला नाहीं, व आपण विजापूरकरांचे दोस्त या नात्यानें चाललों आहों, असा त्या प्रांतांत समज करून दिला. शेरखानानें त्याच्याकडे वकील पाठविला असतां त्यास त्यांनी असें सांगितलें कीं, 'आपला व विजापूरसरकाराचा कलह मिटून समेट झाला आहे, व आपण त्या सरकाराचे ताबेदार झालों आहों.' असा बेमालूम बहाणा करून त्यांनी त्या वृद्ध किल्लेदारास आपल्या पुत्रासह व नातलगासह [illegible] आपल्या ठाण्यांत घालविलें. तो असें हातीं आलें असतां महाराजांनी त्यास कैद करून किल्ला हस्तगत केला. प्रो. सरकार म्हणतात कीं, रूपखान व नासरखान हे खवासखानाचे मुलगे होते. सदरील किल्ला दग्यानें घेतल्याची हकीकत त्यास मुळीं खरी वाटत नाहीं. महाराजांना किल्ल्यावर हल्ला करून पहिल्या सपाट्यास तो सर केला, याला पुरावा मदुरा येथील एका जेसुइट मिशनरीच्या लेखाचा ते देतात.

१ शिवदिग्विजयकार याचें उपनाव गरुड असें देतो.

करच हा बहाणा टाकून ते नवीन काबीज केलेल्या ठाण्यावर आपले लोक ठेवून आपल्या नावानेच त्यांची व्यवस्था करूं लागले हा प्रकार कुतुबशहाला कळला तेव्हा त्याचे डोळे साफ उघडून त्याने त्यास आणखी मदत करण्याचें बंद केलें. ह्याप्रमाणे स्वारीखर्चास लागणारी रक्कम मिळण्याची अडचण पडूं लागली तेव्हा महाराजानी लूट करून पैसा मिळविण्यास सुरुवात केली ही अशी त्यानी त्या प्रातात धामधूम आरभिली तेव्हा तिकडील लोकाची कशी गडबड उडून गेली होती हे मद्रासच्या इग्रज व्यापाऱ्यानी लिहून ठेविले आहे त्याचा आशय असा 'शिवाजीमहाराज द्रविडदेशात शिरले हे वर्तमान चोहोकडे पसरलें तेव्हा सर्व लोक पराकाष्ठेचे घाबरून गेले तो मोठा भयकर पुरुष असून त्याने पश्चिम किनाऱ्यावरील प्रातचे प्रात लुटून जाळून उध्वस्त केले, व यवनपादशहास त्राहित्राहि करून सोडिलें, अशी त्याची ख्याति चोहोकडे पसरली होती यास्तव त्या लोकास त्याची फारच दहशत वाटू लागली आपली आता धडगत कशी लागते याचा ज्याला त्याला विचार पडला शिवाजीमहाराजाला द्रव्य कोठे आहे व कोणावर हल्ला केला असता खचित द्रव्यलाभ व्हावयाचा हे काहीं दैवी शक्तीच्या योगाने कळत असून ते जातील तिकडे त्यास हटकून यश प्राप्त व्हावयाचे, असा त्या लोकाचा समज होऊन गेला होता '

चदी सर केल्यावर तेथून कूच करून महाराज त्रिनमली[1] प्रातात गेले ह्या प्राताचा ताबा शेरखाननामक एका पाचहजारी सरदाराकडे होता हा अर्थात् विजापूरकराचा अकित होता महाराज आपल्या प्रातात शिरले असें पाहून तो सरदार आपल्या लोकानिशीं त्याच्यावर चालून आला. त्याच्याशी महाराजाच्या लोकानी सामना करून त्याला व त्याच्या सैन्याला चोहोंकडून गराडा घातला ह्या युद्धात तो सरदार पराभव पावून तो प्रात महाराजाच्या हातीं आला ह्या विजयात त्यास पुष्कळ द्रव्य व हत्तीघोडे मिळाले

ह्या प्रांतात वेलूर, त्रिवादी, आर्नी वगैरे किल्ले होते, त्यावरचे अधिकारी महाराजास सामोपचारानें वश होईनात यास्तव महाराजाचें पायदळ सैन्य मागाहून कूच करून येत होतें, त्यानें वेलूरच्या[2] किल्ल्यास स १६७७ च्या

---

१ चिटणीस त्रिमली असें ह्या प्राताचे नांव देतो. सभासद त्रिवादी असे नाव देतो. पण त्रिवादी हा एक मोठा किल्ला त्रिनोमाली प्रांतात होता. काहीं बखरींत व जेध्यांच्या शकावलीत या किल्ल्याचें नाव त्रिपाटी असें दिलें आहे.

२ ह्या किल्ल्याचीं वेल्लूर व येल्लूर अशीं नांवें इतरत्र दिलेलीं आढळतात.

मे महिन्यांत वेढा घातला हा किल्ला मोठा बळकट असून त्याच्या सभोवतीं खंदक होता त्याची रुंदी फार मोठी होती, इतकी कीं त्यांत मोठमोठ्या सुसरी असत. त्या किल्ल्याचा तट इतका रुंद होता कीं, त्याच्या फाजीवरून दोन गाड्या एकदम जात ह्या किल्ल्याच्या वेढ्याचे काम नरहरि बल्लाळ याने मोठ्या नेटाने व हुशारीने चालविलें त्या किल्ल्याच्या दोन बाजूस दोन टेकड्या होत्या त्यास त्याने साजरा व गोजरा अशी नावे देऊन त्यावर मोर्चे चढविले, व तोफा लावून मुख्य किल्ल्यावर जोराचा मारा चालविला ह्या भडिमारापुढे किल्ल्यावरच्या लोकाचा निभाव न लागून त्यानी तो मराठ्याच्या स्वाधीन केला.

ह्याच वेळी आर्नी व त्रिवादी ह्या किल्ल्यास महाराजाच्या लोकानी वेढा घातला हे किल्ले त्याच्या हाती ऑक्टोबर महिन्यात आले त्रिवादी येथे शेर-खान स्वत जाऊन राहिला असून तो किल्ला त्यानें थोडे दिवस लढविला परतु मराठ्याच्या मारापुढे निभाव न लागून तो आपल्या लोकानिशी रात्रीच्या वेळी किल्ल्यातून निसटून पळू लागला तेव्हा मराठ्यानी त्याचा पाठलाग करून त्याच्या लोकाचा सप्पा उडविला, आणि शेवटी हा खान शभर घोडेस्वारानिशी जेमतेम त्याच्या हातून सुटून भवनगिरी येथे जाऊन राहिला इतके झाले तरी सदरील किल्ला महाराजाच्या हाती लागलाच आला नाही ह्या खानाच्या सास-ऱ्याने आपल्या बाकीच्या लोकानिशी हा किल्ला आणखी कांहीं दिवस लढविला हे वेढ्याचे काम आपल्या दोघा मुसलमान सरदारास सागून महाराज स्वत आपले घोडदळ घेऊन शेरखानास पुरा करण्याकरिता भवनगिरीकडे गेले येथे मद्रासच्या इग्रज व्यापाऱ्यानी त्याच्याकडे आपला नेल्लूर रामण्णा नावाचा वकील पाठवून मद्रासेजवळ असता महाराजानी मागितलेल्या जिनसा पावत्या केल्या असें ह्मणतात त्यानी कावेरीनदीच्या तीरी आरदीनजीक त्रिवादी येथे आपल्या घोडदळाचा तळ देऊन तेथे पावसाळ्यामुळे मुक्काम केला येथे असता मदुरा

२ मुसलमान बखरकार म्हणतात की, ह्या किल्ल्याचा हवालदार अबदुलखान याने महाराजाकडून पन्नास हजार होन लाच घेऊन तो त्याच्या स्वाधीन केला जेध्याच्या शकावलीवरून असे दिसते की, हे वेढ्याचे काम चौदा महिने चालले असून शेवटीं तो रघुनाथपत व आनदराव यानीं सर केला सेट जॉर्ज येथील इग्रज व्यापाऱ्याच्या लेखावरून असें कळते की, अबदुलखानाने किल्ला लढववेल तितके दिवस लढवून शेवटी तो मराठ्याच्या हाती गेल्यावाचून राहत नाही असे पाहून त्याच्याकडून तीस हजार होन लाच घेऊन तो त्याच्या स्वाधीन केला.

प्रांताच्या राजाचा वकील महाराजाकडे आला ह्या राजाकडे त्यांनी आपल्या स्वारीखर्चासाठी एक कोटि रुपयाची मागणी केली होती हा राजा व्यंकोजीचा दोस्त होता त्याच्यापाशी एवढी मागणी करण्याचे कारण असे कीं, त्याची दौलत फार मोठी होती हे त्यास ठाऊक होते त्याच्या वकिलानें महाराजास असें सांगितलें कीं आमच्या धन्याचा काहीं मुलूख म्हैसूरच्या नायकानें व काही मुलूख व्यंकोजी राजे यानी बळकावला आहे हा मुलूख आमच्या धन्यास परत घेऊन द्याल तर ते आपल्या खर्चासाठी सात लाख रुपये देतील इकडे सदरील राजा त्रिचनापल्ली येथे राहत होता तो आपल्या कुटुंबासह मदुरा येथे येऊन बंदोबस्तानें राहिला [१] महाराजानी त्याच्या वकिलाबरोबर रघुनाथ पंतास पाठवून त्याच्याकडून घ्यावयाच्या खंडणीची रकम ठरविली त्याने सात लाख होन द्यावयाचे करून दीड लाख तत्काळ दिले तेव्हा अर्थात् त्याच्या प्रांतास त्यांनी उपद्रव दिला नाहीं सदरील ठिकाणी छावणीस असता महा-राजानी व्यंकोजी राजास असा निरोप पाठविला कीं, 'तुमच्याआमच्याम ये सामोपचाराचे बोलणे करण्याकरिता तुमच्याकडील कारभारी गोविंदभट गोसावी, काकाजीपंत व निळोनाईक यास आमच्याकडे पाठवून द्यावे ' त्यावरून व्यंकोजी-राजानी ह्या गृहस्थास महाराजाकडे रवाना केले त्याजपाशी महाराजानी असें बोलणें केले कीं, 'थोरले महाराज यानी कैलासवास केला त्यास आज तेरा वर्षे झाली महा-राजाची सर्व दौलत रघुनाथपंतानी व्यंकोजीराजाच्या स्वाधीन करून त्यास सत्ताधीश केलें परतु ते पितृधन आहे आमचा त्यात अर्धा वाटा आहे ह्या वाट्याचा उपभोग त्यांनीच आजपर्यंत केला हा आमचा वाटा आम्ही त्याच्याकडे यापूर्वीच मागितला पाहिजे होता परतु आह्मी दूर असल्यामुळे आह्मास आज दिनपावेतों तसें करण्यास सवड मिळाली नाहीं ते महाराजाचे पुत्र आहेत, दौलतीचे मालकच आहेत ते खातील तोपावेतो खा होत आह्मास फावेल त्या वेळीं आपला भाग मागून घेऊं असा विचार करून आह्मीं आज तेरा वर्षें सबुरी केली पुढे काहीं राजकारणाच्या निमित्तानें कुतुबशहाच्या भेटीस आलों, व तेथून कर्नाटकात यावेसे वाटल्यावरून इकडे आलो आहों इकडे कोणकोणते प्रांत आह्मी आतांपर्यंत काबीज केले हें त्यास मशहूर आहेच तर आतां आमचा अर्धा हिस्सा आह्मास बिनतक्रार द्यावा असा त्याचा मनसोबा आहे किंवा कसें ते त्यानीं लवकर कळवावें त्याचा आमचा कलह लोकानीं पाहावा,

---

१ शिवदिग्विजयकार रंगोनाईक व तिमाजीनाईक याचीं नावें आणखी देतो.

मग चौघांनी त्यास सांगावे, व त्यांनी रीतीवर येऊन हिस्सा द्यावा, व त्यांच्या आमच्यांत विनाकारण वितुष्ट व्हावें, हे नीट नाहीं तीर्थरूप कैलासवासी झाल्यामागे ते व आह्मी एका रक्ताचे भाऊ, एकोप्याने वागू, एकमेकाच्या सुखदुःखाचे विभागी होऊ व्यर्थ कलह माजविल्याने कोणाचें कधीहि बरे होणे नाहीं ' असे त्यास सांगून त्यांच्याबरोबर आपले काहीं कारभारी देऊन त्यास महाराजानी व्यंकोजीराजाकडे पाठवून दिले त्यांनी व्यंकोजीराजाकडे जाऊन त्यास महाराजाचा सर्व मनोदय कळविला

व्यंकोजीराजाच्या मसलतगारानी त्याला ह्या वेळी अशी सल्ला दिली होती कीं, ' शिवाजीमहाराज हिस्सा मागत आहेत तो त्यास गुपचूप देऊ नका तुह्मी मर्द आहा त्याच्याशी युद्ध करण्यास सिद्ध व्हा ' महाराजाशी लढाई करण्यास त्याला आणखी मदुरेच्या व म्हैसूरच्या राजानी भर देऊन आपण मदत करितो असे सांगितले होते ह्मणून त्यानी महाराजाच्या सदरील निरोपाचा काहींएक विचार न करिता त्यांच्या कारकुनास मुळाच काहीं जबाब दिला नाहीं तेव्हा ते माघारी महाराजाकडे गेले व्यंकोजीराजानी लढाईचा घाट घालून काहीं तयारीहि केली परंतु ज्या राजानी मदत देण्याचे अभिवचन दिलें होतें, त्यानी आयत्या वेळी नाहीं ह्मटल्यावरून त्याचा निरुपाय झाला त्याला एकट्याला महाराजाशी समरप्रसंग करण्याचे सामर्थ्य नव्हते असें सांगतात कीं, मदुरेच्या नायकाशी रघुनाथपंताने कारस्थान केल्यामुळे त्याने व्यंकोजीराजाचा पक्ष असा ऐन प्रसंगीं सोडला ही अशी व्यंकोजीची निराशा झाल्यावर ते महाराजाच्या भेटीस दोन हजार लोकानिशी आले [१]

महाराजानी व्यंकोजीराजाची मोठ्या प्रेमाने भेट घेऊन त्याची बरदास्त उत्तम प्रकारे ठेविली [२] व्यंकोजीराजाबरोबर शहाजीराजाच्या नाटकशाळांचे

---

१ रायरीच्या बखरीत असे आहे की, महाराजानी व्यंकोजीराजास प्रथमतः असा निरोप पाठविला होता की, 'आमची तुमची भेट आज पुष्कळ वर्षें मुळीच झालेली नाहीं ती व्हावी ह्मणून आह्मी इतके दूर आलो आहों तरी आह्माला भेट देऊन आनंदित करावें ' ह्यावरून व्यंकोजीराजे आपल्या फौजेसह त्यांच्या भेटीस आले. दोघा बंधूंची भेट महादेवाच्या देवळात होऊन त्यानी एका ताटात भोजन केलें.

२ प्रो सरकार ह्मणतात की, व्यंकोजीराजे आपल्या मुलाखतीस येत आहेत असें ऐकून महाराज आपल्या मुक्कामावरून कित्येक मैल त्याना सामोरे गेले.

दुसरे तिघे पुत्र भिवजीराजे, प्रतापजीराजे व रायभानराजे हे महाराजाच्या भेटीस आले होते त्यांचाहि यथोचित आदरमान त्यानी केला. त्यास कोणत्याहि गोष्टीचे उणें पडूं नये, व त्यानी काहीं सागितलें असता कारकूनमंडळीनें तें तत्काळ ऐकावें अशी त्यास ताकीद देऊन ठेविली व्यंकोजीराजे महाराजाचा पाहुणचार घेत पधरावीस दिवस छावणींत राहिले परतु ते आपण होऊन वडिलाच्या दौलतीच्या वाटणीसबधानें एवढ्या अवकाशात काहींएक बोलतना. तेव्हा आपणच त्याच्याशी बोलावे असे मनात आणून महाराजानी त्याला एकाती बोलाविले व पुढीलप्रमाणे बोध केला 'तुह्मी आह्मी प्रत्यक्ष बधु थोरले महाराज निवर्तल्यास आज तेरा वर्षे झाली त्याच्या मागे सर्व दौलतीचा उपभोग तुह्मीच एकट्यानी घेतला वडिलोपार्जित दौलतीचे आह्मी उभयता विभागी तुह्मी आह्मास काहींएक न कळविता आपल्या मनास येईल तशी दौलतीची वहिवाट केली आह्मी विभाग मागतो आहों तो तुह्मी स्वपराक्रमाने सपादिलेल्या दौलतीचा नव्हे तुह्मास ईश्वराने नवीन दौलत सपादावयाचें सामर्थ्य व बुद्धि द्यावी आणि आह्मी ती पाहावी, अशी आमची फार इच्छा आहे परतु वडिलाच्या जोडीची व्यवस्था आमच्या विचाराशिवाय करणे तुह्मास विहित नाहीं काय काय दौलत आहे तिचे कागदपत्र वगैरे असतील ते आह्मास दाखवा तुह्मी आह्मी समजून चालूं तुह्मास जड पडेल तेथे आह्मी तुह्मास अवश्य मदत करू तुह्मी मनात कोणत्याहि प्रकारचा किंतु ठेवूं नये 'असें महाराजानी त्यास अनेक प्रकारीं समजून सागितले त्यास व्यंकोजीराजे नुसते हूं हूं ह्मणाले परंतु त्याच्या ह्मणण्यास त्यानी काहींएक स्पष्ट जबाब दिला नाहीं नंतर पुन पुन प्रसगविशेषी महाराज त्याच्याशी ह्या प्रकरणीं बोलून त्याच्या मनात तरी काय आहे ते समजून घेण्याचा प्रयत्न करीत पण व्यंकोजीराजे पुरे मौन धरून राहिले त्यानी आपल्या मनातला भाव त्यास किंवा दुसऱ्या कोणास यत्किंचित्‌हि कळूं दिला नाहीं जवळचे कारभारी व सरदार यासहि त्या प्रकरणीं त्याची समजूत घालावयास महाराजानी सागितले परतु काहींएक उपयोग झाला नाहीं व्यंकोजीराजानी ह्या कारभाऱ्यापाशीं असे मात्र उद्गार काढिले ह्मणतात कीं, 'महाराजानी काबीज केलेल्या मुलखाचा अर्धा हिस्सा द्यावा ह्मणजे इकडील आमच्या ताब्यातल्या मुलखाचा अर्धा हिस्सा आह्मी देण्यास कबूल होतो' ह्या त्याच्या ह्मणण्यास महाराजाचा जबाब अर्थात् असा होता कीं, 'आमच्या ताब्यातला मुलूख बहुतेक आह्मीं नवा संपादिला आहे. परंतु तुमच्या हातीं

असलेला सगळा मुलूख आमच्या तीर्थरूपाच्या कमाईचा आहे त्यात तुह्मी काहीं-एक भर घातलेली नाहीं. तेव्हां वडिलाच्या ह्या दौलतीचा अर्धा हिस्सा आम्हास हिंदुशास्त्राप्रमाणे मिळणे रास्त आहे [1]

ह्याप्रमाणे पंधरावीस दिवसपर्यंत व्यंकोजीराजाचे मन वळविण्याचा प्रयत्न महाराजानी केला, परतु तो सगळा व्यर्थ गेला हा त्याचा असा हटाग्रह पाहून महाराजास राग आला, आणि त्यास कैद करून दौलतीचा अर्धा हिस्सा बळजबरीने घ्यावा असें एक वेळ त्याच्या मनात आले परंतु त्यानी पुन असा पोक्त विचार केला कीं, ‘ हे आपले धाकटे बधु आहेत त्याशीं असें कठोरपणाचे वर्तन करणे उचित नव्हे असें करणें आपल्या इभ्रतीस शोभणार नाहीं सामोपचारानेच हे वठणीस येतात किंवा कसें ते पाहावे ’ व्यंकोजीराजे आपल्या ह्मणण्याप्रमाणे वागण्यास कबूल नाहीत असें पाहून त्यानी त्यास आपल्या गोटातून जाण्यास निरोप दिला, व त्यास तंजावरापर्यंत[2] पोचविण्यास हंबीरराव मोहिते, रुपाजी भोसले, मानसिंग मोरे व आप्पाजी रगनाथ केळकर यास बरोबर दिले[3] तजावरास सुखरूप पोचल्यावर व्यंकोजीराजानी बरोबर आलेल्या लोकाची वस्त्र-

---

[1] मद्रास व सेट जॉर्ज येथील इग्रज व्यापाऱ्याचे ह्या प्रकरणी जे लेख आहेत त्यावरून असे दिसते की, महाराजानी शहाजीराजाच्या तीन चतुर्थांश दौलतीला हक्क मागतला व व्यंकोजीला त्या दौलतीचा एकच चतुर्थांश घेऊन स्वस्थ राहावयास मागितले

[2] चदावर व चजावर अशी नावे इतरत्र आढळतात

[3] प्रो सरकार ह्मणतात की, व्यंकोजीराजे महाराजाची मागणी मान्य करिनात तेव्हा त्यानी त्याचा कठोर शब्दानी निषेध केला, ह्मणून ते रात्री पाच घोडेस्वारासह तजावरास पळून गेले ही अशी मसलत त्याना त्याच्या कारभाऱ्यानी दिली ह्मणून महाराजानी त्यास काहीं दिवस कैदेत ठेवून मग त्याला शेलापागोटे देऊन तजावरास रवाना केले सभासद ह्मणतो की,व्यंकोजीराजे महाराजाच्या गोटातून भिऊन पळून गेले. त्यावरून महाराजानी दिलगिरी प्रदर्शित करून ह्मटले की, आह्मी काही त्याना अटकेंत ठेवणार नव्हतो आमचा लौकिक दिगंतां पसरला आहे आमच्या वडिलाच्या दौलतीचा हिस्सा राखावा ह्मणून आह्मी त्याच्याकडे तो मागत होतों. तो त्याना द्यावयाचा नाहीं तर त्याच्यावर आह्मी जुलूम करीत नाही त्यानी असें पळून जावयाचें नव्हतें ते अजून लहान आहेत त्यानीं हे मुलासारखें वर्तन केले आहे. मग त्याच्याबरोबर आलेल्या कारकुनास वगैरे वस्त्रालंकार देऊन गौरविले व आपल्या धन्याकडे जावयास निरोप दिला.जेध्याच्या शकावलींत व शेडगावकराच्या बखरींतहि व्यंकोजी पळून गेल्याचाच उल्लेख आहे.

भूषणें देऊन संभावना केली, व त्यास परत रवाना केलें ह्यानंतर पुन एक वेळ महाराजांनी त्यास आपल्या कारकुनाकडे असा निरोप पाठविला कीं, तंजावर-प्राताचा अर्धा भाग, व दुमरे किल्ले आह्मास आमचा अर्धा भाग ह्मणून द्यावे एवढ्यानेच आमचें समाधान होईल तुह्मी आह्मी परस्पराशी सलोख्यानें राहावे हे उत्तम. गृहकलह वाढविण्यात उभयताचेहि नुकसान आहे असें केल्याने व्यर्थ कष्ट मात्र भोगावे लागतील पूर्वी कोरवपाडव यास कसे क्लेश सोसावे लागले ते ध्यानी आणा, व व्यर्थ कलह वाढवू नका आजपर्यंत आमचा वाटा तुह्मी खाल्ला तो खाल्ला यापुढे तरी त्याचा अभिलाष धरू नका वाटा काहीं सुटणार नाहीं तुह्मास तो द्यावा लागेल तुह्मी विचाराने वागून ह्या गोष्टीस कबूल व्हाल तर कमीजास्तीचा विचार अवश्य होईल' व्यंकोजीराजाच्या पदरच्या काहीं यवनानी त्यास अशी मसलत दिली कीं, 'शिवाजीराजे वडील बधु खरे परंतु त्यानी तुमचे धनी जे अदिलशहा त्याच्याशी बंड केले आहे त्यानी सरकारचा पुष्कळ मुलूख काबीज केला आहे ह्या त्याच्या बंडखोरपणामुळें तुमच्या वडिलास पुष्कळ दु ख सोसावे लागले होतें. एकदा तर त्याच्या जिवावरचा प्रसग आला होता तुह्मी नेहमी आपल्या वडिलाच्याच तत्राने वागत राहिला ह्मणून अदिलशहानें त्याच्या पश्चात् त्याची दौलत तुमच्याकडे राहू दिली, नाहीं तर त्याने ती खालसा केली असती. तेव्हा जी दौलत अदिलशहाच्या निवळ कृपेने कायम राहिली आहे, तिचा हिस्सा ह्या बंडखोरास तुह्मीं काय ह्मणून द्यावा ? दुसरे असे कीं, ही केवळ चाकरीबद्दल मिळालेली दौलत आहे तुह्मी अदिलशहाची ताबेदारी करिता ह्मणून तुह्मास ही मिळाली आहे तीत ह्या बंडखोराचा सबंध काय ?'' ह्या मसलतीप्रमाणें त्यानी निरोप घेऊन येणारास जबाब दिला आणि असें सागितले कीं, 'वडिलांच्या वेळचे हत्तीघोडे, जवाहीर वगैरे जें काहीं असेल त्याचा वाटा मागणें असल्यास रघुनाथपंत कागदोपत्रीं काहीं याद्या असतील त्या समजावितील, व जेवढा ऐवज आमच्या अगी लावितील तेवढ्याचा हिस्सा द्यावयास आह्मी राजी आहों. रघुनाथपंत वडील आहेत ते उचित दिसेल ते करितील वडिलास वांकडा जबाब द्यावयाचा नव्हता ह्मणून इतके दिवस आम्ही काहींएक बोललों नाहीं.' ह्याप्रमाणे निक्षून जबाब देऊन व्यंकोजीराजानी आलेल्या कारकुनास वस्त्राभरणें देऊन रवाना केलें.

असें सांगतात कीं, ह्या समयी व्यंकोजीराजानी अदिलशहास पत्र पाठवून कळविलें की, ‘ वडील बंधु दौलतीचा वाटा मागत आहेत. ही दौलत चाकरीची आहे आम्हीं तिचा वाटा त्यास द्यावा कीं काय ते कळवावे ’ त्यावर बादशहाचा असा जबाब आला कीं, ‘ शहाजीराजानीं ह्या सरकाराची नेकीनें चाकरी केली, ह्मणून इकडून त्यास जाहगिरीबद्दल वंशपरपरेची सनद मिळाली हा मुद्दा ध्यानात आणून शिवाजीराजे हिस्सा मागत आहेत ते हरामखोर झाले तरी त्यास विचारणार आम्ही खबरदार आहो तुह्मी गृहकलह करून सरकारात दुशमनी आणिता याचे कारण काय ? वाटा न द्यावा असे आम्हीं तुह्माला लिहून कळविलें असता ते आमच्या अमलास खलेल करितील, व विनाकारण त्याची आमची चुरस वाढेल ह्यासाठी ते चाकरीच्या दौलतीचा हक्क मागत असतील तर तो त्यास अवश्य द्यावा ते हल्ली आमच्याशी शत्रुत्वान वागत आहेत ते जर अशी चाकरीची दौलत विभागून घेऊन आमची चाकरी करण्यास तयार होत असतील तर ते ठीकच आहे अशानें त्याचे आमचे मित्रत्व तरी होईल ते वडील असल्यामुळें दौलतीचे मालकच आहेत ’ हा असा अदिलशहाकडचा जबाब आला तरी देखील व्यंकोजीच्या पदरच्या मुसलमानानीं त्याचे असे कान फुकिले कीं, ‘शिवाजीराजे दंडेलखोर आहेत हजरत त्यास भीत आहेत तुह्मी दौलतीचे मुखत्यार खावद आहा तुह्मी त्याच्याशी लढाई करावयास माघार घेऊं नये हारजीत पाहावी आह्मी जीवत आहों तोपर्यंत तुह्मास वाटा देऊं देणार नाहीं तुह्मास डर तो कसला ? शिवाजीराजेच काय आईचें दूध प्याले आहेत ?’

सदरी निर्दिष्ट केल्याप्रमाणें व्यंकोजीराजाचा जबाब आल्यामुळें, व ते यवनसरदाराच्या मसलतीनें आपणाशी विरोध करावयास तयार झाले आहेत हे कळल्यामुळें महाराजास फारच सताप आला, आणि त्यानी व्यंकोजीराजाच्या ताब्यातील मुलखावर स्वारी करण्याचा बेत मनात आणिला परतु त्यांनी पुन असा विचार केला कीं, त्याच्यावर स्वारी करून त्यास जेर करण्यात पुरुषार्थ तो कोणता ? ते कसे झाले तरी आपले बंधु आहेत वडिलाच्या दौलतींत असा धुमाकूळ उडवून देण्यापेक्षा दुसरे प्रात काबीज करण्यास काय कमी आहेत ? ते सर करून त्यांवर आपली सत्ता बसविल्यानें तेवढा यवनी अमल तरी कमी केलासें होईल असें मनात आणून त्यानी व्यंकोजीराजावर स्वारी करण्याचा बेत रहित केला

व्यंकोजीराजे भेटून गेल्यावर महाराज त्रिवादीहून वेलुरास आले. तेथें आपलें ठाणें बसवून, त्याच्या आसपास असलेले महाराजगड, जगदेवगड, कर्नाटकगड वगैरे आणखी किल्ले त्यानी काबीज केले नंतर तिकडील घाट चढून ते शहाजीराजास पूर्वी अदिलशहाकडून मिळलेल्या जाहगीरच्या प्रातात आले. तिकडील कोल्हार, बालापूर, बेगरूळ, शिरटे, वासकोट वगैरे तालुके जे पूर्वी शहाजीराजास जहागिरीदाखल मिळाले होते ते सारे त्यानी हस्तगत केले ह्याशिवाय आणखी तिकडील बरेच कोट व किल्ले काबीज करून काहीं चागल्या टेकड्यावर त्यानी आणखी नवे किल्ले बाधिले, जिकडेतिकडे आपली ठाणीं घातलीं, व तिकडील एकंदर पाळेगाराचा फडशा उडवून चोहोकडे स्वस्थता केली[1] ज्यानी सालाबाद खंडणी देण्याचा करार केला त्यास मात्र त्यानीं त्रास दिला नाहीं आरणीचा कोट शहाजीराजानी वेदोभास्करनामक एका ब्राह्मणाच्या हवाली केला होता तो अद्यापि त्याच्या मुलाच्याच हातीं होता ह्या त्याच्या मुलानी शिवाजीमहाराजाला शरण येऊन किल्ल्याच्या चाव्या त्याच्या स्वाधीन केल्या ही त्याची नम्रता पाहून महाराज फार खुष झाले, व तो कोट आणि त्याच्या आसपासचा तीन लक्ष होन उत्पन्नाचा मुलूख त्यानी त्याच्याकडे लावून देऊन त्यास आपले अकित केले ह्या प्राताचा बदोबस्त नीट राहावा ह्मणून मानसिग मोरे व रगनाथ केळकर यास काहीं फौजेनिशी तिकडे ठेवून दिले नतर महाराज श्रीरगपट्टण वगैरे प्रातातून खंडण्या घेत घेत गदगलक्ष्मेश्वर येथें आले तेथील दोन कोट त्यानी काबीज केले त्या प्राताचा अधिकारी खानगाड देसाई हा भिऊन पळून गेला त्यामुळे तो प्रात सहज त्याच्या हाती आला.

ह्या प्रांतात वृद्धचालम नावाचें एक प्राचीन शिवदेवालय होते ह्या देवस्थानाच्या दर्शनास महाराज काहीं लोकानिशी गेले असता तेथें तेबेनापटम येथील डच व्यापाऱ्याच्या एका प्रतिनिधीनें महाराजाची मुलाखत घेतली. त्यानें रेशमी वस्त्रे, चंदन, लवंगा, मालदिवी नारळ, तरवारीची पानें वगैरे वस्तूचा नजराणा महाराजास दिला तेथून कूच करून महाराज वनिअमवाडी येथें मुक्कामास असतां त्यांनी मद्रास येथील इंग्रज व्यापाऱ्याच्या अध्यक्षास ता २२

---

१ प्रो. सरकार इंग्रज व्यापाऱ्याच्या लेखांच्या आधाराने ह्मणतात कीं, महाराजानी व्यंकोजी राजांच्या तंजावर प्रातात स्वारी करण्याचा बेत रहित केला तरी कोलेरून नदाच्या उत्तरभागातील शहाजी राजांच्या जहागिरीचा सगळा प्रात व किल्ले आणि शेरखानाच्या ताब्यातला सगळा मुलूख काबीज केला.

सपटेंबर रोजी येणेंप्रमाणें पत्र लिहिलें, "कर्नाटकातल्या कित्येक किल्ल्यांत मला कांहीं इमारती बाधावयाच्या आहेत तरी तोफासाठी मोठे गाडे व सुरुगाचें काम ज्याना करिता येते असे लोक तुमच्याजवळ असल्यास ते आमच्याकडे पाठवून द्यावे मुरुंग लावून दगडी कोट उडवून देण्याचे कसब ज्याना अवगत आहे अशा लोकाची तर आह्मास फारच गरज आहे असले वीसपचवीस किंवा निदान दहापाच तरी मनुष्य आमच्याकडे पाठवावे आह्मी त्यास चागलें वेतन देऊं व आमच्या किल्ल्यावर ठेवून देऊ " या पत्राला मदरील इग्रज व्यापाऱ्याने असा जबाब पाठविला कीं, "आम्हाला कोणत्याहि पक्षाला मिळून राहता कामा नये, ह्मणून आपली मागणी मान्य करिता येत नाहीं " येथून पुढे कूच करून महाराजानी पोर्तोनोवो शहर लुटून आर्काटचा दक्षिणेकडला सगळा प्रात व उत्तरेकडलाहि काहीं प्रात हस्तगत केला आक्टोबरच्या तिसऱ्या तारखेला महाराज मद्रासेपासून दोन दिवसाच्या वाटेवर गेले होते असें ह्मणतात

ह्याप्रमाणें महाराज कर्नाटकातील विजापूरकराच्या अमलात सारखा धुमाकूळ उडवून देत व खंडण्या बसवीत चालले असता, दिल्लीस त्याचा वकील होता, त्याजकडून व हेराकडून अशी पत्रे आली कीं, औरंगजेबबादशहा मोठ्या फौजेनिशी दक्षिणेत जातीनें स्वारी करण्याच्या विचारात आहे, व ह्यासाठी त्याच्या फौजेची दिल्लीस तयारीहि चालली आहे ही बातमी कळताच महाराज कर्नाटकातून स्वदेशी जावयास मोठ्या लगबगीन निघाले त्यानी चदीचा किल्ला व त्याच्या आसपासचा मुलूख सताजीराजाच्या ताब्यात पूर्वी दिला होता, त्याची व इतर नवीन काबीज केलेल्या मुलखाची व्यवस्था व बदोबस्त नीट राहावा ह्मणून सताजीच्या मदतीस रघुनाथपंत व हंबीरराव सेनापति यास काहीं फौजेनिशीं मागे ठेविले, व म्हैसूरच्या डोंगरी प्रदेशाच्या रक्षणास रगोनारायण यास काहीं लोकानिशी ठेविलें ह्याप्रमाणे तिकडचा बदोबस्त लावून महाराज बाकीच्या फौजेसह स्वदेशीं यावयास निघाले ह्या मोहिमेत रामेश्वरापर्यंतचा सर्व मुलूख काबीज करण्याचा त्याचा बेत होता. पण वर सागितलेल्या बातमीपत्रामुळें त्यास स्वदेशीं येणें प्राप्त होऊन हा सकल्प असिद्ध राहिला.

---

१ स्वदेशीं निघून येताना त्यानीं आपल्या मागें ठेवलेल्या सरदारास असे सागितले होतें कीं, त्यानीं पालिआकोट, मद्रास व मद्रास येथील डच व इग्रज लोकाच्या ठाण्यावर छापे घालून तीं हस्तगत करावी. फ्रेंचलोक ह्या वेळी पादेचेरी येथे होते, त्यास मात्र उपद्रव देऊं नये, असें त्यानीं त्यास फर्माविलें होतें.

ह्या मोहिमेत महाराजानी वीसबावीस लाख होन उत्पन्नाचा मुलूख व शंभर किल्ले काबीज केले असें ह्मणतात त्या वेळच्या मद्रास येथील इंग्रज व्यापाऱ्याचा असा लेख आहे कीं, ' शिवाजीमहाराजानी ह्या वेळी जिजी व वेलोर ह्या दोन बळकट किल्ल्याच्या आसपासचा बावीस लाख होन उत्पन्नाचा मुलूख काबीज केला, व त्याच्या बंदोबस्तासाठी पुष्कळ पायदळ व घोडदळ ठेवून दिलें. त्यानीं १४ मोठे किल्ले व ७२ मोठ्या मजबूत टेकड्या काबीज केल्या कर्नाटकातील बहुतेक सधन लोकाकडून अपार द्रव्य काढले ज्या ज्या प्रातातून ते जात तेथे कोणते लोक सधन आहेत याची त्याना चागली बारीक माहिती असे इकडच्या सर्व श्रीमत लोकाना पत्रे पाठवून त्याच्याकडून स्वारीखर्चासाठी ह्मणून कर्जाऊ रकमाची मागणी ते करीत किनाऱ्यावरील प्रातातून त्यानी असे दोन लाख होन काढले खुद्द मद्रासेहून व पालिकत येथून त्यानी पन्नासपन्नास हजार होन काढले स्पेनदेशात सीझर याने स्वारी केली तशी त्यानी ह्या मुलखात स्वारी करून फारशा लढाया वगैरे न करिता मुलूख काबीज केला. त्यानी ह्या प्रातातून सोने, हिरे, रत्नें, पाच वगैरेच्या रूपाने किती द्रव्य नेलें याची गणती नाहीं ह्या प्रकारे त्यानी आपल्यापुढील स्वराज्यविस्ताराच्या कार्यास लागणारे द्रव्यसामर्थ्य उत्तम सपादिलें '

आता उत्तरेस वास्तविक प्रकार असा घडला होता कीं, खानजहानबहादूर याजशी महाराजानी तह केला होता तो औरगजेबास पसत झाला नाही, व त्या सुभेदाराविषयी त्याच्या मनात पुरा वहीम उत्पन्न झाला दिलेरखानाने बादशहास असें सुचविले की, विजापूरसरकाराचा मुख्य कारभारी अबदुलकरीमखान यास आपल्या पक्षाकडे घेऊन त्या सरकारच्या फौजेच्या मदतीने कुतुबशहाच्या राजधानीवर स्वारी करावी, ह्मणजे शिवाजीमहाराज दक्षिणेंतून परत येण्यापूर्वी कुतुबशाही खालसा करिता येईल ही त्याची सूचना बादशहास पसंत पडून त्याप्रमाणें करण्याचा हुकूम त्याने त्यास दिला, व खानजहानबहादूर यास परत बोलाविले

दिलेरखानाचे व अबदुलकरीमखानाचे हे असे सगनमत होण्याचे कारण अर्थात् असें होतें कीं, शिवाजीमहाराजाचा व कुतुबशहाचा मागे सांगितल्याप्रमाणे स्नेहभाव दृढ झाला याचें मोगलास व विजापूरकरांस फारच वैषम्य वाटलें होतें. मोगल व विजापूरकर एक होऊन त्याची संयुक्त सेना आपल्या राज्यावर येणार आहे असें मादण्णापतास कळताच त्यानेंहि आपल्या सैन्याची

कडेकोट तयारी केली पुढे ह्या पक्षाचे तुबल युद्ध होऊन मादण्णाने शत्रुसैन्याचा पुरा मोड करून त्यास मागे हटविले ह्या वेळी विजापूरकराच्या फौजेची तर अगदी वाताहत होऊन गेली त्याच्या लष्करास अन्नाचा पुरवठा न होऊन लोक पटापट मरूं लागले शिपायास मुशाहिरा न मिळाल्यामुळे त्याच्यात फिसाद होऊन ते चाकरी सोडून मन मानेल तिकडे निघून गेले अमलदारास व बड्या बड्या सरदारासहि कोणी जुमानीना दुसरे असें झाले कीं, अबदुलकरीमखान ह्या धामधुमीच्या ऐन प्रसगी आजारी पडून लवकरच मरण पावला त्यामुळे तर कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नाहीं अशी अवस्था होऊन गेली तेव्हा दिलेरखानाने विजापूरदरबारची पुन सुव्यवस्था लावून लष्कराची नाराजी नाहींशी करण्याचे मनात आणिले मग त्याने त्या दरबारच्या अमीरउमरावात माजलेली दुफळी मोडून टाकून मसाउदखान ह्या नावाचा एक मोठा धनाढ्य जाहगीरदार होता, त्यास इतराच्या समतीने अदिलशाहीचा कुलकारभारी नेमले हा मसाउदखान शिद्दीजोहाराचा जावई असून मोठा श्रीमान् होता याने दिलेरखानाशी असा करार केला कीं, 'आपण अदिलशाही राज्यात उत्तम बंदोबस्त राखून जिकडेतिकडे शातता होईल असें करू तुम्हास झालेले कर्ज वारू, शिवाजीराजाशी कोणत्याहि प्रकारचा सबध ठेवणार नाही, व बेदिल झालेल्या लष्कराचा मुशाहिरा वगैरे देऊन ते कायम राहील असें करू' ह्यातील शेवटली अट मात्र त्याने बरोबर पाळली नाहीं त्याने आपल्या लष्करातील पुष्कळ घोडेस्वारास रजा दिली त्यामुळे हे शिलेदार देशात चोहोकडे हिंडून प्रजेस त्रास देऊ लागले मोरोपत पिंगळ्याने अशा बेकार झालेल्या पुष्कळ स्वारास आपल्या लष्करात नोकरीस ठेविले

हे सगळे वर्तमान महाराजास वेळोवेळा कळतच होते विजापूरकर व मोगल एक होऊन कुतुबशहावर तर चालून गेलेच होते त्याप्रमाणेच ते आपल्या राज्यावरहि हल्ला करितील अशी भीति वाटून ते मोठ्या लगबगीने स्वदेशी यावयास निघाले ते मद्रास प्रात सोडून म्हैसूर प्रातात स. १६७७ च्या दिसेंबर महिन्यात आले. या प्राताचा पूर्व व मध्य भाग त्यानी काबीज केला. तेथून पुढें कूच करून ते कोपल प्रातात आले, आणि तेथल्या किल्ल्यास त्यांनी वेढा देऊन तो पधरा दिवसांत सर केला, आणि त्या किल्ल्याच्या आसपासचा सगळा प्रात व लक्ष्मेश्वराचा कोट हीं काबीज करून तेथील पुंडपाळेगारास अंकित करून ठेविलें. ह्याप्रमाणेच गदग, मालगुड वगैरे ठाणीं त्यांच्या हातीं

आलीं. तेथें आपली सत्ता कायमची बसविण्यासाठी त्यानी जनार्दनपत सुमंत यास थोड्या फौजेनिशीं मागे ठेवून दिलें येथून पुढें महाराज मजलदरमजल करीत मोठ्या वेगाने चालले असता विजापूरकराचे दोन सरदार हुसेनखान माइणा व लोदीखान हे दहा हजार स्वारानिशी त्याजवर चालून आले. त्या सरदाराशी युद्ध करून त्याचा त्यानी मोड केला तसेंच बावलीखान पठाण ह्या नावाचा आणखी एक सरदार महाराजानी काबीज केलेल्या कोल्हापूर, नाग्ळे वगैरे प्रातात उत्पात करीत आहे असें कळताच त्याच्यावर निळोजी काटकर[1] यास महाराजानी पाठविले त्याने त्या पठाणास तुरुबानजीक गाठून त्याचा पराभव करून त्याची फौज उधळून लाविली. ह्या लढाईत ज्यानी ज्यानी पराक्रम केला त्यास नावाजून महाराजानी इनामे दिली, व निळोजी काटकरास भरजरी वस्त्र, सुवर्णपदक, मोत्याचा तुरा, कडी, एक हत्ती व दोन घोडे अशी बक्षीस दिली येथून पुढे उत्तरेस सपगावाकडे महाराज कूच करीत असता, बेलवाडीच्या किल्ल्याची मालकीण सावित्रीबाइ[2] देसाईण ह्मणून एक विधवा स्त्री होती, तिने महाराजाच्या सैन्याच्या कहिकवाडास उपसर्ग दिला त्यावरून तिच्या किल्ल्यास त्याच्या काहीं लोकानी वेढा दिला सावित्रीबाईने न डगमगता किल्ला सत्तावीस दिवस लढविला शेवटी तिची अन्नसामुग्री व दारू गोळा ही सरली तेव्हा तिने आपल्या लोकानिशी वेढा घातलेल्या लोकावर तुटून पडून त्याचा बरीच खराबी केली ती त्याच्याशी सगळा दिवस मोठ्या आवेशाने लढली परतु अखेरीस पराभव पावून ती त्याच्या हातीं लागली तिला त्यानी महाराजापाशी आणिले तिने त्याचे मोठे नुकसान करून आणखी सत्तावीस दिवसपर्यन त्याना दाद न दिल्यामुळे त्याची बरीच फजिती झाली, तरी स्त्रीजातीस शिक्षा करू नये असा त्याचा नियम असल्या कारणाने त्यानी तिला वस्त्रेभूषणे देऊन गारविले आणि दोन गाव इनाम करून देऊन सोडून दिलें[3]

---

१ याच उपनाव कोठे व काटे असे इतरत्र आढळते

२ हिचे नाव कोणी मल्वाई व कोणी लालबा असे देतात

३ तारीख-इ-शिवाजी ह्या यवनी बखरीत असे ह्मटले आहे का, महाराजाच्या सखुजी गायकवाड नामक सरदारान तिला पकडून वाईट रीतीने वागविल्यावरून त्याचे दोन्ही डोळे काढून त्याला मानवली गावी कैदेत ठेविले सावित्रीबाईशीं झालेल्या ह्या युद्धप्रसगासबधाचा इग्रज व्यापाऱ्याचा १६७८ सालच्या फेब्रुवारी महिन्यातला लेख येणे प्रमाणे आहे. "त्यांनीं सध्या एका किल्ल्यास वेढा घातला आहे त्याची ह्या किल्ल्यापाशी जशी फजिती उडाली तशी मोगलाशीं व विजापूरकराशीं एवढ्या

महाराज तोरगलास मुक्काम करून राहिले असता त्याला रघुनाथपताकडून एक पत्र आलें. त्यात व्यंकोजीराजानी महाराजाच्या पश्चात् गडबड केल्याची हकीगत होती ती ऐकून महाराजास ह्याच मुक्कामास तळ देऊन राहावें लागलें आता व्यंकोजीराजानी काय गडबड केली ते सागृं. महाराज कर्नाटकातून स्वदेशी यावयास निघाले असें व्यकोजीराजास कळताच ते तिकडील काहीं मुसलमान सरदाराशी मिलाफ करून त्याच्या साहाय्यानें संताजी भोसले, रघुनाथपंत व हबीरराव सरनोबत याजवर फौजेनिशी चालून आले महाराजाच्या छावणीतून पळून आल्यावर त्यानी मदुरेच्या व ह्मसूरच्या नायकाशीं सगनमत करण्याचा प्रयत्न केला पण मदुरेचा नायक त्यास सामील झाला नाहीं व्यकोजींनी ह्या वेळी विजापूरसरकाराचीहि मदत मागितली पण ती त्याना मिळाली नाही तिकडील काहीं पाळेगार व मुसलमान जहागीरदार यानीं मात्र त्यास ह्या वेळी साहाय्य केलें व्यकोजीराजानी ह्या वेळी स्वताचे दहा हजार पायदळ व चार हजार घोडदळ सिद्ध केले असून आणखी मुसलमान सरदार व पाळेगार याचेहि बरेच लोक त्याच्या साहाय्यास आले व्यकोजीराजे मोठी फौज घेऊन आपणावर हल्ला करावयास येत आहेत असें पाहून रघुनाथपंत, सताजी भोसले व हंबीरराव यानी आपली सेना त्याच्याशी सामना करण्यासाठी तयार करून त्यास बाळगोडापुरानजीक गाठलें रघुनाथपताने त्याच्याशी एकदम सामना न करिता त्याला दोन समजुतीच्या गोष्टी सागून पाहिल्या परंतु ते काही केल्या आपला हेका सोडीनात, व त्याच्या पक्षाकडचे मुसलमान सरदार तर अगदी उतावीळ होऊन हातघाईवर आले तेव्हा अर्थात निरुपायास्तव त्याना त्याच्याशी युद्ध करणें प्राप्त झालें त्या युद्धात व्यकोजीराजाच्या पक्षाचा पुरा मोड झाला ह्या वेळी शहाजीराजाच्या नाटकशाळेचे पुत्र प्रतापजी व

---

लढाया झाल्या त्यात कधी झाली नव्हती ज्यानी एवढी राज्य जिकिली त्याना ह्या देसाईणबाईला इतके दिवस जेर करिता आले नाही ”

१ रायरीच्या बखरीत असे आहे की, व्यकोजीराजे स्वत फौज घेऊन आले नाहीत, तर त्यांनीं आपला दिवाण जगन्नाथपत व इतर सरदार यास रघुनाथपत व सरनोबत याजवर पाठविले

२ उल्किज ह्मणतो की, ह्या लढाईत पहिल्याने संताजी भोसल्याचा मोड झाला व त्याच्या सैन्यानें माघार घेतली तेव्हा त्यास अतिशयित वाईट वाटलें. समरभूमीवरून मागें हटलेल्या सर्व लोकांस रात्रीच्या वेळीं जमा करून त्यानें असें ठरविलें की, अशा रीतीनें पराभव पावून मागें पळून जावें त्यापेक्षा पुन एक वेळ शत्रूवर अकस्मात्

भिवजी हे पाडाव झाले. व्यंकोजीराजे शेदोनशे लोकासह पळत सुटले तेहि महाराजाच्या लोकाच्या हाती सहज लागले असते परतु त्यास धरून पाडाव केले असता आपल्या धन्याचा उपमर्द केला असें होऊन आणखी शिवाजीमहाराजासहि कदाचित् वाईट वाटेल असें मनात येऊन रघुनाथपंताने त्यास जाऊं दिले. ह्या लढाईत व्यंकोजीराजाचे एक हजार घोडे व तीन सरदार त्याच्या हाती लागले, असें ह्मणतात

हे वर्तमान महाराजास कळले तेव्हा त्यानी रघुनाथपतास लिहिले कीं, 'ते आमचे धाकटे भाऊ आहेत त्यानी पोरबुद्धि केली तरी ते बधुच आहेत त्याचें रक्षण करणें उचित होय त्याचे राज्य बुडवू नये' त्याप्रमाणेच व्यकोजीराजासहि त्यानी एक पत्र लिहिलें,त्यातील आशय येणेप्रमाणें होता, 'तुह्मी तुरकाच्या नादी लागून आमच्या लोकाशी युद्ध केले असें कळलें त्यात तुमची खराबी होऊन प्रतापजीराजे व भिवजीराजे यास आमच्या लोकानी पकडून कैद केले, व तुमचे पुष्कळ सरदार जखमी झाले, हे ऐकून आमच्या मनास फार वाईट वाटलें. तुह्मी आह्मी भाऊ, तुमचे नुकसान ते आमचें, व तुमचा लौकिक तो आमचा असे आह्मी समजतो तुह्मी असा अविचार करून आपली अपकीर्ति दिगती पसरली, हे काहीं नीट केलें नाहीं हे तुह्मी केले ते आपल्या बुद्धीने केले नाहीं ज्या लोकाच्या मसलतीने ही गोष्ट करण्यास तुह्मी प्रवृत्त झाला त्यास ईश्वरसत्तेने शिक्षा तर झालीच आहे तुमच्या मनात आमच्याविषयी भलताच भाव उत्पन्न झाल्यामुळें ही गोष्ट तुमच्या हातून घडली आहे यवनाची मसलत न ऐकता तुम्हीं आमच्यावर सर्व भार टाकला असता तर त्यात तुमचें हितच झाले असते. आता तुमची अपकीर्ति होऊन भाग देणे प्राप्त होणार आहे वडिलानी मिळविलेली दौलत चाकरीची आहे तेव्हा तिचा वाटा आह्माला कसा द्यावा असे तुमच्या मनात आलें, हे बरोबर नाहीं तुम्हीं आह्माला तिचा वाटा दिल्यावर

---

घाला घालून मारावे किंवा मरावे हे चागले अशाने आपली अपकीर्ति टळून स्वामिकार्यीं प्राण दिल्याचे श्रेय आपणास प्राप्त होईल हें त्याचे मोठ्या हुरुपाचे बोलणे सर्वास पसत होऊन त्याच्या बेतास त्यानीं रुकार दिला, आणि दिवसभर लढून ते थकले असताहि शत्रूवर पुन हल्ला करण्यास तयार झाले मग त्यानी थोडीशी विश्राति घेऊन व्यकोजीराजाच्या सैन्यावर अकस्मात् घाला घातला हे त्याचे सैन्य ह्या वेळीं विजयानदभरात स्वस्थ विश्राति घेत पडलें होते. यास्तव महाराजाच्या लोकाचा हा असा अवचित घाला आल्यामुळे त्याची अगदी गाळण झाली, व संताजीच्या लोकांनीं त्याचा पार सप्पा उडवून दिला

मग विजापूरसरकार आहे आणि आम्ही आहो. तें तुह्मास विचारणार नाहीं. असे असता तुम्ही पोरपणा करीत आहा यानतर तरी वडिलानी लावून दिलेल्या चालीप्रमाणे वागा. सन्मार्ग सोडूं नका अनीति सोडा विचाराने चाला. दुष्टदुर्मदाचा सहार करून प्रजाजन सुखी करा तुम्ही थोरले महाराजाचे पुत्र असून मोठे कुलीन आहा. असे असता धर्माधर्माचा विचार तुमच्या मनात काहींच येत नाहीं परतु अशाने तुह्मी कष्टी व्हाल. आजपर्यंत सर्व दौलतीचा तुह्मी एकट्यानीच उपभोग घेतला आता तरी आमचा अर्धा वाटा आह्मास द्या आमचा भाग आह्मास देऊन तुह्मी सुखाने राहा तुळजापूरच्या भावानीची आह्मावर पूर्ण कृपा असल्यामुळे आह्मास सदोदित विजयच प्राप्त व्हावयाचा, हे ध्यानात ठेवून आमच्याशी युद्धप्रसग करण्याचे धाडस यवन मसलतगाराच्या नादी लागून करावयाचे नव्हते दुर्योधनासारखी बुद्धि धरून विनाकारण आपल्या शूर लोकाचा सहार करावयाचा नव्हता तुह्मी आपल्या सेवकाच्या हातून पराभव पावला त्यामुळे तुमचा दुलौकिक मात्र झाला आहे लटाई झाली तींत जो नाश झाला तो आमचाच असे आम्ही समजतो यापुढे तरी असला प्रकार होऊं देऊ नका तुह्मो पुरातन माणसाचा अव्हेर करून नवीन माणसाचा लोभ धरू नका. वडिलाच्या हातची वहिवाटलेली माणसे तुह्मी वडिलाप्रमाणे मानलीं पाहिजेत. त्याचा अनादर करून मनास वाटेल तसे वागता त्याचे हे फळ तुह्मास प्राप्त झाले आहे, व यापुढेहि ते भोगावे लागेल रघुनाथपंत आह्माकडे आले ह्मणून हा बिघाड झाला असे समजू नका भाऊपणामुळे वाटा देणे घेणे आहेच ते कधी चुकावयाचे नाहीं यात दुसऱ्याच्या सागण्याशिकविण्याचा काहीं सबध नाहीं तुह्मास तुमच्या बऱ्याचे सागितले ते तुह्मास विपरीत वाटले ह्यामुळे ह्या थरास गोष्ट आली जुनी माणसें वडिलाच्या ठिकाणी मोजून त्याच्याकडून काम घ्याल तर यश पावाल व तुमची दौलत वाढेल हे ध्यानात पुरे ठेवून काय करणे ते करा अरणी, बेगरूळ, कोल्हार, वासकोट, शिरटे वगैरे तालुके आमच्या हाती आहेत चंदावर सुद्धा आमच्या लोकाच्या स्वाधीन करा, नगद जडजवाहीर वगैरे जी चीजवस्त वडिलाच्या हातची आहे तिचा अर्धा वाटा आह्मास द्या तुह्मी आमच्याशीं निर्मळपणाने वागल्यास तुंगभद्रेपलीकडे पन्हाळाप्रातातील आमच्या ताब्यातला तीन लक्ष होनांचा मुलूख आह्मी तुह्मास देऊं. हा प्रात नको असल्यास कुतुबशहास सागून त्याच्याकडून तुह्मास तेवढ्याच उत्पन्नाचा मुलूख देववूं. उगाच गृहकलह माजवून तुह्मीं आह्मीं कष्टी व्हावे यात काहीं

अर्थ नाहीं याउपर तरी तुमचा आमचा सलोखा राहावा आह्मी तुमचे वडील बंधु या नात्यानें जें मागतों ते ऐकाल तर त्यात तुमचें कल्याण होईल. आमच्याशी विरोध कराल तर विनाकारण कष्ट पावाल [1]"

त्याप्रमाणे व्यंकोजीराजास पत्र पाठवून रघुनाथपंतासहि असें लिहून कळविलें कीं, 'व्यंकोजीराजाशी ह्याउपर कलह करून त्याचा हिरमोड करूं नये, व त्याचा आब जाईल असें काहीं करू नये ते थोरल्या महाराजाचे पुत्र आहेत त्यानी दौलतीचा उपभोग घेतला तरी त्यात काहीं गैर झाले नाहीं त्याच्याशी होईल त्या रीतीचा तह करून सख्य करावें ' या अशा आशयाचा खलिता महाराजा-कडून येताच व्यंकोजीराजाच्या मागे फौज रवाना केली होती तिची हालचाल त्यांनें बंद केली तिकडे व्यंकोजीराजे मदरील आशयाचें पत्र आले ते वाचून मोठ्या विचारात पडले त्यानी मनात असें आणिले कीं, 'आपल्या फौजेचा मोड होऊन ती अष्ट दिशास उधळली आपले हत्ती, घोडे, उंट वगैरे सर्व त्याच्या हाती लागले आपले लोक पुष्कळ मेले, त्याची राउापोरे आपल्यापाशी धरणें धरून बसलीं आहेत पुष्कळ शिलेदार आपली पाडाव झालेली घोडी आह्मास द्या ह्मणत आहेत जखमी झालेले लोक अन्न अन्न करीत आहेत ह्या सगळ्याची समजूत घालावी तरी कशी? वडील बधु तर वाटा घेतल्यावाचून सोडणार नाहींत एकदर नीअवस्थेची माहिती देणारे रघुनाथपंत त्याच्यापाशी आहेतच आता कोणता विचार करावा? लढाई पुन चालवावी तर तीत आमचें अधिकच नुकसान होऊन विरोध मात्र वाढणार, व सर्व दौलत हातची जाणार आह्मी आरंभी विरोध केला तोच मूर्खपणा झाला दादासाहेबाच्या भेटीस गेलों त्या समयींच लीनतेने वागून ते मागत ते ऐकिले असते तर आज आमची ही दशा झाली नसती आमचे वडील बंधु मोठे भाग्यशाली आहेत आह्मी वाईट लोकाच्या नादाने त्याशी कलह केला हे फार वाईट झालें.'

व्यंकोजीराजास हा असा पश्चात्ताप होऊन ते चिताग्रस्त झाले त्यांस भोजन, शयन काहीं सुचेना. ते असे चार प्रहर विचार करीत बसले तेव्हा त्याची स्त्री दीपाबाई त्याच्याजवळ जाऊन चिंतेचे कारण विचारूं लागली. तेव्हा राजे ह्मणाले, 'दादासाहेबाचे कामदार इकडे राहिले, त्यानीं पुंडपाळेगाराचा बंदोबस्त

---

१ महाराजाच्या ह्या पत्राची अस्सल नकल रा ब पारसनीस यांनीं इतिहास-संग्रहांत प्रसिद्ध केली आहे.

करून पादशाही अमलातील किल्लेकोट काबीज केले त्याच्या नित्य लढाया होतात. पण त्यास अपयश असें कोठेच येत नाहीं पादशहाकडून त्याचें पारिपत्य होईना, तेथे आमचा पाड काय ? आम्ही त्याशी लढून फळ काय ? लढाई झाली तीत आमची खराबी मात्र पुष्कळ झाली ' हे ऐकून ती ह्मणाली, 'थोरले महाराज कैलासवासी झाले त्याच्या मागे तेच आपणास वडील आहेत सोद्याच्या नादास लागून अपकीर्ति मात्र करून घेतली बधुत्वात विरोध आणिला आता त्याबद्दल खेद वाटतो पहिल्यानेच विचार करावा तो केला नाहीं दादासाहेब पुण्यश्लोक अवतारी पुरुष आहेत आपण सरळ रीतीने चालल्यास ते आपला अनादर करणार नाहींत आपल्या ह्या अशा वागणुकीमुळे मात्र त्याच्याकडून भीति आहे त्याला ह्मणजे ह्या दौलतीची परवा आहे असें नाहीं त्यानी अशा दौलती किती कमविल्या असतील ! व आपल्यासारखे दौलतदार त्याच्या पदरीं किती तरी असतील आपण त्याच्याशी निरर्थक भाडता आहा त्यास शरण गेला असता तर त्यात काय हानि होती ? वडील वाटा मागतात तो का देऊ नये ? आपण नवीन दौलत तर नाहीं ना मिळविली ? आपली कमाई तर ते नाही ना मागत ? त्याजकडून अमर्यादा ती काय झाली ? आपल्या स्नेहात त्यानी अतर केले नसता त्याच्याशी आपण विरोध करून विनाकारण कलह माजविला, तो कशाला ? रघुनाथपत वडिलाच्या वेळचे विश्वासू चाकर, ते आपणास वडिलाचे ठिकाणी असें असता त्यास नाराज केले. ते सर्व व्यवस्था नीट राखते, व आपणास सुखाने व समाधानाने राहता आले असते. आपण लुच्याच्या नादास लागून विनाकारण हुर्मत गमाविली आता तरी सर्व विरोध एकीकडे ठेवून रघुनाथपतास शरण जावे, आणि ते सागतील तसें वागावे, ह्मणजे आपणास ते काडीइतके सकट पडू देणार नाहींत. आपण ह्या वेळी नसता अभिमान धरून भलत्याच रीतीने वागाल तर नाहक फजिती मात्र होईल रघुनाथपंताची व आपली बाचाबाची झाली असल्यामुळे त्याच्याकडे जाण्यास दिक्कत वाटत असेल तर खुद्द दादासाहेबास शरण जावे त्याशीं अजून तरी लीनतेनें वागल्यास ते आपला अवश्य सभाळ करितील हें सर्वांपरी चागलें. त्यास शरण गेल्याशिवाय परिणाम नाहीं '

दीपाबाईचा हा सल्ला व्यकोजीराजास पसंत वाटून त्यानी महाराजाशीं समेट करण्याचा निश्चय केला, व तहाचीं कलमें ठरविण्यासाठीं रघुनाथपंतास आपल्या भेटीस बोलाविलें रघुनाथपंतानें त्यास असा जबाब पाठविला कीं, 'ह्या प्रकरणीं

महाराजांची आज्ञा होईल तसे आम्हास वर्तन करणें आहे यास्तव त्याची परवानगी मिळाल्यावाचून मला तुमच्या भेटीस येववत नाहीं.' मग महाराजाची आज्ञा घेऊन तो व्यंकोजीराजाकडे जावयास सिद्ध झाला, आणि त्याने त्यास असे कळविलें कीं, 'आम्ही शिवाजीमहाराजाचे सेवक व तुम्ही त्याचे धाकटे बंधु, यास्तव तुमची आमची भेट होणे ती बरोबरीच्याहून अधिक नात्याने व्हावी' ही अट व्यंकोजीराजानी मान्य केली मग भेटीचे स्थल नेमून तेथे डेरे दिले, आणि दोहोकडून दोघे हत्तीवर बसून डेऱ्यानजीक आले[1] व्यंकोजीराजे अबारीतून खाली उतरल्यावर रघुनाथपन उतरला ते एकमेकाचा हात धरून डेऱ्यात गेले तेथे दोन मसनदी करविल्या होत्या, त्यापाशी दोघे बरोबरीने गेल्यावर रघुनाथपंत हात सोडून एकीकडे उभा राहिला आणि ह्मणाला 'ह्या मसनदीचे आह्मी चाकर, हीजवर बसण्यास आपणच योग्य आहा' असें म्हणून त्यास मसनदीवर बसवून मुजरा करून तो स्वत पूर्वमर्यादेप्रमाणें दूर बसला आणि बोलला कीं, जसे शिवाजीमहाराज तसेच तुम्ही मला आहा तुमच्याकडून निघून जाताना मीं ह्मटलें होते कीं, मी तुमच्या अर्धासनीं बसण्यास योग्य असा चाकर आहें हे तुमच्या प्रत्ययास आणून द्यावे ह्मणून एवढे करावे लागलें वरकड चाकराप्रमाणे मी नव्हे, ह्मणूनच शिवाजीमहाराजानी माझा अंगीकार केला आहे तसाच तुह्मीहि करावा तुमच्या हिताविरुद्ध प्राणहि गेल्या वागूं नये हा माझा संकल्प आहे. पण स्वामी वाकडे चालले असता त्यास योग्य विचार सांगण्यास मी चुकणार नाहीं स्वराज्य व स्वसत्ता वाढविण्याविषयीं मी ह्मास वारंवार विनति करीत गेलो परंतु क्षुद्र माणसाचे ऐकून तुह्मीं माझा उपमर्द केला. ह्मणून मीं शिवाजीमहाराजाकडे जाऊन कर्नाटकात राज्य साधण्यासारखे आहे असें त्यास सुचविलें ते महापराक्रमी असून स्वसत्ता व स्वधर्म याची संस्थापना करण्यास व दुष्ट म्लेंच्छाच्या संहार करण्यास प्रवृत्त झाले असल्याकारणानें त्याला माझी सूचना पसंत होऊन ते इतके दूर कर्नाटकात आले, व इकडे त्यानीं तीनचार कोटींचें नवें राज्य

---

१ ही भेट चंदावरामच झाली असें शिवादिग्विजयकार ह्मणतो रघुनाथपंतास व्यंकोजीराजे व दीपाबाई यानी फारच आग्रह केल्यामुळें तो महाराजाच्या हुकमाची वाट न पाहता चंदावराम गेला, व त्याम पहिल्याने एकाती नेऊन उभयतानीं त्याचे चरण धरून 'शिरसुरी तुह्माजवळ, तारा कीं मारा' असे ह्मटले ही अशी त्यांची नम्रता व अनुताप पाहून रघुनाथपंतानें त्याच्याशी तह केला

संपादन केले तरी तुमच्या ठायीं त्याचा लोभ बहुत आहे त्याची तुमच्या-वर फारच ममता आहे. आह्मासहि त्याची अशाच आशयाचीं पत्रे आलीं आहेत या नंतर तुम्हीं त्याच्याशी स्वच्छपणें वर्तावे जसा लक्ष्मण रामचंद्राच्या आज्ञेत सदैव वागला तसे तुम्हीं त्याच्याशीं वागावे हाच तुमचा धर्म आहे. असें कराल तरच तुमचा उत्कर्ष होईल कोणताहि कठीण प्रसंग आला असता मला आज्ञा करीत जावी, ह्मणजे मी सेनेसह येऊन तुह्मास लागेल तें साहाय्य करीन शिवाजीमहाराजाप्रमाणें कांहींतरी पराक्रम तुमच्या हातून व्हावा व तुमची कीर्ति वाढावी हीच माझी इच्छा आहे' ह्याप्रमाणे अनेक प्रकारीं व्यंकोजीराजास बोध करून रघुनाथपंताने त्याच्याकडून असा करार-करून घेतला कीं, 'त्यानी वडिलांच्या जाहगिरीचे अर्धे उत्पन्न शिवाजीमहारा-जास दरसाल देत जावे, वडिलार्जित जडजवाहिराचा अर्धा ऐवज त्यास द्यावा, व कांहीं रोख पैसा स्वारीखर्चासाठी ह्मणून द्यावा.' ह्या अटी व्यंकोजीराजानीं कबूल केल्यावर महाराजानी तंजावरप्रांत त्याच्याकडेच राहू देऊन आणखी जाहगिरीचे जे दुसरे तालुके जप्त केले होते तेहि सोडून दिले[1]

रघुनाथपंताकडून ह्या संबंधाचे कागद महाराजाच्या हातीं गेल्यावर त्यानी त्यास जबाब लिहिला त्यातील मतलब येणेप्रमाणे आहे 'चिरंजीव राजश्री व्यंकोजीराजे यास सौभाग्यवती दीपाबाईनी ध्यानावर आणून तुह्मास नेऊन तह ठरविला हे ठीक झाले चिरंजिवास आह्मी समक्ष सांगत होतो ते त्यानी मनास आणिलें नाहीं त्या वेळीं त्यास धुंदी होती ज्याच्या फुसलावणीवरून त्यानीं आमचें बोलणें तुच्छ मानिलें होते, त्याचा कावा आता त्यास स्पष्ट दिसून आला, व त्याची नजर खुली झाली हे ठीक झालें ते स्थितीवर येऊन तुमच्या-कडे बोलले आहेत त्याप्रमाणें वागण्याचा दृढ निश्चय त्याच्याकडून करून घ्या. तुमची मर्जी असल्यास चिरंजिवाच्या संस्थानाचा बंदोबस्त ठेवण्यासाठीं तुह्मी तिकडे राहा आमच्या चंदी वगैरे प्रांताचे काम जनार्दन पंडितांकडे सोंपवावें व कमीजास्त कामाची चौकशी तुह्मीं वेळोवेळां ठेवून नीट बंदोबस्त राखावा चिरंजिवांजवळ तुह्मीं राहिला तर तेथील बंदोबस्त पुढील प्रमाणें राखून आम्हास वरचेवर तिकडील हकीगत कळवीत जा बंदोबस्ताच्या कलमाचा बितपशील -

---

१ ह्या वेळी व्यंकोजीराजानी कोल्हार, बाळापूर, महाराजगड, जगदेवगड व कर्नाटकगड हे किल्ले महाराजाच्या स्वाधीन केले असें रायरीच्या बखरीत ह्मटलें आहे ही ठिकाणे महाराजानी अगोदरच काबिज केलीं होती हे माग सांगितलेंच आहे.

१ सोयरे व मानकरी याचा योग्य बंदोबस्त करावा त्यांचा अपमान होऊं न द्यावा त्याचा आदरमान करीत जावा त्यास खासगी कामे सागून राबवूं नये.

२ दरखदार व कामदार याच्या इतल्ल्याशिवाय कोणतेहि कामकाज होऊ न द्यावे. बरीवाईट सल्ला त्यास विचारीत जावे इतबारी लोक असतील त्यासच कामगिऱ्या सागाव्या दरखदारमडळीशी बखेडा करू नये त्याच्या योग्यते-प्रमाणे त्यास बढत्या देऊन वागवून घ्यावे

३ शागीर्दपेशामडळी चागली कुलीन, इमानी, इतबारी अशी पाहून जामीन घेऊन जवळ बाळगावी व कृपेत ठेवावी. सर्व ठिकाणची बातमी राखावी परंतु हे अमक्याचे ऐकतात असें कोणास वाटूं न द्यावे सर्वास जरबेत वागवावे.

४ आसपासचे सस्थानिक आपले मित्र असोत किवा शत्रु असोत, त्याच्या-कडे आपले वकील व बातमीदार ठेवून, कोणास कळूं न देता, सर्व ठिकाणची बातमी वरचेवर आपणास कळेल अशी तजवीज ठेवावी

५ पागा, शिलेदार व पथके याचे काम नित्य पाहून तीं सुस्थितीत ठेवावीं घोडी व माणसें नेहमीं हुशार राखावीं शिलेदार असतील त्याचे घोडे खरेदी करून पागेस लावावे व त्यास आपल्या पागेत नोकरीस ठेवावे लष्कराच्या चाकरीचा राबता नित्य ठेवावा ह्मणजे ते सर्वदा हुशार राहते, नाहीतर गाफिली वाढून परचक्र आलें असता नाश होतो यास्तव पागा व तोफखाना सर्वदा तयारींत ठेवावा

६ दुष्ट, दुरात्मे, हिदुद्वेष्टे, चोरटे, चहाड, सोदे, फितवेखोर, दरवडेखोर, मद्यपी इत्यादिकास आपल्या राज्यात थारा देऊ नये. त्याना राहूं दिलेंच तर त्याच्याकडून जामीन किवा दंड घ्यावा त्याच्याकडून प्रजेस पीडा न होण्या-विषयीं खबरदारी घ्यावी त्यांचा पक्का बंदोबस्त राखावा गाफिली करूं नये

७ लहानथोराशी केलेले हद्दनामे, तहनामे इत्यादिकासंबंधानें तटे उपस्थित होऊ न द्यावे गोरगरीब व अनाथ असतील त्याचा योग्य परामर्श घ्यावा व त्यास यथोचित साहाय्य करावें. त्यास कोणी विनाकारण नाडतील किंवा त्रास देतील तर त्या संबंधाचा बंदोबस्त वेळच्या वेळीं लावावा

८ धर्मादाय, देवस्थानाच्या नेमणुका, अन्नाहार वगैरे चालत आले असतील तसेच पुढें चालू ठेवावे. त्याचा उच्छेद होऊं न द्यावा. त्यांचा योग्य बंदोबस्त ठेवावा.

९ देणेंघेणें किंवा भाऊबंदकी यांच्यासबंधाने उद्भवणारे तटे व बखेडे याची निवड करण्यासाठीं लायक पंचाची नेमणूक जेव्हाची तेव्हा करावी प्रजेस योग्य न्याय मिळेल असें करावे लाच न घेता इनसाफ मिळेल अशी तजवीज ठेवावी सरकार गोरगरिबाचे अभिमानी मायबाप आहे असें समजून कोणाच्याहि कवडीस न शिवता न्यायमनसोबा करावा

१० कोणास अभय देऊन त्याचे रक्षण करण्याचे वचन दिल्यावर मग पुन. त्याशीं निष्कारण दंडेली करावी, असा नीच प्रकार आमच्या कुळात झाला नाहीं व यापुढें होऊं नये

११ किल्ला अरणी हा महाल वेदोभास्कर यास थोरले महाराजानी दिला आहे त्याचे हल्ली आठ पुत्र हयात आहेत त्याच्याकडे तो कायम राखावा ते सरकारचाकरीवर हजर राहिल्यास उत्तम, न राहिले तर त्याबद्दल त्याच्या महालास उपद्रव देऊ नये

१२ विजापूरकराकडून काहीं सनदी अमल आहे त्याप्रमाणेच दौलताबादकराकडून वडील इकडे आले तेव्हा काहीं अमल तहात मिळाला त्याशिवाय त्यानी कित्येक पाळेगार काबूंत आणून खारा अमल केला ह्या सर्व मुलखाचा हिशोब जमेंत बरोबर लागलेला नाहीं, तो नीट लावावा तशीच थोरले महाराजाच्या वेळेपासून ह्या अमलाबद्दल विजापूरकराची पाच हजार फौजेनिशी चाकरी करावी लागत आहे. हे चाकरीचे कलम आह्मीं त्या सरकाराशी तह केला त्यात काढून टाकून असें ठरविलें आहे कीं, आह्मी त्यास प्रसगोपात्त मदत करूं हा करार तीर्थरूप जिवंत असता झाला आहे तेव्हा अर्थात् ही चाकरी तुह्मास इत पर करण्याचे कारण नाहीं ह्या चाकरीच्या ऐवजी त्यास प्रसगविशेषीं मदत करणें पडेल ती तुह्मीं आपल्या फौजेनिशी करावी ती न केल्यास त्याचा जाब तुह्मांस विचारूं. ही मदत आह्मास देणें प्राप्त झालें असता स्वारीखर्च तुह्मास द्यावा लागेल

१३ वरघाटीं हिंगणी, बेरडी, देऊळगाव वगैरे गांवाच्या पाटीलक्या, देशमुख्या वगैरे वडिलोपार्जित वतने आहेत. त्याविषयीं तुह्मीं बोलूं नये. तीं वतनें आह्मी वहिवाटूं

१४ प्रसंगविशेषीं इकडील एकादा माणूस तिकडे गेला किंवा तिकडील इकडे आला तर परस्परानीं त्याचा योग्य परामर्श किंवा चौकशी ठेवावी. कोणाची

काहीं समजूत करणें असल्यास किंवा खुलासा घेणे असल्यास तो घेऊन जिकडला माणूस तिकडे रवाना करावा त्याविषयीं हरकत करूं नये

१५ आम्हीं सोडविलेल्या प्रांतापकीं, बेगरूळ, बामकोट, सिलेकोट अशा तीन महालाचे उत्पन्न आज तीन लाख वराई आहे. चांगली जमाबंदी केल्यास याचें उत्पन्न पाच लाखापर्यंत होईल हे महाल आम्ही आमच्या तर्फे चिरंजीव सौभाग्यवती दीपाबाई हिला चोळीबांगडीसाठी दिले आहेत ह्या प्रांतावर व्यंकोजीराजांनी किंवा त्यांच्या वंशजांनी हक्क सांगू नये किंवा त्याचें उत्पन्न घेऊ नये मुलींनी परंपरेनें आपल्या खासगी खर्चास हे उत्पन्न ठेवावें ह्या प्रांताचा बंदोबस्त मात्र तुम्हीं राखावा

१६ नदीप्रांताजवळ आम्हीं जो प्रांत सोडविला आहे त्यापैकी सात लाख होणाचे महाल चिरंजीव राजश्री व्यंकोजीराजे यास दूधभाताकरिता इनाम दिले आहेत ते त्यांच्या वंशात परंपरेने चालावे ह्या महालाची यादी करून तुम्हीं आमच्याकडे पाठवावी ह्मणजे त्यास मंजुरी देऊ व सनदा पाठवू

१७ तुह्मी ( रघुनाथपंत ) पिढीजाद इतबारी सेवक तुमचें कुटुंब थोर व सत्पात्र हे जाणून तंजावरप्रांतापैकीं एक लाख वराई उत्पन्नाचे गाव तुह्मास तोडून द्यावयाचे आहेत त्याची यादी इकडे पाठवावी ह्मणजे सनदा पाठवून देऊ ह्या गावाचें उत्पन्न तुह्मास वंशपरंपरेने भोगत जाईल

१८ तुमच्या संस्थानातला कोणी चोर वगैरे गुन्हेगार आमच्या राज्यात आला किंवा आमच्याकडचा तुमच्या संस्थानांत गेला तर तो परस्परांनी परस्परांच्या स्वाधीन करावा, अनमान करू नये

१९ थोरले महाराजांच्या छत्रीकडे चौघडा वगैरेची दरमहाची नेमणूक तुम्हीं करावी तिकडे घोडे, हत्ती, कारकून, शिपाई, प्यादे इत्यादिकांची नेमणूक नेहमीं असावी. ह्याविषयीं ढिलाई करूं नये

ह्या एकुणीस कलमांबरहुकूम वागण्याविषयीं चिरंजिवाची मान्यता असल्याबद्दल त्याचें पत्र घेऊन आमच्याकडे रवाना करावें म्हणजे आह्मास मोठे समाधान वाटेल ”

ह्याप्रमाणे आलेलें कलमबंदी पत्र रघुनाथपंतानें व्यंकोजीराजास वाचून दाखविलें. ह्याशिवाय आणखी महाराजांनीं व्यंकोजीराजांसहि एक स्वतंत्र पत्र पाठवून त्यांचें आश्वासन केले. मग रघुनाथपंतानें व्यंकोजींच्या जाहगिरीची व्यवस्था ठेवून आणखी महाराजांनीं नवीन संपादन केलेल्या प्रांतावरहि देखरेख ठेवावी

असें ठरलें हा असा व्यकोजीराजाशीं सलोखा करून व कर्नाटकात मिळविलेला प्रात निर्वेध झाला असें पाहून महाराज तोरगलाहून पुढे कूच करून गेले, व हंबीरराव सरनोबत यास सेनेसह स्वदेशी निघून येण्याचा हुकूम त्यानी पाठविला

तिकडे निबाळकर व घाटगे हे पन्हाळाप्रातात शिरून तो उध्वस्त करून कऱ्हाडा-पर्यंत प्रात लुटीत गेले ह वर्तमान महाराजास तोरगळ मुक्कामी कळले तेव्हा त्यानी निळाजी काटकर याच्या बरोबर काहीं लोक देऊन त्यास त्या सरदारावर पाठविले त्याने त्यास कुर्ला येथे गाठून त्याचा अगदी धुव्वा उडवून दिला, व त्यान्याकडची बहुतेक लूट परत हस्तगत केली ही लूट आपल्या प्रजेची असून ज्याची त्यास मिळावी हे योग्य होय असे मनात आणून, महाराजानी नीट चौकशी करून ज्याचा जो माल होता तो त्यास मिळावा अशी तजवीज केली, आपण त्या एवजातील एका तनसडीसहि शिवले नाहीत

महाराजानी कोपलप्रात काबीज करून त्यावर जनार्दनपंत यास ठेवले होते. त्यान्यावर विजापूरकराच्या फौजेचा हल्ला होण्याचा रग आहे असें कळताच त्यानी त्याच्या मदतीस काहीं लोक रवाना केले व स्वत थोड्या लोकानिशी रायगडावर येऊन दाखल झाले ( मार्च स १६७८ )

कर्नाटकातून स्वदेशीं येत असता महाराजांनी विजापूरचा किल्ला हस्तगत करून शिकदर अदिलशहा याचा कारभार आपण पाहण्याचा घाट घातला होता. बहिलोलाखान मृत्यु पावल्यावर जमशीदखान नावाच्या सरदाराने अदिलशहाचा कारभार चालविला होता परतु त्याला पुष्कळ विरोधी झाले असून त्याच्यापुढं त्याचा निभाव लागणें कठीण झालें, तेव्हा त्यानें शिवाजीमहाराजाशीं असें बोलणे लाविले कीं, "तुम्ही मला सहा लक्ष होन द्याल तर विजापूरचा किल्ला तुमच्या स्वाधीन करितों आणि अदिलशहाचा सगळा कारभार तुमच्या हातीं देतों" हे बोलणें त्यास मान्य होऊन त्यानीं आपल्या स्वारीचा रोख विजापुरा-कडे फिरविला. पण त्याना लौकरच असें कळलें कीं, ह्या जमशीदखानास मसाउदखानाने दग्यानें कैद करून सगळा कारभार आपल्या हातीं घेतला. तेव्हां अर्थात् त्याची निराशा होऊन ते तिकडून माघारीं फिरून पन्हाळ्याकडे गेले.[२]

---

१ हा प्रात मोरोपतानें तेथला सुभेदार कासीमखान याला कांहीं लांच देऊन घेतला होता, असें प्रो. सरकार ह्मणतात.

२ ह्या कारस्थानाचा उल्लेख राजापूर येथील इग्रज व्यापाऱ्यांनीं आपल्या लेखांत केला आहे.

महाराजाच्या हुकमाप्रमाणे हंबीरराव स्वदेशीं यावयास निघाला हें वर सांगितलेंच आहे तो जवळ आला असें ऐकून जनार्दनपंताने त्याच्या मदतीने विजापूरकराच्या सैन्यावर हल्ला करण्याचा बेत केला, व हंबीरराव त्या गोष्टीस मान्य झाल्यावर त्यानी आपल्या फौजेनिशीं तुगभद्रा व कृष्णा ह्या नद्याच्या मधल्या प्रदेशात शत्रूच्या सैन्यास गाठिलें, व त्याचा पराभव करून त्यास अष्ट दिशास उधळून लाविलें त्याचे पाचशे घोडे, पाच हत्ती व एक मोठा सरदार एवढे त्यानी पाडाव केले, व तिकडील सगळा प्रात पादाक्रात करून तेथे आपला अमल बसविला कोपल व बेलवाडी ह्या प्रातातील देशमुख विजापूरसरकारास वसूल देत नसून आपणच सगळा प्रात बळकावून पुड होऊन बसले होते त्या सगळ्यास जनार्दनपताने जेरीस आणून त्याच्याकडून शिवाजीमहाराजाचा ताबा कबूल करविला हे जे प्रात त्यानी काबीज केले त्याचे महत्त्व मोठे होतें कोपल तर दक्षिणेचे केवळ नाके असून म्हैसुराकडील जो प्रात महाराजाच्या सत्तेखाली आला होता त्याच्यामध्ये व पन्हाळाप्रातामध्ये जो प्रदेश होता त्याचे हें मध्यवर्ती ठाणे होते यास्तव व तुगभद्रानदीच्या अलीकडील व काहीं पलीकडील प्रात ताब्यात आल्यामुळें तेवढी महाराजाची सत्ता अखड झाली हे जे विजापूरकराचे प्रात काबीज केले ते परत घेण्याचा प्रयत्न त्याच्याकडून यानंतर झाला नाहीं कारण त्याचें घोडदळ बहुतेक खलास झाले असून मोग लाशी व कुतबशहाशी लढाया करकरून त्याची बहुतेक हलाकी झाली होती तशात आणखी लवकरच पावसाळा सुरू होऊन नद्यानाल्यास पूर आल्यामुळे तिकडे फौज पाठविण्याची सोय उरली नव्हती ही एवढी फुरसद जनार्दनपंतास व रघुनाथपंतास मिळाल्यावरून त्यानी तिकडील एकंदर बदोबस्त उत्तम करून ठेविला

हबीरराव जनार्दनपतास मदत करून निर्भय केल्यावर पुन स्वदेशाकडे यावयास निघाला त्याला वाटेत देऊरचा किल्ला लागला त्यावर त्यानें हल्ला केला हें वर्तमान विजापूरकरास कळल्यावर त्यानीं हुसेनखाननामक सरदारास दहा हजार लोकानिशीं त्याच्यावर पाठविलें त्याचा हंबीररावानें मोड करून त्यास पाडाव केलें,[1] व हा किल्ला सर केला त्यावरून त्याच्यावर लोदीखानास पाठ-

१ हा हुसेनखान मोठा शूर पुरुष होता. तो वर सागितलेल्या तुगभद्रा व कृष्णा ह्या नद्यांच्या मधल्या प्रातावर सुभेदार होता त्याला हबीररावानें तिकडून हांकून दिल्यावर तो विजापुरास पळाला असावा,आणि तेथून तो सैन्य घेऊन हबीररावाशी

विलें, त्याचाहि पराभव करून हंबीररावानें त्यास कैद केले. त्याप्रमाणेंच त्यानें गोडल व बहादूरबदा हे किल्ले छापा घालून हस्तगत केले. हीं अशीं शत्रूचीं वाटेंत लागलीं तेवढी ठाणीं सर करीत करीत हंबीरराव महाराजाकडे येऊन दाखल झाला. त्याच्या ह्या उत्कृष्ट कामगिरीबद्दल महाराजानी त्याचें पुष्कळ गौरव करून त्यास मोठे इनाम दिलें त्याच्या बरोबर धनाजी जाधव व बयाजी घोरपडे हे ह्या मोहिमेंत होते त्यानीहि उत्तम पराक्रम केल्यावरून महाराजानी त्याची वाखाणणी करून त्यास इनामे व बढत्या दिल्या त्याप्रमाणेंच कर्नाटकाच्या मोहिमेत ज्यानी ज्यानी चागल्या कामगिऱ्या केल्या त्यास त्यानी त्याच्या योग्यतेप्रमाणे पारितोषिकें देऊन सतुष्ट केले ह्या मोहिमेस निघाल्यापासून अठरा महिन्यानी महाराज स्वदेशी परत आले

पुढें काहीं दिवसानी रघुनाथपताकडून महाराजास असें पत्र आलें कीं, 'व्यंकोजीराजाची उदासवृत्ति झाली आहे ते नेत्र झाकून बसतात, कोणाशीं बोलत नाहींत, खाण्यापिण्याकडेहि दुर्लक्ष करितात, सदैव एकाती बसून काय करितात ते कळत नाहीं, आम्ही जवळ गेलो ह्मणजे काहीं बोलले तर बोलतात, ब्राह्मणानी जे काहीं मागावे ते त्यास बेलाशक देतात ही त्याची वृत्ति वर्षसहा महिन्यानी पालटेल ह्मणून वाट पाहिली पण काहीं नाहीं ती आहे तशीच आहे यास्तव केवळ निरुपायास्तव ती आपणास कळविली आहे कळविली नाहीं असा आपणाकडून दोष न यावा तरी आपणास जे कर्तव्य असेल ते करावे " हे वर्तमान ऐकून महाराजानी व्यकोजीराजास येणेंप्रमाणे पत्र लिहिलें " रघुनाथपंत तुमची भेट घेऊन आले त्यानी तुह्माकडील मजकूर लिहून कळविला तो वाचून मनास फार वाईट वाटले कारण महाराजाच्या पोटी तुह्मी आम्ही उभयता बधु एकमेकास आधार असून तुह्मी उदास होऊन बसला आहा हे ऐकून मनास खेद होतो उदास होऊन बसण्यासारखे सकट तरी तुह्मावर काय आलें आहे ते कळवाल तर त्याचें निवारण करिता येईल आह्मास कोणतीहि गोष्ट कळविण्यास तुह्मीं शंका धरूं नये तुमचा जो काहीं मनोरथ असेल तो तत्काळ पूर्ण होईल. आमच्याकडून तुह्मास सतोष होईल

---

पुन सामना करावयास आला असावा झाला हंबीररावानें पाडाव करून महाराजा-पुढे नेल्यावर त्यानीं त्याचा आदरमान करून त्यास सोडून दिलें. ही अशी बेअब्रू झाल्यामुळें तो पराकाष्ठेचा खिन्न झाला आणि त्यानें विष प्राशन करून देहत्याग केला प्रो. सरकार, पृ. ४०६.

असें करण्यास मुळींच आळस व्हावयाचा नाहीं, ही खात्रा ठेवा तुमच्य. मनास अशी विकृति का झाली ते अवश्य कळवा तिचे परिमार्जन करिता येईल इत पर उदासीनपणानें वागू नका, वागला असता जवळ आणून ठेवावे लागेल. मग इकडून तुमचे जाणें घडणार नाहीं ह मनात वागवून सरळ रीतीनें वागा रघुनाथ तताची सल्ला नेहमी ऐकत जा यातच तुमचे हित आहे पुढे तुमची मर्जी ' हे असें पत्र त्यास पोच यावर ते शुद्धीवर येऊन नीट वागू लागले

# भाग सत्ताविसावा.



## मोगलांशीं शेवटले युद्धप्रसंग.

### १६७८–१६८०.

कर्नाटकांतील मोहीम फत्ते करून व तिकडील पुष्कळ मुलखावर आपला ताबा बसवून शिवाजीमहाराज विजयी होऊन स्वदेशी आले, ही खबर औरंगजेबास कळली तेव्हा त्यास अतिशयित वाईट वाटलें. बहादूरखानास द्रव्याचें आमिष दाखवून व मोगलबादशहास खंडणी देण्याचे कबूल करून त्यानी स्वराज्यास त्याच्याकडून उपद्रव न लागे असें केले होते. ह्या सलोख्याचें औरंगजेबास पहिल्याने फारसे काहीं वाटले नव्हते. हा असा सलोखा होणें त्या समयी त्यास सोइचेहि वाटले होते. याचें कारण अर्थात् असे होतें कीं, तो उत्तरेस पठाणाशी लढण्यात गुंतला होता, त्यामुळें त्याला दक्षिणेतील सुभेदारास कुमक पाठविण्यास सवड नव्हती. पुढं त्यास हा तह नापसंत होऊन त्याने बहादूरखानास दोष दिला खरा, परंतु महाराजाच्या मुलखावर त्याला गर्दी करावयास न सांगता दिलेरखानाच्या सूचनेवरून त्याने कुतुबशहाशी युद्ध करण्यास त्यास परवानगी दिली. परंतु त्यांत त्याला यश आले नाहीं. एवढे मात्र झालें कीं, त्याचा पुष्कळ फौज ह्या धामधुमीत खलास झाली त्यामुळे मोगलास महाराजाच्या मुलखात गडबड करण्यास त्राण उरलें नाहीं. ह्या वेळी औरंगजेबाचा असा हिशोब होता कीं, कर्नाटकासारख्या बिकट, अनोळखी व दूरच्या प्रांतात स्वारी करून शिवाजीमहाराजाचे सैन्यबळ पुष्कळ कमी होऊन ते बरेच दुर्बल झाले ह्मणजे त्याला जिंकण्यास फारसे आयास पडणार नाहीत. परंतु हा त्याचा अजमास अगदी चुकला. त्यानी ह्या स्वारीत कर्नाटकातल्या बऱ्याच मुलखावर कायमची सत्ता बसवून विजापूरकराचा तिकडील अमल पुष्कळ कमी केला, व तिकडूनहि त्या सरकारच्या मुलखावर चढाई करण्याचा मार्ग सुगम करून ठेविला. हे पाहून औरंगजेबास असें वाटू लागलें कीं, 'आता शिवाजीमहाराज विजापूरसरकारच्या उरलेल्या मुलखावर चोहोंकडून गर्दी करून

अदिलशाही बुडवून टाकतील व आपला अमल थेट रामेश्वरापर्यंत बसवितील; आणि आपला बेत जो दक्षिणेंतील दोन्ही मुसलमानी शाह्या बुडवून दक्षिण समुद्रापर्यंत एकछत्री सत्ता करण्याचा तो आता निष्फळ होतो ' ह्मणूनच त्यानें दिलेरखानाच्या सूचनेवरून शिवाजीमहाराज कर्नाटकातून परत येण्यापूर्वी अदिलशाही बुडविण्याचा विचार मनात आणिला होता परतु त्यात त्यास यश आलें नाहीं मग त्यानें बहादूरखानास दक्षिणच्या सुभेदारीवरून दूर करून आपला पुत्र मोअझिम यास पुन ह्या सुभ्यावर पाठविलें

मागल्या भागात सागितल्याप्रमाणें मसाऊदखानाच्या हातीं विजापूरकराचा कारभार येऊन त्याशीं दिलेरखानानें तह केल्यावर मोरोपंतानें आपल्या प्रत्येक ठाण्याची व्यवस्था स्वत जातीनं जाऊन पाहून सर्व बंदोबस्त नीट ठेविला, व जिकडेतिकडे आपल्या लोकाची जय्यत तयारी केली मोगल व विजापूरकर एक होऊन आपल्या मुलखावर लवकरच स्वारी करितील अशी त्याला भीति होती ह्या वेळी कोंकणात शिद्दीनेहि गडबड आरभिली होती त्याच्याशीं मोरोपंतास काहीं वेळ युद्ध करावे लागले त्याचा तपशील पुढील भागात देऊ

मसाऊदखानाशी दिलेरखानानें केलेला तह औरगजेबास पसत वाटला नाहीं त्यानें त्याबद्दल त्या सरदारास दोष दिला, व त्यास असा हुकूम पाठविला कीं, 'विजापूरसरकाराच्या लष्कराचा थकलेला मुशाहिरा अद्यापि दिला नाहीं तो देववावा, त्या दरबारचे जितके सरदार आपल्या तर्फेचे होतील तितके करून घ्यावे; सर्व राज्यकारभार आपल्या तत्रानें चालेल असें करावे, किंबहुना सर्व राज्य आपल्या आश्रयानें चालेल असें करावें ह्या बादशाही हुकमाप्रमाणें दिलेरखानानें त्या दरबारच्या बहुतेक अफगाण सरदारास आपल्या पक्षास सामील करून घेतले परतु दुसरे काहीं सरदार होते त्यास मोगलाचा पुरा तिटकारा असे ते काही केल्या वश होईनात बालराजाची बहीण पादशाबिबी औरगजेबाच्या मुलास देण्याचें ठरविलें होते, त्याप्रमाणे तिची मागणी करण्याकरिता बादशहाचे लोक आले तेव्हा ह्या सरदारानी एकच कल्ला केला. त्याच्या मनातून मोगलबादशहाशी हा शरीरसबंध करावयाचे नव्हते ते ह्या वेळी प्रतिपक्षाशीं युद्ध करण्यास सिद्ध झाले दुसरा पक्षहि पादशाबिबीस मोगलाकडे पाठविण्याचा हेका धरून बसला. हा असा गृहकलह माजून राहिला असता, तो विकोपास जाऊन आपल्या बधूचे राज्य लयास जाऊं नये ह्मणून बिबी स्वत पडदपोशी

सोडून बाहेर येऊन लोकास ह्मणाली कीं, मी मोगलाकडे जाण्यास तयार आहें ही अशी तिची स्वताची इच्छा लोकास कळली तेव्हा विरुद्ध पक्ष भाडण पाहून स्वस्थ बसला बिबी दिलेरखानाच्या छावणीत जाऊन दाखल झाली । त्या खानाने तिला मोठ्या लवाजम्यानिशी दिल्लीस पाठवून दिले

एवढ्याने दिलेरखानाचा सतोष झाला नाहीं मसाऊदखानाने तहाप्रमाणे वर्तन केले नाही ह्मणून त्याचे पारिपत्य करण्यासाठी त्या खानाने विजापुरावर चाल केली तेव्हा हे अरिष्ट कस टाळावे हा विचार मसाऊदखानाला पडला. ह्या आणीबाणीच्या प्रसगी आपणास शिवाजीमहाराजाकडून साहाय्य मिळते तर पाहावे असा त्याने विचार केला त्याने ह्या वेळी असें मनात आणिल कीं शिवाजीमहाराजाचे आपल्या सरकाराविषयी अत करण शुद्ध नाहीं त्याच्याकडे मदत मागितली असता ती ते देतील न देतील तथापि ते शहाजीराजाचे पुत्र आहेत त्याचे वडील ह्या राज्याच्या आश्रयाने वाढले होते हे ध्यानात आणून ते ह्या प्रसगी आपल्या पूर्वीच्या नात्यास जागतात कीं कसे ते पाहावे ह्यात त्याचा कुलीनपणा दिसून येईल पुन मोगलाशी त्याचा विरोध आहेच तेव्हा कदाचित् ते त्याशी लढण्याची ही सधि साधण्यास तत्पर होतील असा विचार करून त्याने महाराजास लिहिले की, "आम्ही एकमेकाचे शेजारी आहो आम्ही एकच निमक खात आहो ह्या शाहीसबधाने जशी मला चिता आहे तशीच तुह्मालाही आहे शत्रु ह्या शाहीचा नाश करण्यास रात्रदिवस टपले आहेत तर तुह्मी आह्मी एक होऊन मोगलाना इकडून हाकून लावू या दिलेरखान पुष्कळ सैन्यानिशीं विजापुरापाशी येऊन थटकला आहे ही पादशाहत तुमची आहे तरी लवकर येऊन मदत केली पाहिजे"

आता येथे एका प्रकरणाचा उल्लेख अवश्य केला पाहिजे ह्या वेळी कुतुबशहाच्या मनात शिवाजीमहाराजासबंधाने वैमनस्य उत्पन्न झाले होते त्याचा दिवाण मादण्णा याने महाराज कर्नाटकाच्या मोहिमेस जाताना त्याच्याशीं स्नेहभाव दृढ करून आपल्या शहाकडून त्याच्या मोहिमेस लागणारा खर्च व मदतीस फौज व तोफखाना देवविला होता, परतु महाराजानी तिकडील एवढे मुलूख व किल्ले काबीज केले असून व प्रचंड लूट स्वदेशीं आणिली असून कुतुबशहाला त्यातला एकहि मुलूख किंवा किल्ला दिला नाहीं आणि मोहिमेसाठीं घेतलेल्या रकमेंतून एक कपर्दिकाहि परत केली नाहीं, हें पाहून कुतुबशहाला

त्याचा पराकाष्ठेचा क्रोध आला आणि ह्या ठकबाजीबद्दल त्याचें पारिपत्य करावयाचा निर्धार करून त्यानें विजापूरकराशी सगनमत करण्याचें योजिले त्यानें मसाऊदखान व त्याचे प्रतिस्पर्धी जे सारजाखान वगैरे सरदार त्याच्याशी ह्या बाबतीत बोलणे करून त्याच्या लष्कराचा मुशाहिरा थकला होता तो देण्यासाठी त्यास लागला तेवढा पैसा पुरविला, आणि त्यानी एक होऊन शिवाजीमहाराजास कोकणाबाहेर पडू द्यावयाचे नाहीं असा निश्चय करून त्याच्याशी लढाई करण्यासाठी मोठी फौज एकवट केली परंतु वर सांगितल्याप्रमाणे दिलेरखानानें विजापुरावर गर्दी केली तेव्हा ह्या दोन्ही शाहींचा हा बेत जागच्याजागी राहिला, आणि मसाऊदखानाला उलट महाराजापाशीच मदत मागणें प्राप्त झालें त्याची मदत मागितल्यामुळे तर दिलेरखानाला अधिकच त्वेष आला

मसाऊदखानाच्या सदरील विनतीस महाराजानी मोठ्या आनदाने मान देऊन पन्हाळ्यास आपलें घोडदळ जमा केलें व सात हजार स्वार विजापुराकडे पाठवून दिले ह्या सैन्यास त्यानी असा हुकूम केला की, 'तुह्मी विजापूरचा किल्ला ताब्यात घेऊन त्यात मोठ्या हुशारीने राहावे, व आह्मी बाकीच्या स्वारानिशीं शत्रूच्या पिछाडीवर हल्ला करून त्याचा रग जिरवितो ' ह्या हुकमाप्रमाणे महाराजाचे स्वार विजापुरापाशी गेले तेव्हा त्यास मसाऊदखानाने सांगितले कीं, तुह्मी अटग नदीच्या तीरी तळ देऊन शत्रूच्या मुकाबल्यास तयार राहा महाराजाचे सरदार ते ऐकतना ते शहरानजीक जाऊन खानापूर व खुसकपूर येथे डेरे देऊन राहिले, व त्यानी खानास सांगून पाठविले कीं, किल्ल्याचा एक दरवाजा व एक बुरूज आमच्या स्वाधीन करावा, ह्मणजे आह्मी किल्ल्याचे रक्षण करितों. परंतु मसाऊदखानास ते मान्य होईना, व तो मराठ्याच्या ह्या सैन्यातील मोठमोठ्या सरदाराखेरीज कोणासहि शहरात येऊं देईना मग हे मराठे जोहारपुरात किल्ल्यानजीकच्या मैदानात जाऊन उतरले येथे थोडे दिवस राहिल्यावर महाराजाचे काहीं लोक व्यापाराच्या मिषाने शहरात जाऊं लागले बैलावर गल्ल्याच्या गोण्या घालून त्यात तरवारी व हत्यारे छपवून प्रत्येक बैलामागे एकएक स्वार असे ते शहरात जाऊं लागले, व निरनिराळ्या जागी टोळ्या करून राहूं लागले हें त्याचे ढोंग लवकरच उघडकीस आलें तेव्हा अर्थात् त्यांस लागलाच प्रतिबंध झाला ह्यावरून महाराजाचे काहीं सरदार मसाऊदखानाकडे जाऊन ह्मणूं लागले कीं, ' आम्ही तमच्या कुमकेस आलों

असून आमच्या लोकास तुम्ही आत येऊ देत नाहीं अशाने आम्ही शत्रूच्या तोंडी सापडण्याचा सभव आहे त्या वेळी आमचें रक्षण होणे कठीण जाणार आहे एन प्रसगी तुम्ही आह्मास किल्ल्यात तर जागा देणार नाहीं ' मसाऊद-खानाने त्याच्या ह्या बोलण्याची परवा मुळीच केली नाही कारण त्याल महाराजाचा भरवसा बिलकुल वाटत नव्हता महाराजान्या मनात ह्या वेळी साधल्यास विजापरशहर काबीज करावयाचे होते असे दिसते मसाऊदखान मराठ्यास सामोपचाराने शहरात प्रवेश करू देईना तेव्हा अर्थात् उघड वेर करून त्यानी त्या शहरावर एकच गर्दी केली दौलतपुर व खुसरुपुर हीं लुटुन यानी तेथील श्रीमान् उदम्यास पकडून कैद केले त्याप्रमाणेच त्यानी जोहार-पुरावरहि हल्ला केला त्यान्याशी लढण्यास काही लोक आले त्यास त्यानी घायाळ करून पिटाळून लाविले ह्या चकमकींन काहीं सरदार ठार झाले इत-क्यात किल्ल्यावरून त्याच्यावर तोफाचा सारखा भडिमार होऊ लागला यामुळे ते अमळ माग हटले मग किल्ला हस्तगत करण्याचा प्रयत्न मराठ्यानी काही दिवस केला परतु तो असा हाती येणे शक्य नव्हते, शिवाय दिलेरखान मोठ्या सैन्यानिशी विजापुराकडे येत होता, यास्तव ते तेथून माघारी गेले' [१]

इकडे दिलेरखान विजापुराजवळ येऊन थडकला त्याच्या हालचालीवर महा-राजाची नजर होतीच तो विजापुराशी तळ देऊन राहिला कीं त्याच्यावर मागून हल्ला करण्याच्या तयारीने ते त्याच्या छावणीपासून सातआठ कोसावर येऊन ठेपले तेथे आल्यावर त्याला असें कळले कीं, दिलेरखानाच्या सैन्यात पठाणलोकाचा भरणा पुष्कळ असून त्याचा जमाव फार मोठा आहे त्यावरून यानीं असा विचार केला कीं, त्याच्याशी ह्या समयी सामना करून आपले लोक विनाकारण नासावे त्यापेक्षा तो इकडे लढण्यात गुतला असता आपण त्याच्या मुलखात शिरून यथेच्छ लुटालूट करावी असा बेत करून ते तेथून उलटले, व मोठ्या वेगाने भीमानदीच्या अलीकडे येऊन मोगलाच्या प्रातात शिरले तिकडे त्यानी सारखा कहर उडवून दिला तरी दिलेरखानाने विजापुरास वेढा घातला होता तो काहीं ढिला केला नाहीं, किंवा मराठ्याच्या पारिपत्यास लोकहि

---

१ कित्येक बखरीत असा उल्लेख आहे की, मराठ्यानी विजापूरच्या किल्लेदारास त्रास हजार होन लाच देऊन किल्ला स्वाधीन करून घेतला, व हे पैसे मसाऊदखान या किल्लेदारापाशी मागू लागला तेव्हां तो सरजाखानास दहा हजार होन देऊन याच्या पाठीशीं पडला.

पाठविले नाहींत [१] महाराजानी भीमानदीपासून गोदावरीनदीपर्यंत मोगलाचा एकंदर मुलूख लुटला धरमगाव, चोप्रा वगैरे मोठमोठी व्यापाराचीं शहरें त्यानी लुटल्यावर ते गोदावरीच्या अलीकडे येऊन जालनाशहरात शिरले, व ते शहर त्यानी तीन दिवस सावकाश लुटलें. जवळ औरंगाबादेस सुलतान मोअझिम होता पण त्याची त्यानी मुळीच भीति धरिली नाही द्रव्य व जवाहीर लोकानी कोठे लपवून ठेविलें असे ते त्याला नक्की ठाऊक असे त ते ते आपल्या लोकास बेचूक दाखवून देत त्याच्या लोकानी ह्या प्रसगी मुसलमान फकिराचीहि घरे लुटली असे ह्मणतात महाराजाच्या नेहमीच्या नियमाविरुद्ध ही गोष्ट घडली कारण अशा धर्मपरायण लोकास उपद्रव देऊ नये अशी त्याची आपल्या लष्करास ताकीद असे. हा नियमभग केल्याबद्दल त्यानी गुन्हेगारास शासन केल्याचे कोठेहि लिहिल नाहीं

ह्याप्रमाणे जमलेली गडगज लूट रायगडावर सुरक्षितपणे पावती करण्यासाठी महाराज जावयास निघाले अगता त्यास वाटेत गाठून सामना द्यावा ह्या इराद्याने शहाजाद्यान रणमस्तखानास दहा हजार स्वारानिशी पाठविले त्याने त्याचा पाठलाग करून त्यास सगमनेराजवळ गाठले उभय पक्षाची मोठ्या निकराची

१ प्रा सरकार ह्मणतात की, ममाऊदखानाने दिलेरखानाशी ह्या वेळा समेट करून त्यास विजापूरशहरात बोलावून मोठ्या थाटाचा पाहुणचार केला, व त्याच्या साह्याने महाराजाच्या लोकावर तो चालून गेला इतक्यात त्यास असे वर्तमान लागले की, महाराज स्वत सातआठ हजार फोजेनिशी आपल्या लोकाच्या मदतीस येत असून मोगलाची किंवा विजापूरकराची फौज पुढे आल्यास तीवर रात्रीचा छापा घालण्याच्या तयारीत ते आहेत परतु ममाऊदखान व सरजाखान याच्यामध्ये बेबनाव होऊन मोगलाच्या साहाय्याने मराठ्यावर स्वारी करण्याचा त्याचा बेत रहित झाला.

२ मुसलमान बखरकार असे ह्मणतात की, महाराजानीं ह्या समयी मुसलमान साधूला त्रास दिला ह्मणून त्यास लवकर मरण आले. प्रो सरकार ह्मणतात की, ह्या शहरात सय्यद जानमहमद नावाचा एक साधु होता, त्याच्या मठात श्रीमत लोक आपले जडजवाहीर घेऊन जाऊन लपून बसले याचा सुगावा महाराजाच्या लोकास लागून ते त्या मठात शिरले, आणि त्या साधूच्या विनवणीस न जुमानता त्यानी तेथे लपलेल्या सगळ्या सावकारास मारहाण करून त्यांचें सगळे जवाहीर लुटले. असे सागतात कीं, ह्या साधूने शिवाजीमहाराजांस शाप दिला ह्या लुटीनतर पाच महिन्यानीं महाराज मरण पावले. ह्या साधूच्या शापामुळे त्यांचा असा अकाली अत झाला असें मुसलमान लोक ह्मणू लागले

लढाई झाली ह्या वेळीं संताजी घोरपड्यास मोठा आवेश चढून तो अमळ अविचारानें रणकंदनात घुसला. त्यामुळे त्याच्या हाताखालील सैन्यभागात थोडासा घोटाळा झाला, व ह्या हातघाईत सिवोजी निबाळकर पडला तथापि महाराज मुळीच डगमगले नाहींत जिवाची परवा न करिता ते पुढे सरसावून आपल्या लोकास उत्तेजन देऊ लागले आपला धनी स्वत हातात शस्त्र घेऊन सगळ्याच्या पुढे आहे असें पाहून त्यास पराकाष्ठेचा हुरूप येऊन ते शत्रूवर एकदम तुटून पडले त्यामुळे मोगलाचा धीर निघेनासें होऊन ते रानोमाळ पळत सुटले [1] ह्याप्रमाणें मोगलाचा पुरा मोड होऊन महाराज विजयी झाले, व सगळी लूट घेऊन पुढे कुच करू लागले

वर सागितल्याप्रमाणे रणमस्तखानाच्या फौजेची दाणादाण झाली असता त्यास कुमक करण्याकरिता शहाजाद्याने केशनसिंगास [2] फौज देऊन पाठविले. ही अशी मदत पोचल्यावर जिकडेतिकडे पागलेल्या मोगलास पुन दम येऊन ते एकवट झाले, व त्यानीं महाराजास एका खिडीपाशी गाठले ह्या खिडी-तून पार निघून जाण्याचा त्याचा इरादा होता आता ह्या नव्या दमाच्या मोगलसैन्याबरोबर झगडण्याचे त्राण ह्या वेळी आपल्या लोकात मुळीच उरले नाहीं हे त्यास समजून चुकलें होते तेव्हा आता काय करावे ह्या फिकिरीत ते पडले त्याच्याजवळ हिरजी नाईक ह्मणून एक हेर होता, त्यानें हे आपल्या धन्याचे सकट पाहून अशी हमी घेतली की, महाराजाची सगळी लूट व सैन्य मोगलाची गाठ पडू न देता घाट उतरून घेऊन जातो असें ह्मणून त्याने अहोरात्र सारखे कूच करून दुसऱ्याच एका खिडीतून महाराजाचे सगळे लष्कर खाली नेलें. त्याचा सुगावा मोगलास काहींएक लागला नाहीं मराठे आपल्या तळावर नाहींत हें पाहून मोगलाचे लोक ते कोठून कोणीकडे गेले ते पाहू लागले. परंतु त्यास मुळीच पत्ता लागला नाहीं कारण त्याला ती खिडच उमगली नाहीं मग ते ज्या खिडीपाशी महाराजाची वाट पाहत बसले होते तींतून खाली उतरले तो इकडे महाराजाचें सैन्य मोठ्या वेगानें

---

१ काहीं बखरकार ह्मणतात की, हबीरराव ह्या लढाईत जखमी झाला

२ हा जयसिंगराजाचा नातू. ह्याचे नाव सभासद केशरसिंग असे देतो. चित्रगुप्त ह्मणतो की, ह्या केशरसिंगानें तीन कोसावर मुक्काम करून महाराजास असा गुप्त निरोप पाठविला की, तुमचे आमचे बधुत्वाचे नातें आहे आमची गाठ पडली नाहीं तों तुम्ही कूच करून वेगानें निघून जावें.

कूच करून पट्टा येथे [1] सुरक्षित जाऊन पोचलें. ह्याप्रमाणे शत्रूच्या तावडींतून आपण बरेपणी निभावून आपणास ह्या गडावर विश्रांति मिळाली म्हणून त्यांनी त्याचें नाव विश्रामगड असें ठेविलें. मराठे पट्टा येथे जाऊन बंदोबस्तानें राहिले. असें पाहून मोगलसैन्य निराश होऊन माघारी औरंगाबादेस गेलें. ह्या कठीण प्रसंगी हिरजी नाइकानें मोठेंच साहाय्य केलें, म्हणून त्यास महाराजांनी पुष्कळ इनाम दिलें. पट्टा येथे विश्रांति घ्यावयासाठी महाराज कांही दिवस राहिले असतां त्यांनी असा निश्चय केला कीं ह्या गडाच्या आसपास असलेले एकंदर किल्ले काबीज करण्यास ही संधि चांगली आहे, तरी दिलेरखान विजापुराकडे गुतला आहे इतक्यांत हा बेत सिद्धीस न्यावा. मग यांनी मोरोपंतास ही कामगिरी सांगून त्याच्या साहाय्यास कोंकणांतून पायदळ मागविलें, व त्याशिवाय त्याच्या हाताखाली पुष्कळ घोडेस्वारहि दिले. ह्या हुकमाप्रमाणे किल्ले सर करण्याचें काम मोरोपंतानें मोठ्या नेटानें चालविलें. ह्या वेळी त्यानें मुंगीपट्टण शहर काबीज करून शिवनेरी किल्ला मोगलांकडून परत घेण्यासाठी लोक पाठविले. मराठ्यांनी जुन्नर शहरांत प्रवेश करून रात्रीच्या समयीं तीनशें असामी किल्ल्यास दोऱ्याच्या शिड्या लावून वर गेले त्यास तेथल्या किल्लेदारानें कापून काढलें, आणि सकाळच्या वेळीं त्यानें किल्ल्याच्या आसपास कपारींतून व गुहांतून लपून राहिलेल्या मराठ्यांस हुडकून काढलें व त्यास इनामें देऊन परत पाठविलें आणि महाराजांस असा निरोप दिला कीं, " मी येथला किल्लेदार आहे तोंपर्यंत हा किल्ला तुमच्या हातीं लागण्याची आशा धरूं नका."

महाराज पट्टा येथे असतां मसाऊदखानाकडून एक जासूद पत्र घेऊन मोठ्या तातडीनें आला. त्या पत्रांतील आशय येणेंप्रमाणें होता 'तुम्ही ह्या प्रसंगीं ह्या दरबाराशी साधेल तेवढें नेकीनें वागून शहाजीराजाचे योग्य पुत्र आहां असें दर्शविलें. शहाजीराजानीं खाल्लेल्या निमकाचें तुम्हीं चीज केलें. तुमच्याशी ह्या दरबाराचें वैमनस्य असतां, तुम्हीं ऐन प्रसंगी येऊन साहाय्य केलें. तुम्हीं आपल्याकडून अगदीं शर्थ केली. तुम्हीं जी मसलत केली कीं, गलिमाच्याच मुलखांत धामधूम करून त्याला इकडून उखळून काढावें, व मग त्यास चोहोंकडून घेरून मारावें, तीहि उत्तम होती. ह्या मसलतीप्रमाणे त्याच्या सगळ्या मुलखाची तुम्हीं खराबी केली, व त्याचा एकदोन ठिकाणीं चांगलाच पराजय केला. त्याप्रमाणेंच

१ सभासद म्हणतो कीं, ते पावनगडास आले.

आमच्या राजधानीच्या किल्ल्यातहि तुमच्या लोकांनी आह्मास चांगली मदत केली परंतु दिलेरखान केवळ हट्टास पेटला आहे मोगलांनी सगळी दौलत खराब झाली तरी चिंता नाहीं, परंतु विजापूर घेतल्यावाचून येथून जावयाचें नाहीं असा त्याचा निर्धार झालेला दिसतो तो इकडचा वेढा काहीं केल्या उठवीत नाहीं तो राजधानीच्या कोटानजिक येऊन भिडला आहे तरी ह्या समयीं तुमच्याकडून मदत मिळाल्यावाचून आमचा निभाव लागेलसें दिसत नाहीं अशा संकटांत मागचापुढचा काहींएक विचार मनात न आणिता मोठ्या त्वरेनें येऊन आदिलशाहीचें रक्षण केलें पाहिजे ' हा निरोप पोंचताच महाराज पुन विजापुराकडे जावयास निघाले इतक्यात त्यास अशी बातमी आली की, संभाजी पळून जाऊन दिलेरखानास मिळाला तेव्हा हंबीररावास फौजेसह विजापूरकराच्या मदतीस पाठवून आपण स्वत पन्हाळ्यास गेले व संभाजीला शत्रूच्या गोटातून परत कसें आणावें ह्या विचारास लागले

आता संभाजी ह्याप्रमाणे आपल्या तीर्थरूपावर रुसून शत्रूस जाऊन मिळण्याचें कारण येथे सांगणे इष्ट होय संभाजीस सुशिक्षण प्राप्त व्हावें ह्मणून महाराजांनी चांगली व्यवस्था केली होती त्याच्याकडून विद्याभ्यास करविण्यासाठीं, व त्यास सदाचाराचें वळण लावण्यासाठीं, मोठमोठे पंडित ठेवून दिले होते परंतु त्याचा काहीएक उपयोग झाला नाहीं त्याचें वर्तन नेहमी उच्छृंखल असे राज्याधिकार योग्य रीतीनें चालविता येण्यास आवश्यक अशा गुणाचा विकास त्याच्या ठायीं व्हावा एतदर्थ महाराजाचा सदोदित प्रयत्न असता त्यापासून इष्ट परिणाम काहींएक झाला नाहीं त्याला योग्य वेळी युवराज्याभिषेक करिता यावा ह्मणून त्याचा व्रतबंधहि केला होता, परंतु तो सर्वदा उन्मत्तपणें, व अनर्गलपणें वागत असल्यामुळे महाराजास परम खेद वाटे एके दिवशी शितळगौरीप्रीत्यर्थ राजवाड्यात हळदकुंकवाचा समारंभ झाला. किल्ल्यावरील एकंदर सुवासिनी स्त्रिया वाड्यात आल्या, त्यात एक ब्राह्मणस्त्री अत्यंत लावण्यसंपन्न होती तिला पाहून संभाजी अगदी मोहित झाला, व तिला त्यानें महालांत नेऊन तिजवर बलात्कार केला हें वर्तमान महाराजास कळलें तेव्हा त्यास पराकाष्ठेचा संताप आला, आणि ते ह्मणाले " हे राज्याचे अधिकारी असता अगम्यगमन करितात. श्रेष्ठ वर्णाचा असा उपमर्द करितात हें अतिशयित नीच कर्म होय सर्व प्रजा म्हटली ह्मणजे तिला राजानें आपल्या कुटुंबाप्रमाणें लेखलें पाहिजे. असें अत्यंत अनन्वित कर्म केल्याबद्दल यांस शिक्षा अवश्य

केली पाहिजे पुत्र झाले ह्मणून काय झाले ? त्याच्या हातून असें दुष्कर्म होऊं लागलें तर त्याचा आम्ही त्याग केला " असें ह्मणून त्यानी त्याला कैद करून पन्हाळ्यावर नेवून ठेविलें पुढे काहीं दिवसानीं त्यास सक्त कैदेंतून काढून त्याच किल्ल्यावर नजरकैदेत ठेविले ही कैद अर्थात् सभाजीला अगदी असह्य झाली होती तीर्थरूप दूर मोगलाशी लढण्यात गुतले आहेत असें पाहून त्याने पन्हाळ्यावरून पळून जाण्याचा बेत केला, व दिलेरखानास त्यासबंधाने आगाऊ सूचनापत्र पाठविले त्या खानास ही घरफूट पाहून अर्थात् मोठा आनंद झाला सभाजीस सामोरे जाऊन आणण्यासाठी एकलासखान व घेरातखान यास तीन-चार हजार स्वार देऊन पाठविले

ह्याप्रमाणे सभाजी पळून गेला असें कळताच महाराजानी त्याच्या पाठलागास लोक पाठविले इतक्यात सुप्याच्या पलीकडे चार कोसावर सभाजीची व एकलासखानाची गाठ पडून त्यास मोगलाचा आश्रय मिळाला त्याच्या पाठलागास गेलेल्या लोकानी पाहिले कीं, शत्रूच्या लोकाचा जमाव मोठा आहे, त्यावर हल्ला करण्यात काहींएक अर्थ नाहीं ह्मणून ते निराश होऊन परत स्वस्थानी आले इकडे दिलेरखान सभाजीस भेटण्यास एवढा उत्कंठित झाला होता कीं,तो स्वत काहीं लोकानिशी त्यास सामोरा गेला शिवाजीमहाराजाच्या गादीचा वारस आपल्या स्वाधीन झाल्यामुळे त्यास परम हर्ष वाटला त्याला सगळी दक्षिण जिकिल्यासारखे वाटून मोठे समाधान वाटले सभाजी त्याच्या गोटात येऊन पोचल्यावर त्याने नोबती वगैरे रणवाद्याचा गजर करविला. त्याला त्याने सात हजारी सरदार करून राजा हा किताब दिला व एक हत्ती नजर केला

दिलेरखानानें सभाजीचा मोठा आदरमान केला हे वर्तमान औरगजेबास कळविले व त्यास असें सुचविले कीं, सभाजी आपल्या पक्षास येऊन मिळाला हें फार चागलें झालें आहे शिवाजीमहाराजाच्या पदरचे काहीं सरदार संभाजीच्या पक्षास येऊन मिळण्याचा सभव आहे अशी घरफूट झाल्याने ते लवकरच दुर्बळ होतील, व आपला डाव अनायासें साधेल सभाजीला आपल्या एका सैन्यभागावर प्रमुख नेमून त्याच्या बापाविरुद्ध लढण्यास पाठविले असता त्याच्या ताब्यांतले प्रांत व किल्ले काबीज व्हावयास विलंब लागणार नाहीं.'

---

१ हे आपल्या तीर्थरूपाचे क्रोधोद्गार ऐकून सभाजी घाबरून जाऊन रातोरात आपल्या पत्नीस घेऊन पळून गेला, असें कित्येक ठिकाणीं ह्मटलें आहे.

परंतु बादशहास ही सूचना पसंत वाटली नाहीं कारण त्याला असा वहीम येणें साहजिक होते कीं, शिवाजी महाराजाचेच हे कारस्थान असावे संभाजीला त्यानी आपल्या लष्करातील भेद काढावयास किंवा विश्वास दाखवून दगा करावयास पाठविले असावे औरंगजेबाकडून ह्या संबंधाचे निषेधपत्र येऊन पोचण्यापूर्वी दिलेरखानाने संभाजीबरोबर आपले काहीं लोक देऊन त्यास भूपाळगडावर हल्ला करावयास पाठविले हे महाराजांचे अगदी पूर्वेकडील ठाणे असून ते त्यांनी चांगले मजबूत बांधून त्यात धान्याचा वगैरे मुबलक पुरवठा केला होता, व मोगलाशी युद्ध करिताना आपल्या प्रजेस त्यांच्या आश्रयाने राहता यावें अशी तजवीज केली होती त्या किल्ल्यातले लोक मोठ्या निकराने लढण्यास सिद्ध झाले त्यानी मोगलाच्या ह्या वेढ्यास मुळींच दाद दिली नसती परंतु महाराजाचा पुत्र संभाजी प्रत्यक्ष किल्ल्याच्या दरवाज्यापाशी उभा आहे असे पाहून त्याच्यावर गोळागोळी कशी करावी, अशी त्यास पंचाईत पडली संभाजीने त्या किल्ल्याच्या हवालदारास असा दम भरला की, दरवाजा उघडला नाहींस तर शिरच्छेद करीन तेव्हा अर्थात् किल्ल्यावरील लोकास मोठी दहशत पडली ते वाट फुटेल तिकडे पळत सुटले ह्या किल्ल्याचा हवाला फिरंगोजी नरसाळा याजकडे होता शास्ताखानाने चाकणच्या किल्ल्यास वेढा घातला असता ज्याने तो किल्ला मोठ्या शौर्याने लढविला तोच हा वीर होय परंतु ह्या प्रसंगी त्याच्या लोकाचा धीर न निघून ते त्याला भराभर सोडून गेले तेव्हा त्याचा निरुपाय झाला त्याचें अवसान अगदी खचले बरे, शत्रूवर तोफांचा भडिमार करावा तर संभाजी पुढें उभा आपल्या धन्याच्या पुत्रावर गोळा सोडता तर येत नाहीं, अशा पेचात तो सापडला ह्मणून तो रात्रीच्या वेळी किल्ला सोडून पळून गेला त्यामुळे तो किल्ला मोगलाच्या हाती सहज लागला. किल्ल्यावर काहीं लोक राहिले होते ते सगळे मोगलानी पकडले दिलेरखानाने तेथे येऊन सातशे योद्ध्याचे डावे हात तोडविले, व इतर लोकाना पकडून गुलाम केलें त्या निरपराध लोकास असें छिन्नभिन्न केलें हें क्रूर कर्म संभाजीस पसंत वाटले नाहीं. ही उग्र शिक्षा करण्याचे कारण अर्थात् असें असावे कीं, इतर किल्ल्यावरच्या लोकास तेणेंकरून दहशत पडावी. त्याला तेथे पुष्कळ लूट सापडली जी चीजवस्त त्याला नेता आली नाहीं ती त्यानें जाळून टाकिली, व किल्ल्याची तटबंदी वगैरे पाडून टाकून तो अगदीं उजाड केला. ह्या किल्ल्यावर मोगलानी चढाई केल्याचें वर्तमान ऐकून महाराजांनीं त्याच्या रक्षणासाठीं सोळा हजार घोडदळ पाठविलें.

परंतु ते तिकडे जाऊन पोचण्यापूर्वीच किल्ला वर सांगितल्याप्रमाणे मोगलाच्या हातीं जाऊन त्याची दुर्दशा झाली महाराजाच्या लोकांनी मोगलाच्या सैन्यावर दुरून दुरून छापे घालून तीस हैराण केले त्याचा सरदार इराजखान व बजाजी निंबाळकर हे दिलेरखानाच्या सैन्यासाठीं अन्नसामग्री घेऊन जात होते त्यास गाठून त्यांनी त्याचा पुरा मोड केला व त्याच्या ताब्यातले सगळे धान्य वगैरे लुटले सभाजीमुळे भूपाळगड आपल्या हातचा जाऊन आपल्या लोकांची अशी दुर्दशा झाली, तरी पुढे आणखी असा प्रकार होऊं नये ह्मणून त्यांनी इतर किल्लेदारास अशी ताकीद दिली कीं, सभाजी बेदिल होऊन मोगलाकडे पळून गेला आहे तो त्याचे लोक घेऊन कोणत्याहि किल्ल्यापुढे आला असता त्यास यत्किंचित्‌हि जुमानूं नये त्याच्याशी बेलाशक लढावे किल्ला सोडून देऊं नये

मग महाराजांनी सभाजीकडे कारकून पाठवून त्यास येणेप्रमाणे बोध करविला 'हे असें वर्तन तुह्मी करीत आहां हे काय? आह्मी श्रम करून स्वराज्य स्थापिलें ते तुह्मासाठीं की दुसऱ्या कोणासाठी? यवनास सामील होऊन पुन हे राज्य त्याच्या घरात घालण्याची ही बुद्धि तुह्मास कोठून सुचली? ह्यापासून अपाय कोणास होणार? तुह्मास की आह्मास? आह्माविषयीं ह्मणाल तर आह्माला ह्यापुढे काहींएक कर्तव्य उरले नाही एकाद्या क्षेत्रांत जाऊन राहावे, किंवा रामदासगुरूपाशी जाऊन बसावे, असें आमच्या मनात अलीकडे आले आहे. तेव्हा हे राज्य नष्ट झाले तर त्यात हानि तुमचीच आहे. मागे झाल्या गोष्टी त्या झाल्या त्या मनात न ठेविता निघून यावे याउपर शत्रूकडे राहूं नये खासगी खर्चास तालुका लावून घेऊन पाहिजे तेथे राहावे. कारभार आटपवेल तितका करावा' हा व अशाच आशयाचा पुष्कळ बोध त्या कारकुनाने केला, पण त्यामुळे सभाजीचे डोळे काहीं उघडले नाहींत

तिकडे हंबीरराव मोहिते सरनोबत महाराजाच्या हुकमाप्रमाणे सैन्य घेऊन विजापूरकराच्या मदतीस चालला असता त्याला रणमस्तखानानें आठनऊ हजार स्वारानिशीं वाटेत गाठले उभय पक्षाची लढाई झाली तींत तो मोगल सरदार पराभव पावून पळून गेला. मग हंबीरराव दिलेरखानाच्या छावणीजवळ जाऊन तिजवर वेळोवेळा छापे घालूं लागला त्याच्या लष्करास दाणावैरण कोठूनहि मिळूं नये असे त्याने केलें त्यामुळे मोगलाचा उपासमार होऊं लागला. हत्ती, घोडे व माणसें अन्नावाचून पटापट मरूं लागली तेव्हा अर्थात् खानाचा

उपाय खुटून त्यास आपला तळ हलवावा लागला, व मराठ्याच्या तावडीतून जेमतेम सुटून कसाबसा एकदाचा तो औरंगाबादेस येऊन पडला हबीररावा-पाशी सैन्याचा जमाव मोठा नसल्यामुळे खानाशी त्याला सामना करिता आला नाहीं तरी त्याचे सैन्य औरंगाबादेस जाऊन पोचेपर्यंत सेनापतीने त्याचा चाग लाच पाठपुरावा केला

इतक्याने दिलेरखानाची रग काही जिरली नाहीं पावसाळा सपताच त्याने पुन आपल्या फौजेची तयारी केली, आणि विजापूरसरकाराच्या मुलखात शिरून तो लुटालूट करू लागला त्याचा वर सागितल्याप्रमाणे पराभव आला असल्यामुळे त्याला पराकाष्ठेचा चेव येऊन त्याचा सूड विजापूरसरकारच्या गरीब रयतेवर उगविण्याचा क्रम त्याने मोठ्या निर्दयपणाने चालविला पुरुष, बायका व मुले पकडून त्यास गुलाम करण्याचा सपाटा त्याने सुरू केला हिंदु-मुसलमानाच्या बायकानी त्याच्या हाती लागून विटबना व्हावयाची ती टाळ-ण्यासाठी विहिरीत व तलावात उड्या टाकून प्राणत्याग केला ! त्याने गावचेगाव लुटून, जाळून बेचिराख केले एका मोठ्या गावातले तीन हजार हिंदु रहिवासी पकडून त्यास त्याने गुलाम ह्मणून विकून टाकले अथनी नावाचे एक मोठे व्यापाराचे शहर होते ते लुटून त्याने साफ जाळून टाकले व त्यात सापडलेल्या सगळ्या हिंदु लोकास गुलाम करून नेले त्या वेळी सभाजी त्याच्या बरोबर होता त्याला खानाचे हे अत्यंत भयकर क्रूरकर्म पाहून पराकाष्ठेचे वाईट वाटलें आणि त्याबद्दल त्याने त्याचा निषेध केला पण खानाने काहीं आपला घोर क्रम सोडला नाहीं हे त्याचे घोर कर्म पाहून सभाजीचे डोळे उघडले आणि त्यानें स्वीकारलेल्या क्रमाचा त्यास पश्चात्ताप झाला हंटी ह्मणून एक मोठे शहर होतें तें त्याने लुटून कृष्णानदीस उतार मिळताच तिच्या पलीकडे जाऊन त्याने कर्ना-टकात लुटालूट चालविली ह्या वेळीं त्याने आपल्या सैन्याच्या दोन टोळ्या करून दोन बाजूस रवाना केल्या. एका टोळीवर अर्थात् आपण स्वत प्रमुख झाला जनार्दनपंतास ही त्याची धामधूम कळताच त्याने सहा हजार लोकानिशीं त्याच्यावर हल्ला केला, व त्याच्याशीं लढून त्याचा अगदी मोड करून टाकला. तो व त्याचे लोक मराठ्याच्या मारापुढे हतवीर्य होऊन पळत सुटले ह्याप्रमाणें मोगलाची एक टोळी उधळून लाविल्यावर जनार्दनपंताने त्याच्या दुसऱ्या टोळीस गाठून तीहि कापून काढिली हा असा पुरा पराभव झाल्यामुळें खान अगदी सर्द होऊन मागे पळत सुटला. ह्या वेळी महाराजानी भूपाळगड पुनरपि

काबीज करून त्याची दुरुस्ती केली व त्यावर पुन आपले ठाणें बसविलें, असें ह्मणतात

दिलेरखानाची अशी दुर्दशा उडाल्याचें वर्तमान ओरंगजेबास कळले तेव्हा त्याचा त्याला फारच राग आला त्याचें हे करणे त्याला मुळीच आवडलें नाहीं आपल्या सुभ्याचा बदोबस्त राखण्याचें सोडून तो विजापूरकराशी लढाई कराव यास गेला ह्मणून त्यास त्यानें टपका दिला, व त्यास असा हुकूम पाठविला कीं, 'शिवाजीमहाराजाचा पुत्र सभाजी हा तुमच्याकडे आला आहे, त्यास सरदारी देऊन आपल्या लष्करात ठेवणे धोक्याचें आहे कारण तो काहीं तरी फितवा-फितवी करून आपला पुरा नाश करण्यास चुकणार नाही यास्तव त्यास कैद करून दिल्लीस पाठवावें ' हा बादशहाचा हुकूम दिलेरखानास मुळीच आवडला नाही त्यान सभाजीस आपल्या गोटातून पळून जावयास सागितलें त्यावरून सभाजी तेथून लगबगीने निघून महाराज पन्हाळयाजवळ होते तेथे येऊन त्यास भेटला ह्या वेळी पन्हाळाकिल्ल्यावर दिलेरखान सभाजीसहवर्तमान हल्ला करण्याच्या बेतात आहे असं कळल्यावरून महाराजानी ह्या किल्ल्याची चागली मजबुदी केली होती फ्रेंचाकडून घेतलेल्या पन्नास तोफा ह्या किल्ल्यावर त्यानी लावून ठेविल्या होत्या

ह्याप्रमाणे सभाजी परत आला त्यास भेटून महाराजानी त्याच्याशी येणेप्रमाणे बुद्धिवाद केला: " तुम्हीं आह्मास सोडून मोगलास जाऊन मिळाला ही फार वाईट गोष्ट केली औरंगजेबाशी आपला दावा असून दिलेरखानाचें आणि आपले हाडवेर आहे असें असता त्यांच्या तावडीत तुह्मी आयतेच जाऊन पडला हें मोठेंच धाडस केलें त्यानी तुह्माला दगाच करावा. परतु जगद-बेची कृपा होती ह्मणून तुम्हीं त्याच्या हातून जिवानिशीं सुटून आला. हा एक

१ प्रो सरकार ह्मणतात की, दिलेरखानाचा पूर्वोक्त प्रकारचा क्रूरपणा पाहून सभाजीस त्याचा वीट येऊन तो त्याच्या छावणीतून विजापुराकडे पळाला त्याच्या बरोबर त्याची स्त्री येसूबाई ही होती, तिला त्याने पुरुषवेश दिला होता विजापुरास मसाऊदखानानें त्याचा आदरमान करून त्यास आश्रय दिला दिलेरखानास हे कळताच मसाऊदखानास लाच देऊन सभाजीस परत पकडून आणण्यासाठी त्याने आपला एक सरदार पाठविला. ह्या गोष्टीचा सुगावा लागताच सभाजी विजापुराहून रातोरात पळाला, आणि महाराजानीं त्याला घेऊन यावयास पाठविलेल्या लोकास भेटून तो पन्हाळ्यास येऊन पोंचला.

दिलेरखानाचा आमच्यावर उपकारच झाला. तुम्ही हिंदुपदपादशाहीचे अधिकारी असून थोर कुळात उत्पन्न झाला आहा तुम्ही काहीं सामान्य नाहीं. ही आमची सगळी कमाई तुमच्यासाठी आहे. असे असता य:कश्चित् सरदार जो दिलेरखान त्याच्या आश्रयास तुह्मी जावे आणि आपला अपमान व घात करून घ्यावा हे तुह्मासारख्या बुद्धिमान्, हुशार व अभिमानी पुरुषास शोभलें तरी कसे ? तुम्ही पुढे आमच्या गादीचे मालक होणार तेव्हा ही सर्व प्रजा तुह्मास लेकरासमान वाटली पाहिजे तिच्या वित्ताचे जीविताचे व अब्रूचे रक्षण करणे हें तुमचे परम पवित्र कर्तव्य आहे असे असता तुह्मीच जर अनन्वित कर्म करून आपल्या प्रजेस दु:ख देऊ लागला तर तिचे पालन व्हावे कसें ? अगम्यागमन किंवा परस्त्रीगमन हे यश क्षय करून पुरा नाश करणारें आहे रावणादि राज्यकर्त्यांची ह्या पातकामुळे कशी दुर्दशा झाली, व तेणेंकरून राज्यभ्रंश व कुलक्षय कसा झाला, याचा विचार मनात आणा तुमच्या अंगचा हा महादोष निघावा ह्मणून मी केवळ पुत्रवात्सल्यास्तव तुह्मांस थोडीशी शिक्षा केली तीबद्दल तुह्मास विषाद वाटून तुम्ही हा अविचार केला पण त्यामुळें कांहीं अनिष्ट प्रकार घडला नाहीं, हा जगदंबेचा आह्मावर मोठाच प्रसाद झाला आता हे ढंग तुह्मी पुनरपि करू नका अशी घरफूट झाल्याने शत्रूस आनंद वाटून आमचा नाश करण्याच्या कामी त्यास मोठा हुरूप येईल यवनाच्या ताबेदारीतून सुटण्याचा दीर्घ परिश्रम आह्मी इतकीं वर्षे अव्याहतपणें करून स्वातंत्र्य व स्वराज्य हीं संपादिलीं असता, त्या गोष्टीची कांहीं दरकार न धरितां पुन: यवनाच्या आश्रयास जाण्याची तुह्मास दुर्बुद्धि सुचावी हें मोठेंच दुर्भाग्य होय तुह्मास राजपद भोगावयाची इच्छा झाली असल्यास ह्या राज्याचे दोन विभाग करून तुंगभद्रेपासून कावेरीपर्यंतचा सगळा मुलूख तुह्मास देतो, व नर्मदानदीपासून तुंगभद्रानदीपर्यंतचा मुलूख राजारामास देतो, आणि मी स्वत: एकाद्या पुण्य क्षेत्रात जाऊन बसतो, किंवा रामदासस्वामींच्या चरणापाशीं राहून उरलेलें आयुष्य परमेश्वराच्या भक्तींत घालवितों परंतु ही व्यवस्था लावीतोंपर्यंत तुह्मास पन्हाळ्यावर अटकेत ठेवणें प्राप्त आहे कारण तुमचा आता मला भरंवसा वाटत नाहीं. रायगडावर जाऊन राजारामाचें लग्न करून येतों, आणि मग पुढें काय करावयाचें तें पाहतों. ' असें बोलून त्यानीं संभाजीस पन्हाळ्यावर पुन: नजर कैदेंत ठेविलें. त्याच्या खर्चासाठी त्या प्रातातील तीन लक्ष उत्पन्नाचा तालुका लावून दिला. त्याचा कारभार पाहावयास विठ्ठल त्रिंबक देशपांडे यास खासनीस

हा हुद्दा देऊन ठेविलें,[1] त्याच्या बंदोबस्ताकडे सोमाजी नाईक बंकी, बावाजी नाईक समशेरबहादर व बावाजी टमढेरे ह्या परम विश्वासू सरदारास ठेविलें, व त्यास असा हुकूम देऊन ठेविला की, संभाजीशीं नित्य बुद्धिवाद करून त्यास वाटेवर आणण्याचा उपाय करीत राहावें, त्याच्याशी मोठ्या युक्तीने वागावें, त्यास आमच्या आज्ञेवाचून गडाखाली कदापि उतरूं देऊं नये, आणि किल्ल्याचा एकंदर बंदोबस्त तेथील हवालदाराच्या हाती असावा, त्यात संभाजीस सहसा हात घालूं देऊं नये संभाजीच्या खर्चास लावून दिलेल्या प्रांताची व्यवस्था जनार्दन नारायण सुमंत याजकडे सोपून त्यालाहि त्याच्यावर नजर ठेवावयास सांगितले

वर सांगितल्याप्रमाणे मोगलसैन्याची खराबी होऊन त्यास परत जावे लागून विजापुरास त्याच्या कचाटीतून सुटल हे संकटनिवारण शिवाजीमहाराजांच्या साहाय्याने झाल्यामुळे त्यास त्या सरकारांतून एक पत्र आले त्यातील आशय असा होता की, ' तुम्हीं आम्हास ह्या प्रसंगी चांगली मदत करून शत्रूच्या ताव-डीतून सोडविलें, हा तुमचा मोठाच थोरपणा व कुलीनपणा होय तुम्हीं शहाजीराजांचे पुत्र त्यांच्या ॠणांतून आज उतराई झाला आमच्या सरकाराशी तुम्ही विरोध केल्यामुळे तुमचे व ह्या सरकाराचे वर इतके दिवस चालले अजून तुमच्या वर्तनास्तव शहाजीराजास आमच्या सरकाराने फारच त्रास दिला, असे असून तुम्ही हा सगळा अपकार मनास न आणिता आमच्या विनंतीस मान देऊन आह्मास योग्य प्रसंगी मदत केली, यामुळे तुमची दिगंत कीर्ति झाली आहे,' हे पत्र वकिलाबरोबर पाठवून महाराजास वस्त्र, जवाहीर, हत्ती, घोडे वगैरे नजर पाठविले त्या पत्रास महाराजांकडून असा जबाब गेला की, " आम्ही तुमच्या पादशाहतीतील इतका मुलख काबीज केला असूनहि आमचे तीर्थरूप आह्मास बिलकुल सामील नाहीत अशी आपली खात्री झाली तेव्हा त्यांच्याकडे असलेली जाहगीर अद्यापपावेतों कायम राखून त्यांचे व त्यांच्या मागे त्यांच्या दुसऱ्या पुत्राचे थोर मनाने चालविलें, हा आमच्या घराण्यावर आपला मोठाच उपकार झाला आहे आम्ही तुमच्याच आश्रयाने आजपर्यंत वाढलो आहो आम्हीं जी काही दौलत मिळविली आहे व जी फौज जमविली आहे ती निदानी तुमच्या उपयोगी पडावी यातच आह्मास कृतकृत्यता वाटते. तुमच्या सरकाराचे ताल सबळ होते ह्मणून तुह्मास ही फत्ते मिळाली आमच्या

१ हा प्रसिद्ध मुरार बाजी देशपांडे यांचा नातू

कडून झाले तितके आम्हीं केलें. यानंतर सकट पडेल तेव्हा साहाय्य करण्याविषयीं आह्मास अवश्य लिहावे मनात काहीं दुजाभाव वागवू नये ' हा जबाब आपल्या वडिलाच्या हाती देऊन त्यानी अदिलशहास यथोचित नजरनजराणा पाठविला, व तहाच्या अटीची यादी त्याच्याकडे दिली तीतील कलमे येणेप्रमाणें होती (१) कोपल व बेलवाडी (बिलारी) ह्यासभोवतालचा मुलूख आमच्या स्वाधीन करावा, (२) द्रविडदेशात जो मुलूख आम्हीं काबीज केला आहे त्याच्यावर अदिलशहाने काहींएक हक्क सागू नये (३) तजावर वगैरे जे प्रात शहाजीराजाच्या जाहगिरीत मोडतात त्यावर अदिलशहाने कोणत्याहि प्रकारचा ताबा चालवू नये, तर त्यावर आमचा पूर्ण अमल चालावा आणि (४) प्रसगोपात्त एकमेकानी एकमेकास साहाय्य करावे ह्या अटी मसाऊदखानाने कबूल करून ह्या आशयाचा तह मजूर झाला मग महाराज मसाऊदखानाच्या भेटीसाठी विजापुराकडे गेले, व त्याचे आणखी काही गुप्त खलबत झाले ह्या वेळी महाराजाच्या मनात असें आले कीं, विजापुरशहरात जाऊन अदिलशहाची भेट घ्यावी मसाऊदखानाने ह्या त्याच्या उद्देशास अनुमोदन देऊन पाचशे लोकासह विजापुरास अदिलशहाच्या भेटीस यावे असा त्यास निरोप पाठविला परतु मोरोपंत पिगळ्याने त्यास असले धाडस करू नये असे सुचविल्यावरून त्यानी हा बेत रहित केला

ह्याप्रमाणें कर्नाटकातील व द्रविड देशातील प्रातावर शिवाजीमहाराजाचें प्रभुत्व विजापूरसरकाराने कबूल केल्याचे वर्तमान व्यंकोजीराजास कळलें तेव्हा त्यास अतिशयित विषाद वाटला, व आपले स्वातंत्र्य आता अगदीच नष्ट झालें असे त्याला वाटू लागले आधीच महाराजानी त्याच्यावर रघुनाथपताचा शह पुरा बसवून त्याच्या जाहगिरीची बहुतेक व्यवस्था आपल्या हाती घेतली होती त्यात आणखी विजापूरसरकाराने त्या जाहगिरीवर आपला काहींएक ताबा नाहीं असें सदरील तहात कबूल केल्यामुळे त्या सरकाराकडून मागपुढे काहीं मदत मिळून आपण आपल्या बधूच्या शहातून मुक्त होऊ अशी थोडीशी आशा त्याच्या मनात होती ती समूळ खुटली ह्यामुळे ते अगदी उदास होऊन बसले आपल्या नित्यव्यवहाराकडे दुर्लक्ष करून ते विरक्तासारखे वागू लागले त्याच्या वृत्तीत जो हा पालट झाला त्याविषयी रघुनाथपताने महाराजास कळविल्यावरून त्यानीं त्यांस पुढील आशयाचे एक पत्र पाठविलें "पुष्कळ दिवस झाले, तुमच्याकडून पत्र येऊन कांहींएक वर्तमान कळलें नाहीं. त्यामुळें जिवास काळजी

लागली आहे रघुनाथपंत लिहितात कीं, तुह्मी उदास व खिन्न होऊन आपल्या देहाची निगा राखीत नाहीं तुह्मास आपल्या जिवाचा कंटाळा आला आहे तुह्मी कोणतेहि सण किंवा उत्सव करीत नाहीं तुमची सेना बहुत असून ती स्वस्थ बसली आहे तुह्मी दरबारच्या कामकाजात मुळींच लक्ष घालीत नाहीं तुह्मी पुरे वैरागी बनून कोणत्या तरी पवित्र स्थानीं बसून काळ दवडणाऱ्या गोष्टी बोलत आहां असा पुष्कळ मजकूर ते तुमच्या संबधानें लिहितात तो वाचून आह्मास फार खेद झाला आहे आमच्या वडिलांचें उदाहरण तुमच्यापुढे असतां तुमची वृत्ति अशी व्हावी याचें आह्मांला नवल वाटतें सर्व संकटाच्या संगी ते कसे वागले, त्या प्रसंगाचें निवारण त्यांनी कसें हुशारीनें, धैर्यानें व दृढ निश्चयानें केलें आणि मोठा लौकिक व मान संपादून तो कसा आमरण राखिला, याचा अमळ विचार करा त्याचें हें उज्ज्वल चरित्र तुमच्या डोळ्यासमोर घडलें त्याचा तुह्मास नित्य समागम घडला असून त्याची हुशारी व चाणाक्षपणा हीं तुह्मास नेहमी पाहावयास मिळत त्यामुळे तुमचा त्यापासून पुष्कळ फायदा व्हावा आह्मी स्वतः अनुकूल स्थित्यनुसार स्वरक्षण करून स्वराज्य कसें संपादन केलें हें तुह्मास विदित आहेच तुह्मास सांप्रत चांगली अनुकूळ साधनें प्राप्त झाली असतां तुह्मी सर्व प्रपंचाचा त्याग करून वैरागी बनावें हें तुह्मास उचित आहे काय ? तुह्मी आपला सगळा कारभार दुसऱ्याच्या हातीं द्यावा, आणि त्यांनी तुमचें संस्थान गिळंकृत करावें हें चांगलें काय ? तुह्मी आपल्या दौलतीचा नाश होऊं द्यावा व स्वतास अपाय करून घ्यावा हे बरोबर नाहीं हा कसला शहाणपणा ? व याचा शेवट काय होईल बरे ? आह्मी तुमचे वडील बंधु असून तुमचें संरक्षण करण्यास सर्वदा तत्पर आहों आमच्यापासून तुह्माला काहीएक भीति बाळगायाला नको तरी आता ही वृत्ति सोडून द्या विरक्त होऊं नका, उदासीनता टाका सुखानें काल क्रमणा करा व्रतें, उद्यापनें, सण, उत्सव व इतर व्यवहार नीट पाळा आपल्या जिवास जेणेंकरून सुख होईल त्याजकडे लक्ष पुरवा आपल्या पदरच्या लोकांस रिकामे बसू देऊं नका आपल्या लष्कराची व्यवस्था नीट राखा महत्त्वाच्या राजकारणांत मन घाला आपल्या पदरच्या लोकांकडून आपआपली कामें नीट करून घ्या. त्यास कामगिऱ्या सांगून त्या ते बरोबर रीतीनें बजावितात कीं काय तें दक्षतेनें पाहा. योग्य रीतीनें वागून नावलौकिक संपादन करा. तुह्मी आमचे धाकटे बंधु. तुमची कीर्ति व उत्कर्ष झालेला आमच्या कानीं आल्यानें आह्मास

समाधान वाटेल. तुमच्या सन्निध रघुनाथपंत आहेत ते कोणी परके नाहींत. कोणत्या प्रसगी कोणती गोष्ट करणें उचित आहे तें त्याच्या मसलतीनें ठरवीत जा ते तुह्मास आमच्या प्रमाणेच मानून चालतील आमचा सर्व भरवसा त्याच्यावर आहे तसाच तुह्मीहि त्याच्यावर भरवसा ठेवा त्यास सहसा सोडू नका त्याचा तुह्मास व तुमचा त्यास पूर्ण आश्रय असावा येणेकरून तुमची ख्याति होईल विशेष सागावयाचें ते हेच कीं, आळस करू नका अनुकूळ संधि येईल ती व्यर्थ दवडू नका आपल्या लष्कराकडून काहीं तरी कामगिरी करून घेत चला हे वय पराक्रम करण्याचें आहे वैरागी व्हावयाचे ते वृद्धापकाळीं व्हावे तर आता उठा, उदासीनता टाका, आळस झाडा, आणि काहीं तरी पराक्रम करून आह्माला दाखवा तुह्मी सुज्ञच आहा तुह्मास बहुत काय लिहिणें ?"

हें महाराजाचे व्यकोजीराजास बहुतेक शेवटलेच पत्र असावें त्यानंतर लवकरच त्याची प्रकृति बिघडून त्यातच त्याचा अत झाला

# भाग अट्ठाविसावा



## इंग्रज व शिद्दी.

### १६७४–८०

महाराजांनीं स १६६१ त राजापुरशहर लुटले, स १६६४ त सुरतशहर पहिल्याने लुटले, स १६६५ त कारवारशहरावर हल्ला करून खड बसविला, स १६७० त सुरतशहर पुन लुटले, व स १६७३त हुबळीशहर लुटले ह्या सर्व ठिकाणी इंग्रजांच्या वखारी असून त्याचे त्या त्या प्रसगी बरेच नुकसान झाले होते, हे मागे सागितलेच आहे राजापुरशहर महाराजाच्या ताब्यात आल्यावर तेथील वखार इंग्रजानी उठविली होती स १६६८ त सुरतेच्या इंग्रजव्यापाऱ्यानी मुबईबेटात वखार घालून तेथे आपले कायमचे ठाणें केले, व सभोवतालच्या मुलखात व्यापार सुरू केला

ह्या बेटाच्या लगत्यास साष्टीप्रातात फिरग्याचा अमल होता त्यास मुबईबेट आपल्या हातचे गेल्यामुळें फार वाईट वाटले, व ते इंग्रज व्यापाऱ्याशी द्वेष करू लागले ते आपल्या ताब्यातील प्रातात त्यास कोणत्याहि प्रकारचा व्यापार करू देईनात मुबईतील इंग्रजास धान्यादिकाचा पुरवठा साष्टीप्रातातून मुळीच होईना, त्यामुळें त्यास दुसऱ्या प्रातातून दाणागल्ला आणावा लागत असे आता साष्टी खेरीज करून मुंबईच्या आसपासच्या इतर प्रातावर शिवाजीमहाराजाचा अमल होता यास्तव त्याच्याशी सलोखा ठेवण्यात आपले हित आहे असें इंग्रजास वाटणें साहजिक होते शिवाय महाराजाचीहि ह्या लोकावर वक्रदृष्टि असण्याचे काहीएक कारण नव्हते ते कुशल व्यापारी व हुशार दर्यावर्दी आहेत असें त्याजविषयी महाराजाचे मत होते त्याच्या व्यापाराने आपल्या मुलखाचे हित आहे असें त्यास वाटे दुसरें असें कीं, शिद्दीशीं महाराजास वारवार युद्ध-

---

१ हे बेट इंग्लडच्या दुसऱ्या चार्लसराजाला स १६६१ त पोर्तुगालच्या राजाच्या मुलीशा विवाह केल्याबद्दल आदण ह्मणून मिळाले होते हे चार्लसराजाने ईस्ट इन्डिया कपनीला प्रतिवर्षी दहा पौंड घेण्याचे ठरवून स १६६८ त दिले होते हे सुरत येथल्या इंग्रज व्यापाऱ्याचा प्रमुख सर जॉर्ज ऑक्झिन्डन याच्या हवाली केले.

प्रसंग करावे लागत, यास्तव त्यांच्याकडून आरमाराची वगैरे मदत आपणास मिळेल अशी त्यास आशा होती. त्यांची जहाजें मजबूत व मोठी असत. अशी जहाजें आपणास त्यांच्याकडून मिळतील व चांगल्या बंदुका, तोफा व दारूगोळा ते आपणास पुरवितील असें महाराजास वाटे. आणखी असे की, शिद्दी मोगलाच्या साहाय्यानें इंग्रजांच्या ह्या बंदरांत शिरून आपल्या कुलाबा वगैरे प्रांतांत उपद्रव करील अशी भीति त्यास नेहमी असे. ती टाळण्याचा एक उपाय ह्मटला ह्मणजे इंग्रजांस आपले स्नेही करून ठेवणें हा होय, असें त्यांचे धोरण होतें. खरें ह्मटलें असतां इंग्रजांस ह्या बेटांतून हाकून देऊन तेथें आपलें ठाणें बसविण्यास महाराजाला कांहीं कठीण होतें असें नाहीं. परंतु अशा परदेशांतील व्यापाऱ्यास विनाकारण त्रास द्यावा, व आपल्या मुलखाशीं त्यांचा व्यापार होत आहे तो बंद पाडावा हें त्यास बरोबर वाटलें नसावें. सगळ्या पश्चिमकिनाऱ्यावर आपली सत्ता बसवावी, असा दृढ संकल्प महाराजाचा होता. पण तो साध्य व्हावयास चांगलें मजबूत आरमार आपणास तयार केलें पाहिजे असें त्यास वाटे, व हें तयार करण्याच्या कामी ज्यांच्याकडून साहाय्य होण्याचा संभव असे त्यास ते सांधेल तेवढें न दुखविण्याचा प्रयत्न करीत. ह्याच कारणास्तव ते फ्रेंच, डच वगैरे परस्थ व्यापाऱ्यांशीं मित्रभावानें वागत. फिरंगीलोकांशीं त्यांचा पहिल्यापहिल्यानें सलोखा असे. परंतु त्यांच्यांत धर्म-वेडाचा फैलाव झाल्यामुळें ते हिंदु प्रजेस छळूं लागले हें महाराजास खपेनासें होऊन ते शेवटींशेवटीं त्यांशीं वैर करूं लागले होते. तरी ते तहाप्रमाणें तोफा, बंदुका व दारूगोळा प्रतिवर्षी पुरवीत. यास्तव महाराजांनीं त्यांची थोडीशी सबुरी केली होती. ते आणखी कांहीं वर्षे जगले असते तर फिरंग्यांचा त्यांनीं ह्या देशांतून पुरा उठावा केला असता.

आतां, इंग्रज व्यापारी सुरतेस मोगलाच्या आश्रयानें असल्यामुळें त्यांच्या-कडून आपणास फारसें साहाय्य होईल असें महाराजास वाटत नसे. ह्मणून त्यांनीं त्यांच्या वखारी वारंवार लुटल्या. परंतु पुढें सदरीं निर्दिष्ट केल्याप्रमाणें इंग्रज व्यापारी मुंबईस येऊन राहिल्यावर त्यांचा महाराजाशीं अधिक निकट संबंध आला. इंग्रज व्यापाऱ्यास मुंबईबेट मिळाल्यावर चार वर्षांनीं ह्मणजे स. १६७२ त आंगिअर नावाचा एक हुशार व धोरणी गवर्नर तेथल्या वखारी-वर आला. त्यानें शिवाजीमहाराजाशीं कायमची मैत्री करण्याचा विचार मनांत आणिला, व त्या उद्योगास तो लागला, इकडे शिद्दीच्या मनांतहि असा उद्देश

होता कीं, इंग्रजास अनुकूळ करून घेऊन मुंबईबेटाच्या बंदरात आपलें आरमार न्यावें, व तेथून शिवाजीमहाराजाच्या कुलाबा वगैरे प्रांतास उपद्रव द्यावा. तो मोंगलाचा तावेदार झाल्यावर त्या सरकाराचें आरमारहि त्याच्या स्वाधीन झालें होते, व त्या सरकाराच्या वशिल्याने तो मुंबईबंदरात प्रवेश करावयास जेव्हा तेव्हा पाहत असे परंतु आंगिअर त्यास तसें करूं देत नसे सुरतेचा मोंगल-सुभेदार त्यास वेळोवेळा निरोप पाठवी कीं, शिद्दीस तुमच्या बंदरात येऊं द्या पण आंगिअर शिवाजीमहाराजाच्या धाकाने त्या गोष्टीस कदापि कबूल होत नसे हें त्याने लिव्हाईतपणाचें वर्तन महाराजास पसंत वाटे, व त्याचें त्याच्याविषयीं चांगलें मन झालें होतें

महाराजाच्या फौजेची फिरंग्याच्या वसईप्रांतालगत किल्ले वगैरे बांधण्यासंबंधाची धामधूम सुरू झाली तेव्हा त्याचा आपणासहि कदाचित् उपद्रव होईल ह्या भीतीने आंगिआर याने त्याच्याशी सलोख्याचा तह करण्यासाठी लेफटेनन्ट उस्टिक यास त्याच्याकडे पाठविलें[1] परंतु तो राजापूर व हुबळी येथे झालेलें एकंदर बत्तीस हजार होनांचें नुकसान भरून द्यावें असें एक कलम पुढें करूं लागला, ह्मणून त्यांनी त्या वेळी इंग्रजांशी तह केला नाहीं पुढें पुनः दुसऱ्या वर्षी आंगिअर याने निकल्सनामक एक वकील संभाजीच्या मार्फत तह करण्यास महाराजाकडे पाठविला पण ह्या वेळी सुद्धा उभय पक्षाचे करारमदार जमले नाहींत महाराजाचें ह्मणणें असें होतें कीं, 'राजापूर येथे तुमच्या मंडळीचें नुकसान झालें आहे तें आम्ही भरून देऊं परंतु तुमच्या लोकांचें जे काहीं व्यक्तिशः नुकसान माझ्या लोकांनी केलें असेल तें मजकडे मागूं नका कारण तें

१ ह्या वेळी महाराजांनी ह्या इंग्रज व्यापाऱ्याकडे दारूगोळ्याची वगैरे मागणी केली होती ती त्यांनी मान्य केली नाही ह्मणून त्याच्या जहाजांस आपल्या ताब्यातील कोंकणच्या बंदरांत येण्याची महाराजांनी मनाई केली त्यामुळे त्यास सरपण वगैरे मिळण्याची पंचाईत पडूं लागली ह्मणून त्यांनी लेफटनन्ट उस्टिक यास महाराजाकडे पाठविलें त्यास दारूगोळा पुरविण्याची लालूच दाखवून त्यांनी राजापूर लुटलें तेव्हा इंग्रज व्यापाऱ्याचें जे नुकसान झालें होतें त्याची भरपाई करून देण्याविषयींचें त्याने बोलणें केलें, त्याप्रमाणेंच महाराजाच्या सत्तेतल्या मुलखात इंग्रजांना व्यापार करण्याची मोकळीक सरसकट दोन टक्के जकात घेऊन द्यावी अशी त्यानें त्याजपाशी मागणी केली ह्या वेळी इंग्रज व्यापाऱ्याच्या सुरत येथील अध्यक्षानें असें लिहून कळविलें होतें कीं, शिवाजीमहाराजांशी दारूगोळा पुरविण्याचा किंवा शिद्दीशीं लढण्यास मदत करण्याचा स्पष्ट करार करूं नये, तर नुसतीं वचनें देऊन त्यास आशा दाखवावी. तीं पुरीं कधीहि करूं नयेत.

मजकडे जमा झाले नाहीं आता हुबळी येथे तुम्ही ह्मणता तितके तुमचें नुकसान आमच्या हातून झाले नाहीं ' ह्या संबंधाने त्याची खात्री करण्यासाठीं महाराजानी त्यास आपल्या हुबळी येथील लुटीच्या याद्याहि दाखविल्या, हे मागे सांगितलेच आहे हा असा उभय पक्षामध्ये लढा पडला होता दुसरें असे कीं, महाराज इंग्रजाकडे तोफा मागत होते, व ते मोगल व शिद्दी याच्या भीतीमुळे देण्यास राजी नव्हते .

पुढे कांहीं दिवसानी शिद्दीने मुंबईबंदरात इंग्रजाच्या परवानगीची दरकार न करिता आपलें आरमार नेले, व महाराजाच्या प्रातात तो धामधूम करूं लागला. हे आगिअर यास बरें न वाटून त्याने त्यास मनाई केली, व त्याचे आरमार आपल्या बंदरातून काढून लाविलें हे वर्तमान महाराजास कळलें तेव्हा त्यानी इंग्रजावर फार खुष होऊन त्यास असे सांगून पाठविले कीं, तुमच्याआमच्यातला लढा काढून टाकून तह करण्यासाठी तुम्हीं आपला वकील आमच्याकडे पाठवून द्यावा परंतु ह्या वेळी सुरतेच्या मोगलसुभेदाराकडून आगिअर यास पुन पुन अशीं पत्रे येऊं लागली कीं, येत्या पावसाळ्यात शिद्दीच्या आरमारास तुमच्या बंदरात राहू द्यावें तेव्हा त्या इंग्रज गवर्नरास मोठा पेच आला मोगलास नाखुष केल्याने सुरतेहून आपला उठावा होईल अशी भीति त्यास वाटणे साहजिक होतें हा पत्रव्यवहार महाराजाच्या कानी आला तेव्हा त्यानी इंग्रजास असा धमकीचा निरोप पाठविला कीं, 'तुम्ही मोगलसुभेदाराचे ऐकून शिद्दीस आपल्या बंदरात येऊं द्याल तर डच लोकाचे आरमार तुमच्या बेटावर हल्ला करावयास येत आहे, व त्यावरील सरदार आमच्याकडे मदत मागत आहे, त्यास आम्ही दहा हजार लोकानिशी मदत करून तुमचें बेट सर करूं.[२]' इकडे शिद्दीने तर आपले आरमार मुंबईबंदराजवळ आणून उभे केले.

---

१ पृष्ठ, ३२७ पहा हुबळी लुटला तेव्हा आपल्या व्यापाऱ्याचे ७८९४ होन नुकसान झाले होते असे त्याचे ह्मणणे होते, परंतु महाराजाच्या या वेळच्या लुटीच्या याद्यात त्याचा फक्त २०० होन किमतीचा माल हाती लागल्याचा तपशील होता

२ ही गोष्ट सं १६७२–७४ सालाच्या दरम्यान घडली. ह्या सुमारास डच व इंग्रज याच्यामध्ये युरोपात युद्ध चालू होते डचलोकाचा सेनापति रिकलॉफ वानगोएन याने शिवाजीमहाराजाशी असे बोलणें लाविलें की, मुंबईच्या इंग्रजाशी लढण्याच्या कामी आह्मास मदत करा ह्मणजे तुह्मांस आह्मी शिद्दीकडून दंडाराजपुरी परत घेण्यास मदत करितों. हें त्याचें बोलणे महाराजास पसंत वाटलें नाही यावरून त्याचा डच लोकापेक्षां इंग्रजावर विशेष भरवसा होता हे उघड दिसतें.

आगिअरने त्यास तेथून निघून जाण्यास सागितले. परंतु हें त्याचे सांगणें न जुमानतां शिद्दीच्या आरमारातील काहीं पडाव खाडीत शिरले, व शिवाच्या उत्तरेकडील बाजूस किनाऱ्यावर त्याचे बरेच लोक उतरले, व तेथील रहिवाशास हाकून देऊन तेथे पावसाळ्यात आपली छावणी करण्याचा त्यानी बेत केला परतु त्यास इग्रजाच्या शिपायानी तेथून हाकून दिले मग पुन शिद्दीचे पाचशें हत्यारबद शिपाई पडावात बसून माजगावाजवळील किनाऱ्यास आले, व खाली उतरू लागले तेव्हा त्याच्यावर इग्रजानी तोफाचा मारा सुरू केला त्यामुळे त्यास तेथून पळून जावे लागले इतक्यात दच लोकाचे जे आरमार उत्तरेकडे येत होते ते वेगुर्ल्याजवळ विसकळून थोडेसे सुरतेकडे गेले, थोडेसे इराणाकडे गेले, व बाकीचे खालीं सिहलद्वीपाकडे गेले ही वार्ता मुबईच्या इग्रजास कळ-ल्यावर त्यास धीर आला, व शिवाजीमहाराजाच्या धमकीचा बाऊ त्यास अमळ कमी वाटू लागला इकडे, शिद्दीच्या लोकानी जमिनीवर उतरण्याचा दोन वेळा केलेला प्रयत्न व्यर्थ गेला, तरी शिद्दी काहीं मुंबईबदराजवळून आपले आरमार काढून नेईना[1] तो फारच लगट करू लागला तेव्हा इग्रजानी त्याच्याशी असा ठराव केला कीं, त्याचे तीनशेंपेक्षा अधिक लोक बदरात राहूं नयेत, त्याच्यावर इंग्रजाच्या लोकाचा पाहारा असावा, व ते शिवाजीमहाराजाच्या प्रातास उपद्रव देऊं लागले असता त्यास इग्रजानी एकदम हाकून द्यावे, व पुनः बदरात येऊं देऊं नये औरगजेबानें ह्या सुसारास शिद्दीच्या मदतीस सुरत बंदरातून ३६ लढाऊ जहाजे पाठविली होती ह्या जहाजाच्या साहाय्यानें त्याने महाराजाच्या ताब्यातल्या निरनिराळ्या बदरावर हल्ले करून ती लुटण्याचा सपाटा चालविला, आणि तेथल्या शेकडो पडावाचा नाश केला ह्या धाम-धुमीच्या वेळी महाराजाची सहा लढाऊ जहाजे मुंबईबंदराच्या आश्रयाने होती, त्यावर मोगल आरमारानें हल्ला केला तेव्हा इंग्रज व्यापाऱ्यानी मोगल सरदाराला असें सांगितलें कीं, हीं जहाजे आह्मी जप्त करून ठेविली आहेत शिवाजीने राजापूर स १६६० त लुटले तेव्हा तेथे आमचे जे नुकसान

---

[1] स १६७३ च्या आक्टोबर महिन्यात शिद्दीने मुबईबंदरातून आपले काही लोक पेण व नागोटना ह्या खाड्यातून महाराजाच्या मुलखात पाठवून तेथली खेडी लुटून जाळून टाकण्याचा सपाटा चालविला, तेव्हा महाराजाच्या लोकानी त्याच्यावर हल्ला करून त्याच्या शभर लोकाची कत्तल उडविली, आणि त्यांच्या सरदाराची शिरें, तोडून महाराजाकडे नेली. प्रो सरकार, पृ २४०.

झालें त्याच्या भरपाईसाठी हीं जहाजें आह्मी अडकवून ठेविलीं आहेत हे त्याचें ह्मणणें खरे वाटून मोगल सरदाराने त्यास हात लाविला नाहीं मोगलाचें साहाय्य मिळाल्यावर शिद्दी संबळ याने महाराजाचा सरदार दौलतखान याच्या ताब्यातील आरमारावर स १६७४ च्या मार्च महिन्यात मुचकुंद खाडीत ( सातवली नदीत ) हल्ला केला उभय आरमाराचे घनघोर युद्ध होऊन शिद्दीचा पराभव झाला, आणि तो हरेश्वराकडे पळून गेला शिद्दीचा काटा अजीबात काढून टाकण्याचा महाराजानी निश्चय करून त्याच्याशी निकराचा सामना करण्यासाठी ते ह्या वेळी कोकणात लढाईची सर्व प्रकारची सामुग्री व लोक एकसारखे पाठवीत होते, आणि त्यानी बारदेशपर्यंत सगळा कोकणकिनारा हस्तगत करून सगळ्या बदरात लढाईची जय्यत तयारी करून ठेविली

ह्या वेळी महाराजाचा वकील[1] मुंबईस तहाची कलमे ठरविण्याकरिता आला होता, त्याने इंग्रज व्यापाऱ्याची शिद्दीस अनुकूलता नसून ते आपणास साधेल तेवढी मदत करण्यास उद्युक्त आहेत असें त्याना लिहून कळविल्यावरून त्यास इंग्रजाच्या ह्या वर्तनाबद्दल समाधान वाटून त्यास आपला वकील तहाची कलमे ठरविण्यास गडावर पाठवून द्यावयास लिहिलें त्याप्रमाणे आगिअर यानें आपला एक वकील[2] लवाजम्यानिशी रायगडावर पाठवून दिला हा इंग्रजाचा वकील रायगडापाशी गेल्यावर त्याला गडावर जाण्याची मनाई झाली. कारण त्या वेळी महाराज गडावर नव्हते ते ह्या सुमारास राज्याभिषेकाच्या गडबडीत असून प्रतापगडावर देवीच्या दर्शनास गेले होते[3] ते तिकडून परत आल्यावर त्याच्या परवानगीनें तुह्मास वर जावयास मिळेल असें इंग्रज वकिलास

---

१ महाराजानी ह्या वेळी भिमाजी पंडित यास इंग्रज व्यापाऱ्याचा दुभाषी नारायण शेणवी याजबरोबर रायगडाहून पाठविले होते त्यानें ह्या वेळीं लुटीच्या भरपाईसंबधाचा वाद मिटवून १००२५ होन देण्याचे कबूल केले. ही तोड सुरत येथील काउन्सिलास मान्य झाली परतु महाराजास ह्या वेळी कोल्हापुराकडे लढाई करावयास जावे लागल्यामुळे तहाची कलमे ठरविण्याचे लांबणीवर पडल.

२ याचे नाव हेन्री आक्सेन्डन असे होते हा १६७७ पासून १६७९ पर्यंत मुंबईचा डेप्युटी गव्हर्नर होता

३ ह्या वेळी महाराजानी सवामण सोन्याचा नजराणा देवीला नेला होता असे डॉ. फ्रिअर आपल्या प्रवासवृत्तात ह्मणतो

गडावरच्या अधिकाऱ्यानी सांगितल्यावरून त्यास गडाच्या पायथ्याशीं पांचड नामक गावी तंबू ठोकून राहावें लागलें. आपण कोणत्या कामासाठीं आलो आहो हे इंग्रज वकिलानें नारायणजी पंडित[१] यास कळविल्यावरून तो त्याच्या भेटीस आला तेव्हा त्या वकिलाने त्याला आगिअरचें पत्र दाखविलें आणि महाराजास व इतर मुत्सद्यास आणिलेल्या नजरा दाखविल्या त्या पाहून तो खुष झाला, आणि त्याने त्या वकिलास असें वचन दिले कीं, महाराज प्रतापगडावरून परत आल्यावर तुह्मास त्याची मुलाखत करून देतो मग त्याने तहाचीं कलमे लिहून आणिलीं होतीं तीं नारायणजी पंडितास दाखविलीं, आणि त्यासबंधाने त्याचा काय अभिप्राय आहे ते विचारिलें तेव्हा, त्यात शिद्दीशीं महाराजानी सलोखा करावा असें एक कलम होते, त्या संबंधाने नारायणजी पंडित ह्मणाला, 'हें कलम तुम्ही अजीबात गाळा ते आमच्या महाराजास मुळीच पसंत होणार नाहीं. शिद्दीस नाहींसा करून जंजिरा हस्तगत करण्याचा त्याचा विचार आजकालचा नाहीं स १६४८ सालापासून ते त्याच्या पिच्छास एकसारखे लागले आहेत. त्यामुळें त्याचे आजपर्यंत पुष्कळ नुकसान झाले आहे. त्याचा नायनाट केल्यावाचून आमची कोंकणपट्टी सुरक्षित होणार नाहीं यास्तव काहीं झाले तरी त्यास बुडविण्याचा त्याचा पक्का निर्धार झाला आहे ह्यासाठी माणसाची व पैक्याची खराबी कितीहि झाली तरी ती करण्यास ते तयार आहेत सांप्रत त्याच्या जंजिऱ्यास वेढा दिला असून तो सर होण्याचा संभव आहे प्रतिदिवशी तोफा, दारुगोळा, लोक व पैका तिकडे पाठवीत आहेत. तेव्हा अर्थात् हे तुमचें कलम त्यास मुळींच रुचणार नाहीं ह्यासाठी ते गाळाल तर ठीक होईल ' ह्यावरून त्याने ते कलम गाळलें हे सांगावयास नकोच मग हा वकील ह्मणूं लागला कीं,' 'महाराजानी आपल्या राज्यातून चोहोंकडच्या व्यापाऱ्यास जाण्यायेण्याचा मार्ग मोकळा करावा बालेघाटाचा रस्ता बंद आहे तो खुला करावा. अशानें व्यापारी लोकास आपला माल बंदरात आणता येईल, व तेणेंकरून महाराजाच्या रयतेचा व आमचाहि पुष्कळ फायदा होईल महाराजाचें सर्व वय शिपाईगिरींत गेल्यामुळें त्याच्या लक्षात ही गोष्ट येत नसावी तरी तुम्हीं त्याची ह्या प्रकरणीं नीट समजूत घालावी ' त्यावर नारायणजी ह्मणाला ' ही व्यवस्था लवकरच होईल कारण विजापूरसरकारास आता महा-

---

१ हे नाव डॉ. फ्रिअर देतो. हा मुंबईतील इंग्रज व्यापाऱ्यांचा दुभाषी होता, हें वरच्या टिपेंत सांगितलें आहेच.

राजांशीं वैर करून एकसारखे युद्धप्रसंग करण्याचा पुरा त्राम आला आहे, व तसें करण्यास त्याला आता त्राणहि उरलें नाहीं, ह्मणून तें सरकार महाराजांशी तह करून समेट करण्याच्या विचारात आहे ह्या उद्देशानें तिकडून अनेक वेळा वकीलहि आले होते हा तह दोनतीन महिन्यात होऊन जिकडेतिकडे शांतता होईल, व व्यापारी लोकास सगळया वाटा खुल्या होऊन त्यास आपला माल पाहिजे तिकडे सुरक्षितपणें नेण्याची सोय होईल. महाराज तक्तनशीन झाल्यावर राजपदास अनुरूप असें प्रजापालन करण्याकडे आपले सगळे लक्ष पुरवितील, आणि आपल्या राज्यातील व्यापार वाढविण्याचा हरएक उपाय दक्षतेनें करितील हा काळपावेतो त्यास विजापूरकराशी व मोगलाशी सतत युद्धप्रसग करावे लागल्यामुळे ह्या गोष्टीकडे लक्ष पुरविण्यास हवी तितकी स्वस्थता त्यास मिळाली नाहीं ' ह्याप्रमाणे इंग्रज वकिलाचा आणि नारायणजी पंडिताचा सवाद झाल्यावर त्या वकीलानें त्याला एक हिऱ्याची आगठी नजर केली, व त्याच्या वडील मुलासहि बक्षीस दिले, आणि महाराजाची भेट लवकर करून देण्याविषयी त्यास विनति केली

महाराज परत आल्यावर ह्या इंग्रज वकिलास गडावर येण्याची परवानगी मिळाली, व त्यास राहण्यासाठी एक बगला दिला नतर नारायणजी पंडितानें महाराजाजवळ जाऊन ह्या वकिलाच्या तर्फेने फारच विनवणी केल्यावरून त्यानी त्यास चार दिवस लोटल्यावर हुजुरास घेऊन येण्याविषयीं परवानगी दिली इंग्रज वकिलानें महाराजापाशी जाऊन तहाची कलमें समजून सागितली ती त्यास पसत होऊन त्यानीं त्याला असें आश्वासन दिलें कीं, तुम्हास आमच्या राज्यातील कोणत्याहि भागात व्यापार करण्यास मुळींच हरकत होणार नाहीं, व तुम्हास किंवा तुमच्या मालास आमच्याकडून बिलकुल उपद्रव होणार नाही ह्या सबधाच्या तहास आमची पूर्ण अनुकूलता आहे. ' त्यावर तो वकील म्हणाला ' ह्याच उद्देशानें मला आमच्या काउन्सिलाच्या अध्यक्षानें आपल्याकडे पाठविलें आहे हिंदुस्थानात व इराणात जशा सौलती आम्हास तिकडील बादशहानी दिल्या आहेत तशाच आपणाकडूनहि मिळाव्या एवढीच आमची विनति आहे ' महाराजानीं ' ठीक आहे ' असें बोलून त्या वकिलानें तहाच्या कलमाची यादी आणिली होती ती नीट पाहून तीत काहीं कमीजास्त असल्यास कळविण्याविषयी मोरोपंतास हुकूम केला, आणि आपण स्वत राज्याभिषेकासबंधाच्या तयारीसाठी लगबगीनें दरबारातून उठून गेले.

त्या वकिलास नतर असें कळले कीं, आपल्या कामाचा निकाल राज्याभिषेकविधि आटपेपर्यंत काहींएक लागणार नाहीं. मग त्याने नारायणजी पंडिताकडे जाऊन इतर मुत्सद्यासाठी आणलेले नजराणे कसे द्यावे त्याविषयी त्याची सल्ला विचारिली तेव्हा त्याने त्या वकिलास असें सागितले कीं, ' मोरोपंतासाठी आणलेला नजराणा तुम्हीं स्वत घेऊन गेलें पाहिजे इतर मुत्सद्यास नजराणे द्यावयाचे ते कोणा कारकुनाच्या हाती पाठविले तरी चालेल परतु तुमचे काम लवकर व सुरळीत झालें पाहिजे तर तुम्हीं ह्या मुत्सद्यास चागलेच नजराणे दिले पाहिजेत त्याच्या-साठी तुम्हीं ज्या वस्तु आणिल्या आहेत त्या काहीच नव्हत तुम्हास त्याला आणखी वस्तु दिल्या पाहिजेत हे त्याचे ह्मणणें त्या वकिलास खरे वाटून त्याने मुंबईहून लागोलाग आणखी वस्तु मागविल्या ह्या रीतीने त्या मु सद्यास खुश करण्यात काहीं अधिक पैका खर्च झाला तरी पतकरला, पण पावसाळा सुरु होऊन त्या गडावर तीनचार महिने अडकून पडणें त्यास सोईचे वाटले नाही.

असें सागतात कीं, इंग्रजाच्या वकिलाने महाराजापुढे वीस कलमे माडिली होती, त्यापैकी अठरा कलमे त्यास कबूल झालीं त्यातील काहीं येणेप्रमाणे होतीं. राजापूर येथें इंग्रजाचे नुकसान झाले त्याबद्दल दहा हजार होन महाराजानी त्यांस द्यावे, राजापूर, दाभोळ, चेऊल व कल्याण येथें इंग्रजानी वखारी घालाव्या. महाराजाच्या सर्व राज्यात व्यापार करण्यास इंग्रजास मोकळीक असावी, त्यानी योग्य वाटेल त्या दरानी क्रयविक्रय करावा, त्याचे निरख अमुकच असावे असा कांहीं निर्बंध नसावा, इंग्रजानी मालाच्या किमतीप्रमाणें आयात मालावर शेकडा अडीच टक्के जकात द्यावी आता जी दोन कलमे महाराजास नापसत झालीं त्यापैकीं एक असे होतें की, इंग्रजाचे नाणे महाराजाच्या राज्यात चालावे. ह्यावर महाराजाचे ह्मणणें असे पडले कीं, ' हें कलम तहात ठरण्याची आवश्य-कता नाहीं कारण कोणतेहि नाणे आमच्या राज्यात चालण्याविषयीं आमच्या कडून मुळीच प्रतिबध होत नसतो, व जे नाणे घेतल्याने आमच्या प्रजेचे नुकसान होण्याचा सभव असतो ते घेण्याविषयीं आमच्याकडून तिच्यावर जुलूम होणें रास्त नाहीं तुमचें नाणे मोगलांच्या नाण्याइतके जड व चांगलें असल्यास तें चालण्यास आमच्याकडून काहींएक हरकत नाहीं [१] तो प्रजेच्या खुषीचा

---

१ मुबईत जें नाणें ह्या वेळी चालू होतें ते हलके असून त्याची किंमत कमी जास्त होत असे. स १६७४ व १६८३ अशा दोन सालीं ह्या बेटांत बडें झाली त्याचें एक कारण नाण्याचा खोटेपणा हें होतें असें ह्मणतात.

सौदा आहे.' आता दुसरें कलम असें होतें तुफानानें किंवा दुसऱ्या कोणत्याहि कारणानें इंग्रजाची तारवे फुटून त्यातील जो माल किनाऱ्यास लागे तो, किंवा जी तारवे किनाऱ्यास लागून फुटत तीं त्यास परत मिळावीं ह्या कलमास महाराजाची हरकत अशी होती की, 'कोंकणच्या किनाऱ्यावर तारवे फुटून लागणारा माल, किंवा ती फुटलेलीं तारवे परत देण्याची वहिवाट नाहीं त्यावर तेथील राजाचा हक्क प्राचीन काळापासून चालत आला आहे तो सोडून देणे आह्मास नीट दिसत नाहीं इंग्रजास ही सोलत दिली असता फ्रेंच वगैरे इतर व्यापारी ती मागूं लागतील यास्तव ह्या अटीविषयी आग्रह धरूं नये अशा फुटलेल्या तारवावरच्या खलाशास मात्र लागेल ते साहाय्य करण्याची व त्याचा बचाव करण्याची व्यवस्था लावण्यात येईल ह्याप्रमाणे महाराजाचा अभिप्राय पडल्यामुळे त्या कलमासंबंधानें इंग्रज वकिलास काहींएक बोलता येईना तरी नारायणजी पंडितानें त्यास असें सांगितलें की, हेंहि कलम मंजूर होण्यास फारशी अडचण पडणार नाहीं कारण मोंगलबादशहाकडून व अदिलशहाकडून तुह्मास ही सवलत मिळाली आहे तेव्हा ती आमच्या राज्यातूनहि मिळावी असें महाराजाच्या मनात येण्यासारखें आहे

ह्याप्रमाणे ह्या तहाच्या कलमाची वाटाघाट होऊन शेवटीं सगळी कलमें मंजूर झाली, आणि राज्याभिषेकानंतर काहीं दिवसानी ह्या तहावर महाराजाची सही

---

१ ऑम। ह्मणतो की, ज्या दोन कलमासंबंधानें महाराजानीं हरकत घेतली होती तीं काहीं मंजूर आलीं नाहींत डा फ्रिअर ह्मणतो की, नाण्यासंबंधानें तेवढें कलम खेरीज करून बाकीचीं कायम केलीं मुळातील मजकूर ग्राट डफच्या इतिहासातून घेतला आहे डा फ्रिअर ह्मणतो की, राज्याभिषेकसमारंभ झाल्यावर थोड्या दिवसानीं नारायण शेणवी यानें इंग्रज वकिलास येऊन सांगितलें की, नाण्यासंबंधाच्या कलमाखेरीज बाकी सगळ्या कलमास शिवाजी महाराजाची मंजुरी मिळाली ह्या तहनाम्यावर ता १२ जून स १६७४ रोजी सह्या झाल्या रा राजवाडे यानीं आपल्या आठव्या खंडात ह्या तहाच्या संबंधाचा एक कागद छापला आहे, त्यात येणेप्रमाणे उल्लेख आहे इंग्रजानीं शिवाजी महाराजाकडे चार सवलती मागितल्या होत्या, त्या अशा (१) महाराजाच्या राज्यात इंग्रज व्यापाऱ्यास जकात घेतल्यावाचून व्यापार करावयास मोकळीक असावी, (२) इंग्रजाच्या मालावर महाराजाच्या ताब्यातील बंदरात जकात घेऊ नये, (३) इंग्रज लोकाचें नाणें महाराजाच्या राज्यात चालू करावे, (४) आणि इंग्रजाची व्यापाराचीं जहाजें फुटून जो माल त्यांच्या बंदरास लागेल तो त्याच्या स्वाधीन करावा, व त्याचीं फुटकी जहाजेंहि त्यास मिळावी. या कलमापैकी पहिली दोन कलमें महाराजानीं कबूल केलीं, दुसरीं दोन मान्य केलीं नाहीत.

झाली, व एकंदर प्रधानाच्याहि त्यावर सह्या झाल्या त्या तहाअन्वयें राजापूर येथे झालेल्या नुकसानाबद्दल इंग्रजास दहा हजार होन द्यावयाचे ते रोख न देतां त्याची फेड येणेप्रमाणें करण्याचें ठरलें इंग्रजानी महाराजाकडून सतत तीन वर्षे पाचपाच हजार होनाचा माल खरेदी करावा, व त्याबद्दल त्यास फक्त अर्धी किमत द्यावी, ह्मणजे अर्थात् तीन वर्षात एकंदर साडेसात हजार होन किमतीचा माल मिळावा, व बाकीच्या अडीच हजार होनासबधाने असा करार केला कीं, इंग्रजानी राजापुरास वखार घातल्यावर त्या बदरात जो त्याचा माल येईल त्यावरची जकात, अडीच हजार होनाची रक्कम होईपर्यंत माफ करावी. हा असा तह करून त्याची यादी वर सांगितल्याप्रमाणें सह्या झाल्यावर नारायणजी पंडिताने इंग्रज वकिलाच्या हाती दिली, व महाराजाचा त्याला असा निरोप सांगितला की, 'तुमची वसाहत आमच्या राज्यानजीक होऊन तुमचा व्यापार आमच्या राज्यात चागला चालल्याने आमच्या रयतेचे पुष्कळ कल्याण होईल असे वाटल्यावरून तुमच्याशी आम्हीं हा सलोख्याचा तह केला आहे. तर हा तुमचाआमचा स्नेह दृढ राहावा अशी आमची इच्छा आहे

राज्याभिषेक झाला त्या वेळी हा वकील मुबईच्या गवर्नराचा प्रतिनिधि ह्या नात्यानें दरबारास गेला होता त्या वेळी त्याने महाराजास एक हिऱ्याची आंगठी नजर केली ह्या वकीलास महाराजाच्या सिंहासनापर्यंत जाण्याचा योग आला होता. तेव्हा त्याला त्याची रचना पाहावयास मिळून त्याचें त्यानें येणेंप्रमाणे वर्णन केले आहे ' सिंहासनाच्या दोन्ही बाजूस सोन्याचा भाल्याच्या टोकावर सत्ताप्रदर्शक पुष्कळ साकेतिक चित्रे होतीं. उजवे बाजूच्या भाल्यांवर दोन मोठे सोन्याचे मासे असून त्याच्या विकाळ दाढा दाखविल्या होत्या; व डावे बाजूच्या भाल्यावर घोड्याच्या शेपटा असून दोन मोठ्या उंच भाल्यांच्या टोकांवर सोन्याची तराजू समतोल ठेविली होती मासे दाखविले होते त्यावरून समुद्रावर महाराजाची सत्ता आहे हें सुचविलें होते; व घोड्याच्या शेंपटा दाखविल्या होत्या त्यावरून जमिनीवर त्याची सत्ता आहे असें सुचविलें होतें; आणि तराजू अशासाठी दाखविली होती कीं, ह्या राज्यातील सर्व प्रजेस सारखी वागवून योग्य न्याय मिळेल, असें आश्वासन एकंदर लोकास मिळावे.'

इंग्रजाचा हा वकील रायगडावर एक महिना होता असें ह्मणतात. त्यानें रायगडाचें व तेथील इमारती व राजमंदिर यांचें वर्णन केले आहे, तें डॉ. फ्रिअरनामक त्या वेळच्या एका प्रवाशानें आपल्या प्रवासवृत्तात लिहिलें आहे.

तें येथें विस्तारभयास्तव उतरून घेत नाहीं.[1] इंग्रज वकिलानें ह्या वेळी जें वर्तन केलें व जो पोक्तपणा दाखविला त्यावरून महाराजाचा इंग्रजाविषयीं बराच अनुकूळ ग्रह झाला तहाप्रमाणें राजापुरास इंग्रजानीं वखार घातली.[2] परंतु ती फार दिवस टिकली नाहीं तेव्हा सदरी निर्दिष्ट केलेल्या अटीप्रमाणे त्यास सगळी रकम मिळाली कीं नाहीं याविषयी शंका वाटते ह्या तहानंतर दोन वर्षांनी आंगिअर मृत्यु पावला,[3] व त्याच्या मागून झालेला गवर्नर त्याच्यासारखा हुशार व धोरणी नव्हता

मागे सांगितले आहे कीं, शिद्दी मुंबईच्या खाडीत शिरून महाराजाच्या कुर्ला वगैरे प्रांतास फार उपद्रव देई तो महाराजाच्या प्रांतातील निरपराध रयतेस पकडून, पुरुष असत त्यास ठार मारी आणि बायका व मुलें यास गुलाम म्हणून विकी असा कहर त्यानें सन १६७३ त केल्याच वर सांगितलेंच आहे हा त्याचा धिगाणा इंग्रजास मुळींच आवडत नसे ते आपल्याकडून होई तेवढा त्यास प्रतिबंध करीत परंतु कधीकधी त्याचा कांहींच उपयोग होत नसे मोगलाच्या धाकामुळे त्यास त्याच्याशी उघडपणे युद्ध करण्याचें धैर्य नसे. त्याचा

१ डॉ फ्रियर यानें आपल्या प्रवासवृत्तांत ह्या वेळची एक मौजेची गोष्ट नमूद केली आहे, आणि मि किंकेड यांनी ह्या गोष्टीचा अनुवाद केला आहे ती गोष्ट अशा- एक खाटीक गडावरील लोकांस मांस पुरवीत असे तो इंग्रज वकिलास पाहावयासाठी मुद्दाम गडावर आला याचे कारण असे की, ह्या इंग्रजानीं एका महिन्यात त्याच्या-कडून जेवढे मांस खरेदी केले तेवढे रायगडावरील सगळ्या लोकांनी उभ्या वर्षांत खाल्ले नव्हते. तेव्हा अशा मांसभक्षकास प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहण्याची त्याला इच्छा झाली '

२ ह्या पुन घातलेल्या वखारीवर सर जॉन चाइल्ड यास प्रमुख नेमिलें परंतु कोंकणचा महाराजाचा सुभेदार अण्णाजी दत्तो हा त्यास अनुकूळ नसल्यामुळे इंग्रजाचा व्यापार तेथे चांगला चालेना तेव्हा इंग्रजाकडून पुन महाराजाकडे वकील गेला. आपल्या व्यापारास ठरल्याप्रमाणे सवलती न मिळाल्यास आपण राजापूरची वखार उठवू असे त्याने महाराजास सांगितले. तेव्हा महाराजांनी त्याची समजूत करून त्यास आपला चांगला आश्रय मिळेल असे अभिवचन दिले, आणि राजापुराच्या लुटीच्या वेळी त्याच्या झालेल्या नुकसानाची भरपाई करावयाची राहिली आहे ती दाणा, गवत, सुपारी वगैरे जिनसा त्यास पुरवून करण्यात येईल असें त्यांनी सांगितलें.

३ ग्रँटडफ ह्मणतो की, हा स १६७६ त मुंबईस मरण पावला. परंतु दुसऱ्या एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे की, हा १६७७ त सुरत येथें मरण पावला.

जंजिरा काबीज करून तेथे आपली वखार घालावी व मुंबईचें ठाणें उठवावें, असें त्याच्या मनात येऊन त्यानी कंपनीच्या डायरेक्टराकडे त्याबद्दल परवानगी मागितली परतु त्यानी ती त्यास दिली नाहीं शिद्दीच्या घोर कृत्याचा परिणाम एकादे वेळीं आपणांसहि भोगावा लागेल असें त्यास महाराजांच्या धाकामुळें वाटे परंतु शिद्दीशी वाकडें चालल्याने मोगल रुष्ट होऊन त्याच्या राज्यांत आपणास थारा मिळणार नाहीं, अशी त्यास धास्ती असे. त्याप्रमाणें एकीकडून शिवाजीमहाराजाचा व दुसरीकडून औरगजेबाचा असा दुहेरी धाक असल्यामुळे त्या वेळी शिद्दीस न दुखविता साधेल तेवढे तटस्थ राहण्यातच आपला निभाव आहे असें इग्रज व्यापाऱ्यास वाटे

शिद्दीस चागली शिक्षा करावयाची असा निर्धार करून महाराजानी आपली फौज व आरमार हीं सिद्ध करून त्याच्याशी युद्ध सुरू केले दडाराजपुरी पूर्वी मोगलाच्या मदतीने त्यानें परत घेतली होती ती महाराजानी पुन काबीज केली. जजिऱ्यापासून गोव्यापर्यंत सगळा कोकणकिनारा त्याच्या ताब्यात आला शिद्दीनें मोगलाच्या आरमाराच्या साहाय्याने महाराजाच्या ताब्यातील कोकणकिनाऱ्या-वरील गाव लुटीत व जाळीत वेगुर्ल्यापर्यंत दांड केली परतु विजयदुर्गाजवळील महाराजाच्या आरमाराने त्याच्यावर हल्ला करून त्यास सुरतेपर्यंत पिटाळून लाविले. इकडे महाराजाच्या लोकानी जजिऱ्यास पाण्यातून व जमिनीवरून वेढा देऊन त्याच्यावर सारखा मारा चालविला पाण्यात मोरचे उभे करून त्यावर तोफाचा भडिमार चालविला जमिनीवरून जजिऱ्यापर्यंत एक मोठा बाध घालण्याचा प्रयत्न सुरू केला परतु इतक्यात शिद्दी सबळ सुरतेकडून मोठे आरमार घेऊन आला तेव्हा मराठ्याना जंजिऱ्याचा वेढा उठवावा लागला तरी दुसऱ्या वर्षी (स १६७६ त) पुन मोरोपंत पिंगळयाबरोबर दहा हजार लोक देऊन व्यंकोजी दत्तोजी शिद्दीशीं युद्ध करीत होता त्याच्या मदतीस पाठविलें, आणि जंजिऱ्यावरील हल्ला पुन मोठ्या नेटानें चालू केला त्या वेळीं तें बेट मराठ्याच्या हाती येण्याचा दृढ सभव दिसूं लागला. इतक्यात शिद्दी काशीम मोगल आरमार घेऊन आला आणि त्यानें मराठ्याचे पाण्यातील मोरचे उडवून देऊन आरमार उधळून लाविलें, आणि जमिनीवरील मराठ्याच्या लष्करावर तोफांचा एकसारखा भडिमार चालविला. त्यामुळें त्यांना वेढा उठवून परत जाणें भाग पडलें. परंतु जंजिरा काबीज करण्याचा त्याचा निश्चय अखेरपर्यंत अढळ

राहिला. सदरील झटापटींत शिद्दीच्या हजारो लोकांचा नाश होऊन तो अगदीं डबघाईस आला परंतु मोगलाच्या आश्रयाने तो पुन लवकरच सावरला.

पुढे महाराज कर्नाटकात मोहिमेवर गेले असें वर्तमान शिद्दीच्या कानीं येताच त्याने कोकणकिनाऱ्यावर पुन धामधूम सुरू केली ह्या धामधुमींत त्यास मोगलाच्या आरमाराचे पूर्ण साहाय्य होतें, हे सागावयास नकोच त्यानें जयतापूरशहरावर हल्ला करून त्यास आग लावून दिली परंतु तेथील ठाण्यावरच्या लोकानी त्याच्यावर निकराचा हल्ला केल्यामुळे त्याला तेथल्या खाडीतून पुढे जाता आले नाहीं महाराजाच्या आरमाराने त्याचा पाठलाग केला पण त्यास न गाठता तो आपली जहाजे घेऊन मुबईच्या बदरात शिरला, व माजगावास उतरून तेथे मुक्काम करून राहिला [1] येथे असता महाराजाच्या ताब्यातील कुर्ला प्रातात रहाणारा एक दुष्ट ब्राह्मण शिद्दीपाशी येऊन ह्मणाला 'तुम्ही मला साहाय्य कराल तर मराठ्याच्या अमलातील कित्येक सभावित ब्राह्मणास पकडून तुमच्या हवाली करितो ' ह्या त्याच्या ह्मणण्यास तो अर्थात कबूल झाला; आणि त्याच्याबरोबर त्याने आपले थोडेसे लोक व एक पडाव देऊन त्यास गुप्तपणे रवाना केले ह्या कृष्णकर्मात आपले अग आहे असें त्याने इंग्रजास कळू दिलें नाहीं त्या दुष्ट ब्राह्मणाने शिद्दीच्या लोकाच्या साहाय्याने चार ब्राह्मण पकडून आणिले त्यास शिद्दीने कोणास समजू न देता आपल्या जहाजात कैद करून ठेविले हे वर्तमान चेऊल येथील महाराजाच्या सुभेदारास कळताच त्यानें मुबईतील इंग्रजास असें जरबेचे पत्र पाठविले कीं, ' तुमच्या बेटात आमच्या प्रातातले ब्राह्मण पकडून नेले आहेत त्यास सोडवून एकदम पाठवून द्या, नाहीं तर तुमच्याकडे इकडून दाणागल्ला व सरपण जात असते ते बंद करूं हे काहींच नाहीं, तर याहूनहि वाईट परिणाम तुह्मास भोगावा लागेल ' इंग्रजांस ह्या धमकीचा निरोप पोचताच त्यानी शिद्दीपाशी ह्या गोष्टीचा तपास केला त्यानें पहिल्यानें कानावर हात ठेविले परंतु इंग्रज अगदीं जिकिरीस आले असें पाहून तो ह्मणू लागला कीं, ह्या प्रकरणात माझे अग मुळीच नव्हते. शेवटीं त्याला त्या ब्राह्मणास सोडून द्यावे लागलें ज्या पडावातून त्या ब्राह्मणास आणिलें

---

[1] ह्या सुमारास शिद्दी सबळ यास बडतर्फ करून शिद्दी कासीम यास मोगलानीं आपल्या आरमारावर मुख्य सरदार नेमिलें. परंतु शिद्दी सबळ आपल्याकडचा अधिकार देण्यास प्रथम राजी होईना परतु शेवटी तो त्यास देणें भाग पडलें. तेव्हा तो शिवाजीमहाराजाच्या आरमारावर जाऊन राहिला, असें ऑर्मी ह्मणतो.

होतें, त्यावरील अकरा खलाशास इंग्रजानी पकडले, व त्यापैकीं तिघास देहांत शासन देऊन बाकीच्यास सेन्टहेलेना येथे रवाना केले ही गोष्ट स १६७७ त जॉन पेटिट नामक मुंबईच्या डेप्युटी गव्हर्नराच्या कारकीर्दीत घडली

महाराज कर्नाटकातून परत आल्यावर मोरोपंत पेशवा वगैरे ब्राह्मणकामदारांनी त्याजपाशी असे गाऱ्हाणे केले की, शिद्दीने आमच्या राज्यातील ब्राह्मणास पकडून नेऊन त्याची विटंबना केली आहे यास्तव त्याचे पारिपत्य अवश्य केलें पाहिजे हल्ली मुंबईबंदरात त्याचे आरमार असून इंग्रजानी त्यास मोगलांच्या आग्रहास्तव माजगाव येथे पावसाळ्यात छावणी करून राहण्यास परवानगी दिली आहे तरी त्याच्या आरमारास आग लावण्यासाठी आपले लोक पाठवावे ' हे त्याचे ह्मणणें महाराजास अर्थात् मान्य होऊन त्यानी आपल्या आरमाराचे सरदार दर्यासारंग व दौलतखान यास चार हजार लोकानिशी जुलई महिन्यात पनवेल येथे पाठविले परंतु त्यास पलीकडे घेऊन जाण्यास पुरेसे पडाव सापडतना, आणि पाऊस असल्यामुळे दुसरीकडून तेथे पडाव आणण्याची सोय नव्हती त्याप्रमाणे त्याची निराशा होऊन तिकडून माजगावास येण्याचा बेत त्यास रहित करावा लागला मग दौलतखान तेथून कल्याणकडे कूच करून गेला व ठाणेप्रांतात प्रवेश करण्याची परवानगी फिरंग्यापाशी मागूं लागला यांत त्याचा मनसोबा असा होता कीं, ठाण्यावरून जाऊन माहीमची खाडी ओलांडून मुंबईबेटात शिरावे आणि शिद्दीच्या छावणीवर व किनाऱ्याजवळील त्याच्या तारवावर हल्ला करावा, आणि तेथे पडाव पैदा करून जवळच ओरखा करून असलेल्या त्याच्या आरमारावर चढून त्यास आग लावून द्यावी

महाराजाचे हे लोक पनवेलीस आल्याचें वर्तमान कळले तेव्हा इंग्रज फारच घाबरून गेले. त्यानी बेटाच्या रखवालीस ठेवलेले बहुतेक शिपाई माजगावा जवळ नेऊन ठेविले. पुढे दौलतखान आपल्या लोकानिशीं कल्याणाकडे गेला असें समजलें तेव्हा त्यानी आपले लष्कर माहिमास आणून ठेविलें, व माहीमच्या खाडींत एक लढाऊ जहाज ( फ्रिगेट ) आणून ठेविले. परंतु ह्या खबरदारीची कांहींएक जरूर लागली नाहीं. कारण वसईच्या फिरंग्यासहि महाराजाचे लोक जवळ आल्याबद्दल दहशत वाटून त्यास आपला साष्टीप्रांत कसा सुरक्षित राहतो याचा विचार पडला. तेथील फिरंग्यांचा सुभेदार आपलें निवडक सैन्य घेऊन ठाण्यास आला, आणि त्याने तेथील खाडींत चाळीस पडाव चांगले सज्ज करून ठेविले. त्यामुळे दौलतखानाचा ठाण्यावरून येण्याचा मार्ग खुंटला.

ह्याप्रमाणे तो सरदार निरुपाय होऊन, एवढ्या दूर इतके लोक आणिले त्याचें काहीं तरी चीज करावे ह्मणून फिरंग्याच्या मुलखात शिरून गावचे गाव लुटून उध्वस्त करीत सुटला. त्याने आपले काहीं लोक दमन व सुरत या शहराकडे लुटालूट करावयास पाठविले. इतक्यात रायगडावरून त्यास परत निघून येण्याविषयी हुकूम आला तेव्हा त्यास आपल्या लोकानिशी तिकडे जाणें प्राप्त झाले.

हा असा इंग्रजाचा आश्रय करून शिद्दी आपल्या अमलातील मुलखास उपद्रव करितो हे पाहून महाराजास मनस्वी राग आला हें साहजिक आहे. इंग्रजानी त्यास असा आश्रय द्यावा हे त्याशी केलेल्या सलोख्याच्या तहास अगदी विरुद्ध होते पूर्वी जसे ते तिऱ्हाईतपणाने वागून शिद्दीस आपल्या बंदरात थारा करीत नसत, तसेच त्यानी नेहमी करावयास हवे होते परंतु आगिअर मृत्यु पावल्यापासून मोगलाच्या धाकास्तव त्यानीं ही तटस्थवृत्ति अमळ सोडली होती ह्मणूनच त्यानी ह्या वेळी शिद्दीस आपल्या बंदरात पावसाळाभर राहू दिले होते ह्या लपंडावाबद्दल इंग्रजास शिक्षा करण्याचें महाराजानी मनावर घेतलें असते तर त्यात काही अन्याय झाला नसता परंतु महाराजाचे धोरण काहीं निराळें होते मोगलाच्या पायीं इंग्रज हे असें आपल्या इच्छेविरुद्ध वर्तन करीत हे त्यास कळून चुकले होते तेव्हा ह्या अशा अपरिहार्य कारणास्तव त्याच्याकडून होणाऱ्या आगळिकीबद्दल त्याच्यावर शस्त्र धरणें त्यास उचित दिसलें नाहीं दुसरे असें कीं, इंग्रजाच्यामुळे त्याच्या राज्यात व्यापार वाढून प्रजेच्या हातात पैसा घोळू लागला होता शिवाय आपण मोगलाची सुरत वगैरे ठाणी सर करून शिद्दीचा जंजिरा किल्ला हस्तगत केल्यावर इंग्रजावरचा शह नाहींसा होईल आणि मग त्याच्या साहाय्याने आपलें आरमार सुधारिता येईल अशी त्यास उमेद होती इंग्रजलोकास होता होईतो न दुखविण्याविषयी महाराज किती जपत याचे एक उदाहरण येथे देऊ चेऊलचा सुभेदार पेटिट नावाच्या एका इंग्रजव्यापाऱ्याकडे व्यापारासंबधानें थकलेल्या काहीं बाकीची मागणी करीत होता, त्याप्रमाणेंच, सुरत येथे इंग्रजाचा एक मुनीम होता, त्याच्या भावाला अशाच काहीं बाकीविषयीं त्याने एकसारखा तगादा लाविला होता. परंतु त्यानी ह्या बाकीची फेड करण्याचें बरेच दिवस दिरंगाईवर टाकिलें होतें. त्याबद्दल त्याचा सूड उगविण्याचा विचार त्या सुभेदारानें मनात आणिला. ह्या वेळीं शिद्दीचें आरमार जाळण्याचा प्रयत्न फसल्यामुळें महाराजांस वाईट वाटलें होते. यास्तव आपण ह्या संधीस इंग्रजाचा सूड घेतला तर तो

महाराजास मुळींच नापसंत होणार नाहीं असें त्याला वाटले नग मुबईचे पडाव त्याच्या ताब्यातील बदरात व्यापार करावयास आले होते ते मगळे त्यानें पकडले तेव्हा मुंबईच्या काउन्सिलाने चार पडावावर माठ युरोपिअन नेमून त्याला धरलेले पडाव सोडविण्यास पाठविलें त्या सुभेदाराने पकडलेल्या पडावावर आपले लोक रखवालीस ठेविले होते, त्यावर ह्या इग्रज शिपायानीं हल्ला करून बहुतेक पडाव सोडवून आणिले इग्रजाच्या ह्या कृत्याबद्दल त्या सुभेदाराने महाराजाकडे तक्रार केली आणि असें लिहून कळविलें कीं, आपल्या सत्तेचा त्यानी उपमर्द केला आहे, तरी त्यास अवश्य शिक्षा केली पाहिजे त्यानी त्यास असा जबाब पाठविला कीं, ‘ इंग्रजानी जे काहीं केले ते बरोबर आहे त्याची जहाजे व माल तुम्हीं कबजात घेतला असेल तो त्याचा त्यास पावता करावा ’ ह्या हुकमाप्रमाणे त्या सुभेदारास करणे प्राप्त झाले

स १६७८ च्या अखेरीस महाराजानी आपले आरमार चागले तयार करून जजिऱ्यास पाण्यातून वेढा दिला, व त्यावर तोफाचा भडिमार चालविला शिद्दी कासीम हा ह्या वेळी मुबईच्या बदरात होता त्याच्या लोकाचा मुशाहिरा थकल्यामुळे ते बेदिल झाले होते त्याच्यापाशी पैसा नव्हता सुरतेच्या सुभेदाराकडे त्याने काहीं पैसा मागितला होता पण तो वेळेवर आला नाहीं म्हणून त्याला तेथून हलता येईना अशा रीतीने शिद्दी तिकडे निरुपाय होऊन अडकून पडला तरी जजिरा काहीं केल्या महाराजाच्या हाती येईना तेव्हा ह्या वेळीहि त्यास तो वेढा उठवून जावे लागलें

महाराजानी ह्या वेळीं असें मनात आणिले कीं, शिद्दीशी आजपर्यंत केलेल्या झटापटीत आपणास यश येत नाहीं याचे मुख्य कारण हें होय कीं, त्यास वाटेल तेव्हा मुबईच्या बंदरात दडी मारून राहता येते इग्रज मध्ये नसतील तर त्याच्या कडून आपल्या मुलखास उपद्रव घडणार नाहीं इंग्रजाचा त्यास हवा तेव्हा आश्रय मिळून आपल्या राज्यात मनसोक्त धुडगूस घालिता येतो यास्तव शिद्दीची व मोगलाची मुंबईबंदराजवळील हालचाल साधेल तेवढी बंद पाडण्याची व इंग्रजासहि पुरे धाकात ठेवण्याची काहीं तरी तजवीज केली पाहिजे. असा विचार करून त्यानी ही पुढील युक्ति काढिली मुंबईपासून बारा मैलाच्या अतरावर खांदेरी व उंदेरी अशीं दोन लहान बेटे आहेत हीं समोरील किनाऱ्यावरून दोनतीन मैलाच्या अतरावर आहेत. ह्या बेटात कधींच कोणी वस्ती केली नसून त्यावर पुष्कळ रान होतें. ह्या बेटातून इंग्रजास कधींकधीं

सरपण मिळत असे ह्याहून दुसरा काहीं उपयोग त्याचा होईल असें कोणांस कधीं वाटलें नव्हते ह्या बेटावरून मुंबईबदरात जाणाऱ्यायेणाऱ्या प्रत्येक जहाजावर नजर ठेविता येऊन शत्रूंची तिकडील हालचाल हवी तेव्हा कळण्याजोगी आहे असें महाराजाच्या लक्ष्यात आले. त्यानी ती आपल्या ताब्यात घेऊन त्यावर मजबूत किल्ले बाधण्याचें मनात आणिलें, आणि आपले तीनशें शिपाई व तितकेच मजूर शस्त्रे व विखणे मुबलक देऊन प्रथम खादेरीबेटावर पाठविले, व तटबदीचे काम झपाट्याने सुरू केले हे वर्तमान इग्रजास कळलें तेव्हा ते मोठ्या फिकिरीत पडले ह्या बेटावर महाराजाचे ठाणे झाले असता आपणास किती धोका आहे हे त्याच्या तेव्हाच लक्षात आलें यास्तव ते ह्मणूं लागले कीं, ‘ ह्या बेटावर आपला हक्क आहे फिरग्यानी मुबईबेटाबरोबरच हीं बेटे आह्मास दिली होती ’ तिकडे वसईचे फिरगीहि त्यावर हक्क साग लागले ते ह्मणाले कीं, ‘ ह्या बेटावर इंग्रजाचा मुळीच हक्क नाहीं हीं आज पुष्कळ वर्षे आमच्याच ताब्यात आहेत आम्ही त्यावर वसाहत करणार होतो परतु त्यावर विहिरी खणल्या त्यास गोडे पाणी लागले नाहीं, ह्मणून तो बेत आह्मी रहित केला ’ महाराजानी ह्या त्याच्या ह्मणण्याकडे मुळीच लक्ष पुरविलें नाही

इंग्रजानी महाराजास हरकत करण्याचा निश्चय केला. त्यानी तीन शिबाडे तयार करून त्यावर चाळीस युरोपिअन नेमिले, व त्यास असें सागितलें कीं, ‘ शिवाजीमहाराजाची तारवे खादेरीजवळ येऊ देऊ नका, व बेटावर त्याचे अमलदार आहेत त्यास आपले लोक घेऊन निघून जावयास सागा ’ ह्याप्रमाणें हीं शिबाडे त्या बेटापाशी गेलीं, आणि त्यावरील अमलदारानी महाराजाच्या लोकास तेथून निघून जावयास सागितले त्यावर त्यानी असा जबाब दिला कीं, ‘ आमच्या धन्याच्या हुकमावाचून आह्मी आमची कामगिरी सोडून जाणार नाहीं ’ मग हीं इग्रजाची तारवे त्या बेटासभोवतीं दहा दिवस घिरट्या घालीत होतीं, व शेवटी वादळ झाले तेव्हा ती तेथून परत गेलीं इंग्रजानीं त्याबरोबर आणखी एक रिवेन्ज नावाचे फ्रिगेट देऊन तीं पुन खादेरीकडे रवाना केलीं ह्या रिवेन्जवर सोळा तोफा होत्या. ही इंग्रजाचीं तारवे पुनः खादेरीजवळ फिरू लागली एका शिबाडावरचा लेफ्टेनन्ट दारू पिऊन छाकटा झाला होता, तो आपलें शिबाड बेटाला लवून आपल्या हाताखालच्या लोकांनिशीं वर चढला. तेव्हा त्याची व महाराजाच्या लोकाची झटापट होऊन त्या-

अंमलदारास व आणखी सहा इंग्रज शिपायास त्यानीं ठार मारून बाकीच्यांस कैद करून ठेविलें, आणि त्याचे ते तारूं किनाऱ्यावर ओढून घेऊन बांधून ठेविलें. वारा जोराचा सुटला असून भरतीचे ताण असल्यामुळे दुसऱ्या शिबाडास त्याच्या मदतीस यावयाला मुष्कील पडली. त्याचा काहींच इलाज चालेना व अनुकूळ वारा लागून लाटाचा जो॰ कमी झाला तरी त्यास खांदेरीपाशी जाण्याचें धैर्य होईना.

मराठ्याचीं तारवे खांदेरीकडे येतील त्यास प्रतिबंध करण्याचें काम त्या तारवावरच्या इंग्रज शिपायास सांगितले होते परंतु तेहि त्याच्याकडून नीट होईना मराठ्याची तारवे रात्रीचीं झपाट्याने येऊन तटबंदीस लागणारा मालमसाला व लोकास लागणारी अन्नसामुग्री आणून पोचवीत, आणि तशीच त्वरेनें परत जात त्याचा पाठलाग इंग्रजाच्या जहाजाच्याने होत नसे याचे मुख्य कारण असें होते कीं, मराठ्याच्या पडावाच्या वल्ह्याची व तारवाची रचना अशी होती कीं, तीं वारा किंवा लाटा कितीहि प्रतिकूल असल्या तरी जलद चालत, इंग्रजाचीं तारवे तशी जलद चालत नसत शिवाय त्याचा जमाव फार थोडा असल्यामुळे त्यास मराठ्यावर हल्ला करण्याचे धैर्यहि होत नसे म्हणून इंग्रज अमलदारानी आपल्या वरिष्ठापाशी आणखी कुमक मागितली. त्यावरून त्यांनी आणखी काहीं जहाजे भाड्याने घेतलीं आणि त्यावर लोक नेमून तीं खांदेरीकडे रवाना केलीं असें सांगतात कीं, ह्या बेटापाशी इंग्रजाची एकंदर आठ जहाजे होतीं—एक फ्रिगेट, दोन गुराबा, तीन शिबाडे व दोन मचवे. ह्या जहाजावर युरोपिअन व इतर शिपाई मिळून एकंदर दोनशे लोक होते. ह्याशिवाय आणखी खलाशी होते.

दौलतखानाच्या हाताखालील आरमार खांदेरीच्या समोर चेउलाजवळ ओरवा करून होतें तेथून प्रत्येक रात्री काहीं जहाजे तो बेटावर पाठवी, आणि शत्रूचा पाठलाग होण्यापूर्वी ती पुन त्या आरमारापाशी येत एके समयी दौलतखानाने आपलें आरमार तेथून उठवून बेटाकडे चालविले ते इतक्या त्वरेनें चाललें होते कीं, इंग्रजाची तारवे नांगर ओढून घेऊन तयार होण्यापूर्वी तें त्यांच्या जवळून पार निघून गेले जाताजाता त्याने इंग्रजाचे एक गुराब हातीं लागलें तें पकडून नेलें. तेव्हा इंग्रजाचीं बाकीची जहाजे तेथून पळत सुटलीं; एकटें रिवेन्ज मात्र धीर धरून राहिलें. पण त्यास मराठ्याच्या आरमारानें चोहोंकडून घेरलें. रिवेन्जवर तोफा चांगल्या रचल्या असल्यामुळे त्याच्या-

चढून होणाऱ्या सरबत्तीपुढे मराठ्याच्या जहाजाचा टिकाव निघेना. ह्या वेळीं ह्या रिवेन्जच्या कॅप्टनाने आणखी अशी दगाबाजी केली कीं, आपलीं शिडें पाडून आपण हतवीर्य होऊन शरण आल्याचा बहाणा केला हा दौलतखानास खरा वाटून तो त्याच्या जवळ चोवीस गुराबानिशी आला, आणि त्या इंग्रज जहाजावर आपले लोक पाठविण्यासाठी त्याने होड्या पाण्यात लोटल्या त्याबरोबर त्या कॅप्टनाने तोफाची एकदम सरबत्ती सुरू केली, त्यामुळे मराठ्याचे बरेंच नुकसान झाले, आणि त्याची पाच जहाजे फुटून बुडाली.[1] ही अशी त्याची झटापट चालली असता तिकडे बेटावर काहीं आणखी लोक, अन्नसामुग्री व मालमसाला पोचवून पडाव निघून गेले ह्याप्रमाणे आपली मुख्य कामगिरी शेवटास गेली असें पाहून दौलतखानाने आपले आरमार नागोठण्याच्या बदराकडे चालविलें इंग्रजाचें फ्रिगेट काहीं वेळ त्याच्या मागून गेलें पण तें आरमार दूर निघून गेले तेव्हा ते परत आलें[2] ह्याप्रमाणे दौलतखानाने नागोठण्याच्या खाडीत राहून खादेरीवर लागणारी सामुग्री पुरविण्याचा क्रम एकसारखा चालविला होता त्यास इंग्रजाच्या जहाजाकडून ह्मणण्यासारखा काहींएक प्रतिबंध झाला नाहीं

ही अशी खादेरीपाशी मराठ्याच्या व इंग्रजाच्या जहाजाची धावपळ चालली असता महाराजानी पाच हजार लोक कल्याणास पाठविले त्यानी पूर्वीप्रमाणेच पुन वसईच्या फिरग्यापाशी ठाण्यावरून मुबईकडे जाण्यास परवानगी मागितली, ती ते देईनात हे मराठ्याचे सैन्य कल्याणाकडे आल्याची बातमी मुंबईच्या इंग्रजास कळताच त्याला मोठी धास्ती पडली फिरग्यानी त्यास आपल्या प्रातातून येण्याची परवानगी दिली, किंवा त्यास पुरतसे पडाव मिळाले तर ते आपल्या बेटावर खास चालून येतील असें त्यास वाटूं लागले पूर्वीसारखा माजगावापाशी किंवा माहिमापाशी बंदोबस्त करण्याचेंहि त्यास आतां अनुकूळ नव्हतें कारण त्या वेळी त्याचे बहुतेक शिपाई व सर्व जहाजे खादेरीपाशीं गुतलीं होतीं हे असें संकट प्राप्त झालें तेव्हा ते अगदी घाबरून गेले व त्यांनीं रायगडावर आपला वकील तहाचे बोलणे करण्यासाठी पाठविला

---

१ ह्या झटापटीत जी इंग्रजाची गुराबे पळून जाऊन किनाऱ्यास लागली होतीं तीं दौलतखानानें हस्तगत केलीं, आणि अगोदर एक तर त्याने काबीज केलेंच होते. ह्याप्रमाणें रिवेन्ज फ्रिगेटच्या मदतीस पाठविलेल्या सात गुराबापैकी सहा दौलतखानाच्या हाती ह्या वेळी लागली असें ह्मणतात.

२ आर. ॲन्ड ओ. स्ट्राची याचे "किंग्ज विन्स रिबेलिअन." पृ ३८ व ३९ पाहा.

इकडे खादेरीपाशी इंग्रजाची जहाजे जमा होऊन मराठ्यांच्या आरमारास अटकाव करण्याचा प्रयत्न त्यानी चालविला होता तरी त्यास न जुमानता मराठ्याचे पडाव त्या बेटापाशी मालमसाला घेऊन एकसारखे येतच होते इतक्या अवकाशात बेटावर तोफा लावण्याचें काम पुरे करून त्या ते इंग्रजाच्या आरमारावर सोडू लागले त्यामुळें त्यास आपली जहाजे तोफाच्या माऱ्याबाहेर न्यावीं लागली इतक्यात सुरतेहून काहीं जहाजे त्याच्या मदतीस आली त्यात हटर नावाचें फ्रिगेट होते त्यावर सोळा तोफा असून छत्तीस युरोपिअन होते ही अशी कुमक मिळाल्यावर इंग्रजास थोडासा धीर आला, व नागोठण्याच्या खाडीच्या तोंडावर राहून मराठ्याची जहाजे बाहेर न येऊ देण्याचा त्यानी प्रयत्न चालविला. परंतु हा त्याचा प्रयत्न व्यर्थ झाला कारण त्या खाडीस दुसरीकडून वाट होती, त्या वाटेने मराठ्याचे पडाव वेलाशक बाहेर पडून बेटाकडे जातयेत मग इंग्रजानीं असा विचार केला की, खाडीत शिरून मराठ्याच्या आरमारास आग लावून द्यावी परतु हा त्याचा बेत मुबईच्या गवर्नरास व सुरतेच्या अध्यक्षासहि पसत झाला नाहीं कारण अशाने शिवाजीमहाराज अतिशयित सतापून आपला पुरा धुव्वा उडवून देतील अशी त्यास दहशत वाटत होती शिवाय रायगडावर पाठविलेल्या वकिलाने महाराजाशी पुन तह केल्यावर हा कलह मिटेल अशी त्याला आशा होती

त्याप्रमाणे महाराजानी खादेरीउदेरीवर आपले ठाणे घालण्याचा उद्योग जारीनें चालविला असून इंग्रजाकडून त्यास काहींएक अटकाव होईना, व फिरंगी तर तटस्थ होऊन राहिले होते, हे वर्तमान सुरत येथील मोगलसुभेदारास कळलें तेव्हां त्यासहि मोठी दहशत वाटली आजपर्यंत शिवाजीमहाराजाचे प्राबल्य जमिनीवरच विशेष झाले होते ते आता समुद्रावरहि स्थापित होऊन आपला दोहोकडून कोंडमारा होण्याचा समय आला असें त्यास वाटू लागलें. सुरतेचें महत्त्व कायते परदेशांतील व्यापारामुळें वाढले होते त्या व्यापारावर महाराजाचा पुरा शह बसून सुरतशहर व दुसरीं बंदरे लवकरच त्यांच्या हातीं जातात असें भय त्यास पडलें. ह्या प्रसगी शिद्दीसहि अशी भीति वाटू लागली कीं, आपला जंजिरा आता महाराजाच्या हातीं जाऊन आपला नायनाट खास होईल.

त्यानें ह्या वेळीं महाराजाच्या आरमारास प्रतिबंध करावा परंतु त्याचे लोक मुशाहिरा न मिळाल्यामुळें नाराज झाले होते. तो मोगलापाशीं कांहीं द्रव्यसाहाय्य मागत होता परंतु तें द्यावें कीं देऊ नये ह्या विचारात मोगलबादशहा

होता. इतक्यात महाराजांनी हे नवीन ठाणे समुद्रात बसवून सर्वांसच शह देण्याचा बेत केलेला पाहून त्याने शिद्दीस हवे होते तेवढें साहाय्य करून व आपलीहि जहाजें त्याच्या मदतीस देऊन मराठ्याच्या आरमारावर रवाना केले. शिद्दी आपल्या आरमारासह मुंबईच्या बंदरात येऊन पहिल्याने तेथल्या इंग्रज काउन्सिलास भेटला त्याच्याशी काहीं खलबत केल्यावर तो इंग्रजाच्या कुमकेस ह्मणून खांदेरीजवळ गेला शिद्दीने बेटासभोंवती फिरून त्याची बारकाईने पाहणी केली आणि इंग्रज अमलदाराशी असें बोलणे लाविलें कीं, 'तुह्मी मला मदत कराल तर हा मराठ्याचा किल्ला मी हस्तगत करितो.' हे त्याचे बोलणे त्यास पसंत वाटले नाहीं कारण त्यास असें कळून चुकले होते कीं, 'शिद्दी आपल्या मदतीने हे बेट सर करून बळकावून बसेल, व मग त्याच्याकडून आपणास फार त्रास होईल त्यापेक्षा शिवाजीमहाराजाकडून होणारा त्रास पतकरला' ह्मणून ते शिद्दीस साहाय्य करण्यास अळमटळम करूं लागले.

शिद्दीस इंग्रज मदत करीतना तेव्हा त्याने स्वत त्या बेटावर आपल्या जहाजां-वरून तोफा सोडण्यास आरंभ केला, आणि बेटावरूनहि मराठ्यांनी आपल्या तोफांचा भडिमार सुरू केला हा सगळा प्रकार इंग्रजलोक तटस्थ वृत्तीने पाहत राहिले हे त्यांचें वर्तन पाहून मराठ्याच्या आरमाराने त्यास उपद्रव देण्याचे सोडून सगळा रोख आपला हाडवैरी जो शिद्दी त्याच्यावर धरिला. ह्या वेळी रायगडावर इंग्रजाचा वकील जाऊन तहाचे बोलणे करीत आहे हें शिद्दीस समजले होते ह्या बोलण्यात बिघाड करण्याच्या हेतूने त्याने आपलीं काहीं जहाजें मुंबईच्या बंदरात नेऊन महाराजाच्या प्रांतात प्रवेश केला, आणि तिक-डील चार गाव जाळून उध्वस्त करून पुष्कळ माणसें पकडून आणिलीं.

ह्याप्रमाणे शिद्दीचे व इंग्रजाचे आरमार खांदेरीबेटापाशीं घिरट्या घालीत असतां त्याची परवा न करिता नागोठण्याच्या खाडीतून मराठ्याचे पडाव बेटास येऊन लागत व अन्नपाण्याची व दारूगोळ्याची सामुग्री त्यावरील लोकांस एकसारखी पुरवीत. आपली सर्व जहाजें घेऊन एकदां शत्रूच्या मुकाबल्यास जावे असा विचार करून दौलतखानानें नागोठण्याच्या खाडीच्या तोंडाशी आपल्या काहीं गुराबा आणिल्या हीं मराठ्याचीं जहाजे बाहेर येऊं पाहत आहेत असें शिद्दीच्या व इंग्रजाच्या दृष्टीस पडून त्यास प्रतिबंध करण्याच्या इराद्यानें त्यांनीं आपलीं आरमारें तिकडे फिरविलीं हा शत्रूंचा जमाव पाहून मराठ्यांच्या आरमारानें माघार घेतली, व शत्रु आत शिरूं नयेत ह्मणून खाडीचें तोंड अडविण्यासाठीं

कांहीं पडाव दौलतखानानें तेथे ठेवून दिले. हे पडाव आपल्या आरमारापाशीं रात्रीचे अकस्मात् येऊन त्यास आग लावून देतील ह्या भीतीनें शिद्दीनें तें तेथून काढून नेले, आणि इंग्रजाचें आरमार एकटेंच तेथ टेहळणीस राहिलें शिद्दी पुन· बेटाकडे वळून त्यावर तोफाचा भडिमार करू लागला परंतु मराठ्यांनीं त्याला बिलकूल दाद दिली नाहीं.

खादेरीवर मराठ्यानी तोफा वगैरे रचून उत्तम बदोबस्त केल्यामुळे तें हस्तगत होण्याचा आता संभव नाहीं असें पाहून शिद्दीने मोठी शिताफी करून उंदेरीवर आपल्या तोफा व माणसे चढविली, आणि इंग्रजास असें कळविले कीं, हे बेट मी आपल्या ताब्यात घेणार हे त्याचें कृत्य पाहून दौलतखान आपल्या आरमारानिशी खाडीबाहेर पडला व त्याच्या आरमारावर चालून गेला दोन्ही पक्षाचे तुबल युद्ध झाले त्यात कोणाचीच सरशी झाली नाहीं इंग्रज लोकाचीं जहाजे त्या ठिकाणी जाऊन पोचण्यापूर्वी हे त्याचे युद्ध सपल मग दौलतखानाने किनाऱ्यावर उंच ठिकाणी तोफा चढवून उंदेरीवर मारा सुरू केला, व खादेरीवरूनहि त्या बेटावर तोफाची सरबत्ती होऊ लागली हा असा उभय पक्षाकडचा मारा काहीं दिवस सारखा चालला होता मग पुनः दौलतखान आपल्या आरमारानिशी शिद्दीच्या आरमारावर तुटून पडला. उभय पक्षाचें चार तासपर्यंत मोठ्या निकराचे युद्ध झाले ह्या लढाईत मराठ्यांच्या चार गुराबा व चार लहान जहाजे नाश पावली, व सुमारे पाचशे लोक प्राणास मुकले पुष्कळ लोक शिद्दीच्या हाती लागले ,व दौलतखान जखमी झाला. ह्या लढाईत शिद्दीचें फारसें नुकसान झाल नाहीं असे ह्मणतात ह्या लढाईनंतर मराठ्याचें उरलेलें आरमार आपल्या घायाळ झालेल्या सरदारास घेऊन राजापुरास गेले तेथे फुटलेल्या जहाजाची दुरुस्ती करून नवीन माणसाची भरती केली, व पुन ते आरमार शत्रूशीं लढण्यास तयार झाले

तिकडे रायगडावर जो इंग्रजाचा वकील तहाचें बोलणें लावण्यासाठी गेला होता त्यास अनुकूल जबाब मिळून महाराजानी आपला वकील मुंबईस तहाचीं कलमे मुकर करण्यासाठी पाठविला ही महाराजाची अनुकूलता पाहून इंग्रजानीं खांदेरीबेटाजवळील आपले आरमार परत बोलाविलें, व शिद्दीस जो नुकताच विजय मिळाला होता तो आपणास मुळीच पसत नाहीं असें दर्शविलें. महाराजाचा वकील मुंबईस येऊन तह ठरवीत आहे तो मोडेल तर पाहावे, असा विचार करून शिद्दीने मराठ्याच्या गुराबा पकडल्या होत्या त्या मुंबईस विकाव-

यास पाठविल्या, व मुंबईच्या बंदरांत आपल्या आरमारानिशी येण्याविषयी तो इंग्रजापाशीं परवानगी मागूं लागला ती त्यानी त्यास अर्थात् दिली नाहीं तेव्हा तो पेणच्या खाडींत शिरून दोन्ही किनाऱ्यावरील गाव जाळून उध्वस्त करूं लागला ह्या धामधुमीत त्यानें हजाराहून अधिक लोक पकडून नेले असें म्हणतात.

शिद्दीची अशी गडबड चालली असता मुबईस स १६८० च्या मार्च महि-न्यात महाराजाचा व इग्रजाचा पुन तह झाला त्यात स १६७४ त केलेला तह कायम केला, व शिद्दीच्या आरमारास इग्रजानी आपल्या बदरात पावसा-ळ्यात आश्रय देऊं नये, आणि दिलाच तर त्यानी त्याच्याकडून महाराजाच्या मुलखास किमपि उपद्रव न करण्याचा करार करून घ्यावा असें ठरलें

ह्या तहानंतर खादेरी व उंदेरी हीं बेटें महाराजाच्या ताब्यात आली एकट्या शिद्दीला मराठ्यास त्या बेटावरून काढून लावण्याचे सामर्थ्य नव्हतें. उंदेरीवर त्यानें वर सागितल्याप्रमाणे आपल्या तोफा चढविल्या होत्या, पण दोन्ही बाजूंकडून होणाऱ्या मराठ्याच्या माऱ्यापुढे तेथे त्याचा निभाव न लागून तें बेट आपल्या स्वाधीन ठेवण्याचा विचार त्यास सोडावा लागला हीं आपल्या बदराजवळील दोन्ही बेटे मराठ्याच्या ताब्यात जाऊन त्यावर त्याची ठाणीं बसलीं याबद्दल इंग्रजास पुढे मोठे वैषम्य वाटूं लागलें ती आपल्या ताब्यात असावी असे त्याच्या मनात फार होते. यास्तव मराठ्यांशी लढून तीं परत घेण्याविषयी त्यानीं कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स यापाशी परवानगी मागितली. परंतु त्यास ती मिळाली नाहीं त्या कोर्टाचें असें म्हणणें पडलें कीं, मराठ्यां-सारख्या प्रबळ लोकाशी वैमनस्य करून आपणास तेथे थारा नाहींसा करण्यात कांहीं शहाणपणा नाहीं

हीं बेटें कबजात घेऊन पुढें ज्या गोष्टी कराव्या असें महाराजाच्या मनांत होतें त्या सिद्धीस न्यावयास महाराज जगले नाहींत. ही खादेरीबेटाजवळील धामधूम संपल्यानंतर लवकरच त्याचें देहावसान झालें

# भाग एकुणतिसावा.



## सज्जनसेवा.

एथपर्यंत आमच्या महाप्रतापी चरित्रनायकाचें जीवमवृत्त कथन केलें आहे, त्यांत त्याच्या अगच्या शौर्य, वीर्य, औदार्य, राजकार्यनिपुणत्व, प्रजापालनपटुत्व, युक्तिमत्ता, बुद्धिमत्ता, मातृपितृभक्ति इत्यादि उज्ज्वल गुणांचें दिग्दर्शन अनेक प्रसगीं झालें आहे तशीच त्याच्या ठायीची धर्मशीलताहि कित्येक प्रसंगी व्यक्त झाली आहे ही वृत्ति महाराजाच्या ठायीं केवढी नि सीम वसत होती हे साधुसमागम व साधुसेवा याविषयीं ते सर्वदा किती सोत्कंठ असत ते सागितल्याने प्रत्ययास येणारें आहे. यास्तव ह्या संबधाच्या काहीं गोष्टींचें निरूपण प्रकृत भागात करूं.

सदाचारसपन्न व धर्मशील मातेच्या सहवासानें महाराजांच्या ठायी धर्मबुद्धि अगदीं अल्प वयापासून जागृत होऊन तिची वृद्धि कथापुराणादिकाच्या श्रवणानें उत्तरोत्तर होत गेली होती. पुढ दादाजी कोंडदेवासारख्या धर्मपरायण व पापभीरु पुरुषाच्या देखरेखीखालीं त्याचें कांहीं वय गेल्यामुळें ह्या वृत्तींचा परिपोष विशेषच झाला होता हे जें वळण त्यास तरुण वयात प्राप्त झालें तें आमरण कायम राहिलें होतें. ह्या उज्ज्वल वृत्तीस्तव त्यास नेहमीं असें वाटे कीं, केवळ ऐहिक ऐश्वर्यप्राप्तीनें जीवितसाफल्य व्हावयाचें नाहीं, तर खरें जीवितसार्थक्य परलोकसाधनातच आहे. महाराजाच्या वेळीं महाराष्ट्रात भागवतधर्माचा सर्वत्र प्रसार होऊन भक्तिमार्गाचें सुलभ साधन सर्व जातींच्या व सर्व दर्ज्याच्या लोकास संतमंडळाच्या बोधानें अनुकूल झालें होतें. मुकुंदराज, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ वगैरे पूर्वकालीन संतमंडळाचा चरित्रमहिमा व बोधामृत यांचें श्रवण महाराजास नेहमीं घडत असे. त्याप्रमाणेंच मुक्तेश्वर, रामदासस्वामी, वामनपंडित, तुकारामबावा, जयरामस्वामी, रंगनाथस्वामी, आनंदमूर्ति, केशवस्वामी इत्यादि महासाधु व ग्रंथकार महाराजांचे समकालीन असून त्याची कीर्ति व कांहीं कवनेंहि महाराजांच्या कानी वेळोवेळां पडत असत. शिवाय त्या काळीं पंढरीस वर्षांतून दोन वेळां लक्षावधि भगवद्भक्तांचा मेळा जमत असे. ह्या

वारीस बहुतकरून प्रत्येक गांवांतून वारकरी ज्ञानदेवनामदेवादिकांचे अभंग गात व विठ्ठलनामाचा घोष करीत पंढरीस जात ही अशी धर्मजागृति एकंदर महाराष्ट्रात त्या काळीं झाली असल्याकारणानें तिचा सुपरिणाम महाराजांच्या मनावर व्हावयास विलंब लागला नाहीं, हें स्पष्टच आहे.

महाराजानी स्वराज्यस्थापनेस ज्या प्रांतात आरभ केला त्यात ज्ञानदेव व तुकारामबावा ह्या महामाधूचीं अळंदी व देहू हीं ठिकाणें आहेत तेव्हां अर्थात् त्याच्या सबधाच्या गोष्टी व त्यानीं केलेल्या बोधप्रचुर कविता लहान वयापासूनच त्यास ऐकावयास मिळाल्या होत्या त्यातून तुकारामबावांचीं उत्कृष्ट कीर्तनें तर त्यास लहानपणापासूनच ऐकावयास मिळालीं होतीं. त्यामुळें ह्या महासाधूविषयी महाराजाच्या मनात अत्यंत आदरबुद्धि वसत असे. तुकारामबावा त्या काळच्या कीर्तनकारात अग्रणी असून पराकाष्ठेचे भाविक व प्रेमळ भगवद्भक्त असल्याकारणानें त्यांची बोधवाणी अत्यंत प्रासादिक व मनोवेधक असे यास्तव महाराजास त्याची कीर्तनें ऐकण्याचा अतिशयित उल्हास असे तुकारामबावा वेळोवेळा पुण्यास येऊन कीर्तनें करीत तीं ऐकावयास ते जात असत शिवाय कोठे आसपासच्या गावात त्याचे कीर्तन होणार आहे असें कळल्यास ते रात्रीचे त्या गावी जाऊन कीर्तनश्रवणाचा लाभ अवश्य साधीत असत तुकारामबावाचे कीर्तन श्रवण करण्याचा हव्यास महाराजांस किती होता याचे एक उदाहरण येथे देऊ

कोणे एके[१] समयीं तुकारामबावास काहीं भाविक लोकानीं पुण्यास आणून त्याची कीर्तनें घरोघर करण्याचा क्रम आरंभिला ह्या वेळीं महाराज सिंहगडावर होते त्याला हें वर्तमान कळल्यावरून ते दररोज रात्रीं गडावरून पुण्यास कीर्तनें ऐकावयास येऊं लागले ते नेहमीं रात्री पुण्यास येतात असें यवनांस कळल्यावरून ते त्याच्या पाळतीस राहिले एके दिवशीं एका वाण्याच्या घरीं कीर्तन असून शिवाजीमहाराज ते ऐकावयास येणार आहेत अशी बितम बातमी चाकणच्या यवन किल्लेदारास कळताच त्यानें दोन हजार पठाण महाराजांस पकडून आणण्यासाठी त्या ठिकाणीं पाठविले. ह्या पठाणानीं त्या वाण्याच्या घरास वेढा घातला. त्यानी महाराजास पूर्वी कधींहि पाहिलें नसल्यामुळें कीर्तन ऐकावयास बसलेल्या एकंदर लोकास पकडून नेण्याचा बेत केला. हें अरिष्ट पाहून कीर्तनश्रवण करावयास बसलेले लोक घाबरून जाऊन गल्बला

[१] हीं कीर्तनें लोहगावीं होत होतीं असें एके ठिकाणी ह्मटलें आहे.

करूं लागले तुकारामबावानी गडबड कशाची ह्मणून विचारिता लोकानी त्यास तें संकट निवेदन केलें आणि ह्मटले कीं, शिवाजीमहाराजास येथून पळून जाण्याची आज्ञा व्हावी तेव्हा तुकारामबावा ह्मणाले कीं, ‘ कीर्तन चालले असता मध्येच उठून जाऊं नये असें आहे आज एकादशी आहे अशा सुदिनी आपणासर्वास हरिकथा श्रवण करीत असता मरण प्राप्त झाले तर आपले मोठेच भाग्य समजावयाचें विठ्ठलाच्या भक्तीत गुंतलें असता मृत्यु आला तर कैवल्यप्राप्ति होऊन जन्ममरणाची येरझार चुकेल ह्यासाठी येथून कोणींहि निघून जाऊं नये असें ह्मणून बावानी विठ्ठलनामाचा गजर करून देवाचा परम सद्गदित अत करणाने धावा चालविला इकडे महाराजहि अशा समयी कीर्तनांतून उठून जावयाचे नाहीं असा निर्धार करून जागच्या जागी मोठ्या धैर्याने बसून राहिले तेव्हा त्याच्या बरोबर जे विश्वासू नोकर आले होते त्यांपैकी एकानें आपल्या धन्यावर आलेलें हे सकट निवारण्याची अशी युक्ति योजिली कीं, तो राजाचा शिरपेच चढवून एका घोड्यावर बसून यवनास दिसे अशा रीतीनें तेथून निसटून गेला त्याला असा हळूच भरधाव घोडा टाकून पळून जाताना पाहून यवनास वाटले कीं, हे शिवाजीमहाराजच पळून जात आहेत ह्मणून त्यानी आपले घोडे त्याच्या मागोमाग भरधाव सोडले ती चांदणी रात्र असल्यामुळे तो मराठा स्वार जिकडे पळत गेला त्या दिशेने त्यानी त्याचा पुष्कळ वेळपर्यंत पाठलाग केला परतु तो काहीं केल्या हातीं लागेना. शेवटी चंद्र अस्तास जाऊन चोहोंकडे काळोख पडला इतक्यात तो स्वारहि आड वाटेने निसटून पार निघून गेला. त्या वाण्याच्या घरापाशी काहीं पठाण होते तेहि आपल्या सोबत्याच्या मागोमाग निघून गेले, आणि कीर्तनास बसलेले लोक निर्भय होऊन आपआपल्या ठिकाणीं गेले. महाराजहि तुकारामबावाचा निरोप घेऊन रातोरात सिंहगडावर निघून गेले [१]

तुकारामबावाच्या बोधाचा परिणाम महाराजाच्या हृदयावर केवढा होत असे याचें एक उदाहरण आहे. तें असें एके समयीं तुकारामबावा लोहगावास

---

१ हें अरिष्ट देवानें शिवाजीमहाराजाचें रूप धारण करून त्या पठाणास आपल्या मागून धावावयास लावून निवारण केलें, असा भाविक लोकांचा त्या वेळी समज झाला. महिपतीनें व चिटणिसानें आपल्या ग्रथांत हाच समज कायम ठेविला आहे. परंतु आपल्या धन्याचा जीव वांचविण्यासाठीं आपला प्राण सकटात घालण्याचें साहस करण्यास तयार होणाऱ्या स्वामिभक्तांची कमताई त्या काळीं नव्हती.

येऊन रात्रीस घरोघर कीर्तनें करीत आहेत असें ऐकून महाराज त्यापैकीं एक श्रवण करावयास एकदा आपल्या बरोबरच्या लोकासह गेले. कीर्तनास आरंभ होऊन पहिलें मंगलाचरणच अशा थाटानें सुरू झालें की, तें ऐकून महाराज अगदीं थक्क होऊन गेले भाविक श्रोत्याची चित्तें प्रेमभरानें उचंबळून जो तो देहभान विसरून टाळ्याचुटक्या वाजवीत व मुखानें विठ्ठलनामोच्चारण करीत नाचूं लागला असा अद्भुत भक्तिरस महाराजानीं पूर्वी कधींहि अनुभविला नव्हता. पुढे प्रतिपादन सुरू झाले त्यात तुकारामबावानी वैराग्यवृत्तीचें महत्त्व व लक्षण वर्णन करून विठ्ठलावाचून ह्या विश्वामध्ये दुसरें काहींच थोर नाहीं, आपल्या जीविताचे सार्थक्य ज्यास करावयाचें असेल त्याने विठ्ठलभक्तीचा सोपा मार्ग स्वीकारावा, असा अनेक दाखले देऊन व मधूनमधून तात्कालिक स्फूर्तीनें प्रासादिक अभग ह्मणून श्रोत्यास बोध केला ऐहिक वैभवाची व ऐश्वर्याची अस्थिरता, सुखविषयाची अनथवहता व जीविताची क्षणभंगुरता श्रोतृवृंदाच्या मनात पूर्णपणे ठसण्यासारखा त्याचा तो बोध श्रवण करून महाराजाच्या चित्तवृत्तीत विलक्षण पालट झाला ते मुळचेच भाविक व सुवृत्त असल्यामुळें तुकारामबावाचे ते बोधामृतप्रचुर वक्तृत्व श्रवण करून त्याचे चित्त तल्लीन झालें, आणि त्याच्या उपदेशानुसार वर्तन केल्यास नि सशय कैवल्यप्राप्ति होईल अशी त्याच्या प्रेमळ व ऋजु अत करणाची तत्काळ खात्री झाली.

कीर्तन आटोपल्यावर महाराज बावाचा निरोप घेऊन आपल्या मुक्कामास गेले व तेथून उठून रानात एकाती जाऊन बसले, व बावाच्या बोधाचे मनन करूं लागले ही त्याची वृत्ति पाहून बरोबरचे कारभारी त्याच्याकडे जाऊन, ही अशी उपरति ह्या वयात आपणास होणे उचित नव्हे, असा त्याशीं बुद्धिवाद करूं लागले हे त्याचें बोलणे महाराजानी मुळींच मनास आणिलें नाहीं. त्यानी त्यास असे निक्षून सागितलें कीं, ‘ तुह्मी कोणी माझ्याकडे येऊं नका. तुह्माला वाटेल तशी माझ्या दौलतीची व्यवस्था करा. मला त्यात इत पर मुळींच मन घालणे नाहीं. आयुष्य क्षणभंगुर आहे तें केव्हा संपेल याचा नेम नाहीं यास्तव माझ्या जन्माचें सार्थक्य मला ह्या क्षणापासूनच करावयास लागलें पाहिजे राज्यसाधनाच्या जजाळास लागून मीं मोक्षसुखास अतरावें हें मला मुळींच योग्य वाटत नाहीं ’ हे महाराजाचें भाषण ऐकून कारभारी-मंडळीस मोठी चिंता उत्पन्न झाली, आणि त्यानीं ही सगळी हकीकत जिजा-बाईमातु श्रीस लिहून कळविली. तेव्हा ती लागलीच शिबिकेंत बसून लोहगांवास

आली; आणि पहिल्याने तुकारामबावाच्या दर्शनास जाऊन तिनें त्याला हात जोडून व पदर पसरून अशी विनति केली कीं, 'स्वामिमहाराज, माझा पुत्र शिवाजी आपलें कीर्तन ऐकून विरक्त झाला आहे आणि संसाराचा त्याग करून वनांत जाऊन बसला आहे. त्याने संपादिलेले राज्य आता कोण संभाळील बरें! तें पुन यवनाच्या हाती जाऊन गरीब हिंदुप्रजेस त्या विधर्मीयाचा जाच पुनरपि सोसावा लागेल. तेव्हा ह्या गोष्टीकडे नजर पुरवून त्यास राज्यसाधनाचा उद्योग न सोडण्याविषयीं बोध करावा ' हे तिचे नम्रतेचे भाषण ऐकून तुकारामबावानी तिचें आश्वासन केले आणि सांगितलें कीं, शिवाजीमहाराज नेहमीप्रमाणे आज रात्रीं कीर्तनास येतील, त्या वेळी मी त्याला दोन गोष्टी सांगून त्याचें मन पुन संसाराकडे लागेसें करितो.

ह्याप्रमाणें व्यवस्था करून जिजाबाई रात्री बावाच्या कीर्तनास येऊन बसली महाराजहि नित्यनियमाप्रमाणें कीर्तनास आले ह्या प्रसंगीं बावानी कर्मकांडाचे प्रयोजन काय आहे ते सांगून, ज्याने त्याने आपआपल्या धर्माप्रमाणे वर्तन करावे यातच खरें श्रेय आहे असें प्रतिपादन केले.हरिभक्तीसाठी संसाराचा त्याग करून वनात जाऊन बसण्याचे काहींएक कारण नाहीं जनात राहून आपला संसार नेकीने व माणुसकीनें चालवून आपल्या बांधवाच्या सुखात शक्त्यनुसार भर घालण्यास अहर्निश झटावे यात खरा मर्दपणा आहे आपल्या सभोवता-लील जनाची सर्व प्रकारें वाईट स्थिति प्रतिक्षणीं दृष्टीस पडत असता अशा विपन्न जनाचा त्याग करून केवळ स्वमोक्षासाठीं गिरिकुहरात जाऊन बसण्यात मुळींच पुरुषार्थ नाहीं, आणि स्वजनकल्याणहेतूने संसारात राहावयाचें ह्मटलें ह्मणजे गृहस्थाश्रमासारखा दुसरा आश्रम मनुष्यास हितप्रद होणे नाहीं जगास कंटाळून, बायकामुलाचा त्याग करून व अंगास राख फासून जे विरक्त होतात, त्यांच्या हातून इंद्रियाचें दमन न होऊन ते पुन-पुन- मोहवश होतात आणि जनांच्या अधिक्षेपास पात्र होतात अशा विटंबना पावणाऱ्या मनुष्यास कोठेंच मान नाहींसा होतो, व तो खऱ्या मोक्षसुखासहि आंचवतो तेव्हा तात्पर्य काय कीं, गृहस्थाश्रमाचा त्याग करून गोसावी बनून इतस्तत भ्रमण करीत राहण्या-पेक्षां, संसारात राहून नीतीनें वागावे, व परोपकार आणि हरिभक्ति करण्यात आयुष्य घालवावें हें विशेष चांगलें. ह्याप्रमाणें सर्वसाधारण असा बोध करून तुकारामबावांनीं राजाच्या कर्तव्यासंबंधानें थोडेंसें विवेचन केलें.त्यात त्यानीं असें दाखवून दिलें कीं, राजा जर सदाचारी व प्रजापालनदक्ष असला तर त्याच्या

ह्यातून लोककल्याण पुष्कळ होण्यासारखे असते. पुराणातरी वर्णिलेल्या अंबरीष, जनक, धर्म आदिकरून राजर्षींचीं उदाहरणें देऊन त्यानी असें सिद्ध केलें कीं, हरिभक्ति व सद्वर्तन साध्य करण्यासाठीं राजानें स्वराज्यत्याग करण्याची गरज नाहीं हा असा अनेक दृष्टांत देऊन मोठ्या कळवळ्यानें केलेला सद्बोध महाराजानी ऐकिला तेव्हा त्याची वृत्ति अगदी तटस्थ होऊन गेली बावानी केलेला एकदर बोध सत्य असून तदनुसार वागण्यातच वास्तविक हित आहे असा त्यांच्या [illegible] आणि [illegible] बावांच्या व आपल्या मातु श्रीच्या [illegible] ठेवून ते स्वस्थानीं परत गेले, व आपला स्वराज्य-संपादनाचा स्तुत्य क्रम त्यानी पुढे चालविला

त्याप्रमाणें तुकारामबावावर महाराजाची श्रद्धा अतिशयित बसून ह्या अशा महासाधूचें सान्निध्य आपणास नेहमीं घडावे व त्याच्या बोधामृताचें सेवन सदोदित करावे अशी उत्कट इच्छा त्यांच्या हृदयात उत्पन्न झाली, आणि त्यानी त्यास ह्या आशयाचे एक पत्र लिहिले व तें एका कारकुनाकडे देऊन त्यांस आणावयास घोडा, छत्री वगैरे सरंजाम त्याच्याबरोबर दिला बावानी तें पत्र वाचून महाराजास उत्तरादाखल काहीं अभंग लिहून पाठविले त्यापैकीं दोन येथे देतों —

विरंचीनें केले ब्रह्मांड सकळ। तयामाजी खेळ नाना युक्ति ॥ १ ॥
युक्तीचे चाळक तपोनिष्ठ ज्ञानी। गुरुभक्ति मनी विश्रामेंचा ॥ २ ॥
ऐसा तुझा प्रेमा कळे काहीएक। पाहुनिया लेख पत्रिकेचे ॥ ३ ॥
शिव नाम तुझे ठेविले पवित्र। छत्रपति सूत्र विश्वाचे की ॥ ४ ॥
व्रत नेम तप ध्यान योग कळा। करूनि मोकळा झालासी तू ॥ ५ ॥
हेत लागला आमुच्चिये भेटी। पत्रामाजी गोष्टी हेचि थोर ॥ ६ ॥
याचे हे उत्तर ऐकें गा भूपति। लिहितो विनंति हेताची हे ॥ ७ ॥
अरण्यवासी आह्मी फिरों उदासीन। दर्शन हें हीन अमंगळ ॥ ८ ॥
वस्त्राविण काया झालीसे मलीन। अन्नरहित जाण फळाहारी ॥ ९ ॥
रोड हातपाय दिसे अवकळा। काय तो सोहळा दर्शनाचा ॥ १० ॥
तुका ह्मणे माझी विनति सलगीची। वार्ता हे भेटीची करू नका ॥ ११ ॥
तुह्मापाशीं आह्मी येऊनिया काय। वृथा आहे शीण चालण्याचा ॥ १ ॥
मागावे ते अन्न तरी भिक्षा थोर। वस्त्रासी हे थोर चिंध्याबिंदी ॥ २ ॥
निद्रेसी आसन उत्तम पाषाण। वरी आवरण आकाशाचे ॥ ३ ॥
तेथें काय करणें कवणाची हे आस। वाया होय नाश आयुष्याचा ॥ ४ ॥
राजगृहा यावें मानाचिये आसे। तेथें काय वसे समाधान ॥ ५ ॥

रायाचिये घरीं भाग्यवंतां मान । इतरां सन्मान नाहीं तेथें ॥ ६ ॥
देखोनिया वस्त्रभूषणाचे जन । तत्काळ मरण येतें आह्मा ॥ ७
ऐकोनिया मनीं उदास व्हाल जरी । तरी आह्मां हरि उपेक्षिना ॥ ८ ॥
आता हेचि तुह्मा सांगेन कौतुक । भिक्षे ऐसे सुख नाहीं नाहीं ॥ ९ ॥
तपव्रतयाग महाभले जन । आशाबद्ध दीन वर्ततातीं ॥ १० ॥
तुका ह्मणे आह्मी श्रीमंत मनाचे । पूर्वील दैवाचे हरिभक्त ॥ ११ ॥

हें असें अत्यंत निस्पृहतेचें पत्रोत्तर आल्यामुळें महाराजाची इच्छा अतृप्त राहिली परंतु त्याबद्दल त्यास काहींएक विषाद वाटला नाहीं, तर उलट त्या महासाधुविषयीं त्याची आदरबुद्धि व पूज्यत्वबुद्धि विशेषच वृद्धिंगत झाली पुढे त्या साधूचा अंत होईपर्यंत सवडीप्रमाणें त्याच्या दर्शनास किंवा कीर्तनास ते जात असत बावाचें अकिंचनत्व पाहून त्यास काहीं तरी नेमणूक करून त्याचा योगक्षेम नीट चालेसें करावें असें महाराजाच्या मनात फार दिवस होतें परंतु हा उद्देश सिद्धीस जाण्यापूर्वींच बावाचें देहावसान झालें तरी त्याच्या बोधामृताचें अनेकदा प्राशन केल्याचें काहीं तरी उतराई झालें पाहिजे, व त्यानी जनास सदाचाराचा व ईश्वरभक्तीचा जो आपल्या आयुर्दायात बोध केला त्याबद्दल थोडासा मोबदला त्यास नाहीं तर त्याच्या वंशजास दिला पाहिजे, असें मनात आणून महाराजानीं त्याच्या मुलास तीन गावाची सनद करून दिली ती अद्यापि त्याच्या वंशजात चालत आहे [२]

तुकारामबावास गुरु करून त्याच्या समागमाने आपलें आयुष्य घालवावें असा महाराजाचा हेतु फार होता, तो बावाच्या अकालिक निधनानें तसाच असिद्ध राहिला त्या काळी पुष्कळ साधुसंत होते, परंतु ते तुकारामबावाच्या तोडीचे नसल्यामुळें महाराजाच्या मनात त्यांपैकीं कोणास आपला गुरु करण्याचें आलें नसावें एके दिवशीं महाराज महाडास असता तेथे एका हरिदासाचें कीर्तन झालें तें श्रवण करावयास ते गेले हरिदासानें ध्रुवाख्यान लावून ध्रुवाच्या ईश्वरप्राप्तीविषयींच्या अढळ निश्चयाचें सुरस वर्णन केलें ते ऐकून महाराजाच्या

---

१ हे असे सहा अभंगाचे पत्र आहे परंतु काहीं अभंगात अष्टप्रधान व रामदास स्वामी ह्याचा उल्लेख आहे त्यावरून ते प्रक्षिप्त आहेत असे ह्मणावे लागते. कारण ह्या वेळीं अष्टप्रधानाची योजना केली नसून रामदासस्वामीचेंहि दर्शन महाराजास झाले नव्हते तुकारामबावा १६४९ त वारले हें आता बहुतेक निर्विवाद आहे.

२ हा तुकारामबावांसंबंधाचा मजकूर बहुतेक जशाचा तसा प्रकृत लेखकानें त्या साधूचे चरित्र लिहून प्रसिद्ध केले आहे त्यातून घेतला आहे.

मनांत असें आलें कीं, ध्रुवास नारदगुरु प्राप्त झाल्यामुळें मोक्षसिद्धि घडली, तसा आपणासहि कोणी गुरु मिळाला पाहिजे, गुरूवाचून परलोकसिद्धि घडणें नाहीं परंतु हा गुरु करावयाचा तो खरा सात्त्विक व मोक्ष साध्य करून देणारा असा पाहिजे, असें महाराजास वाटत असल्यामुळे त्याच्या कसोटीस कोणी फारसा उतरेना तुकारामबावाचें अलौकिक साधुत्व व ईश्वरनिष्ठा अवलोकन करावयास मिळाल्यामुळे त्याची कसोटी अमळ उच्च प्रतीची होती. दुसरें असें कीं, स्वराज्यसाधनाच्या खटपटीत व संपादिलेल्या दौलतीचे रक्षण करण्याच्या प्रयत्नात त्याचा बहुतेक काळ गेला असल्यामुळे त्यास साधुपरिचर्या करून त्याचें अंतेवासित्व स्वीकारण्यास मुळीच अवकाश नव्हता ह्मणूनच त्यानीं तुकारामबावास आपल्या सन्निध राहावयास बोलाविले होते परतु ते बावा अत्यंत विरक्त असल्यामुळे त्याच्या ऐश्वर्यास व बहुमानपुरःसर केलेल्या आमंत्रणास ते भुलले नाहींत त्यावरून महाराजाची अशी खात्री झाली होती कीं, खरे साधु अमनात त्याच्या ठायीं निःसीम वैराग्यवृत्ति बाणली असल्यामुळें ते कोणाचीच परवा करीत नाहींत, व त्यास कोणाच्या आश्रयाची बिलकुल दरकार नसते. यास्तव असा साधु आपल्याजवळ येऊन राहण्यास तयार होणें कठीण आहे असें त्यास वाटे तरी खऱ्या साधूचा समागम व्हावा व त्याच्या अनुग्रहानें कैवल्यपावन करावे असें त्याच्या मनात अहर्निश वागे जेथेजेथे कोणी साधु-संत असत तेथे सवडीनुसार जाऊन त्याचें दर्शन घेण्याचा महाराजाचा परिपाठ असे त्याचा परामर्श घेऊन त्याच्या योगक्षेमाची ते योग्य तजवीज करीत.

रामदासस्वामी हे एक अशातले साधुपुरुष होते ते अतिशयित विरक्त असून सर्वदा रानावनात भ्रमण करीत असत ते एके ठिकाणी असे कोठेंच कायमचा वास करीत नसत ते चाफळखोऱ्यात रघुपतीचें देवालय व मठ बाधून तेथे बहुतकरून असतात असें कळल्यावरून महाराज त्याच्या दर्शनासाठीं तेथे गेले देवालयांत जाऊन देवाचें दर्शन घेऊन बाहेर मंडपात येऊन राम-दासस्वामी कोठें आहेत ह्मणून ते चौकशी करूं लागले तेव्हा त्या खोऱ्यात महा-राजानी नेमलेला अधिकारी नरसोमलनाथ हा तेथे येऊन मुजरा करून ह्मणाला कीं, 'स्वामी नेहमी मठात राहत नाहींत, बहुतकरून अरण्यातच असतात हल्लीं कोंडवणच्या घळीनजीक बहिरवगड आहे तेथें ते आहेत.' मग महाराज त्याच्या-विषयींची सविस्तर हकीगत त्याला विचारीत असता रामदासस्वामींचे शिष्य विठ्ठल गोसावी व भानजी गोसावी यानीं महाफळ, गंध व पुष्पमाळा असा

देवाचा प्रसाद त्यास आणून दिला. तो घेऊन त्यानी त्या गोसाव्यास नमस्कार करून विचारिलें कीं, 'हे देवालय कोणीं बांधिलें ? समर्थ इतके दिवस येथे वास करीत असून त्याची आह्मांकडून काहींच सेवा घडली नाहीं हे कसें ?' त्या गोसाव्यानी उत्तर केले कीं, आपणास समर्थांचें दर्शन घडलें नाहीं तरी हे देवालय बांधण्यास पैसा आपणाकडूनच आला आहे. तेव्हा महाराज ह्मणाले. ' तुम्ही आह्मास थोरपणा देण्याकरिता हें बोलत आहा असें वाटते हें खरें असेल तर आमच्याकडून केव्हां व कसा पैसा आला ते सागावे ' गोसावी ह्मणाले "गिरिगोसावी नाशिककर याचें पुण्यास आपल्या उपाध्यायाच्या घरीं कीर्तन झालें, तें ऐकावयास आपण गेलां होता कीर्तन चागले झालें असें वाटून आपण त्या गोसाव्यास तीनशे होन देऊं लागला तेव्हा तो ह्मणाला कीं, ' मी निरिच्छ आहें मला हे द्रव्य नको. ' त्यावर आपण बोलला कीं, 'आह्मी हें द्रव्य अर्पण केले ते केलें आपण भगवद्भक्त आहा आपल्या इच्छेस येईल तसा त्याचा विनियोग करावा ' तेव्हा त्या गोसाव्याने आपणास सागितले कीं, 'चाफळखोऱ्यात रामदासस्वामी रघुपतीचे देवालय बाधीत आहेत तेथ हे द्रव्य पावतें करावे ' आपण बरें ह्मणून ती रक्कम आपले मामलेदार नरसोमलनाथ याच्या हस्ते स्वामीकडे पावती केली " हें ऐकून महाराजास आठवण होऊन खूण पटली नतर ते त्या टेकासभोवतीं फिरून पाहू लागले तों त्याच्या दृष्टीस असें पडलें की, उत्तरेकडून वाहणाऱ्या एका ओढ्यामुळे टेकास उपद्रव होत आहे. तो नाहींसा करण्यासाठी त्यानीं नरसोमलनाथास सागितलें की, जो काय खर्च होईल तो करून ओढा वळवावा व त्यावर एक पूल बाधावा, व ह्या कामीं पाचशे होन रकम सरकारतिजोरीतून खर्चावी. ह्याप्रमाणें तेथली व्यवस्था करून महाराज कोडवणच्या घळीस समर्थांच्या दर्शनास गेले, पण तेथेंहि त्यांची भेट झाली नाहीं. तेव्हा निराश होऊन ते प्रतापगडावर आले. महाबळेश्वरास जाऊन तेथल्या देवस्थानाचें दर्शन महाराजानी घेतले, व तेथून ते पुन वाईस उतरले, आणि तेथे ब्राह्मणभोजने, दानधर्म वगैरे करून माहुलीस आले. तेथे कृष्णावेण्यासगमी स्नान करून दानधर्म करण्यांत व ब्राह्मणभोजनें घालण्यांत गुंतले आहेत तों त्यास रामदासस्वामींचें एक ओवीबद्ध पत्र आलें. तें असें:—

'निश्चयाचा महामेरू । बहुत जनासी आधारू । अखड स्थितीचा निर्धारू । श्रीमत योगी ॥ १ ॥ परोपकाराचिया राशी । उदड घडती जयासी । तयाचे गुणमहत्त्वासी । तुलना

कैची ॥ २ ॥ नरपति हयपति गजपति । गडपति भूपति जलपति । पुरंदर आणि छत्र-पति । शक्ति पृष्ठभागी ॥ ३ ॥ यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत । पुण्यवंत नीति-वंत । जाणता राजा ॥ ४ ॥ आचारविचारशील । दानशील धर्मशील । सर्वज्ञपणे सुशील । सकळा ठायी ॥ ५ ॥ धीर उदार गंभीर । शूर वीर्यासी तत्पर । सावधपणे नृपवर । तुच्छ केले ॥ ६ ॥ तीर्थक्षेत्रे मोडिली । ब्राह्मणस्थाने भ्रष्ट झाली । सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥ ७ ॥ देव धर्म तो ब्राह्मण । करावया संरक्षण । हृदयस्थ झाला नारायण । प्रेरणा केली ॥ ८ ॥ उदंड पंडित पुराणिक । कवीश्वर याज्ञिक वैदिक । धूर्त तार्किक सभानायक । तुमच्या ठायी ॥ ९ ॥ या भूमंडळाचे ठायी । धर्म रक्षी ऐसा नाही । महाराष्ट्रधर्म राहिला काही । तुह्माकरिता ॥ १० ॥ आणीकहि धर्मकृत्ये चालती । आश्रित होऊनी कित्येक राहती । धन्य धन्य तुमची कीर्ति । विश्वी विस्तारली ॥ ११ ॥ कित्येक दुष्ट संहारिले । कित्येकास धाक सुटले । कित्येकास आश्रय झाले । शिव कल्याण राजा ॥ १२ ॥ तुमचे देशी वास्तव्य केले । परंतु वर्तमान नाही घेतले । ऋणानुबंधे विस्मरण झाले । काय नेणू ॥ १३ ॥ सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ति । सांगणे काय तुह्माप्रति । धर्मस्थापनेचा कीर्ति । सांभाळिली पाहिजे ॥ १४ ॥ उदंड राजकारण तटले । तेणे चित्त विभागले । प्रसंग नसता लिहिले । क्षमा केली पाहिजे ॥ १५ ॥

हे असें पत्र आले त्याचा मोठ्या प्रेमाने स्वीकार करून तें महाराजानीं वाचून पाहिले व पत्र घेऊन येणाऱ्या शिष्याचा आदरमान करून उलट जबाब लिहिला कीं, 'स्वामिराज, मी अपराधी आहे आपण क्षमाशील आहा आशी-र्वादपत्र पाठविले ते पाहून परमानंद झाला तो पत्रात कोठवर लिहू ? आपल्या पत्रात माझी स्तुति केली आहे, तीस मी सर्वथा पात्र नव्हें. स्वामींच्या दर्श-नाची मला फार दिवस उत्कंठा लागली आहे. तरी मी आपल्या दर्शनास येत आहे कृपा करून मला दर्शनलाभ घडावा व माझी बहुत दिवसाची इच्छा तृप्त व्हावी.' ह्या अशा आशयाचे पत्र लिहून महाराजानी त्या शिष्याच्या हातीं दिले व त्यास स्वामिमहाराज कोठे आहेत ह्मणून विचारिले त्याने सांगितलें कीं, 'सांप्रत ते चाफळ येथे आहेत परंतु त्याचा नेम नाहीं कारण ते क्षणांत एका स्थळाहून दुसऱ्या स्थळी जातात.' ह्याप्रमाणें बोलून तो शिष्य पत्राचा जबाब घेऊन परत गेला

मग दुसरे दिवशी महाराज स्वारीच्या लोकासह चाफळास गेले. तेथे रघु-पतीचे दर्शन घेऊन ते रामदासस्वामी कोठे आहेत ह्मणून विचारूं लागले शिष्य-मंडळी ह्मणाली 'समर्थ शिंगणवाडीच्या मारुतीपाशीं आहेत. काल अस्तमानी आपलें पत्र घेऊन शिष्य आला ते कल्याणगोसाव्यानें आजच स्वामींकडे नेलें आहे. आपण आताच स्वामींपाशीं जाण्याची घाई न करितां, येथे नैवेद्य तयार

होत आहे तो देवास समर्पण झाल्यावर मंडळीसह प्रसाद घेऊन पुढें जावें. तोंपर्यंत आपण दर्शनास आल्याची वर्दी स्वामिमहाराजास देऊन जबाब आणतों.' महाराज ह्मणाले 'आज गुरुवार आहे, स्वामिमहाराजाचें दर्शन घेतल्यावाचून अन्नग्रहण करावयाचें नाहीं, असा आम्हीं निर्धार केला आहे' तेव्हा शिष्य-मंडळी ह्मणाली 'पुष्कळ मंडळीसहवर्तमान गेल्यास गाठ पडण्याचा नेम नाहीं यास्तव गडबड करूं नये' हें ऐकून महाराजानीं दिवाकरभटजी ह्या नावाचा एक शिष्य वाट दाखवावयासाठीं बरोबर घेऊन आपले एकदोन मनुष्य समागमें घेऊन शिंगणवाडीच्या मारुतीपाशी आले, तो रामदासस्वामी तेथून खडीच्या खाली बागेत गेले आहेत असें समजले. ह्मणून ते तिकडे गेले त्या समयी स्वामी उंबराखाली बसले होते व कल्याणगोसाव्याने नुकतेंच नेऊन दिलेलें महाराजाचे पत्र वाचून हसत होते इतक्यात दिवाकरभटजी पुढे व त्याच्या मागून महाराज तेथे जाऊन पोहचले महाराज स्वामीपुढे श्रीफळ ठेवून साष्टांग-दंडवत करून उभे राहिले तेव्हा रामदासस्वामी अगदी चकित होऊन बोलले 'शिवाजीराजे, पत्र व तुम्ही एकदाच आला, फारच त्वरा केली तुमच्या देशीं आम्ही इतके दिवस आहों, आमचा परामर्श आजपर्यंत बराच घेतला आणि आज का आलां ?' महाराज ह्मणाले 'मी आज बरेच दिवस आपले दर्शन घेण्याचा प्रयत्न करीत आहे परंतु तो आजपर्यंत सफळ झाला नाहीं. याबद्दल मला क्षमा करावी आज मला अनुग्रहप्रसाद व्हावा अशी माझी उत्कट इच्छा आहे ती पूर्ण करणार स्वामी समर्थ आहेत' ही त्याची विनंति रामदासस्वामींनी मान्य केली व कल्याण गोसाव्याच्या सांगण्यावरून महाराजानी पूजेचें साहित्य आणविले, आणि महाराजानी स्नान केल्यावर दिवाकरभटजीनें पूजाविधि सांगितला त्याप्रमाणें समर्थांची पूजा करून महाराजानी त्याच्या चरणी मस्तक ठेविलें. तेव्हां त्यांनी त्यास उपासनेच्या मंत्राचा अनुग्रह दिला, व यथोचित बोध केला तो दासबोधांतील तेराव्या दशकाच्या सहाव्या समासांत अंतर्भूत झाला असून त्यास लघुबोध अशी संज्ञा आहे, असें ह्मणतात.

हा बोध श्रवण करून महाराजाची वृत्ति अगदीं पालटली व त्यानी रामदासस्वामींस अशी विनंति केली कीं, 'मला हा राज्य संपादण्याचा खटाटोप आता पुरे आहे. तो सोडून आपल्या शिष्यमंडळीबरोबर राहून आपली सेवा करण्यांत उरलेलें आयुष्य घालवावें असें माझ्या मनांत आलें आहे. तर आपल्या समागमें राहण्याची मला आज्ञा व्हावी' ही त्यांची विनंति ऐकून रामदासस्वामी

बोलले 'याकरिताच मला शरण आलां कीं काय ? तुमचा मुख्य धर्म क्षात्र. क्षत्रियानी राज्य रक्षण करून प्रजेचे पालन करावे, देवब्राह्मणाची सेवा करावी. तुमच्या हातून अद्यापि पुष्कळ अलौकिक पराक्रम व्हावयाचे आहेत. फार दिवस म्लेंच्छमय पृथ्वी झाली आहे त्याचे निर्मूलन तुमच्या हातून करवावे अशी श्रीरघुपतीची इच्छा आहे. श्रीकृष्णाने अर्जुनास भगवद्गीतेत बोध केला आहे तो तुह्मास माहीत आहेच तो लक्षात आणा तुह्मास मुख्यत क्षात्रधर्माचेच अनुसरण केले पाहिजे पूर्वी राजे झाले त्याच्या कथा पुराणातरीं सांगितल्या आहेत त्याचें श्रवण तुह्मास घडतच आहे, आणि तुमच्या पूर्वजानी केलेले पराक्रम तुह्मास विदित आहेत ते लक्षात आणून तुह्मी तुमच्या क्षात्रधर्मास अनुरूप असें वर्तन करा. ते सोडून भलतेच कर्म करण्याची इच्छा तुह्मी धरिता ती बरोबर नव्हे ' हा स्वामीचा बोध श्रवण करून महाराजानी आपला उद्देश रहित केला, व ते स्वस्थानी निघून आले

त्यानंतर महाराज फुरसतीप्रमाणे रामदासस्वामीस वेळोवेळा भेटत असत, व त्याच्या आध्यात्मिक बोधाचें चित्तपूर्वक श्रवण करीत असत ह्या सत्पुरुषाच्या ठायी त्याची परमनिष्ठा होती कार्यबाहुल्यास्तव त्यास स्वामीच्या दर्शनास वारवार जाण्यास फावत नसे, व ते मनास येई तिकडे भ्रमण करीत असल्यामुळे त्याच्या दर्शनाचा योग मोठ्या प्रयासाने येत असे. जासुदास पाठवून पहिल्याने स्वामी कोठे आहेत त्याचा शोध करून मग त्याच्या भेटीचा लाभ साधावा लागत असे ह्याप्रमाणें त्याच्या दर्शनासबधाने नेहमीं अनिश्चय असल्याकारणानें त्यास आपल्या जवळ कोठे तरी ठेवून घ्यावे असें महाराजांच्या मनात फार असे, व ह्यासबधाने ते त्यास वारवार आग्रह करीत असत. शेवटीं रामदासस्वामींनी त्याच्या इच्छेप्रमाणें वागण्याचें कबूल करून परळीस आपण राहतों असें ह्मटलें त्यावरून त्यास महाराजांनीं मोठ्या समारभानें त्या गडावर आणिलें. तेथे एक वाडा होता त्यांत समर्थांस ठेवावें असें त्यांच्या मनात होते. परंतु त्यानी तो पाहून म्हटलें कीं, ' हा वाडा जीर्ण झाला आहे, तो मोडून नवा बांधवावा. तोंपर्यंत किल्ल्याच्या दरवाजाचे उत्तरेस ओवऱ्या आहेत त्यात आम्ही राहूं. '

हा किल्ला नुकताच हातीं आला असल्यामुळें त्यावरची व्यवस्था वगैरे नीट नव्हती, ती महाराजानीं चामली लावून दिली. ह्या किल्ल्यावर जिजोजी काटकर यास हवालदार नेमिलें होतें. त्यास समर्थांच्या आज्ञेंत सर्वदा वागावयास

सांगितलें. किल्ल्यावर व किल्ल्याखाली राहणाऱ्या एकंदर लोकांनीं समर्थांच्या आज्ञेत वागावें असा एकसहा हुकूम देऊन ठेविला. समर्थांकडील नेहमीच्या भोजनखर्चास मौजे वावरदरें ह्या गावाचा वसूल लावून दिला त्या संबंधाची व्यवस्था कोंडोपंत नावाच्या कारकुनास वाकनिसाच्या निसबत पाहावयास सांगितली, व त्यानें नेहमीं गडावर स्वामीपाशी असावे अशी त्यास आज्ञा केली. रामदासस्वामी परळीस येऊन राहिल्यावर त्या किल्ल्याचे नाव सज्जनगड असें ठेविलें ह्या गडावर नाना देशीचे साधुसंत नेहमी समर्थांच्या भेटीस येत. त्यांचें दर्शन महाराजास अनायासें होऊं लागलें पुढें समर्थांचा शिष्यसमुदाय फारच वाढल्यामुळें पूर्वी लावून दिलेलें उत्पन्न भोजनखर्चास पुरेनासें झालें. ह्मणून महाराजानी ही नेमणूक पुष्कळ वाढविली ही नेमणूक वाढविली त्याच वर्षी महाराज कर्नाटकाच्या मोहिमेवर गेले असा समर्थांच्या चरित्रलेखात उल्लेख आहे तेव्हा अर्थात् ही नेमणूक स १६७६ त वाढविली हे सिद्ध होते

महाराज व समर्थ याच्या भेटीच्या अनेक प्रसगाचा उल्लेख समर्थांच्या चरित्रलेखात केला आहे परतु त्याचे निरूपण अद्भुत चमत्कारानी युक्त असल्याकारणानें त्यांचा अनुवाद प्रकृत ग्रथात करणे उचित दिसत नाहीं. तरी त्या गोष्टींवरून एवढें अनुमान काढिता येण्यासारखे आहे कीं, महाराजांच्या ठायीं गुरुभक्ति, स्वधर्मनिष्ठा व सदाचारशीलता ह्या सद्वृत्तीचा विकास उत्कृष्ट प्रकारें झाला असून ते ह्या सद्गुणास्तव रामदासस्वामीसारख्या अत्यंत निस्पृह साधूच्या आदरास व प्रीतीस पात्र झाले होते यावरून त्याची जनक, अबरीष, धर्म इत्यादि पुराणप्रसिद्ध साधुनृपवरात गणना केली असता अत्युक्ति होणार नाहीं.

रामदासस्वामींनीं महाराजास तीन गोष्टी करावयास सांगितल्या होत्या असें ह्मणतात. एक गोष्ट अशी कीं, महाराज पूर्वीपासून सांबाची भक्ति करीत आले होते. यास्तव त्यांनीं श्रावणमासीं कोटि पार्थिवलिंगे करून ब्राह्मणभोजनें चालवीं. दुसरी गोष्ट अशी कीं, ते विद्वान् ब्राह्मणाची संभावना वेळोवेळां करीत असत, ती त्यांनीं दरसाल श्रावणमहिन्यात स्वराज्यांतील विद्वान् ब्राह्मणांस बोलावून करीत जावी मागे राज्यव्यवस्थाप्रकरणात सांगितलें आहेच कीं, पढलेल्या ब्राह्मणाची परीक्षा श्रावणमहिन्यात घेऊन त्यास त्याच्या विद्वत्तेप्रमाणें दक्षिणा देण्याचा क्रम त्यानी चालू ठेविला होता तिसरी गोष्ट अशी कीं, महाराजांच्या राज्यांतील हिंदुप्रजेनें एकमेकास जोहार करण्याचें सोडून रामराम करावा, व कागदोपत्रींहि एकमेकास रामराम लिहावा. ही रामराम करण्याची

पद्धत कोणाच्या मतें पूर्वीपासूनच सुरू होती असें आहे आणखी एका गोष्टीच्या संबंधानें येथे उल्लेख करणें अवश्य आहे ती अर्थात् महाराजाच्या भगव्या निशाणासबंधाची होय त्यांच्या निशाणास हा रंग रामदासस्वामींच्या अंगावरील भगव्या वस्त्रावरून आला होता असें ह्मणतात. ह्या संबंधाची आख्यायिका येणेंप्रमाणें आहे एके समयीं महाराजाची स्वारी साताऱ्यास असतां रामदासस्वामी आपल्या कांहीं शिष्यांसहवर्तमान त्या शहरांत भिक्षा मागावयास गेले महाराज शहरात आहेत हें त्यास ठाऊक नसल्यामुळें ते भिक्षा मागत मागत महाराज राहत होते त्या वाड्यापाशी गेले हें वर्तमान त्यास कळताच त्यानी बाळाजी आवजी चिटणीस यास एक चिठ्ठी लिहावयास सांगितली, व तींत असा मजकूर लिहविला कीं, 'आजपर्यंत जे राज्य मिळविलें आहे तें स्वामिभिक्षेस अर्पण होवो' मग त्या चिठ्ठीवर मुद्रा करून ती महाराजांनीं समर्थांच्या झोळीत घालून त्यास भक्तिपुरःसर नमस्कार केला तेव्हा समर्थांनीं त्यास पुसलें 'शिवबा, भिक्षेस धान्य घालावयाचें असून तुह्मीं चिठ्ठी घातली ती कसली?' महाराज ह्मणाले, 'भिक्षेस घालायाचे तेंच घातलें आहे' मग समर्थांनीं ती चिठ्ठी कल्याणगोसाव्यास वाचावयास सांगितली तींतील मजकूर ऐकून समर्थ म्हणाले 'शिवबा, तुह्मी सर्व राज्य भिक्षेस घातलें आतां तुम्ही काय करणार?' महाराज म्हणाले 'स्वामिराज, आपल्या इतर शिष्यमंडळीप्रमाणें आपली सेवा करून राहावे, हीच माझी इच्छा आहे' ही अशी त्याची वृत्ति पाहून समर्थांनीं त्यास दाशरथी राम व विदेही जनक याच्या कथा सांगून व्यवहाररीत्या राजधर्माप्रमाणें आचरण करून परमार्थ साधण्यातच खरा पुरुषार्थ आहे असा पुनरपि बोध केला; व त्यास आपल्या वतीने सर्व राज्यकारभार पूर्ववत् चालविण्याची आज्ञा केली. ती शिरसावंद्य करून तदनुसार ते वागूं लागले, आणि हें राज्य रामदासस्वामींचें आहे हें सर्वांस समजण्यासाठी त्यानीं आपल्या निशाणास भगवा रंग दिला.[१]

आतां येथे एका महत्त्वाच्या गोष्टीसंबंधानें थोडेंसें लिहिणें इष्ट दिसतें. रामदासस्वामींला गुरु करून त्यांच्यावर एवढी निष्ठा महाराजानीं प्रगट केल्यावरून कित्येकाचा असा तर्क आहे कीं, त्या साधूकडून त्यांस राज्यसाधनाच्या कामीं हरएक प्रसंगीं सल्लामसलत मिळत असे. समर्थांचे चरित्रलेख आज उपलब्ध आहेत त्यांत समर्थांच्या वडील बंधूचा हनुमानस्वामी ह्मणून एक वंशज होता त्यानें समर्थांच्या देहावसानानंतर सुमारें सवाशें वर्षांनीं समर्थांचें एक

१ ही आख्यायिका महाराजाच्या कोणत्याहि बखरींत आढळत नाहीं.

चरित्र लिहिले तेच पहिले असून तदनंतरच्या इतर एतद्विषयक लेखास आधारभूत झालें हनुमानस्वामीच्या ह्या बखरीत महाराजास समर्थांकडून स १६४९ त अनुग्रह मिळाला होता, व तेव्हापासून ते समर्थांच्या उपदेशानुरूप राज्यव्यवहारात वागत असत, असा स्पष्ट उल्लेख आहे परंतु ही अनुग्रहाची तारीख बिलकुल खरी नाहीं. सदरील चरित्रलेखात ज्या काहीं तारखा दिल्या आहेत त्या बहुतेक विश्वसनीय वाटत नाहींत महाराजाच्या चरित्रक्रमासबधानें काहीं तारखा यात दिल्या आहेत त्या बहुतेक चुकल्या आहेत रामदासस्वामीची महती वाढविण्याच्या उद्देशानें त्याच्या चरित्रकारानी हा सत्यापलाप केला असावा, किंवा पूर्वपरंपरागत चालत आलेल्या आख्यायिका सत्यवत् मानून त्याचा अनुवाद त्यानी स्वलेखात केला असावा हे पूर्वकालीन चरित्रकार महिपतीचें अनुकरण करून अद्भुत चमत्कारांचें वर्णन स्वग्रथात करितात. त्यावरून त्याची सत्यनिष्ठा कितीशी होती हें उघड दिसत आहे महासाधूच्या लीला वर्णन करावयाच्या ह्मटल्या ह्मणजे त्यात चमत्काराचे कथन अवश्य झालें पाहिजे अशी समजूत सामान्य लोकाची असल्यामुळे त्याच्या एतद्विषयक लेखास ऐतिहासिक रीत्या प्रमाण ह्मणवत नाहीं तरी त्याच्या ह्या अद्भुतकथामय ग्रंथात सत्याचा अंश बराच असतो. तो सत्यान्वेषण करणारानें निवडून घेतला पाहिजे परंतु हे कर्तव्य आमचे कित्येक आधुनिक पंडित विसरतात किंवा त्यास पराङ्मुख होतात, ह्मणून सामान्य जनाच्या भ्रमाचा निरास होत नाहीं. आतां हा अनुग्रहकाल कसा चुकला आहे तें येथे थोडक्यात सागणें इष्ट होय

रामदासस्वामीचे जे चरित्रलेख आहेत त्या सर्वांत महाराजास समर्थांचें दर्शन प्रथम चाफळखोऱ्यात झालें असून त्या वेळीं ह्या खोऱ्यावर महाराजाची सत्ता होती, व तेथे त्यांचा एक मामलेदारहि होता असें सागितलें आहे. तसेंच ह्या चाफळगावाकडे जावयासाठीं महाराज प्रतापगडावरून निघून महाबळेश्वरास गेले व तेथून कऱ्हाड, वाई व माहुली ह्या गांवावरून आले असून वाई व माहुली येथे ब्राह्मणभोजनें व दानधर्म पुष्कळ केल्याचा उल्लेख त्या चरित्रांत आहे. ह्यावरून हें उघड होतें कीं, अनुग्रह घेण्याच्यापूर्वी प्रतापगड बांधला असून ह्या प्रांतावर महाराजांची त्या वेळीं सत्ता स्थापित झाली होती. परंतु वास्तविक इतिहास असा आहे कीं, महाराजांनीं प्रतापगड स. १६५८ च्या सुमारास बांधला असून वाई, माहुली वगैरे प्रांत महाराजांनीं स० १६७३ त

पहिल्यानेच काबीज केले[1] ह्यापूर्वी ते त्याच्या कबजात आले नव्हते त्या-प्रमाणेंच महाराजानी रामदासस्वामीचा अनुग्रह घेतल्यावर एकदोन वर्षानी त्यास परळीच्या किल्यावर नेऊन ठेविले, व प्रसिद्ध स्वराज्यदानाचा प्रकार साताऱ्यास घडला असे सदरील लेखात ह्मटले आहे परंतु हे दोन्ही किल्ले महाराजानी स १६७३ तच हस्तगत केले होते ह्या एका ऐतिहासिक प्रमाणा मुळे रामदासस्वामीच्या भक्तानी सर्वत्र प्रसृत केलेला वादविषयक प्रवाद अगदी निराधार आहे असें ह्मणण्यास काहीएक प्रत्यवाय नाहीं

महाराजाच्या चरित्राच्या ज्या बखरी प्रसिद्ध झाल्या आहेत त्यात अद्भुत चमत्काराचा लवलेश नसून त्या बहुतेक इतिहासकथनात्मकच आहेत तेव्हा त्यावर विश्वास ठेवण्यास फारशी हरकत वाटत नाहीं ह्या बखरींत महाराजानीं कोणत्याहि प्रसगी रामदासस्वामीचा सल्ला घेतल्याचा उल्लेख आढळत नाही, नाहीं ह्मणावयाला एका प्रसगी मात्र त्याचे मन विचारिल्याचे आढळते तो प्रसग राज्याभिषेकसमारभाचा होय[2] आता चिटणीसकृत बखरीत व श्रीशिवदिग्विजयात

१ मागे भाग बाविसावा पाहा

२ महाराजानी समर्थाची सल्ला हरएक महत्त्वाच्या प्रसगी घेतल्याचे उल्लेख ऐतिहासिक बखरीतून नाहीत याविषयी समर्थभक्तास वैषम्य वाटून हनुमानस्वामीच्या बखरीत ह्या उल्लेखाच्या अभावाची मीमासा पुढील भाकडकथा देऊन केली आहे शिवाजीमहाराजानी स १६४९ त अनुग्रह घेतल्यापासून ते प्रतिगुरुवारी रामदासांच्या दर्शनास येऊन राजकीय प्रकरणी सल्लामसलत विचारीत. हा त्यांचा नेम पाळण्यास त्याना कित्येक वेळा निकडीच्या प्रसगामुळे अडचण येऊ लागली हे जाणून समर्थांनी त्यास एके प्रसगी असे सागितले की, ‘शिवबा, तुमचा हा नेम चालणार नाही, तुह्मी प्रसग येईल तशी मसलत करून काम करीत असावे’ महाराजानीं ह्मटले की, ‘हा प्राण जावो की राहो आपल्या आज्ञेवाचून पाऊलहि पुढे पडावयाचे नाहीं’ हा असा त्याचा निर्धार पाहून रामदासानी त्यास अशी तोड सुचविली कीं, “ हे राजा, शुचिर्भूत होऊन एक प्रश्न विचारणारा व एक लेखक असे तिघे एकांतीं बसा, आणि कार्यासंबधानें प्रश्न विचारावयाचा असेल तो प्रश्न विचारणारानें विचारावा ह्मणजे तुमच्या अगात देवी सचरून तुमच्या मुखे बोलेल. ते शब्द लेखकाने लिहून ठेवावे मग देवीचे वारे विसर्जन पावल्यावर लिहून ठेवलेला मजकूर वाचून त्यात केलेल्या आज्ञेप्रमाणे वर्तत जा ” ही अशी भाकडकथा रचण्याला सदर स्वामीला आधार एवढाच होता की, महाराजांला एकादा बिकट प्रसग प्राप्त होऊन काहीएक सुचेनासें झाले ह्मणजे त्याच्या अंगांत देवीचें वारें येऊन त्या प्रसगीं कसें वागावे तें ते वदत असत, असें इतिहासात नमूद झालें असून तें सर्वश्रुत होतें. परंतु रामदासांसारख्या कट्ट्या रामभक्तानें ज्या देवताचा आपल्या काव्यात अनेकश· उपहास केला आहे,

महाराजानीं रामदासस्वामीचा अनुग्रह घेतल्याची तारीख इ स १६४९ ही दिली आहे, तीहि खोटी कीं काय ? असा कोणीं प्रश्न केल्यास त्यास उत्तर एवढेंच कीं, ती समर्थांच्या चरित्रलेखावरून त्या बखरकारानी उतरून घेतलेली स्पष्ट दिसते [१] महाराजाच्या इतर जुन्या चरित्रलेखात हा अनुग्रह घेतल्याचा उल्लेखच

---

त्यातल्या एका देवतेचे साहाय्य घेण्याचा उपदेश करावा हे विचित्र दिसते रामदास स्वत हवे तेथे हवे तेव्हा प्रगट होत असत अशा त्याच्या सबधान आख्यायिका हनुमानस्वामीच्या बखरीत दिली आहे, तीस अनुसरून त्यानी महाराजाना असें का नाहीं सागितले की, 'शिवबा, तुला एकाद्या कायामबधाने पेंच प्राप्त होईल तेव्हा माझे स्मरण कर म्हणजे मी प्रगट होईन'' समर्थ एवढे निसीम रामभक्त होते की, त्याला पढरपूरच्या विठोबाच त्या वेळी अतिशयित गाजत असलेल माहात्म्य तुच्छ वाटे एकदा कोणाच्या आग्रहास्तव पढरपुरास ते गेले तव्हा विठोबाची मूर्ति रामरूप झाली अशा कथा आहे शिवाय ते मारुतीचे अवतार असून त्यानी जिकडेतिकडे रामाचा व मारुतीची देवालये स्थापिल्याचा प्रवाद आहे ह्या दोन्ही प्रवादास अनुसरून त्यानी महाराजास तुमच्या अगी राम किवा मारुति सचरून जी आज्ञा देईल तदनुसार वागा असे सागावयास हवे होते हनुमानस्वामी समर्थ व महाराज याच्या तीसबत्तीस वेळा झालेल्या भेटींच्या गोष्टी देतो, त्यातील एकाहि प्रसगी महाराजानी त्यास राजकीय बाबतींत सल्लामसलत विचारिल्याचा उल्लेख तो कोठेहि करीत नाहीं शिवाय रामदासमाधूशी १६४९ पासून सघटन झाले होते हे जर खरे तर महाराजाच्या मनात उपासनातर का उद्भवले नाही हे एक कोडेच आहे खरें पाहता महाराज अखेरपर्यंत भवानीचे उपासक होते ते रामभक्त झाल्याचा पुरावा नाहीं

१ रामदासस्वामीचें देहावसान झाल्यावर त्याच्या वडील बधूच्या वशजांकडे त्याच्या मठाची व्यवस्था आली, आणि हनुमानस्वामी नावाच्या त्याच्या एका वशजानें रामदासस्वामीचें चरित्र प्रथम लिहिले हे रामदासाच्या निधनानतर सुमारें सवाशें वर्षांनी लिहिले हें वर सागतलेच आहे ह्याच सुमारास मल्हार रामराव चिटणीस याने शिवाजीमहाराजाचें चरित्र लिहिले ह्या उभय चरित्रकारानीं आपआपल्या कामी परस्पराचे पुष्कळ साहाय्य घेतलें असावें तरी त्यातल्यात्यात चिटणिसाने महाराजाच्या इतिहासास अगदीच विरुद्ध अशा कित्येक गोष्टी ज्या हनुमानस्वामीने रामदासाच्या चरित्रात त्याची महती वाढविण्याच्या उद्देशाने लिहिल्या आहेत त्या सगळ्याचाच अनुवाद केलेला नाही रामदासानी महाराजास अनुग्रह दिल्याची हकीकत मात्र त्यानें हनुमानस्वामीच्या बखरीवरून घेतली आहे हनुमानस्वामीने महाराजाच्या व रामदासाच्या वारवार झालेल्या भेटींसबधाच्या तीसबत्तीस भाकडकथा आपल्या बखरींत लिहिल्या आहेत त्याचा चिटणीसानें उल्लेख केलेला नाहीं दिल्लीस जाताना मात्र महाराजानी रामदासाचें दर्शन घेतलें होतें असा ह्या

मुळीं केलेला नाहीं[1] ह्या अनुग्रहकालाचा निर्णय, रामदासस्वामींचा शिष्य दिवाकर गोसावी याच्या वंशजाजवळ मिळालेल्या पत्रसंग्रहापैकीं काहीं अस्सल पत्राचे उतारे प्रसिद्ध झाले आहेत, त्यावरून बहुतेक झालाच आहे त्यावरून

बखरकारानं आपल्या बखरात उल्लेख केला आहे पण राज्याभिषेकाच्या प्रसंगाखेरीज इतर कोणत्याहि प्रसंगी महाराजानी त्याची सल्लामसलत घेतल्याचा उल्लेख केलेला नाही अनुग्रहाची तारीख त्याने स १६४९ अशी दिली आहे, तरी महाराजानी रामदासास परळीस आल्यावर स १६७८ त आणून ठेवले व चाफळखोऱ्यातील मठास त्याच वेळी इनाम गाव दिले, असे त्याने लिहिले आहे हनुमानस्वामी ह्मणतो की, रामदासस्वामी परळीस १६५० त जाऊन राहिले ह्या तारखेस परळीचा किल्ला महाराजाच्या ताब्यात आला नव्हता ह्मणून चिटणीसाने ही तारीख दिली नाही असे दिसतें त्याप्रमाणेच स १६५९ त अफझुलखानाच्या वधानतर महाराजानी रामदासास परळी येथे भेटावयास जाऊन काही गाव इनाम दिल्याचा आख्यायिका चिटणीसाला खरी वाटली नाही म्हणून ती त्याने दिली नाही। शिवदिग्विजयात महाराजांस सज्जनगडावर ब्रह्मविद्येचा लाभ रामदासांकडून झाल्याचा उल्लेख आहे अनुग्रहाची हकीकत अर्थात् त्यात हनुमानस्वामीच्या बखरीच्या आधारानेंच दिली आहे

१ महाराजाचे देहावसान झाल्यावर थोड्याच वर्षांनीं सभासदानें महाराजाच्या चरित्राची बखर लिहिली तींत रामदासाचा मुळींच उल्लेख नाही ह्यानंतर चित्रगुप्ताने बखर लिहिली तींत रामदासाचा उल्लेख फक्त दोन स्थली अगदी त्रोटक केला आहे त्याचा अनुग्रह महाराजानीं घेतल्याचा वगैरे उल्लेख मुळी नाही राज्याभिषेकानंतर रामदासस्वामींनीं महाराजास राजनीतीचा उपदेश केल्याचा मात्र उल्लेख त्यात आहे, पण तोहि अगदी संक्षेपत केला आहे

२ ही पत्रे रा गो का चांदोरकर यानी केसरीपत्राच्या ता २६ माहे जून स. १९०६ इसवीच्या अंकात एक पत्र प्रसिद्ध केले आहे त्यात नमूद केलीं आहेत. त्यापैकी दोन उतारे येथे देऊं केशव गोसावी याने दिवाकर गोसाव्यास पाठविलेले उत्तर —"राजेश्री शिवराजे भोसले समर्थाचे भेटीस येणार ह्मणोन लिहिले, समजले. मी येणार होतो परंतु माझी प्रकृति फार बिघडली. येणे होत नाहीं. मी इकडून अंकास येणेसाठीं लिहिले परंतु अंकाचेंही येणें व्हावयाचें नाही. भानजी गोसावी तेथें असतील राजे याची पहिलीच भेट आहे वाडीचे लोक खटपटीस आणावे. उपयोग होईल दत्ताजीपंताकडून दोनशे होन उत्सवास पाठविले ते आले असतील लोभ करावा मिति चैत्र वद्य १ शके १५९४ (ता ४ एप्रिल १६७२)" महाराजांचें जिजाजी काटकर हवालदार कारकून, किले सज्जनगड, यास पत्र "श्रीरामदास गोसावी शिवथरीं राहतात सांप्रत कित्येक दिवस गडावरी येतील त्यास येऊं देणें, राहतील तितके दिवस राहूं देणें. उतरतील तेव्हा उतरूं देणें .छ० ८, जमादिलाखर सन सबा सबैन, १०७७–शके १५९८ (इ. स. १६७६.)".

पाहता महाराजाची प्रथम भेट स १६७२ त झाली त्याप्रमाणेंच स १६७६ पर्यंत समर्थ परळीवर कायमचे राहावयास आले नव्हते आणखी असें कीं, चाफळ येथील मठास किंवा परळी येथील मठास किंवा समर्थांनी स्थापलेल्या दुसऱ्या कोणत्याहि देवस्थानास गावाचे वगैरे उत्पन्न लावून देण्यासाठी महाराजानी १६७४ सालापूर्वी एकहि सनद करून दिलेली सापडत नाहीं रा राजवाडे व सत्कार्योत्तेजक मडळी यानी आजपर्यंत कितीतरी कागदपत्रे हुडकून काढून प्रसिद्ध केलीं आहेत परंतु स १६७४ पूर्वीची एकहि सनद त्यास अद्यापि सापडली नाहीं, हा चमत्कार नव्हे काय ? तेव्हा अर्थात् हनुमानस्वामीने आपल्या बखरीत स १६४९ त अनुग्रह झाल्यावर समर्थांस जमिनीच्या सनदा करून दिल्या व पुढे अफझुलखानाच्या वधानतर पुन एकदा अशाच आणखी सनदा करून दिल्या असा उल्लेख केला आहे तो अगदी खोटा आहे. ह्या वेळी ह्या गुरुशिष्याची मुळी गाठच जर पडली नव्हती तर इनामाच्या सनदा कोठून सापडणार ?

आता येथे कोणी अशी शंका घेतील कीं, महाराज स १६७२ पर्यंत त्यास प्रत्यक्ष भेटले नसले तरी त्याची माहिती त्यास असावी ही माहिती त्यास निदान स १६५८ पर्यंत मुळीच नव्हती, व त्यानतरहि समर्थांचे स्मरण त्यास

---

१ दिवाकर गोसाव्यास भास्कर गोसावी याचे पत्र —"शिवाजी राजे याच्याकडे भिक्षेस गेलो त्यानी विचारिले, तुह्मी कोठील कोण, कोणा ठिकाणी असता ? त्यावरून आह्मी बोलला की, आह्मी रामदास श्रीसमर्थांचे शिष्य, चाफळास राहतो मग ते बोलले की, ते कोठे राहतात व मूळगाव कोण ? त्यावरून आह्मी सांगितलें की, 'गगातीरचे जाबेचे राहणार प्रस्तुत चाफळास मठ करून श्रीदेवाची स्थापना करून उत्साह मोहोत्साव चालू करून आज्ञा सर्वत्रास आज्ञा की, तुह्मी भिक्षा करून उत्साह करीत जावा ऐसें सागितल्यावरून आह्मी हिडत आहो, असे बोलताच राजश्रींनी दत्ताजीपत वाकेनिवीस यास प्रतिवर्षीं श्रीचे उत्साहास दोनशे होनु देत जाणे ह्मणून पत्र पाठविले ते होनु समयास येतील, कळावे फाल्गुन शुद्ध २, शके १५८०" ( हे पत्र रा. देव यानीं छापलेल्या दासबोधग्रथाच्या प्रस्तावनेंत शेचाळीसाव्या पृष्ठावर दिलें आहे ) ही नेमणूक करून दिल्यासबधाचा उल्लेख समर्थांच्या शिष्याचें महाराजाशी जे भाषण झालें त्यात झालेला नाहीं भेटीसबधाचा मजकूर समर्थांच्या बखरीतून घेतला आहे. रा. चांदोरकर आपल्या पूर्वोक्त पत्रांत ह्मणतात कीं, शिवरायांकडून समर्थांस ज्या सनदा मिळाल्या होत्या त्यात शके १५९४ ( १६७२ ) च्या अलीकडील एकहि नव्हती. तेव्हा अर्थात् भास्कर गोसाव्याच्या पत्रांत सागितलेली वार्षिक रकम प्रतिवर्षीं नियमानें मिळाली नसून तिचा ठराव त्या वेळीं सनदेनें झाला नसावा.

राहिलें असावें असें दिसत नाहीं कारण महाराज समर्थांच्या दर्शनासाठीं प्रथमच चाफळास गेले तेव्हा, 'इतके दिवस स्वामीची आपणाकडून काहींच सेवा घडली नाहीं हे कसें ?' असा प्रश्न त्यानीं समर्थांच्या शिष्यास केला होता, असें रामदासाच्या बखरीत लिहिले आहे ह्या विस्मरणाचें याहूनहि बलवत्तर प्रमाण खुद्द रामदासस्वामीच्या वर दिलेल्या ओवीबद्ध पत्रावरून मिळण्यासारखें आहे त्यात आपले वर्तमान घेतले नाहीं व आपल्याविषयी विस्मरण झालें असावे, असा स्पष्ट उल्लेख समर्थानी केला आहे दुसरे असें की, ह्या पत्रात जी महाराजाची स्तुति केली आहे तिला ते १६४९ त किंवा पुढे पचरावीस वर्षांनी तरी लायक झाले होते असे सहसा ह्मणवत नाहीं ह्या पत्रात समर्थानी महाराजास जलपति ह्मटले आहे कोंकणपट्टी काबीज करून तिच्या तीरी किल्ले बाधण्याच्या व आरमार निर्माण करण्याच्या कामाला त्यानी १६६३ नतर सुरुवात केल्याचे इतिहास निश्चितपणें सागतो तेव्हा अर्थात् १६४९ ह्या वर्षी त्यास जलपति हे विशेषण लावणे मुळीं शक्य नव्हते असो, तेव्हा एकंदरींत काय की, १६७२ पर्यंत समर्थांची व महाराजाची मुळी भेटच झाली नव्हती आता ही भेट घेतल्यावर लागलींच अनुग्रह घेतला की कसें हें निश्चयात्मक सागता येत नाहीं [१] वर समर्थांच्या बखरीतील हकीगत जशाची तशी दिली आहे ती खरी मानिल्यास वाइ, कऱ्हाड वगैरे प्रात स १६७२ नच काबीज केले असावे असें दिसते, आणि परळी व सातारा हे किल्ले स १६७३ त काबीज केले असावे समर्थांचा शिष्य अनंत गोसावी याने भैरवभटास एक पत्र पाठविले होते[२] त्यात ' कैलासवासी शिवाजीराजे भोंसले यासी परिधावी

१ पुण्याच्या फर्ग्युसन कॉलजाचे प्रोफेसर भाटे यानी दोन वर्षांपूर्वी " सज्जनगड व समर्थ रामदास" नावाचे एक लहानसे पण सुदर पुस्तक प्रसिद्ध केले आहे त्यात त्यानी रामदासस्वामी व शिवाजीमहाराज याचा गुरुशिष्यसबध कधीं घडून आला याचा निर्णय प्रकृत ग्रथातल्या सारखाच केला आहे ह्या वादाचा योग्य निर्णय विशेष स्पष्टपणे लक्षात यावा असे ज्यास वाटत असेल त्यानीं त्यांचें सदरील पुस्तक अवश्य वाचावे. रा चादोरकरांकडचीं अस्सल पत्रें त्यानी नीट तपासून वाचून पाहिली आहेत. प्रो भाटे ह्मणतात की, केशव गोसाव्यानें पूर्वोक्त पत्र पाठविल्यावर आठ दिवसानीं ह्मणजे चैत्र वद्य नवमीला महाराजास अनुग्रह झाला असावा. कारण ह्या तिथीस अमृतसिद्धि योग असून उत्तराषाढा नक्षत्र होतें. ह्या अभिजात मुहूर्तावर अनुग्रह झाल्याचा उल्लेख एकदोन बखरींतहि आहे यास्तव हें त्यांचें अनुमान खरे आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

२ हेंहि पत्र रा. चादोरकरांच्या पूर्वोक्त पत्रांत अशरूपानें अस्सल ह्मणून दिलें आहे.

संवत्सरी शिंगणवाडीचे मठी श्रीहनुमंतासमोर परमार्थ झाला,' असा स्पष्ट उल्लेख आहे हा परिधावी सवत्सर स० १६७२ त येतो

आतां तुकारामबावाच्या सान्निध्याची इच्छा करून महाराजानी त्यास आणण्याकरिता लवाजमा व पत्र पाठविले असता, त्यास त्या महाविरक्त साधुवराने जे एक अभगात्मक पत्र लिहिले आहे त्यात रामदासस्वामीचा उल्लेख असून त्याच्या ठायी मन स्थिर करण्याविषयी बावानी महाराजास सागितले आहे, ह्यावरून रामदासस्वामीचे दर्शन व अनुग्रह महाराजास ह्या पत्रव्यवहारापूर्वीच घडला होता असें कोणी ह्मणतील परतु पूर्वोक्त ऐतिहासिक प्रमाणे असत्य ठरल्यावाचून ह्या अभगरूप पत्राच्या प्रमाणावर भिस्त ठेविता येणार नाही दुसरे असें की, रामदासस्वामीच्या चरित्रात दिलेला अनुग्रहाचा शक खरा आहे असें मानून चालले तर तुकारामबावाचे देहावसान झाले त्याच वर्षी हा अनुग्रह झाला असें ह्मणावे लागते हे जर खरें तर समर्थाचा अनुग्रह घेतल्यानतर तुकारामबावा, रामदासस्वामी व शिवाजीमहाराज याच्या अनेक वेळा भेटी झाल्या, व परळी येथे मोठा समारभ झाला तेव्हा तुकारामबावा आले होते, इत्यादि गोष्टी समर्थाच्या बखरीत आहेत त्याहि खऱ्या मानून तुकारामबावाचा निधनकाळ बराच पुढे लोटावा लागेल परंतु तो स १६४९ सालापलीकडे मुळीच ढकलता येत नाहीं, हे निर्विवाद आहे आणखी असें की, महाराजानी बावास पत्र पाठविलें ते अर्थात् त्याच्या देहावसानापूर्वी काहीं दिवस पाठविले असले पाहिजे परतु रामदासस्वामीच्या बखरीत तें अनुग्रह घेतल्यानतर बऱ्याच दिवसानीं पाठविल्याचा उल्लेख आहे चिटणीसकृत बखरीतहि असाच उल्लेख आहे ह्या बखरींत तर यासबधाचा काहींसा कृत्रिम प्रकार दिसतो तींत तुकारामबावाच्या अभगरूप पत्रोत्तराचे दोन तुकडे केले आहेत रामदासस्वामींचे दर्शन घडल्यापूर्वी तुकारामबावास बोलवावयास पाठविलें तेव्हा त्यांनी उत्तर पाठविले तें दोन अभंगात दिलें आहे, आणि रामदासस्वामींनी अनुग्रह दिल्यानंतर पुन महाराजानी बावास येऊन दर्शन द्यावयासाठीं विनतिपत्र लिहिलें, त्याचे उत्तर त्यानीं पाठविलें तें चार अभंगात दिले आहे जर समर्थांच्या ठायीं महाराजाचा भाव दृढ झाला असून त्याच्या दर्शनाचा वेध लागून राहिला होता तर तुकारामबावाकडे धाव घेण्याचे त्यास काय प्रयोजन होतें ? नुसतें दर्शन घ्यावयाचें होते तर त्यास पत्र पाठवून बोलावण्याचे काय कारण होतें ? महाराज नेहमीं फिरत असून वेळोवेळा तुकारामबावाचे कीर्तन ऐकावयाची संधि साधीत असत, असा इतरत्र स्पष्ट उल्लेख आहे. अशा समयी

त्यांस दर्शन होत नसे काय ? तेव्हा अर्थात् हा सगळा प्रकार केवळ बनावट दिसतो

ह्यावरून असें ह्मणावे लागते कीं, तुकारामबावाच्या कासेस लागण्याचा प्रयत्न महाराज करीत होते तेव्हा समर्थाचे नावहि त्यास माहीत नसावे यावर सहज अशी शंका उत्पन्न होते कीं, तुकारामबावानी आपल्या पत्ररूप अभगांत रामदासस्वामीचा उल्लेख केला आहे त्याची वाट काय ? ह्या शकेचें निरसन असें कीं, त्या अभगापैकीं काहीं अभंग तुकारामबावाचे नसून केवळ प्रक्षिप्त आहेत आणि ते बहुतेक राज्याभिषेकानतर रामदासस्वामीच्या भक्तानी रचून त्यात सामील केले आहेत, असे त्यातील छत्रपति ह्या विशेषणच्या व अष्टप्रधानाच्य उल्लेखावरून ह्मणावे लागते कारण तुकारामबावाच्या हयातीत महाराज छत्रपति झाले नसून अष्टप्रधानाचीहि योजना त्यानी केली नव्हती हा प्रक्षेप करणारानी आपल्या गुरूची महती वाढविण्यासाठी हा सत्यापलाप केला नसत तर महाराजास हीनपणा आणणारा प्रवाद आज महाराष्ट्रात प्रचलित झाला नसता हा प्रवाद अर्थात् असा कीं, स्वधर्मरक्षण व स्वराज्यसाधन हीं मुख्यतः रामदासस्वामीच्या उपदेशाने महाराजाकडून घडली ह्या प्रवादाचे सत्यत्व स्थापित करण्यासाठीं काहीं इतिहासशोधक गृहस्थ साधेल तेवढा पुरावाहि गोळ करण्यात गुतले आहेत असें समजते परतु वर नमूद केलेली पत्रे खोटीं ठरत तोंपर्यंत त्याचा हा प्रयत्न व्यर्थ होय, व त्याचे आजपर्यंतचे एतद्विषयक वाक्पाडित्य केवळ अनर्थक होय [१]

१ रा राजवाडे यानी तुकारामबावाच्या सदरील अभगरूप पत्रावरून रामदासस्वामी व शिवाजीमहाराज याची भेट तुकारामबावाच्या निधानापूर्वी झाल्याच निर्णय होतो असे प्रतिपादन केले आहे ते कितपत सत्य आहे ते वरील विवेचनावरून ध्यानात येण्यासारखे आहे ह्याशिवाय आणखी तीन कागद त्यास सापडले आहेत त्यातील मजकुरावरून प्रथम भेटीच्या काळाचा बराच निर्णय होतो असे त्याचें ह्मणणे आहे ह्या तीन कागदापैकी दोन पत्रें आहेत ही महाराजानी रामदासस्वामीस राज्याभिषेकानतर लिहिली आहेत एका पत्रात राज्याभिषेकानतर त्यांची परस्पराची रायगडावर एकाता भेट झाल्याचा उल्लेख आहे, आणि दुसरें १६७१ तलें असून त्यांत रामदासाच्या कृपेनें व उपदेशानुसार वर्तनानेंच आपणांस यश प्राप्ति झाल्याच परमलीनतेचा व अहभावविरहित असा उल्लेख आहे ह्या अशा औपचारिक उल्लेखाच आधार केवळ दुर्बळ आहे महाराजासारख्या परमभाविक व साधुसतांविषयीं परम आदराची वृत्ति सर्वदा हृदयात वागविणाऱ्या साधुनृपानें आपल्या परमयोग्य गुरु

आतां येथे आणखी एका शंकेचा विचार करून हें प्रकरण संपवूं ही शंका अशी कीं, रामदासस्वामींची शिवाजीमहाराजानी प्रथम भेट १६७२ त घेतली असून त्या वर्षी किवा त्याच्या पुढल्या वर्षाच्या आरभी त्याचा अनुग्रह घेतला हें जर निर्विवाद आहे तर समर्थाच्या दासबोधात जी राजनीत्यादि प्रकरणें त्या राजमणीस उपदेशपर अशी आढळतात तीं केव्हा लिहिली असावीं ? ह्या शंकेचे समाधान असें आहे कीं, दासबोधाचे जे एकदर वीस दशक आजला उपलब्ध आहेत त्यापैकीं पहिले आठ दशक काय ते मूळचे असून दासबोध सगळा एवढाच होता, व बाकीचे दशक एक तर समर्थाच्या शिष्यानी मागाहून सामील केले असावे, किंवा समर्थानीच ते पुढे प्रसगोपात्त रचले असावे. रा शं श्री देव यानी आपल्या दासबोधावरील प्रस्तावनेत (प्रथमावृत्ति) ह्या सबधाचा पुरावा येणेंप्रमाणे नमूद केला आहे —(१)आठ दशकाच्या अखेरपर्यंत ग्रथाचा प्रवाह एकसारखा चाललेला दिसतो त्यात कोठेहि पुनरुक्ति नाहीं अनेक वेळा पुनरुक्ति करण्यात आली आहे ती आठव्या दशकानतर श्रीस र्थाना मुख्यत: अध्यात्मनिरूपण करावयाचे होते अध्यात्माशिवाय आठ दशकाच्या अखेरपर्यंत दुसरा विषय नाहीं राजकारण हा शब्द आठ दशकापर्यंत कोठेहि आला नाहीं श्रीशिवाजीमहाराजाचा ओघ अजून येऊन मिळाला नव्हता राजकारण हा शब्द प्रथम नवव्या दशकात ओझरता आला आहे, (२) द० ७-१०-४२ ही ओवी अशी आहे, ' सरली शब्दांची खटपट । आला ग्रंथाचा शेवट । येथें

---

पाशी असा विनय प्रगट करावा हे केवळ अनुरूप होय त्यावरून भलतेच तर्क करणे अप्रयोजक होय आता रा राजवाडे याना आणखी एक कागद मिळाला आहे त्यात रामदासाच्या चरित्रातील प्रसंगाचे क्रमवार टिप्पण आहे हनुमानस्वामीने रामदासांच्या चरित्रग्रथात जे अद्भुत व असभाव्य प्रसग वर्णिले आहेत त्याची हे टिप्पण बहुतेक अनुक्रमणिकाच आहे हे टिप्पण रामदासाच्या निधनानतर काही दिवसानी लिहिलें असा त्यात उल्लेख आहे त्यावर भरवसा ठेवून रा राजवाडे ह्मणतात की, हे टिप्पण इतके जुने आहे त्या अर्थी त्यातले शक बरोबर असले पाहिजेत, आणि हनुमानस्वामीच्या बखरीतले शक ह्या टिप्पणातल्या शकाबरहुकूम आहेत, त्या अर्थीं हनुमानस्वामीने दिलेला अनुग्रहशक बरोबर असलाच पाहिजे परतु हे टिप्पण कधी लिहिलें याचा काल निश्चित नाही यास्तव हनुमानस्वामीच्या बखरींतील भाकडकथाचेंच हें टिप्पण असावे शिवाय तें रामदासस्वामीच्या सप्रदायाच्या अभिमान्यांनीं तयार केलेलें आहे. तेव्हा तें हनुमानस्वामीच्या बखरीप्रमाणेंच ऐतिहासिक पुराव्याच्या अभावीं अविश्वसनीय समजलें पाहिजे

**सांगितलें पष्ट। सद्गुरुभजन॥**' आणि खरोखरच आता फक्त ज्ञानदशक सागून ग्रन्थ सपूर्ण करावयाचा होता,(३)नवव्या दशकाच्या सहाव्या समासाची दुसरी ओवी अशी आहे '**हें दासबोधीं असे बोलिलें। ज्ञानदशकीं प्रांजळ केले। मूळमायेंत दाखविलें। पंचभूतक॥**' ह्या ओवीवरून हें सिद्ध होते की, हा दशक दासबोधातील ह्मणून लिहिला नाहीं हीच गति ह्या पुढील दशकाची समजावयाची आणि ज्या अर्थी ह्या शेवटल्या बारा दशकात कोठेकोठे शिवाजीमहाराजास उद्देशून बोध आहे असें ह्मणतात त्या अर्थी ते स० १६७२ नंतर रचिले असावे तेव्हा एकदरीत ह्या वादावरून असा निष्कर्ष निघतो की, समर्थांच्या ज्या बोधाची एवढी महती त्याचे भक्त गातात तो महाराजानी स्वराज्य-साधन व स्वातत्र्यसपादन यासबधाचा उद्योग बहुतेक आटोपल्यावर झालेला आहे, किंबहुना त्याच्या त्या अलौकिक कतृत्वावरूनच त्या साधूस हा बोध सुचला असावा हनुमानस्वामीने आपल्या बखरीत असें लिहिले आहे कीं, स १६४९ त महाराज समर्थांस भेटावयास गेले तेव्हा समर्थानी त्यास दासबोधाच्या तेराव्या दशकातील लघुबोध केला परतु ह्या वेळी दासबोधाचें एक अक्षरहि लिहिलें नसावे असे दिसते कारण समर्थानी १६५४ त एकाती जाऊन दासबोध लिहि-ण्यास आरभ केल्याचा पुरावा दिवाकरगोसाव्याने बहिरभटास शके १५७६ त पाठविलेल्या पत्रावरून होतो त्या पत्रात येणेंप्रमाणे मजकूर आहे "कल्याण-गोसावी, चिमणाबाई, आका व अनतकवि यास घेऊन ग्रथलेखनाकरिता शिवथरचे घळीत दहा सवत्सर राहाण्याचा सकल्प करून श्रीसमर्थ गेले"[1] शिवाय प्रत्यक्ष दासबोधातहि ह्या रचनाकाळाच्या निर्णयास आधार आहे तो असा दासबो-धाच्या सहाव्या दशकाच्या चवथ्या समासात "**चार सहस्र सातशें साठी॥ इतुकी कलियुगाची राहाटी॥ उरल्या कलियुगाची गोष्टी॥ ऐसी असे॥**" अशी एक ओवी आहे हीवरून हा समास स० १६५९ त समर्थ लिहीत होते असें ह्मणावें लागते

ह्या प्रथम भेटीच्या काळाच्या निर्णयासबधानें आणखी एक तर्क अलीकडे निघाला आहे त्याचा समाचार घेऊन प्रकृत विवेचन पुरें करूं हनुमान-स्वामीच्या बखरींत एके ठिकाणीं अनुग्रहाचा सवत्सर विकारी हा होता असा उल्लेख आहे प्रथम भेटीची साप्रदायिक मिती व वार हीं ह्या संवत्सरांत जुळतात

---

१ रा. चादोरकरानीं पूर्वोक्त पत्रात दिवाकर गोसाव्याचा हा पत्राश अस्सल ह्मणून दिला आहे.

म्हणून ह्या विकारी संवत्सरात प्रथम भेट झाली असावी असा कित्येकांचा तर्क आहे हा विकारी संवत्सर स. १६५९ त येतो परंतु हा शकहि वर दिलेल्या कारणास्तव खरा नाहीं हें उघड आहे ह्या शकात महाराजानी अफझुलखानाचा वध केल्यावर समर्थांचे परळीस जाऊन दर्शन घेतले, त्या वेळी समर्थांनी त्याला अठराव्या दशकातील सहाव्या समासातला उत्तमपुरुष-लक्षणाचा बोध केला अशी सांप्रदायिक बखरीत एक भाकडकथा आहे तीवरून सदरील पक्ष आपल्या तर्कास बळकटी येते असे ह्मणतो परंतु ह्या शकात समर्थ सदरी दर्शविल्याप्रमाणें सहावा दशक लिहीत होते त्या वेळी आठरावा दशक मुळीं लिहिला नव्हता, आणि स १६५९ त समर्थ परळीस असण्याचा संभव नव्हता कारण महाराजानी तो किल्ला काबीज केल्यावर चाफळाहून त्याना परळीस आणिले.आणखी असे कीं, दिवाकरभटाच्या वर दिलेल्या पत्रावरून असें दिसते की, समर्थ ह्या वेळी शिवतर खाऱ्यात एकाती जाऊन दासबोधरचनेत गुतले होते.

एकदरीत सारांश काय कीं, दादाजी कोंडदेवाने स्वराज्यस्थापनेस आरंभ करून महाराजास तो मार्ग दाखविला, किंबहुना शहाजीराजाच्या पदरच्या कारकुनानीं हा स्तुत्य उद्योग महाराजास पुढे करून सुरू केला, असें ह्मणणारे इतिहासपडित आमच्या देशात झळकत आहेत, त्याच्या ह्या विधानाचा खोटसाळपणा मागे दाखविण्याचा प्रयत्न केलाच आहे [1] तसाच हा रामदासस्वामींस महाराजाच्या हातून घडलेल्या एकंदर कर्तृत्वाचे श्रेय देण्याचा प्रयत्न आहे हा किती खोटा आहे हे सदरील विवेचनावरून वाचकाच्या लक्षात येईल अशी उमेद आहे [2]

---

१ मागें पांचवा भाग पाहा

२ ह्या खोटसाळपणाचा आणखी एक मासला येथे नमूद करण्याजोगा आहे तो असा "रामदास व रामदासी" नावाच्या ग्रथमालेतील नवव्या भागात समर्थांच्या सप्रदायाची कागदपत्रे प्रसिद्ध केलीं आहेत त्यात रा चादोरकर याच्याकडील सदरीं निर्दिष्ट केलेल्या पत्राचा समावेश केलेला नाही ! ही पत्रे प्रसिद्ध केल्याने समर्थांच्या सप्रदायास व त्याच्या आजपर्यंत गाजलेल्या महतीस न्यूनत्व येईल अशी प्रकाशकास दहशत वाटली असावी रा चादोरकराकडील कागदपत्राची हकीकत प्रो भाटे यांनी सदरीं सांगितलेल्या "सज्जनगड व समर्थ रामदास" ह्या आपल्या पुस्तकात दिली आहे, तीवरून पाहतां समर्थांचा वर सांगितलेला शिष्य दिवाकर भट याच्या उपाध्ये आडनावाच्या मालेगाव येथल्या एका वंशजाने समर्थ सप्रदायासबधाची बरीच

कागदपत्रें अत्यंत अमोल निधि ह्मणून एका जस्ती पेटीत घालून ह्या उपाध्यायाच्या वडि-
लांनीं जमिनीत पुरून ठेविलीं होतीं तीं रा चादोरकरानीं त्याच्या घरी मध्यरात्रीस
जाऊन त्याच्या मातुःश्रीस नकळत आणिलीं ह्यावरून पाहतां "रामदास व राम-
दासी" ग्रथमालेच्या प्रकाशकास ह्या कागदपत्राच्या अस्सलपणाविषयी संशय घेण्यास
मुळीं जागा नव्हती असे असता ही अशी सत्यगोपनमूलक आवडनिवड त्यानीं का
केली ते कळत नाही प्रो भाटे याचे सदरील पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर 'मराठी रिया-
सती'चे कर्ते रा सरदेसाई यानी नवयुगनामक मासिक पुस्तकात एक लेख लिहून
शिवाजी महाराज व रामदासस्वामी याच्या गुरुशिष्यत्वासबधाना समर्थसप्रदाया
नुसार झालेला आपला अभिप्राय आपल्या ग्रथाच्या पुढल्या आवृत्तीत बदलण्याचे
अभिवचन दिले आहे स १९०७ त प्रकृत चरित्रग्रथ पहिल्याने प्रसिद्ध झाला तो
रा सरदेसाई यानी वाचला नाही असे ह्मणता येत नाही त्यात सदरी दिलेला साप्र
दायिक मताविरुद्ध अभिप्राय नमूद केला होता तो रा सरदेसाई यास पटला नव्हता.
परतु हाच पुरावा प्रो भाटे यानीं दिला तो त्यास खरा वाटला, हा गोष्ट लक्षांत
ठेवण्याजोगी आहे दादाजी कोंडदेव शिवाजी महाराजास स्वराज्यस्थापनेच्या कामी
स्फूर्तिदाता व साहाय्यकारी होता, किंबहुना स्वराज्याचा मूळपाया घालणारा होता
असा जो रा सरदेसाई याचा अभिप्राय आहे तो प्रकृत ग्रथ पुन वाचून बदलेल काय

# भाग तिसावा



## अंतकाळ

## १६८०

मागे सांगितल्याप्रमाणे खादेरीबेटावर ठाणे करून इंग्रजास व शिद्दीस जागच्या जागी बसविल्यावर महाराजास अशी बातमी लागली कीं, औरंगाबाद येथील लष्कराच्या खर्चासाठी पुष्कळ मोठी रकम दिल्लीहून येत आहे त्यासरशी त्यांनी आपले निवडक घोडेस्वार बरोबर घेऊन, कोणास कळूं न देता, ती रकम घेऊन येणारावर हल्ला केला, व ते सगळें द्रव्य हस्तगत करून शत्रूकडून हरकत होण्यापूर्वी ते रायगडावर अतिवेगाने येऊन पोचले त्या दौडीमुळें त्यास अतिशयित थकवा आला त्यांच्या छातींत दुखूं लागलें, थुकींतून रक्त पडूं लागले, व अंगात मनस्वी ज्वर भरला [1] हे दुखणे दिवसेंदिवस अधिकाधिक जड होत चाललें पदरच्या लोकानी मोठमोठे वैद्य आणून नाना प्रकारचे उपचार केले अनेक देवतास नवस केले सर्व प्रकारचीं अनुष्ठाने केलीं मांत्रिकाकरवी जादूटोणे करविले साराश, सर्व प्रकारच्या उपायाची पराकाष्ठा केली पण काहीं एक उतार पडेना

---

१ सभासद व चित्रगुप्त हे ह्मणतात की, त्यांच्या अंगात नुसता शीतज्वराचा प्रादुर्भाव झाला होता चिटणीस व रायरीची बखर लिहिणारा हे ह्मणतात कीं, ज्वराची व्यथा झाली होती ग्राट डफ गुडघीचा रोग झाला होता असे ह्मणतो. बुदल्याच्या बखरीत मरणाचें कारण निराळेच दिले आहे तो ह्मणतो कीं, महाराजानीं जालना शहरावर हल्ला केला तेव्हा त्यांच्या लोकानी तेथील मुसलमान फकिरास उपद्रव दिल्यामुळें त्यानीं महाराजास शाप दिले, त्या शापामुळे ते आजारी पडून मरण पावले ! शिवदिग्विजयात तर याहूनहि चमत्कारिक कारण दिलें आहे तें असें की, महाराजांची द्वितीय पत्नी सोयराबाई हिनें महाराजास विषप्रयोग केला ! तो अशासाठी की, संभाजी पन्हाळ्यास अटकेंत आहे ही संधि साधून आपला पुत्र राजाराम यास गादीवर बसवावें. मुळातील हकीकत त्या वेळचा प्रवासी डॉ फ्रिअर व प्रसिद्ध इतिहासकार ऑर्मी यांच्या ग्रथांवरून घेतली आहे

आपण आजारी पडून अत्यवस्थ झाल्याची बातमी बाहेर कळू देऊ नये अशी महाराजानीं सक्त ताकीद दिली होती, आणि ही वार्ता पसरली असती तरी ती कोणीं खरी मानिली नसती कारण अशी वार्ता पूर्वी अनेक वेळा पसरून ते कोणत्या तरी मोहिमेवर जाण्याच्या तयारीत असत, असें मुसलमान बखरकाराचे ह्मणणे आहे ह्या समयीं महाराजाचे लोक सुरतेच्या तटापर्यंत धुमाकूळ करीत जाऊन त्या शहरावर त्यानी मोठ्या नेटाचा हल्ला चालविला होता त्यावरून आतील लोकास असें वाटले की, प्रत्यक्ष शिवाजीमहाराज आपल्या शहरावर हल्ला करावयास आले आहेत त्यामुळे त्याची अगदी त्रेधा उडून गेली इग्रज-व्यापाऱ्यानी आपला पैसाअडका सगळा तापीनदीच्या पलीकडे स्वाली येथे त्याची काहीं जहाजे होती त्यावर पाठवून दिला सुरतेच्या मोगल सुभेदाराने ह्या वेळी पुष्कळ खड भरून मोरोपंत पेशव्यास माघारी परतविले ह्या मोहिमे-वर महाराजाचा स्वत जाण्याचा विचार होता परतु प्राणात दुखणे लागल्यामुळे तो बेत रहित करणे प्राप्त झाले वर सागितल्याप्रमाणे गुजराथप्रातात लुटालूट करून व खड वसूल करून मोरोपत रायगडावर आला तो महाराजाची प्रकृति बेमुमार बिघडली होती

आपला अतसमय समीप आला असें पाहून महाराजानी आपले प्रधान वगैरे कारभारी व आप्तजन जवळ बोलाविले त्या वेळी मोरोपत पेशवे, प्रल्हादपत न्यायाधीश, बाळाजी आवजी चिटणीस, रामचद्रपंत अमात्य, रावजी सोमनाथ, सूर्याजी मालुसरे, बाजी कदम, महादाजी नाईक पानसबळ वगैरे गृहस्थ जवळ होते त्यास महाराज ह्मणाले "आमच्या आयुष्याची मर्यादा सपली आता आमचा निधनसमय दिसतो अत पर आमचा देह राहत नाहीं आमच्या वडिलाची चाळीस हजार होनाची जाहगीर होती, ती वाढवून एक कोट होनाचें राज्य आम्हीं मिळविलें ऐशीं हजार पागा केली हें राज्य आमच्या मागे मर्दुमकीनें, हिंमतीनें व हुशारीनें रक्षण करणारा असा पराक्रमी पुत्र नाहीं राजा-राम अल्पवयी आहे, तो वाचला तर तो एक हें राज्य सभाळून वाढवील सभाजी वडील मुलगा असून तो जाणता आहे, परंतु त्याची बुद्धि काहीं चागली नाहीं उभयता पुत्रास राज्य वाटून देत होतों परंतु संभाजी त्यास कबूल झाला नाहीं इतकेंहि करून राज्याचे विभाग करावे तर आमच्या पदरचे चार मातबर आहेत ते एकास एक विरुद्ध होऊन राज्यवृद्धि न होतां कलह मात्र माजेल, कोणीं कोणाची मर्यादा ठेवणार नाहीं. वडील पुत्रानें राज्य करावें व

कनिष्ठ पुत्रानें त्याच्या आज्ञेत चालून त्याची सेवा करावी, असा राजधर्म आहे. परंतु तदनुसार आमच्या पुत्राकडून वर्तणूक होण्याचा संभव दिसत नाहीं संभाजी माझ्यामागे सर्व राज्य आटोपील लष्करातले नामांकित शूर सरदार संभाजी वडील म्हणून त्याच्या पक्षाकडे जातील राजाराम धाकटा म्हणून लष्कराचा ओढा त्याच्याकडे न होऊन त्याचा पक्ष दुर्बळ होईल कारभारी लोक राजारामाचा पक्ष धरून राहतील अशाने दुफळी होईल संभाजी थोर-थोर पुरुषास पकडून देहांत शासन करील, मोठमोठ्या सरदाराची इज्जत घेऊन त्यास ठार मारील क्षुद्र लोकांचा वरपगडा होईल. जे नामांकित व घरदाज पुरुष श्रमसाहस करून आजपर्यंत आम्हाला सहाय झाले त्याचा अपमान व अप्रतिष्ठा करून तो राज्याची एकंदर शिस्त बिघडवील तो कैफी व इष्कबाज असल्यामुळे त्याची मति भ्रंश पावेल तो मदांधपणें वर्तन करील निर्दय, अविचारी, व कृतघ्न अशा लोकांचा वरचष्मा होऊन राज्यात बेबंदाई होईल संभाजीच्या हातून दौलतीचा सर्वस्वी नाश होईल आम्हीं गुणसंपन्न माणसें मिळवून स्वराज्याचा पाया घातला त्या माणसाची आमच्या पश्चात् दुर्दशा व बेअदबी होऊन तीं राहणार नाहींत हा असा आमच्या राज्यात घोटाळा झाला म्हणजे औरंगजेबास आयतेच फावेल तो आजपर्यंत आमच्या धाकाने जागच्या जागीं राहिला आहे तो ही अव्यवस्था पाहून मोठ्या फौजेनिशीं दक्षिणेंत स्वारी करील पहिल्याने अदिलशाही व कुतुबशाही पादशाहती दुर्बल झाल्या आहेत त्यांचा नायनाट करून तो आमच्या राज्यावर चढाई करील. संभाजी-च्यानें स्वराज्याचें रक्षण होणार नाहीं. औरंगजेब त्याचा सर्वस्वी नाश करण्यास प्रवृत्त होईल कैफी मनुष्य दगा पावण्यास विलंब लागत नसतो राजाराम ह्यात राहिला तर मात्र माझ्या काहीं विश्वासू सरदाराच्या मदतीनें तो दुस्मानाच्या हातीं गेलेलें राज्य पुनरपि मिळवील एरवीं काहीं धडगत दिसत नाहीं ”

हें असें निदानींचें व निरुत्साहाचें भाषण ऐकून सर्वांचे कंठ दाटून आले. त्यांच्या नेत्रातून अश्रुधारा वाहूं लागल्या त्यास पराकाष्ठेचें दुःख झालेलें पाहून महाराज बोलले “ तुम्ही अणुमात्र श्रमी होऊं नका ह्या मानवी देहास ईश्व-रानें मृत्यु नेमिला आहे. हा मृत्युलोक आहे जितके उत्पन्न झाले तितके जाव-याचे. चिरंजीव असा कोणीच नाहीं धन, सुत, जाया, वीरश्री, पराक्रम, अहंता हीं सर्व मिथ्या असून येथल्या येथेच राहावयाची. त्यांस लुब्ध होऊन

मोहवश झाल्यानें चित्तास नसती तळमळ लागते त्यात काहीं हित नाहीं ज्या काळी जे घडावयाचें ते प्रमाण मानून निरपेक्ष चित्ताने वर्तावे यातच कल्याण आहे तुह्मी सर्व पराक्रमी अहा कळेल तसा प्रयत्न करून स्वराज्याचे रक्षण करा सर्व जण एका विचाराने वागा. आमच्या प्रकृतीस आराम पडावा ह्मणून तुह्मी करावयाचे तेवढे प्रयत्न केले सर्व मानवी प्रयत्न कुंठित झाले आता प्रयत्न क नका आमची आयुष्यमर्यादा पूर्ण झाली आह्मी स्वर्गानुभवास जावयास सिद्ध झालो आता तुह्मी सावव राहा आमच्यामागे क्रियापूर्वक राज्यरक्षण करा. सपूर्ण भारतखड जिकावे, दिल्लीचे तक्त घ्यावें, श्रीभागीरथी करमुक्त करावी, अटकनदीच्या पलीकडे राज्य आक्रमण करून शासन चालवावे, असा आमचा उत्कट हेतु होता तो असिद्ध राहिला आमचे आयुष्य खुटलें तुह्मी ह्या गोष्टीचा शोक करूं नये विवेकाने चित्ताचे समाधान करावें ” ह्याप्रमाणे त्याच सात्वन करून महाराजानी सगळ्यास बाहेर जावयास सागितलें

मग त्यानीं भागीरथीचे उदक आणून प्रायश्चित्तविधियुक्त स्नान केलें सर्व अगास अग्निहोत्राचें भस्मलेपन करून त्यानी रुद्राक्ष व तुळशीमाळा धारण केल्या, दर्भासनी बसून मोठमोठ्या पंडितास व सन्याशास जवळ बोलाविलें, व त्याशीं आत्मानात्मविचार चालविला अशी विरक्तता धारण करून ते सर्व काळ भगवद्भजन करूं लागले, व कथाकीर्तनादि श्रवण करून काळ घालवू लागले शतगोप्रदाने आपल्या समक्ष करवून त्यानीं सहस्र गोप्रदानाचा द्रव्यद्वारा सकल्प केला, आणि भगवद्गीता व सहस्रनाम याचे पाठ चालविले असा आसमंतात् ब्रह्मवृदाच्या वाणीचा घोष चालला असता, शके १६०२ रौद्रनाम सवत्सरे उत्तरायणी चैत्र शुद्ध पौर्णिमेस रविवारीं दोन प्रहरीं ( ता ५, एप्रिल स १६८० इ० ) ‘श्रीराम’ हे शब्द उच्चारून महाराजानीं अत्यत शातपणे व समाहित चित्तानें देहत्याग केला ह्याप्रमाणे आमरण अविश्रात परिश्रम व पराक्रम करून सपादिलेलें ऐश्वर्य व दौलत सोडून जाताना त्यास अत्यल्पहि खेद झाला नाहीं, हें काहीं लहानसान धैर्य नव्हे. धर्मपरायणतेनें प्राप्त होणारें मनोजय करण्याचें सामर्थ्य त्याच्या ठायी किती वसत होतें हें ह्यावरून चागलें व्यक्त होतें पुराणातरीं वर्णिलेल्या राजर्षींच्या क्रमास अनुसरून सर्व राज्य पुत्राच्या स्वाधीन करून व सर्वसगपरित्याग करून ईश्वरप्राप्तीच्या मार्गाचे अखड अवलबन करावें असा विचार त्याच्या मनात वारंवार येई. परंतु यवनपादशाहतींचें भरतभूमीं-

तून समूळ उत्पाटन करून हिंदुपदपातशाहीची संस्थापना करण्याचा जो आपला हेतु आहे तो अपूर्ण राहिला आहे, तशात आपल्या पश्चात् स्वराज्याचे रक्षण करून प्रजेचे यथान्याय पालन करण्याजोगे गुण आपल्या वडील पुत्राच्या अंगीं नाहींत, तेव्हा अशा स्थितींत राज्यत्याग करून वानप्रस्थाश्रमाचा अंगीकार केल्यास स्वप्रजेचे अहित होऊन स्वराज्यनाश होईल, व तेणेकरून आपली सर्वत्र अपकीर्ति होईल हे विचार त्याच्या मनात येऊन संसारत्यागाचा विचार त्यास अकालिक वाटे शेवटी त्यानी असा निर्धार केला होता की, संसारात राहून धर्माचरण करावे, सत्समागम करावा, विषयसुखात आसक्त होऊ नये, व स्वकर्तव्य यथासांग करून मोक्ष साधावा यातच खरा पुरुषार्थ आहे संसारत्याग करून गिरि-कुहराचा वास केल्याने स्वकर्तव्यपराङ्मुख झाल्याचा दोष पदरी येऊन आपला भ्याडपणा व्यक्त होईल असे त्यास वाटे.

महाराजाचे देहावसान झाले तेव्हा सर्व कारभारी, सरदार व आप्तजन यास पराकाष्ठेचें दुःख झालें आबालवृद्ध शोकसागरांत बुडाले प्रधानमंडळीनें किल्ल्याचे दरवाजे बंद करून ही निधनवार्ता बाहेर न पसरे अशी खबरदारी घेतली सर्व राजचिन्हांनी युक्त अशी प्रेतयात्रा काढून महाराजाच्या कलेवरास विधिपूर्वक मंत्राग्नि दिला महाराजाची तृतीय पत्नी पुतळाबाई हिने सहगमन केलें उत्तरक्रिया साबाजी भोसले[1] शिंगणापूरकर याच्याकडून राजारामास समीप बसवून सांगोपांग करविला दानधर्म बहुत केला

महाराजास सात बायका होत्या त्या अशा (१) सईबाई, ही फलटणच्या प्रख्यात निंबाळकराच्या घराण्यातली होती,[2] (२) सोयराबाई, ही शिर्के घराण्यातली होती, (३) पुतळाबाई[3], (४) सकवारबाई, ही गायकवाड घराण्यातली होती; (५) सगुणाबाई, ही शिर्क्यांच्या घराण्यांतली होती;

---

१ ग्राट डफ ह्याचें नांव शहाजी भोसले असे देतो

२ मागें ५७ व्या पृष्ठावर ही शिर्क्यांच्या घराण्यातली होती असे आह्मीं ह्मटलें आहे ते अर्थात् चुकीचें आहे. शेडगांवकर भोंसल्यांकडील वंशावळीच्या आधारावरून मि. किंकेड ह्मणतात कीं, सईबाई विठोजी मोहिते नेवासकर यांची कन्या होती (पृ २७७).

३ ही जाधव किंवा इंगळे याच्या घराण्यांतली होती, असें जेध्याच्या शकावलीवरून दिसतें. पण रा. राजवाडे यांनीं आपल्या संकीर्ण लेखांत दिलेल्या यादीवरून ही पालकराची मुलगी होती असें दिसतें.

( ६ )लक्ष्मीबाई,[१] आणि ( ७ ) गुणवंताबाई [१] सईबाईस संभाजी, सखूबाई व अंबिकाबाई अशीं तीन अपत्ये झालीं. सखूबाई ही फळटणचा महादजी नाईक निंबाळकर यास दिली होती ह्या शरीरसंबंधाविषयींची अशी गोष्ट आहे कीं, फळटणचा बजाजी निंबाळकर हा काहीं कारणामुळे मुसलमान झाला हा महाराजाचा नातेवाईक असल्यामुळे त्याला शुद्ध करून परत हिंदु-धर्मात घ्यावे असें मातु श्री जिजाबाई हिच्या मनात येऊन तिनें शिंगणापूरच्या एका उपाध्यायास तयार करून बजाजीस प्रायश्चित्त देऊन शुद्ध करविले, आणि तो असा शुद्ध होऊन स्वज्ञातीत आल्याबद्दल कोणास संशय वाटू नये म्हणून त्याचा मुलगा वर सांगितलेला महादजी यास महाराजाची मुलगी सखूबाई ही दिली [२] सईबाईची दुसरी मुलगी हरजी राजे महाडिक तारळेकर यास दिली होती[३] सोयराबाईस राजाराम व दिपाबाई अशी दोन मुले झालीं. दिपाबाई[४] ही विसाजीराव नावाच्या एका सरदारास दिली होती सकवारबाईला एक मुलगी झाली, तिचे नाव कमळाबाई ही जानोजी पालकर यास दिली होती. जेध्याच्या शकावलीवरून असें दिसते कीं, ह्या सकवारबाईशीं महा-राजानीं १६५७ साली विवाह केला, आणि ही स १६७४ च्या मार्च महि-न्यात निवर्तली पुतळाबाई अपत्यहीन होती हिने महाराजाबरोबर सहगमन केले, सगुणाबाईस राजकुंवारबाई (नानीबाई)नावाची मुलगी होती ती गणोजी.

---

१ ह्या दोघींची नावे रा राजवाडे यांनी प्रसिद्ध केलेल्या यादीत नाहीत ही नावे शेडगावकराच्या वंशावळीवरून घेतली आहेत रा राजवाड्याच्या यादीत जाधवाच्या घराण्यातली काशीबाई हे एक नाव आहे जेध्याच्या शकावलीत जाधवाशी शरीरसंबंध केल्याचा उल्लेख आहे तो कदाचित् ह्या काशीबाईसंबंधाचा असावा रा राजवाड्याच्या यादीत आठ बायका होत्या असे म्हटले असून सहा बायकांची नावे दिली आहेत, आणि दोघींची नावे न देता त्या फर्जंद व विचारे यांच्या घराण्यातल्या होत्या असे म्हटले आहे.

२ ही पतितपावन केल्याची अलौकिक गोष्ट फलटणच्या निंबाळकराच्या दप्तरातून घेतली आहे ह्या जावयाला महाराजानी पुरंदर तालुक्यातल्या एका गावाची पाटी-लकी बाराशे होनास खरेदी करून अर्पण केली होती असे म्हणतात

३ रा. राजवाडे यांच्या सदरीं सांगितलेल्या यादींत सईबाईला आणखी एक राणू-बाई नांवाची मुलगी असून ती जाधवाच्या घराण्यात दिली होती असा उल्लेख आहे.

४ हिचे नाव बाळीबाई होते असें रा. राजवाड्याच्या यादीत नमूद केले आहे.

राजे शिर्के मालेकर यास दिली होती बाकीच्या दोघी गुणवंताबाई व लक्ष्मी बाई ह्या अपत्यहीन होत्या महाराजाच्या स्त्रियाच्या संख्येसबधाने बखरकारांचें एकमत नाहीं ह्या चरित्रलेखाच्या प्रथमावृत्तीत आह्मी फक्त तीन बायकाची नावे देऊन निरनिराळ्या बखरकारांचें व इतिहासवृत्तलेखकाचें काय ह्मणणें आहे ते लिहिलें होतें महाराजाचा प्रथम चरित्रलेखक जो सभासद तो महाराजाच्या सात बायका होत्या असें ह्मणतो परंतु त्याची नावे त्यानें दिलीं नाहींत. रामदासाच्या चरित्रा मक बखरींत सईबाई, पुतळाबाई व सगुणाबाई अशा तीन बायकाच्या नावाचा निर्देश करून आणखी त्याच्या दोन उपस्त्रिया होत्या असें ह्मटलें आहे ह्या अशा उपस्त्रिया असल्याचा उल्लेख इतरत्र आढळत नाहीं, तेव्हा तो विश्वसनीय नसावा त्या बखरींत नमूद केलेल्या इतर भाकड कथासारखीच ही एक भाकडकथा असावी ह्या बखरकाराला पुतळाबाई जी महाराजाच्या चितेवर सती गेली तिचे नावहि ठाऊक नव्हते. रा राजवाडे हे आपल्या 'सकीर्ण लेखसग्रहा'त तंजावर येथे सापडलेल्या एका यादीच्या आधारावरून असें ह्मणतात कीं, महाराजाच्या आठ बायका होत्या ह्यापैकीं सहा बायकांचीं ते नावें वगैरे देतात बाकीच्या दोघींचीं नावें ते देत नाहींत. ह्यावरून कोणी असा तर्क करितात कीं, ह्या दोघी त्याच्या राखा असाव्या आता ऐतिहासिक पुरावा पाहता महाराजाची एक बायको स १६७४ च्या मार्च महिन्यात मरण पावल्याचा उल्लेख इंग्रज व्यापाऱ्यांचा वकील नारायण शेणवी ह्यानें ह्या व्यापाऱ्यास पाठविलेल्या एका पत्रात केला आहे इग्रज व्यापारी हेन्री ऑक्झिन्डेन याचा महाराजाच्या राज्याभिषेकासबंधानें स १६७४ तील ता २७ मेचा एक लेख आहे त्यात असा उल्लेख आहे कीं, महाराज ह्या वेळीं दोन नव्या बायका करण्याच्या विचारात होते जेध्याच्या शकावलींत असा उल्लेख आहे कीं, महाराजांनीं राज्याभिषेक समारंभापूर्वी आपला व्रतबंधविधि वेदोक्त मंत्र उच्चारवून करविला, आणि मग दोन दिवसांनीं वेदोक्तमंत्रोच्चारपूर्वक आपला एक विवाह करविला हेन्री ऑक्झिन्डेनचें सदरील ह्मणणें खरें असण्याचा दृढ संभव असल्या कारणानें महाराजानीं राज्याभिषेकानंतर लागलींच पुन. आणखी एक वेदमंत्रोच्चारपूर्वक विवाह मोठ्या थाटानें केला असावा असें दिसतें त्या वेळचा डॉ. फ्रिअरनामक प्रवासी आपल्या प्रवासवृत्तांत ह्मणतो कीं, राज्याभिषेकसमयीं महाराजांनीं चौथी बायको केली ऑक्झिन्डेनच्या स. १६७४ तील जून महिन्याच्या आठव्या तारखेच्या पत्रांत असा उल्लेख आहे कीं शिवाजीमहाराजांनीं राज्याभिषेकानंतर आणखी चौथी

बायको केली ह्या व्यापाऱ्यानें वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें ता २७ मे रोजीं लिहिलेल्या आपल्या पत्रात दोन बायका करण्याच्या तयारींत शिवाजीमहाराज आहेत असें ह्मटलें होतें त्यावरून असें सिद्ध होते कीं, ही शेवटीं चौथी ह्मणून जी बायको केली ती जीवंत असलेल्या बायकापैकीं चौथी होती सईबाई स १६५९ त मरण पावली व दुसरी बायको स १६७४ च्या मार्च महिन्यात मरण पावली. ह्या दोघी सदरील इंग्रज लेखकानीं जमेस धरिल्या नसाव्या आतां पुतळाबाई जी महाराजाच्या पश्चात् सती गेली तिच्याशीं महाराजानीं बऱ्याच वर्षापूर्वीं विवाह केला असावा कोणी ह्मणतात कीं, सईबाई निवर्तल्यावर स. १६५९ त त्यानी पुतळाबाईशी विवाह केला असावा ही बाई सती गेली त्यावरून तिचें महाराजाशीं बहुत वर्षांचें साहचर्य असून तिचें त्याजवर अकृत्रिम प्रेम होते असें दिसते राज्याभिषेकाच्या वेळी केलेल्या दोन तरुण बायकापैकी कोणी अशी सती जाण्यास तयार होणें संभवनीय नव्हते. तेव्हा साराश की, महाराजास सहा बायका तर खास होत्या असें दिसतें सभासद सात बायका होत्या असें ह्मणतो, पण त्याचीं नावे देत नाहीं. रा राजवाड्याच्या पूर्वोक्त लेखात आठ बायकाचा उल्लेख आहे, परंतु त्यापैकीं सहाचींच तेवढी नावें तींत नमूद केलीं आहेत शेडगावकराच्या वंशावळींत सात बायकाचा उल्लेख असून त्या सगळ्याचीं नावे दिली आहेत यास्तव सभासदांच्या एतद्विषयक उल्लेखाला सदरील वंशावळीतलीं सात नावें परिपोषक असल्यावरून वर सात बायका होत्या असें गृहित धरून त्याची नावें दिलीं आहेत

ह्या सगळया राण्यामध्यें सईबाई ही मोठी सुशील, शहाणी व पतिव्रता होती. तिच्यावर महाराजाची अतिशयित प्रीति होती. ती मरण पावल्यापासून महाराजास कुटुंबसुख चागलेंसें लाभलें नाहीं. तिचा मुलगा संभाजी ह्याचें आचरण शुद्ध नसल्यामुळे महाराजाना तो मुळीं आवडत नसे. सोयराबाईचा मुलगा राजाराम हा स १६६४[1]त जन्मला ह्याचीं लक्षणें बरीं असून तो पुढें चागला निपजेल असा महाराजाचा अभिप्राय झाला होता. सोयराबाई मोठी कारस्थानी बायको होती. आपला पुत्र राजाराम ह्यास गादी मिळावी अशी तिची उत्कट इच्छा असून तत्सिद्धयर्थं तिचा प्रयत्न महाराज हयात असतांच सुरू होता. तिनें बहुतेक प्रधान आपल्या ह्या उद्देशास अनुकूळ करून घेतले होते. विशेषतः अण्णाजी दत्तोपंत सचिव तिच्या तर्फेचा होता त्यात आणखी महाराज जेव्हा-

१ काहीं बखरीत ही तारीख १६६१ अशी दिली आहे.

तेव्हां ह्मणत कीं, संभाजीचें आचरण चागलें नाहीं, तो राज्याधिकारास लायक नाहीं. अतसमयीं तर त्याचे संभाजीविषयीचे उद्गार फारच निरुत्साहाचे होते यास्तव कारभारीमडळी सोयराबाईच्या पक्षास अनुकूळ झाली व राजारामास गादीवर बसवून त्याच्या वतीनें राज्यकारभार चालविण्याचा विचार त्यानीं केला हा आपला बेत निर्विघ्नपणे सिद्धीस जावा ह्मणून त्यानी महाराजाच्या मृत्यूची वार्ता सभाजी पन्हाळ्यावर नजरकैदेत होता त्याला मोठया बदोबस्तानें सक्त कैदेंत ठेवीपर्यंत कोणास कळू न द्यावी असा त्याचा प्रयत्न होता ह्या उद्देशाने त्यानी जनार्दनपत सुमत यास सैन्यासह पन्हाळ्या रवाना केले, रायगडावर आणखी लोकाची भरती करून तें ठाणे मजबू केलें, पचवडी येथे दहा हजार घोडेस्वार ठेविले, हबीरराव सेनापतीस कऱ्हाड मोठया सन्यानिशी तयार राहावयास सागितले ही एवढी तयारी कराव- काहीं अवधि लागणार ह्मणून हिरोजी फर्जद यास सभाजीच्या बंदोबस्त नेमिलें होते त्यास त्यानीं पुढं काय व्यवस्था करावयाची तें कळविण्यास एक पत्र पाठविलें एवढी खबरदारी प्रधानमंडळीने घेतली होती त महाराजाच्या मृत्यूचें वर्तमान सभाजीस अगोदरच कळून चुकले होते असें दिसते निदान त्याला असा सशय तरी खास आला असावा. कारण सदरील पत्र घेऊन जासूद किल्ल्यावर आला, त्यास पाहताच सभाजीने त्याला पकडून लखोटा आपल्या स्वाधीन करण्याविषयीं सागितले, न केल्यास देहातशिक्षा होईल अशी त्यास धमकी घातली, तेव्हा त्या जासुदानें निरुपाय होऊन तो लखोटा त्याच्या हातीं दिला आपणास प्रधानमंडळाने पाठविलेलें गुप्त मजकुराचें पत्र सभाजीच्या हातीं लागलें असें कळताच हिरोजी फर्जद घाबरून कोंकणात पळून गेला. संभाजीने किल्ल्यांवरील सर्व लोकास आपल्या ताब्यात घेऊन त्यांच्या दोन अमलदारांनीं थोडीशी कुरबूर केल्यावरून त्यास ठार मारिलें, किल्ला आपल्या स्वाधीन राखण्यासाठीं त्यावर चोहोकडून चागला बदोबस्त करून तो प्रधानमंडळी पुढं काय करते तें पाहत राहिला संभाजीनें पन्हाळाकिल्ला आपल्या कबजांत घेतला असून त्यावर सैन्य नेण्याचा मार्ग उरला नाहीं असे पाहून जनार्दनपंतानें आपल्या फौजेचा त्या किल्ल्यास वेढा दिला. तेथं तो आपल्या लोकांनिशीं कांहीं दिवस राहिल्यावर वेढा तसाच ठेवून तो कोल्हापुराकडे गेला.

इकडे प्रधानांनीं राजारामास गादीवर बसवून त्याच्या नावानें राज्यकारभार सुरू केला. परंतु त्या प्रधानांमध्यें असावें तसें ऐक्य नव्हतें. पेशवा व सचिव

यांच्यामध्यें पहिल्यापासून थोडीशी चुरम होती, ती आता वाढली हंबीररावास त्यानीं आपल्या ह्या मसलतींत घेतले नसल्यामुळें तोहि त्यांच्या ह्या करण्यास प्रतिकूळच होता जनार्दनपंत तरी पन्हाळ्याचा वेढा तसाच मोडून स्वत कोल्हापुराकडे गेला त्याचे कारण बहुत करून असेंच काहीं तरी असावें त्याने पन्हाळ्यापाशी ठेवलेल्या लोकापैकीं काहीं जणास सभाजीनें वश करून घेतले, व जनार्दनपत तेथे आला असता काहीं मावळ्यानिशी त्याच्या छावणीवर रात्रीचा छापा घालून त्यास कैद करून पन्हाळ्यावर आणून ठेविले सभाजीचें हें कृत्य कून हबीरराव सेनापतीस असे वाटले की, शिवाजीमहाराजाच्या पुत्रास अनुरूप ा पराक्रम याच्या अगी आहे, यास्तव याचा पक्ष आपण धरावा हे ठीक ने जनार्दनपतास सभाजीनें कैद केल्याचे वर्तमान रायगडावर पोंचताच त पिगळे त्यास सोडविण्याच्या मिषाने सैन्य घेऊन पन्हाळ्याकडे गेला तो सभाजीशी युद्ध करण्याचे सोडून त्यासच सामील होऊन बसला. ही । अनुकूलता पाहून सभाजीनें त्याचा हुद्दा त्याच्याकडे कायम केला ाररावहि आपल्या सगळ्या फौजेनिशीं पन्हाळ्यावर येऊन सभाजीस मिळाला. टी अशी आपल्या पक्षाची बळकटी झाली असें पाहून सभाजी रायगडावर चालून आला तो रायगडावर येऊन पोंचण्यापूर्वीच त्या किल्ल्यावरच्या गार्दी लोकानी त्याच्या पक्षाचे होऊन त्याच्या विरुद्ध असलेल्या सगळ्या लोकास कैद करून ठेविले त्याप्रमाणेच पचवडी येथे ठेवलेलें सैन्यहि सभाजीस येऊन मिळालें ह्याप्रमाणें चोहोंकडून अनुकूळता झाल्यावर त्याला रायगडकिल्ल्यावर प्रवेश करण्यास बिलकुल हरकत झाली नाहीं वर जाताच पहिल्यानें त्याने अन्नाजी दत्तोपत सचिव याच्या पायात बिड्या ठोकल्या व त्याची सर्व मालमत्ता जप्त केली, राजारामाला कैद केले, सोयराबाईला पकडून आणून तिची अतिशयित कठोर शब्दानी निर्भत्सना केली, महाराजास विषप्रयोग केल्याचा तिच्यावर आरोप केला व तिचे हालहाल करून मारण्याचा आपल्या लोकास हुकूम दिला, तिच्या पक्षाच्या सर्व लोकाचा शिरच्छेद केला, एका इसमाला तर गडाच्या तटावरून खालीं लोटून दिले, आणि ह्याप्रमाणे प्रतिपक्षाचा अगदीं बींमोड करून आपणास आगष्ट महिन्यात राज्याभिषेक करून घेतला ह्यापुढील संभाजीच्या घोर कृत्याचा फाडा येथे वाचणें अप्रस्तुत होय.

# भाग एकतिसावा.



## दौलतीचा हिशोब.

आमच्या महातेजस्वी व प्रौढप्रताप चरित्रनायकाचे जीवनवृत्त मागील भागात आटोपले आता त्यानी एकसारखी छत्तीस वर्षे अव्याहत परिश्रम करून प्रबल यवनपादशहाच्या हातची किती दौलत हिसकावून घेतली त्याचा अदाज प्रकृत भागात देणें इष्ट दिसते अदिलशाहींत नोकरी पतकरून शहाजीराजे कर्नाटकात जाऊन राहिले तेव्हा महाराष्ट्रात दादाजी कोंडदेवाच्या हवालीं राजाची जी जाहगीर होती, तींत पुणें, सुपे, इंदापूर, बारामती व मावळप्रांताचा काहीं भाग एवढ्या परगण्याचा अतर्भाव होत होता महाराजाच्या हाती आयती आलेली वडिलांची जोड काय ती एवढीच होती, आणि तीहि अदिलशहाच्या पूर्ण आटोक्यात होती त्याला वाटेल तेव्हा ती खालसा करिता येण्याजोगी होती ह्याप्रमाणे यवनपादशहाच्या कृपेने प्राप्त झालेल्या जाहगिरीचा ताबा वडिलाच्या विद्यमानें महाराजाच्या हाती आल्यावर त्यानी ही दोलत स्वतत्र करून तीत किती भर घातली त्याचें निरूपण करू. हे अर्थात व्हावें तसे यथास्थित होणार नाहीं तरी निरनिराळ्या बखरीत ज्या याद्या दिल्या आहेत त्याच्या आधाराने पुढील हिशोब दिला आहे हा महाराजानी आपल्या हयातीनच करून ठेविलेला दिसतो कारण सभाजी दुर्वृत्त निघून एक वेळ शत्रूसहि जाऊन मिळाला होता तेव्हां मागेपुढे तो सर्व दौलतीचा नाश करील ही भीति त्यास वाटत होती यास्तव राजारामास व त्यास राज्य विभागून देण्याचा त्याचा मनोदय होता असें कित्येक बखरीवरून दिसते असो, तर हा हिशोब येथे देऊं

महाराजाच्या ताब्यातील मुलखाचे एकंदर चवदा विभाग चिटणिसाच्या बखरीत दिले आहेत, व ह्या प्रत्येक विभागात किती किल्ल्यांचा अतर्भाव होतो हे सागितलें आहे ही यादी येथे बहुतेक जशाची तशी उतरून घेऊं.

( १ ) **प्रांत मावळ सह्याद्रि**—यात सांप्रतचे मावळ, सासवड, जुन्नर व खेड हे तालुके मोडतात. ह्या प्रातांत एकंदर अठरा किल्ले होते. त्यांचीं नांवें

येणेंप्रमाणे आहेत –रोहिडा, सिहगड, नारायणगड, कुंवारी, केळना, पुरधर, दौलदतमगळ, मोरगिरी, लोहगड, रुद्रमाळ, राजगड, तुंग, तिकोना, राजमाची, तोरणा, दातेगड, विसापूर, बासोटा, व सिवनेरी

( २ ) **प्रांत सातारा वांई**—यात अकरा किल्ले होते ते येणेप्रमाणेः सातारावैराटगड, वर्धनगड, परळी, (सज्जनगड) पाडवगड, महिमानगड, कमलगड, वदनगड, तायवडा, चदनगड, व नादगिरी

( ३ ) **प्रांत कराड**––यात वसतगड, मचिंद्रगड, भूषणगड व कसबा कराड, असे चार किल्ले होते

( ४ ) **प्रांत पन्हाळा**—यात तेरा किल्ले होते त्याची नावे -पन्हाळा, णा, विशाळगड, पावनगड, रागणा, गजेंद्रगड, भुदरगड, पारगड, मदनभीवगड, भूआळगड, गगनगड व बावडा.

) **प्रांत कोंकण वंधारी व नलदुर्ग**-यात एकदर अठ्ठावन्न किल्ले होते, ा नावे -मालवण सिधुदुर्ग, विजयदुर्ग, जयदुर्ग, रत्नागिरि, सुवर्णदुर्ग, खादेरी, री, कुलाबा, राजकोट, अजनवेल, रेवदडा, रायगड, पाली, कलानिधिगड, आरनाळा, सुरगगड, मानगड, महिपतगड, महिमडण, सुमारगड, रसाळगड, कर्नाळा, भोरप, बल्लाळगड, मारंगगड, माणिकगड, सिदगड, मडणगड, बाळगड, महिमंतगड, ळगाणा, प्रचीतगड, समानगड, कागोरी, प्रतापगड, तळागड, घोसाळागड, बिरवाडी, भैरवगड, प्रबळगड, अवचितगड, कुभगड, सागरगड, मनोहरगड, सुभानगड, मित्रगड, प्रल्हादगड, मडणगड सहनगड, शिकेरगड, वीरगड, महीधरगड, रणगड, सेटगागड, मकरंदगड, भास्करगड, माहुली, व कावन्ही

(६) **प्रांत त्रिबक**-यात पंचवीस किल्ले होते त्याची नावे -त्रिबक, बाहुला, मनोहरगड, खळागड, चावडंस, मृगगड, करोला, राजपेहर, रामसेन, माम-णागड, हर्षण, जवळागड, चादवड, सबलगड, आवढा, कणकई, गडगडा, मनरजन, जीवधन, हडसर, हरीद्रगड, मार्कंडेयगड, पटागड, टणकई व सिद्धगड.

(७) **प्रांत बागलाण**—यात सात किल्ले होते. त्याची नावें –सालेरी, नाहावा हरसळ मुलेरी, कणेरा, अहिवतगड व घोडप.

( ८ ) **प्रांत वनगड वगैरे**—यास धारवाड जिल्ह्यातला बराच भाग मोडतो यात एकंदर बावीस किल्ले होते. त्यांचीं नावें—वनगड, गहनगड, सिमदुर्ग, नलदुर्ग-मिरागड, श्रीमतदुर्ग, श्रीगदनगड, नरगुंद, महंतगड, कोपल-

गड, बाहदूर बिंडा, व्यंकटगड, गंधर्वगड, ढाकेगड, सुपेगड, पराक्रमगड, कनकादिगड, ब्रह्मगड, चित्रदुर्ग, प्रसन्नगड, हडपसरगड, काचनगड, अचलागिरिगड व मंदनगड

( ९ ) **प्रांत फोंडे बिदनूर**--यात बारा किल्ले होते त्याची नावे--कोट फोंडे, कोट काहूर, कोट बकर, कोट ब्रह्मनाळ, कोट कडवळ, कोट अकोलें, कोट कठर, कोट कलबर्गे, कोट शिवेश्वर, कोट मंगरूळ, कोट कडणार, व कोट कृष्णगिरि

( १० ) **प्रांत कोल्हार, बाळापूर**—यात सत्तावीस किल्ले होते त्याच नावे — कोल्हार, ब्रह्मगड, वडन्नगड, भास्करगड, महीपाळगड, मृगमदग आबेनिराईगड, बुधला कोट, माणिकगड नदीगड, गणेशगड, खळगड, हा गळगड, मचकप्रकाशगड भीमगड, प्रेईवारगड, सोमसेखरगड, मेदगिरि, गड, श्रीवर्धनगड, बिदनूरकोट, मलकोल्हारकोट, ठाकूरगड, सरमगड, मल्हा भूमंडलगड, व बिरूट कोट.

( ११ ) **प्रांत श्रीरंगपट्टण**—यात बावीस किल्ले होते त्याचीं नावे –का धर्मपुरी, हरिहरगड, कोट गरुड, प्रमोदगड, मनोहरगड, भवानीदुर्ग, कोट अमरापुर, कोट कुसुर, कोट तळेगिरि, मुदरगड कोट तळगोडा, कोट आटनूर, कोट त्रिपादुरे, कोट दुटानेटी, कोट लखनूर, कळपगड, महिनदीगड, रजनगड, कोट आलूर, कोट शामल, कोट विगर्डे, व कोट चदमाल

( १२ ) **प्रांत कर्नाटक—प्रांत जगदेवगड** यात अठरा किल्ले होते, त्याचीं नावे–जगदेवगड, सुदर्शनगड, रमणगड, नदीगड, प्रबळगड, बहिरवगड, वारुणगड, महाराजगड, सिद्धगड, जवादिगड, मार्तंडगड, मगळगड, गगनगड, कृष्णगिरि, मल्लिकार्जुनगड, कस्तूरीगड, दीर्घपलिगड व रामगड

( १३ ) **प्रांत वेलूर**—यात साप्रतचा अर्काटजिल्हा मोडतो यात पंचवीस किल्ले होते त्याचीं नावें –कोट आरकाट, कोट लखनूर, कोट पळणापट्टण, कोट त्रिमल, कोट त्रिवादी, पाळे कोट, कोट त्रिकोनदुर्ग, कैलासगड, चंजिवरा कोट, कोट वृंदावन, चेतपाव्हली, कोलबाळगड, रसाळगड, कर्मटगड, यशवंत गड, मुख्यगड, गर्जनगड, मंडविंडगड, महिमंडनगड, प्राणगड, सामरगड, साजरागड, गोजरागड, दुमेगड, व अनूरगड.

( १४) **प्रांत चंदी**—यांत सहा किल्ले होते. त्यांची नांवें –राजगड, चेनगड, कृष्णगिरि, मदोन्मत्तगड, आखलुगड व काळा कोट.

योग्यता सामान्य जनाच्या लक्षात यावी तशी येत नसते त्याच्या कर्तबगारीनें ज्याचें कल्याण झाले असतें ते त्याची सर्वदा स्तुतिच करीत असतात, व ज्याचें अकल्याण झालें असते ते त्याची अनेक प्रकारीं निंदा करीत असतात हा मनुष्यमात्राचा नेहमींचा क्रमच आहे. परतु कोणी तिऱ्हाईत मनुष्य ह्या दोन्ही पक्षाच्या ह्मणण्याचा यथान्याय विचार करून त्या पुरुषाचें वास्तविक स्वरूप दाखवून देतो तेव्हा त्याची खरी योग्यता सामान्य जनाच्या लक्षात येते अशा उदासीन सत्यनिर्णय करणाऱ्या ग्रथलेखकाचा सुयोग आमच्या कथानायकाच्या चरित्रास आजपर्यंत फारसा झाला नाहीं हें बहुश्रुत वाचकास सागावयास नको[१] प्रकृत लेखक महाराष्ट्रवासी असून शिवाजीमहाराजाचा पूर्ण अभिमानी असल्याकारणानें त्याच्या हातून ही कामगिरी यथास्थित होणें शक्य नाहीं हे उघड आहे. परंतु महाराष्ट्रीयाचें शिवाजीमहाराजाच्या संबधानें काय ह्मणणे आहे व त्यास

---

१ अलीकडे मि किंकेड यानी रा. बा पारसनीस याच्या साहाय्यानें मराठ्याचा इतिहास लिहिण्याचा उद्योग चालविला आहे त्याच्या इतिहासाचा पहिला भाग नुकताच प्रसिद्ध झाला आह त्यातील मजकुरावरून असे दिसतें की, त्याच्या ठायीं मराठ्याविषयी आणि विशेषत शिवाजीमहाराजाविषयी बरीच आदरबुद्धि वसत आहे महाराजावर आग्लग्रथकारानी यवनी ग्रथाच्या आधारानें जे कित्येक दोषारोप केले आहेत ते निराधार आहेत असे त्यानी दाखवून दिले आहे. चद्रराव मोरे, अफझुलखान इत्यादिकाशीं त्याचे जे वर्तन घडले ते केवळ सदोष नव्हत असें त्यांनीं सिद्ध केले आहे. यवनी बखरकाराच्या आधारावरच मुख्यत भिस्त ठेवल्यामुळे आमच्या देशी इतिहासलेखकाच्याहि मनाची कशी अवस्था होते हें अलीकडे प्रो. जदुनाथ सरकार यानी जे शिवाजीमहाराजाचे चरित्र. इंग्लिश भाषेत लिहिले आहे ते वाचल्यानें ध्यानात येईल. ते हिंदी गृहस्थ असून पारशी भाषेत पारगत आहेत. त्यांनी जुन्या पारशी ग्रथाचे आलोडन करून मोगलाच्या इतिहासाची व विशेषत औरगजेबाच्या सगळ्या कारकीर्दाची बरीच माहिती मिळविली आहे, व ती औरगजेबाच्या चरित्राचे चार भाग इंग्रेजीत लिहून प्रसिद्ध केली आहे. शिवाजीमहाराजाचें चरित्र त्यानी लिहिले आहे तें केवळ मोगली बादशहांच्या दक्षिणेंतील चळवळीचे एक उपकथानक ह्मणून लिहिलें आहे. तें वाचताना त्या काळच्या कोणी यवन ग्रथकारानें तें लिहिलें आहे काय असा भास होतो. प्रो. सरकारांनीं ह्या चरित्रलेखात जागोजाग यवनी ग्रथकाराचा अनुवाद करून महाराजाच्या सबधानें अनुदारतेचे व असत्यमय उल्लेख केले आहेत. त्याचा ते वारवार "शिवा" ह्या एकेरी व तिरस्कारसूचक नावाने उल्लेख करितात. हें एकेरी नाव वाचून खऱ्या देशभक्तांच्या व विशेषत महाराजाविषयी यथार्थ अभिमान वाहणाऱ्या महाराष्ट्रीयांच्या मनाला वाईट वाटण्यासारखें आहे.

यवनग्रंथकारांनीं व त्याच्याच ह्मणण्याचा अनुवाद करणाऱ्या आंग्लग्रंथकारांनीं जे दोष लाविले आहेत त्यासबंधाने त्याचे काय अभिप्राय आहेत तें येथे सविस्तर सागणे इष्ट दिसते

## बंडखोरपणाचा आरोप.

त्याचा पहिला दोषारोप असा आहे कीं, महाराजानी विजापूरकराशी निमकहरामी करून त्या सरकाराविरुद्ध बंड केले, हें काहीं चागले केले नाहीं ह्या बडखोरपणास्तव त्याची त्यानी त्या काळच्या पुन्डपाळेगारात गणना केली आहे अदिलशहाने महाराजाच्या वडिलास ऐन सकटाच्या प्रसगी आश्रय देऊन जाहगीर करून दिल्याचे उपकार न स्मरता त्यानी कृतघ्न होऊन त्या सरकारावर शस्त्र धरिले व त्याची सत्ता बरीच कमी केली, ह्याबद्दल हे इतिहासकार त्यास दोष देतात परतु हा दोषारोप अगदीं अयथार्थ आहे कृतज्ञतेच्या ओझ्याखाली दडपून जाऊन परतंत्रावस्थेत आमरण खितपत राहणें तेजस्वी व स्वाभिमानी पुरुषास असह्य वाटले तर तो त्याचा अपराध समजणें बरोबर नाहीं परस्थ यवनानीं येथे येऊन सत्ताधीश व्हावे व गरीब हिंदु प्रजेस हवे तसें वागवावे, आणि हिंदुधर्माची सर्वत्र ग्लानि व्हावी, हे पाहून कोणा देशभक्तास व स्वधर्माभिमानी पुरुषास परस्थाच्या कृपेनें प्राप्त झालेल्या वैभवाने सुख वाटेल बरें ? पुन , हें वैभव परकीयाच्या कृपेने प्राप्त झालेले असल्यामुळे त्यास मुकण्याची पाळी केव्हा येईल याचा नेम नसे यास्तव त्यात सुख मानून खाविंदाची मर्जी साधेल त्या उपायाने राखण्यातच आपला तरणोपाय आहे असें खऱ्या तेजस्वी पुरुषास सहसा वाटावयाचें नाहीं तो ही परतत्रता नाहींशी करण्यासाठीं योग्य उपायाचा अवलंब करून

---

२ हें आमचें विधान अत्युक्तिरूप नाही, हे मि किंकेड याच्या पूर्वोक्त ग्रथातील पुढील उताऱ्यावरून लक्षात येण्याजोगें आहे " शिवाजीसबधानें इतिहासकारानी जेवढा अन्याय केला आहे तेवढा दुसऱ्या कोणत्याहि ऐतिहासिक व्यक्तीसबधानें त्यानीं केलेला नाहीं. ग्राट डफचें मत निर्विवाद आहे असें त्यांनीं सर्वांना गृहित धरिले आहे, आणि ग्राट डफनें आपलें मत खाफीखानाच्या आधारानें नमूद केलें आहे. ऑर्मीनें आपल्या लेखात शिवाजीसबधानें विशेष यथार्थ अभिप्राय प्रदर्शित केला आहे, तो ह्या इतिहासकारानी अमान्य ठरविला आहे' शिवाजीच्या कर्तृत्वावर त्यानीं अतिशयित कडक टीका केली असून त्याच्या शत्रूच्या बाबतींत त्यानीं हा कडकपणा यत्किंचितहि व्यक्त केलेला नाहीं, हा मोठा चमत्कार होय. औरंगजेबाची सहस्रावधि नीच कृत्यें व विजापूर व अहमदनगर येथील उमरावाचीं भयकर कृष्ण कारस्थानें याविषयी त्यांना फारसें काही वाटत नाहीं." ( भाग पहिला, पृ. २७१. )

झटला तर त्यांत त्यास दोष लावण्यासारखे काय झालें बरें? असा बडखोरपणा आजपर्यंत जगाच्या इतिहासात पुष्कळ राज्यस्थापकानी केला आहे. परंतु त्यांच्या त्या बडखोरपणाचे दोषावहत्व त्याच्या राज्यवैभवामुळे विगलित होऊन ते मानार्ह होऊन बसले आहेत हाच मान आमच्या चरित्रनायकास मिळणें रास्त आहे. परस्थाच्या मगरमिठीत सापडलेला स्वदेश सोडवून त्यास त्यानी स्वातंत्र्यानुभव घडवून दिला हा आझा हिंदुस्थानवासी जनांवर त्याचा मोठा उपकार झाला. त्याबद्दल आमच्या शिरी त्याचे उपकारऋण कायमचें आहे ही स्वतंत्रता फार दिवस टिकली नाहीं, हा दोष शिवाजीमहाराजाचा बिलकुल नव्हे तो त्याच्यामागून हे स्वातंत्र्य कायम राखण्याचें काम ज्याच्या हाती आले त्यासच लाविला पाहिजे, हे इतिहासज्ञास सागणे नलगे महाराजानी अदिलशाहींत बंड उभारून स्वराज्यस्थापनेचा परम स्तुत्य उद्योग आरंभिला तो सिद्धीस गेला नसता तर त्यास हे ग्रंथकार बंडखोर ह्मणून आणखी हूड व अविचारीहि ह्मणते. परतु ते यशस्वी झाल्यामुळे त्यास एवढा तरी दोष देऊन त्याच्या शुभ्र कीर्तीस ते ग्रंथकार कालिमा लावण्याचा प्रयत्न करितात वादविषयक दोषारोप यवनग्रंथकारानी केला तर तो काहींसा क्षम्य आहे. परंतु स्वतंत्रतादेवतेचे निःसीम भक्त जे युरोपिअन ग्रंथकार त्यानीहि यवनाच्या ह्या अभिप्रायाचा अनुवाद स्वग्रंथात करावा हे चमत्कारिक दिसते त्यानी आमच्या ह्या देशोद्धार करणाऱ्या वीरमणीविषयी अभिप्राय निःपक्षपातबुद्धीने देणें योग्य होय परंतु ही चित्ताची समता राखणें कठीण आहे आज आमचे स्वराज्य कायम असते तर हा अभिप्राय त्यानी असा निक्षून दिला नसता हे उघड आहे.

## कपटीपणाचा आरोप.

ह्या ग्रंथकाराचा महाराजावर दुसरा दोषारोप असा आहे कीं, ते महाकपटी, घातकी व क्रूर होते महाराजाच्या अनेक कृतींचें वरवरून अवलोकन करणारांचा व विशेषत यवनाचा हा अभिप्राय होणें साहजिक आहे. परंतु त्यांच्या उद्दिष्ट कार्याचें महत्त्व केवढे होतें, व तें सिद्ध करण्यास लागणाऱ्या साधनसामुग्रीचें आनुकूल्य किती होतें हें लक्षात आणिलें असता त्यांनी अनेक प्रसंगीं कापट्याचा अवलंब केला तो यथायोग्य होता असें आह्मां महाराष्ट्रीयांस ह्मणावें लागतें. अदिलशाही, कुतुबशाही व मोगलशाही अशा महाप्रबळ पादशाह्यांशीं महाराजांसारख्या अगदीं क्षुल्लक जाहगीरदारानें विरोध मांडण्याचें धाडस करणें हा मोठा विलक्षण अविचार आहे असें त्या काळाच्या लोकांस वाटलें असावें,

हें कांहीं सांगावयास नको. प्रत्यक्ष महाराजांचा प्रतिपाल करणारा दादाजी कोंडदेव यास हा आपल्या धन्याच्या पुत्राचा विलक्षण हूडपणा महाघातक वाटल्यामुळें तो कसा चिंताज्वरानें मरणाच्या दारीं बसला हें वाचकास विदित आहेच. तेव्हां अशा अतिप्रबल शत्रूंशीं झगडण्यांत यश प्राप्ति होणें ती कापट्य व धूर्तता याच्याच पूर्ण साहाय्यानें होण्यासारखी होती. हे गुण महाराजाच्या ठायी नसते किंवा ते अल्प प्रमाणानें असते तर त्याच्या हातून जगास थक्क करून सोडणारी कामगिरी कदापि झाली नसती, आणि महाराष्ट्रीयास काहीं काळपर्यंत जो स्वातंत्र्यानुभव घडला तो किमपि घडला नसता. त्या काळी वैभवाच्या शिखरास पोंचलेला अदिलशहा व सार्वभौमसत्ता पावलेला मोगलबादशहा अमर्याद द्रव्यबल व प्रचंड सैन्यबल यांच्या साहाय्यानें महाराजाचा सर्वस्वी नाश करून टाकण्यास सर्वदा उद्युक्त असता त्यांस पुरून उरून त्याची सत्ता कमीकमी करून टाकण्यास महाराजाच्या ठायींचा हा कापट्यगुण किती उपयोगीं पडला हें वाचकांस विदित आहेच परंतु हें कपटाचे वर्तन महाराजानीं सगळयांशींच केलें असें मात्र सहसा ह्मणता येणार नाहीं. त्याच्याशी इमानानें व माणुसकीनें वागून त्याच्या इष्ट कार्यास जे कोणी अनुकूल होत त्याच्याशीं त्याचे वर्तन अत्यंत सरळ व इतबारानें असे अफझुलखान व शास्ताखान यानीं मोठ्या सेनेनिशीं महाराजावर स्वारी केली असतां त्याशीं समरांगणात गांठ घालून युद्धप्रसंग करण्याचें सामर्थ्य महाराजास बिलकुल नव्हतें तेव्हा अशा दुर्धर प्रसंगीं आपला व आपल्या पदरच्या लोकांचा पुरा नाश करून स्वराज्यसिद्धीस कायमचे अंतरून लोकाधिक्षेपास सर्वतोपरी पात्र व्हावें त्यापेक्षा कपटप्रबंध रचून शत्रूचा नाश करण्यास पुऱ्या धैर्यानें प्रवृत्त व्हावें हें बिलकुल गर्हणीय नव्हे, असें आह्मा महाराष्ट्रीयास वाटणें साहजिक आहे. असा किंवा याहूनहि हीन प्रकारचा कपटप्रयोग करून दुसऱ्यांच्या स्वातंत्र्याचा किंवा राज्याचा अपहार केल्याची उदाहरणें इतिहासांतरीं अनेक आहेत. परंतु महाराजाचा उद्देश असा हीन प्रतीचा नव्हता. स्वराज्यसाधनाचें पवित्र कार्य साध्य करण्यासाठीं त्यांनी हा यवनांच्या दृष्टीनें घातकीपणा केला. तो नसता केला तर त्याचा समूळ नाश होऊन आज सारी इमामशाही सर्वत्र माजली असती, व मराठ्याचें नाव जगाच्या इतिहासांत अमर होऊन राहण्याचा योग आला नसता शत्रु वेशीशीं येऊन भिडला असून आपला सर्वस्वीं नाश करण्यास कदापि चुकणार नाहीं, व त्याच्याशीं शुद्ध नीतीनें वागून निभाव लागणार

नाहीं अशी खात्री झाल्यावर त्याला साधेल त्या उपायानें नामोहरम करणें हें राजनीतीस किंबहुना व्यवहारनीतीस बिलकुल असंमत नव्हे तुसरें असें कीं, आपल्याबरोबर आपल्या आश्रयानें असलेल्या सहस्रावधि मनुष्यांचा संहार होण्याचा किंवा त्यांस अखंड विपत्तीत पडण्याचा अनिवार समय जेथें प्राप्त होतो तेथें उदात्त नीतीचीं सर्व तत्त्वे एकीकडे गुंडाळून ठेवून स्वजनरक्षण करण्यासाठीं एकाद्या अनन्वित उपायाचा अवलंब केल्यानें कोणीहि मनुष्य दोषार्ह ठरत नाहीं, हे निर्विवाद आहे शिवाय त्या काळची समाजस्थिति पाहिली असता तीत कैक शतकेंपर्यंत शांतता कसली ती मुळींच नव्हती. त्या काळीं चोहोकडे सततसंगरावस्था माजून राहिली असल्याकारणानें राजनीतीचीं तत्त्वें आधुनिक काळच्या इतकीं उज्ज्वल नसणें स्वाभाविक आहे. अशी कल्पना करा कीं, शिवाजी महाराजाला कैद करण्याचा किंवा ठार मारण्याचा जो कपटप्रबंध अफझुलखानानें रचला होता त्यांत त्यास यश आलें असते तर त्याला किती धन्यता वाटली असती, व विजापूरदरबारात त्याचे केवढें देव्हारें माजलें असतें? महाराजांसारख्या सहसा हाती न लागणाऱ्या वीरास पकडण्यासाठीं किंवा त्याचा कांटा अजीबात काढून टाकण्यासाठी शास्ताखान वाटेल तें घोर कर्म करण्यास प्रवृत्त झाला असता यात बिलकुल संदेह नाहीं यावरून पाहता अफझुलखानाचा वध व शास्ताखानावरील छापा यामुळे महाराज दोषास पात्र होत नाहींत, तर ते उलट शत्रुपराजयाच्या ह्या अप्रतिम युक्ति योजिल्याबद्दल प्रशंसेसच पात्र होतात ह्या अशा युक्तीमुळे ज्यांचे अतिशयित नुकसान झालें त्यास वाईट वाटून त्यांनी महाराजास शिव्याशाप द्यावे हे स्वाभाविक आहे. परतु युरोपीय ग्रंथकारांनीं त्याच्या ह्या निर्भर्त्सनेचा अनुवाद स्वग्रंथांत करावा हे मात्र चमत्कारिक होय.

ह्या काळच्या इतिहासांत कपटयुक्ति व दगाबाजी योजून कार्यसिद्धि करून घेण्याकडे सगळ्याची सारखीच प्रवृत्ति होती. याचीं उदाहरणें मोगलाच्या व दक्षिणेंतील सुलतानांच्या इतिहासात पुष्कळ आहेत. यापैकीं कित्येकाचा उल्लेख येथें अप्रस्तुत होणार नाहीं. शिवाजीमहाराजांना महाडाहून परत येतांना पकडण्याची कपटयुक्ति अदिलशहाचा सरदार बाजी शामराज यानें जावळीच्या चंद्रराव मोऱ्याच्या साहाय्याने योजिली होती शहाजीराजाना पकडण्याची अधमपणाची युक्ति घोरपड्यानें केली होती शिवाजीमहाराज आग्र्याहून अटकेंतून पळून आल्यावर त्यास पकडून ठार करण्याची अत्यंत घोर युक्ति

ओजण्याचें प्रत्यक्ष जयसिंगानें औरंगजेबास पत्रद्वारे अभिवचन दिले होतें, हें मागें सांगितलेंच आहे औरंगजेबाने गोवळकोंडे काबीज करण्याच्या इराद्यानें सुलतान महमद नावाच्या सरदाराबरोबर मोठी फौज देऊन तिकडे पाठविलें. ही फौज त्यानें त्या नगरावर हल्ला करण्याच्या स्पष्ट उद्देशाने न पाठविता त्याचा मुलगा बंगाल्यास विवाहनिमित्ताने चालला होता त्याच्याबरोबर ह्मणून पाठविली, आणि मार्गात गोवळकोंड्यास मुक्काम करण्याच्या बहाण्याने ही फौज शहरात शिरली. कुतुबशहानें तिला हरकत केली नाहीं. परंतु नगरांत शिरताच त्या फौजेनें चोहोंकडे धुमाकूळ उडवून देऊन तेथल्या लोकांची भयंकर कत्तल उडविली व लुटालूट केली ही दगाबाजी व हे क्रूर कर्म अति घोर नव्हे काय? आता त्या काळच्या इंग्रज व्यापाऱ्यानीं शिवाजीमहाराजाशीं केलेल्या विश्वासघाताची दोन उदाहरणे येथे देतो महाराज पन्हाळाकिल्ल्यावर असता त्या किल्ल्यास विजापूरकरानी वेढा घातला तेव्हा राजापूर येथील इंग्रज व्यापाऱ्यानी विजापूरकराना दारूगोळ्याची वगैरे मदत केली, व त्यास तोफा डागण्यास मदत केली,हे त्यानी महाराजाशीं केवळ दग्याचें वर्तन केलें. आपण उभय पक्षाच्या कलहात तटस्थवृत्ति स्वीकारणार असा बहाणा करून त्यानी हा असा विश्वासघात केला ह्याहूनहि वाईट प्रकारच्या दगाबाजीचें उदाहरण ह्मटलें ह्मणजे खादेरी बेटाजवळ इंग्रजाच्या एका अमलदाराने महाराजाच्या आरमारावरील अमलदाराशी केलेल्या अनन्वित प्रकाराचे होय.

## क्रूरपणाचा आरोप.

आता, महाराज क्रूर व खुनशी होते असा जो आरोप त्यांच्यावर केला आहे तो तर मुळीच निराधार होय. त्याच्या चरित्राचें ज्यानें नुसते वरवरून अवलोकन केलें आहे त्यास देखील यात मुळींच तथ्य नाहीं असें वाटल्यावांचून राहणार नाहीं विनाकारण रक्तपात करू नये असा तर त्यांचा नेहमींचा क्रम असे. शत्रूशीं रणकंदन करून त्याचा पराजय झाल्यावर त्याचे कोणी लोक धाडाव होऊन हातीं लागले असतां त्यास ते कधींहि क्रूरपणानें वागवीत नसत.[१] इतकेंच नव्हे तर ते त्याचा उलट यथोचित आदरमान करून त्यास वस्त्राभरणें, घोडीं व वाटखर्चास पैसा देऊन स्वस्थानी रवाना करीत. हें त्याचें औदार्य आधुनिक सुधारलेल्या राष्ट्राच्या युद्धनीतीसहि लाजविणारें आहे. त्या काळचे यवन

१ ह्या संबंधाचे उल्लेख प्रकृत ग्रथांत जागोजाग केलेले वाचकास स्मरत असतीलच.

युद्धांत पाडाव केलेल्यांचे अनेक प्रकारीं हाल करीत, त्यास धर्मांतर करावयास लावीत, त्यांस दास ह्मणून विकीत, किंवा बंदींत ठेवीत.[1] तसा काहींएक प्रकार महाराजाच्या हातून कदापि होत नसे नि शस्त्र होऊन शरण आलेला शत्रु कितीहि अपराधी असला तरी त्याशीं उदारपणें वर्तन करून त्याला लाजविण्याची अलौकिक कला महाराजास साधली असल्यामुळे त्यांच्या पदरीं नोकरी पतकरून राहण्यास शत्रूंकडील वीर सर्वदा तयार असत असे काहीं वीर पुढे स्वराज्यसाधनाच्या कामी प्राण द्यावयासहि कसे उद्युक्त झाले हे वाचकास ठाऊक आहेच त्यावरून पाहता हा क्रूरपणाचा व खुनशीपणाचा दोषारोप अगदींच शुष्क आहे. हा महाराजाविषयींचा निरर्थक ग्रह बाजी घोरपड्याच्या वधामुळें कित्येकाचा झाला असावा, व काहीं जणाचें असें ह्मणणें आहे कीं, हा अमल क्रूरपणा तर खराच एका बाजी घोरपड्याच्या अपराधाबद्दल त्याच्या कुटुंबातील सर्व पुरुषास, त्याच्या सर्व नातलगास व त्याच्या सर्व आश्रितास देहांत प्रायश्चित्त मिळावे हे अगदी योग्य नाहीं परंतु बाजी घोरपड्यासारख्या मराठेसरदाराने स्वोत्कर्षावरच दृष्टि देऊन आपल्या जातीच्या महातेजस्वी पुरुषाचा घात करण्यास यवनाच्या सांगण्यावरून प्रवृत्त व्हावे हे अत्यंत गर्हणीय व अक्षम्य होतें त्या त्याच्या कृष्णकर्माचा परिणाम केवढा भयंकर होण्याचा संभव होता हें वाचकास सांगावयास नकोच. महाराजाच्या ठायीं निःसीम पितृभक्ति असल्याकारणानें त्याच्या बचावासाठीं आपला स्वराज्यसाधनाचा उद्योगहि त्यास सर्वथैव सोडावा लागला असता;

---

१ शिद्दाच्या स्वाऱ्या मराठ्याच्या अमलातील मुलखात वेळोवेळी होत त्या समयी त्याच्या हातून किती भयंकर क्रूर कर्मे होत, त्याप्रमाणेच शास्ताखानाने महाराजाच्या मुलखावर स्वारी केली तेव्हा त्याने चोहोंकडे कसा आहाकार उडवून दिला हे वाचकास आठवत असेलच दिलेरखानाने १६७९ त स्वारी केली त्या वेळी त्याने जी अत्यंत घोर कर्मे केली ती पाहून संभाजी, जो त्या समयी महाराजावर रुसून त्याच्या छावणीत पळून गेला होता, तो जात्या क्रूर स्वभावाचा असूनहि त्याला अतिशयित वाईट वाटून व त्या मोगल सरदाराचा त्याबद्दल निषेध करून त्याच्या छावणींतून निसटून परत आपल्या प्रांतात आला. शिवाजी महाराजांवर व विजापूरकरांवर केलेल्या बहुतेक मोहिमात मोगलांनीं अनाथ बायकामुलांना पकडून त्यांचे अनेक प्रकारीं हाल केल्याचे, व रयतेचा जेवढा संहार होईल तेवढा करण्याविषयीं औरंगजेबानें आपल्या सरदारांस वेळोवेळीं ताकीद केल्याचे उल्लेख खाफीखान वगैरे यवनी बखरकारांनीं केले आहेत. परंतु शिवाजीमहाराज शत्रूच्या मुलखांतल्या बायकामुलांस व निरपराध रयतेस कोणत्याही प्रकारचा त्रास मुळीं देत नसत असा उल्लेख खाफीखानासारखे हिंदूचे कट्टे द्वेष्टेहि करितात, यावरून काय समजावयाचें बरें?

आणि शहाजीराजे बंदिमुक्त होततोपर्यंत त्यास जवळजवळ चार वर्षे स्वस्थ बसावेंहि लागलें होतें हे मनात आणिले ह्मणजे पितृप्रेम व स्वराज्यसाधनप्रीति ह्या सद्वृत्तीस वश होऊन त्यानी जो हा घोरपड्याचा अति भयंकर रीतीने सूड उगविला तो काहींसा क्षम्य होय असे ह्मणावें लागतें शिवाय ह्या प्रकरणीं खुद्द शहाजीराजाची आज्ञा असल्याकारणाने ती पितृप्रेमास अनुरूप अशा रीतीने पाळणें हे सुपुत्राचे पवित्र कर्तव्य आहे असे मनात येऊन त्याच्या ठायीचा हा आवेश विशेष उग्र स्वरूप पावला असावा असे वाटते

## द्रव्यलोभानें लूट केल्याचा आरोप.

प्रतिपक्षाचा तिसरा दोषारोप असा आहे कीं, महाराजास द्रव्यलोभ अमर्याद असल्याकारणाने ते यवनी अमलातील निरपराध प्रजेस सर्वदा लुटीत व अनेक प्रकारा त्रास देत ह्यामुळे जिकडेतिकडे धामधूम व अस्वस्थता माजून राहिली होती हा आरोप काही अंशी खरा आहे, असे आमच्यापैकींहि काहीं जणाचें ह्मणणे आहे परतु त्याचें वास्तविक स्वरूप लक्षात आले असता प्रतिपक्ष ह्मणतो तेवढा दोष महाराजाच्या माथी येत नाहीं प्रथम असें पाहा कीं, महा राजानीं स्वराज्यसिद्धीच्या आरभापासून अगदी शेवटपर्यंत जो हा क्रम धरिला होता त्यात त्याचा हेतु केवळ स्वधनवृद्धि करण्याचा नव्हता तीन प्रबळ व धनाढ्य पादशाहतींशी एकसारखा विरोध माडून त्याच्या प्रचंड सेनाशी हरदम लढत राहण्यास लोकबळ व द्रव्यबळ किती हवे होते हे कोणासहि कळ णारें आहे आपल्या पदरचे लोक सर्वदा राजी राखून ते हाती घेतलेल्या महत्कार्यसिद्ध्यर्थ हातावर शिर घेऊन दाडग्या इमामाशी लढण्यास तयार करण्यासाठीं त्यास द्रव्याच्या आमिषावाचून आणखी कोणतें आमिष दाखवि ण्यासारखें होतें बरें ? दुसरें असें कीं, महाराजांस आपलें सैन्यबळ साधेल तेवढें वाढविल्यावाचून बिलकुल गति नव्हती. ह्या एवढ्या सैन्यास द्यावा लाग- णारा मुशाहिरा त्यांनीं कोठून आणावयाचा होता ? त्याचप्रमाणें स्वराज्यरक्षणास व स्वराज्यवर्धनास सर्व प्रकारी साहाय्यभूत असे जे शेकडो किल्ले त्यांची नेहमी दुरुस्ती करून त्यावर उत्तम बदोबस्त राखण्यास व नवीन शेकडो किल्ले बाधण्यास लागणारें अमाप द्रव्य त्यांनीं कोठून आणावयाचें होते ? स्वसत्तेतील मुलखाच्या उत्पन्नावर हा एवढा अवाढव्य खर्च भागण्यासारखा होता काय ? जर नाहीं, तर हें द्रव्यबल त्यांस लुटालूट करूनच मिळविणें प्राप्त होतें हें निर्विवाद आहे. हल्लीं जसें सुधार-

केल्या राष्ट्रांस युद्धादि प्रसंगांसाठीं राजरोसपणें हवें तितके कर्ज काढून त्याचा बोजा स्वप्रजेच्या शिरीं अक्षयींचा लादण्याचा व तिला कराच्या ओझ्याखालीं अगदी हैराण करण्याचा मार्ग साध्य आहे, तसा काहीं प्रकार त्या काळी अनुकूळ होता काय ? आधुनिक राष्ट्राच्या राष्ट्रीय कर्जाचे आकडे आपण पाहिले म्हणजे आपली छाती अगदी दडपून जाते आणि असें वाटते कीं, ह्या राष्ट्राचीं दिवाळी निघाली पाहिजेत एक, किंवा अनाथ प्रजेस त्यानी सर्वथैव पिळून काढिलें पाहिजे एक परंतु हीं राष्ट्रे जे युद्धप्रसंग करितात ते सर्व स्वत्वरक्षणार्थ किंवा स्वातंत्र्यसंपादनार्थ करितात काय ? त्याच्या आपआपसातल्या कलागती केवळ एखाद्या दुसऱ्या राजाच्या किंवा मुत्सद्याच्या हरामखोरीमुळे, मूर्खपणामुळे किंवा राज्यतृष्णेमुळें उद्भवतात,आणि त्याच्या पायीं लक्षावधि मनुष्याचे बळी पडून त्याबद्दलचा सगळा दंड त्याच्या प्रजेस पुत्रपौत्रपरपरेनें भरीत राहावे लागते ह्या अत्यंत अनर्थावह, अक्षय विपत्तिमूलक व अन्याय्य पद्धतीशीं महाराजाचा वादविषयक द्रव्यप्राप्तीचा मार्ग ताडून पाहता तो केवळ क्षम्य होय असें ह्मणावे लागते त्यास लागणारे अमर्याद द्रव्यसाहाय्य त्यानी स्वप्रजेस अशा रीतीने नाडून मिळविलें नाहीं, तर जे परस्थ इकडे येऊन येथील प्रजेच्या जिवावर हवे तसे गबर होऊन बसले होते त्याच्यावर, व त्याच्या आश्रयाने जे हिंदुलोक सधन झाले होते त्याच्यावर खंड बसवून त्यानी ज्यास परतंत्र करून सोडिले होतें त्यास स्वतंत्र करण्याच्या पुण्यकृत्याप्रीत्यर्थ त्या द्रव्याचा विनियोग केला, यात त्याच्याकडून मोठेसें पातक घडलें असें आम्हा महाराष्ट्रीयास तरी निदान कदापि वाटणार नाहीं त्यानी अशा रीतीनें लुटालूट करून द्रव्य मिळवावयाचें नव्हते असा नीतिबोध करणे म्हणजे त्यानी स्वराज्य व स्वातंत्र्य हीं संपादण्याच्या प्रयत्नासच मुळी लागावयाचे नव्हते असें म्हणणे होय लक्षगणित पागा व पायदळ सर्वदा जय्यत राखून अगदी लहान् दर्जाच्या शिपाईप्याद्यापासून मोठमोठ्या सेनापतींपर्यंत सर्व लष्करास रोख पगार द्यावयास नेहमी किती पैका लागत असावा, व त्याच्या सत्तेतील मुलखाचें उत्पन्न त्या काळीं सरासरी किती असावे याचा अदाज केला असता अशा रीतीनें बाहेरून द्रव्य मिळविल्यावांचून गति नव्हती हें उघड आहे. शिवाय औरंगजेबासारख्या सार्वभौम बादशहाची आपणांवर लवकरच चढाई होऊन आपणांस त्याच्याशीं निकराचा संग्राम करावा लागणार, तेव्हां त्या प्रसंगीं द्रव्याचें मुबलक साहाय्य लागणार हें महाराज जाणून होते, यास्तव ते साधेल तेवढा द्रव्यसंग्रह करीत असत. त्या तरतुदीस जर कोणी द्रव्यलोभ

म्हणत असतील तर तो त्यांचा निवळ खोटसाळपणा होय. गिझनीच्या महमदानें हिंदुस्थानांत सतरा वेळा स्वाऱ्या करून अगणित द्रव्यराशि केली व मरणसमयीं ते सर्व द्रव्य सोडून आपण जाणार म्हणून शोकाश्रु ढाळले, अशा कोटींतले शिवाजी महाराज होते असें कोण म्हणेल ?

## लुटीसंबंधाचे निर्बंध

आतां, ही लुटालूट महाराज करीत असत ती केवळ निर्बंधरहित होती किंवा तिला कांहीं नियमाचा आळा होता हे पाहणें उचित आहे यासंबंधाचे त्याचे नियम कसे होते हे मागे सांगितलेंच आहे. गरीब रयतेस व शेतकऱ्यास त्याच्या लोकाकडून मुळीच उपद्रव होत नसे स्त्रिया व मुले यांस पकडू नये किंवा त्याची बेअदबी करू नये अशी त्याची आपल्या लोकास सक्त ताकीद असे देवस्थाने, मशिदी, साधुसंत व मुसलमान फकीर यास बिलकुल त्रास देऊ नये असा त्याचा कडक कायदा असे. तसेच लुटालूट करिताना हातीं लागेल तो माल बुचाडून शिपायानी किंवा अमलदारानी गव्वर व्हावे असा प्रकार त्याच्या मुलूखगिरींत मुळींच होत नसे सर्व लुटीचा हिशोब सरकारात द्यावा लागत असे त्यामुळे त्याच्या लष्करास परराज्यातील प्रजेवर यथेष्ट चरण्याचें मुळीच साधत नसे पुढे पेशवाईत जसें सरकारी सैन्याबरोबर बाजारबुणगें जाऊन जिकडेतिकडे धुमाकूळ उडवून देत असे व सरकारी लष्करासहि अन्नसामुग्री मिळण्याची पंचाईत करून सोडीत असे, तसा प्रकार महाराजाच्या लष्करात मुळीच नसे दुसरे असें कीं, जे अमीरउमराव किंवा शेटसावकार आपल्या द्रव्याची छपवाछपवी न करिता सुकाळ्याने आपल्या मगदुराप्रमाणें मागतील तो खंड देण्यास तयार होत त्यांस महाराजाच्या लोकाकडून कदापि उपद्रव होत नसे. त्याप्रमाणेंच ज्या शहरांतले लोक अमुक इतका खंड द्यावयास राजी होत त्यांत त्याचे लष्कर कधींहि प्रवेश करीत नसे, बाहेर वेशीपाशीं राहून ठरलेला खंड मिळतांच ते तेथून निघून जाई. जे संस्थानिक वार्षिक खंड द्यावयास सिद्ध होत त्यांच्या संस्थानांत ते मुळींच मुलूखगिरीस जात नसत पुढें अदिलशहानें व कुतुबशहानें वार्षिक खंडण्या देण्याचें कबूल केल्यावर[१] त्यांच्या सत्तेतील मुलखात महाराज स्वारीस जातनासे झाले. परंतु त्यांचा हा तह फार दिवस टिकला नाहीं म्हणून त्यांस पुन पुन त्याच्या राज्यांतील

---

१ भाग चोविसावा पाहा.

यवन प्रजेवर घाले घालावे लागत. ह्या लुटालुटीच्या संबंधानें आणखी एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे, ती ही कीं, महाराजाचे लोक एका हातांत तरवार व दुसऱ्या हातांत आग घेऊन गरीब प्रजेची सरसकट कत्तल उडवीत किंवा घरेंदारें जाळीत जात नसत असला अप्रयोजक क्रूरपणा त्याच्या हातून मुळींच होत नसे द्रव्य कोणापाशी आहे हें पहिल्याने हेरांच्या द्वारें समजून घेऊन केवळ अशाच लोकांवर घाला घालावा व त्यानी आपलें द्रव्य बिनहरकत स्वाधीन केल्यास त्याला सोडून द्यावे, असा महाराजाचा नियम असे तेव्हां तात्पर्य काय कीं, वर निर्दिष्ट केलेल्या एकदर गोष्टीचा नीट विचार केला असता महाराजास लुटारू व क्रूर लोकाच्या वर्गात गणून त्याची अवहेलना व निंदा करणें सर्वथा उचित नव्हे असे खऱ्या विचारी मनुष्यास वाटल्यावाचून राहणार नाहीं

## लुटीचा उद्देश.

ह्या लुटालुटीच्या प्रकाराचे आणखी एक प्रयोजन येथे निर्दिष्ट केलें पाहिजे. तें पुष्कळाच्या लक्षातून गेले असावे असें वाटते तें प्रयोजन अर्थात असें कीं, यवनी अमलात अशी सतत धामधूम करीत राहिल्यानें तेथील प्रजेकडून यवनबादशहास मिळावा तसा कर न मिळून त्याची शक्ति क्षीण व्हावी, व अशा लुटारू व प्रबळ रिपूस सतुष्ट राखल्यावाचून आपली सत्ता निबध चालणें कठीण आहे असें त्यास वाटावें ह्या सतत होणाऱ्या त्रासापासून मुक्त होण्यासाठी अदिलशहा व कुतुबशहा हे महाराजास वार्षिक खडणी देण्यास तयार झाले हे मागे सागितलेंच आहे ह्या खंडणीशिवाय आणखी चवथाई व सरदेशमुखी हे हक्क अदिलशहाच्या सत्तेतील मुलखातून वसूल करण्याचा क्रम त्यानीं मोगलाच्या सामलानीनें सुरू केला होता, याचा उल्लेख मागे केलाच आहे. त्याप्रमाणेंच कुतुबशाहींत हे हक्क स्थापित करण्याचा त्याचा विचार होता. तो कर्नाटकांतल्या मोहिमेमुळें अमळ लांबणीवर टाकावा लागला होता. असेच हक्क मोगलाच्या दक्षिणेंतील मुलखांतून वसूल करण्याची मुभा मिळविण्याविषयीं त्यांची खटपट चालली होती, आणि ते आणखी कांहीं वर्षे जगते तर हे हक्क त्यांनीं मोगलबादशहाकडूनहि कबूल करून घेतले असते. आता ह्या हक्कांचें धोरण काय होतें हें कोणासहि सांगावयास नकोच. हिंदु रयतेपासून मिळणाऱ्या कराच्या जोरावर यवनबादशहा प्रबळ झाले होते, त्यांचा कांहीं अश अथवा हिस-

कावून घेतल्यानें तेवढे त्याचें सामर्थ्य कमी व्हावें आणि त्या मानानें आपली शक्ति वाढून त्यांच्याशी झगडण्यास लागणारी तयारी आपणास करितां यावी, असा महाराजाचा उद्देश होता.

आता येथे कोणी असा प्रश्न करील कीं, यवनी पादशाहती दुर्बल करण्याच्या ह्या प्रयत्नात निरपराध प्रजेस नाहक त्रास देणें हे मोठे पातक नव्हे काय ? ह्या प्रश्नाचें उत्तर एवढेच आहे कीं, महाराज यवनी अमलांतील सर्वच प्रजेला सरसकट उपद्रव देत नसत त्याचा डोळा नेहमी सधन लोकांवर असे त्याच्या वित्ताचा काहीं अंश स्वराज्य व स्वातंत्र्य हीं साध्य करण्याच्या महत्पुण्याच्या कामी योजावा असा त्यांचा संकल्प असे त्याच्याकडून बहुतकरून सधन यवनासच त्रास होत असे, व त्याच्या आश्रयानें गबर झालेल्या इतर लोकावर त्याचा खंड असे, हे मागे सांगितलेंच आहे. त्याच्या ह्या सदुद्देशाविषयीं परमुलखातील लोकास कितीहि सांगितले तरी ते त्यास पटून ते आपल्या वित्ताचा अंश ह्या राष्ट्रीय कार्यास राजी-खुषीनें देण्यास तयार झाले नसते हे उघडच आहे यास्तव त्याच्यावर जुलूम केल्यावाचून दुसरी गति नव्हती. सर्व हिंदुजनास जी कार्यसिद्धि हितावह होणारी होती तिच्या प्रीत्यर्थ त्यापैकीं थोड्याशा लोकास अल्प काळपर्यंत काहींशी घस सोसावी लागली तर ते मोठेंसें पाप झाले असें सहसा ह्मणवत नाहीं महाराजाचा अंतिम हेतु काय होता याचा जो नीट विचार करील त्यास ह्या त्याच्या करण्यात काहीं वैगुण्य आहे असें बिलकुल वाटणार नाहीं.

## राज्यतृष्णेचा आरोप.

प्रतिपक्षाचा आणखी एक दोषारोप असा आहे कीं, केवळ राज्यतृष्णेस वश होऊन महाराजानी हा सगळा खटाटोप केला, यास्तव तो कोणत्याहि दृष्टीनें क्षम्य नव्हे ह्या दोषारोपाचें निरसन करावयाचें ह्मणजे अर्थात् त्याच्या ह्या खटाटोपाचें वास्तविक स्वरूप जगाच्या प्रत्ययास आणून दिले पाहिजे स्वराज्य संपादण्याचा मूळ उद्देश पाहिला असतां तो यवनाच्या ताबेदारीतून सुटून स्वतः स्वतंत्र व्हावें असा होता, हे उघडच आहे; आणि ह्याच उद्देशानें महाराज आरंभीं ह्या भगीरथ उद्योगास लागले असावे यात काहीं शंका नाहीं. परंतु त्या उद्देशांत सर्व हिंदुप्रजेस यवनत्रासमुक्त करण्याच्या उद्देशाचें मिश्रण नव्हते असें सहसा ह्मणवणार नाहीं. कारण त्यानीं आरंभीं जीं माणसें आपल्या केवळ असाध्य दिस-णाऱ्या कार्यास अनुकूळ करून घेतलीं त्यांच्या हृदयांत यवनसत्तेविषयीं तिर-

स्कार व स्वातंत्र्यप्रीति ह्या वृत्तीचें उद्दीपन केले नसतें तर त्यांनीं जें साहाय्य त्यांस स्वसुखाची व स्वजीविताची यत्किंचित्‌हि परवा न करिता केलें तें त्यांच्या हातून घडलें नसते अफझुलखानाकडून आलेला ब्राह्मणवकील, जयसिंग, यशवंतसिंग वगैरे पुरुषास अनुकूळ करून घेण्यात महाराजास जे यश आले त्याचे इंगित पाहूं जाता, केवळ आपला वास्तविक उद्देश जो यवनसत्ताविनाशाचा तोच त्यास नीट समजून सागून त्याविषयी त्याच्या ठायी अभिमान जागृत करण्याचा प्रयत्न महाराजानीं केला हेच होय, एरवी त्यानी त्याच्या स्वराज्यप्राप्तीच्या उद्योगास, कितीहि आमिष दाखविले असते तरी, आनुकूल्य प्रगट केलें नसते. राज्यतृष्णा महाराजाच्या ठायी अनिवार होती असें ह्मणणारानी, त्यास तीनचार प्रसगीं विरक्तता प्राप्त होऊन राज्यत्याग करून मोक्षसाधनाच्या मार्गाचे अवलंबन करण्याचा त्यानी विचार कसा केला होता, व त्या विचारापासून त्यास परावृत्त करण्यास त्याच्या पदरच्या लोकास किती सायास पडले, हे अमळ लक्षात आणावे आलेक्झॅन्डर, सीझर, तैमुरलग, बाबर, औरगजेब अशा स्वसत्तावृद्धीच्छु पुरुषाशी ह्या बाबतीत महाराजाची तुलना कदापि करणे रास्त नव्हे. परकीयाच्या स्वातत्र्याचा व राज्याचा अपहार करून आपली सत्ता वृद्धिगत करण्यात जो प्रचड मनुष्यसहार ह्या राज्यतृष्णावश पुरुषानी केला तो सर्वथा क्षम्य नव्हे हे केवळ महापातक होय हा दोष महाराजाच्या पदरी बाधिता येत नाहीं हिंदुस्थान हिंदूंचे असून त्यात राज्य करण्याचा हक्क फक्त हिंदूसच असावा, असें असता परस्थानी त्यात प्रवेश करून त्यावर आपली सत्ता बसवावी, व तेथील प्रजेस वाटेल तसें नाडावे, हा अत्यंत मोठा अन्याय होय. अशा अन्यायी व जुलमी सत्ताधीशाचे स्वदेशातून निष्कासन करून पुनरपि स्वराज्य व स्वातत्र्य स्थापन करण्यास उद्युक्त होण्यांत मुळीच अन्याय नाहीं, उलट हे महत्पुण्यकर्म होय, आणि हे करण्यास जो नरपुगव प्रवृत्त झाला त्याचें अखिल भरतवर्ष अक्षयीचे ऋणी झाले तर त्यात नवल तें कोणतें? अशा सत्कार्यास राज्यतृष्णादोषानेहि बिलकुल हीनत्व येत नाहीं एकादें कार्य करण्यास मनुष्य कोणत्याहि उद्देशानें प्रवृत्त झाला तरी त्या कार्याचा परिणाम जर सर्व जनसमाजास हितकर झाला तर ते कार्य अत्यंत स्तुत्य होय, अशी नीति आहे. ह्या दृष्टीनें पाहता महाराज केवळ राज्यतृष्णेस वश होऊन स्वराज्यसाधनास प्रवृत्त झाले असें मानिलें तरी त्यांत त्यांस वैगुण्य आणणारें असें कांहींच झालें नाहीं अशी आमची मनोदेवता आह्मांस सांगते. ह्या त्यांच्या

कर्तृत्वामुळें ज्या परस्थांस अपाय घडला त्यांनीं ह्याबद्दल त्यांस कितीहि नावें ठेविलीं तरी तीं अगदीं व्यर्थ होत जगाच्या इतिहासात स्वातंत्र्यसंपादक महापुरुषाची खरे निरपेक्ष व नि पक्षपाती इतिहासकार सर्वदा वाखाणणीच करितात व स्वातंत्र्यमूलक जे राष्ट्रीय सुख त्याचें वर्धन केल्याबद्दल त्याचा धन्यवाद करितात. ह्या धन्यवादास आमचे चरित्रनायक सर्व प्रकारें पात्र होत हे निर्विवाद आहे.

## स्वार्थपरतेचा आरोप.

ह्या राज्यतृष्णारूप दोषाच्या अनुषगानें असणारे स्वार्थपरता व महत्त्वाकांक्षा हे दोन दोष महाराजाच्या अंगी वसत होते असें प्रतिपक्षाचें म्हणणें आहे यात कितपत तथ्य आहे ते पाहू स्वार्थपर मनुष्य केवळ आपला उत्कर्ष साधण्यास सर्वदा तत्पर असतो. दुसऱ्याच्या सुखदु खाचा विचार तो बिलकुल करीत नसतो महाराजानी असा आपलपोटेपणाचा प्रकार कोणता केला ते त्याच्या चरित्रावरून मुळीच दिसून येत नाहीं स्वराज्यसाधन करून वैभव भोगावें असें त्याच्या मनात असते तर त्यानी आमरण जो उपद्व्याप, व जी दगदग केली ती कदापि केली नसती त्यानी प्राप्त ऐश्वर्याचा यथेच्छ उपभोग घेण्याचें कधी मनातहि आणिले नाहीं त्यास सर्व सुखविषयाची पूर्ण अनुकूलता असताहि त्यात ते एक क्षणहि गुंतून राहिले नाहींत त्याची दिनचर्या पाहिली असता अशा सुखानुभवास एका पळाचाहि अवकाश त्यानी राहू दिला नव्हता लौकिक कृत्यात त्याचा सगळा वेळ अगदी व्यापून जात असे. सपादित राज्याचें सरक्षण करून त्याची सुव्यवस्था लावण्यात व तदवृद्ध्यर्थ अहर्निश झटण्यात त्याच्या बुद्धिसर्वस्वाचा व शक्तिसर्वस्वाचा सर्वदा व्यय होत असल्याकारणानें त्यास फुरसत अशीं बिलकुल नसे ह्या अत्यत परिश्रमानें श्रात होणाऱ्या त्याच्या देहास किंवा मनास आराम असा कधीच प्राप्त झाला नाहीं, हे त्याचे चरित्र लक्षपूर्वक वाचणारांच्या ध्यानात आल्यावांचून राहणार नाहीं सर्व हिंदुस्थानदेश यवनसत्तेंतून मुक्त केल्यावांचून विश्रांतिच मुळीं घ्यावयाची नाहीं, असा ज्या महापुरुषाचा दृढ संकल्प होता त्याच्यावर स्वसुखार्थ व स्ववैभववृद्ध्यर्थ त्यानें हा सारा खटाटोप केला असा आरोप करणें सर्वथा युक्त नव्हे महाराजांनीं इतकी दौलत संपादन केली होती तरी आपला डौल किंवा दिमाख वाढविण्याकडे त्यांनी तिचा फारसा उपयोग केला होता असें सहसा म्हणवत नाहीं. त्यांचा पेहराव नेहमीं साधा असे, व अंगावर अलंकारादि धारण करण्याचा त्यांस मुळींच शोक नसे; तरी आपली

छाप व वजन हीं परकीयास व स्वकीयास योग्य प्रकारें भासावी यासाठीं स्वारीचा व दरबाराचा जितका थाट ठेवणे उचित वाटे तेवढा ते अवश्य ठेवीत दुसरें असें कीं, आपल्या पदरच्या लोकानी चागल्या कामगिऱ्या केल्या असता त्यास योग्य परितोषिक देण्यासंबंधानें त्याचे औदार्य फारच मोठे दिसून येत असे. त्याप्रमाणेच स्वसेवकास त्याच्या कामाच्या महत्त्वानुरूप व योग्यतेनुरूप वेतनें देण्यात ते कदापि कंजूष नसत. ज्याच्या साहाय्याने एवढी दौलत आपणास लाभली त्यास सतुष्ट ठेवण्यात ते कधी कुचराई करीत नसत. सपादिलेल्या द्रव्याचा उपयोग स्वराज्याच्या रक्षणाकडे व वर्धनाकडेच मुख्यत केला पाहिजे व जेणेंकरून स्वजनहित होईल, किंबहुना अखिल भरतवर्ष यवनत्रासरहित होईल, ते साधण्याकडेच तिचा विनियोग झाला पाहिजे, असा त्याचा नेहमीचा विचार असे ह्या दौलतीचे आपण रक्षक व वर्धक आहो, भोक्ते नव्हो, हें तत्त्व त्याच्या हृदयात पूर्णपणे बिंबले होते असें ह्मणण्यास मुळीच प्रत्यवाय नाहीं. अशा तत्त्वास अनुसरून ज्यानी आपले आचरण आमरण राखिले, त्यास स्वार्थ-परतेचा दोष लावणे बिलकुल यथार्थ नव्हे.

## महत्त्वाकांक्षेचा आरोप.

आता, स्वार्थपरतेच्या अनुषगाने असणारी जी महत्त्वाकाक्षा ती तरी महाराजाच्या अगीं वस्तुत वास करीत होती की काय ते पाहूं स्वताचा बडेजाव वाढावा, आपली सत्ता सर्वत्र स्थापित होऊन सर्व आपले अकित व्हावे, व आपली कीर्ति सर्वतोमुख व्हावी अशी अनावर इच्छा ज्याच्या ठायी वास करीत असते त्या राजास महत्त्वाकाक्षी म्हणणें रास्त आहे. महाराजानीं सर्व आर्यभूमीस पालाण घालण्याचा संकल्प करून जो प्रचंड उद्योग आजन्म केला तो ह्या दोषरूप वृत्तीसच अनुसरून केला असावा असा तर्क होणें साहजिक आहे परतु असे पाहा की, जरकरिता ह्या वृत्तीचा अनिवार क्षोभ होऊन ते हिंदूंचें स्वराज्य स्थापून परतंत्रतारूप महागर्तेतून त्यांचा उद्धार करण्यास प्रवृत्त झाले हे खरे मानिलें तरी ते त्याबद्दल लवमात्रहि दोषास पात्र होत नाहींत. ज्या महत्त्वाकांक्षेचा परिणाम असा राष्ट्रोत्कर्षास कारणीभूत होतो ती दोषरूप कशी ह्मणावी ? परंतु महाराजांच्या एकंदर कर्तृत्वाचा ताळेबंद पाहिला असता असें दिसून येते कीं, स्वराज्यसाधन व स्वातंत्र्यसंपादन करण्यास अहर्निश झटणें हें आपलें अत्यंत पवित्र कर्तव्य होय. अशी त्यांची

परम उदात्त वृत्ति बहुतेक आरंभापासून झाली होती. हें महत्कार्य करण्यासच आपण जन्म पावलों आहों, व तें साध्य करण्यातच आपल्या जीविताचें सार्थक्य आहे असें त्यांस सदैव वाटत असे, असें ह्मटल्यास अत्युक्तीचा दोष प्रकृत लेखकाच्या माथी येईल असें मुळीच वाटत नाहीं ही अलौकिक वृत्ति त्याच्या ठायीं अशी पूर्णपणें विकसित झालेली नसती तर जगाच्या इतिहासात ज्यास जोड नाहीं अशीं साहसाची व शौर्याची कृत्ये त्याच्या हातून कदापि घडली नसतीं.

हा महत्त्वाकाक्षारूप दोष त्यास लावण्याचे मुख्य कारण कोणी असें सागतील कीं, महाराजानी स्वराज्यस्थापनेस आरंभ केला तेव्हा बहुतेक स्वतत्र होऊन बसलेल्या कित्येक हिंदू सरदारास बुडविण्याचा उद्योग त्यानीं केला हें बरोबर नाहीं. यवनाच्या ताबेदारीतून सुटावयाचे तर त्यानी आपल्याच लोकांवर शस्त्र धरिलें तें कशाला? ह्यावरून असें होत नाहीं काय कीं, आपल्या सत्तेव्यतिरिक्त अन्य कोणाहि सरदाराची सत्ता महाराष्ट्रात नसावी असा शिवाजीमहाराजाचा निर्धार होता? आणि ह्यावरून त्याच्या ठायींची ही महत्त्वाकांक्षा अक्षम्य होती असें नको का ह्मणावयाला? अशी शका घेणारास महाराजाच्या एतद्विषयक कर्तृत्वाचे वास्तविक स्वरूप नीट कळले नाहीं असें ह्मणावें लागतें ज्या देशाची परकीयाच्या सत्तेतून मुक्तता करावयाची त्यात जो तो स्वतंत्र होऊन किंवा परकीय सरकाराशीं पुटावा करून आपआपला टापू आटपून बसला तर त्यापासून काहींएक फलनिष्पत्ति होणें नाहीं, हें कोणालाहि सांगावयास नको अशा एकेकट्या पुंडास हतवीर्य करून वरिष्ठ सरकार त्याचा सुळसुळाट नाहींसा करण्यास सर्वदा समर्थ असतें तेव्हा अशा पुंडास किंवा बंडखोरास वश करून घेऊन किंवा त्याचा नायनाट करून स्वसत्तावृद्धि करण्यातच तरणोपाय आहे असें महाराजास वाटलें ते यथायोग्य होते त्याप्रमाणेंच जे कित्येक मराठे जाहगीरदार अदिलशहाची ताबेदारी स्वीकारून राहिले होते त्यांस वश करून घेण्याचा प्रयत्न करणे किंवा ते सामोपचारानें वश होत नसल्यास त्याला हरउपायानें जेर करणे हे महाराजानी हातीं घेतलेल्या महत्कार्याच्या सिद्धीस अत्यावश्यक होते हें कोणीहि कबूल करील इतालीदेशांत परराष्ट्रांनीं चोहोकडे लाडा कारभार आरंभून स्वसत्ता स्थापित करण्याचा उद्योग मांडिला तेव्हां तेथील काउन्ट केव्हरादि पंचायतनाने स्वराष्ट्रास स्वतंत्र करण्याच्या कामीं केलेला उद्योग, किंवा जर्मनीच्या माजी बादशहानें सर्व जर्मनराष्ट्र एका छत्राखाली आणण्याचा केलेला उद्योग जसा नि:पक्षपाती इतिहास-

वेत्यांस क्षम्यच स्तुत्यही वाटत आहे तसाच हा महाराजांचा वादविषयक उद्योग वाखाणण्यासारखा आहे. त्यास महत्त्वाकांक्षेच्या किंवा स्वार्थपरतेच्या दोषानें हीनत्व आणणें सर्वथा युक्त नव्हे. महाराजानी हा सकृद्दर्शनीं अन्यायाचा असा भासणारा प्रकार केला नसता तर महाराष्ट्रास स्वराज्य व स्वातंत्र्य याचा अनुभव कदापि घडला नसता सर्व लोकाच्या हितासाठी थोड्याशा लोकांचे तात्कालिक नुकसान करण्याचा प्रसंग आला तर तो सर्वथा निषिद्ध नव्हे, हे आज कोणाचाहि सांगावयास नको.

## भित्रेपणाचा आरोप.

आता, आणखी एका दोषाविषयी थोडेसें लिहून ह्या प्रकरणाचा पूर्वार्ध संपवूं. तो दोष असा कीं, महाराजानी आपल्या वर्तनक्रमात शौर्यापेक्षा भित्रेपणाच अनेक प्रसगीं प्रकट केला हा भ्याडपणा त्याच्या अगीं नसता तर त्यानीं आपल्या शत्रूशीं विरोध करण्यात जो कपटाचा व युक्तिप्रयुक्तीचा अवलब निरनिराळ्या प्रसगी केला तो ते न करिते खरा शूर पुरुष असतो तो शत्रूशीं समारासमोर युद्ध करून विजय संपादीत असतो, लपूनछपून व नाना कावे करून त्यास हतवीर्य करण्याच्या निंद्य कर्मांचा तो अवलंब करीत नसतो. ह्या दृष्टीनें पाहतां महाराजाची खऱ्या शूर पुरुषात गणना करणें युक्त नव्हे, असा कित्येकांचा अभिप्राय आहे हा अगदीच निराधार व हास्यास्पद आहे असें त्याचे चरित्र लक्षपूर्वक वाचणारास वाटल्यावाचून राहणार नाहीं आता हें खरें कीं, महाराजास पुष्कळ प्रसगी जी यश प्राप्ति झाली ती शौर्यापेक्षा युक्तिमत्तेच्याच बळावर विशेष झाली. महाराज फारच धूर्त व सावध असत अविचार व नसतें धाडस असें त्यांनी कधीच केलें नाहीं. हरएक प्रसगीं आपलें व शत्रूचें बलाबल पाहून ते वागत. जी गोष्ट थोड्या आयासानें व पदरच्या लोकांचा विनाकारण नाश न होतां होण्यासारखी असे ती ते युक्तिप्रयुक्तीनें साध्य करून घेत असत. रक्तपात होईल तेवढा टाळावा असा त्यांचा नेहमीचा सकल्प असे. ही युक्तिमत्ता त्याच्या अगीं नसती तर त्याचा किंवा मराठ्याचा इतिहास लिहिण्याचा योगच आज आला नसता. शत्रूंच्या प्रबल सेनेपुढें त्याच्या तुटपुंजा लोकांचा कधींच सप्पा उडून गेला असता, व त्यांनी आरंभिलेलें महत्कार्य असिद्ध राहून त्यांची आज बंडेखोरांत व पुंडपाळेगारातच इतिहासकारानी गणना केली असती, व हिंदुपदपादशाहीचे अधिष्ठाते ह्मणून जो त्याचा आज सर्व जगांत

गौरव होत आहे त्याच्या ऐवजी त्याची निंदा मात्र सर्वतोमुख झाली असती. ह्या दृष्टीनें पाहतां महाराजाच्या युक्तिमत्तेस भ्याडपणा ह्मणून त्याची अवहेलना करणारांच्या मूर्खत्वाचा अधिक्षेप करावा तितका थोडाच आहे

येथवर परकीयानी महाराजास जे दोष लाविले आहेत त्यापैकीं बहुतेकाचें विवेचन करून त्यात कितपत तथ्य आहे ते सांगितलें आता आमच्या देशातील कित्येक इतिहासपडितानी त्याच्या कर्तृत्वास अमळ लघुत्व आणणारी अशीं जी काहीं विधानें केलीं आहेत त्याचें दिग्दर्शन करून तीं कितपत यथार्थ आहेत तें पाहणे इष्ट होय

## भागवतधर्माचे साहाय्य.

ह्या इतिहासज्ञाचे पहिले विधान असे आहे कीं, महाराष्ट्रात भागवतधर्माचा सर्वत्र प्रसार होऊन उच्चनीचत्वाचा भाव बराच लोपल्यामुळे निरनिराळ्या जातींच्या लोकाचें ऐक्य सभवले आपण एकाच देवाची लेंकरे असून आपणा सर्वाचा मोक्षमार्ग एकच आहे, यास्तव व्यवहारातहि एकमेकाच्या हितासाठी झटून सर्वाचे कल्याण ज्या गोष्टीत आहे त्याचा पुरस्कार करण्यास एकमताने झटणें उचित होय, असें समंजस लोकास वाटू लागले. ह्या भागवतधर्मास महाराष्ट्रधर्म असे अभिधान रामदासस्वामीनी ठेवून त्याच्या सरक्षणार्थ व सवर्धनार्थ शिवाजीमहाराजास व इतर महाराष्ट्रमंडळास वेळोवेळा बोध केला म्हणूनच हे राष्ट्रोद्धाराचे महत्कार्य शिवाजीमहाराजाच्या व त्याच्या अनुयायी पुरुषाच्या हातून सिद्धीस गेलें ह्या विधानात कितपत तथ्य आहे तें पाहू

पहिला प्रश्न असा कीं, भागवतधर्म शिवाजीमहाराजांच्या काळीं किंवा त्याच्या पूर्वीच्या काळी महाराष्ट्रात सर्वत्र प्रसृत झाला होता काय ? ह्या प्रश्नाचे निश्चयात्मक उत्तर देणें कठीण आहे कारण भागवतधर्मप्रतिपादक अशी जी संतमालिका महिपतीनें वर्णिली आहे तिचा छळ करणारे सनातनधर्माभिमानी कर्मठ ब्राह्मणादि पुरुष त्या काळीं महाराष्ट्रात सर्वत्र होते, त्याप्रमाणेंच पंढरिमाहात्म्य जें ह्या संतमालिकेनें एवढे वाढविलें होते ते सर्वासच मशहूर किंवा मान्य होतें असें सहसा म्हणता येणार नाहीं ह्या सगुणोपासक वेदांतमतवादी सतमडळाचें उपास्य दैवत जो पंढरीचा विठोबा तोच सर्वांस उपासनार्ह वाटत होता असें विधान करणें साहसात्मक होईल. कारण त्या काळी संतमंडळाच्या ह्या पंथाखेरीज आणखी अनेक पथ महाराष्ट्रांत प्रचलित होते. दुसरें असें कीं, संतमंडळाचा ह्या

भक्तिमार्ग सनातन हिंदुधर्मास सर्वथा असमत होता असे नाहीं तेव्हा तो धर्मक्रांतिरूप होता असें मानणे उचित नव्हे त्या पथाचा विशेष पुरस्कार ज्ञानदेवादि संतमंडळाने केला इतकेंच तसेच त्या पंथामुळे जातिभेदादि भेदभाव विनष्ट होऊन महाराष्ट्रीयाचा ऐक्यभाव संभवला हे ह्मणणेहि युक्त नव्हे कारण तेव्हाची वस्तुस्थिति पाहता ह्या म्हणण्यास मुळीच आधार नाहीं संतमंडळीने व पंढरपूरच्या इतर वारकऱ्यानी ह्या पवित्र क्षेत्री गेल्यावर जातिभेदाविषयी थोडीशी बेपरवाई दर्शविली असली तरी ते स्वग्रामी परत आल्यावर ती वृत्ति कायम ठेवून तदनुरूप व्यवहारात वर्तन करीत असें कोण म्हणेल ? सनातनधर्मविहित उच्चनीचत्वाचा भाव अन्नव्यवहार व लग्नव्यवहार यासंबधाने ते सभोवतालील कर्मठ लोकाप्रमाणेच पाळीत असत ह्यावरून पाहता संतमंडळाच्या भागवतधर्मामुळे त्या काळच्या समाजस्थितींत ह्मणजे फारसें रूपांतर झाले होते असे सहसा म्हणवत नाहीं हा पंथ अस्तित्वात आला नसता तर शिवाजीमहाराजास ज्या पुरुषानीं स्वराज्यसाधनाच्या कामी साहाय्य केले त्यास ते करण्याची बुद्धि झाली नसती असे कोण ह्मणेल ? ह्या पुरुषापैकी कोण बरें पंढरीचे वारकरी होते, किंवा भागवतधर्माचे मोठे पुरस्कर्ते होते ? असा काहीं पुरावा ह्या इतिहासज्ञानी मिळविलेला आहे काय ? बखरकार तर अशा प्रकारचा काहीएक उल्लेख करीत नाहींत प्रत्यक्ष शिवाजीमहाराज व त्याचे वाडवडील सांब व भवानी याचे उपासक असून हरएक महत्संकटाच्या प्रसंगी महाराजानी भवानीचा कौल मिळविण्याचा प्रयत्न केला होता ह्या त्याच्या क्रमावरून हे स्पष्ट होते की, भागवतधर्मावर ह्मणजे त्याची अढळ श्रद्धा होती असें वाटत नाही, तर ते आमरण देवीचे उपासकच होते शेवटीशेवटी रामदासस्वामीचे दर्शन घडून व बोधामृत श्रवण करून त्याच्याठायी थोडेसे उपासनांतर झाले होते असे वाटते तरी खुद्द समर्थानी त्यास त्याचे उपास्य दैवत जे सांब त्याच्या प्रसादाप्रीत्यर्थ कोटि पार्थिवलिंगे करण्याविषयी आग्रहपूर्वक सांगितले होते, आणि हे गुरुवचन त्या सच्छिष्याने पाळलें असावे यात शंका नाहीं. ह्यावरून असें ह्मणावे लागते कीं, महाराज मूळचे कट्टे शैवमताभिमानी असून पुढे रामदासस्वामीच्या संघटनाने त्याची वृत्ति द्विधा झाली असावी परंतु हे संघटन घडल्यावर लवकरच त्याचें देहावसान झाल्यामुळें तिचें पर्यवसान काय झालें असते हे आज खात्रीने सांगता येत नाहीं आणखी असें कीं, महाराज स्वत देवी–उपासक शैव होते त्याप्रमाणेच मावळातील घाटमाथ्यावरील व कोंकणातील मराठे, शिलेदार, हेटकरी व बारगीर बहुतेक

शैवच होते, व त्यांस जेजुरीचा खंडोबा व तुळजापूरची भवानी हींच दैवतें विशेष उपासनार्ह वाटत. ह्या दैवतांच्या प्रतिमा महाराष्ट्रात गावोगाव अनेक नावांनीं स्थापन केल्या असून त्याचा प्रसाद साधण्यातच त्यास इतिकर्तव्यता वाटे, हें त्याच्या अनेक धर्मविधींवरून व चालींवरून व्यक्त होते उदाहरणार्थ, विजया-दशमीचा सण मराठे लोक किती उत्साहाने व थाटाने पाळतात हें सर्वास विदित आहे ह्यावरून हे सिद्ध होतें कीं, भागवतधर्माच्या उदार मताचा सुपरिणाम ह्या जनसमाजावर होऊन ते शिवाजीमहाराजाच्या निशाणास येऊन मिळाले असें ह्मणणें प्रमादजनक आहे आता महाराजास साहाय्य करणारे ब्राह्मण व प्रभु हे तरी भागवतपथानुयायी वैष्णव होते ह्मणूनच किंवा भागवत-पंथाचा त्यांच्यावर परिणाम झाला होता ह्मणूनच ते महाराजाच्या भजनीं लागले असें ह्मणण्यास काय आधार आहे ? त्याचे साहाय्यकर्ते ब्राह्मण मुत्सद्दी व ब्राह्मण वीर तर पक्के कर्मठ होते, आणि त्याच्या पदरचे कायस्थ प्रभु वीर व अत्यंत विश्वासू कारभारी सगळे साब व भवानी हींच आपलीं उपास्य दैवतें मानीत

## भागवतधर्माचा वास्तविक परिणाम.

तेव्हा तात्पर्य काय कीं, महाराजानीं जो एवढा लोकसंग्रह केला व त्याच्या-कडून जें हें अपूर्व देशकार्य करविलें त्याच्या मुळाशीं भागवतधर्मप्रसाररूप कारण नसून केवळ महाराजांच्या अगच्या अलौकिक करामतीचेंच तें फळ होय. त्याचें थोडेंसें श्रेय ह्या भागवतधर्मास देणें ह्मणजे वस्तुस्थितीचा विपर्यास करणें होय असें मोठ्या कष्टानें ह्मणावें लागतें. खरें ह्मटलें असता संतमंडळीनें प्रचलित केलेल्या निवृत्तिमार्गामुळें महाराष्ट्रातील प्रवृत्तिमार्ग तीनशें वर्षे बहुतेक लोपल्यासारखा झाला होता असें ह्मणण्यास हरकत नाहीं राम व रहिम एक ह्मणणारे, शांत, विरक्त, अहंताशून्य, उदासीन व परमार्थसाधनपर भगवद्भक्त संसार क्षणभंगुर मानून त्यातून मुक्त होण्याचीच उत्कट इच्छा अहर्निश करीत असत. त्यांला ऐहिक सुखदु खांचें मुळींच कांहीं वाटत नसे, व सर्व जनांस ह्याच उपदेश ते कंठरवानें करीत असत. त्याच्या हातून यवननिर्दालनाचा उपदेश होणें मुळींच शक्य नसे; आणि हा असा उपदेश रामदासखेरीजकरून अन्य कोणाहि साधूच्या ग्रंथात यत्किंचितूहि सांपडेल असें वाटत नाहीं. हा ऐहिक पसारा जलतरंगवत् मानणाऱ्या साधूंस हा असला विचार कोठून सुच-

णार? ही वैराग्यवृत्ति किंवा निवृत्तिपरता आमच्या लोकाच्या हाडींमासीं खिळली असल्यामुळें मुख्यत यवनाचा क्लेशप्रद अमल. आमच्या महाराष्ट्रांत सतत तीनशें वर्षे सारखा चालू असता त्याला प्रतिकार करण्यास कोणीहि मराठा सरदार किवा ब्राह्मण मुत्सद्दी पुढें सरसावला नाहीं यवनानीं तोंडावर टाकलेला लहानमोठा भाकरीचा तुकडा चघळीत बसण्यातच त्याला सौख्य वाटलें भागवतधर्माचा दुंदुभि त्याच्या कर्णविवरात सारखा दुमदुमत होता पण त्यामुळें त्याच्या ठायी स्वराज्यसाधनबुद्धि जागृत न होता उलट समाधानवृत्ति व उदासवृत्ति मात्र नि सीम बाणली होती असें दिसते पुढे शिवाजीमहाराज स्वराज्यसपादनाच्या उद्योगास प्रवृत्त झाले असता त्याचा हिरमोड करणारे व उत्साहभग करणारे मराठे सरदार व ब्राह्मण मुत्सद्दी किती होते हें इतिहासज्ञांस सागावयास नको फार काय, पण वादविषयक विधान करणारे इतिहासपडित अशा एका सरदाराचें किवा मुत्सद्याचे नाव सागतील काय कीं, जो भागवतधर्ममूलक ऐक्यभावजागृतीस्तव शिवाजीमहाराजास आपण होऊन येऊन मिळाला होता? असा प्रकार झाला असता तर प्रारंभीं त्यास जो शुद्ध नीत्यभिमानीं जनाच्या मतें अमळ अनन्वित प्रकार कित्येक मराठे व ब्राह्मण सरदाराच्या सबंधानें करावा लागला त्याचें प्रयोजनच मुळी राहतेंना. मोरोपंत पिगळे, बाळाजी सोनदेव, दत्ताजीपत आदिकरून ब्राह्मण मुत्सद्दी, बाळाजी आवजी, बाजीप्रभु देशपाडे, मुरारबाजी इत्यादि स्वामिभक्त प्रभु गृहस्थ, व तानाजी मालुसरे, प्रतापराव गुजर व हंबीरराव मोहिते याच्यासारखे प्रतापशाली वीर महाराजांपाशी आरंभीं केवळ स्वोत्कर्षलालसेनेंच जमा झाले असून, पुढें सूर्यकमलन्यायानें त्याच्या ठायींच्या उज्ज्वल गुणाचा विकास व परिपाक महाराजाच्या अगच्या अलौकिक तेजानेंच केवळ झाला असें आह्मांस वाटतें. ह्या संसिद्धीस हें वास्तविक व समर्पक कारण पुरेसें असता तिचें यश आपल्या संसारसुखबहिष्कृत साधुमंडळाच्या निवृत्तिमार्गास अशत. तरी देणें म्हणजे आमच्या चरित्रनायकाच्या वास्तविक योग्यतेस लघुत्व आणणें होय असें आह्मी समजतों.

## स्वधर्माभिमान.

आतां येथे कोणी असा प्रश्न करील कीं, महाराजांनीं यवनांची सत्ता भरतभूमींतून समूळ नाहींशी करण्याचा जो सत्संकल्प केला त्याच्या मुळाशीं स्वधर्मा-

भिमानरूप वृत्ति नव्हती काय ? ह्या प्रश्नाचें होय असें प्रांजलपणे उत्तर देणें रास्त आहे महाराजाच्या ठायीं स्वधर्माभिमानाचे बीजारोपण अल्प वयापासूनच झालें असून त्याची वृत्ति आमरण धर्मशील होती ह्या वृत्तीस्तवच आरंभी त्याच्या ठायीं यवनद्वेष उद्भवला असावा असेंहि ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं परंतु ह्या धर्माभिमानाबरोबरच स्वातंत्र्यप्रीतिहि त्याच्या हृदयात उद्भूत होऊन उत्तरोत्तर प्रबल होत गेली होती ह्या उभय वृत्तीच्या क्षोभामुळेच त्याच्या ठायीं पुढील कर्तृत्वसंकल्प दृढ झाला, व जगास थक्क करून सोडणारे पराक्रम त्याच्या हातून घडले परंतु हा स्वधर्माभिमान अमर्याद स्वातंत्र्यप्रीतीवाचून केवळ पंगू होता हे मात्र विसरता कामा नये त्याप्रमाणेच ह्या उभय वृत्तीस अप्रतिम कर्तृत्वशक्तीचें साहाय्य नसते तर त्या असून नसून सारख्याच होत्या ह्या तिहींचा संयोग व प्रकर्ष महाराजाच्या ठायीं झाला ह्मणूनच त्याचे चरित्र आज जगदुदाहरक झाले आहे आता हा स्वधर्माभिमान भागवतधर्मप्रसारामुळेच केवळ उद्भूत झाला असें ह्मणता येणार नाहीं कारण हा संतमंडळाचा पंथ अत्यंत उदार असून त्यात अभिमानरूप हृदयवृत्तीस बिलकुल थारा नव्हता राम व रहिम एक ह्मणणाऱ्या साधुसंताच्या भक्तिपंथात असल्या मनोवृत्तीस मुळीं अवकाशच नव्हता शिवाय महाराज ह्या वैष्णवपंथाचे मोठेसे पुरस्कर्ते होते असें विधान करावयास काहींएक पुरावा नाहीं त्याची पूर्ण श्रद्धा सनातन धर्मावरच अगदी दृढ होती, आणि ह्मणूनच त्याच्या ठायीं देवभोळेपणा व भवानीविषयींची भक्ति हीं आमरण कायम राहिली होती त्यानी आपल्या साहाय्यकारी मंडळीत स्वराज्यप्रीतीबरोबरच स्वधर्माभिमानाची जागृति केली ती ह्या वैष्णवपंथाच्या साहाय्यानें बिलकुल केली नाहीं, तर गोब्राह्मणास आपलीं दैवतें समजावयास लावणाऱ्या, जातिभेद अवश्य पाळला पाहिजे ह्मणणाऱ्या, प्रतिमापूजेचा पुरस्कार करणाऱ्या व सर्व कर्मकांडाचा उपयोग प्रतिपादन करणाऱ्या सनातनधर्माचा तो अभिमान होता हे मुळीं विसरता कामा नये महाराजाचे व त्याच्या बहुतेक अनुयायिजनाचे आचरण ह्या धर्मास अनुसरूनच होते हे निर्विवाद आहे, कारण ह्याच्याविरुद्ध पुरावा कोणत्याहि बखरींत यत्किंचित् सापडत नाही

महाराजाच्या कर्तृत्वाच्या व स्वातंत्र्यसंपादनाच्या अचाट उद्योगाच्या योगाने महाराष्ट्रातील जनसमाजास स्वधर्माचारानुसार स्ववर्तन ठेवण्यास यवनाकडून प्रत्यवाय होण्याचे बंद झालें, व त्यामुळे एके प्रकारें धर्मजागृति चोहो-

कडे पुनरपि झाली असें ह्मणण्यास चिंता नाहीं परंतु ती केवळ सनातन धर्माच्या बाबतीतच होय. तीस भागवतधर्माचें वळण लावण्याचा उद्देश त्याच्या मनांत कधी आलाहि नसावा, किंबहुना त्याचें महत्त्व त्याच्या मनांत भरलें नसावें. त्याच्या काळी त्याच्या आश्रयास असलेले शास्त्री व पंडित यांच्या ठायीं सनातनधर्मविहित कर्मकांडाचा अभिमान किती प्रबळ वसत होता हें महा-राजांनी आपणास राज्याभिषेक करून घेण्याचें मनांत आणिलें तेव्हां चांगला दृग्गोचर झाला. ते त्यांस शूद्र मानून क्षत्रियोचित राज्याभिषेकास ते पात्र नाहींत असा आग्रह धरून बसले. त्या समयी गागाभट्टासारखा उत्तरेकडचा सर्वशास्त्र-पारंगत ब्राह्मण त्या शास्त्र्यांच्या नेत्रांत अंजन घालावयास नसता, व बाळाजी आवजीसारखा स्वामिकार्यदक्ष पुरुष नसता तर राज्याभिषेकसमारंभाचा अपूर्व विधि महाराष्ट्रास स्वातंत्र्यानुभव करून देणाऱ्या त्या महापराक्रमी राजर्षीला कदापि साध्य झाला नसता. त्या काळी कर्मठ ब्राह्मणांच्या ठायी जातिभेदाचें बंड किती प्रखर वसत होतें हें कायस्थांच्या बाबतीत त्यांनी दाखविलेला अति नीचतेचा तिरस्कार व अवगणना यावरून स्पष्ट होतें असो. आतां, प्रो सरकार ह्मणतात कीं, महाराष्ट्रांत जातिभेदमूलक वैरभाव प्रखर असल्याकारणानें महा-राष्ट्रीयांनी बहुत कष्टांनी मिळविलेलें स्वराज्य लौकरच अंत पावलें. हें त्यांचें ह्मणणें कांही खोटें नाहीं. ते आणखी ह्मणतात 'जातिमत्सर प्रत्यक्ष शिवाजी-महाराजाच्या वेळीहि प्रखर स्वरूपानें वसत होता महाराष्ट्रांतील लोकांचें शिवाजी-महाराजाच्या वेळीं जें एकीकरण झालें तें केवळ कृत्रिम होतें. त्यांत कायम-पणाचें तत्त्व मुळीं नव्हतें. तें केवळ तात्पुरतें असून क्षणभंगुर होतें. त्या काळीं शिवाजीसारखा विलक्षण कर्तबगार राज्यसंस्थापक व शास्ता निर्माण झाला ह्मणून तें एकीकरण अल्प काळ टिकलें. परंतु असे अलौकिक पुरुष महाराष्ट्रांत आणखी निर्माण न झाल्यामुळें हें एकीकरण लौकरच लय पावलें' ह्यावरून प्रो. सरकार शिवाजीमहाराजाच्या स्वराज्यसंस्थापनारूप महाकार्यांत असें वैगुण्य दाखवितात कीं, त्यांनी लोकांचें वास्तविक एकीकरण करण्याचा व लोकांची शिक्षणप्रसारादिकेंकरून सुधारणा करण्याचा कांहींच उद्योग केला नाहीं. परंतु त्यांना स्वराज्यस्थापना करून स्वत्व कायम राखण्यासाठीं प्रचंड शत्रूशीं आमरण एकसारखें झगडावें लागल्यामुळें ह्या इष्ट गोष्टी करितां आल्या नाहींत, हें त्यांच्या लक्षांत कसें आलें नाहीं नकळे.

आतां येथें कोणी अशी शंका घेईल कीं, महाराजांच्या कर्तृत्वाचा व्याप ज्या प्रांतांत विशेषत होता त्यात तुकारामादि वैष्णव भक्त पुष्कळ असून त्यापैकीं कांहीं जणाचें चरित्र महाराजाच्या डोळ्यांपुढे घडत होतें, व प्रत्यक्ष तुकाराम-बावावर तर त्याची फारच निष्ठा होती असें असता त्याच्या मनावर ह्या भक्तिपंथाचा मुळींच कांहीं परिणाम झाला नाहीं काय ? ह्या शंकेचें समाधान अर्थात् असें कीं, तुकारामादि साधुसताच्या उज्ज्वल आचरणामुळे ते त्यास परम वंद्य वाटत, आणि त्याची बोधवाणी श्रवण करण्यास व त्याचा समागम साधण्यास ते सर्वदा उत्सुक असत हे निर्विवाद आहे परंतु ह्या साधूंला सनातनधर्माविरुद्ध कांहीं सांगावयाचें आहे किंवा तद्विरुद्ध त्याचे आचरण आहे असें महाराजाच्या कधी ध्यानीमनींहि आले नाहीं, व त्या काळच्या संतमंडळासहि आपल्या पथात सनातनधर्माहून विशेष कांहीं आहे असें कधींहि वाटलें नाहीं ही भेददृष्टि आधुनिक पडिताची आहे [१] तिचा आरोप त्या काळच्या साध्या, सरळ व भाविक लोकावर करणें बरोबर नाहीं फार काय पण साप्रत काळी हा वैष्णवपंथ अस्तित्वात असून महाराष्ट्रातील बहुतेक गांवातून पंढरीचे वारकरी आढळतात, व लाखो लोक पंढरीच्या यात्रेस जातात, परतु त्यात कांहीं विशेष आहे असें एकंदर लोकास वाटत नाहीं, व

---

१ महाराष्ट्रात निर्माण झालेल्या साधुसतानी त्या काळच्या लोकास आपल्या प्रासादिक वाणीने जो सद्बोध केला, आणि ह्या त्याच्या बोधामुळे जी धर्मक्राति झाली त्याचे साहाय्य शिवाजीमहाराजानी घडवून आणलेल्या राज्यक्रातीस प्रमुखत्वे करून झाले, असा सिद्धात न्यायमूर्ति रानडे यानी प्रथम स्पष्टपणे आपल्या ग्रथात प्रणीत केला हा अर्थात् सोळाव्या शतकात युरोपात पचड धर्मक्रांति झाल्यावर राज्यसुधारणा व राज्यक्राति उद्भवल्या ह्या गोष्टींवर लक्ष ठेवून आमच्या ह्या पडितांनी प्रवृत्त केला आहे कारण शिवाजीमहाराज निर्माण होण्यापूर्वी व त्याच्या हयातींत महाराष्ट्रांत कर्मकांडाचा अव्हेर करून भक्तिमार्गाचे माहात्म्य प्रतिपादन करणारे साधु निर्माण झाले होते केवळ ह्या एवढ्या साम्यावरून सदरील सिद्धात प्रणीत करणें बरोबर नाहीं रा. राजवाडे हे जरी असें ह्मणतात की, शिवाजीमहाराजांना स्वराज्य स्थापनेची स्फूर्ति रामदासस्वामीकडूनच मुख्यत प्राप्त झाली, तरी न्यायमूर्ति रानडे यांचा सिद्धांत जो कीं, साधुसंताच्या बोधामुळें पुरातन धर्मात क्रांति होऊन भागवतधर्म प्रवृत्त झाला, तो केवळ निराधार आहे असे ते प्रतिपादन करितात. ते ह्मणतात कीं, त्या काळचे कोणीहि सत पूर्वकाळापासून आराध्य मानलेल्या देवतास अपूज्य मानीत नसत, किंवा पुरातन धर्माचा अव्हेर करीत नसत. जातिभेदनिषेध, मूर्तिपूजानिषेध वगैरे गोष्टींचा ते पुरस्कार करीत नसत.

अशा वारकरी लोकांचा कर्मठपणा व जात्यभिमान विगलित झाला आहे असें अनुभवास येत नाहीं.

## रामदासस्वामींकडून स्फूर्ति मिळाली नाहीं.

ह्या एकंदर वादाचा निष्कर्ष मिळून एवढाच कीं, प्रत्यक्ष महाराज किंवा त्यांस साहाय्य करणारे मुत्सद्दी व वीर भागवतधर्माच्या उदार तत्त्वास्तव स्वराज्य-स्थापनेस प्रवृत्त झाले, एरवीं होते ना, हे ह्मणणें बरोबर नाहीं [1] आता वादविषयक विधानाच्या उत्तरार्धात रामदासस्वामीस एतद्विषयक श्रेय देण्याचा जो प्रयत्न केला आहे त्यात कितपत तथ्य आहे ते पाहूं प्रतिपक्षाचे पहिलें विधान असें आहे कीं, रामदासस्वामीनी ह्या भागवतधर्मास महाराष्ट्रधर्म असें नाव देऊन त्याचें संरक्षण व सवर्धन करण्याविषयी शिवाजीमहाराजास आमरण बोध केला म्हणून त्याच्या हातून एवढा अचाट उद्योग झाला, एरवी होता ना ह्या ह्मणण्यात काहींएक जीव नाहीं, हे एकुणतिसाव्या भागाच्या शेवटी सप्रमाण दाखवून दिलें आहे त्याची येथे पुनरुक्ति नको समर्थानी महाराजास स १६४९ त अनुग्रह देऊन त्याचें गुरुत्व स्वीकारलें असा जो जनप्रवाद समर्थाच्या चरित्र-लेखावरून, व त्याचा आधार सत्यवत् मानून चिटणीस व शिवदिग्विजयकार यानी केलेल्या एतद्विषयक उल्लेखावरून सर्वत्र प्रचलित झाला आहे तो सप्रमाण मानून आमच्या इतिहासपंडितानी हे विधान केले आहे. परतु ही रामदासाच्या भेटीची व अनुग्रहाची तारीख अगदी खोटी ठरून पुढें तेवीसचोवीस वर्षानी त्याची प्रथम भेट झाल्याचा अस्सल पुरावा हल्ली महाराष्ट्रीयाच्या अवलोकनात आला आहे त्यामुळें हा सर्व विभु निखालस ढासळून जाऊन महाराजाच्या यशाचे अशभाक् रामदासस्वामी बिलकुल ठरत नाहींत वास्तविक पाहता हा एवढा यशाचा वांटा रामदासस्वामीस देऊं पाहणें सदरील पुराव्याच्या अभावीं देखील युक्त. नव्हतें. महाराजानीं स्वराज्यसाधनाचा जो सत्संकल्प केला तो स.१६४९ सालापूर्वी निदान पांचसहा वर्षे तरी केला होता हें निर्विवाद आहे.

---

१ ह्या सदरील विवेचनावरून भागवतधर्म सनातन धर्माहून उच्च प्रतीचा नव्हे असें आमचें मत आहे असें मात्र कोणींहि समजू नये. त्याचें अनुसरण सुसगतपणे करणाऱ्याच्या ठायी कर्मठाच्यापेक्षा शतपट जास्त औदार्य व समता ही वसण्याचा सभव आहे हें निर्विवाद आहे. प्रकृत वाद जो आह्मीं केला आहे तो त्या पथापासून तदभिमानी पडित ह्मणतात तितकें राजकीय पुनरुज्जीवनास साहाय्य झालें होतें किंवा कसें तें पाहावें ह्यासाठीच होय.

त्याप्रमाणेच रामदासस्वामींनी महाराजास पाठविलेल्या प्रथम पत्रातच जो त्याचा स्तुतिपाठ केला आहे त्यास ते स १६४९ त किंवा त्यानंतर पंचवीस वर्षे तरी पात्र झाले होते असें सहसा ह्मणवत नाहीं दुसरे असे की, वाई, वऱ्हाड, सातारा, परळी वगैरे ठाणीं महाराजांनी स १६७२–७३ सालापूर्वी जिंकली नव्हती तेव्हा त्या ठिकाणी ह्या गुरुशिष्याच्या उभा भेटी वगैरे झाल्याचे समर्थांच्या बखरीत लिहिले आहे त्या कशा संभवल्या याचा ह्या इतिहासपंडितांनी अमळ विचार करावयास हवा होता तसेच ज्या दासबोधाच्या बळकट पुराव्यावरून ह विधान त्यांनी इतकें निक्षून केलें आहे त्याचे तरी त्यांनी सूक्ष्म दृष्टीने साद्यंत अध्ययन करावयाचे होते असा काहींच विचार न करिता महाराजास समर्थांकडून स्वराज्यसाधन व स्वधर्मरक्षण करण्याच्या कामी स्फूर्ति व उपदेश प्राप्त झाला असें विधान त्यांनी बेधडक करून ठेविलें आहे, याचें नवल वाटतें. प्रो रोलिंसन यांनी अलीकडे शिवाजी महाराजांचे एक लहानसे चरित्र इंग्रजी भाषेत लिहिलें आहे, आणि मि किंकेड यानीं मराठ्यांचा इतिहास लिहिण्याचा संकल्प करून त्याचा पहिला भाग प्रसिद्ध केला आहे, त्यात महाराजांचे चरित्र दिलें आहे हे दोन्ही ग्रंथ त्या आंग्ल लेखकांनी महाराष्ट्रीय इतिहासज्ञांच्या साहाय्यानें लिहिले असून त्यातसुद्धा रामदास व शिवाजीमहाराज यांच्या संबंधाचा निराधार प्रवाद नमूद केला आहे. याचा फारच चमत्कार वाटतो प्रकृत चरित्रग्रंथ तेरा वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला असून त्यात ह्या प्रवादाचें निराधारत्व आम्ही स्पष्टपणें व सप्रमाण स्थापित केलें असून त्या संबंधाचा वाद तेव्हापासून मधूनमधून होत आला आहे असें असता आम्हीं दिलेली प्रमाणे खोटी ठरविण्याचा काहींच प्रयत्न न करिता सदरील आंग्ल लेखकांना स्वग्रंथात खोटी विधाने करावयास लावणे हा मोठाच सत्यापलाप होय अलीकडे प्रो भाटे यांनी आमच्या पुराव्याचे स्वतंत्र रीतीने समर्थन केलें आहे तरी देखील कित्येक इतिहाससंशोधक ह्या बाबतींत अद्यापि साशंकच आहेत प्रो सरकार ह्या प्रवादावर फारसा भरंवसा ठेवीत नाहींत मि किंकेड व रा ब पारसनीस यांना हनुमंतस्वामीची बखर व तींत वर्णिलेले चमत्कार खरे वाटतात असें दिसतें. कारण त्यांनी वर निर्दिष्ट केलेल्या इतिहासग्रंथात रामदासानें केलेल्या काहीं चमत्काराचा उल्लेख मोठ्या आवडीनें केला आहे ! असल्या भाकडकथा दिल्यानें आपल्या ग्रंथाची इतिहास ह्या दृष्टीने विश्वसनीयता कमी होते हे त्यांच्या लक्ष्यात कसें आलें नाहीं ?

ह्या गुरुशिष्यांची प्रथम भेट स. १६७२ त झाली हे जर आता निश्चित झाले आहे तर स्वराज्यसंपादनाची बहुतेक खटपट आटोपल्यावर समर्थांची उपदेशवाणी महाराजांस श्रवण करण्याचा योग आला होता हे उघड आहे. जर कोणी येथे असे म्हणेल की, समर्थांचे प्रत्यक्ष दर्शन घडले नसलें तरी त्यांच्या शिष्यांच्या द्वारे हा बोध त्यास प्राप्त झाला असावा, तर तेंहि निराधार आहे. कारण महाराजांस समर्थांविषयींची माहिती एकदोन वेळाच काय ती झाली असून तिचे विस्मरण त्यास पुढे प्रथम भेटीपर्यंत झाल्याचे समर्थांच्या बखरीतच लिहिले आहे. त्यावरून 'राजकीय पुनरुज्जीवनार्थ' रामदासस्वामींनी जो प्रयत्न केला असें म्हणतात त्यास हा वेळ पावेतो मुळी आरंभच झाला नव्हता असें म्हणावे लागते,

---

१ रा. वि. का. राजवाडे 'श्रीसरस्वतीमंदिरा'च्या सहाव्या वर्षाच्या पहिल्या अंकात (चैत्र शके १८२८) येणेप्रमाणे विधान करितात—"शके १६०० (इ. स. १६७८) मध्ये सर्व महाराष्ट्रभर रामदासाची मते पाळणारे व कृति करणारे सुमार १२०० रामदासी काम करीत होते. शके १६०० त १२०० लोक एकाच मताचा प्रसार व एकाच कृतीची सिद्धि करणार पाहिले म्हणजे समर्थांनी महाराष्ट्राच्या राजकीय पुनरुज्जीवनार्थ केवढे मोठे यंत्र निर्मिले होते त्याचा अदमास होतो. श. १६०० त महाराष्ट्र समर्थांच्या विचाराने व कृतीने सर्वस्वी भारून गेले होते, असेच म्हणावे लागते" (पृ. ३३) ह्या विधानाचे कारण काय आहे ते सामान्य वाचकास सांगावयास नकोच. त्याचा अर्थ हाच की, सर्व राजकीय पुनरुज्जीवनाचे श्रेय समर्थांस द्यावयाचे, शिवाजीमहाराज केवळ निमित्तमात्र होते, पुढे त्यांच्या हातून असे फारसे काहीच झाले नाही. स. १६७२-७३ पर्यंत महाराजांनी केलेला खटाटोप हे समर्थनिर्मित यंत्र अस्तित्वात येईपर्यंत केवळ व्यर्थ होता ना? त्या खटाटोपामुळे स्वराज्य-विषयक अभिमान व तत्प्रीत्यर्थ स्वप्राणाची समयी आहुति देण्यासहि सिद्ध होण्याची बुद्धि महाराजांच्या पदरच्या लोकांत उद्भवली नव्हती ना? एकंदरीत ह्या इतिहाससंशोधकाची सत्यनिष्ठा प्रशंसनीय समजावयाची! ह्या इतिहासपंडिताच्या सदरील विधानाच्या आधारावर दुसऱ्या एका रामदासभक्तास उकळी फुटून त्याने श्रीसयाजी-विजयाच्या ता. २४ नवंबर स. १९०६ च्या अंकात 'रामदासी संप्रदाय' ह्या मथळ्या-खाली एक लेख लिहून बरेच अकांडतांडव केले आहे. हा सर्व प्रकार पाहून त्यांच्या रामदासभक्तीस केवढा ऊत आला आहे व त्याबरोबर सत्यापलाप करून महाराजांस लघुत्व आणण्याची त्यांची धडपट कशी चालू आहे हे उघड होते. रा. राजवाडे आणखी असे म्हणतात की, रामदासस्वामींचे मठ शिवाजी महाराजांच्या राज्यात किंबहुना दक्षिणेस तंजावरापर्यंत स्थापित झालेले आढळतात. ह्या गोष्टीवरून रामदासीपंथाच्या प्रसाराबरोबर शिवाजीमहाराजांचा राज्यविस्तार झाला असे मानण्यापेक्षा महाराजांची सत्ता जिकडेजिकडे स्थापित झाली तिकडेतिकडे समर्थांच्या शिष्यांस मठ स्थापण्याचें उत्तेजन व सवड मिळाली, असे म्हणणें विशेष सयुक्तिक

आणि पुढेंहि तो कितपत चालू झाला हें समर्थांच्या चरित्रलेखांवरून किंवा महाराजाच्या बखरींवरून कांहींएक कळून येत नाहीं इतिहासाकडे डोळेझांक करून कल्पनासृष्टीत रममाण व्हावयाचें असेल व स्वाभिप्रेत मताचें कसें तरी प्रणयन करावयाचें असेल तर हवें ते विधान बेलाशक ठोकून द्यावे पण तें मोठ्या शोधकपणाच्या बडेजावाखालीं खपलें जावे, हें आमच्या देशाचें मोठेंच दुर्भाग्य होय हा एवढा ऊहापोह करण्याचा हेतु तरी एवढाच आहे कीं, वास्तविक सत्य असेल त्याचें निरूपण करून ज्याची जितकी खरी योग्यता असेल तितकी नि पक्षपातबुद्धीने जगास विदित करावी

## भागवतधर्म व महाराष्ट्रधर्म.

आता शेवटी वादविषयक विधानातील एका गौण मुद्याचा येथे विचार करू. तो मुद्दा असा कीं, ह्या भागवतधर्मास रामदासस्वामीनीं महाराष्ट्रधर्म अशी संज्ञा दिली होती, व त्याचाच प्रसार त्यानें स्वबोधाच्या द्वारें सर्वत्र केल्यामुळे महाराष्ट्रीयाच्या ठायीं स्वदेशाभिमानाची जागृति झाली परंतु येथे असा प्रश्न उद्भवतो कीं, ह्या विठ्ठलभक्त वैष्णवाचा पंथ रामदासस्वामीस सर्वतोपरी मान्य होता कीं काय ? दासबोधाचें सूक्ष्म रीत्या अवलोकन केले असता तो रचणाऱ्याचा पथ कांहींसा निराळाच होता, आणि हा रामदासी पंथ वैष्णवपंथाहून निराळा असा महाराष्ट्रात त्या काळी हळूहळू पसरत चालला होता ह्या पंथाचे लोक पंढरीच्या वारीस फारसे जात नसत. खुद्द रामदासस्वामीस मोठ्या आग्रहानें एक वेळ पंढरीस नेले असता तेथे कोणता अद्भुत चमत्कार घडला ते त्यांचें चरित्र वाचणारास विदित आहेच. असो. तर 'सताळ्या'चा हा वैष्णवपंथ रामदासी पंथाहून अमळ भिन्न असून त्याची सनातनधर्मावरच विशेष भिस्त होती

---

दिसते रा. सरदेसाई तर आपल्या रियासतीत असें स्पष्ट विधान करितात कीं, " शिवाजीच्या राज्योपक्रमात आरंभी रामदासाचें अग बिलकुल नव्हते. शिवाजीस राज्यस्थापनेची स्फूर्ति रामदासापासून झालेली नाहीं शिवाजीचा उपक्रम पाहून रामदासाच्या मनात नवीन प्रकाश पडला ..व त्यास नवीन दिशा दिसूं लागली, ती राजकारणाची होय." ( म रि. पृ. १११ ) असें विधान करूनहि ते म्हणतात कीं, ह्या गुरुशिष्यांची भेट प्रथम १६४९ त झाली ! पण अलीकडे प्रो. भाटे यांचें "रामदास व सज्जनगड" ह्या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध झाल्यापासून त्यांचें हें शेवटलें मत बदलल्याचें त्यांनीं जाहीर केलें आहे. प्रो. भाटे यानीं दिलेला बहुतेक पुरावा आम्हीं १९०७ सालीं ह्या ग्रंथांत नमूद केला होता तो त्यांस त्या वेळीं खरा वाटला नव्हता !

असें वाटतें. यास्तव ह्या वैष्णवपंथास त्यानीं महाराष्ट्रधर्म हें नाव दिलें असावे असें वाटत नाहीं. एक विद्वान् गृहस्थ ह्या शब्दाचा अर्थ महाराष्ट्राचें कर्तव्य असा करितो, त्यात तर काहींच जीव नाहीं. महाराष्ट्राचें कर्तव्य ह्मणून काहीं निराळाच एकादा वर्तनक्रम होता असे ह्मणवत नाहीं. ह्या शब्दाचा साधा सरळ अर्थ टाकून हे पंडित उगेच आडरानात का शिरले नकळे प्रस्तुत लेखकास ह्या सामासिक पदाचा अर्थ महाराष्ट्रातील लोकाचा धर्म असा असावा असें वाटते महाराजास पाठविलेल्या स्तुतिपर पत्रात व पुढे सभाजीस पाठविलेल्या बोधपर पत्रात जो हा शब्द योजिला आहे त्याचा दुसरा काहींएक अर्थ होणे सभवत नाहीं महाराजानी त्या काळी महाराष्ट्राचा बराच भाग काबीज करून तेथील यवनी अमल अजीबात उडवून दिल्यामुळें तेथील प्रजा इतर अनेक बाबतीप्रमाणें धर्मसबंधानें निर्भय झाली होती ह्या इष्ट स्थितीस अनुलक्षून रामदासस्वामीनी महाराजाची स्वपत्रात स्तुति केली आहे, व सभाजीस त्याचे सगोपन व सवर्धन करण्याविषयी बोध केला आहे महाराजाचें जन्म कर्नाटकात होऊन तेथे त्यानी स्वराज्यसपादनद्वारा स्वधर्मसगोपन केलें असतें तर समर्थानीं 'कर्नाटकधर्म राहिला काहीं तुह्माकरिता' असें विधान अवश्य केलें असतें दुसरें असं की, हें महाराष्ट्रधर्मपद रामदासाच्या इतर कोणत्याहि कवनात आढळत नाहीं. त्यावरून त्याचा उपयोग फक्त शिवाजीमहाराजाच्या कर्तृत्वाची प्रसशा करण्यापुरताच समर्थानी केला होता असे ह्मणावे लागते असल्या लेच्यापेच्या आधारावर रामदासानी महाराष्ट्रीयाच्या ठायी स्वदेशाभिमान जागृत करण्यासाठीच केवळ हा असा शब्द प्रचारात आणिला असे म्हणणे निखालस अप्रमाण होय. ' मराठा तेवढा मिळवावा, महाराष्ट्रधर्म वाढवावा ' वगैरे उद्गार सभाजीस लिहिलेल्या पत्रात त्यानी काढिले ते त्याचे बहुतेक पहिले व शेवटलेच होते.[१] कारण ज्या वर्षी हें पत्र त्यानीं सभाजीस लिहिलें त्याच वर्षी त्यांचे देहावसान झाले आहे, व त्याच्या पश्चात् त्याच्या शिष्यवर्गानें हें व्रत पुढें

---

१ सभाजीस समर्थानीं पाठविलेले पत्र जे जगदीश्वर छापखान्यात छापून प्रसिद्ध झालेल्या रामदासस्वामीच्या चरित्राच्या एका जुन्या बखरीत व रा चौबळकृत स्वामीच्या चरित्रात छापिले आहे, त्यात 'मराठा तेवढा मिळवावा, महाराष्ट्र धर्म वाढवावा' हे शब्द नाहींत हे महत्त्वाचे शब्द त्यानीं कां गाळले असावे बरे ? किंवा ते मूळचे त्या पत्रात नसून पुढें कोणी तरी रामदासभक्ताने ते घुसडले तर नसावे ?

१. शके १६०३ च्या पौषमहिन्यात हें पत्र लिहिले असून त्याच वर्षाच्या माघ महिन्यात समर्थांचें देहावसान झालें.

चालविल्याचें कोठेहि लिहिलेलें नाहीं नुसती कल्पना करावयाची तर तो इतिहास नव्हे हे समर्थभक्तानी विसरता कामा नये तेव्हां एकंदरीत काय कीं, स्वदेशाभिमान, स्वधर्माभिमान, स्वराज्याभिमान व स्वातंत्र्यप्रीति ह्या वृत्ति समर्थासारख्या गोसाव्याच्या बोधानें महाराष्ट्रात पुढे काही काळ जागृत राहिल्या असें म्हणण्यापेक्षा त्याचे बीजारोपण व संगोपन शिवाजीमहाराजाच्या उज्ज्वल चरित्रमहिम्यानेच मुख्यत झाले होते हे म्हणणे विशेष सयुक्तिक दिसते औरंगजेबानें संभाजीस पकडून ठार मारून स्वराज्य बहुतेक पायाखालीं तुडविले असता त्याच्याशी मोठ्या आवेशानें व शौर्यानें सतत एकुणीस वर्षे टक्कर देऊन त्याला ज्या वीरानी त्राहित्राहि करावयास लाविलें त्यास रामदासो पथाकडून मुळीच साहाय्य झाले नसावे, तर हा अलौकिक आवेश शिवरायाच्या कर्तत्वामुळे व त्याच्या तालमत तरबेज झाल्यामुळे त्याच्या ठायी संचरला होता असेंच म्हटले पाहिजे ह्याचे सर्व यश त्या राजमणीसच दिलें पाहिजे समर्थानी लिहिलेल्या एकाद्या दुसऱ्या चिठोऱ्यास ते देऊन त्याचा नसता बडेजाव वाढविणे अन्यायाचे होणार आहे

## पूर्वीचे सरदार व मुत्सद्दी यांचें साहाय्य.

ह्याप्रमाणें आमच्या काहीं इतिहासपडिताच्या सदरी नमूद केलेल्या एका विधानाचें अयथार्थत्व किती आहे ते सागितले हे अमळ विशेष विस्तृत झालें ह्याबद्दल वाचक प्रस्तुत लेखकास क्षमा करितील अशी उमेद आहे ह्या त्याच्या विधानामुळे आमच्या चरित्रनायकास बरेच लघुत्व येण्यासारख आहे असें वाटले ह्मणून हा खटा पारहाळ करावा लागला आता ह्या इतिहासपडिताचें दुसरें एक असे विधान आहे कीं, ब्राह्मणी राज्याच्या काहीं विभागात पुष्कळ ब्राह्मणमुत्सद्दी व मराठेसरदार उदयास येऊन त्यास आपल्या ठायी काहीं कर्तृत्व आहे असें वाटू लागलें, व पुढे महाराजाच्या ठायी स्वराज्य साध्य करण्यास हवे असणारे सामर्थ्य व शहाणपण आहे असें पाहून ते त्यास हळूहळू अनुकूल झाले, ह्मणून त्याच्या साहाय्यानें स्वराज्याचा पाया त्यास घालिता आला ह्या विधानाचें सत्यत्व महाराजाचा एकंदर इतिहास लक्षपूर्वक पाहिला असता मुळीच दिसून येत नाहीं त्याच्या मुत्सद्दीमंडळीत एकहि असा कोणी नव्हता कीं, जो स्वत किंवा ज्याचे पूर्वज यवनी पादशाहतींत मोठे मुत्सद्दी होते. त्याप्रमाणेंच जे सरदार महाराजाच्या लष्करात उदयास आले त्यापैकीं कोणीहि

यवनपादशाहींतला मोठा जाहगीरदार नव्हता नेताजी पालकर, प्रतापराव गुजर, हबीरराव मोहिते, सताजी घोरपडे, खंडेराव दाभाडे, धनाजी जाधव वगैरे सरदार पूर्वीचे मोठेसे जाहगीरदार होते असे ह्मणण्यास मुळीच आधार नाहीं ते सारे लहानसान मोकासदार किंवा देशमुख असावे मागे राज्य-व्यवस्थाप्रकरणात सांगितल्याप्रमाणे रयतेकडून वसूल गोळा करण्याचे हक्क मोकासदाराकडून व देशमुखाकडून काढून घेतले तेव्हा ते महाराजांच्या लष्करात नोकरी पतकरून स्वताच्या कर्तबगारीने हळूहळू उदयास आले होते त्या वेळचे बडे सरदार ह्मटले ह्मणजे फलटणचे निंबाळकर, मुधोळचे घोरपडे, ह्मसवडचे माने, वाडीचे सावंत, शृंगारपूरचे सुर्वे, शिर्के व दळवी, जावळीचे मोरे इत्यादि होत हे सारे विजापूरसरकारचे शेवटपर्यंत अंकित राहिले असून, पहिले तिघे आपल्या धन्याच्या वतीने महाराजांशी विरोध करण्यास सर्वदा तयार असत, आणि बाकीच्या सरदारास महाराजांनी जिंकिले नसते तर ते आपण होऊन महाराजांस येऊन मिळाले असते असे सहसा म्हणवत नाहीं त्यावरून पाहता मराठे जाहगीरदारांचें पुढे महाराजास आयतेच साहाय्य मिळाले हे ह्मणणे अगदी खरे नव्हे महाराजांच्या पदरी जे कोणी सरदार किंवा मुत्सद्दी होते ते सगळे मुशाहिऱ्याच्या आशेने त्याची नोकरी पतकरून राहिले होते शिवाजीमहाराज मोठ्या देशकार्यास उद्युक्त झाले आहेत ह्मणून आपण त्यास सहाय होऊन ह्या उद्योगास हातभार लावावा ह्याच बुद्धीने केवळ त्यास येऊन कोणी मिळाले होते असे आज उपलब्ध असलेल्या माहितीवरून तर ह्मणता येत नाहीं पुढे त्याच्या ठायी स्वराज्याभिमान जो विकास पावला त्याचे बीजारोपण व वर्धन महाराजांच्या उन्नतिप्रद संघटनानेच मुख्यत झालें होते यास्तव ह्याबद्दलचे सर्व यश महाराजासच दिले पाहिजे त्यास न्यूनत्व आणणारे वादविषयक विधान केवळ भ्रामक होय

## स्वराज्यस्थापना महाराष्ट्रापुरतीच नव्हती.

ह्या इतिहासवेत्त्याचे महाराजास लघुत्व आणणारे आणखी एक असे विधान आहे कीं, स्वराज्यस्थापना महाराष्ट्रापुरतीच करावी असा संकल्प महाराजांचा होता हेहि विधान अगदी खरे नव्हे ज्या महाशय पुरुषाने सर्व भरतभूमि यवनसत्तेपासून मुक्त करून स्वधर्माचे रक्षण करावे व हिंदुपदपादशाहीची स्थापना करावी असा सत्संकल्प केला होता, त्याच्या कर्तृत्वाची मर्यादा अशी

संकुचित करणें ह्मणजे वस्तुस्थितीचा विपर्यास करणें होय. महाराष्ट्रापुरतेंच स्वराज्य स्थापावें असा त्याचा उद्देश होता असें ह्मणावे तर त्यानी कर्नाटकात अठरा महिने मोहीम करून, तिकडे पुष्कळ मुलूख व किल्ले काबीज करून जागोजाग आपलीं ठाणीं बसविलीं व कित्येक प्राताच्या सरक्षणासाठीं नवे किल्लेहि बाधिले त्याचें काय प्रयोजन होते बरें? त्याप्रमाणेंच पुढे १६७९-८० सालात विजापूरसरकारचा कुलकारभारी मसाऊदखान याच्याशी तह करून त्यात आपल्या वडिलाची जाहगीर स्वतंत्र करून ती आपल्या ताब्यात घेतली, त्यात त्याचा काय हेतु होता बरे? प्रस्तुत लेखकास तर असें वाटते कीं, थेट रामेश्वरा-पर्यंत सर्व मुलूख काबीज करून तेथे आपली सत्ता कायमची बसवावी असा जो त्याचा सकल्प काहीं बखरकारानी लिहून ठेविला आहे तो खरा असून, त्यास आणखी थोडें आयुष्य असते तर हा उद्देश त्यानी सिद्धीसहि नेला असता. कर्नाटकातील मोहिमेचा दुसरा उद्देश अर्थात् असा होता कीं, अदिलशहाच्या सत्तेचा सक्षेप त्यानी जसा पश्चिमेकडून व उत्तरेकडून बराच केला होता तसाच तो दक्षिणेकडूनहि करावा, व अशा रीतीनें त्या सरकाराची सत्ता सपुष्टात आणून योग्य सधि आली ह्मणजे ती अजीबात उडवून द्यावी ह्या मोहिमेत त्याचा आणखी असा रोंख होता कीं, कुतुबशहाच्या सत्तेसहि दक्षिणेकडून व पूर्वेकडून शह द्यावा महाराजानी कर्नाटकांतून परत येताना तिकडे ठेवलेल्या आपल्या सरदारास मद्रासेकडील प्रात काबीज करून पूर्वसमुद्रापर्यंत आपली सत्ता बसविण्याचा क्रम चालू ठेवावयास सागितलें होतें. ह्याप्रमाणें कर्नाटकातील मोहिमेचा दुहेरी तिहेरी हेतु होता ह्या दोन्ही शाह्या उत्तरेप्रमाणें दक्षिणेकडूनहि कोरीत याव्या असा त्यांचा मानस होता हें स्पष्ट दिसतें आतां पश्चिम किनारा सबंध आपल्या ताब्यात यावा ह्मणून तर आरमार तयार करून तें उत्तरोत्तर प्रबळ करण्याचा त्याचा क्रम सुरू होता. सिद्दीचा पश्चिमकिनाऱ्यावरील कांटा समूळ उपटून टाकण्यासाठीं त्यांचा जो एकसारखा प्रयत्न चालू होता त्यांतलें इंगित मुख्यत. हेंच होतें. गुजराथप्रांतांत दमन व सुरत शहरांपर्यंत त्यानीं आपलीं ठाणीं बसविण्यास आरंभ केला होता. गुजराथेंत मोहीम केल्या-वाचून स. १६७० पासून स १६८० पर्यंत एकहि वर्ष गेलें नाहीं असें ह्मटलें असतां चालेल. मोगलाचा अमल तिकडे असल्यामुळें तो प्रात एकदम हस्तगत करणें अमळ जोखमाचें होतें हें ते जाणून असत. आपल्या शक्तीपलीकडची अशी कोणतीहि गोष्ट सहसा करूं नये असें त्याचें धोरण असल्यामुळें औरंग-

बादचें मोंगलांचें प्रबळ ठाणेंहि त्यांनीं तसेंच राहू दिलें होतें तेथपर्यंत लुटालूट करीत जावे, परंतु त्यावर हल्ला करूं नये असा त्याचा क्रम असे. आता मोगल-बादशाहीवर महाराजाचा डोळा मुळींच नव्हता असेंहि ह्मणतां येणार नाहीं. कारण असें पाहा कीं, जयसिंगराजा दक्षिणेंत प्रबळ सैन्यानिशीं आला असतां त्याच्याशी शास्ताखानासारखें कपटाचें आचरण न करिता त्याला सर्वस्वीं वश करून घेण्याचा उपाय महाराजानी योजिला त्याचा हेतु काय असावा बरें ? पुरंदरास दिलेरखानानें वेढा दिला होता त्यात ह्मणजे त्याची सरशी झाली होती असें नाहीं त्या एका किल्ल्याखालीं मोगलाची बरीच रग जिरली होती त्या-प्रमाणेंच सिंहगड घेण्याचा जयसिंगाने त्या मोहिमेत केलेला प्रयत्न व्यर्थ गेला होता. तेव्हा मोगलापुढे आता आपला निभाव लागणें नाहीं असें त्यास वाटण्याजोगा कांहींच प्रकार घडला नसून जयसिंगराजाच्या गोटात त्यानीं आपण जातीनें जाऊन व त्या गर्विष्ठ दिलेरखानाशीहि नम्रतेने वागून तहाचें बोलणें लाविलें, व पुढे जयसिंगाच्या मसलतीनें दिल्लीसहि जावयास ते तयार झाले, याचें कारण काय असावे बरे ? व औरंगजेबासारखा महाकपटी, विश्वासघातकी व कट्टा शत्रु आपल्या नाशास सर्वदा टपलेला आहे हे महाराजास पक्के ठाऊक असता त्याच्या तावडींत सहज जाऊन मिळण्याचें धाडस जे त्यानी केलें त्यात त्याचा काय हेतु होता बरें ? प्रस्तुत लेखकास तर यात त्याचें फार मोठे धोरण होतें असें वाटतें तें अर्थात् असें की,जयसिंगासारख्या बलाढ्य रजपूतराजास वश करून घ्यावें, मोगलदरबारा-तील इतर रजपूतसरदारांच्या ओळखी करून त्यास जयसिंगाच्या द्वारें आपल्या पुढील कार्यास अनुकूळ करून घ्यावे, उत्तरेकडील मुलखाची थोडीबहुत माहिती मिळवावी, व तूर्त अदिलशहा व कुतुबशहा याजवर मोगलाच्या स्नेहानें आपला शह पुरा बसवावा. हे सगळे उद्देश त्यानीं बरेच सिद्धीस नेले होते हें त्याच्या चरित्रावरून उघड होतच आहे. दक्षिणेंतील मराठे जाहगीरदार जसे यवनांचे पुरे ताबेदार होऊन बसले असून, सर्व एक होऊन स्वतंत्र सत्ता स्थापित कर-ण्याचें त्यांच्या मनांतहि कधीं आलें नव्हतें, तद्वतच हे रजपूत राजे मोगलबाद-शहाचे मांडलिक होऊन जे ते आपल्यापुरतें पाहत होते. सर्व एक होऊन मोग-लसत्तेशीं विरोध करण्याची बुद्धि त्यास कधींहि सुचली नव्हती. तरी आपण जो दक्षिणेंत क्रम आरंभिला त्याचीच नक्कल उत्तरेकडील ह्या रजपूतसरदारांनीं आपल्या साहाय्यानें करावी असा महाराजांचा मानस असावा यात कांहीं शंका नाहीं.

एरवीं त्यानीं मरणसमयी जे खेदोद्गार काढिल्याचे[1] बखरकार लिहितात ते त्यानीं काढिले नसते त्याप्रमाणेच शहाजीराजे आपल्या ह्या महाप्रतापी सुपुत्राची भेट घेऊन कर्नाटकात गेले तेव्हा त्यानी व्यकोजीराजास बोधाचे दोन शब्द सागताना महाराजाच्या कर्तृत्वासबधाचे जे प्रशंसापर उद्गार काढिले होते[2] ते केवळ अत्युक्तिरूप होते असें ह्मणवत नाहीं ह्या सर्व गोष्टी लक्षात आणिल्या ह्मणजे त्याचा सकल्प केवटा मोठा होता हे सहज दिसून येते हा महासकल्प पूर्णपणें सिद्धीस नेण्यास दीर्घायुष्याची त्यास अनुकूलता झाली नाहीं ह्मणून त्याचा व्याप सकुचित होता असें मानून त्यास लघुत्व आणू पाहणें सर्वथा युक्त नव्हे

येथवर आरभी सकल्प केल्याप्रमाणे दोन मोठ्या प्रकरणाचा विचार झाला त्यावरून वाचकाच्या लक्षात आलेच असेल कीं, आमच्या चरित्रनायकास परके लोक जे निरनिराळे दोष लावितात ते निराधार आहेत, व आमच्या देशातील इतिहासज्ञ त्याच्या वास्तविक योग्यतेत कमीपणा आणणारी जी कित्येक स्थूलमानाने विधाने करितात तींहि अप्रयोजक आहेत

आता त्याच्या ठायीच्या काहीं उज्ज्वल गुणाचे येथें निरूपण करणे इष्ट होय वरील विवेचनात त्याच्या अगच्या काहीं सद्गुणाचे दिग्दर्शन झालेच आहे तरी त्याच्या आणखी काहीं ठळकठळक गुणाचे थोडक्यात विवेचन करू हे गुणपरिगणन करावयाचे ह्मटले ह्मणजे त्यान महाराजाच्या चार प्रकारच्या वर्तनाचा विचार प्रसक्त होतो ते प्रकार अर्थात् हे होत –( १ ) राजकीय वर्तन, ( २ ) व्यावहारिक वर्तन, ( ३ ) कौटुबिक वर्तन व ( ४ ) धर्मसबंधी वर्तन.

## लोकसंग्रह व औदार्य.

पहिल्याने राजकीय वर्तनाविषयी विचार करू प्रबल यवनाच्या सत्तेशी विरोध करून स्वराज्यस्थापनेच्या उद्योगात सुयश सपादन करण्यास आवश्यक असे जे त्याच्या ठायीचे शौर्य, वीर्य, पराक्रम, युक्तिमत्ता, साहस इत्यादि उत्कृष्ट गुण त्याचे येथें उज्ज्वलन करूं पाहणें ह्मणजे सूर्यास काडवात दाखविणें होय.

---

१ स्वातन्त्र्य प्राप्त्यर्थ शिवाजीमहाराजानी केलेल्या दीर्घोद्योगाने स्फूर्ति पावलेल्या कित्येक रजपूतराजापैकी बुदेलखडाचा राजा छत्रसाल हा एक होता मोगलबादशहाशी विरोध करण्याच्या हेतूने हा राजा महाराजाकडे आला असता त्यास त्यानी आपल्या राज्यात जाऊन स्वातंत्र्याचा झेंडा उभारून यवनाशी युद्ध करण्यास उद्युक्त व्हावयास सागितले हे मागें लिहिलेच आहे.

२ पृ ५० पाहा.

या अप्रतिम गुणाचा प्रत्यय त्याच्या चरित्रात जागोजाग इतका मिळणारा आहे कीं, त्यांविषयी येथे स्वतंत्र रीतीने विवेचन करण्याची आवश्यकता बिलकुल नाहीं स्वराज्यसाधनरूप कार्यात पूर्ण यशस्वी व्हावयास ह्या वरील गुणाहून आणखी काहीं गुणाची अनुकूलता लागते हे गुण महाराजाच्या अंगी कसे काय होते ते पाहू पहिला गुण असा कीं, असला सकृद्दर्शनीं असंभवी वाटणारा उद्योग यशोलाभास आणू पाहाणाराने लोकास अनुकूळ करून घेण्याची कला आगलीच साध्य असावी लागते ह्या कलेत महाराज इतके कुशल होते कीं, अशी कला जगाच्या इतिहासात आजपर्यंत कोणालाहि साधली नसेल महाराजास मधुर व मोहक रसवंती अल्प वयापासून अनुकूल होती ह्मणूनच त्यास मावळा-तले बहुतेक देशमुख व इतर लोक अगदी आरंभापासून आपल्या कार्यास साहाय्यकारी करून घेता आले कोणी कसाहि पुरुष त्याच्यापाशी एक वेळ आला ह्मणजे त्याच्या ह्या मोहनीत सापडून त्याच्याविषयी त्याच्या ठायी अत्यंत आदरबुद्धि व स्नेहभाव हीं उत्पन्न होत असत, आणि त्यांनी योजलेल्या महत्कार्या-विषयीं त्याच्या अंगात अभिमान संचरून तो त्यास कायावाचामनेकरून साहाय्य करण्यास उद्युक्त होत असे हा असा अलौकिक जादू त्यास साधला असल्यामुळे विश्वासू व स्वामिनिष्ठ सेवकाची त्यास कधींहि उणीव पडली नाहीं. असा लोकसंग्रह करणाराच्या अंगी लोकप्रीति संपादण्यास आणखी एक गुण लागावा असतो तो अर्थात् औदार्यरूप होय पदरच्या लोकाशी उदारपणानें वागण्यात तर महाराजाची बरोबरी कोणाहि इतिहासप्रसिद्ध नृपतीच्याने होणार नाही. आपल्या लोकानी चागली कामगिरी केली असता त्यास त्या कामगिरीच्या महत्त्वाच्या मानाने इनामे व शाबासकी देण्यास ते सर्वदा तयार असत त्याचीं पतने वेळच्यावेळीं देऊन त्यास संसारातील अनेक कठिण प्रसंगीं साहाय्य करण्यात त्याचा हात सर्वदा सढळ असे युद्धादि प्रसंगात कोणी गतप्राण झाला

---

१ महाराजाचा कट्टा शत्रु जो औरंगजेब त्याचे उद्गार येथें नमूद केल्यानें ह्या गुणांची साक्ष उत्तम पटेल. ते उद्गार हे होत –"तो महारणशूर सेनानी होता हिंदु-स्थानातील प्राचीन राज्याचा नाश करण्याचा प्रयत्न मी एकसारखा चालविला असता नूतन राज्य स्थापण्याचे महत्कार्य सिद्धीस नेण्यास लागणारे पराक्रमादि गुण त्याच्याहून अन्य कोणाच्याहि ठायीं नव्हते माझ्या प्रबळ फौजा त्याच्याशी लढ-ण्यात सतत एकुणीस वर्षे गुतल्या होत्या तरी त्याची सत्ता एकसारखी वृद्धिगत होत होती." महाराजास 'पहाडका चुवा' ह्मणणाराचा हा अभिप्राय आहे

असतां त्याच्या कुटुबाचा चरितार्थ त्याच्या पश्चात् नीट चाले असें करण्यास ते नेहमीं तत्पर असत त्याचा एकादा मुलगा किवा भाऊ सरकारचाकरी करण्यास लायक असला तर त्याच्या योग्यतेप्रमाणें त्यास काम देण्याची ते व्यवस्था करीत. ह्यामुळें पदरच्या लोकाची नेहमीं अशी खात्री असे कीं, ह्या प्रभूच्या कामगिरींत प्रसगीं स्वप्रमाणाची आहुती पडली तरी हा आपल्या कुटुबाचे आपल्या मागें अवश्य चालवील

## गुणज्ञता व निःपक्षपातबुद्धि.

लोकसग्रह करणारा प्रभु खरा गुणज्ञ व गुणाची बूज करणारा असला पाहिजे. महाराजाच्या ठायीं ही गुणग्राहकता अलौकिक होती प्रत्येकाच्या अगच्या वास्तविक गुणाची पारख करून त्यास यथोचित कामगिरी सागावी व त्याच्या अगच्या वर्तमान योग्यतेच्या मानाने त्याची बढती केवळ नि पक्षपातबुद्धीने करावी असा त्याचा अव्याहत क्रम असे हा आपला मित्र किवा हा आपला सुहृत्सबधी आहे, याला मोठ्या मानाची किवा मोठ्या किफायतीची कामगिरी सागावी, असा पक्षपाताचा काहींच प्रकार त्याच्या हातून कदापि घडत नसे खऱ्या लायक माणसांच्या हक्काचा विचार करून तंतोतत न्यायाने त्याची योग्यता वाढवावी असा त्यांचा नियम असे ह्यामुळें ज्याला त्याला अशी पूर्ण खात्री असे कीं, आपल्या गुणाचा व कर्तृत्वाचा योग्य विचार करून आपली बढती करणारा असा हा खरा गुणज्ञ प्रभु आहे दुसरा एक उत्कृष्ट गुण ह्या लोकनायकाच्या अगीं असा बसत असे की, आपल्या पदरच्या लोकाच्या ठायीं विश्वासूपणा उत्पन्न करण्याची हातोटी त्यास उत्तम साधलेली असे कोणालाहि एकादें कितीहि महत्त्वाचें काम सोंपविल्यावर तें बजावण्यासबंधानें त्याच्यावर ते पूर्ण भरंवसा टाकीत असत प्रथमत· असा भरंवसा ठेवण्यास तो मनुष्य लायक आहे किवा कसें हें नीट पहावयाचें, आणि मग एकदा त्याच्यावर भरवसा टाकला म्हणजे त्याच्याविषयीं सहसा संशय घ्यावयाचा नाहीं असा त्याचा क्रम असे. त्याच्या संबंधानें कोणी द्वेषी किंवा मत्सरी मनुष्यानें महाराजांचें मन कलुषित करीन म्हटलें तर त्याची त्याच्या कानास लागण्याची प्राज्ञा नसे.अशा मनुष्यास आपल्या वाऱ्यासहि ते घेत नसत. कोणाच्या लौकिक वर्तनाविषयीं अमळ संशय आला असता त्याची माहिती ते आपल्या गुप्त हेरांच्या द्वारें पहिल्यानें मिळवीत,आणि मग त्यासंबंधाचा वास्तविक पुरावा काय आहे तो राजरोस रीतीनें पाहून त्याची योग्य शहानिशा

करीत. ह्या त्याच्या वृत्तीस्तव त्याच्या पदरच्या लहानमोठ्या सर्व कामदारास असा पक्का भरंवसा असे कीं, आपण आपलीं कामे नेकीनें व दक्षतेनें केलीं असता आपणांस आपल्या हुद्यावरून दूर होण्याची भीति ह्या प्रभूकडून कदापि नाहीं हा असा प्रत्येकावर पूर्ण भरंवसा टाकल्यामुळें व त्याला आपल्या हुद्याविषयींची निश्चित शाश्वती वाटत असल्यामुळें लोकाच्या ठायी इमान, स्वामिनिष्ठा, स्वकार्यदक्षता इत्यादि वृत्तीचा विकास होत गेला

## निष्कपटीपणा व मित्रभाव.

लोकसंग्रह करणाऱ्या लोकनायकाच्या हातून पदरच्या लोकाशीं निष्कपटीपणाचें व मित्रभावाचे वर्तन होणें इष्ट असते ह्यासंबंधानें तर महाराजाचा हात खडा असे ज्यावर एक वेळ इतबार टाकला त्याच्याशी ते कदापि कपटानें वागत नसत आपण योजलेले बेत व तत्सिद्ध्यर्थ करावयाचे उपाय ह्याविषयींचा खल ते आपल्या विश्वासू कामदाराशी केवळ प्राजल बुद्धीनें करीत असत. त्याची काय मसलत असे ती ते आदरपूर्वक ऐकून घेत असत आत एक व बाहेर एक असें त्याचे आपल्या लोकाशीं कधींहि वर्तन नसे. तसेंच अधिकाराच्या जोरावर कोणाशी दिमाखाचें किंवा गर्वाचें वर्तन ते कधीहि करीत नसत. आपल्या हाताखालचे लोक आपल्या मित्रासमान आहेत असें समजून त्यांच्याशीं ते खऱ्या स्नेहभावाने वर्तत असत, कोणाचा उपमर्द किंवा मानहानि ते सहसा करीत नसत ह्याप्रमाणें स्वकीय जनाशीं त्याचें सदोदित आचरण असल्यामुळें ज्याला त्याला असें वाटे कीं, आपला स्वाभिमान व इभ्रत कायम राखून ह्या प्रभूची सेवा आपणास करितां येईल, आणि त्याच्या स्नेहयुक्त वर्तनामुळें प्रत्येकाच्या ठायीं त्याजविषयीं प्रेम व अभिमान ह्या वृत्ति उत्पन्न होत असत.

## जरब.

महाराज ह्याप्रमाणें आपल्या अधिकाऱ्याशीं मित्रभावानें व आदरानें वागत असत, तरी त्यांची त्याजवर जरबहि पराकाष्ठेची असे महाराज आपला इतका मानमरातब राखतात व आपणाशीं स्नेहभावानें वागतात एवढ्यावर जाऊन कोणी कारभाऱ्यानें शिरजोर होऊं पाहिलें किंवा आपल्या कामांत कुचराई केली तर त्यास महाराजांकडून कदापि गय होत नसे तो केवढाहि मोठा अमलदार असला तरी त्यास त्याबद्दल योग्य शासन करण्यास ते कधींहि चुकत नसत. ह्यामुळें त्यांचा दरारा सर्वांवर सारखा असे, आणि त्यांस असें वाटे कीं, ह्या

प्रभूची सेवा इमानानें व हुशारीनें केली तरच त्याची कृपा आपणांवर कायम राहा-वयाची. हा असा त्याचा करडा अमल असल्याकारणानें त्यास इतक्या लोकांवर पूर्ण ताबा चालविता येऊन त्याच्याकडून हवी ती कामगिरी करवून घेता आली.

## उद्यमशीलता

हा असा दरारा राहण्यास आणखी एका गोष्टीची महाराजास पूर्ण अनुकूलता असे ती गोष्ट ही कीं, त्यास स्वत आग मोडून मेहनत करण्याची लहानपणा-पासून सवय असून राज्यप्राप्तीस व राज्यव्यवस्थेस लागणाऱ्या हरएक गुणाचा व कर्तबगारीचा विकास त्याच्या ठायीं उत्तम प्रकारें झाला होता रणभूमीवर शत्रूशी लढताना आपल्या सैनिकास शत्रूच्या तोडीं देऊन स्वत कोठे तरी सुर-क्षित जागी प्रेक्षकाप्रमाणें उभे राहण्याचा जसा कित्येक सेनापतींचा किंवा राजाचा क्रम असतो, तसा प्रकार महाराजाकडून कदापि होत नसे हातीं समशेर घेऊन रणकंदनात ते सर्वांच्यापुढे असत, व आपल्या अगचें अप्रतिम शौर्य, वीर्य व युद्धकौशल्य हीं प्रगट करीत तेणेंकरून त्याच्या पदरच्या कोणाहि वीरास महाराजापेक्षां आपल्या अगीं हे गुण अधिक आहेत अशी घमंडी मिरविण्यास बिलकुल अवकाश नसे. त्याप्रमाणेंच आपल्या सेनापतींस मुलूखगिरीवर किंवा एकाद्या स्वारीवर पाठवून आपण स्वस्थ मजा मारीत असावे असा क्रम बहुतेक नृपतींचा असतो. त्यामुळें विजयशाली सेनापतीचे प्रस्थ त्याच्या राज्यात परा-काष्ठेचें माजतें, व अशा सेनापतींच्या मुठीत असले राजे बहुतकरून असतात परंतु महाराजाच्या हातून असा प्रकार आमरण झाला नाहीं ते स्वत कोणत्या ना कोणत्या मोहिमेंत सर्व काळ गुंतलेले असत आळशासारखे स्वस्थ बसून राहण्यास त्यांना मुळीं सवडच नव्हती अशा उद्योगसातत्यामुळें व अविश्रांत परिश्रमा-मुळें त्यानी आपणावर कोणाहि सेनापतीची किंवा सरदाराची मात्रा चालूं दिली नाहीं आपण निरनिराळ्या मोहिमा करून जे पराक्रम गाजवितों त्यांपेक्षा कांकण-भर जास्त पराक्रम महाराजाच्या हातून घडतात असें पाहून त्यांस स्वताचा दिमाख किंवा तोरा मिरविण्यास मुळींच जागा नसे महाराजापुढें आपण केवळ हीनपराक्रम आहो असें त्यांस सर्वदा भासे असाच प्रकार राज्यव्यवस्थेसंबंधा-नेंहि असे. किल्ल्यांचा बंदोबस्त, जमीनमहसुलाची सुव्यवस्था, बिकट कारस्थानें रचण्याच्या कामीं लागणारी युक्तिमत्ता इत्यादिकांसंबंधानें त्याच्या पदरच्या कोणाहि मुत्सद्यांस त्यांजवर शेखी मिरविण्यास मुळीं सवड नसे. हा असा अष्ट-

पैलूपणा त्यांच्या अगीं पूर्णपणें वागत असल्यामुळें प्रत्येक कामदार त्यांच्यापुढें अगदीं लीन व नम्र असे, व त्याचा दरारा प्रत्येकास अतिविलक्षण वाटे ह्याच सुप्रसिद्ध गुणास्तव त्यास रामदासस्वामींनी आपल्या पत्रात सर्वज्ञ हें विशेषण दिलें आहे

## लोकवशीकरण.

तेव्हा एकंदरीत काय कीं, लोक वश करून घेऊन त्याच्याकडून हवी ती कामगिरी इमानेइतबारे करवून घेण्याची कला जी महाराजास इतकी अप्रतिम साधली होती तिची मीमासा सदरी निर्दिष्ट केलेल्या गुणसमुच्चयाचा विकास त्याच्या ठायी उत्तम झाला होता हे लक्षात आणिल्याने होणारी आहे ही लोकवशीकरणाची मोहिनी किंवा जादू त्यास उत्तम साधली असल्यामुळे त्याच्या पदरच्या सर्व कामदारात इमान, स्वामिनिष्ठा व कर्तव्यदक्षता हे गुण उत्पन्न झाले असून त्याची परस्परात नेहमी चढाओढ लागून राहिलेली असे महाराजाकडून शाबासकी मिळविण्यातच त्यास कृतकृत्यता वाटे स्वामिकार्यी प्राणाहुति देण्याचा प्रसग आला तरी त्याचे त्यास काहींच वाटत नसे अशा अलौकिक पुरुषाची सेवा कायावाचामनेंकरून करण्यातच आपलें जीवितसाफल्य आहे असा त्याच्या बुद्धीचा पूर्ण निर्धार झाला होता. पुढेपुढें तर महाराज कोणत्या पुण्यकृत्यात गुतले होते हे त्याच्या लक्षात आल्यामुळे त्याच्याशीं बेइमानाचे किंवा दग्याचे वर्तन केलें असता महत्पाप होईल असें त्यास वाटूं लागले. ही अशी त्याच्या ठायीं महाराजाविषयी पूर्ण भक्ति व देशकार्याची खरी महती पूर्णपणे बिंबल्याकारणाने त्याच्या हातून फदफितूर किंवा दगाफटका असा बिलकुल झाला नाहीं. महाराज आग्र्यास जाऊन तेथे अटकेत पडले व आठनऊ महिने पुन स्वराज्यात आले नाहींत त्या वेळीं किंवा कर्नाटकात मोहीम करून तिकडेच अठरा महिने ते गुंतून राहिले त्या वेळीं त्याच्या पदरच्या कोणाहि मुत्सद्यानें किंवा सरदाराने त्याच्याशीं दग्याचें वर्तन करण्याचें मनांतहि आणिलें नाहीं हा त्या धामधुमीच्या काळीं मोठाच चमत्कार समजला पाहिजे. परंतु महाराजाच्या ठायीं लोकवशीकरणास लागणाऱ्या लोकोत्तर गुणाचा विकास कसा झाला होता हें लक्षात आणिलें म्हणजे हें एवढे गूढ कोणासहि वाटणार नाहीं.

## कल्पकता.

महाराजांच्या ठायीचा दुसरा मोठा ठळक गुण ह्मटला ह्मणजे अप्रतिम कल्पकता हा होय. हा गुण त्याच्या अगी इतका परिपूर्ण वसत नसता तर स्वराज्यसाधनाची बुद्धि त्यास कदापि सुचली नसती कारण असें पाहा कीं, यवनी अमलात दहाहजारी, वीसहजारी असे बलाढ्य मराठे सरदार नादत असता व ते मोठमोठ्या जाहगिरी वहिवाटीत असता, त्याच्या मनात ही स्वराज्यसाधनाची कल्पना का उत्पन्न झाली नाहीं बरें ? त्या सगळयाच्याच ठायी स्वातंत्र्यप्रीति, स्वधर्माभिमान व यवनसत्ताद्वेष ह्या वृत्ति वसत नव्हत्या असें कोण ह्मणेल ? त्याप्रमाणेच शौर्यपराक्रमादि गुणाचा त्याच्या ठायी अभाव होता असें ह्मणता येईल काय ? तर ह्या सरदारास ही बुद्धि का सुचली नाहीं बरे ? ह्या प्रश्नाचें उत्तर एवढेच आहे कीं, त्याच्या ठायी कल्पकता हा गुण फारसा वसत नव्हता. स्वराज्यसाधन कोणत्या उपायानी करिता येईल, व त्यापैकीं काहीं उपाय प्रसंगीं फसले असता दुसरे कोणते उपाय योजिता येतील, याचा योग्य विचार करून तदनुरूप वागण्यास लागणारी कल्पकता महाराजाच्या अगी अल्प वयापासूनच विकसित झाली होती ही कल्पकता मुख्यत्वेकरून बुद्धिमत्तेवर अवलबून असते महाराजाची बुद्धि अतितीव्र असून त्यास सर्व प्रकारची माहिती मिळविण्याचा हव्यास अमर्याद होता ह्या चौकसपणामुळे त्याचे ज्ञानभाडार सर्वदा परिपूर्ण असे. दुसऱ्याच्या अनुभवाचे उत्तम साहाय्य घेऊन त्यात आपल्या प्रत्यक्ष अनुभवाची भर घालून हें सर्व ज्ञान आपल्या दिलदप्तरात कायमचें नमूद करून ठेवण्यात त्यांची बरोबरी कोणाच्यानेंहि होणार नाहीं हा फक्त स्मृतीचा गुण झाला परतु नुसती स्मरणशक्ति प्रबल असल्यानें कल्पकता वाढत नसते तिला विवेकशक्तीचें उत्तम साहाय्य हवे असते ही विवेकशक्ति महाराजाच्या ठायी अतिप्रखर होती हे निर्विवाद आहे ह्या स्मरणशक्तीच्या व विवेकशक्तीच्या अप्रतिम बलाने प्राप्त अनुभवाचा व ज्ञानाचा उद्दिष्ट कार्याच्या सिद्धीकडे विनियोग करिता येऊन अलौकिक युक्तिमत्ता त्याच्या ठायीं विकास पावली. एक युक्ति फसली असतां दुसरी युक्ति योजावी, तीहि फसली असता तिसरी योजावी, हताश होऊन कदापि बसूं नये, असा त्याचा नेहमीं निर्धार असे. हा निर्धार सर्वांसच साधत नसतो ज्याच्या ठायीं कल्पकतेच्या बलावर युक्तिप्रयुक्तींचा जसा काय अखंड झरा वाहत असतो त्यालाच तो साधतो.

महाराजांनीं हा अप्रतिम गुण अगदीं आरंभापासून प्रगट केल्यामुळेंच त्याच्यावर त्यांच्याहून जाणत्या व अनुभवी लोकाची श्रद्धा ते अल्पवयी असताहि इतकी नि सीम बसली हा वयाने लहान परंतु बुद्धीनें थोर आहे, अशी खात्री झाल्यामुळें त्याच्या सकृद्दर्शनी असभवी दिसणाऱ्या नेतास त्याच्या आसपासचे लोक सर्वस्वीं अनुकूळ झाले त्याची कल्पना उत्तम असून ती साध्य करण्यास त्यानीं सुचविलेल्या युक्ति यथायोग्य आहेत अशी त्या लोकाची पूर्ण खात्री झाली ह्मणून ते त्याच्याबरोबर आपले जीव धोक्यात घालावयास सिद्ध झाले, एरवीं होते ना ह्या कल्पकतेच्या बलावर त्यानी पुढे आपणावरील मोठमोठी अरिष्टे कशी निवारण केली हे त्याच्या चरित्रात पदोपदीं आढळून येते, किंबहुना त्याच्या एकदर कर्तृत्वाचे मूळ ह्या गुणातच मुख्यत आहे असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं. ह्या गुणाच्या साहाय्याने त्यानी आपल्या पदरच्या लोकाच्या ठायी आपणाविषयी पुरा भरवसा उत्पन्न केला होता ह्मणूनच ते स्वराज्यसिद्धीच्या कामी आपल्या प्राणाचे स्वाहास्वधाकार करण्यास प्रवृत्त झाले कोणता कसाहि बिकट प्रसग प्राप्त झाला तरी त्यातून पार पडून स्वकार्यसिद्धि करण्यास हवी असणारी युक्तिमत्ता ह्या लोकनायकाच्या ठायी परिपूर्ण आहे अशी खात्री त्याच्या पदरच्या एकूणएक लोकाची होऊन ते पाहिजे ते धाडसाचे कृत्य करण्यास सर्वदा उद्युक्त असत.

## तेजस्विता व स्वाभिमान.

महाराजाच्या ठायींचा तिसरा वर्णनीय गुण ह्मटला ह्मणजे तेजस्विता हा होय. खरे तेजस्वी पुरुष जे असतात त्यास दुसऱ्याची ताबेदारी बिलकुल सहन होत नाहीं ते पुरे स्वाभिमानी असल्यामुळें स्वाभिमानास प्रतिकूळ अशी जी परतंत्रता ती त्यास अगदी असह्य होते स्वताच्या पायावर उभे राहून काय ओलीकोरडी भाकर मिळेल तीत सतोष मानून राहण्यातच त्यास विशेष सुख वाटते. महाराजाच्या अगीं हा लोकोत्तर गुण वसत असल्याकारणाने स्वपित्याची परावलंबी स्थिति त्यास मुळींच चागली वाटली नाहीं ती झुगारून देण्यात जीवितहानि होण्याचा सभव आहे हें ते पूर्णपणें जाणून होते. परंतु अशी श्ववृत्ति स्वीकारून यवनानीं तोंडावर टाकलेला तुकडा खात बसण्यापेक्षा जीवितसशय पतकरला, असा त्याच्या मनाचा धडा होऊन गेला होता आपण अगीकारलेल्या दुर्घट उद्योगांत हटकून यश येईल याची त्यांस आरंभीं भ्रातिच होती असें ह्मणण्यास काहीं चिंता नाहीं. परंतु परतंत्रतामूलक ऐहिक धनसंपदा व सौख्य

हीं त्यास अत्यंत तुच्छ वाटून त्यांनीं ह्या उद्योगास मोठ्या धैर्यानें व अढळ निश्चयानें हात घातला प्राप्त स्थितींत सुख मानून राहावें असें ह्मणणाऱ्या दादाजी कोंडदेवासारख्या पुरुषानीं त्यास त्या उद्योगापासून परावृत्त करण्याविषयी प्रयत्न केला. परंतु त्याचा निश्चय अचल राहिला पुढे प्रत्यक्ष त्याच्यावर नाहीं तरी त्याच्या प्रिय पित्यावर प्राणसकट आले असता मुळीच न डगमगता त्यातून त्याची मुक्तता करण्याची त्यानी अजब युक्ति योजिली, परतु स्वसकल्प कदापि सोडला नाहीं यात त्याच्या ठायीचा तेजस्वीपणा चागलाच व्यक्त होतो ह्या गुणाच्या अनुषंगान असणारा जो स्वाभिमान तो तर त्याच्या अगात ओतप्रोत भरला होता मोगलदरबारात औरगजेबासारख्या सार्वभौम बादशहाच्या पूर्ण तावडीत ते साप-डले असताहि तेथ झालेली मानखंडना त्यास बिलकुल सहन झाली नाहीं ह वाच-कानीं मागे वाचलेच आहे खरे वीर पुरुष जे असतात त्याचा हा महाभूषणप्रद गुण होय ह्या गुणाच्या अभावीं पुरुष केवळ निर्माल्यवत् होतो कोणी आपला उपमर्द करू नये, किंवा कोणी आपणास दोष लावू नये किंवा तुच्छ लेखू नये, ह्याविषयी महाराज अहर्निश जपत असत ह्मणून त्याच्या हातून असे अलौकिक पराक्रम झाले महातेजस्वी पुरुष राष्ट्राच्या अभ्युदयास कसे कारणीभूत होतात हे महाराजाच्या चरित्रावरून उत्तम प्रकारे प्रत्ययास येते वीर्य, शौर्य, साहस आदि-करून उज्ज्वल गुण व सदाचार, निर्व्यसनता इत्यादि नैतिक गुण ह्याचे मूळ ह्या तेजस्वितारूप गुणात आहे कारण तेजस्वी पुरुष आपली तेजोहानि जेणेकरून होण्यासारखी असते ते सर्व हरप्रयत्नाने टाळून वास्तविक तेज जेणेंकरून वृद्धिगत होईल ते करण्यास सर्वदा तत्पर असतो इतकेच नव्हे तर आपल्या ठायींच्या तेजाच्या प्रभावाने अन्य जन सुखी व समृद्ध करण्यास सर्वदा झटल्यानेंच आपल्या जीविताचें साफल्य होईल असें त्यास वाटत असते ही कसोटी लावून पाहतां तीस महाराज किती उत्तम प्रकारें उतरतात हे मार्मिक वाचकास सागावयास नकोच साराश काय कीं, महाराजाच्या ठायीच्या ह्या तेजस्वितेमुळेंच मुख्यत आमच्या देशास काहीं काळ स्वातंत्र्य प्राप्त होऊन महाराष्ट्रीयाच्या ठायीं काहीं विशेष ओज आहे असें सर्व जगास विदित झालें.

## स्वप्रजावात्सल्य.

स्वप्रजावात्सल्य हा महाराजाच्या ठायींचा आणखी एक स्तुत्यर्ह गुण होय. ह्या गुणाचें दिग्दर्शन राज्यव्यवस्थाप्रकरणात चागलेंच झालें आहे, त्याची येथें

पुनरुक्ति नको. शेतकरी, व्यापारी व उदमी यांचा उत्कर्ष व्हावा, त्यास कोणाकडूनहि उपद्रव होऊं नये व त्यास योग्य न्याय मिळावा ह्यासाठी ते आपल्या राज्याची सुव्यवस्था लावण्यास सर्वदा झटत असत हा सर्व कारभार बिनबोभाट चालावा व कोणत्याहि प्रकारची बेबदाई होऊ नये ह्मणून त्यानी पूर्वी कोणाहि नृपतीस न सुचलेली अशी अष्टप्रधानमंडळाची कल्पना काढिली. राज्यातल्या निरनिराळ्या कारभाराची जबाबदारी निरनिराळ्या प्रधानावर टाकून त्याच्यावर एकंदर प्रधानमडळाची व स्वताची जरब ठेविल्याने रयतेस सुख लाभेल असे त्याच्या लक्षात आले ह्मणून त्यानी आपल्या अधिकाराची अशी समसमान वाटणी केली, व आपल्या पदरच्या लायक पुरुषाची इभ्रत व दबदबा हीं चोहोंकडे स्थापित केलीं प्रजेस अन्यायाने त्रास देणारा अधिकारी कितीहि मोठा असला तरी त्यास शासन करावयास ते कदापि चुकत नसत त्याच्या हातून कसा काय कारभार होतो हे पाहण्यासाठी मुख्य प्रधानाची तर त्यावर देखरेख असे. ह्याशिवाय आणखी त्याचे हेर स्वराज्यात जिकडेतिकडे सर्व काळ हिडत. त्यामुळे प्रत्येक अमलदारास असें वाटे कीं, रयतेशी आपण यत्किंचित्‌हि अन्यायाचे वर्तन केलें तर त्याची वार्ता महाराजास कळून, योग्य चोकशी होऊन आपणास शिक्षा होईल हा धाक सर्व लहानमोठ्या अधिकाऱ्यास सर्व काळ असल्यामुळे महाराजाच्या रयतेस शाति व सुख याचा अनुभव घडू लागला. ह्याशिवाय आणखी शेतकऱ्यास हरएक प्रकारची मदत करण्यासबधाने त्याचे काय नियम असत हे मागे सागितलेच आहे

ह्या प्रजावात्सल्याचें आणखी एक असें अग असते कीं, राजानें आपल्या प्रजेला समतेने व नि पक्षपातपणें वागवावे ह्यात तर महाराजाची बरोबरी करणारा प्रभु आजपर्यंत कोणीच झाला नाहीं असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईल असें वाटत नाहीं. आपल्या अमलातील निरनिराळ्या जातींच्या लोकास त्याच्या मगदुराप्रमाणे राज्यातील कमीजास्त महत्त्वाची कामें सागून त्यास सतुष्ट व सुखी करावे असा त्याचा क्रम असे. केवळ आपले जातभाईच तेवढे आपल्या कृपेस पात्र आहेत असा पक्षपात त्याच्या मनात कदापि वागला नाहीं फार काय, पण त्याच्या अमलातील यवनी प्रजेसंबंधानेंहि हा पक्षपात त्यानीं कधीं केला नाहीं. जे यवन आपल्याशीं इमानानें वागून त्यावर सोंपलेलीं कामें दक्षतेनें करितील असें वाटे त्यांस ते मोठमोठ्या कामगिऱ्या सांगून खुष

राखीत.[1] ह्या अशा नि·पक्षपाताच्या वर्तनामुळें त्यांच्या राज्यांत फंदफितूर किंवा दगेधोपे कधीहि झाले नाहींत सर्व जातींची प्रजा त्यास देवासारखे पूज्य मानी

## व्यावहारिक वर्तन.

आता महाराजाच्या व्यावहारिक वर्तनात कोणते गुण विशेषत दृष्टीस पडत तें थोडक्यात सागूं बखरकाराचें मुख्य लक्ष राजकीय घडामोडींकडेच असल्या-मुळें त्यानी महाराजाच्या व्यावहारिक आचरणाचा उल्लेख फारसा कोठे केलेला नाहीं, यास्तव ह्या सबंधानें विशेष काही सागता येणार नाहीं तरी ते आचर-णानें फार शुद्ध असत. त्याचा पोषाख नेहमी अगदी साधा असे त्याना कोणतेंहि व्यसन नसे थट्टामस्करी व विनोद याचा त्यास पुरा तिटकारा असे महाकवींची काव्ये व कथापुराणे ऐकण्याचा तेवढा नाद त्यास असे इतर कोण-त्याहि सुखविषयात ते रममाण होत नसत, व तसें रममाण होण्यास त्याना आम-रण अवकाशहि नव्हता कोणीहि गुणी मनुष्य किवा विद्वान् पुरुष आला असतां त्याची य ग्य सभावना करण्यास ते सर्वदा तयार असत. ज्या गुणी जनाचा आपणास उपयोग होण्यासारखा असे त्यात ते योग्य वेतन देऊन पदरीं ठेवून घेत. त्याप्रमाणेंच आपल्या सुहृत्सबधी जनाचा व इतर सरदार व राजे याचा यथोचित आदरमान करण्यात ते सर्वदा दक्ष असत साराश काय कीं, ऐश्वर्यमद, सत्तामद इत्यादि अनभ्वित वृत्ति त्याच्या चित्तास कदापि शिवल्या नाहींत, व त्यांच्या हातून कोणत्याहि प्रकारचा अनाचार किवा अन्याय झाला नाहीं.

## कौटुंबिक वर्तन.

पूर्वसकल्पास अनुसरून महाराजाच्या कौटुंबिक वर्तनासंबंधानें येथे दोन शब्द बोलले पाहिजेत परंतु ह्यासबंधानें बखरकारानी फारसा उल्लेख केलेला नाहीं. महाराजाच्या ठायीं मातृपितृभक्ति व बधुप्रेम हीं किती नि सीम वसत होतीं हें मागें अनेक प्रसगीं सागितलेंच आहे त्याविषयीं येथे विशेष रीतीनें लिहि-ण्याची आवश्यकता नाहीं एवढे ऐश्वर्य व एवढी सत्ता केवळ स्वपराक्रमानें प्राप्त झाली असता त्याच्या गर्वानें फुगून जाऊन स्वमातापितराचा व स्वबंधूंचा उपमर्द किंवा अवहेलना करण्याचें निंद्य कर्म महाराजासारख्या सत्ताधीशाच्या हातून

---

१ महाराजांच्या आरमारावर दौलतखान नावाचा एक सरदार असून त्यानें स. १६७९ त मुंबईच्या इग्रज व्यापाऱ्यांशी खांदेरी जवळ कशी झटापट केली तें मागें अठ्ठाविसाव्या भागांत सांगितलें आहे.

कदापि झालें नाहीं, हें त्या काळच्या यवनबादशहांची स्थिति पाहतां मोठे अलौकिक होय आता महाराजाचें स्वस्त्रियांशीं कसें काय वर्तन होतें तें कळत नाहीं परंतु विरुद्ध पुराव्याच्या अभावीं एवढें मात्र निश्चितपणे सागता येईल कीं, ते बिलकुल स्त्रैण नसत, व आपल्या राण्याचे ऐकून कोणताहि अयोग्य प्रकार ते कधींहि करीत नसत स्त्रियानी राज्यकारभारात ढवळाढवळ करूं नये असें त्याचें मत असे प्रत्यक्ष मातेलाहि ते असला प्रकार बिलकुल करू देत नसत मग स्त्रियाचा काय पाड? असें होते तरी स्वस्त्रियाविषयी आदर व प्रेम ह्या वृत्ति त्याच्यात नव्हत्या असें मुळींच ह्मणता येणार नाहीं सईबाईवर तर त्याचे अतिशयित प्रेम होते असें बखरकार ह्मणतात महाराजाच्या ठायी एकंदर स्त्रीजातीविषयीं अतिशयित आदरबुद्धि वसत होती ह्मणूनच त्याचा आपल्या लष्करास सर्वदा असा हुकूम असे कीं, कोणाच्याहि स्त्रियास कदापि त्रास देऊं नये ह्यामुळे त्याच्या लष्कराकडून कधी कोणाच्या स्त्रीवर जुलूमजबरी झाली नाहीं खुद्द महाराजानीच आपल्या एतद्विषयक आचरणाचा कित्ता आपल्या पदरच्या लोकास अगदी अल्प वयापासूनच घालून दिला होता कल्याणच्या मुलाणाच्या सुनेची गोष्ट आमच्या वाचकाच्या स्मरणातून गेली नसेलच असें जर महाराजाचे पवित्र व्रत होतें तर ते स्वस्त्रियाविषयी बेदरकार किवा निष्ठुर होते असें कोणालाहि ह्मणता येणार नाहीं आता, स्वपुत्राविषयी त्याच्या ठायी निसर्गत च प्रेम वसत असून त्यास सुशिक्षण प्राप्त व्हावे व ते स्वसपादित राजपदास लायक व्हावे ह्याविषयी त्यानी योग्य तजवीज केली होती. असें करूनहि त्याचा वडील पुत्र बदफैल व दुर्वृत्त निघून परस्त्रीपातिव्रत्याचा भंग करण्यास प्रवृत्त झाला तेव्हा हा माझा पुत्र आहे, यास शिक्षा काय करावयाची, असा काहींच विचार त्यांनीं मनात न आणिता त्यास एकदम सक्त कैदेंत ठेविलें यावरून ते आपल्या पुत्रांचे नसते लाड करणारे नव्हते हे उघड होते तेव्हा साराश काय कीं, ते आपल्या कौटुबिक आचरणावरून उत्तम पुत्र, उत्तम पति, उत्तम पिता व उत्तम बंधु ह्या विशेषणास सर्वथा पात्र होते

## धर्मनिष्ठा व धर्माभिमान.

शेवटी एका प्रकारच्या वर्तनक्रमाविषयीं थोडेसें लिहून हें गुणदोषविवेचनाचें प्रकरण समाप्त करू. हा वर्तनक्रम अर्थात् धर्मसबंधाच होय. मागे जागोजाग व विशेषत एकुणतिसाव्या भागात ह्या सबंधाचें बरेंच निरूपण केलें

आहे. तेव्हां त्याची येथे पुनरुक्ति करण्याची गरज नाहीं महाराजाच्या ठायीं धर्मनिष्ठा व धर्माभिमान ह्या वृत्ति अल्प वयापासूनच उत्पन्न झाल्या असून त्याचें वर्धन वयमानानें अधिकाधिक होत गेले होते ही धर्मशीलता किती अनावर होती हे त्यानीं तीनचार प्रसगीं स्वराज्यसपादनाचा क्रम सोडून मोक्षसिद्धि करण्यात शेष जीवित घालविण्याचा बेत कसा केला होता हें लक्षात आणिलें ह्मणजे कळून येण्यासारखे आहे ते कर्नाटकात मोहिमेस चालले असता वाटेत मल्लिकार्जुनाच्या देवस्थानासमोर स्वदेहत्यागाचा विचार त्याच्या मनात कसा अनावर उत्पन्न झाला होता हे वाचकास स्मरतच आहे त्याप्रमाणेच सज्जनसेवा करण्यास व साधुसताचा परामर्श घेण्यास ते सर्वदा किती तत्पर असत, व ब्राह्मणभोजने, देवस्थाने, व धर्मग्रथाचे अध्ययन करणाराची सभावना यात ते किती द्रव्यव्यय करीत असत हे मागे सागितलेंच आहे ही धर्मशीलता अनावर होऊन स्वराज्यसाधनाचा उद्योग ते अजीबात सोडून देतात कीं काय अशी भीति त्याच्या मसलतगारास नेहमी वाटत असे परतु श्रीभवानीने मालोजी राजास स्वप्नात सागितल्याप्रमाणे भोसल्याच्या कुळात शककर्ता उत्पन्न होऊन सर्व हिदु प्रजेस यवनत्रासापासून मुक्त करील असे जें त्याच्या प्रिय मातेस सर्वदा वाटत असे त्याचा प्रत्यय आपल्या ठायी स्वमातेस व स्वजनास पाहावयाचा सुयोग आला आहे अशी भावना त्याच्या ठायी पुढेपुढे उद्भूत होऊन आपण कोणी सामान्य मनुष्य नाहीं, तर ह्या आर्यभूचे पाग फेडण्यासाठी आपले जीवित आहे असें त्यास वाटे, व स्वराज्यसाधनद्वारा हिदुप्रजेस यवनाच्या ताबेदारीतून सोडविण्याचें पुण्यकर्म आमरण करीत रहाण्यातच स्वजीविताची सार्थकता आहे असा त्याच्या बुद्धीचा सुनिश्चय झाला होता त्या आपल्या कार्यास श्रीभवानी सर्व प्रकारें अनुकूळ आहे अशी त्याच्या चित्ताची पूर्ण भावना झाल्या कारणानें हरएक बिकट प्रसगी तिची आराधना करण्यास ते प्रवृत्त होत असत ही आराधना अत्यंत ऋजु अत:करणानें व परम सद्भावपूर्वक केल्यामुळे त्याच्या ठायी भवानीचा सचार होऊन ते संकटनिवारणाचा उपाय बोलत असत ह्यावरून कित्येकाची अशी कल्पना धावते कीं, हा प्रकार ते आपल्या पदरच्या साध्याभोळया लोकास भुरळ घालून स्वसंकल्पास वश करून घेण्यासाठींच केवळ करीत असत त्यावर त्यांची स्वताची श्रद्धा होती असें ह्मणता येणार नाहीं. परंतु ह्या सबंधानें प्रकृत लेखकाचें असें मत आहे कीं, हा असा स्वजनवंचनाचा प्रकार महाराज जाणूनबुजून मुळींच करीत नसत. महाराष्ट्रांत त्या काळीं असा प्रकार सर्वत्र

आढळत असे आपल्या उपास्य देवतेचें वारें कोणाच्या तरी अंगात आणून तिचा कौल घेण्याचा प्रघात त्या काळीं जिकडेतिकडे होता, व तो साप्रतहि पुष्कळ ठिकाणीं चालू आहे. यात ह्मणजे सर्वच लोक लबाडी करितात असें सहसा ह्मणवत नाहीं ह्या दृष्टीनें पाहता महाराजाचे यात पूर्ण कपट होतें असें न ह्मणता त्याच्या अगीं भाविकपणा अतिशयित होना असें ह्मणावे हें युक्त होय अनेक कठीण पेचांच्या प्रसगीं कोणती युक्ति योजावी याविषयीं पदरच्या लोकाशी खलबत केल्यावरहि त्यातून निभावण्याचा योग्य मार्ग दिसेनासा झाला ह्मणजे ते श्रीभवानीचें साहाय्य मागून विचार करण्यात अत्यंत गुंग झाले असता हे वारें त्याच्या अगात सचरे, आणि त्यानी आपल्या मनाशी केलेल्या सकल्पाचे उद्गार ह्या स्थितींत त्याच्या मुखावाटे निघत तो साक्षात् श्रीभवानीचाच कौल आहे असें समजून ते स्वत व त्याच्या पदरचे लोक एकाद्या धाडसाच्या गोष्टीचा उपक्रम बिनदिक्कत करीत असत अशा वर्तनास प्रत्येक वेळी यश येत गेल्यामुळे त्याच्या पदरच्या भोळ्या व भाविक लोकास ह्या प्रभूवर श्रीभवानीचा वरप्रसाद आहे असें वाटून त्याच्यावर पूर्ण भरंवसा त्यानीं ठेविला, तर त्यात काहीं नवल नाहीं. तेव्हां तात्पर्य काय कीं, महाराजाच्या ठायींच्या त्या काळास अनुरूप अशा ह्या पराकाष्ठेच्या भाविकपणास आधुनिक काळच्या विचारयुगात निर्माण झालेल्या पडितानी दोष लावणें किंवा त्याची उपपत्ति कपटादिकानी करणे सर्वथा उचित नव्हे

ह्याप्रमाणें प्रारंभीं उपोद्धात केल्याप्रमाणे महाराजाच्या अगच्या मुख्यमुख्य गुणांचें दिग्दर्शन करून त्यास वृथा दोष लावू पाहणाराच्या व लघुत्व आणूं इच्छिणाराच्या विधानांत कितपत तथ्य आहे तें सागितले हे निरूपण कोणास पक्षपातप्रचुर वाटले तर त्यास इलाज नाहीं आह्मा महाराष्ट्रीयांस ह्या महापुरुषाची वास्तविक योग्यता किती वाटत आहे त्याचें दिग्दर्शन करणे हें आमचें काम आहे ते कोणास रुचेल किंवा नाहीं, ह्या प्रश्नाचा विचार आम्ही बिलकुल करीत नाहीं महाराष्ट्रीयास किंबहुना अखिल भारतवर्षीयास शिवाजीमहाराज जे आज इतके ललामभूत होऊन राहिले आहेत ते कोणत्या गुणास्तव याचे विवेचन आजपर्यंत कोणींहि करावें तसें सविस्तर केलें नाहीं ह्मणून त्याच्याविषयीं पुष्कळाचे निरनिराळे प्रतिकूल ग्रह होऊन राहिले आहेत त्याचा निरास होऊन शिवाजीमहाराजांची वास्तविक योग्यता लोकाच्या लक्षात पूर्णपणें येण्यास व त्यांजविषयींचा

यथार्थ अभिमान व कृतज्ञताबुद्धि सर्व काळ जागृत राहाण्यास हा चरित्रलेख यत्किंचित् तरी साहाय्यभूत झाल्यास प्रकृत लेखक आपल्या श्रमाचे सार्थक्य झालें असें समजेल

## प्रकृत चरित्रापासून बोध.

शेवटीं ह्या चरित्रापासून आधुनिक काळाला अनुरूप असा कोणता बोध घेण्याजोगा आहे त्याचें निरूपण थोडक्यात करणें इष्ट दिसते हा बोध अर्थात् दोन प्रकारच्या लोकास होणारा आहे. एक लोकाग्रणी जनास व दुसरा साधारण ससारी जनास लोकाग्रणींत पुन दोन प्रकार आहेत-एक लोकनायक राजे व दुसरे इतर अग्रेसर जन राजेलोकानी घ्यावयाचा जो बोध तो अर्थात् देश-कालवर्तमान पाहून घेतला पाहिजे साप्रत आपला हा देश जगातील अत्यंत प्रबल व विद्याचारसपन्न अशा परस्थ राष्ट्राच्या सत्तेखाली जाऊन त्यास अननुभूलपूर्व अशा शातीचा अनुभव चिरकाल होण्याचा सुयोग प्राप्त झाला आहे सततसगरावस्था विनष्ट होऊन सर्वत्र शातीची सस्थापना झाल्याकारणानें उद्योग-युगाचा प्रभाव आमच्या देशात इतर पुष्कळ राष्ट्राहून विशेष रीतीने दृष्टोत्पत्तीस येऊं लागला आहे ही अवस्था समाजशास्त्रवेत्त्याच्या मते अत्यत स्पृहणीय होय सर्व सुधारणेचा अतिम हेतु हाच आहे ज्या राष्ट्रास परचक्रभीति किंवा देशातल्या देशात उद्भवणाऱ्या युद्धप्रसगाची भीति अहर्निश असते त्यास वास्तविक स्वास्थ्याचा अखड अनुभव सहसा घडत नाहीं, आणि जेथे अप्रतिबंध स्वास्थ्य नाहीं तेथे मनुष्यसुखवर्धक अशा औद्योगिक संस्थाचा सुविकास होणें शक्य नाहीं आमच्या देशास हा स्वास्थ्यानुभव आयताच प्राप्त झाला आहे. निदान देशांतल्या देशात होणारे युद्धप्रसग तरी ब्रिटिश लोकाच्या प्रतापानें सर्वथा बद पडले आहेत सर्व देश त्याच्या शातिछत्राखालीं निर्वेध झाला आहे. आता हें खरें कीं, ही शाति आमचें स्वातंत्र्य नष्ट होऊन आह्मास प्राप्त झाली आहे. परंतु ही परतंत्रता यवनी रियासतींत जशी अनेक प्रकारीं असह्य झाली होती तशी ती आता नाहीं. अन्याय, जुल्म व पक्षपात यांस ब्रिटिश रियासतींत उत्तरोत्तर कमी थारा मिळत आहे, व हें राष्ट्र अत्यंत सुधारलेलें असल्यामुळें जितजेतेसंबंध हळुहळू लोपत जाण्याचा दृढ संभव आहे. यवनी अमलांतील जाहगीरदारांपेक्षा आमच्या आधुनिक संस्थानिकाची स्थिति पुष्कळ चागली आहे. ते आपआपल्या संस्थानांचे पूर्ण मालक असून सार्वभौम सत्ताधीशांशीं ठरलेल्या

नियमाप्रमाणे वागत राहिल्यानें त्यास स्वस्थानभ्रष्ट होण्याची भीति फारशी नाहीं. अशा स्थितीमध्यें पूर्ण स्वातंत्र्य संपादण्याचा सर्व प्रकारी असंभाव्य हेतु कोणा संस्थानिकाच्या स्वप्नीहि येणे नाहीं तेव्हा अशा अपरिहार्य अवस्थेत प्राप्त- ऐश्वर्याचा अनुभव साधेल तेवढा घेऊन स्वस्थपणें कालक्रमणा करावी व सार्वभौम प्रभूची कृपा जेणेकरून कायम राहील ते करण्यास सर्व काळ जपावे एवढीच आपली इतिकर्तव्यता आहे असें त्यास वाटण्याचा संभव आहे परंतु ही समजूत अगदीं अनिष्ट आहे कारण येणेकरून त्याच्या ठायी आळस व व्यसना- सक्ति प्रबळ होऊन ते अगदीं निर्माल्यवत् होऊन जाण्याची भीति आहे. अशा पुरुषाना शिवाजीमहाराजाच्या चरित्रापासून घेण्याजोगा पुष्कळ बोध आहे. तलवारीच्या प्रखर तेजाने शत्रूची हृदये कंपायमान करण्याची सोय नाहींशी झाली असली तरी स्वबुद्धितेजानें सर्व जनास दिपवून टाकण्याची सोन्या- सारखी संधि त्यास प्राप्त झाली आहे यथावकाश ज्ञानार्जन करून प्राप्त ज्ञानाचा सदुपयोग स्वप्रजेच्या वास्तविक हिताकडे करण्यात अहर्निश गुंतून राहण्यात जें सौख्य व चित्ताचे समाधान आहे तें इतर कोणत्याहि व्यव- सायानें प्राप्त होणारे नाहीं आपल्या संस्थानाची सुव्यवस्था लागावी, त्यातील उद्योगधंदे व व्यापारउदीम उत्तरोत्तर वृद्धिंगत व्हावे, सुशिक्षणाचा लाभ एकंदर लोकास होऊन त्याची नीति व आचार हीं एकसारखी सुधरत राहावी इत्यादि गोष्टींचा आमच्या संस्थानिकास सर्वदा निदिध्यास लागेल तर त्याला त्याची प्रजा दुवा मागून पूर्वार्जित ऐश्वर्याचा योग्य उपयोग केल्याचें श्रेय व लौकिक हीं त्यास प्राप्त होतील शिवाजीमहाराजानी स्वराज्यसिद्धीसाठी जे अविश्रांत परिश्रम आमरण केले त्याचा एकशतांश आमच्या संस्थानिकानी स्वसंस्थानाच्या उत्कर्षा- प्रीत्यर्थ केला तरी पुरणारा आहे शत्रूंशीं सतत युद्धप्रसंग करावे लागले असूनहि महाराजाच्या ठायीं प्रजावात्सल्य किती निःसीम वसत होतें व त्याच्या सुखवृद्धीसाठीं त्यांनीं किती उपायाची योजना केली होती याचा विचार आमच्या संस्थानिकानी अवश्य करावा. आपल्या संस्थानातल्या प्रत्येक दरज्याच्या लोकाचा यथोचित उत्कर्ष होईल अशी व्यवस्था राखण्यास त्यानी झटलें पाहिजे. आधुनिक जीवन- कलहामध्यें जो जनवर्ग मागे पडून दुर्बल होत चालला आहे त्याची स्थिति सुधार- ण्यासाठीं विशेष उपायाची योजना करण्याचें त्यानीं मनावर घेतलें पाहिजे. जे लोक खरोखर लायक असतील अशासच आपलीं कामें सांगून वाढविलें पाहिजे. कोणाहि संबंधानें पक्षपात किंवा अन्याय बिलकूल करिता कामा नये.

परस्थांचें अनुकरण करून स्वप्रजेवर फाजील कराचा बोजा बसवून त्यांचे शिव्याशाप घेऊ नयेत केवळ सत्तामदवश होऊन कोणावर जुलूम करूं नये, कोणाच्या वित्तादिकाचा अपहार करूं नये, किंवा कोणाशीं अन्यायानें व उद्दामपणानें वागूं नये. स्वताचें आचरण सर्वदा शुद्ध राखावे, निंद्यव्यसनासक्त होऊन स्वताच्या आरोग्याचा व आयुष्याचा क्षय करून लोकाधिक्षेपास पात्र होऊं नये लहरी, छांदिष्ट, चलबुद्धि, अविश्वासू , निर्लज्ज, आळशी, उथळे, अविचारी वगैरे विशेषणानी स्वताची मानखंडना व तेजोहानि करून घेऊ नये राजाने काहीं केलें तरी चालते अशा समजुतीवर जाऊन कोणत्याहि अविचारमूलक फंदात सहसा पडूं नये ह्या सर्व बाबतींत शिवाजीमहाराजाचे आचरण किती निर्दोष व अनुकरणीय होते याचा सदोदित विचार करावा ज्याच्या कर्तृत्वबलेंकरून प्रत्यक्ष किंवा परंपरेने स्वतास हा ऐश्वर्यलाभ झाला आहे त्याचा योग्य अभिमान वाहून आमच्या राजानी त्याच्या चरित्रमहिम्याचे सतत मनन केलें असता त्याच्या ठायीं त्या महात्म्याचे थोडे तरी गुण खास उगम व विकास पावतील

## लोकाग्रणींनीं घेण्यासारखा बोध.

आतां इतर लोकाग्रणींनी कोणता बोध घ्यावा ते सागू अखिल जनसमाजाच्या कल्याणासाठीं किंवा विवक्षित जनवर्गाच्या उत्कर्षासाठीं उपस्थित झालेल्या सस्थाचें चालकत्व ज्याच्याकडे असते त्यानी शिवाजीमहाराजास उत्तम प्रकारें साधलेल्या लोकवशीकरणाच्या कलेचा अवलंब अवश्य केला पाहिजे कारण कोणतेंहि लौकिक कृत्य उत्तम प्रकारे सिद्धीस नेण्यास सघशक्तीची आवश्यकता अतिशयित असते जो अग्रेसर सामान्य जनाची परवा करित नाहीं, किंवा त्याच्याशी उद्दामपणानें व पक्षपाताने वागून त्यास असतुष्ट व बेदिल करितो त्याचें अग्रणीत्व त्यास असह्य व अपायकारक वाटतें. अशाने ऐक्यभावाचा लोप होऊन संघशक्तिस व्याघात घडतो त्याप्रमाणेच जो कोणी लोकस्फितीस्तव किंवा स्वकीर्तीची लालसा धरून अग्रेसरत्वाचा मान मिळवूं पाहतो, व अगीकृत कार्यांत स्वार्थैकपरताच केवळ प्रगट करितो त्याचीं पावलें ओळखण्यास लोकांला उशीर लागत नाहीं हा मनुष्य निरपेक्ष बुद्धीनें लौकिक कृत्यात वागत नाहीं, यांत याचा कांहीं तरी मतबल आहे, असें लोकांच्या नजरेस एक वेळ आलें म्हणजे त्याच्यावरून त्याचा विश्वास उडतो, ते त्याच्या तंत्रानें वागतनासे होतात, व त्याला साह्याय्य करावयाचें सोडून मागें लोटून देतात. महाराजानीं

केवळ राज्यतृष्णावश होऊन स्वैश्वर्यवृद्ध्यर्थच जर खटपट केली असती तर त्यास जे नि सीम स्वामिनिष्ठ अनुयायी लाभले ते कदापि लाभते ना त्याची स्वोत्कर्ष-लालसा त्या अनुयायिजनाच्या दृष्टीस पडताच ते त्यांच्याशीं दगा करण्यास प्रवृत्त झाले असते परंतु त्याचा अनन्य हेतु जो यवनसत्ताविनाश करून स्वदेश स्वतंत्र करण्याचा तो सिद्धीस नेण्यातच आपली इतिकर्तव्यता आहे असा त्याच्या मनाचा पूर्ण निर्धार झाला असून तत्सिद्ध्यर्थच त्याचा सारा उद्योग आहे अशी त्याच्या पदरच्या लोकाची पूर्ण खात्री झाली असल्यामुळें त्यांनीं त्यास असें उत्तम साहाय्य केले हे देशकार्याचे पवित्र व्रत आमच्या पुढाऱ्यानी धारण केले असता त्याच्या उद्योगास लोकसाहाय्य मिळण्यास मुळीच अडचण पडणार नाहीं

आमच्या देशात अनेक धर्म प्रचलित असून सहस्रावधि जातीचें बंड अस्मानें काळापासून चोहोंकडे माजलें असल्याकारणानें येथील जनसमाजाचे सहस्रावधि खंडविखड झाले आहेत स्वधर्माभिमान व स्वजात्यभिमान याचा लोकांच्या हृदयात वरपगडा होऊन ते एकमेकाचा मत्सर व हेवा करीत आहेत व एक-मेकास हीन व तुच्छ समजत आहेत अशा स्थितीमध्ये सार्वजनिक कल्याणाचा हेतु धरून कोणी पुरुष पुढं सरसावले असता त्याच्या मनातला हा आपपरभाव समूळ नष्ट झाला पाहिजे केवळ आपल्या धर्माच्या किंवा आपल्या जातीच्या लोकास तेवढे एकवट करून त्याचें हित साधण्याचा उद्देश मनात धरिला असता त्यास इतर जनाचे साहाय्य कदापि मिळणार नाहीं. आरंभी ते कांहींसे जमले तरी त्याचा वास्तविक उद्देश काय आहे ते समजताच ते त्यास आपले अग्रणी समजणार नाहींत, व त्यांजवर विश्वास ठेवणार नाहींत असें झालें म्हणजे संघशक्तीनें होणारी कार्ये कदापि यशोलाभास येणार नाहींत. त्या बाबतीत महाराजानी आमरण कसें वर्तन ठेविलें होते तें सर्वदा लक्ष्यांत वाग-वेण्यासारखे आहे त्यानीं आपल्या सत्तेतल्या जनसमाजांतील अमुक एका जातीवर किवा जनवर्गावर विशेष कृपादृष्टि न करितां सर्वांस समबुद्धीनें वाग-वेलें. ते लोकाच्या अगच्या गुणांकडे व योग्यतेकडेच फक्त पाहत असत. त्यांची जात कोणती आहे किवा त्यांचा धर्म कोणता आहे याचा विचार ते सहसा करीत नसत. फार कशाला, यवनाविषयी आरंभी त्यांच्या मनांत एवढी प्रबळ अढी होती तरी ती लवकरच नाहींशी होऊन त्यांस आपल्या पदरीं ठेव-ण्यास ते तयार झाले. शिवाय त्यांच्या राज्यांत जी यवनप्रजा असे तिला ते

इतर हिंदुप्रजेसारखीच वागवून धर्माच्या भिन्नत्वास्तव त्याचा छळ किंवा तिरस्कार यत्किंचित्हि करीत नसत ही त्याच्या ठायीची समता त्याच्या त्या काळच्या समजुतीप्रमाणे व व्यवहाराप्रमाणें पाहता अत्यंत स्तुत्यार्ह होय साप्रत काळी विचारयुगाचा प्रभाव सर्वत्र इतका झाला असता हा आपपरभाव आमच्या पुढारी ह्मणविणाऱ्या लोकाच्या चित्तातून निर्मूळ होऊ नये हे चमत्कारिक नव्हे काय ? ग्रंथ लिहावयाचे, वर्तमानपत्रे व मासिक पुस्तके चालवावयाची, सार्वजनिक सस्था स्थापावयाच्या, किवा मोठमोठे कारखाने घालावयाचे, त्यात स्वजातीच्या किवा स्वधर्माच्या लोकाचा बडेजाव व उत्कर्ष कसा होईल इकडेच लक्ष्य पुरविणारे पुरुष लोकाग्रणी म्हणवून घेण्यास मुळीच लायक नाहींत त्यानीं शिवरायाची गुणैकदृष्टि आपल्या अगी बाटविण्याचा प्रयत्न अवश्य केला पाहिजे अशा नि पक्षपाताच्या वर्तनास त्याचे कोत्या समजुतीचे जातिबाधव कांहीं वेळ दोष देतील हे खरे, परतु एकदर जनसमूहाचे हित साधण्याचे पुण्यकर्म त्याच्या हातून सुसाध्य होऊन शेवटी ते लोकस्तुतीस पात्र होतील आमच्या शिवरायाचे एतद्विषयक व्रत पुढ पेशवाईत पाळले गेले असते तर आह्मास जी आज परतत्रता प्राप्त झाली आहे ती कदाचित कधीहि आली नसती एवढा प्रचंड राष्ट्रीय अनर्थ ज्या जात्यभिमानामुळे व स्वार्थपरतेमुळे गुदरला व ज्याची विषमय फळे आह्मास व आमच्या वशजास आणखी केक शतके भोगावी लागतील असा दृढ सभव आहे, तो आमच्या अग्रेसर ह्मणविणाऱ्या लोकाच्या अगातून अद्यापि जाऊं नये हे आमच्या देशाचे मोठेच दुर्भाग्य होय आमच्या देशातला जातिभेद नष्ट होण्यास कालावधि लागणार हे खरे आहे, तरी जात्यभिमानमूलक पक्षपात व मत्सरभाव याचा साप्रतच्या दैन्यावस्थेत समूळ उच्छेद होणे अत्यंत इष्ट होय ही इष्टता लक्ष्यात वागवून आमच्या अग्रेसर ह्मणविणाऱ्या गृहस्थानी स्ववर्तन ठेवण्यास झटलें असता त्याचे अनुकरण इतर सामान्य जन हळूहळू करूं लागतील, व आमच्या जनसमाजात परस्परामध्ये ऐक्य, प्रेम व विश्वास ह्या वृत्ति उत्तरोत्तर वृद्धिंगत होत जातील, आणि जे ते आपआपल्या जातीपुरते उद्योग उपस्थित करून फळ्या व तट करीत आहेत ते बद होऊन त्यास खरे सार्वजनिक स्वरूप प्राप्त होईल, व त्यास संघशक्तीचें यथोचित साहाय्य मिळून ते सर्वजनसुखवर्धक होतील तेव्हा तात्पर्य काय कीं, लोकाग्रणींच्या ठायीं खरी देशहितबुद्धि वास करूं लागून ते वास्तविक लोकमान्य व्हावे असें असल्यास त्यांनी शिवरायाच्या चरित्राचें मनन सर्व काळ करणें उचित होय.

# संसारी जनांनीं घेण्याजोगा बोध.

येथवर लोकनायकानी व लोकाग्रणीनी महाराजाच्या चरित्रापासून कोणता बोध घेण्यासारखा आहे त्याचे नुसते दिग्दर्शन केले आता सामान्य ससारी जनानी त्याच्या चरित्रापासून कोणता बोध घ्यावा ते थोडक्यात सागून ह्या ग्रन्थाचा उपसहार करू प्रपचात नेहमी सुख व यश लाभावे असें प्रत्येकास वाटत असते त्याची सिद्धि मुख्यत्वेकरून उद्योगशीलता, निर्व्यसनता, दृढ निश्चय, सदाचार, साहस, बुद्धिमत्ता, कुशलता इत्यादि गुणानी प्राप्त होणारी असते ह्या गुणाचा प्रकर्ष महाराजाच्या ठायी किती झाला होता हे त्याचे चरित्र वाचल्याने ध्यानात येणारे आहे प्राप्त स्थितीत समाधान मानून स्वस्थ बसण्यात काहींएक पुरुषार्थ नाही ती साधेल त्या योग्य उपायाने सुधारण्याचा उद्योग निरलसपणे अहर्निश करीत राहिल्याने अगी खरा मर्दपणा उद्भवून व्यसनासक्ति व दुर्वर्तन यास थारा नाहींसा होतो हे उत्तम तत्त्व महाराजाच्या चरित्रश्रवणाने प्रत्येकाच्या मनावर उत्कृष्ट प्रकारें बिबणार आहे बुद्धिमत्ता व कुशलता अगी उत्तरोत्तर वृद्धिगत व्हावी एतदर्थ अहोरात्र परिश्रम केल्यावाचून आपले तेज कोठेच पडावयाचे नाही, व साहसादि इष्ट गुणाचा प्रादुर्भाव अगी कदापि व्हावयाचा नाहीं कारण असे पाहा कीं, ज्याला स्वबुद्धिबलाचा व स्वतःच्या अगच्या कर्तबगारीचा पुरा विश्वास नसतो त्याच्या हातून कोणतेहि धाडसाचे कृत्य होणे नाहीं महाराजाच्या ठायी ह्या गुणाचा विकास उत्तमप्रकारे झाला होता ह्मणून त्याच्या हातून एवढा पराक्रम झाला तसेच वित्ताची व ऐश्वर्याची कितीहि अनुकूलता असली तरी सन्मार्गापासून कदापि च्युत व्हावयाचे नाहीं, व कोणतेंहि दुर्व्यसन लावून घ्यावयाचे नाहीं असा अढळ निर्धार करून आपले आचरण सर्वदा पवित्र राखणारास खरी सौख्यप्राप्ति होऊन लोकाकडून मान मिळतो ही गोष्ट महाराजाच्या चरित्रात उत्तम प्रकारे प्रत्ययास येते

साप्रतच्या दुर्वह स्थितीत प्रत्येक मनुष्य आपल्या पुरते पाहूं लागला तर ते कदापि चालणार नाहीं ज्या देशात किंवा ज्या जनसमाजात आपणास आयुष्यक्रमण करावयाचें आहे त्याच्याशीं आपले कर्तव्य काय आहे तें पूर्णपणे ओळखून ते बजावण्यास त्याने कायावाचामनेंकरून झटलें पाहिजे. सार्वजनिक हितसबंधात खासगी द्वेषमत्सरादिकास अजी फाटा दिला पाहिजे. जातिभेद-

मूलक उच्चनीचत्वाचा भाव जितका कमी होईल तितकें आपल्या समाजात ऐक्य व परस्परप्रेम वृद्धिंगत होऊन हरएक देशकार्य सुसाध्य होणार आहे, हें तत्त्व त्यानें अहर्निश चित्तात वागविलें पाहिजे. कोणत्याहि धर्मसंबंधी किंवा व्यावहारिक चालीचा अप्रयोजक अभिमान धरून समाजात दुफळी किंवा कलह माजविण्याचे दिवस आता उरले नाहींत सांप्रत संघशक्ति जितकी वाढेल तितकी आपल्या देशाच्या हिताची आहे हें लक्षात ठेवून तिला विघातक अशी कृति ज्याच्या हातून होत असेल त्याचा निषेध व अधिक्षेप करण्यास कधीहि चुकता कामा नये तो आपल्या जातीचा आहे किंवा आपल्या धर्मांचा आहे हा विचार बिलकुल न करिता त्याचे करणे सर्वजनसमाजाच्या हिताविरुद्ध आहे, यास्तव तो देशद्रोही आहे असें मानावें अशा रीतीनं जो वागेल तोच खरा स्वदेशाभिमानी होय हल्ली पाहावे तर आमच्या समाजातील कित्येकांच्या बोलण्याचालण्यात जो स्वदेशाभिमान दृष्टोत्पत्तीस येत आहे तो बऱ्याच अशीं स्वजात्यभिमानमूलक आहे कित्येकांच्या आचरणात तर स्वदेशाभिमान व स्वजात्यभिमान हे एकरूप होऊन गेले आहेत ही अनिष्ट मनोविकृति हळूहळू नाहींशी होईल तरच आमच्या देशाचा तरणोपाय आहे. परंतु अलीकडे काहीं सुशिक्षित ह्मणविणाऱ्या मनुष्याच्या ठायी ही मनोविकृति विशेष प्रबल झालेली दृष्टीस पडते. त्यावरून ही अभीष्ट संसिद्धि व्हावयास अद्यापि पुष्कळ काळ लागेल असें वाटतें एकंदर जनसमाजाचे हित जेणेंकरून सुसाध्य होईल अशा संस्था उपस्थित करून त्या चालविण्याची योग्यता आमच्या लोकास अद्यापि आली नाहीं असें स्वजात्यभिमानाने पछाडलेल्या आमच्या सुशिक्षित ह्मणविणाऱ्या गृहस्थाच्या सध्याच्या आचरणावरून मोठ्या कष्टानें ह्मणावें लागते. स्वधर्मांचा किंवा स्वजातीचा अप्रयोजक अभिमान चित्तात वागवून जे लोकाग्रणी समाजात वैरभाव व दुफळी माजविण्यास प्रवृत्त होत असतील त्याचे अग्रणीत्व बिलकुल मान्य करावयाचें नाहीं व त्यास कोणत्याहि प्रकारचे उत्तेजन द्यावयाचें नाहीं असा निर्धार प्रत्येकानें केला तर असल्या अहंमन्य देशबुडव्या लोकांच्या त्रासापासून आमचा देश लवकरच मुक्त होईल. आह्मास आज जे पुढारी पाहिजेत ते शिवरायासारखे पवित्र व्रत पाळणारे पाहिजेत. ह्या कसोटीस जे खरोखर उतरतील तेच आपले पुढारी होत असें प्रत्येकास वाटलें पाहिजे.

येथे प्रकृत लेखकाची लेखणी विराम पावणार. त्याने जो हा उद्योग केला आहे त्याचा मुख्य उद्देश एवढाच आहे की, शिवाजीमहाराजाविषयी महाराष्ट्रात किंबहुना अखिल भरतखंडात जो अभिमान सांप्रत काळी जागृत झाला आहे तो लोकांच्या मनात कायम राहून त्याजविषयीची यथार्थ बुद्धि सर्व लोकांच्या मनात वसावी. महाराजांचे साद्यंत चरित्र अवलोकन केल्यावाचून ती बुद्धि कायम राहणे शक्य नाही. त्यांचे देहावसान होऊन आज सवादोनशे वर्षे लोटली आहेत. इतक्या अवकाशात त्यांचा चरित्रमहिमा अनेक गद्यपद्यात्मक ग्रंथांत ग्रथित केला आहे. अनेक यवनां व युरोपीय ग्रंथकारांनी त्यांच्याविषयी यथाबुद्धि उद्गार केले आहेत. त्याप्रमाणे ते आज कीर्तिरूपाने अमर होऊन राहिले आहेत. परंतु त्यांचे ते कीर्तिचित्र एका ठिकाणी आणून त्याचा वास्तविक प्रकार किती आहे व ते कल्पनामिश्रित आहे असे जे कित्येकांचे म्हणणे आहे त्यात कितीसे तथ्य आहे हे, त्यांचे समग्र चरित्र कथन करून, आजपर्यंत कोणीहि दाखविण्याचा प्रयत्न केला नव्हता तो प्रकृत लेखकाने यथामति व यथाशक्ति केला आहे. त्याचा यथोचित आदर महाराष्ट्रीयांकडून होईल अशी त्यास पूर्ण उमेद आहे.

# परिशिष्ट.

ह्या पुस्तकाच्या एकुणिसाव्या भागाच्या शेवटी औरंगजेबाच्या एका मुलीचें शिवाजीमहाराजावर प्रेम जडल्याची दतकथा दिली आहे, ती खरी नसावी असें प्रो जदुनाथ सरकार यानी औरगजेबाच्या ह्या मुलीसबंधानें दिलेल्या वृत्तातावरून ह्मणावें लागते आह्मी सदरील दतकथेत वर्णिलेल्या औरगजेबाच्या मुलीवर शहाजादा अकबर याच्या बडास सामील असल्याचा आरोप येऊन तिला दिल्लीजवळील एका गडावर बदींत ठेविलें असून तेथेंच तिचा १७०२ साली अत झाला तेव्हा अर्थात् सभाजीच्या मुलाचे पालन तिच्या-कडून घडलें नाहीं, आणि ती काहीं आपल्या बापाबरोबर दक्षिणेत आली नव्हती औरगजेबाबरोबर होती ती त्याची दुसरी मुलगी तिचें नाव झिनात-ऊन-निसा असें होतें सभाजीच्या मुलाचें सगोपन केलें ते ह्याच शहाजादीनें. सभाजीला पकडल्यावर, मुसलमानी धर्म स्वीकारशील तर तुला सोडू, असें त्याला सागितलें तेव्हा, ही शहाजादी मला द्याल तर मी मुसलमान होतो, असें त्यानें ह्मटले, अशी दतकथा आहे आह्मी दिलेल्या दतकथेत औरगजेबाच्या मुलीचे जे वर्णन केले आहे ते ह्या दुसऱ्या शहाजादीला लागत नाही. तुरुगात टाकलेल्या मुलीचें नाव जेब-ऊन-निसा असें असून तिला ते वर्णन लागतें तरी पण ज्या अर्थी आह्मीं दिलेली दतकथा एका मुसलमानी बखरीतूनच घेतली आहे त्या अर्थी ती अशत तरी खरी असावी असें दिसतें. तिला अटकेत ठेवल्यामुळें तिच्या हातून सभाजीच्या मुलाचे सगोपन होणें शक्य नव्हते तरी तिच्या बहिणीनें ते केलें, आणि दोघीच्याहि नावाच्या शेवटीं निसा हा शब्द असून त्या निसाबेगम ह्या नावाने प्रसिद्ध असल्याकारणानें तुरुगातली मुलगीच पुढे आपल्या बापाबरोबर दक्षिणेंत गेली असून तिच्याच हातून सभा-जीच्या मुलाचे सगोपन झाले असें मानण्यात आलें असावे आमच्या दतकथे तली शहाजादी पुढे अटकेत पडली असली तरी तिच्या मनात शिवाजी महा-राजाविषयीं प्रेमवृत्ति उद्भवली नव्हती असें ह्मणण्यास काही आधार नाहीं